# नागपुर प्रांताचा इतिहास

लेखक

यादव माधव काळे, बी. ए. एल्‌एल्. बी.

वऱ्हाडचा इतिहास व इतर ग्रंथांचे कर्ते,

मध्यप्रांत कायदेकौंसिलचे मेंबर व

भूतपूर्व अध्यक्ष. मध्यप्रांत वऱ्हाड

लिटररी अकॅडेमीचे

अध्यक्ष इ. इ.



सन १९३४.

कि. ५ रु.

A

# History Of The Nagpur province.

by

**Y. M. KALE**, B. A. LL. B.

Author of "History of Berar" and other works, Member of the C. P. Legislative Council & for some time it's president; President, C. P. & Berar Ver. Literary Academy, Etc. Etc.



**1934 A. D.** **Prisce Rs. 5**

# अर्पण-पत्रिका

साहित्यप्रेमी

श्रीमंत सयाजीराव महाराज
गायकवाड, बडोदें
सेनाखासखेल, समशेरबहादुर
जी.सी.एस्.आय्., जी.सी.आय्.ई.,
एल्. एल्. डी.

यांस

ग्रंथकर्त्याकडून सादर समर्पण

# प्रस्तावना

"मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः ॥"

नागपुर राज्याचा विस्तृत इतिहास आजपर्यंत प्रसिद्ध झाला नाहीं. हा इतिहास लिहिण्याचे छोटेखानी प्रयत्न पुष्कळांनीं केले व त्यांपैकीं कांहीं पुस्तकरूपानें सफलहि झाले आहेत. त्यांवरून भोंसल्यांचा व त्यांचे राज्याचा इतिहास स्थूल मानानें समजतो.

आम्हीं लिहिलेला वऱ्हाडचा इतिहास इ. स. १९२४ मध्यें प्रसिद्ध झाल्यानंतर आम्हीं नागपुरचा विस्तृत इतिहास लिहिण्याचें मनांत आणिलें. तोच एक व्यासंग असता तर तें काम यापूर्वीं बरेच दिवस पूर्ण व्हावयास पाहिजे होतें. परंतु खाजगी धंदा व इतर अनेक व्यवसाय सांभाळून जितका वेळ या कामास देतां येईल तेवढाच त्यास मिळाल्यामुळें कल्पनेपेक्षां जास्त काळ लागला.

नागपुरप्रांत म्हणजे वऱ्हाडप्रमाणें कोणत्याहि दृष्टीनें एक घटक नाहीं. भौगोलिक रचना, भाषा, पूर्वेतिहास वगैरे सर्व भिन्न. नागपुरकर भोंसल्यांच्या व तदनुषंगानें इंग्रजांच्या ताब्यांत जसजसे निरनिराळे मुलूख येत गेले तसतसे ते या प्रांतांत समाविष्ट झाले. छत्तीसगड व नागपुर अगर जबलपुर व चंद्रपुर अशांसारखे भिन्न संस्कृतीचे प्रदेश यांत एकत्रित झाले आहेत. यांपैकीं बराचसा भाग जंगली व मागसलेला असल्यामुळें राजकीय इतिहासाशिवाय इतर इतिहास फार थोडा आहे. सामाजिक, औद्योगिक व वाङ्मय-विषयक प्रगतीविषयीं फार थोडें लिहितां येण्यासारखें आहे.

या प्रांताचा प्राचीन इतिहास पुराणांतून व तत्कालीन इतर ग्रंथांतून फारच थोडा सांपडतो. देशाच्या व क्वचित् राजांच्या नांवांशिवाय दुसरें कांहीं सांपडत नाहीं. मध्ययुगीन कालांत मात्र उत्तरेकडील चेदि व कलचूरि राजांचा व पूर्वेकडील छत्तीसगडांतील अनेक राजघराण्यांचा इतिहास उपलब्ध आहे व अद्यापहि त्याचें संशोधन चालू आहे. पश्चिम व दक्षिणेकडील

प्रदेशाचा इतिहास गोंडांच्या अमदानीपासून सुरू होतो. तो एका स्वतंत्र भागांत दिला आहे. याप्रमाणें या इतिहासाची पार्श्वभूमि आहे.

प्रस्तुत ग्रंथास आधारभूत झालेल्या ग्रंथांची यादी आम्हीं निराळ्या जागीं दिली नाहीं. परंतु विषयानुरोधानें जागोजागीं टीपांमध्यें आधार दिले आहेत. तरीहि सर्व ठिकाणीं आधार देणें शक्य नाहीं. म्हणून सर्वसाधारणपणें आम्हीं वाचकांस खात्री देतों कीं प्रकाशित अथवा अप्रकाशित लेखी आधारांशिवाय आम्हीं कोणतेंच विधान केलें नाहीं. ऐक्कीव दंतकथा अगर आख्यायिका पूर्वी प्रकाशित झाल्या तेवढ्याच जमेस धरल्या आहेत व जागजागीं त्यांचें कमी अथवा अधिक महत्त्व दाखविण्याकरितां त्यांना आख्यायिका अगर दंतकथा या नांवानें संबोधिलें आहे. क्वचित् त्यांच्या खरेखोटेपणाबद्दल छाननी केली आहे. परंतु एकंदरींत त्यांची विश्वसनीयता वाचकांच्या बुद्धिमत्तेवर ठेविली आहे.

प्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्तींच्या कृत्यांवर अनुकूल अथवा प्रतिकूल टीका जागोजाग केली आहे. तिजविषयींहि मतभेद होण्यास जागा आहे. परंतु होईल तोंपर्यंत असे प्रसंग आम्हीं टाळले आहेत व जेथें जेथें अशी टीका केली आहे तेथें तेथें ती कोणाचें मन दुखेल अशा तऱ्हेनें केली नाहीं. तसेंच कांहीं लोकांवरील जे लोकप्रवाद आम्हांस मिथ्या वाटले ते खोडून काढून गत माणसांसहि न्याय मिळावा असा आम्ही प्रयत्न केला आहे, तो ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीनेंच केला आहे; इतर कोणतीहि बुद्धि त्यांत नाहीं. ग्रंथांत फारच महत्त्वाच्या गोष्टींविषयीं क्वचित् टीका केली आहे. परंतु चर्चा अगर व्याख्यान केलें नाहीं. कारण तसें केलें असतें तर ग्रंथ फारच वाढला असता. शिवाय अशा चर्चेंत मतभेदहि होण्याचा संभव असतो. तें काम वाचकांवर व टीकाकारांवर सोंपविलें आहे. भोंसले आडनांवाच्या उत्पत्तीसंबधीचे जुने तर्क आतां कुचकामाचे ठरले आहेत म्हणून त्यांचा उल्लेख केला नाहीं. आडनांवांची उत्पत्ति नेहमींच लागते असें नाहीं. भोंसल्यांच्या आडनांवाच्या उत्पत्तीबद्दल एकहि तर्क समाधानकारक नाहीं.

या पुस्तकाच्या ऐतिहासिक साधन-ग्रंथांत नाग० भोंसल्यांची छापील बखर व कागदपत्रें यांस अग्रमान दिला पाहिजे. वरील बखर ही अस्सल कागदपत्रांच्या आधारानें लिहिलेली आहे यांत संशय नाहीं. बखरकार हा

जरी आधुनिक इतिहास-शास्त्रास पारखा होता व जुन्या तऱ्हेच्या पौराणिक बखरीच्या वळणापासून अलिप्त नव्हता तरी एकंदरींत त्याचा प्रयत्न त्याच्या कालाच्या व परिस्थितीच्या मानानें चांगला साधला आहे. प्रकाशित व अप्रकाशित कागदपत्रांचा जसजसा आमचा जास्त जास्त परिचय होत गेला तसतसा या बखरीविषयींचा आमचा आदर जास्तच वाढत गेला हें आम्हांस कबूल केलें पाहिजे. नाग०चे कागदपत्र हें तर अत्यंत महत्त्वाचें व बखरीच्या दोषांपासून मुक्त असेंच साधन होय. हे कागदपत्रहि आतां दुर्मिळ झाले होते. परंतु रा. **गोविंदराव सरदेसाई, कृ. पां. कुलकर्णी** व **प्रस्तुत लेखक** यांनीं पुणें येथील समर्थ भारत छापखान्याचे मदतीनें ते कागद व इतर दुर्मिळ कागद क्रमवार लावून " ऐतिहासिक पत्रव्यवहार " या नांवानें नुकतेच पुनर्मुद्रित केले आहेत. त्यामुळें हीं अस्सल साधनें आतां अभ्यासकांस उपलब्ध झालीं आहेत. वाण काय ती अभ्यासकांचीच आहे.

पेशवे दप्तराच्या पुनर्मुद्रणानेंहि अस्सल सामुग्रीचें दुसरें एक मोठेंच द्वार खुलें झालें आहे. त्यांतील भाग २० हा नाग. भोंसल्यांविषयीं आहे. त्याचा वरील कामांत फार उपयोग झाला आहे. विशेषतः माधवराव पेशव्याच्या जानोजीवरील दोन्ही स्वाऱ्यांची विस्तृत माहिती यांत आली आहे. तसेंच कान्होजी भोंसल्याच्या उत्तर चरित्राची अगदींच अज्ञात असलेली माहिती या भागांत प्रथमच पुढें येत आहे.

**ग्रँट डफचा** इंग्रजी इतिहास जरी बराच अपूर्ण व कांहीं कांहीं ठिकाणीं चुकलेला आहे तरी अद्यापहि त्याचें महत्त्व व उपयुक्तता अढळच आहे. मात्र लेखकाची इंग्रजी दृष्टी वजा करून तो वाचला पाहिजे. उदाहरणार्थ डफ साहेबांना पेशवे व भोंसले यांच्या भांडणांत ब्राम्हण व ब्राम्हणेतर वर्चस्वाचा झगडा दिसतो. परंतु त्यावेळीं या वादाचें अस्तित्व कोणत्याच स्वरूपांत नव्हतें. इंग्रज लेखकांच्या कल्पनासृष्टींतून निघालेले हे विचार हल्लींच्या कांहीं जात्यंध लेखकांनींहि सोईस्कर म्हणून उचलले आहेत. परंतु हा वाद निव्वळ अलीकडचा असून त्यावेळचीं भांडणें व्यक्तिविषयक अथवा अशाच हेतूंनीं झालीं होतीं.

**सरदेसाई** यांच्या रियासती ही तर मराठ्यांच्या इतिहासाच्या माहि-तीची खाणच आहे. आजपर्यंत उपलब्ध असलेली प्रचंड सामुग्री आवाक्यांत

आणून ती एकत्रित करणें याचें महत्त्व हें काम जो कोणी करील त्यासच समजण्यासारखें आहे.

**राजवाडे** व **खरे** यांच्या साधन ग्रंथांची आतां तारीफ करणे म्हणजे सूर्याला दिव्यानें ओवाळण्यासारखें आहे. पण त्यांचा नामनिर्देश केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. त्यांच्या साधनसामुग्रीचाहि आम्ही पूर्ण उपयोग करून घेतला आहे. वरील ग्रंथकारांच्या ग्रंथांचा उपयोग इतका सर्वसाधारण झाला आहे कीं प्रत्येक स्थळीं त्यांचा उल्लेख करणें शक्य नव्हतें.

इ. स. १८०३ पासून तों १८५३ पर्यंतच्या पन्नास वर्षांतील इतिहास इंग्रजी अमदानीचा होय. मध्यप्रांत सरकारानें प्रसिद्ध केलेल्या निरनिराळ्या रिपोर्टांचा व चोपड्यांचा या कामीं फार उपयोग झाला आहे. तसेंच मध्यप्रांत सरकारच्या ताब्यांत जे कांहीं अप्रकाशित कागदपत्र अद्याप कायम आहेत त्यांचा त्यांनीं आम्हांस उपयोग करूं दिला याबद्दल त्य सरकारचेहि आभार मानले पाहिजेत.

अप्रकाशित कागद पत्रांत मुख्यत्वें कै. **सर गंगाधरराव** व त्यांचे पुत्र श्री. रा. **माधवराव** ऊ० राजाबाळ सा. यांच्या मदतीचा उल्लेख करणें जरूर आहे. त्यांच्या ताब्यांतील कागदपत्र त्यांनीं मोठ्या आनंदानें आम्हास पाहावयास दिले. तसेंच कै. राजे **लक्ष्मणराव,** उमरावतीकर भोसल्यांच्या शाखेचे विद्यमान प्रतिनिधि श्री. **बाबासाहेब भोंसले** व इतर लहान मोठ्या लोकांनींहि या कामीं शक्य ती मदत केली आहे. पुण्याचें भारत इति. सं. मंडळ व वांईचे **वैद्य** यांनींहि आपल्या अप्रकाशित संग्रहांचा उपयोग आम्हांस करूं दिला. उलटपक्षीं व्यक्तिशः व सर्वसाधारणपणें विनंतिपत्रें पाठविलीं असतां नुसतें उत्तरहि पाठविण्याचें दाक्षिण्य ज्या सद्‌गृहस्थांना दाखवितां आलें नाहीं त्यांच्या अनास्थेचेंहि कौतुक करावें तितकें थोडें आहे. भवानी काळू, भवानी मुनशी व दिवाकरपंत चोरघोडे यांच्या सारख्यांच्या दीर्घ कालीन कर्तृत्वाचा लेखी चिठोराहि त्यांच्या घराण्यांत आज सांपडूं नये हें इतिहासाचें दुर्दैव समजलें पाहिजे.

नागपुर प्रांतांत इतिहासाचे अभ्यासक व जिज्ञासु यांचा दुष्काळ असल्यामुळें या विषयाची साधारणपणें अनास्थाच दिसून येते. प्रांतस्थ लोकांत शिक्षणाचा प्रसार कमी. बाहेरील लोकांस या कामांत आपलेपणा वास्त-

विक कमी वाटावा. पण आजपर्यंत जें कांहीं काम केलें आहे तें मात्र कै. **वामनराव ओकां**सारख्या परप्रांतस्थांनींच केलें आहे. हे त्यांचे उपकार प्रांतस्थांना विसरतां येणार नाहींत.

या ग्रंथास "नागपुर प्रांताचा इतिहास" असें नांव जरी दिलें आहे तरी त्यांत मुख्यत्वें नागपुरकर भोंसल्यांचा इतिहासच आला आहे. हें दुसरें नांव आम्ही ग्रंथास दिलें असतें तर मध्यकालीन राजघराण्यांचा व गोंडांचा इतिहास जो आम्ही आरंभीं दिला आहे तो अस्थानीं झाला असता म्हणून प्रांतिक इतिहासाचेंच नांव देणें बरें वाटलें.

वऱ्हाडच्या इतिहासाचे धर्तीवर वाङ्मय, भाषा, चालीरीति वगैरे इतिहासाच्या उपांगांचा परामर्ष आम्हांस घेतां आला नाहीं. एक तर वऱ्हाड हा जसा सर्वांगानें एकसारखा स्वतंत्र घटक तसा हा प्रांत नाहीं. यांतील मराठी भाग साधारणपणें वऱ्हाडासारखा तर उत्तर भाग संयक्त प्रांतासारखा आहे. परंतु त्यास स्वतंत्र स्थान देतां येण्यासारखें नसून वरील दोन्ही केंद्रांच्या कक्षेंतच या दोन्ही भागांची संस्कृति येते. छत्तीसगड हा अल्प प्रमाणांत एक स्वतंत्र घटक असून त्याची वेगळी संस्कृति थोडीबहुत अद्याप कायम आहे.

दुसरें कारण ग्रंथविस्तार. हल्लीं वाचकांपुढें ठेवलेला भागच संकल्पित मर्यादेच्या बराच बाहेर गेला आहे. त्यांतच वरील विषयांची भर घालण्याचा प्रयत्न केला असता तर एका भागांत ग्रंथ आटोपणें अशक्य झालें असतें. त्यामुळें वरील विवेचन व इतर कांहीं भाग लिहून तयार असलेले ते सुद्धां गाळावे लागले. ग्याझेटियरच्या धर्तीवर स्थानिक माहिती व तत्संबंधीं दंतकथा ह्याहि एका परिशिष्टांत द्यावयाच्या होत्या. त्यांत इतिहास जरी विशेष नसला तरी त्या सामान्य वाचकांस मनोरंजक वाटतात. परंतु विस्ताराच्या भयानें हेंहि प्रकरण गाळावें लागलें.

ग्रंथांत सर्वत्र इंग्रजी मित्त्या दिल्या आहेत हें कित्येकांस आक्षेपार्ह वाटेल. परंतु सर्व बाजूंनीं विचार करितां हीच पद्धति वाचकांस सोइस्कर होईल असें वाटलें.

प्रस्तुत ग्रंथांत भोंसल्यांच्या वंशांतील राज्यकर्त्यांचीं व इतर चित्रें दिलीं आहेत तीं जशीं उपलब्ध झालीं तशीं दिलीं आहेत. पहिल्या रघूजीचें विश्व-

सनीय चित्र उपलब्ध नाहीं. हल्लीं नागपुरकरांच्या जवळ जीं चित्रें आहेत तीं अलीकडे काढलेलीं असून मोठींशीं विश्वसनीय दिसत नाहींत. जानोजी (पहिला) व मुधोजी यांचीं चित्रें एलिचपुरच्या नबाबाच्या पदरच्या एका चिताऱ्यानें काढलीं असून तीं उत्तर हिंदुस्थानच्या मोंगल व रजपूत पद्धतीचीं आहेत. वरील अस्सल चित्रें प्रस्तुत लेखकाच्या संग्रहीं असून पाऊणशें वर्षांपूर्वीं काढलेलीं आहेत. पण तीं जुन्या चित्रांवरून काढलीं असावींत असें त्याच संग्रहांतील चित्रांवरून दिसतें. नागपुरचें आप्पासाहेबाचें चित्र अगदींच अविश्वसनीय असून त्याच्या वयासहि शोभणारें नाहीं म्हणून तें आम्ही घेतलें नाहीं. आप्पासाहेब इंग्रजी अमदानींतला म्हणून इंग्रज कारागिरांकडून तरी तें पूर्वीं काढलें गेलें असावें या दृष्टीनें आम्ही विलायतेंत व हिंदुस्थानांत बराच तपास केला. शेवटीं कै. रा. ब. पारसनीस यांच्या संग्रहांत त्यांनीं विलायतेंत मिळविलेलें आप्पासाहेबाचें एक चित्र आहे असा तपास लागला. रा. ब. यांचे चिरंजीव रा. बाबूराव यांनीं कृपा करून त्याचा फोटो आम्हांस दिला व तो विश्वसनीय दिसल्यावरून तोच आम्ही घेतला आहे, रेसिडेंट रिचर्ड जेन्किन्स याचेंहि चित्र मिळेना. परंतु शेवटीं तें नागपुरचे गव्हर्मेंट हाऊसमध्येंच सांपडलें व ना० गव्हर्नर मध्यप्रांत यांनीं त्याचा फोटो मेहेरबानीनें आम्हांस दिला. पेशवे दप्तर भा. २० मधील हस्ताक्षरें उतरून घेण्यास मुंबई सरकारानें आम्हांस परवानगी दिली. वरील सर्वांचे याबद्दल आम्ही आभार मानतों. प्रस्तुत पुस्तकानें नागपुरच्या इतिहासाची एक उणीव भरून निघेल अशी आशा आहे.

अप्रकाशित कागदपत्रांच्या बाबतींत ग्वाल्हेरचे रा. भास्कर रामचंद्र भालेराव यांच्या संग्रहाचीहि फार मदत झाली आहे. म० साहित्य संमेलनास ग्वाल्हेर येथें गेलों असतां त्यांनीं आम्हांस अगत्यानें आपले नोकरीचे गांवीं नेऊन आपला संग्रह दाखविला. त्यांत व्यंकोजी व रघूजी यांमधील तेढ व दौलतराव शिंद्याशीं कारस्थान; तसेंच शिंदे भोंसले यांनीं भोपाळचें राज्य जिंकून वांटून घेतलें याबद्दलचा महत्त्वाचा पत्रव्यवहार पहावयास मिळाला.

बुलढाणा
ता. १-५-१९३४

यादव माधव काळे

# नागपुर प्रांताचा इतिहास

# अनुक्रमणिका

---

## चित्रें



---

## नकाशे



---

## हस्ताक्षरें



---

# कांहीं प्रमुख वंशावळी

# महत्त्वाच्या मित्या.

---

१ **परसोजी भोंसले** यास सेनासाहेब सुभ्याची सनद
शके १६२९ अखेर (इ. स. १७०७) बखर पा. २३
परसोजीचा मृत्यु शके १६३२. (फसली ११११)
इं. ता. १७०९–१०. (ना. का. ले. १ बखर पा. २४ टीप)
समाधिठिकाण— कृष्ण वेण्या संगमी मौ. खेड (साताऱ्याजवळ)
येथें असून स्मशान स्थळाचे व्यवस्थेकरितां शाहूनें इनाम जमीन तेथेंच
दिली. (ना. का. ले. ५०)

२ **कान्होजीस** सेनासाहेब सुभ्याचें पद इ. स. १७१० (ना. का. ले. ५०)
पदभ्रष्ट इ. स. १७३०
कान्होजीचा मृत्यु— साताऱ्यास शाहूच्या नजर कैदेंत.

३ **पहिले रघूजीस** सेनासाहेब सुभ्याची सनद—
राज्या. शके ४९ (इ. स. १७२३) या सनदेंत सेनासाहेब सुभ्याचें
पदाचा उल्लेख नाहीं. वऱ्हाड, गोंडवण वगैरे प्रांतांची चौथाई वगैरे
हक्क वसूल करण्याची सनद आहे.
प. रघूजीचा मृत्यु: नागपुर येथें फाल्गुन शु० ३ शके १६७६.
इं. ता. १४–२–१७५५.

४ **जानोजीस** से. सा० सु. वस्त्रें. छत्रपतीकडून श्रावण शु॥ ६ श.
१६८३. इं. ता. ६-८-१७६१ नानासाहेब पेशव्याकडून इ. स. १७५७
मध्यें पुण्यास मिळालीं होतीं परंतु छत्रपतीकडून मिळालीं नव्हतीं.
मृत्यु—मुक्काम येरळ प्र. नलदुर्ग प्रांत गंगथडी येथें. वैशाख शु॥ १५
श. १६९४ (ता. १६।५।१७७२) (ना. भो. का. ले. २५)

५ **मुधोजी**—सेना धुरंधरीचीं वस्त्रें. इ. स. १७५७ नानासाहेबाकडून.
मृत्यु—नागपुरास. वैशाख शु॥ १५ श. १७१० (ता. १९ मे. १७८८)

६ **दु० रघूजी.** सेनासा० सु० वस्त्रें—२४।६।१७७५.
मृत्यु—नागपुर येथें. मि. फाल्गुन व॥ ९ श. १७३७ (२२।३।१८१६).

७ **व्यंकोजी** सेना धुरंधरीचीं वस्त्रें.

मृत्यु काशी येथें. सन. १८११ ऑगस्ट. (श्रावण श० १७३३)

८ **खंडोजी ऊ० चिमणाबापू** सेना बहाद्दर–सनद व वस्त्रें व मंडल्याची सनद. ता. ६।२।१७८०

मृत्यु—नागपुरास. श्रावण व. १० श. १७११ ता. १६।८।१७८९.

९ **दु. परसोजी ऊ. बाळासाहेब**— वस्त्रें १४।४।१८१६

मृत्यू–१।२।१८१७ इ. नागपुर येथें.

१० **आप्पासाहेब**–वस्त्रें २१।४।१८१७.कैद व राज्यभ्रष्ट १५।३।१८१८ इ.

मृत्यु–जोधपुर येथें. ता. १५।७।१८४० इ.

११ **ति० रघूजी**—गादीवर स्थापना १८१८

मृत्यु–नागपूर येथें ११।११।१८५३. त्यानंतर राज्य खालसा.

---

# शुद्धिपत्र

( सहज लक्षांत येणाऱ्या चुका दुरुस्त केल्या नाहीत. )

| पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | शेवटची | ओडू | ओड्र |
| २ | टीप १ ओळ ४ | वरदाकले | वरदाकूले |
| ३ | शेवटची | उच्छकल्प | उच्चकल्प |
| ४ | ३, ४ | ,, | ,, |
| ,, | २४ | आटव्या | पांचव्या |
| ५ | १० | १४८ | २४८ |
| ,, | २० | " गांगेय " यापुढें " त्याचा पुत्र कर्ण " हीं अक्षरें जास्त वाचावीं. | |
| ६ | टीप २–१ | या | नाग |
| ७ | ३ | चित्रकोट | चक्रकोटच |
| ,, | १८ | उदयागिरी | उदयगिरि |

११५ टीपेंतील छापलेला मजकूर खोडून त्या जागीं " वावीकर. पुढें पृष्ठ २४१ पहा " असें वाचावें.

२२४ टीप— जगन्नाथपुरी हीं अक्षरें खोडावीं व पुढें पुढील मजकूर वाचावा. " हें पुरुषोत्तमपुर जगन्नाथाच्या जवळच पण निराळें आहे. नकाशा पहा. "

# नागपुरच्या राजवटींतील कांहीं हस्ताक्षरांचे नमुने

—१—



पहिला रघूजी

—२—



जानोजी

---

# नागपुर प्रांताचा इतिहास

## भाग १ ला

## प्राचीन काळ व मध्ययुग

मध्यप्रांत हा नैसर्गिक रीतीनें अगर राजकीय परंपरेनें एक सलग प्रांत नसून यदृच्छेनें भोंसल्यांच्या व त्यानंतर इंग्रजांच्या ताब्यांत आलेल्या प्रदेशाचें एक जाळें आहे. विंध्य पर्वताच्या व सातपुड्याच्या शाखा पश्चिमेकडून पूर्वेकडे गेल्या आहेत. त्यांतील डोंगराळ भाग हा प्राचीन सुधारणेच्या केंद्रांत फारसा आला नाहीं. त्याच्या उत्तरेकडील भाग उत्तर हिंदुस्थानच्या सुधारणांशीं संलग्न असून प्रथम दक्षिणेकडील व नंतर चेदि देश या नांवानें संबोधिला जात असे. हल्लींच्या जबलपूर व सागरच्या भोंवतालचा प्रदेश या चेदि देशांत मोडत असे. पौराणिक—कालीन **शिशुपाला**चा हा देश.

अयोध्येचें राज्य कोसल या नांवानें संबोधिलें जात होतें. नंतर त्याचे उत्तर—कोसल व दक्षिण—कोसल असे भाग झाले. **दक्षिण—कोसल** देश श्रीरामचंद्राचा पुत्र **कुश** याचे वांट्यास येऊन त्यानें विंध्य पर्वतांत **कुशस्थळी** अथवा **कुशावती** येथें राजधानी केल्याचा उल्लेख सांपडतो. रामायण, महाभारत, पद्मपुराण, वायुपुराण, विष्णुपुराण इत्यादि ग्रंथांतून या दक्षिण कोसल देशाचे उल्लेख आढळतात. रत्नावलि नाटिकेंत सेनापति **वत्स** यानें विंध्य पर्वताचे प्रदेशांत कोसल देशाच्या राजास घेरलें असा उल्लेख आहे.

विंध्य पर्वताच्या उत्तरेकडील प्रदेश हा **चेदि** देश या नांवानें मोडूं लागला. परंतु दक्षिणेकडील प्रदेश मात्र **दक्षिण—कोसल** याच नांवानें संबोधिला जात असे त्याची मर्यादा उत्तरेस चेदि देश, दक्षिणेस कलिंग, पश्चिमेस विदर्भ व पूर्वेस उत्कल (ओड्र) ऊर्फ ओरिसा, वंग वगैरे देश

अशी होती यांत नागपुर जिल्ह्याच्या पूर्वेपासून तों सर्व छत्तिसगड विभाग व विंध्य पर्वतापासून तों दक्षिणेस तेलंगणापर्यंत मुलूख मोडत असे व या विस्तारानंतर त्यास **महा-कोसल** असेंहि म्हटलेलें आढळतें.

वऱ्हाडच्या पूर्वेस जेथपावेतो मराठी भाषा चालू आहे तो थोडासा भाग हा मात्र या कोसल देशाच्या मर्यादेंत येत नव्हता. तो पश्चिमेकडील विदर्भ प्रांतांत मोडत असे.[१] अयोध्येच्या भोंवतालच्या कोसल प्रांताहून या कोसलाचें भिन्नत्व दर्शविण्याकरितां त्यास दक्षिण कोसल असें म्हणत; छत्तिसगडास क्वचित् प्राक्कोसल असेंहि नांव होतें.[२] दक्षिण कोसल व प्राक्कोसल मिळून महाकोसल असेंहि नांव सांपडतें. महाकोसलांत विंध्य पर्वताचे उत्तरेकडील चेदि देशाचा समावेश होत नव्हता.[३]

मध्ययुगांत मात्र महाकोसल प्रांतांत अनेक राजघराणी होऊन गेली त्यांमुळें या युगात **महाकोसल** हा मोठा सुधारलेला देश बनला. ही घराणी दीर्घकाल टिकून राहिल्यामुळें त्यांनी केलेल्या लोकोपयोगी कामांच्या खुणा अद्याप दिसतात. त्या वेळचे अनेक ताम्रपट, शिलालेख व नाणीं उपलब्ध आहेत. व अद्यापहि सांपडत आहेत. या प्रदेशांत बुद्ध धर्माचाहि प्रसार बराच झाला होता असे दिसतें. जबलपुराजवळील **रूपनाथ** येथील खडकावरील लेख, **भांदक** येथील गुहेंतील लेख व छत्तीसगडांतील अनेक लेख यांवरून बुद्ध धर्माचा प्रसार या प्रांतांत बराच झाला होता असें दिसतें. **नागार्जुन** हा

---

१ मालविकाग्निमित्र नाटकांत उल्लेख आहे की, विदर्भाचें राज्य वर्धा नदीच्या दोन्हीकडे असून दोघा भावांस तें वाटून देतांना वर्धेच्या पश्चिमेकडील भाग एका भावास दिला व पूर्वेकडील अर्धा दुसऱ्यास दिला. " तो पृथग्वरदाकूले शिष्टामुत्तरदक्षिणे " माल. अं. ५ श्लोक. १३ वऱ्हाडचा इतिहास पा. ६१

२ क्वचित् काशीच्या प्रदेशास काशिकोसल अथवा प्राक्कोसल असें नांव सांपडतें.

३ प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनसंग यानें विदर्भाचाहि अंतर्भाव चुकीनें कोसलांत केला आहे. परंतु तो विदर्भांत स्वत: मुळीच न गेल्यामुळें ही त्याची चुकी झाली असावी.

प्रसिद्ध बुद्ध पंडित जरी विदर्भात जन्मलेला होता तरी तो महाकोसलांतच प्रसिद्धीस आला. नागार्जुनाची गुहा **रामटेक** येथें दाखविण्यांत येते.

बुद्ध धर्माप्रमाणेंच जैन धर्माचाहि या प्रांतांत एके काळीं बराच प्रसार झाला होता असें दिसतें. जैनाच्या अनेक मूर्ती ठिकठिकाणी सांपडतात त्यांपैकी बऱ्याच मूर्ती नागपुर येथील पदार्थसंग्रहालयात ठेविल्या आहेत.

## मध्ययुग

मध्ययुगीन कालांत हा प्रदेश वेळोवेळी मौर्य,गुप्त,आंध्र,राष्ट्रकूट, चालुक्य वगैरे परप्रांतस्थ साम्राज्यांत अंतर्गत झाला होता. याचें विस्तृत वर्णन अन्यत्र उपलब्ध असून त्यांच्या कारकीर्दीत या प्रांतांत घडलेल्या महत्त्वाच्या गोष्टी उपलब्ध नाहीत. म्हणून या प्रांतांत होऊन गेलेल्या राजवंशांचीच थोडक्यांत माहिती देण्याचें आम्ही योजिलें आहे.[१]

**वाकाटक राजवंश**--इ. स. तिसऱ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंत वाकाटक या नावाचें राजघराणे महाराष्ट्रांत राज्य करीत होतें. त्याचा अंमल उत्तरेस नर्मदेपर्यंत व पूर्वेस हल्लीच्या मराठी मध्यप्रांतावर होता. पश्चिमेस कोंकणापर्यंत व दक्षिणेस कृष्णा नदीपर्यंत त्याचा अमल होता. या वंशाचे ताम्रपट व शिलालेख शिवणी,चांदूर व बुंदेलखंडांतील नाचणा येथपर्यंत सापडले आहेत. हे राजे मुख्यत्वें विदर्भ ऊर्फ महाराष्ट्राचे राजे होते, तरी त्यांचा अंमल मध्य-प्रांतातील पश्चिम व उत्तर भागांवर होता असें दिसते. त्यांच्या राजधानीचें गांव प्रवरपूर हें कोठें होतें त्याचा अद्याप पत्ता लागला नाही. चंद्रपुराजवळील **भांदक** ऊर्फ **भद्रावती** हें त्यांचें राजधानीचें गांव असावें असा एक तर्क आहे. वाकाटकांचें समकालीन राज्य पूर्वेस हल्लींच्या छत्तीसगडांतील त्या वेळच्या कोसलावर राज्य करणाऱ्या शरभपूरचें राज्य हें होते. शरभ-पूरच्या **महासुदेव** या राजाचें नांव तत्कालीन ताम्रपटात सांपडतें. कोसलाच्या राजासहि वाकाटकांनी जिंकिलें होतें असा उल्लेख एका ताम्रपटांत सांपडतो. त्याचप्रमाणें बुंदेलखंडांतील **उच्चकल्प** वंशांतील **व्याघ्रराज** नांवा-

१ साधनें 1 Hiralal's Inscriptions in C. P. and Berar. (2nd edition). 2 Mahakosal Historical Society's Papers.
नं. १ च्या पुस्तकांत सर्व मध्ययुगीन घराण्यांची सविस्तर माहिती दिली आहे.

चा राजा वाकाटकांचा मांडलिक होता असे नाचणा येथील ताम्रपटांत म्हटलें आहे.

**परिव्राजक (उच्छकल्प)**–इ. स.पांचव्या शतकापासून जबलपुरचे आसपास **परिव्राजक व उच्छकल्प** या नांवाचे राजवंश राज्य करीत होते. ते प्रथम गुप्त राजांचे मांडलिक होते असें बैतूलच्या शिलालेखांवरून समजतें. परिव्राजकांची राजधानी जबलपूर जिल्ह्यांत **दाभारा** येथें होती व उच्छकल्पांची राजधानी वाघेलखंडांत **उचेहला** येथें होती. दाभाला यास **डाहल** असें नांव होतें व त्यावरून त्या प्रांतास **डाहल** देश असेंहि नांव होतें. त्याची मर्यादा भागीरथीपासून नर्मदेपर्यंत समजली जात होती.[१]

**श्रीपुरचे सोमवंशी राजे**–छत्तिसगडांत **शिरपुर** म्हणून एक प्राचीन गांव रायपुर जिल्ह्यांत महानदीचे कांठावर आहे. त्याचें जुनें नांव **श्रीपुर** असें असून तेथें प्राचीन इमारतींचे अवशेष अद्याप आहेत. **श्रीपुर** येथें एक सोमवंशी राजकुल इ. स.चे सहाव्या शतकाचे सुमारास राज्य करीत होतें. त्यास **राजर्षितुल्यकुल** असेंहि त्यांच्या ताम्रपटांत लिहिलेलें आहे. हें राजघराणे प्रथम **भद्रावती** ऊर्फ **भांदक** येथें राज्य करीत होतें व तेथून तें पदभ्रष्ट झाल्यामुळें त्यांनीं **श्रीपुर** येथें जाऊन कोसल देशावर राज्य केलें असा तर्क आहे. या घराण्याचे ताम्रपट **शिरपुर, भांदक, बलोदा, राजीम** व **खरोद** वगैरे ठिकाणीं सांपडले आहेत. या वंशांतील राजांनी आपला राज्यविस्तार ओरिसा प्रांतापर्यंत केला होता. त्यांचेपैकीं **महाभवगुप्त** (जनमेजय), **महाशिवगुप्त** (ययाति) व **महाभवगुप्त** (भीमरथ) यांनी ओरिसा प्रांतांतील **पाटणा** व **सोनपुर** या भागांतील गांवें दान दिल्याबद्दल ताम्रपट सांपडले आहेत.[२]

**शरभपूर वंश**– छत्तिसगडांतच आठव्या शतकाचे सुमारास **शरभपुरचे** राजघराण्याचा उल्लेख सांपडतो. या वंशाचे ताम्रपट छत्तिसगडांत **रायपूर** व

१ भागीरथीनर्मदयोर्मध्यं डहलमंडलम् ।

Malkapuram stone Inscription

2 Banerji's History of Orissa Vol. I. Chap. XIV

**खैरियार** येथें सांपडले आहेत. त्यांत **सुदेवराय** नांवाच्या राजाचें नांव आहे. हा **सुदेव** पश्चिमेकडील वाकाटकांच्या समकालीन होता.

**कलचूरिवंश**— चेदि देशांत म्हणजे हल्लीच्या जबलपुरचे भोंवतालीं **कलचूरि** वंशाचें साम्राज्य होतें. हे कलिचूरि राजे आपणांस "**हैहय**" नांवाच्या क्षत्रिय राजघराण्याची शाखा असें म्हणवीत असत व आपल्या वंशाचा आरंभ रावणाचा पराभव करणाऱ्या सहस्त्रार्जुनापासून दाखवीत. जबलपुराजवळ **त्रिपुर** ( हल्लीचें **तेवर** ) म्हणून गांव आहे. तेथें कलचूरि राजांची राजधानी होती. त्यांच्या अमलाखालीं सर्व चेदि देश येत असे. यांचा मूळपुरुष **कोक्कलदेव** नांवाचा समजला जातो. या कलचूरि राजांनीं स्वतःचा **चेदिशक** नांवाचा शक सुरू केला. त्याचा आरंभ इ. स. १४८ पासून होतो. हा शक चेदि व कोसल प्रांतांत बरेच दिवस चालू होता.

कलचूरीचा राज्यविस्तार फार मोठा होता असें दिसतें. हल्लीच्या मध्यप्रांताशिवाय त्यांचें राज्य पश्चिमेस गुजराथेपर्यंत व उत्तरेस यमुना नदीपर्यंत पसरलें होतें अशाबद्दल पुरावा सांपडतो.

**कोक्कलदेव** हा इ. स. च्या नवव्या शतकांत होऊन गेला. त्यावरून कलचूरि राजघराणें त्यापूर्वीहि बरेच दिवस नांदत होतें असें दिसतें. या घराण्याचे लग्नसंबंध राष्ट्रकूट, चंदेल, चव्हाण व चालुक्य वगैरे क्षत्रिय कुलांशीं झालेले होते. या राजवंशानें बारावे शतकाचे अखेरीपर्यंत राज्य केलें व कलचूरि वंशांत पहिला **कोक्कलदेव**[१] (इ. स. ८७५) व शेवटचा राजा **गांगेय** (इ. स. १०३८) हे राजे अतिशय प्रसिद्ध होते. गांगेयदेवास त्याचे पराक्रमावरून "**विक्रमादित्य**" असें म्हणतात व त्यानें आपल्या नांवाचे सोन्याचें नाणेंहि पाडलें होतें. त्याचेनंतर पांच सहा राजे या वंशांत होऊन गेले. परंतु त्यानंतर या वंशास उतरती कळा लागून भोंवतालच्या राजांनीं त्यांचें सर्व राज्य घेतलें. कलचूरि राजघराणें अस्तास जाण्याचे सुमारास मध्यप्रांतांत गोंडांनीं आपलीं स्वतंत्र राज्यें स्थापिलीं.

**रतनपुरचे हैहयवंशी राजे**—त्रिपुरीच्या कलचूरि ऊर्फ हैहयवंशी राजांपैकींच एका शाखेनें दहाव्या शतकाचे सुमारास छत्तिसगडांत म्हणजे त्या

---

१ तेषां हैहयभूभुजां समभवद्वंशे स चेदीश्वरः ।
श्रीकोकल्ल इति स्मरप्रतिकृतिर्विश्व-प्रमोदो यतः ॥

वेळच्या कोसल देशांत स्वतंत्र राज्य स्थापिलें. त्याची राजधानी बिलासपुराजवळ **तुम्माण** [१] येथें होती. परंतु पुढें ती **रतनपुर** येथें गेली. या राज्याचा पहिला पुरुष "**कलिंगराज**" नांवाचा होता. या वंशांत "**जाजल्लदेव**" नांवाचा प्रसिद्ध राजा झाला. या वंशांतील राजांनीं पश्चिमेस भंडाऱ्यापर्यंत व दक्षिणेस तेलंगणापर्यंत राज्य केलें. बस्तर वगैरे संस्थाने त्यांनी आपल्या अमलाखालीं आणलीं. या वंशांतील राजांनीं दिलेले अनेक ताम्रपट व शिलालेख सांपडले आहेत व त्यावरून त्या वंशांतील राजांची नांवें समजून येतात.[२] भोंसल्यांनी रतनपुरचें राज्य कबीज करीपर्यंत या वंशांतील राजे रतनपुर येथे राज्य करीत होते. चेदि प्रांतांतील कलचूरि राजांप्रमाणेंच याहि राजांनीं आपल्या नांवाचें नाणें पाडिलें होतें. कलचूरि वंशाच्या नाण्यावर एका बाजूस लक्ष्मीचें चित्र असून दुसऱ्या बाजूस राजाचें नांव असे. परंतु रतनपुरच्या राजांनीं लक्ष्मीच्या ऐवजी सिंहाचें चित्र ठेवलेलें आढळतें. या दोन्ही घराण्यांतील राजांनीं पाडलेलीं सोन्याची व तांब्याची नाणीं नागपुर व कलकत्ता येथील पदार्थसंग्रहालयांत ठेवलेलीं आहेत.[३]

**रायपुरचा हैहयवंश**– रतनपुरचे शाखेपैकीं **सिंहण** नांवाच्या मनुष्यानें रायपुर जिल्ह्यांतील **खल्लारी** नांवाचे गांवीं स्वतंत्र राज्य स्थापिलें. तें पंधराव्या शतकापासून तों आठराव्या शतकापर्यंत चालू होतें व रतनपुरच्या शाखेप्रमाणेंच नागपुरच्या भोंसल्यांनी तें जिंकून घेतलें.

ओरिसांतील **सापुनर** (विनीतपुर) येथील सोमवंशी राजे यांचाहि अंमल कोसल देशावर होता.

---

१ तुम्माण येथें **वंकेश्वर** नांवाचे प्रसिद्ध शिवालय होतें.

रा. ब. हिरालाल यांचा तुम्माण नांवाचा विस्तृतलेख महाकोसल हि. सोसा. चे कागदांत छापला आहे. पा. ३४

२ या वंशातील का राजाच्या शशिप्रभा नांवाच्या मुलीशी धारानगरच्या सिंधुराजाचा (भोजाचा बाप) विवाह झाला होता, अशी कथा नवसाहसांक नांवाच्या काव्यांत आहे. (प्रो. मिराशी यांचा भा. इ. सं. त्रै वर्ष १३ अंक २ मधील लेख पहा).

3 The Coins of India by C. J. Brown. P. 52. पहा.

**नागवंशी राजे**--हैययांप्रमाणेंच छत्तिसगडांत नागवंशी नांवाचे रजपूत अनेक ठिकाणीं राज्य करीत होते. त्यांपैकीं **कवरध** व **खैरागड** येथील हल्लींचे संस्थानिक व बस्तर संस्थानांतील **चित्रकोट**चे राजे वगैरे होत. बस्तर येथील हल्लीचे संस्थानिक व "काकतीय" नांवाचे क्षत्रिय घराण्यांतील आहेत. पण हीं सर्व घराणीं विशेष प्राचीन नसून अलिकडचीं आहेत.

वरील राजघराण्यांशिवाय व त्यांचे पूर्वी (इ. स. पूर्वी) कलिंगदेशाच्या **खारवेल** राजांचेंहि साम्राज्य महाकोसलावर होतें असें दिसतें. **खारवेल** हा राजा **चेदिवंशीय** असून त्यानें कलिंग देशांत मौर्यानंतर स्वतंत्र राज्य स्थापिलें. नंतर त्यानें उत्तर हिंदुस्थानांतहि स्वाऱ्या करून एक मोठें साम्राज्य स्थापन केलें. त्यानें कलिंग देशाचा विस्तार ओरिसाप्रांतापर्यंत वाढविला. त्यावरून **कलिंग, तोशल** व **उत्कल** मिळून **त्रिकलिंग** असे नांव पडलें. खारवेल हा जैनधर्मीय राजा असून त्यानें त्या धर्माचा फार प्रसार केला. त्याची राणी ही " **वज्रागड** ऊर्फ **वयिरागड**" येथील राजकन्या होती. वज्रागड म्हणजे हल्लीचा चांदा जिल्ह्यांतील **वैरागड** हेंच होतें असें अनेक पुराव्यांवरून सिद्ध झालें आहे.[१]

खारवेलाच्या नंतर त्याच्या वंशजांचे राज्य बरेच दिवस कलिंग देशावर चालू होतें. ओरिसा प्रांतांतील **जगन्नाथपुरी** या जिल्ह्यांत **भुवनेश्वर** या गांवाजवळ **उदयगिरी** नांवाच्या टेकडीवर खारवेलाच्या वेळचा खडकावर कोरलेला एक लेख सांपडला आहे. त्यावरून खारवेलाच्या वंशाचा पत्ता लागला आहे. खारवेल हा इ. स. पूर्वी सुमारें दोनशें वर्षांपूर्वी उदयास आला.

**समुद्रगुप्ताची स्वारी**:-- प्रख्यात गुप्तवंशीय राजा **समुद्रगुप्त** यानें दक्षिणेकडेस स्वारी केली. त्यावेळीं तो उत्तरेकडून चेदि देशांतून कोसल

---

१ Banerji's History of Orissa Vol. I P. 78

वैरागड व बस्तर संस्थानांतील चक्रकोट या गांवांचा उल्लेख एकाच शिलालेखांत आला आहे.

प्रांतात शिरला व हल्लींच्या छत्तिसगड व गोंडवनांतून दक्षिणेस कलिंग व आंध्र देशांत गेला. कोसलाधिपति **महेंद्रराजाशीं** त्याची लढाई होऊन महेंद्राचा पराभव झाला.

**चिनी प्रवासी हूएनसंग याचा प्रवास** (इ. स. ६२९–६४५) — बुद्धधर्माचा विख्यात तत्त्वज्ञानी **नागार्जुन** हा पूर्वी महाकोसल प्रांतांत रहात होता. त्यामुळें हूएनसंग हा दक्षिणेस कलिंग प्रांतांत[१] गेला असतांहि मुद्दाम उत्तरेस जाऊन या प्रांतांत आला. मार्गांत दाट अरण्यें असल्यामुळें त्यास या प्रांतांत येण्यास फार कष्ट सोसावे लागले.

या प्रवाशानें महाकोसलाचें मोठें विस्तृत वर्णन आपल्या ग्रंथांत केलें आहे. तो म्हणतो, "या प्रांताचा घेर एक हजार मैलांचा असून भोंवतालीं मोठमोठे डोंगर आहेत व दाट जंगलांनी व दलदलीच्या प्रदेशांनी हा देश भरलेला आहे. या प्रदेशाच्या राजधानीचें नगर फार मोठें असून त्याचा परीघ चाळीस ली (सुमारें ६॥ मैल) होता. तेथील राजा क्षत्रिय असून बुद्ध-मतानुयायी होता. या देशांत बुद्धधर्माचे शंभर मठ असून महायान पंथाचे दहा हजार भिक्षु त्यांत रहात होते. राजधानीच्या बाहेरच एक मठ असून तेथें अशोकानें बांधलेला एक स्तूप होता. नागार्जुन याच मठांत रहात असे."

**नागार्जुन** हा भरतखंडांतील त्या वेळच्या सर्व पंडितांत श्रेष्ठ म्हणून समजला जात होता. भरतखंडांतील रसायन व वैद्यक शास्त्रांचा तो जनक म्हणून समजला जातो. त्याचप्रमाणें बुद्धधर्मांतील महायान पंथाच्या तत्त्व-ज्ञानाचा त्यानें फार पुरस्कार करून त्यावर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. नागा-र्जुन हा इ. स. च्या पहिल्या अगर दुसऱ्या शतकांत होऊन गेला. त्या वेळच्या कोसलाच्या राजधानीचें गांव कोणतें हें अद्याप नक्की ठरलें नाहीं. नागार्जुन यानें सर्व हिंदुस्थानभर व पंजाबपर्यन्त फिरून बौद्धधर्माचा प्रसार केला.

देवगिरीच्या यादवांचें राज्य वर्धेच्या पूर्वेस होतें असें मानण्यास जागा आहे. रामटेक येथील लक्ष्मणाचे देवळांतील लेख या सुमाराचा असून त्यांत

---

१ तो पूर्वेस जाऊन बंगालमधून कलिंग प्रांतांत गेला होता.

सिंहण व रामचंद्र या राजांचीं नांवें आहेत व त्यांस यादववंशीय असें म्हटलें आहे.[१]

---

## भाग २ रा.

# गोंडांची कारकीर्द[२]

गोंड लोकांची लोकसंख्या सर्व हिंदुस्थानांत मिळून तीस लक्ष आहे. अनार्य जातींपैकी ही एक महत्त्वाची जात आहे. हिंदुस्थानांत आर्य लोकांचे पूर्वी राहणाऱ्या ज्या मूळच्या जाती होत्या, त्यांतील गोंड ही एक आहे. भिल्ल, कोळी, कोरकू वगैरे अशाच दुसऱ्या ज्या जाती आहेत त्यांपेक्षां गोंड हे जास्त सुधारलेले लोक होते व इतर लोकांप्रमाणें शिकार व लुटालूट हे धंदे न करतां त्यांनी निरनिराळी व्यवस्थित राज्यें स्थापन करून शेतकीचा धंदा उचलला. हिंदू संस्कृतीचा पूर्ण फायदा घेऊन त्यांनीं आपली सुधारणा केली. मुसलमान व रजपूत या लोकांच्या लढाऊपणाचें व राज्यकर्तृत्वाचें अनुकरण करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, परंतु जास्त व्यवस्थित व एकजुटीच्या शत्रूंपुढें त्यांचा टिकाव लागला नाहीं. तरी मानवी सुधारणेच्या कामांत त्यांनीं पुष्कळ कार्य केलें आहे.

गोंड लोकांची मुख्य वस्ती मध्यहिंदुस्थानांत आहे. जबलपूरपासून तेलंगणापर्यंत उत्तर–दक्षिण व वऱ्हाडच्या सातपुड्यापासून छत्तिसगडपर्यंत पूर्व-पश्चिम असा या लोकांचा विस्तार आहे. वऱ्हाड खेरीजकरून मध्यप्रांताचा

---

१ रा. ब. हिरालाल यांनी हे राजे हैहयवंशी होते असें म्हटलें आहे परंतु तें बरोबर दिसत नाही. हैहय राजे जरी यदुवंशी होते तरी त्यांना कोठेंहि यादववंशीय असें म्हटलें नाही. हैहयवंशीय असेंच म्हटलें आहे. दुसऱ्या आवृतीत रा. ब. यांनीं पूर्वींचें मत बदलल्यासारखें दिसतें.

P. Inscriptions. P. 3 (2nd edition)

लांजी येथेंहि रामदेव यादव याचा एक ताम्रपट सांपडला आहे. त्यावरून यादवांचें राज्य रामटेकच्या पूर्वेसहि होतें असें दिसतें. (सदरहू पान २०पहा.)

२ हा भाग प्रस्तुत लेखकानें चित्रमय जगत् या मासिकांत छापून प्रसिद्ध केला होता.

सर्व भाग गोंडांच्या वस्तीचा होता म्हणून त्याला गोंडवण हेंच नांव होतें. सर्व हिंदुस्थानांत मध्यप्रांतांतच गोंडांच्या वस्तीचा मुख्य भाग आहे. तीस लक्षांपैकीं तेवीस लक्ष वस्ती मध्यप्रांतांतच आहे. मंडला जिल्ह्यांत निमे वस्ती व बस्तर संस्थानांत तिसरा हिस्सा वस्ती गोंड लोकांची आहे.

गोंड लोकांचे चेहऱ्यांवरून व शरीरांचे ठेवणींवरून ते द्रविड मनुष्यविभागांतील लोक असावेत असें दिसतें. त्यांपैकीं कांहीं जाती आपणांस रजपूत म्हणवीत असत व कदाचित् रजपुतांचे व त्यांचे लग्नसंबंधहि झाले असतील. यांचेपैकीं कांही राजघराणीं आपण रजपूत आहों असें म्हणत असत; परंतु खरोखर ते गोंडांपैकीच पुढें आलेले पराक्रमी पुरुष असून रजपुतांचें क्षत्रियत्व व सामाजिक मोठेपणा आपणांस मिळावा म्हणूनहि त्यांनी रजपूत हें नांव घेतलें असावें.

गोंड लोकांचा धर्म, व चालीरीति साधारणपणें इतर हिंदू लोकांच्या सारख्याच आहेत. परंतु त्यांच्या मूळ धर्माच्याहि कांहीं कल्पना अवशिष्ट आहेत. लिंगो नांवाच्या त्यांच्या पराक्रमी पुरुषाच्या नवलकथा अद्यापहि त्यांच्यामध्यें रूढ आहेत.

गोंडांपैकीं मुख्य जाती दोन आहेत. एक राजगोंड व दुसरे खटोले. राजगोंड हे आपणास रजपूत अथवा क्षत्रिय म्हणवितात. गोंड लोकांच्या देवतांच्या संख्येवरूनहि त्यांच्यामध्यें निरनिराळे भेद झाले आहेत. कांहीं वर्ग एकमेकांचे भाईबंद असतात व त्यांचेमध्यें आपसांत लग्नसंबंध न होतां दुसरे वर्गांतील लोकांशी होतात.

गोंड लोकांची एके काळीं झालेली प्रगति त्या लोकांनी निरनिराळ्या जागीं स्थापिलेल्या राज्यांवरून दिसून येईल. त्या राज्यांचा इतिहास पुढें दिला आहे.

**गढा येथील गोंडांचें राजघराणें**--जबलपूरच्या पश्चिमेस तीन मैलांवर गढा नांवाचें एक लहान गांव आहे. तें पूर्वी राजधानीचें एक मोठें शहर होतें. संगमरवरी खडकांमधून (Marble rocks) वाहणारा नर्मदेचा रम्य प्रवाह पाहण्याकरितां जबलपुराहून हजारों लोक जातात. त्या रस्त्यावरच हल्लीं मोडकळीस आलेलें गढा गांव लागतें. हा प्रांत मूळचाच निसर्गसुंदर असून उत्तरेकडून दक्षिणेंत येण्याच्या हमरस्त्यावर हा भाग आहे. याच भागांत एक बलिष्ठ गोंड राजघराणें झालें व त्यानें सुमारें पांचशें वर्षे भोंवतालच्या प्रदेशावर राज्य केलें.

गोंड राजांचा इतिहास सुसंगत रीतीनें व अधिकारित्वानें कोठेंहि लिहिला नाहीं. त्यामुळें दंतकथावजा ज्या हकीकती उपलब्ध आहेत त्यांवरच भिस्त ठेवावी लागते. त्यांतल्या त्यांत अतिशयोक्ति, कालाचा विसंगतपणा वगैरे गोष्टी वजा घालून शक्य तितक्या सुसंगतपणें लिहिण्याचा उद्योग स्लिमन, चाटरटन, व विल्स वगैरे लोकांनीं केला आहे. मोंगल व क्वचित् मराठ्यांच्या इतिहासांतहि त्यांचा संबंध येतो.

**जदुराय**—गढा येथील राजघराण्याचा मूळपुरुष **जदुराय** हा होता. गोदावरी-च्या आसमंतात् भागी एका गांवच्या पाटलाचा हा मुलगा होता. नामसादृश्या-वरून देवगिरीच्या यादव घराण्यापैकीहि हा असावा असा कित्येकांचा तर्क आहे. गढा येथें राज्यस्थापना होण्यापूर्वी त्या भागांत **कलचूरि** नांवाचे राजे झाले. त्यांपैकीं एका राजाच्या पदरीं **जदुराय** हा नोकर होता. त्यानें मंडला येथील **नागदेव** नांवाच्या एका गोंड राजाच्या मुलीशीं लग्न लाविलें व नंतर **सुरभी पाठक** नांवाच्या एका ब्राह्मण मंत्र्याच्या मदतीनें त्यानें गढा येथें राज्य स्थापिलें.

राज्यसंस्थापक अगर दुसऱ्या प्रसिद्ध व्यक्तीशीं संलग्न अशा कांहीं दंतकथा असतातच. कोणाच्या डोक्यावर त्याचे भावी ऐश्वर्याची पूर्वसूचना म्हणून नाग फणा धरून डोलतो तर कोणाच्या गळ्यांत हत्तीण माळ घालून त्यास एखाद्या सुन्दर राजकन्येसह राज्यैश्वर्याची प्राप्ति करून देते. जदुराया-संबंधीहि अशा दंतकथांची वाण थोडीच पडणार?

एक दंतकथा अशी आहे. जदुराय हा एका राजाचे पदरी नोकर होता व आपले मालकाबरोबर **अमरकंटक** येथें देवदर्शनास जात होता. रस्त्यानें एके दिवशी रात्रीं तो आपल्या मालकाच्या डेऱ्यासमोर पहारा करीत असतां दोन गोंड पुरुष, एक बाई व त्यांचे मागोमाग एक वानर जदुरायाचे समो-रून गेलें. वानरानें **जदुरायाचे** तोंडाकडे पाहून कांहीं मोराची पिसें तेथे टाकली व तें निघून गेले. **जदुरायाचा** पहारा सपतांच तो झोंपी गेला. स्वप्नांत खुद्द **नर्मदामाईनें** त्यास दर्शन दिलें आणि सांगितलें की, "तूं जीं माणसें पाहिलींस तीं सामान्य माणसें नसून प्रत्यक्ष **श्रीरामचंद्र, सीतादेवी** व **लक्ष्मण** असे होते व मागाहून जो वानर जात होता तो **हनुमान** होता. मयूरपुच्छाचा अर्थ हा कीं तुला लौकरच राज्यपद मिळणार. तू आतां रामनगरास जा व तेथें **सुरभी पाठक** नांवाचा ब्राम्हण आहे त्यास गुरू कर." **जदुराय** नोकरी

सोडून निघाला व **सुरभी पाठक** याजकडे गेला. त्यालाहि नर्मदामाईचा तसाच दृष्टांत झाला होता. त्यानें जदुरायाकडून नर्मदेमध्यें जाऊन संकल्प करविला कीं, "मी राजा झाल्यास तुला प्रधानपद देईन." नंतर सुरभीनें जदुरायास गढा येथें जाऊन तेथील राजाचे येथें नोकरी धरण्यास सांगितलें.

जदुराय त्याप्रमाणें गढा येथें गेला. गढा येथील गोंड राजास पुत्र नसून एकच कन्या होती व आपल्या प्रधानाच्या सल्ल्यानें तिला अनुरूप पति मिळावा म्हणून त्यानें पुढील युक्ति योजिली होती. नर्मदेच्या कांठीं त्यानें सर्व लोक जमा केले व आपल्या पदरच्या पाळीव पक्ष्यांपैकीं एक मैना मोकळी सोडून ती ज्याच्या डोक्यावर बसेल त्यास ती मुलगी व राज्यपद देण्याचें त्यानें ठरविलें होतें. ती मैना उडून नेमकीच जदुरायाच्या डोक्यावर बसली व अर्थातच राजकन्या व राज्यवैभव त्यास प्राप्त झालें.

**संग्रामशहा**-- बहुतेक गोंड राजे आपलें रजपुतत्व दाखविण्याकरितां आपल्या नांवांपुढें सिंग असें उपपद लावीत असत. परंतु मुसलमान बादशहाशीं जास्त जास्त संबंध येतांच त्यांनी आपल्या नांवांपुढें शहा हें पद जोडणें सुरू केलें. त्यामुळें बहुतेक गोंड राजांच्या नांवांपुढें शहा अशी पदवी घेतलेली दिसते.

गढा येथील राजघराण्यांत जदुरायानतर संग्रामशहा हा राजा झाला. त्याचें राज्य पूर्वी लहान होतें. संग्रामशहानें आपल्या राज्याच्या भोंवतालचा प्रदेश जिंकून आपलें राज्य बरेंच वाढविलें. नर्मदेच्या कांठचा बराच प्रदेश, हल्लींचा सागर व दमो जिल्हा, व भोपाळ संस्थानचा बराचसा भाग त्याचे राज्यांत मोडत असे. आपले राज्याचे मजबुतीकरितां गढ्याचे पश्चिमेस चाळीस पन्नास कोसांवर त्यानें चौरागड म्हणून एक मजबूत किल्ला बांधिला. तो पुढील लढायांत बराच प्रसिद्धीस आला. दोन उंच व मजबूत टेकड्यांवर हा किल्ला बांधला असून वर पाण्याचा भक्कम पुरवठा आहे. गढा येथेंहि त्यानें अनेक देवालयें व तलाव बांधले.

एकंदरीने गढा येथील राजघराण्यांत सर्वांत पराक्रमी व वैभवशाली राजा हाच होऊन गेला.

**दलपतशहा व राणी दुर्गावती**--इ. स. १५०० चे सुमारास दलपतशहानें राज्य केलें. हा संग्रामशहाचा मुलगा. हा शरीरानें देखणा असून

मोठा पराक्रमीहि होता. त्यामुळें त्यास अनुरूप वधू मिळावी अशी त्याच्या बापाची फार इच्छा होती.

त्यावेळीं महोबा येथील रजपूत चंडेल राजाची मुलगी **दुर्गावती** ही तिच्या सौंदर्याविषयीं फार प्रसिद्ध होती व तिच्याविषयीं पुष्कळांच्या मागण्या होत्या. त्यांत एका रजपूत राजपुत्राचीहि मागणी होती. दलपतशहाकरितांहि त्याच्या बापानें मागणी केली; परंतु दलपतशहा पडला गोंड राजा. त्यामुळें तिच्या बापाचा ओढा वरील रजपूत राजपुत्राकडे जास्त होता. दलपतशहाचे पराक्रमाची माहिती दुर्गावतीस झाल्यामुळें तिचें मन दलपतशहाकडे होतें. असेंहि वर्णन ऐकण्यांत आहे कीं, दुर्गावतीनें रुक्मिणीप्रमाणेंच दलपतशहाकडे निरोप पाठवून तरवारीच्या जोरावर बायको मिळविण्याची सूचना केली.

दलपतशहानें आपलें शूर गोंड सैन्य जमवून आपले भावी सासऱ्याच्या व प्रतिस्पर्ध्याच्या लष्करावर चाल केली व त्यांचा मोड करून लढाई जिंकली व मग मोठ्या आनंदानें दुर्गावतीच्या बापानें दुर्गावतीचें लग्न दलपतशहाशी लावून दिलें.

परंतु ऐश्वर्य चिरकाल टिकत नसतें. वैभवाच्या शिखरास गेलेल्या गढा येथील राजघराण्यास उतरती कळा लागण्याचे दिवस आले. दलपतशहा लग्नानंतर चारच वर्षांनीं मरण पावला. तरुण व सदर राणी दुर्गावतीस वैधव्यांत दिवस काढण्याची वेळ आली. नाहीं म्हणण्यास दुःखांत सुख म्हणून तिला बीरनारायण म्हणून एक मुलगा होता. त्याकडे पाहून ती दिवस कंठीत होती.

मनुष्याच्या अंगच्या गुणांची खरी पारख संकटाच्या वेळींच होते. त्याचप्रमाणें राणी दुर्गावतीची गोष्ट झाली. मुलगा लहान, राज्य मोठें वाढलेलें व जवळच मुसलमानांचें बलाढ्य राज्य आपणांस गिळंकृत करण्यास टपलेलें, अशा कठीण प्रसंगीं मोठ्या जहामर्दीनें व इज्जतीनें राणी दुर्गावतीनें कारभार केला. इतर बायकांप्रमाणें मुळूमुळू रडत न बसतां तिनें स्वतः हातीं कारभार घेऊन व मुलास उत्तम तऱ्हेनें शिकवून अनेक लोकोपयोगी कामें केलीं. तलाव बांधले, किल्ले बांधले व देशांत शांतता झाल्यामुळें वसूल चांगला येऊन संस्थानांत पैसाही बराच शिल्लक राहिला.

राणी दुर्गावतीचा पुत्र **बीरनारायण** हा वयांत येऊन कारभार सांभाळणार इतक्यांत एक आपत्ति कोसळली. त्यावेळीं **अकबर** बादशहा मोंगलांचे गादीवर असून माणिकपूर येथें **आसफखान** नांवाचा एक सुभेदार होता. त्याचें लक्ष या राज्यावर गेलें. असें म्हणतात की, त्याचें लक्ष नुसतें राज्यावरच नसून त्या राज्याच्या शिरोभागीं झळकत असलेल्या राणी दुर्गावतीच्या सौंदर्यावर होतें व या राज्यावर स्वारी करण्यांत त्याचा दुहेरी हेतु होता.

राणी दुर्गावती भ्याली नाही. तिनें सिंगोरगड नांवाच्या आपल्या किल्ल्यावर आपलें ठाणें दिलें व तेथून मोंगल लष्कराशीं सामना देण्याची तयारी केली. तिनें आपलें सैन्य जमवून स्वतः आघाडीस राहून मोंगल सैन्याशी लढाई दिली. परंतु कसलेल्या मोंगल सैन्यापुढें तुटपुंजें गोंड लष्कर किती टिकाव धरणार ? राणी दुर्गावती व तिचें शूर गोंड लष्कर यांचा पराभव होऊन तिला मागें हटावें लागलें.

आसफखानाच्या लष्करानें तिचा पाठलाग केला. तिच्या सैन्यानें गढामंडल्याचे दरम्यान पुनः एकदां लढाई दिली. परतु तिचा पुनः पराभव झाला. मागें पळावें तर एका नदीस मोठा पूर आलेला असून ती ओलांडून जाणें शक्य नव्हतें. तेथेंच रहावें तर कैद होऊन आसफखानाच्या ताब्यांत जाऊन पातिव्रत्याचा भंग होणार. शेवटीं खऱ्या रजपुताच्या ब्रीदास जागून मोठ्या धैर्यानें तिनें पूर्वीं उदाहरण घालून देणाऱ्या असंख्य रजपूत साध्वी स्त्रियांच्या कठोर व्रताचें अनुकरण केलें व आपल्या हातानें आपला अंत करून घेतला.

हिंदुस्थानच्या पुण्यभूमींत चिरस्मरणीय झालेल्या अनेक साध्वी व पराक्रमी स्त्रियांत राणी दुर्गावतीचें नांव अखंड राहील. काळाच्या प्रचंड जबड्यांत अत्युत्तम राजवैभवाचें सुख व कडेलोटाचें दुःख हीं दोन्हीहि लुप्तच होतात. परंतु देशाभिमान, औदार्य, शीलरक्षण व स्वार्थत्याग या गुणांनी भूषित झालेल्या व्यक्ती खरोखरच अमर असून काळाचें सर्वग्रासी उदर फोडून बाहेर येऊन कायम राहतात.

राणी दुर्गावतीचे नांवाचा "**राणी ताल** " म्हणून मोठा तलाव व तिची समाधि **जबलपूर** व **गढा** यांचे दरम्यान कायम आहे.

राणी **दुर्गावतीचा** पराभव होऊन ती रणांगणावर जखमी झाली. तिचा कोंवळा पुत्र **वीरनारायण** हाहि जखमी झाला. त्याला तिनें आपल्या समक्ष रणमैदानांतून माणसें देऊन सुरक्षित ठिकाणीं पाठविलें व स्वत: सर्व सैन्यास धीर देत लढत राहिली. तिच्या कोमल अंगांत घुसलेले बाण आपल्या हातानें उपसून तिनें फेकून दिले व आपल्या उरलेल्या सैन्यास धीर देत ती शेवटपर्यंत लढत राहिली; पण रणक्षेत्र सोडलें नाहीं. शेवटीं आतां आपल्या सैन्याची पूर्ण वाताहत झाली व आपण जिवंतपणीं **आसफखानाच्या** सैन्याच्या हातीं लागून आपली विटंबना होणार हें पाहून तिनें, तिच्याजवळ अंबारीत असलेल्या आपल्या **आधार** नांवाच्या विश्वासू नोकरास सांगितलें कीं "माझ्या छातींत खंजीर खुपसून माझा अंत कर. पण मला शत्रूच्या हातीं लागूं देऊं नकोस." इमानी **आधाराच्या** हातानें हें घोर कर्म कसें होणार! तो म्हणाला, "माझे हात या कामास कसे वाहतील? मी तुम्हाला सुरक्षित घेऊन जातों." "तर मग काय रणांतून पळून जाऊन अगर शत्रूच्या हातीं सांपडून माझा देह विटाळावा अशी तुझी इच्छा आहे? व याकरितांच कां मीं तुला वाढविलें?" असें म्हणून त्या वीरस्त्रीनें आपल्या हातानें छातींत खंजीर खुपसून घेतला व तिला जिवंतपणीं धरण्यास टपलेल्या भोंवतालच्या मुसलमानी सैन्याची निराशा करून तिनें धारातीर्थी देह ठेवला.

सातपुड्याच्या उत्तरेकडील टोंकावर संग्रामशहानें **चौरागड** नांवाचा मजबूत डोंगरी किल्ला बांधला होता. जखमी झालेला **वीरनारायण** यास त्याच्या लोकांनीं पळवून या किल्ल्यांत आणून ठेवलें. हल्लींच्या नरसिंगपुर जिल्ह्यांत हा किल्ला आहे. परंतु **आसफखानानें** गढा घेतल्यानंतर तो वीरनारायणाचा पाठलाग करीत आला व त्यानें चौरागड किल्ल्यास वेढा दिला. आसफखानाच्या तरबेज सैन्यापुढें वीरनारायणासारख्या अल्पवयी व नवशिक्या योद्ध्याचा काय पाडाव लागणार? शिवाय पराजयामुळें त्याचें सैन्य बेहिमती झालेलें व त्यांची संख्याहि अल्प. परंतु खऱ्या शूर मर्दाप्रमाणें कोवळ्या वीरनारायणानें किल्ल्याबाहेर येऊन आसफखानास लढाई दिली व लढत लढत मरण पावला. किल्ल्याबाहेर निघण्यापूर्वीं आपला पराभव होऊन किल्ला शत्रूच्या हातीं लागतो असें दिसतांच "जोहार" करण्याचीहि त्यानें व्यवस्था करून ठेवली होती. आसफखानानें किल्ला

घेतांच आंतील स्त्रियांनी घरास आग लावून जोहार केला. पण त्यांतूनहि दोन स्त्रिया त्यांच्या दुर्दैवानें म्हणा अगर सुदैवानें म्हणा, जिवंत निघाल्या. एक राणी दुर्गावतीची बहीण **कमलावती** व दुसरी बीरनारायणाची भावी वधू, पुरागडच्या राजाची मुलगी. या दोघींनाही अकबराच्या जनानखान्यांत स्थळ मिळालें.

गढा व चौरागड येथील लुटीत आसफखानास एक हजार हत्ती व अगणित द्रव्य सांपडलें. याच किल्ल्यांत गढ्याचा खजिना व जडजवाहीर असे. आसफखानानें यांपैकीं तीनशें हत्ती व कांहीं थोडसें द्रव्य मात्र अकबराकडे पावतें केलें व बाकीचें आपणच जिरविलें. ही गोष्ट अकबरास समजली व त्यावरून तो अकबराच्या मर्जीतून उतरून गेला.

या वेळेपासून गढा येथील राजगोंडांचें राज्य लयास गेले. परंतु सूर्यास्त झाल्यानंतर पूर्ण काळोख पडण्यापूर्वी संधिप्रकाश राहतो त्याप्रमाणें खरोखर निर्जीव स्थितींत पण बाह्यत: जीव धरून हें घराणें कांहीं काळपर्यंत टिकाव धरून राहिलें. कांहीं दिवस अकबरानें नेमलेले सुभेदार या प्रदेशाचा कारभार करीत. एकामागून एक सुभेदार येऊन गेले परंतु कोणीहि टिकून राहीनात. शेवटीं मूळच्याच राजघराण्यास आपला मांडलिक अगर जहागिरदार करून त्याच्या स्वाधीन तो प्रदेश करणें अकबरास जास्त सोईस्कर वाटलें.

बीरनारायणाचा चुलता व दलपतशहाचा भाऊ **चंद्रशहा** नांवाचा होता. त्यास अकबरानें गढ्याचा मांडलिक म्हणून कबूल करून त्यास तें राज्य दिलें. पण भोपाळच्या बाजूचा त्याचा बराच मुलूख काढून घेऊन आपल्या राज्यास त्यानें जोडला. यामुळें गढ्याच्या राज्याची सत्ता बरीच कमी झाली व ते राजे म्हणजे एखाद्या मोठ्या जहागिरदारासारखे बनले.

चंद्रशहाचा एक भाऊ **मधुकरशहा** नांवाचा होता. चंद्रशहास ठार मारून तो गादीवर बसला व मोंगल दरबारीं स्वत: जाऊन व नजर नजराणे वगैरे देऊन त्यानें आपली गादी सुरक्षित करून घेतली.

परंतु **मधुकर** हा निर्ढावलेला खुनी नव्हता. आपल्या भावाचा खून केल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. तो इतका कीं देहांत प्रायश्चित्त घेतल्या-

शिवाय यांतून मुक्ति नाही असें त्याच्या मनानें घेतलें व प्राण देण्याची एक अजब युक्ति त्यानें शोधून काढली. एका जुनाट व वाळलेल्या पिंपळाचे वृक्षाच्या पोकळ ढोलारांत तो जाऊन बसला व आपल्या हातानें त्या झाडास अग्नि दिला. ते वाळलेलें झाड पेटून भडका झाला, त्यांत तो शांत चित्तानें मरण पावला व या तऱ्हेनें त्यानें कृतपापाचें क्षालन केलें.

मधुकराचा पुत्र **प्रेमनारायण** नांवाचा होता. तो व त्याचा मुलगा **हिरदे-शहा** ( हृदयशहा ) हे दिल्लीस मोगल दरबारांत रहात असत.कारण यावेळीं या राजगोंडांना आपला डोंगराळ साधेपणा टाकून देऊन दरबारच्या उलाढाली चालरीतीन आपणहि तरबेज झाले पाहिजे असें वाटू लागलें होतें. बापाचे मृत्यूची खबर लागतांच **प्रेमनारायण** ऊर्फ **प्रेमशहा** हा बादशहाची परवा-नगी घेऊन गढा येथें आला व बापाचे गादीवर बसला. पण एका अनपेक्षित संकटानें प्रेमशहाच्या सुग्रास ग्रहण लागलें. ही हकीकत सांगण्यापूर्वी दुसऱ्या एका चमत्कारिक व्यक्तीची माहिती दिली पाहिजे. ती व्यक्ति म्हणजे **बीरसिंगदेव** बुंधेला ही होय. त्याचा थोडासा पूर्वेतिहास सांगितला म्हणजे हा कशा तऱ्हेचा मनुष्य होता हें कळेल.

**बीरसिंगदेव बुंधेला**:—बुंदेलखंडांत झांशीजवळ ओरछा (वोडसा) येथें राज **बीरसिंगदेव** म्हणून एक बुंधेला रजपूत संस्थानिक होता. त्यावेळच्या रजपूत संस्थानिकांप्रमाणें अकबराच्या दरबारांत तो एक खटपटी व उलाढाल्या गृहस्थ होता. दिल्लीच्या दरबारांत त्याचें जाणेयेणें असून त्याचा मुलगा दरबारांत कायमचा राहात असे. त्यावेळी सर्व लहानमोठे संस्थानिक सर्व उलाढालीवर नजर ठेवण्याकरितां व दरबारच्या रीतीभाती व डावपेच शिकण्याकरितां आपल्या मुलांस तेथें ठेवीत व त्याप्रमाणें बादशहाभोंवतीं या उपग्रहांचें एक मोठे जाळें बनत असे व त्यांचा ते जरूर पडेल तसा उपयोगहि करून घेत असत.

अकबरनामा व ऐनीअकबरी ग्रंथांचा कर्ता **अबुलफजल** याचें अकबरा-शीं फार सख्य होतें व तो त्याच्या विचारानें चालत असे. अकबराचा पुत्र **सेलिम** ऊर्फ **जहांगीर** याचें अकबराशी पटत नसे. अकबराचें वर्तन परधर्म-सहिष्णु असल्यामुळें कट्टे मुसलमान त्याच्याविरुद्ध असत. त्यांतच जहांगीर मिसळला. जहांगीर हा स्वतः मुसलमानी धर्माचा मोटा अभिमानी होता अगर

त्याचें वर्तन त्या धर्मास पूर्ण धरून होतें असा प्रकार नाहीं. परंतु अधिकार-लालसेनें पुढें तीनचार पिढ्या मोगल घराण्यांत मुलानें बापाच्या मरणाची वाट न पाहतां त्याच्याविरुद्ध उठून अकालीं गादीवर बसण्यास पहावें यांतलाच हाहि प्रकार होता. अकबर जबरदस्त असल्यामुळें जहांगिराचें औरंगजेबाप्रमाणें जमलें नाहीं ही गोष्ट वेगळी.

अकबरानें **अबुलफजल** यास दक्षिणेंत अहमदनगरच्या कामगिरीवर ठेवून आपण **अशीरगडच्या** किल्ल्यास वेढा देऊन बसला होता. पाठीमागें जहां-गिरास त्यानें बंदोबस्तांत ठेविलें होतें. तोंच जहांगिरानें स्वतः स्वतंत्र होऊन आपल्या नांवानें जाहीरनामे काढले व अलाहाबाद येथें ठाणें दिलें. अकबरानें किल्ल्यांतील लोकांची मूठ दाबून अशीरगड घेऊन लागलीच तो आग्रा येथें गेला. जहांगीर तीस हजार लष्कर घेऊन अकबराच्या भेटीस येत आहे असें समजतांच अकबरानें त्यास एक खरमरीत व धाकाचें पत्र पाठवून परत अलाहाबादेस जाण्यास सांगितलें व बंगाल व बिहार प्रांतांच्या सुभेदारीची सनद पाठविली. त्याचप्रमाणें आपला विश्वासू दोस्त अबुलफजल यास सर्व वर्तमान लिहून त्यास ताबडतोब मदतीस बोलावलें. अबुलफझल परत येण्यास निघाला.

अबुलफझलविषयी जहांगिराचें मन आधीच कलुषित झालें होतें. दक्षिणें-तून परत आल्यावर अकबर त्याला आपलेविरुद्ध पाटवील ही जहांगिरास भीति होती. सबब रस्त्यांतच अबुलफजल यास गांठून मारण्याकरितां त्यानें बीरसिंगदेव यास सांगितलें. कारण दक्षिणेंतून आग्रा येथें येतांना रस्त्यांत बीरदेवसिंगाचा मुलूख लागत होता.

अबुलफझल यास कांहीं दगा होणार अशी बातमी लागली होती पण त्यानें तिकडे लक्ष न देतां आग्र्याकडे कूच केलें. **नरवारच्या** जवळ बीरसिंगदेवानें पांचशें स्वारासुद्धां अबुलफझलच्या टोळीवर हल्ला केला व अबुलफझलचें शीर कापून तें त्यानें जहांगिराकडे अलाहाबादेस पाठविलें. तेव्हांपासून बीरसिंगदेव जहांगिराच्या गळ्यांतला ताईत झाला. त्याला पुढें त्यानें तीन हजार स्वारां-ची मनसब दिली. अबुलफझलच्या अशा मृत्यूमुळें अकबरास फार दुःख झालें. ही गोष्ट इ. स. १६०२ मध्यें झाली.

अकबर रागानें वेडा झाला व बीरसिंगास धरून आणण्याकरितां त्यानें एकामागून एक असे पुष्कळ सरदार पाठविले. बीरसिंगाचा त्यांनीं पाठलाग केला पण सर्वास झुकांड्या देत देत तो शेवटीं कोणाच्याच हातीं लागला नाहीं. शिवाय त्याला आंतून जहांगिराचें पाठबळ असल्यामुळें त्याच्यावरचें संकट लौकरच गेलें.

बीरसिंगदेवानें जहांगिराचे कारकीर्दीत मथुरा येथें **केशवराजाचें** एक सुंदर देऊळ बांधलें होतें. त्यास एकंदर ३३ लक्ष रुपये त्यावेळीं खर्च आला होता. हिंदुस्थानच्या त्या वेळच्या अत्यंत सुंदर देवळांपैकी तें एक होतें व कैक वर्षेपर्यंत त्याचें काम चाललें होतें. बीरसिंग हा जहांगिराचा आवडता असल्यामुळेंच हें प्रचंड काम पार पडलें. शहाजहानाच्या कारकीर्दीपासून नवीन देवळें बांधण्यास मनाई झाली होती. हें सुंदर देऊळ औरंगजेबाचे डोळ्यांत शल्यासारखें खुपत होतें व तें पाडण्याचा त्याचा सारखा प्रयत्न चालला होता. दुसरा प्रयत्न काशी येथील विश्वेश्वराचें देऊळ पाडण्याचा. इ. स. १६६९ मध्यें ही दोन्ही कामें झालीं. काशी येथील अधिकाऱ्यांनीं औरंगजेबाचे हुकमावरून काशीविश्वेश्वराचें देऊळ पाडून जमीनदोस्त केलें व तेथें लागलीच एका मशिदीचें काम सुरू केलें. ही मशीद आतां तेथें कायम आहे. तिचे पिछाडीस जुन्या विश्वेश्वराच्या देवळाचा कांहीं भाग अद्याप शिल्लक आहे. विश्वेश्वराच्या देवळानंतर लागलीच दुसरी खबर मथुरेच्या अधिकाऱ्याकडून आली कीं बीरसिंगाचे केशवराजाचें देऊळ जमीनदोस्त करून तेथें मशिदीचें काम सुरू केलें. सदरहू देवाची मूर्ति इतर मूर्तीप्रमाणें आग्र्यास पाठविली गेली व बेगमांच्या मशिदीच्या पायऱ्यांखालीं तिची संभावना झाली.

जहांगिराच्या कारकीर्दीत बीरसिंग हा दक्षिणेंत मलिकंबराविरुद्ध झालेल्या स्वारींत मोंगलांतर्फे हजर होता व वऱ्हाडांत बाळापूर, दौलताबाद या बाजूस बरेच दिवस होता.

बीरसिंगाचा पुत्र झुज्झारसिंग नांवाचा होता तोहि बापाप्रमाणें शूर व क्रूर होता. इ. स. १६२७ मध्यें जहांगीर मरून शहाजहान गादीवर बसला. जहांगिरापूर्वीं थोडेच दिवस बीरसिंग मरण पावला होता. शहाजहान नवीन आहे असें पाहून झुज्झारसिंगानें बंड केलें. परंतु शहाजहानानें तें मोडलें व

झुज्झारशीं सलोखा ठेविला. कारण शहाजहान हा अगदी नवीन होता. शिवाय बादशहानें झुज्झार यास दक्षिणेकडे महाबतखानाबरोबर कामगिरी-वरहि पाठविलें.

इ. स. १६३४ मध्यें झुज्झारसिगाने विनाकारण एक तंटा उपस्थित केला. मागें सांगितलेंच आहे की गढा येथील गोंड राजा मधुकरशहा यानें आत्म-हत्या केल्यानंतर त्याचा पुत्र प्रेमशहा हा येऊन गढच्याच्या गादीवर बसला. झुज्झारसिंगानें एकदम प्रेमशहावर स्वारी केली. या स्वारीस निमित्त कांहींच नव्हतें. कांहीं टिकाणीं असें वर्णन आढळतें कीं, प्रेमनारायण दिल्लीहून निघाला तों बीरसिंगदेव याच्या परत भेटीस न जातां तसाच गेला. हा बीरसिंगदेवास आपला उपमर्द वाटून त्यानें मरतांना आपला पुत्र झुज्झार यास याबद्दल सूड उगविण्यास सांगितलें व म्हणून झुज्झार यानें प्रेमशहावर स्वारी केली. पण या दंतकथेंत विशेष अर्थ दिसत नाहीं. बीरसिंग व झुज्झार हे स्वभावतःच क्रूर व लोभी होते व शेजारचें दुर्बळ गढचाचें राज्य घेण्याचा मोह झुज्झार यास अनावर झाला. कदाचित् " त्वां पाणी गढूळ केलें नसेल तर तुझ्या बापानें केलें असेल. " अशापैकी कांही तरी सबब दाखविण्याचा प्रकार झुज्झारनें केला असेल.

झुज्झारशीं उघडचा मैदानांत सामना देणें आपणास शक्य नाही असें पाहून प्रेमशहा चौरागडच्या किल्ल्यांत जाऊन बंदोबस्तानें राहिला व झुज्झारनें किल्ल्यास वेढा दिला. पुष्कळ महिने झाले तरी वेढा उठेना व किल्ला शरण येईना. शेवटीं झुज्झारनें कपटाने किल्ला घेण्याचा बेत केला. प्रेमशहास त्यानें निरोप पाठविला की, तुम्ही निर्भयपणें स्वतः आमचे भेटीस किल्ल्याखालीं यावें म्हणजे तुमचा आमचा तह होईल. या वचनावर विश्वास ठेवून प्रेमशहा आपला दिवाण **जयदेव बाजपाई** यास बरोबर घेऊन झुज्झारसिगाचे भेटीस गेला. झुज्झारसिगानें मारेकरी तयारच ठेवले होते. त्यांनी प्रेमशहा व जयदेव यांना क्रूरपणानें ठार केलें. किल्ल्यास कोणी त्राता न राहिल्यामुळें तो लौकरच शरण आला. झुज्झारनें किल्ल्यांतील सर्व संपत्ति लुटून नेली व किल्ल्यावर आपले अधिकारी नेमून तो ऊर्च्छा येथें आपल्या राजधानीस निघून गेला.

प्रेमशहाचा पुत्र **हिरदेशहा** (हृदयशहा) हा दिल्लीस होता. त्याला हें वर्तमान समजतांच तो गढा येथें गेला, परंतु तेथें झुज्झारचा अंमल बसलेला होता त्यामुळें त्यास कोणी विचारीना. शिवाय कोणी पकडून झुज्झारसिंगाकडे पाठवील ही भीति होती. शेवटीं वेष पालटून तो गढाच्या जवळपास भटकत राहिला. त्याच्या वृद्ध दाईची त्यानें मोठ्या प्रयासानें भेट घेऊन तिला आपली ओळख दिली. तिनें त्यास आश्रय देऊन त्याच्या बापानें एका गुप्त ठिकाणी ठेवलेली पुष्कळ संपत्ति त्याला दाखविली. त्या संपत्तीच्या आधारानें त्यानें लष्कर ठेवलें व भोपाळ येथील मोगलांचा मुसलमान सुभेदार वश करून घेतला. त्याच्याच मार्फतीनें त्यानें शहाजहान बादशहाकडे संधान बांधलें.

शहाजहानाने प्रथम झुज्झार याजवर फर्मान सोडलें की आमचा मांडलिक गढ्याचा राजा यास मारून त्याचें राज्य घेतलें याबद्दल झुज्झारनें जबाब द्यावा. तें सर्व राज्य व लुटलेल्या संपत्तीपैकी दहा लाख रुपये दिल्लीस पाठवावे. झुज्झार याने या फर्मानानंतर स्वारी होणार हें ओळखून त्याचा पुत्र **विक्रमजित** हा वऱ्हाडांत बालाघाटीं मोंगल सरदार **खानडौरान** याच्या हाताखाली होता त्यास पत्र लिहून ताबडतोब निघून येण्यास सांगितलें.त्याप्रमाणें तो आपल्या सैन्यासह निसटून उत्तरेकडे चालला. मध्यंतरी मोंगल सरदार **खानजमान** याने त्यावर हल्ला करून त्याचे सैन्याची वाताहत केली व स्वतः विक्रमजित जखमी झाला. पुढें मोठ्या कष्टानें, आडवाटेनें व डोंगराळ रस्त्यानें तो येऊन बापास मिळाला.

" बादशहानाम्यांत " पुढील हकीकत दिली आहे. " शहाजहानानें **सुंदर कबराय** (कविराज) नांवाचा मनुष्य झुज्झारकडे पाठविला व त्यास तहाच्या पुढील अटी सांगितल्या. (१) झुज्झार यानें आग्रा प्रांतांतील एक सरकार (जिल्हा) बादशहास द्यावा. (२) त्या ऐवजीं झुज्झार यानें गोंडाचे राज्यांतील चौरागड किल्ला व त्या खालचा प्रदेश घ्यावा. (३) चौरागडच्या लुटीपैकी तीन लक्ष रुपये बादशहास द्यावे. (४) झुज्झारनें आपण स्वतः खानजमानाच्या हाताखालीं वऱ्हाडांत सैन्यासुद्धां जावें. (५) त्याचा पुत्र विक्रमजित यास मोगल दरबारीं ठेवावें.

झुज्झारनें ह्या अटी मान्य केल्या नाहींत व **सुंदर** हा परत आला. शहाजहानानें तीन सरदार औरंगजेबाचे हाताखालीं देऊन त्यास झुज्झारसिंगावर पाठविलें. मोगल लष्करानें **ऊच्छी** येथून झुज्झारसिंगास हाकून तें ठिकाण आपल्या ताब्यांत घेतलें. झुज्झारसिंग हा चौरागडच्या किल्ल्यांत जाऊन बंदोबस्तानें राहिला. हा किल्ला मजबूत असल्यामुळें तेथें आपला बचाव होईल असें त्यास वाटलें. तो स्वतः त्या किल्ल्याजवळ दोन कोसांवर शहापूर म्हणून गांव आहे, तेथे तळ देऊन राहिला.

औरंगजेब व त्याचे तिघे सरदार शहापुरावर चालून गेले. हिरदेशहा हाहि या सैन्यांत असावा. एवढ्या मोठ्या सैन्याशीं टक्कर देण्याची झुज्झारसिंगाची तयारी नव्हती. शेवटी त्यानें चौरागड किल्ल्यांतील सर्व द्रव्य घेतलें, तोफा फोडून टाकल्या, मोठमोठ्या इमारती पाडून टाकल्या व शत्रूस उपयोग होऊं नये अशी त्या किल्ल्याची त्यानें स्थिति केली व गोंडवणांतून दक्षिणेस निघाला. त्याचेबरोबर त्याच्या बायकाहि होत्या. मोगल सैन्यानें जोरानें पाठलाग केला तेव्हां बायकांच्यानें त्याच्याबरोबर मजला होईनात. मुसलमान इतिहासकार सांगतात की त्यानें कांहीं बायका मारून टाकल्या व मग शत्रूवर उलटून लढाई दिली. पण त्याचा मोड झाला. शेवटीं लांब मजला मारीत तो चंद्रपुराकडे गेला. तिकडच्या गोंडांनी त्याच्या सैन्याचा विध्वंस केला व त्यालाहि ठार मारलें. पाठीमागून मोगल लष्कर आलें व त्यांनीं मोठ्या प्रयासानें झुज्झार व त्याचा पुत्र विक्रमजित यांचीं प्रेतें हुडकून काढलीं व त्यांची शिरें कापून बादशहाकडे पाठविली. त्यानें तीं वेशीस टांगून ठेविलीं होतीं.

गढ्याचे दुर्दैवी गादीवर **हिरदेशहाची** स्थापना झाली. परंतु पंधरा वर्षानंतर बादशहाची त्याच्यावर अवकृपा झाली. राजगोंडांचे अकारण वैरी जे बुंधेले त्यांचेच हातानें पुनः गोंडांचा उच्छेद झाला. झुज्झारसिंगाचा भाऊ **राजा पहाडसिंग** बुंधेला हा मोंगलांचा एक हजारी मनसबदार होता. त्यांस शहाजहानानें इ. स. १६५१ मध्यें चौरागड घेण्याकरितां पाठविलें. हिरदेशहा पळून गेला व त्यानें शेजारचे संस्थानिकांची मदत मागितली, परंतु कांही उपयोग झाला नाहीं. पहाडसिंगानें चौरागड व गढा काबीज केले व शहाजहानानें तोच प्रदेश पहाडसिंगास जहागीर दिला.

हिरदेशहानें गढा गेल्यावर जबलपुराच्या दक्षिणेस **मंडला** येथें आपलें ठाणें दिलें. मंडल्याचे जवळ चार पांच कोसांवर **रामनगर** म्हणून एक सुंदर ठिकाण आहे तें त्यानें राहण्यास पसंत करून तेथें वाडे बांधले. तेव्हांपासून या घराण्यास गढामंडळाचे राजे म्हणत व "गढामंडळा" हेंच नांव पुढे रूढ झालें. त्यापूर्वी "गढाकटंगा" असें नांव होतें. कटंगा नांवाचें लहानसें गांव गढ्याच्या नजीक आहे त्यावरून हें नांव पडलें होतें. जुनें दौलताबाद शहर मोडून त्याचेंच जसें औरंगाबाद बनलें आहे तसेंच गढ्याचेंच हल्लीं जबलपुर झालें आहे.

मंडल्यास राजधानी गेल्यानंतर या घराण्याचा इतिहास म्हणजे राज्याकरितां मारामाऱ्या व दुसऱ्याची मदत घेऊन आत्मनाश करून घेणें हा होय. हिरदेशहास दोन पुत्र **छत्तरशहा** व **हरिसिंग**. छत्तरशहा गादीवर बसला. त्याचा भाऊ हरिसिंग त्याच वेळेपासून राज्यांतला हिस्सा मागत होता पण त्यावेळीं त्याचें कांहीं चाललें नाहीं. छत्तरशहा सात वर्षे राज्य करून मरण पावला. व त्याचा मुलगा **केसरीसिंग** गादीवर बसला. परंतु हरिसिंगानें बुंदेलखंडच्या **छत्रसाल** राजाची मदत घेऊन केसरीसिंगाचा पराभव करून त्यास पकडून ठार मारलें व आपण गादीवर बसला.

परंतु **बाजपायी** घराण्यांतील पुरुष या राजघराण्याचे एकनिष्ठ सेवक होते व राज्याकरितां त्यांनीं जीव दिले होते. त्याच घराण्यांतील **रामकृष्ण बाजपायी** यानें मोठ्या चातुर्यानें केसरीसिंगाचा सात वर्षांचा मुलगा **नरिंदशहा** (नरेंद्रशहा) यास हरिसिंगाच्या तावडीतून सोडवून रामनगरास नेलें व भोवतालचे आपले पक्षाचे लोक जमवून हरिसिंगाशीं लढाई दिली व त्याचा पराभव करून त्यास ठार मारलें. हरिसिंगाचा मुलगा **पहाडसिंग** नांवाचा मोठा शूर होता; परंतु तो पळून दक्षिणेंत गेला व औरंगजेबाचा सरदार **दिलेरखान** याच्या हाताखाली राहिला. विजापूरावरील स्वारीत त्यानें बरीच कामगिरी केली. पुढें दिलेरखानानें पहाडसिंगास कांही सैन्य मदतीस दिलें. त्या सैन्यासह पहाडसिंगानें नरिंदशहाच्या सैन्याचा पराभव केला. नरिंदशहा व रामकृष्ण बाजपायी मंडल्याहून सोहागपुरास जाऊन राहिले व मोगल लष्कर परत जाईपर्यंत

त्यांनीं सैन्याची जमवाजमव केली. मोंगल सैन्य निघून गेल्यानंतर त्यांनीं पहाडसिंगावर हल्ला करून त्याचा पराभव करून त्यास ठार मारलें व नरिंद मंडल्यास राज्य करूं लागला.

पहाडसिंगास दोन पुत्र होते. पहाडसिंगाचा पराभव होतांच ते पळून गेले व कोणाची तरी मदत घेऊन स्वारी करून गढामंडल्याचें राज्य घेण्याची खटपट करूं लागले. मोगल दरबारांतून मदत मिळण्याची त्यांनी खटपट केली. औरंगजेबाची मदत मिळेल या आशेनें त्यांनी मुसलमानी धर्म स्वीकारला व **अबदुल रहिमान** व **अबदुल हाजी** या नांवांनीं त्यांनीं नवीन अवतार धारण केला. या वेळीं औरंगजेब स्वतःच्याच गड-बडीत होता, त्यामुळे त्याचेकडून या राजपुत्रांस कांही मदत मिळाली नाहीं. परंतु इतर कांहीं सरदारांनी मदत दिली. त्यांसह त्यांनी नरिंद-शहावर स्वारी केली. तसेंच मराठ्यांचीहि त्यांनीं मदत मिळविली होती. परंतु नरिंदशहाकडील मुत्सद्दी मंडळीहि सावध होती. मराठ्यांना त्यांनीं जास्त लालूच दाखवून अलग ठेवले व दोघा पठाण सरदारांची मदत घेऊन नूतन रहिमान व हाजी यांशी लढाई देऊन त्यांचा पराभव केला. त्याच युद्धांत ते दोघे शत्रू ठारहि झाले व नरिंदशहा त्या बाबतीत निर्विघ्न झाला.

परंतु एक नवीनच विघ्न उभें राहिलें. ते दोघे पठाण सरदार आपणच सर्व मुलूख दाबून बसले. शेवटी नरिंदशहानें देवगडचा प्रसिद्ध गोंड राजा **बखतबुलंद** याची मदत घेऊन त्या पठाणांशी दोन लढाया करून त्यांना ठार मारलें. बखतबुलंद यास तरी थोडासा मुलूख द्यावाच लागला. बखत-बुलंदाचा पुढे नागपूरकर भोसल्यांच्या राजकारणांत संबंध आला आहे.

नरिंदशहानें ३७ वर्षे राज्य केलें व इ. स. १७३२ मध्यें तो मरण पावला. त्याचे नंतर त्याचा पुत्र **महाराजशहा** गादीवर बसला.

---

# मराठ्यांची स्वारी
# व
# गढामंडल्याच्या राज्याचा नाश

**महाराजशहा** गादीवर असतांना मराठ्यांचा प्रवेश प्रथम या राज्यांत झाला. मोगलांची सत्ता नामशेष झाल्यानंतर मराठ्यांचा उदयकाल आला. उत्तरहिंदुस्थानांतील प्रभुत्वाबद्दल **पहिले बाजीराव** व **पहिले रघूजी भोंसले** यांजमध्यें चुरस लागली होती. रघुजीनें प्रथम गढामंडल्यावर स्वारी करून तेथून खंडणी घेतली. बाजीराव पेशव्यास याबद्दल राग आला. त्याचें म्हणणें हा भाग पेशव्याचे कार्यक्षेत्रापैकी होय व रघजीनें पाहिजे तर बंगालकडे हात पाय लांबवावेत. पुढे बाजीरावानें तो प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला. बाजीराव मेल्यावर इ. स. १७४२ मध्यें नानासाहेबाने लष्कर पाठवून महाराजशहाचा पराभव केला. त्या लढाईत महाराजशहा मरण पावल्याचें दिसते. त्यानंतर त्याचे पुत्र **शिवराजशहा** व **निजामशहा** गादीवर बसले व मराठ्यांस खंडणी व चौथाई देऊं लागले. त्या वेळी त्यांचा मुलूख अगदी थोडा राहिला होता व उत्पन्न दरसाल चौदा लाखांचें होतें. ते पेशव्यांना चार लाख रुपये चौथाईबद्दल देत होते. पेशवे वरील मुलखावर नांवाला तरी दिल्लीच्या बादशहाचा हक्क दाखवीत व बादशहाच्या सनदेवरून चौथाईची वसूली करीत.

भोसल्याना अर्थात् हें पसंत पडलें नाही. पण त्या वेळीं पेशव्यांचा जोर असल्यामुळे ते मुकाट्यानें बसले. पण हा मुलूख पेशव्यांच्या ताब्यांतून घेण्याकरितां मुधोजी भोसल्यानें इंग्रजांचीसुद्धा मदत मागण्यास कमी केलें नाही.

निजामशहाचा पुतण्या **नरहरशहा** हा मराठ्यांच्या विरुद्ध उठल्यामुळे त्यास पेशव्यांनी सागर व झांशी येथील अधिकाऱ्यांकडून काढून टाकून सर्व मुलूख आपल्या ताब्यांत घेतला. **सुमेरशहा** नांवाच्या या घराण्यांतील एका मनुष्यास पेशव्यांनी काही जहागीर देऊन खूष ठेवलें. पुढें पुण्याचें राज्य खालसा होईपर्यंत हीच स्थिति कायम होती.

पुण्याचें राज्य खालसा झाल्यावर हा मुलूखही इंग्रजांकडे गेला व त्यांनीहि या घराण्यांतील लोकांकडे पूर्ववत् जहागीर चालू ठेवली. इ. स. १८५७ च्या बंडाच्या वावटळीत **शंकरशहा** व त्याचा पुत्र **रघुनाथशहा** हे सांपडले. त्यांनीं बंडवाल्यांस सामील होऊन आपण स्वतंत्र राजे असल्याचें जाहीर केलें व थोडेसें लष्कर तयार करून बंडाचा बावटा लावला. त्यानंतर इंग्रजी लष्कर जाऊन त्यांना पकडण्यांत आलें व कांही चौकशी होऊन त्यांना ता. १८ सप्टेंबर १८५७ इ. रोजी तोफेच्या तोंडीं देऊन त्यांच्या चिंधड्या उडाल्या. त्यांच्यावर जबलपूर येथील इंग्रजी रेसिडेंटाचा खून करण्याचा कट केल्याबद्दल व बंडाबद्दल आरोप ठेवून एका लष्करी कमेटीमार्फत त्यांची चौकशी करण्यांत आली होती.

रघुनाथशहास दोन अज्ञान पुत्र होते. त्यांचा वंश दमो जिल्ह्यांत असून त्यांस कांहीं पेन्शन मिळतें.

शंकरशहा व रघुनाथशहा यांस तोफेचे तोंडी दिलेलें समजतांच रामगड येथील राजगोंड राणीनें बंड पुकारलें. १८५७ च्या बंडाच्या वेळी ज्याला फावलें त्यानें या संधीचा फायदा घेतल्याशिवाय सोडलें नाही. या राणीचें नाव माहीत नाहीं. पण तिचें चरित्र झांशीच्या लक्ष्मीबाईसारखेंच मर्दपणाचें आहे. तिनें स्वतः लष्कराचें प्रमुखत्व घेऊन व स्वतः लढून इंग्रजी लष्कराशी अनेक झटापटी केल्या. शेवटी पराभव झाल्यावर तिचा पाटलाग इंग्रजी लष्करानें केला. मोठ्या बहाद्दरीनें लढत लढत तिनें शत्रूस झुकांड्या दिल्या. परंतु नाइलाज होतांच घोड्याखाली उतरून आपल्या शिपायांपैकीं एकाची तलवार घेऊन इंग्रजी लष्कराच्या लगटींत पहातां पाहतां तिनें त्या तलवारीनें आपल्या हातानें आपला अंत करून घेतला; परंतु जिवतपणी शत्रूच्या हातांत सांपडली नाही. अशा अनेक शूर स्त्रिया अद्याप या देशाच्या इतिहासांत अप्रसिद्ध आहेत.

माळव्यापासून तों बगाल्यापर्यंत व बुंदेलखंडापासून तों वऱ्हाड नागपूरपर्यंत सत्ता गाजविलेल्या एका गोंड घराण्याचा इतिहास या प्रकारचा आहे. गोंड म्हणजे बिनसुधारलेले रानटी लोक अशी साधारण समजूत आहे; पण या राजघराण्यांतील पुरुषांनी व स्त्रियांनीं जीं सुधारणेची कामें केलीं

आहेत तीं त्या वेळच्या इतर सुधारलेल्या राजांच्यापेक्षां कांहीं कमी नाहीत. हे राजे विद्वानांचे चहाते असून विद्वान् पंडितांना पदरी बाळगीत. त्यांपैकी हिरदेशहा यानें जयगोविंद नांवाच्या पंडिताकडून आपल्या घराण्याचें आरंभापासून वंशवर्णन संस्कृत काव्यांत करून तें मंडल्याजवळ रामनगर येथील आपल्या राजवाड्यावर शिलेवर कोरून ठेवलेलें अद्याप कायम आहे. हें काव्य ५२ श्लोकांत असून संवत १७२४ मध्यें तें खोदलेलें आहे असा शेवटी लेख आहे.

दुसऱ्या एका राजानें आपले सर्व लक्ष शेती सुधारण्याकडे लावलें होते. राणी दुर्गावतीच्या सुधारणांसंबंधी मागेच वर्णन आलें आहे.

गढामंडल्याचें राज्य मोडकळीस आलें त्या सुमारास देवगड येथील दुसरें गोंड राजघराणें उदयास आलें व त्यानेहि आपलें कर्तृत्व कांहीं दिवस गाजविलें. त्याच घराण्यांत प्रसिद्ध बखतबुलंद झाला.

---

# देवगड येथील घराणें

गढा येथील राजघराण्यास उतरती कळा लागण्याच्या सुमारास देवगड येथें एका गोंड घराण्याचा उदय झाला. नागपुराहून छिंदवाड्यास जाण्याच्या रस्त्यावर थोडेसे आडमार्गास पण जवळच देवगडचा मोडकळीस आलेला किल्ला व ओसाड झालेलें पायथ्याचें देवगड गांव आहे. मध्यहिंदुस्थानांतील डोंगरांत व दाट जंगलांत गोंडांनी आश्रय केला होता व मुसलमानांच्या प्रखर माऱ्यामुळें उघड्या मैदानांत होईल तोंपर्यंत न येतां दुर्गम अशा प्रदेशांत हे गोंड लोक व त्याचे राजे म्हणविणारे नाईक दबा धरून वसत असत.

देवगडचें गोंड घराणें मूळचें हरया अगर हरयागड या ठिकाणचें. **जातबा** म्हणून त्यांचा मूळपुरुष पराक्रमी निघाला व बारा कोसांवर **देवगड** ही सोईची जागा पाहून तेथें त्यानें आपलें ठाणें दिलें. हा सर्व प्रांत मूळचा गढ्याच्या राज्यांतला होता. गढ्याचें राज्य मुसलमान सुभेदाराच्या अमलाखालीं गेल्यावर हा प्रदेशहि मोंगलांच्या ताब्यांत गेला. परंतु मोग-

लांचा ताबा नांवाचाच असून गढा येथील राजघराण्यांतील पुरुषांपासून खंडणी घेऊन त्यांच्याच ताब्यांत मुलूख ठेवीत असत. कारण हा प्रदेश उत्पन्नास कमी, वस्ती रानटी व मुलूख जंगली यामुळें खर्चास महाग होता. जातबा हा गढ्याच्या राजाचा मांडलिक होता. पण गढ्याचें राज्यच मोंगलांचें मांडलिक बनलें तेव्हां तो मोगलांचा मांडलिक झाला. अकबराच्या वेळेस तो एक महत्त्वाचा संस्थानिक होता व त्याचेजवळ दोन हजार स्वार, पन्नास हजार पायदळ व शंभर हत्ती होते असें ऐनी अकबरीत वर्णन आहे. त्याने आपल्या नांवाचें नाणें पाडले होतें. त्यानें पश्चिमेस व दक्षिणेस नागपुरापर्यंत आपला अंमल वाढविला व नागपुरास एक किल्ला बांधून तेथेंहि एक ठाणें ठेवलें. हा किल्ला नागपुरास शहरांत असून देवगडचे गोंड राजे त्यांत रहातात व त्यांना "किल्लेवाले राजे" म्हणतात.

जातबानंतर त्याचा मुलगा **कोकशाह** हा (इ. स. १६०० चे सुमारास) गादीवर बसला. त्यानें मोगलांची खंडणी वेळेवर दिली नाही म्हणून शहाजहानचा सरदार खानडौरान यानें वऱ्हाडांतून स्वारी करून देवगडच्या मुलखापैकी नागपुरापर्यंत प्रदेश घेतला व खुद्द नागपूरच्या किल्ल्यास इ. स. १६३७ मध्ये वेढा दिला व सुरुंग लावून तीन चार बरूज उडवून दिले. नंतर कोकशहानें देवगडाहून येऊन तह केला व दीड लाख रुपये व पावणेदोनशे हत्ती देऊन हें संकट टाळलें. नागपूरच्या किल्ल्यावर कोकशहाकडून देवजी नांवाचा किल्लेदार होता. नागपूरचा किल्ला परत कोकशहाचे ताब्यांत मिळाला.

शहाजहानाच्या कारकीर्दीत त्याचा सरदार शहानवाजखान यानें इ. स. १६४८ मध्यें पुन्हां देवगडावर स्वारी केली; परंतु मूळचेच गरीब व मोगलांचे त्रासानें पिळून गेलेल्या देवगडच्या खजिन्यांतून कांहीच प्राप्ति होण्यासारखी नव्हती. सर्व हत्ती पूर्वीच खानडौराननें नेले. त्यामुळें शहानवाजची निराशा झाली, व पुढेंहि देवगडची खंडणी वेळेवर न जातां थकत चालली.

औरंगजेब दक्षिणेस सुभेदार असतां शहाजहानानें देवगडची खंडणी वसूल करण्याबद्दल त्यास तगादा लावला. परंतु औरंगजेबास वस्तुस्थिति

माहीत असल्यामुळें त्यानें लिहिलें की, देवगडच्या राजाजवळ कांहीं राहिलें नाही. त्याला त्रास देण्यात अर्थ नाही. तरी शहाजहानास तें खरें न वाटून त्यानें स्वारी करण्याबद्दल सांगितलें. शेवटीं औरंगजेबानें देवगडावर स्वारी करून राजाजवळ राहिलेले वीस हत्ती मात्र आणले. औरंगजेबाने या बाबतींत लिहिलेली पत्रे उपलब्ध आहेत.

औरंगजेबाचे कारकीर्दीत दिलेरखान यानें इ. स. १६६७ मध्यें देवगडावर स्वारी करून थकलेली बाकी पंधरा लक्ष रुपये वसूल केली.

**बखतबुलंद**—कोकशहानंतर प्रसिद्ध **बखतबुलंद** हा गादीवर बसला. याचें मूळचें नांव बखतशहा, याचे भावांनी याचेविरुद्ध बंड करून त्यास देवगडाहून हाकून दिलें. तेव्हां तो पळून औरंगजेबाकडे मदत मागण्यास गेला. "तूं मुसलमान होशील तर मी तुला मदत करतों" असें औरंगजेबानें सांगितलें. बखतबुलंद यानें निरुपायानें ती गोष्ट कबूल केली; पण पुढील अटी घातल्या. मुसलमान झाल्यावर मुसलमानांशीं रोटीव्यवहार करीन पण बेटीव्यवहार करणार नाही. गोंडांच्याच मुली करीन. याप्रमाणें करार ठरल्यानंतर तो मुसलमान झाला व मदत घेऊन परत आला व आपलें राज्य परत मिळविलें. हल्ली नागपुरास बखतबुलंद याचा वंश आहे व आतांपर्यंत गोंडाशीच त्यांचे लग्नसंबंध होतात. लग्नविधि हिंदु व गोंडी पद्धतीनें होऊन नंतर मुसलमानी विधि करतात.

बखतबुलंद पराक्रमी निघाला. त्यानें उत्तरेकडून व पूर्वेकडून वऱ्हाडच्या सरहद्दीपर्यंत आपलें राज्य वाढविलें. नागपूर शहर त्यानें वसविलें. राजापूर बारसा नांवाच्या बारा वाड्या होत्या त्या एकत्र करून रस्ते पाडून पेठा बसविल्या व तट बांधला. नागपूर हे नाव सुद्धा त्यानेंच दिलें.

एकंदरीत बखतबुलंद हा मोठा पराक्रमी निघाला. गढ्याच्या नरिंदशहावर दोघां पठाण सरदारांनीं आणलेलें संकट यानें मदत देऊन टाळलें हें मागें आलेंच आहे. हा इ. १७०६ चे सुमारास मरण पावला. त्याचे नंतर त्याचा मुलगा चांद सुलतान हा गादीवर बसला.

**चांद सुलतान**—याचे कारकीर्दीत नागपुर हें महत्त्वाचें ठाणें झालें. त्यामुळें नागपूर व आसपासचा प्रदेश याची एकदम सुधारणा झाली व पुढें

मराठ्यांच्या कारकीर्दीत तर नागपूर शहर फारच वाढलें. मोगल अंमल या वेळीं मोडकळीस आला होता. त्यामुळें यानें मोगलांचाहि प्रदेश आपल्या अंमलाखालीं आणला. वर्धा जिल्ह्यांतील पवनार हें मोगलांचें एक महत्त्वाचें लष्करी ठाणें होतें. तें यानें घेऊन वीस वर्षें आपल्या ताब्यांत ठेवलें· चांद सुलतान इ. स. १७३८ मध्यें मरण पावला.

**मराठ्यांचा प्रवेश**—चांद सुलतान मेल्यावर त्याचा अनौरस मुलगा वलीशहा यानें गादी बळकावली. चांद सुलतान याचा वडील औरस मुलगा बहादुरशहा यास वलीशहाने मारलें. धाकटे अकबर व बुऱ्हाणशहा हे अल्पवयी असल्यामुळें त्याचें कांहीं चालेना. शेवटीं चांद सुलतान याची बायको राणी **रतनकुवर** इनें रघूजी भोंसले हा वऱ्हाडांत होता त्यास मदतीस बोलावलें. भोंसल्याचें ठाणें त्या वेळी वऱ्हाडांत हल्लींच्या यवतमाळ जिल्ह्यांत **भाम** येथें होतें. रघुजीनें देवगडास जाऊन बुऱ्हाणशहास गादीवर बसविलें व वलीशहास कैद केलें. ही लढाई सोनबरडी व गिरोली या गांवांच्या दरम्यान झाली. या लढाईत रघूजीचे सरदार तुळजोरामपंत व करांडे हे होते व त्यांनीं फार शौर्य गाजविलें. करांडे यांचें घराणें या वेळेपासून प्रसिद्धीस आलें. वलीशहाचा सेनापति रघूनाथसिंग नांवाचा होता. तो जखमी होऊन रघूजीच्या हातीं सांपडला. रघूजीनें त्याची चांगली शुश्रुषा करून त्यास परत पाठविलें. त्यामुळें तो त्याचा मित्र बनला. राणी रतनकुवर इनें या मदतीबद्दल रघूजीस आपल्या दोघां मुलांबरोबर तिसरा हिस्सा दिला.

यानंतर कांहीं दिवसांनीं बुऱ्हाणशहा व त्याचा भाऊ अकबरशहा यांचेमध्यें तंटे सुरू झाले. अकबरशहानें निजामाची मदत घेतली व बुऱ्हाणशहानें रघूजीची मदत मागितली, रघूजीनें बुऱ्हाणशहाचा पक्ष घेतला· अकबरशहास निजामाच्या लष्करांत विषप्रयोग झाला व तो रघुजीनें व त्याच्या पक्षाच्या माणसांनींच करविला असें म्हणतात. अकबरशहाच्या राज्यांतील निम्मा हिस्सा बुऱ्हाणशहानें रघजीस दिला. याप्रमाणें देवगडचें बहुतेक राज्य रघूजीच्या ताब्यांत आलें व त्यानें नागपुरास येऊन वस्ती केली. बुऱ्हाणशहानें उत्पन्नाचा चौथा हिस्सा घेण्याचें कबूल करून व त्यानतर नक्की रक्कम घेण्याचें कबल करून आपला हिस्साहि रघजीच्या स्वाधीन केला व

नागपुरास आपले किल्लयांत शांततेनें राहिला. तेथेंच त्याचे वंशज अद्याप रहात आहेत. देवगड येथें पडका किल्ला, इमारतीच्या खुणा व जातबाची समाधि एवढाच अवशेष राहिला आहे. नागपूरचे किल्लेवाले राजांस इंग्रज सरकाराकडून कांही नेमणूक मिळते.

---

## चंद्रपूरचें राजघराणें

राजकारणाच्या घडामोडीपासून अगदी दूर व अलिप्त राहण्याचा सर्वच मूळजातीचा स्वभाव. त्यांना जवळ करून प्रेमानें वागविणारे कोणीच नसल्यामुळें व सुधारलेल्या जगाच्या शर्यतीत पडून इतरांबरोबर टिकण्याची त्यांची तयारी नसल्यामुळें हे लोक पहाडी मुलखात स्वेच्छाचार करीत आले. कोणी जाऊन त्यांच्या नित्य व्यवहारांत व्यत्यय आणल्याशिवाय हे वनराज जगाच्या भानगडीत पडत नसत. परंतु त्यांतूनहि या वनचारी गोंड लोकांनी आपल्या जंगली अगर डोंगरी मुलखात सुव्यवस्थित राज्यें चालवून दाखविलीं.

मध्यप्रांतांतील चंद्रपूर जिल्हा म्हणजे निबिड अरण्याचा भाग. फार प्राचीन काळी भांदक ( प्राचीन भद्रावती व भानक ) व मार्कंड हीं स्थानें महत्त्वाची होती असें तेथील प्राचीन देवळांवरून व त्यांवरील गुप्तकालीन शिलालेखांवरून दिसतें. तसेच या भागांतील गोंडांजवळ मध्ययुगीन काळच्या **वाकाटक** वंशाचे दोन ताम्रपट सांपडलेले प्रसिद्ध आहेत. परंतु त्यानंतर गोंड राजांचें राज्य होईपर्यंत हल्लीच्या चंद्रपुराच्या जवळचा भाग बराच अरण्यमय होता व सुधारणेची प्राथमिक चिन्हें म्हणजे शेती व वसलेलीं गांवें यांचा या भागांत बराच अभाव असावा असें दिसतें.

चंद्रपुर जिल्ह्यांत गोंडांची वस्ती बरीच आहे. मूळचे राहणारे हेच लोक. यांच्यांत चार, पांच, पासून सात देवांपर्यंत पूजणाऱ्या निरनिराळ्या पोटजाती अगर टोळ्या आहेत व भिन्न संख्येच्या देवांच्या भक्तांमध्येंच सोयरीक होते. एका संख्येच्या देवाचे भक्त आपणांस सगोत्र असें समजतात. राजगोंड व माडीगोंड ह्या दोन मुख्य पोटजाती आहेत.

चंद्रपूरचे गोंड राजे प्रथम वर्धा नदीच्या पश्चिम तीरावर शिरपुर येथें राज्य करीत असत. हें शिरपुर वऱ्हाडच्या वणी तालुक्याच्या दक्षिणेस

निजाम राज्यांत आहे. भीम बल्लाळसिंग नांवाच्या पुरुषानें प्रथम सर्व गोंडांना सुव्यवस्थित करून शिरपुरास राज्य स्थापलें. याची कारकीर्द इ. स. ८९५ च्या सुमारास समजली जाते. जवळच माणीकगड येथें एक प्रसिद्ध किल्ला आहे. त्याच्या आश्रयानें ही राजधानी त्यानें केली. प्रत्येक राजा आपल्या नांवापुढें बल्लाळसिंग हें घराण्याचें नांव लावीत असे. हीरसिंग नांवाच्या राजानें प्रथम जमिनी लोकांस देऊन त्या लागवडीस आणल्या. या घराण्यांतील दुसरा एक राजा केसरसिंग यानेंहि राज्यांत बऱ्याच सुधारणा केल्या व आपल्या राज्याची मर्यादा बरीच वाढविली. त्याचा मुलगा दिनकरशहा यानें ही सुधारणा पुढें चालविली व बाहेरील कर्ते पुरुष व विद्वान् लोक राज्यांत आणले. त्यामुळें राज्यांत व्यवस्था लागून उत्पन्न वाढलें. पूर्वी नसलेला खजिना व कायमचें सैन्य हें झाल्यामुळें त्यावेळच्या भोळ्या प्रजेची अशी समजूत झाली होती की दिनकरशहाजवळ परीस आहे व त्यामुळें तो वाटेल तितकें द्रव्य उत्पन्न करूं शकतो. त्याचा मुलगा रामसिंग हाहि शूर व प्रामाणिक राजा होता. त्यामुळें त्याचें राज्य वाढून प्रजेचीहि त्यावर भक्ति जडली. त्यानें शूर लोकांस जमिनी देऊन कायमचें सैन्य उभें केलें. नाक्याच्या जागीं किल्ले बांधले.

रामसिंगाचा मुलगा सुरजाबल्लालशहा हाहि शूर निघाला. उत्तर हिंदुस्थानांत जाऊन तो युद्धकला व नवीन जगांतील राजकारण शिकण्याकरितां मोगल दरबारात राहिला. त्याच्यासंबंधानें एक दंतकथा अशी आहे की त्याच्या व बादशहाच्या शिपायांचें भांडण होऊन रामसिंगास बादशहानें कैद केलें. रामसिंगाच्या लोकांकडून ही बातमी गोंडवणांत समजल्यावर सर्व गोंड शिपाई जरबा नांवाच्या गोंडाच्या हाताखालीं दिल्लीवर चाल करून सुरजास सोडवण्याकरितां गेले. इकडे मोहनसिंग नांवाच्या रजपूत राजानें आपली मुलगी बादशहास देण्याचें नाकारल्यावरून त्यावर स्वारी करून त्याचा मोड करण्याचें व त्या मुलीस जबरीनें आणण्याचें काम बादशहानें सुरजास दिलें व तें केल्यास त्यास सोडून देण्याचें कबूल केलें. सुरजानें तें कबूल केलें. इतक्यांत त्याचें गोंड लष्कर दिल्लीस आलें. तें व कांहीं मोगल लष्कर घेऊन सुरजानें मोहनसिंगाचा मोड केला व त्यांत मोहनसिंग ठार झाला.

त्याची बायको व मुलगी सुरजाच्या हातीं सांपडली व त्यांना घेऊन तो परत दिल्लीस आला. वाटेंत मोहनसिंगाच्या बायकोनें सुरजाची प्रार्थना केली कीं माझी व मुलीची अब्रू वांचीव. कारण त्यावेळच्या नेहमीच्या क्रमाप्रमाणें बादशहाच्या जनानखान्यांतच त्यांची योजना होणार हें तिला माहीत होतें. सुरजानें कबूल केलें की " मी तुमची अब्रू वांचवीन अगर तसें अशक्य झाल्यास माझ्या हातानें तुमची शिरें उडवीन. " सुरजानें एक युक्ति लढविली. त्यानें मोहनसिंगाच्या मुलीस मुलाचा पोषाख दिला व आपला मुलगा म्हणून जाहीर केले. बादशहापुढे जातांच पूर्ण यशस्वी होऊन आलेल्या सुरजास उत्तेजन यावें म्हणून त्याच्या बरोबर असलेला त्याचा मुलगाच समजून त्यानें " बेटा " म्हणून त्यास आपले मांडीवर घेतलें व सगळ्या लढाईचें फळ मोहनसिंगाची मुलगी ती कोठें आहे म्हणून सुरजास विचारलें. सुरजानें सांगितलें कीं " बेटा " म्हणून मांडीवर घेतलेली तीच मोहनसिंगाची मुलगी व तुम्ही " बेटा " म्हणून म्हटल्यावर आतां ती तुमचीहि मुलगीच झाली. बादशहानें निरुत्तर होऊन त्या मुलीविषयी अभिलाषबुद्धि न धरतां तिला सुरजाचे स्वाधीन केलें व याप्रमाणें सुरजानें त्यांची लाज राखली. या दंतकथेंत तथ्य किती हें सांगणें कठिण आहे.

बादशहानें सुरजाचा सन्मान करून व " शेरशहा " हा किताब व मंडल्यापासून सर्व गोंडवणाची सनद देऊन त्यास परत पाठविलें. सुधारलेल्या राज्याचा अनुभव मिळाल्यानें सुरजानें सुधारलेली राज्यपद्धति आपल्याहि राज्यांत सुरू केली. त्याचे वेळेपासून या घराण्यांतील गोंड राजांनीं " बल्लाळसिंग " च्या ऐवजीं " बल्लालशहा " हें नांव सुरू केलें.

त्याचेनंतर त्याचा मुलगा खांडक्या बल्लाळशहा हा गादीवर बसला. त्याच्या अंगावर जागोजाग खांडकें असत म्हणून हें नांव त्यास पडले. त्याची बायको फार सद्गुणी होती. तिनें त्याच्या अंगावरील खांडकें बंद होण्याकरितां पुष्कळ उपाय केले परंतु कांही उपयोग झाला नाहीं. शेवटचा उपाय म्हणून तिनें शिरपुर राजधानी मोडून वर्धेच्या पूर्वेकडील कांठावर राजधानी केली व तेथें या स्थलांतरानें तरी फायदा होईल असें तिला वाटलें. नव्या राजधानीचें नांव " बल्लाळशहा " असेंच ठेवलें. बल्लाळपुर असेंहि त्याचें दुसरें नांव आहे. तेथेंच वर्धा नदीच्या विस्तीर्ण पात्राच्या काठांवर

या राजानें एक किल्लाहि बांधला. पुढें चंद्रपुर ऊर्फ चांदा ही राजधानी झाल्यावर येथील वस्ती मोडली, किल्याचे आंतील इमारतीहि पडल्या, कांही झोंपड्या मात्र शिल्लक होत्या. चांद्यावरून पुढें तेलंगणांत बिझवाड्यास रेलवेचा फाटा झाल्यामुळें व सुमारें २५ वर्षांपूर्वी बल्लाळशहा या गांवीं दगडी कोळशाची सरकारी खाण सुरू केल्यामळें वरोड्याहून तेथपर्यंत रेलवेची सडक गेली आहे. या कोळशाच्या खाणीमुळें "बल्लाळशहा" या गांवी टुमदार वस्ती होऊन नवीन शहर वसलें आहे. किल्ल्याचा परकोट कायम असून चांगल्या स्थितीत आहे.

चंद्रपूर ऊर्फ चांदा शहराची स्थापना कशी झाली याविषयीं एक दंतकथा प्रसिद्ध आहे. खांडक्या बल्लाळशहा हा उन्हाळ्यांत एके दिवशीं शिकारीस गेला असतां फार ऊन होऊन त्यास तहान लागली. हल्लीं चंद्रपुर जेथें आहे तेथे अरण्य असून तेथून एक ओढा जात होता. पण त्याचे पात्र अगदी कोरडे ठणठणीत होते. राजास तहान फार लागल्यामुळें नाल्याच्या कांठीं अगर पात्रांत कोठें तरी थोडेसें पाणी आहे कीं काय म्हणून तो पाहूं लागला व एका कांठावरील छिद्रांत त्यानें थोडेंसें खणलें तों थोडें पाणी लागलें. ते पिऊन व तोंड धुऊन थोडी विश्रांति घेऊन तो परत आला. रात्री त्याला कधी न लागली अशी गाढ झोंप लागली. सकाळी उठल्यावर राणीने पाहिले ता राजाचा चेहरा ताजातवाना दिसूं लागला व आश्चर्य हें की, चेहऱ्यावरील सर्व खाडकें, पुळ्या वगैरे नाहीशा झाल्या. हें पाहून राणीनें राजास आदल्ले दिवशीची सर्व हकीकत विचारली व त्या चाणाक्ष स्त्रीनें ओळखले की, राजानें ज्या पाण्यानें तोंड व चेहरा धुतला त्यांत कांही तरी गुण असला पाहिजे. तिनें लागलीच तें ठिकाण दाखविण्याबद्दल राजास सांगितलें. कांहीसा शोध करतांच तें ठिकाण सापडलें. राणीनें तें आणखी खणविलें. तों एका खडकावर गाईचीं पांच खुरें उमटलेली होती व त्यात पाणी सांचलेलें होतें. त्यांतून पाणी कितीहि वेळां काढलें तरी खुराची जागा पाण्यानें भरलेली राही. ही कांही तरी पवित्र जागा आहे व म्हणूनच या पाण्यात कांहीं तरी गुण आहे असें राणीनें ओळखून राजास त्या पाण्यानें स्नान घातलें व त्यामुळें

त्याचे अंगावरील सर्व खांडकें नाहींशीं होऊन त्याचें सर्व शरीर निरोगी व तेजस्वी झालें. रात्री त्याच जागेवर राजानें तळ दिला. रात्रीं झोपेंत राजाचे स्वप्नांत अचलेश्वर महादेव येऊन त्यानें राजास दर्शन दिलें. राजानें त्या जागेवर अचलेश्वराचें भव्य देऊळ बांधविलें व नित्य दर्शनास जाऊं लागला.

एके दिवशीं राजा बल्लाळपुराहून अचलेश्वराचे दर्शनास गेला असतां त्याच्या मागें त्याचा शिकारी कुत्रा येत होता. तोंच एका बिळांतून एक ससा निघून त्यानें कुत्र्यावर हल्ला केला व कुत्रा भिऊन पळत सुटला व ससा त्याचे मागें लागला. सशानें वांकडीतिकडी वळणें घेऊन एका ठिकाणी जवळजवळ कुत्र्यास गाठलें; परंतु कुत्र्यानें त्यास हुलकावणी देऊन पुन्हां शर्यत सुरू झाली व कुत्रा धांवत जेथें राजा बिळाजवळ उभा होता त्या ठिकाणाजवळ आला, परंतु थोडेसे अंतर रहातांच एकदम मागें उलटून सशावर त्यानें चाल केली व त्यास फाडून टाकलें. मेलेल्या सशावर चंद्राचे आकाराचा एक पांढरा ठिपका होता.

घरी आल्यानंतर राजानें हा चमत्कार राणीस सांगितला व तिच्या चातुर्याबद्दल त्याची फार खात्री झाली होती म्हणून तिला त्यानें याचा अर्थ काय असें विचारले. तिने विचार करून सांगितलें की, हें त्या स्थला-चेंच माहात्म्य आहे. तेथें भ्याडासहि धैर्य येईल अशी ती जागा आहे. म्हणून सशानें कुत्र्यावर चाल केली. या जागेवर शहर अगर किल्ला बांधा-ल्यास तो अजिंक्य होईल. राजानें त्या जागेवर शहर वसवून ज्या ज्या मार्गाने सशाची पावले उमटली होती तमतसा परकोट बांधविला व ज्या ठिकाणी सशानें कुत्र्यास जवळ जवळ गांठलें होतें व जेथें कुत्र्यानें सशास मारले तेथें असे दोन मजबूत बुरूज बांधविले. पहिला बुरूज मजबूत व दुसरा नेहमी कच्चा राहील व दुसऱ्या बुरजाच्या जागेवरच नेहमी धोका राहील असे तिनें भविष्य सांगितले. त्याचप्रमाणें पुढें झालें. चंद्रपूरचा तट असा वांकडातिकडा कां याचे हें कारण सांगण्यांत येतें. सशाच्या डोक्यावरील चंद्राच्या ठिपक्यावरून शहराचें नांव चंद्रपुर पडलें. सशाची व कुत्र्याची दंतकथा पुष्कळ शहरासंबधाने व किल्ल्यांसंबधाने आहे व ही फार सर्वसामान्य समजूत आहे.

खांडक्या बल्लाळशहानंतर त्याचा मुलगा हीरशहा हा गादीवर बसला. त्यानेंहि राज्याच्या सुधारणेंत महत्त्वाची भर घातली. रामशहा यानें पुष्कळ जंगली भाग आपल्या सरदारांना दिले होते. या सरदारांस तरवेल असे म्हणत. हीरशहानें असा हुकूम दिला की, आपआपले भागांतील जंगल तोडून साफ करून जे वस्ती वाढवितील त्या तरवेलांना तितक्या भागाची सनद दिली जाईल व जे याप्रमाणें करणार नाहींत त्यांचें जंगल सरकारांत जमा होईल. पुष्कळ जमीनदारांनी याप्रमाणें जंगल काढून जमीन साफ केली व गांवें वसविलीं. हीरशहानें त्यांना त्या भागाच्या सनदा दिल्या. याप्रमाणें हल्लीं चांदा जिल्ह्यात पुष्कळ जमीनदार आहेत. शिवाय जो कोणी तलाव बांधील त्यास त्या तलावाखाली भिजेल इतक्या जमिनीची त्यानें मालकीची सनद द्यावी. याप्रमाणें शेतीस उत्तेजन मिळून वस्ती वाढली. दरसाल तो शेतकऱ्यांना बोलावीत असे व शेतीच्या औतांचा नजराणा घेत असे. प्रत्येक औताच्या नजराण्यास तो सोन्याचें एक लहानसें औत करून बक्षिसादाखल देई. याप्रमाणें पुष्कळ जमीन त्यानें लागवडीस आणली. त्यामुळें राज्याचें उत्पन्न व व्यापारउदीम वाढला. त्यानें चांद्याच्या तटबंदीचें काम चालू टेवलें व प्रथम वेशी पुऱ्या करून आंत किल्ला बांधला व त्यांत आपला राजवाडा बांधला व मोठ्या इतमामानें त्यांत प्रवेश केला. हीरशहा हा पहिला स्वतंत्र राजा झाला असें म्हणतात.

कोंडीशहा ऊर्फ कर्णशहा या नांवाचा पुढे एक राजा झाला. त्यानें तटाचें काम निम्याच्या वर पुरें केले. तो विद्वानांचा चहाता व महादेवाचा भक्त होता. त्याचे कारकीर्दींत चांदा शहर वस्तीनें गजबजून गेलें. न्यायदानाची मोडकीतोडकी पद्धत त्यानें सुरू केली. त्याचा मुलगा बाबाजी याचें नांव ऐनी अकबरीत लिहिलेलें आहे व त्याचेजवळ दहा हजार घोडेस्वार व चाळीस हजार पायदळ होतें असें वर्णन आहे. वैरागड येथें रत्नांची एक खाण होती व ती या गोंड राजाच्या ताब्यांत होती असेंहि तेथें वर्णन आहे.

बाबाजीचा मुलगा धुंडिरामशहा हा विशेपसा कर्तबगार नव्हता. परंतु त्याचेच कारकीर्दींत चांद्याचा तट पूर्ण होऊन त्याबद्दल मोठा उत्सव करण्यांत आला. त्यावेळीं पुष्कळ ब्राह्मणांना व इतरांना या राजानें सनदा दिल्या.

त्यांतच धाटकुळ येथील जमीनदार व वऱ्हाडांतील केळापुर, बोरी, कळंब वगैरे बाजूस कांहीं लिंगाईत वाणी लोकांच्या सनदा आहेत. हल्लीं त्यांचे वंशज तेथें आहेत. देवगड येथील गोंडराजे चंद्रपुरचे मांडलीक होते. परंतु यावेळेस त्यांचा जोर वाढून ते स्वतंत्र झाले. धुडीचा मुलगा कृष्णशहा यानें गोवध बंद केला.

बीरशहा नांवाच्या राजाची मुलगी देवगडच्या दुर्गपाल नांवाच्या राजास दिली होती. त्यानें त्या मुलीस वाईट रीतीनें वागविलें म्हणून बीरशहानें त्याचेवर स्वारी करून त्याचा पराभव केला व लढाईत आपल्या हातानें 'जय महाकाली' म्हणून त्याचें शीर उडविलें व तें शीर आणून त्यानें चंद्रपुर येथील पुरातन देवी महाकाली इचेसमोर अर्पण केलें. त्याची बायको हिराई इनें महाकालीचें जुनें देऊळ पाडून हल्लीचें नवें देऊळ बांधलें व देवळाच्या एका भिंतीवर मृत दुर्गपालाचा अर्धपुतळा तिनें कोरविला तो तेथें अद्याप आहे.

बीरशहास त्याच्याच पदरच्या एका रजपुतानें मारलें. त्याची समाधि चंद्रपुरास उत्तम इमारतीपैकी एक आहे. त्याची बायको हिराई इनें रामशहा नांवाच्या मुलास दत्तक घेतलें. रामशहा हा फारच सदाचारी होता व त्या-वर प्रजेची मोठी भक्ती होती. रमाळा नांवाचा तलाव व रामबाग नांवाचा बाग यानें बांधला. त्याचा जन्मदाता बाप गोविंदशहा यानें जवळच गोविंद-पुर व नगीनाबाग नांवाच्या पेठा बसविल्या. याचे कारकीर्दींत पैहिला रघूजी भोसला यानें चंद्रपुरावर स्वारी केली. परंतु तो रामशहाच्या भेटीस गेला असतां त्याच्या साधुवृत्तीचा रघूजीच्या मनावर इतका परिणाम झाला कीं तो कांहींहि कुरापत न काढतां परत गेला.

परंतु पुढें नीलकंटशहा नांवाचा दुष्ट राजा झाला व त्याचे त्रासानें प्रजा त्रस्त झाली. यामुळें सहजच नागपूरकर भोंसल्यांस हात घालण्यास जागा सांपडून त्यांनीं चांद्यावर स्वारी केली व नीलकंठशहास कैद करून सर्व राज्य आपले राज्यास जोडलें. नागपूरच्या खालोखाल भोसल्यांचें मह-त्वाचें ठाणें चंद्रपुरास असे. नीलकंठशहाचे वंशजांस भोसल्यांनीं कांहीं वर्षा-सन करून दिलें तें त्यांचे वंशजांस अद्याप चालू आहे.

सर्व गोंड राजांचें राजचिन्ह त्यांच्या किल्ल्याचे व शहराचे इमारतीवर दिसतें. एक सिंह हत्तीच्या पाठीवर चाल करून एका पंजानें त्याची सोंड धरून ओढीत त्याचे पाठीवर उभा आहे असें हें चित्र आहे.

नीलकंठशहाचे वंशज हल्लीं चंद्रपुरास रहात असून त्यांना पांचशें रुपये महिन्याचे पोलिटिकल पेन्शन ब्रिटिश सरकारकडून मिळतें व शिवाय प्रत्येक गोंड घराणें त्यांना सालीना एक रुपया कर देते. तसेंच गोंडांच्या लग्नांत त्यास सव्वा रुपया कर मिळतो. हल्ली दिनकरशहा नांवाचा राजा आहे.

सातपुड्याच्या उत्तरेकडील उतारावर बैतुलजवळ खेरला नांवाचा डोंगरी किल्ला आहे. तेथेंहि एक गोंड राजघराणें राज्य करीत होतें. त्याचें वर्णन फेरिस्त्याच्या इतिहासांत आहे. ते आपणास रजपूत म्हणत असत. माळवा, खानदेश, एलिचपूर व बहामनी या मुसलमान राजांशी त्यांनी कैक दिवस युद्ध केलें; परंतु अखेर त्यांचा पराभव होऊन ते नामशेष झाले. नरसिंगराय हा त्यांच्यामध्यें बराच पराक्रमी राजा निघाला. खेरल्याच्या किल्ल्याजवळ मुकुंदराज नांवाच्या साधूची प्रसिद्ध समाधि आहे. व तेथें दरसाल मोठी यात्रा भरते. कित्येकांच्या मतें प्रसिद्ध मराठी कवी व साधु मुकुंदराज त्याचीच ही समाधि आहे. व जैत्रपाल वगैरे विवेकसिंधूंत लिहिलेले राजे याच खेरला राजघराण्यांतील होते. परंतु या विधानाबद्दल खात्री देतां येत नाहीं.

मेळघाटांतहि पुष्कळ लहान गोंड नाईक "राजे" या नांवानें प्रसिद्ध आहेत.

गोंड लोकांची वस्ती मध्यप्रांतांत फार मोठी आहे. विद्येंत व सुधारणेंत ते अद्यापहि मागेंच आहेत. त्यांचेपैकी राजगोंड ही जात त्यांतल्यात्यांत पुढे आहे. त्यांच्या चालीरीति अद्याप मागेंच आहेत.

---

## भाग ३ रा.

# नागपुरकर भोंसले घराण्याचा उदय

## परसोजी व कान्होजी

( १६९९–१७०९ इ. ) व ( १७०९–१७३० )



नागपुरकर भोंसल्यांचा उदय होण्यापूर्वी मध्यप्रांतांत सर्वत्र गोंडांचीं राज्यें चालत होती. मोगल साम्राज्यांत या प्रदेशाचा अंतर्भाव होत असून अकबरापासून या सुभ्याबद्दल कागदोपत्रीं उल्लेख सांपडतो. परंतु वास्तविक अंमल मात्र गोंडांचाच असून ते मोंगलांचें सार्वभौमत्व कबूल करून त्यांना करभार देत असत. वऱ्हाडच्या बाजूस लागून असलेला भाग प्रथम अहमदनगरच्या निजामशाही राज्याचा भाग म्हणून समजला जात होता. त्याचे अवशेष अद्यापहि वर्धा जिल्ह्यांत आहेत.[१] निजामशाही राज्य मोगलांनीं काबीज केल्यानंतर सर्वच प्रदेश दिल्लीच्या मोगलांच्या अंकित झाला.

निजामशाही राज्य मोगलांनीं जिंकून घेतल्यानंतर अकबरानें वऱ्हाडचा एक स्वतंत्र सुभा केला. त्यांतच उत्तरेस बैतूलपासून दक्षिणेस चंद्रपुरापर्यंत म्हणजे मध्यप्रांताच्या पश्चिमेकडील भागाचा समावेश होत होता. बैतूल

---

१ यवतमाळ जिल्ह्यांत कळंब येथें सांपडलेला एक शिलालेख नागपुरच्या म्यूझियममध्यें आहे. तो प्रस्तुत लेखकानें वाचून लावला आहे. तो इ. स. १६०० चा असून बुऱ्हाण निजामशहाच्या नांवानें आहे. कळंब येथून सालोड फकीर व नाचणगांवाकडे जाण्यास दोन रस्ते फुटतात त्या फाट्यावर कोणता रस्ता कोणीकडे जातो तें प्रवाशस दाखविण्याकरितां हा दगड हल्लींच्या मैलांचे दगडाप्रमाणें उभा रोवलेला होता असें दिसतें. त्याच्यावरील अर्ध्या भागांत तोच मजकूर फारशींत लिहिलेला होता असें दिसतें. तो खरडून टाकला आहे. अक्षर ३२५ वर्षांपूर्वीचें बालबोध लिपींत लिहिलेलें आहे. परंतु कांहीं अक्षरें वाचण्यास कठीण आहेत. प्रवाशाच्या सोईकरितां त्यावेळीं असे दगड लावल्याचा हा प्रथमच पुरावा मिळतो.

जवळील खेरला ऊर्फ खेरडा या सरकारा (जिल्हा) खालीं बैतूल, साईखेडा, भैसदेहीपासून तों पवनी, आष्टी, आमनेर, पवनार पर्यंत मुलूख येत होता. तसेंच वऱ्हाडांतील कळंब सरकारांत पूर्वेस वैरागडापावेतों[१] प्रदेश येत असे. माहूर, माणिकदुर्ग या सरकारांतहि वर्धेच्या पूर्वेकडील प्रदेश येत असे. हल्लींचा नेमाड हा खानदेश सुभ्याखालीं होता. बाकीचा प्रदेश देवगड, चंद्रपूर व छत्तीसगडांतील संस्थानिकांच्या ताब्यांत होता. त्यामुळें त्यांचा निराळा सुभा नसून ते संस्थानिक मोगलांचे मांडलिक म्हणून समजले जात असत.

---

# नागपूरकर भोंसले घराण्याचा उदय

नागपुरकर भोंसले हे **हिंगणीकर भोंसले** या नांवानें संबोधिले जातात. भोंसले घराण्याच्या शाखा महाराष्ट्रांत मुसलमानी अमलांत सर्वत्र पसरलेल्या होत्या. त्यांचा एकमेकांशीं संबंध स्पष्टपणें जरी जुळत नाहीं तरी त्या एकाच घराण्याच्या शाखा होत्या याबद्दल संशय नाहीं. शिवाजी महाराजांचें घराणें वेरूळचें. ते व हिंगणीकर भोसले हे एकमेकांस जवळचे भाऊबंद म्हणून समजत, व कित्येक वेळां सातारच्या घराण्यांत दत्तक घेण्याचा प्रश्न निघाला त्यावेळीं नागपुरच्या घराण्यांतून दत्तक घेण्याचा प्रश्नही संभवनीय म्हणून समजला जात असे व तसे प्रयत्नहि झाले होते. शाहू दक्षिणेंत आला तेव्हां हा खरा शाहू आहे कीं नाहीं हें पाहण्याचें काम परसोजी व त्याचा भाऊ बापूजी याजकडे दिलें होतें व त्यानें शाहूच्या ताटांत भोजन केल्याबरोबर भोंसले घराण्यांतील जुने महत्त्वाचे पुरुष या नात्यानें बापूजीचा व परसोजीचा शब्द सर्व मराठ्यांनीं कबूल केला.

वेरूळकर भोंसले व हिंगणीकर भोंसले यांच्या समान–कुलाबद्दल कोणी कधींच संशय प्रगट केला नाहीं. परंतु वेरूळकर भोंसल्यांचा व हिंगणीकर भोंसल्यांचा वंशवृक्ष त्या दोघांच्या समान पूर्वजांपर्यंत अद्याप खात्रीलायक

[१] वैरागड येथें हिऱ्यांच्या खाणी असल्याबद्दल व तेथें जवाहीराचा व्यापार मोठा असल्याबद्दल ऐनी अकबरींत उल्लेख आहे. (पा. ३४५ पहा.) कलकत्ता प्रत. कलकत्त्याहून तेथ इंग्रज व्यापारी गेल्याबद्दल उल्लेख पुढें भाग ८ यांत पहा.

रीतीनें जात नाहीं. त्याबद्दल भोंसल्यांनीं व इतिहासभक्तांनीं अनेक प्रयत्न केले आहेत. परंतु विश्वसनीय पुरावा अद्याप मिळाला नाहीं. हल्लीं ज्या रीतीनें नागपूरकर भोंसले आपला संबंध शिवाजीच्या घराण्याशीं दाखवितात तो या प्रमाणें :—




**वेरूळकर व हिंगणीकर भोसल्यांचें नातें**:–हें नातें कदाचित् बरोबरहि असेल. परंतु यास प्रत्यक्ष व स्वतंत्र असा लेखी पुरावा आजवर मिळालेला नाहीं. याचें कारणहि उघड आहे. वेरूळच्या घराण्यांत मालोजीच्या पूर्वीचे व हिंगणीच्या घराण्यांतील परसोजी सेनासाहेब याच्या पूर्वीचे पुरुष फारसे प्रसिद्ध नव्हते. त्यामुळें इतक्या जुन्या व खात्रीलायक वंशावळी आज उपलब्ध नाहींत. तरी पण मूळ सिद्धांतास त्यामुळें कांहींच बाध येत नाही.

**भोंसले व शिसोदे**––सर्व भोंसले आपणांस **शिसोदे** रजपूत म्हणवितात व उदेपुरच्या राज्याशीं आपला संबंध दाखवितात. उदेपुर उर्फ चितोडचें राजघराणें रजपुतांत फार बाणेदार म्हणून प्रसिद्ध आहे. या घराण्यापासून

भोंसल्यांची पूर्वपीठिका सांगण्यांत येते. इतर भोंसल्यांप्रमाणें नागपुरकर भोंसलेहि आपणांस शिसोदेच म्हणतात. महाराष्ट्रांतील क्षत्रिय मराठे हे उत्तरहिंदुस्थानांतील रजपुतांचे वंशज आहेत, हा प्रश्न बराच काल्पनिक दिसतो. हिंदुस्थानांतील सर्व राजघराण्यांनी व विशेषत: क्षत्रियांनीं चंद्रसूर्यापासून बनविलेल्या पौराणिक तऱ्हेच्या वंशावळीप्रमाणेंच मराठ्यांच्या रजपूत पूर्वजांपासून बनविलेल्या वंशावळी संशयात्मक आहेत व इतिहास या दृष्टीनें त्यांना कांहीं महत्त्व देतां येत नाहीं.[१]

**मराठ्यांची रजपूत कुलोत्पत्ति**--वरील तर्क खरा धरल्यास हिंदुस्थानात राजपुतान्यांतील रजपुतांशिवाय दुसरे क्षत्रियच नव्हते कीं काय असा प्रश्न उद्‌भवतो. सर्व हिंदुस्थानभर रजपुतांशिवाय इतर क्षत्रिय, आर्यांच्या वसाहतीबरोबरच आले होते. मग ते अजीबात नाहींसे झाले कीं काय ? महाराष्ट्रांत सुद्धां राष्ट्रकूट, चालुक्य, पल्लव, यादव ही राजघराणी व त्याचे आप्त, सरदार वगैरे अनेक अस्सल क्षत्रिय आर्य कायमच होते व तेच हे क्षत्रिय मराठे होत. त्यांच्या क्षत्रियत्वाला रजपुतवंशोद्‌भवाचा खटाटोप करण्याचें कांहींच कारण नाहीं.

प्रत्येक मराठा क्षत्रिय आपलें क्षत्रियत्व सिद्ध करण्याकरितां रजपुतांकडे धांव कां घेतो याचें कारण दक्षिण हिंदुस्थानांतील व विशषत: महाराष्ट्रांतील समाजव्यवस्थेमध्यें आहे. महाराष्ट्रांत क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्यामध्यें उत्तर हिंदुस्थानांतल्या त्या त्या वर्णांइतका जाड पडदा राहिला नाहीं. शिवाय दक्षिण हिंदुस्थानांतील कर्मठपणा जास्त वाढलेला होता. त्यांतच

१ जुने बखरकार व नवे इतिहासकार यांच्या सिद्धांताविरुद्ध वरील मत आम्ही प्रतिपादिलें आहे हें आम्ही जाणन आहों. परंतु या मतप्रतिपादनांत आम्ही एकाकी आहों असें मात्र नाहीं. ( राजवाडे प्रस्तावना – चित्र० पा. २३० ते २३३ पहा ) तसेंच चि.वि. वैद्य मध्ययुगीन भारत भाग २ परिशिष्ट ५ पहा. मराठे हे उत्तर हिंदुस्थानांतील क्षत्रिय नसून दक्षिणेंतील पुरातन आर्य क्षत्रिय आहेत हें मत वैद्यांनाहि मान्य आहे. परंतु शिवाजी महाराजांचें कुळ शिसोदे असें मात्र ते म्हणतात. मराठ्यांच्या रजपूत वंशोत्पत्तीसंबंधीं त्यांचें मत स्पष्ट दिलेलें नाहीं. पान ४६५ पहा.

मुसलमानी अमलाच्या परिणामानें क्षत्रिय व वैश्य वर्गांचें वर्ण-वैशिष्टय बरेंचसें नाहीसें होऊन त्यापैकीं बहुतेक शेतकरी व तत्सम बनले. त्यामुळे क्षत्रिय व वैश्य आहेत की नाहीत अशी भ्रामक कल्पना होऊन " कलावाद्यन्तयोः स्थितिः " अशा अस्वाभाविक कल्पना बनत चालल्या. हा क्रम बरेच दिवस चालू राहिल्यामुळेंच शिवाजी महाराजांसारख्या अस्सल क्षत्रियाच्या क्षत्रियत्वाविषयी सुद्धा कर्मठ ब्राम्हणात वाद पडला व व्यापक दृष्टि व धर्मरहस्य जाणणाऱ्या गागाभट्टाची जरूर पडली. त्याचें व इतर कर्मठ ब्राह्मणांचें व जनतेचें समाधान करण्याकरितांच उदेपुरच्या घराण्याशी संबंध जोडण्याचा खटाटोप झाला असें स्पष्ट दिसतें.[१] या अनवस्थेमुळेच प्रत्येक क्षत्रिय मराठ्याला आपलें क्षत्रियत्व सिद्ध करण्याकरितां कोणत्या ना कोणत्या तरी रजपुत राजघराण्याशी ओढून ताणून संबंध दाखवावा लागतो व कुशाग्रबुद्धीचे पंडितहि त्यांना या कार्यांत प्रोत्साहन देतात व नवी पुराणेंहि रचून देतात. दक्षिणेंतच काय परंतु सर्व हिंदुस्थानातील लहान मोठ्या राजघराण्यांतहि हें रजपूतवंशोत्पत्तीचें खूळ अद्यापहि कायम आहे.[२]

याप्रमाणें भोंसले, जाधव व इतर मराठे हे महाराष्ट्रांतील अस्सल क्षत्रिय होत. त्यांचें जातिवैशिष्टय त्यांनी आपल्या गोत्रांत व ठराविक कुळांतील लग्नसंबंधांत राखून ठेविलें होतें व अद्यापहि तें तसेंच आहे. रजपुताच्या छत्तीस कुळीप्रमाणें [३] मराठ्यांची शाण्णव कुळी अजूनहि तशीच अबाधित

[१] शिवाजीच्या नंतरहि रजपूत व मराठे यांजमध्यें लग्नसंबंध कधींच झाले नाहीत व रजपुतांनी मराठे हे आपल्यापैकी आहेत ही गोष्ट कृतीने कधीच मान्य केली नाही. इ. स. १७२८ मध्यें निजामानें राजकारणाकरितां आपल्या पदरच्या रामनगरच्या शिसोद्याच्या मुलीशीं संभाजी कोल्हापुरकराचें लग्न करून दिल्याचा उल्लेख आहे. पे. द. भा. १० ले. ५० पहा. पण हें खरें असल्यास भोसल्यांच्या शिसोदे घराण्याबद्दल तर हा विरुद्धच पुरावा होतो.

[२] See R. D. Banerji's History of Orissa. Vol. I

[३] Tod's Rajasthan vol. I. P. 68 (Chap. VII)

चालू आहे. नागपुरकर भोंसल्यांच्या घराण्यांत सुद्धां त्यांच्या ठराविक सात[१] कुलांपलीकडे ते लग्नसंबंध करीत नव्हते.

**मुधोजी व रूपाजी**--नागपुरकर भोसल्यांचा मूळपुरुष प्रसिद्ध परसोजीचा बाप मुधोजी हाच कल्पिणें योग्य आहे. मुधोजीचा बाप बिंबाजी. मुधोजी व त्याचा भाऊ रूपाजी यांच्या पूर्वजांनी पुणें प्रांतांतील (हल्ली पुणें जिल्ह्यांत.) हिंगणीनजीक बेरडी हा गांव वैराण होता, तो त्या वेळच्या सरकारांतून वहितीकरितां घेऊन व तेथील पाटीलकी[२] संपादन करून वसविला व शेती वगैरे लावून गांवाची लागवण केली. त्यामुळें त्यांना "हिंगणीकर" भोसले हें नांव पडलें. मुधोजी व रूपाजी हे शिपाईगिरीचाहि धंदा करीत असत. ते शहाजी भोसल्याचे समकालीन असून प्रथम निजामशाही राज्यांत नोकर होते.[३]

मुधोजी व रूपाजी धार्मिक व श्रीमंत होते असें दिसतें. त्यांनी खंडे-रायाची व देवीची अशा दोन सोन्याच्या मूर्ती प्रत्येकीं सव्वापांच मणाची अशा केल्या होत्या अशी आख्यायिका आहे.[४]

**मुधोजींचे पुत्र**--मुधोजीस तीन पुत्र होते. वडील बापूजी,[५] दुसरा परसोजी व तिसरा साबाजी. रूपाजीस संतति नव्हती.[६] परसोजी,

१ ही सात कुले म्हणजे--१ भोसले, २ मोहिते, ३ महाडिक, ४ पालकर, ५ अहीरराव, ६ गुजर व ७ शिरके हीं होत.

२ रघोजी भोसला सेनासाहेब सुभा झाल्यानंतरहि त्यानें व्याळें, पातूर-नंदापूर, भादोलें वगैरे वऱ्हाडांतील गांवांचीं वतनें खरेदी केली. त्या खरेदी खतांतहि "रघूजी बिन बिंबाजी पाटील (मोकदम) मौजे हिंगणी, नजीक बेरडी, तर्फ पाटस, प्रांत पुणें असें नांव दिलें आहे. (अ. प्र. का.)

३ उमरावती व भाम हीं गांवें त्यांना निजामशाहीतून मिळालीं होतीं असें एका लेखांत आढळतें, परंतु उमरावतीपुरतें तरी तें खरें दिसत नाहीं हें पुढें दिसून येईल.

४ ना. भो. बखर पान ६ पहा.

५ कित्येक ठिकाणीं परसोजी, बापूजी व साबाजी असा अनुक्रम सांप-डतो. वरील तीन पुत्रांशिवाय मुधोजीस आणखी चार पुत्र होते असें कांहीं वंशावळींत सांपडतें. परंतु तें खरें दिसत नाहीं. बखर पान ६ पहा.

६ ना. भो. बखर पान ६ पहा.

बापूजी व साबाजी हेहि शिपाईगिरीवर होते व ते शिवाजीचे समकालीन होते. ते सर्व शिवाजीचे तर्फेनें राहून त्याच्याच सैन्यांत सरदार राहिले व हळूहळू प्रतिष्ठेस चढले. रूपाजी हाहि नंतर शिवाजीकडे नोकर होता असें दिसतें. कारण परसोजी व रूपाजी यांचीं नांवें शिवाजीच्या 'नामांकित सरदारांच्या यादींत आहेत.[१]

मुधोजीच्या पुत्रांपैकीं वडील बापूजी हा हिंगणी येथें बापाजवळ वृत्तीवर होता. परसोजी व साबाजी हे रूपाजीजवळ राहून शिवाजीच्या सैन्यांत नोकरी करूं लागले. ते हळूहळू बरेच प्रसिद्धीस आले.

**शिवाजीनें दिलेली सबाजीची सनद इ. १६७४**—यांप्रमाणें शिवाजीच्या वेळेस हे त्रिवर्ग बंधु बरेच प्रसिद्धीस आले असतांना शिवाजीच्या मरणापूर्वी सहा वर्षे म्हणजे राज्याभिषेक झाल्यावर पहिलेच वर्षी (इ. स. १६७४) शिवाजीनें " साबाजी बिन मुधोजी भोसले " यास राक्षसवाडी तर्फ राशिंग व पिंपरी तर्फ कडेवळीत हीं गांवें इनाम दिलीं त्यांत त्यास 'एकनिष्ठ व पुरातन सेवक' म्हणून संबोधिलें आहे[२] वरील दोन गांवें वंशपरंपरा इनाम दिलीं आहेत. शिवाजीचा अंत्यविधि ज्या साबाजी भोसल्याकडन करविला तो हाच असावा.[३]

तसेंच परसोजी यानेंहि शिवाजीचे कारकीर्दीपासून प्रतापराव गुजराप्रमाणेंच वऱ्हाड व गोंडवण प्रांतांत स्वाऱ्या वगैरे करून मराठ्यांचा अंमल तिकडें सुरू करण्याचा प्रयत्न चालविला व खंडण्या वगैरे घेतल्या. पुढें राजाराम गादीवर आल्यानंतर परसोजीनें त्यास फार मदत केली व वऱ्हाड गोंडवणांतहि आपला अंमल बसविला. त्यामुळें राजारामानें इ. स. १६९९ मध्यें परसोजीस "सेनासाहेब सुभा" हा किताब व सरंजाम देऊन वऱ्हाड व गोंडवण प्रांतांतील चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचें काम देऊन तशी सनद दिली.[४] परसोजी हा यानंतर वऱ्हाडांत भाम येथें येऊन राहिला. जातांन त्यानें गांवोगांव मराठ्यांचा अंमल बसविला.

---

१ चिटणीस बखर पान १४९ पहा.

२ या सनदेचा उतारा ना. भो. बखर पा. १० वर दिला आहे.

३ सरदेसाई म. वि. भा. २ पान ५४१. परंतु चिटणीस बखर पा. १८३ यांत साबाजी भोंसले शिंगणापुरकर यानें क्रिया केली असें म्हटलें आहे.

४ बखर पा. २३ यांत ही सनद शके १६२९ मध्यें दिली असें म्हटलें आहे.

**राजाची भाम—भाम** हें गांव हल्लीं यवतमाळ तालुक्यांत असून अगदीं मोडकळीस आलें आहे. अद्यापहि तें " राजाची भाम " या नांवानें प्रसिद्ध आहे. हे गांव परसोजीच्या चुलत्याला पूर्वीच्या जहागिरीचें होतें व तेथें परसोजीचे चुलते रहातहि असत अशी आख्यायिका आहे. ती खरी असल्यास त्यामुळेच परसोजीनें ते राहण्यास पसत केलें असावें.[1] त्याचें क्षणिक वैभव आतां कोणासहि विशेष माहीत नाही. परंतु एके काळी ते मोठ्या भरभराटीस आले असून फक्त बैरागी लोकांचा पांच हजार उंबरठा तेथें होता. हे बैरागी लढवय्ये होते. तेथें मोठमोठ्या इमारतीच्या खुणा लांबवर सांपडतात. परसोजी व त्याचे नंतर कान्होजी व त्याचा मुलगा रायाजी यांची तेथेंच वस्ती होती. त्यामुळें दोन तीन पिढ्या तरी या गांवाचें महत्त्व कायम होतें. परंतु पुढें रायाजीच्या मृत्यूनंतर भाम हें गांव मोडकळीस आलें व बरींच वर्षें उजाड होतें. अलीकडे तें पुन्हा आबाद झालें आहे. परंतु तें अगदींच खेडगांव राहिलें आहे.

**परसोजी भोसले (पहिला सेनासाहेब सुभा) इ. स. १६९९–१७०९**

इ. स. १७०७ मध्यें शाहू मोगलांच्या कैदेतून सुटून दक्षिणेंत आला. त्यास जे मराठे सरदार मिळाले त्यांत **परसोजी** हा प्रथम मिळाला. वऱ्हाडच्या पश्चिमेस खानदेशांत तो आपले सैन्यासह शाहूस मिळून त्याचे बरोबर गोदावरी उतरून साताऱ्यास गेला. शाहूची प्रतिस्पर्धी **ताराबाई** (राजारामाची बायको) हिचे मनांत शाहूस राज्य द्यावयाचें नव्हते म्हणून तिनें **परशुरामपन्त प्रतिनिधि** व इतर सरदारांस आपलेकडे वळवून घेतलें. त्यांत परसोजीचा वडील भाऊ **बापूजी** यासहि तिनें वळवून परसोजी यास वळविण्याकरितां पाठविलें. शाहू खरा आहे कीं नाही याची परीक्षा पाहण्याकरितां भोसले कुळांतील वृद्ध मनुष्य म्हणून बापूजीची रवानगी केल्याचें ताराबाईनें बाह्यात्कारीं दाखविलें. बापूजी हा शाहूच्या लष्करांत जाऊन शाहूस व परसोजीस भेटला तेव्हां कागदपत्रांवरून व **जोत्याजी केसरकर** वगैरे मराठे मंडळी शाहू कैदेंत पडल्यापासून बरोबर दिल्लीस होती त्यांचे सांगण्यावरून **शाहू** खराच अशी त्याची खात्री

1 History of the Bhoslas as told by an old lady in 1811. (Govt. Press Nagpur)

झाली. सबब त्यानेंहि ताराबाईचा पक्ष सोडून शाहूचा पक्ष धरला. इतर मराठे सरदारांची खात्री लौकर होईना. कारण शाहूचें बोलणें चालणें व रीतभात सर्व हिंदुस्थानी तऱ्हेची. शेवटीं **परसोजी** व **बापूजी** शाहूस एका ताटांत घेऊन जेवले तेव्हां कोणासच शंका राहिली नाही व सर्व मराठे सरदार शाहूस मिळाले व शाहूचें काम सुकर झालें.

**परसोजीस सेनासाहेब सुभ्याची सनद** (इ. स. १७०७)—शाहूस परसोजी भोसल्याची फार मदत झाली होती. म्हणून तो यशस्वी झाल्यावर त्यानें शके[१]–१६२९ अखेर (इ. स. १७०७) मध्यें त्यास "सेनासाहेब सुभा" हें पद व वऱ्हाड, गोंडवण प्रांताचा अम्मल कायम करून त्यास वंशपरंपरेची नवीन सनद दिली. त्यांत खालील प्रांतांचा उल्लेख आहे :—

१ प्रांत रीतपुर व सरकार गावेल प्रांत वराड, प्रांत देवगड, चांदा गोंडवण.

१ अनागोंदी[२] वगैरे वऱ्हाड प्रांतीचें महाल बिनतपशील

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | सरकार | गावेल | महाल | ४६ |
| १ | ,, | नरनाळा | ,, | ३७ |
| १ | ,, | माहूर | ,, | १९ |
| १ | ,, | खेडले | ,, | २१ |
| १ | ,, | पवनार | ,, | ५ |
| १ | ,, | कळंब | ,, | १९ |
| ६ | | | | १४७ |

एकूण सहा सरकार शेकडा नऊ रुपये अकरा आणे मोकाशाचे आकारास असे.

---

१ बखर पान २३.

२ अनागोंदी वराडांत नाही. खेडलें हें वऱ्हाडांतील साखरखेरडें हें नसून बैतुलजवळील खेडलें होय. त्या सरकारचा विस्तार आष्टी आमनेरपर्यंत होता. आमनेर, सरकार खेडलें असा एक तत्कालीन कागद आम्ही पाहिला आहे. या खेडल्याजवळ त्याच नांवाचा एक इतिहासप्रसिद्ध किल्ला असून तेथें एक राजकुल नांदत होतें. त्याची हकीकत पुढें येईल. शिवाय मागें पा. ३८ पहा.

**मराठ्यांची जमाबंदीपद्धति–चौथाई, सरदेशमुखी, मोकासा वगैरे**— या मोकाशाचा आकार समजण्यास मराठ्यांची जमाबंदीची पद्धति समजली पाहिजे.

मराठ्यांच्या राज्याचे दोन भाग पडत असत. एक स्वराज्य व दुसरा चौथाई सरदेशमुखीचा भाग. स्वराज्याचें सर्व उत्पन्न खुद्द राजा व त्याचे संस्थानास मिळे. दुसऱ्या भागांत मराठ्यांचा अंमल चौथाई, सरदेशमुखी वसूल करण्यापुरता व लष्करी बंदोबस्तापुरता असे. याचें मूळ शाहूच्या कारकीर्दीत इ. स. १७१९ मध्यें **बाळाजी विश्वनाथ** पेशव्यानें सय्यदबंधूंकडून शाहूस दक्षिणेच्या सुभ्याची वंशपरंपरेच्या हक्काच्या सनदा आणिल्या त्यांत आहे. त्या योगानें मराठ्यांच्या दक्षिणेकडील धामधुमीस कायदेशीरपणा आला. दक्षिणच्या सहा सुभ्यांमध्यें मराठ्यांना **चौथाई** शेंकडा २५ टक्के व **सरदेशमुखी** शेंकडा दहा टक्के वसूल करण्याचा हक्क या सनदेनें राजरोसपणें मिळाला. शिवाय भोसल्यांसारखे सरदार आपल्या पराक्रमानें वऱ्हाड–गोंडवणासारख्या प्रांतांवर अंमल बसवून जो मुलूख काबीज करीत तो तिसरा वर्ग. **चौथाई** व **सरदेशमुखी** यांतच पुढे **घासदाणा** म्हणून शेंकडा ५ रुपये भर पडून परप्रांतांत शेंकडा ४० प्रमाणें मराठ्यांनीं आपला हक्क स्थापन केला. वऱ्हाडचा सुभा मोगलांचा दक्षिणेचा सुभेदार या नात्यानें निजामाच्या ताब्यांत होता; परंतु नागपुरकर भोसले याच हक्कानें वऱ्हाडांत शेंकडा ४० उत्पन्न घेत व निजामास शेंकडा ६० मिळे व या हिशेबावरूनच त्यांचा साठ–चाळिसीचा तह पुढें झाला.

स्वराज्यांतहि राजाचा स्वतःचा चौथाईचा हिस्सा म्हणून शेंकडा २५ उत्पन्न राजास मिळे. त्याला राजबाबती म्हणत व उरलेल्या ७५ रुपयांस **मोकासी** म्हणत. या मोकाशापैकीं शेंकडा ९ रुपये राजानें स्वतःकडे राखून ठेवले होते व त्यांपैकीं शेंकडा ६ शाहूराजानें पंतसचिव यास वंशपरंपरा त्यांचे कामाबद्दल तोडून दिला होता. त्यास **“साहोत्रा”** म्हणत व तो त्याचे अधिकारी परभारें वसूल करीत. बाकीचा शेंकडा ३ रुपये **“नाडगौडा”** म्हणून राजानें राखून ठेवला होता. तो त्याच्या इच्छेस येईल त्याप्रमाणें निरनिराळ्या जागीं निरनिराळ्या लोकांस सनदा देऊन

तो देत. असे मोकाशापैकीं वरील ९ रुपये वजा जातां **बाकीचे शेंकडा** ६४ रुपये उत्पन्न निवळ **मोकासा** म्हणजे संस्थानी उत्पन्न राही. ही **व्यवस्था** शाहूच्या कारकीर्दींत मुख्यत्वें चालू होती. परसोजी भोसल्याच्या **सनदेंत** शेवटीं "नऊ रुपये अकरा आण्याचे मोकाशाचे आकारास असे" म्हणून जी टीप आहे ती वरील साहोत्रा व नाडगौडा या बाबींस उद्देशून आहे. अकरा आण्यांचा हिशेब नीट कळत नाहीं. भोसल्यांचा मुलूख स्वराज्यांत नव्हता; तरी त्यास ह्या बाबी लागू होत्या असें दिसतें. चौथाईचे मोबदल्यांत मराठ्यांनीं लष्कर ठेवून प्रांतांत बंदोबस्त ठेवावा असा करार होता व इंग्रजांच्या सबसीडियरी तहाच्या तत्त्वावरच ही चौथाईची बाब बसविली होती.

शाहूनें आपल्या मुख्य सरदारांस निरनिराळे प्रांत वांटून देऊन त्यांतील चौथ त्यांनीं घ्यावी व ठराविक लष्कर ठेवावें व काम पडल्यास तें लष्कर नोकरीस द्यावें असे करार केले होते. याप्रमाणें पेशव्यांकडे खानदेश व बाला-घाट; सेनापती (दाभाडे) कडे गुजराथ व बागलाण; भोंसल्याकडे वऱ्हाड व गोंडवन; सरलष्कर (निंबाळकर) याजकडे गंगथडी व औरंगाबाद; फत्तेसिंग भोसल्याकडे कर्नाटक; प्रतिनिधी, चिटणीस व आंग्रे यांजकडे इतर स्वराज्यांतील व स्वराज्याबाहेरचे प्रांत असे वांटून दिले होते. याशिवाय जहागिरी व वतनें प्रत्येकास निराळीं असत व तीं एकमेकांच्या प्रांतांत निरनिराळ्या जागीं असत. त्यामुळें सर्व सरदारांचा स्वराज्याशी व दुसऱ्या सरदारांशीं नेहमी संबंध येत असे.[१] (ग्रँ. डफ भा. १ पा. ३२४ ते ३२९)

**परसोजीचा मृत्यु १७०९**— वरील सनदेप्रमाणें वऱ्हाडांत येऊन पर-सोजीनें कारभार केला. तो त्यानंतर साताऱ्यास गेला व तेथून परत येत असतां त्याचा मृत्यु कृष्णा–वेणा यांचे संगमावर माहुलीजवळ खेड येथें शके

१ फत्तेसिंग भोंसले, रायाजी भोसले व पेशवे यांचे वऱ्हाडांत **वरप्रमाणें** अनेक मोकासे असत. दर्यापूर, अडगांव, अमडापूर, मेहेकर, खेरडा, उमरखेड, जानेफळ हें परगणे पेशव्याचे मोकासे असल्याबद्दल दाखले आहेत. तसेंच फत्तेसिंग भोंसल्यानें आपले मोकासे वहिवाटीकरितां रघूजीस दिल्याचेहि दाखले आहेत.

१६३२ (फसली सन ११११९ इ. स. १७०९) मध्यें झाला.[१] तेथें परसोजीची समाधी आहे व तिचे पूजेअर्चेकरितां कान्होजीनें शाहूपासून इनाम जमीन मिळविली आहे.

**साबाजीचा** मृत्यु. सन १७१६––मुधोजीचे दुसरे दोन पुत्र **बापूजी** व **साबाजी** यांच्या मृत्यूचा नक्की काल सांगतां येत नाहीं. परंतु **साबाजी** हा इ. स. १७१६ मध्यें मरण पावला असें दिसतें. राज्या. शक ४४ (इं.ता. १–२–१७१७) मध्यें साबाजी मृत्यु पावल्यामुळें त्याची बायको **रामाऊ**[२] इच्या नांवानें साबाजीचे मोकामे कुमठे वगैरे करून सनदा दिल्या आहेत. साबाजी यास पुत्र नसल्यामुळें रामाऊच्या नांवानें ह्या सनदा झाल्या होत्या.

---

१ परसोजी भोसल्याच्या मृत्यूचा काळ निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळा दिला आहे. म्हणून त्याबद्दल सविस्तर चर्चा करणें जरूर आहे.

(१) 'ग्रँड डफ' हा परसोजीच्या मृत्यूचा काळ इ. स. १७१५ असा देतो.

(२) ना. भो. ब. पा. २४ मध्यें परसोजीस शाहूराजानें सनद देऊन रवाना केल्यावर तो फौजेसहित येत असतांना गंगेच्या पलीकडेस म्हणजे दक्षिणेस मरण पावला असें लिहिलें आहे. परंतु हें विधान चुकीचें आहे.

(३) ना. भो. का. प.ले. १ मध्यें परसोजी हा फसली सन ११११९ (इ. स. १७०९–१०) मध्यें निवर्तल्याचें लिहिलें आहे. तें विधान बरोबर दिसतें त्यास प्रत्यंतर त्याच कागदपत्रांतील ले. ५० (ऐ. प. ले. ४ पहा.) हा आहे. ले. ५० हा कागद अस्सल असल्यामुळें पूर्ण विश्वसनीय आहे. त्यांत परसोजीचें स्मशान–स्थळ मौ. खेड प्रांत वाई येथें कृष्णा–वेण्या संगमीं असून त्याचे पूजेअर्चेबद्दल व दिवाबत्तीबद्दल त्या गांवची एक चाहूर जमीन कान्होजीचे विनंतीवरून शाहूराजानें इनाम दिली आहे. ही सनद आश्विन व॥ १० शके १६३२ म्हणजे ता. ६–१०–१७१० इ. रोजीं दिलेली आहे. अर्थात् या पूर्वीं कांहीं दिवस परसोजी हा मृत्यु पावला असावा.

२ साबाजीच्या स्त्रीचें नांव ऐ. प. ले. ९३–९४ ( भाग. ५९–६१) भो का. ले. यांत व बखर पान २९ यांत रमाबाई असें छापले आहे. परंतु तिचें खरें नांव **रामाबाई** अथवा **रामाऊ** असें होतें. उमरावतीकर भोंसल्यांच्या अस्सल कागदपत्रांत **रामाबाई** असेच नांव दिलें आहे.तसेंच पे.द. भा.२० ले. ३ पा. २ पहा. त्यांत **रामाऊ** असेंच नांव ताहे. साताऱ्यास **रामाऊचा** गोट म्हणून एक पेठ आहे ती इच्या नांवानें आहे.

**बापूजीचा मृत्यु**--इ. स. १७१७ मध्यें **बापूजी** हा जिवंत होता. राज्या. शके ४३ व ४४ (इं. ता. १-२-१७१७ व २२-१२-१७१७) मध्यें शाहूनें बापूजीस वाळुंज व मलकापूर या परगण्यांतील गांवें मोकासे देऊन सनदा दिलेल्या उपलब्ध आहेत.[1] त्यानंतर इ. स. १७२२ पर्यंतचे कागदपत्र उपलब्ध नाहींत. रा. श. ४९ (इं.ता. ९-१०-१७२२) मध्यें बापूजीचा मुलगा **राणोजी** यास पहिली सनद मिळाली आहे. त्यावरून बापूजी हा इ.स १७१७ व १७२२ यांच्या दरम्यान मरण पावला हें सिद्ध होतें. बापूजीच्या वंशासंबंधाची हकीकत पुढें येईल.

**बापूजी** व **संताजी** यांच्या पूर्वचरित्रापैकीं कांहीं अज्ञात भागावर धावडशीकर ब्रम्हेंद्रस्वामीचे पत्रव्यवहारावरून प्रकाश पडतो. **बापूजी** यास जंजिऱ्याचे शिद्द्यानें पकडून कैद केलें होतें असें दिसतें. ब्रम्हेंद्रस्वामीचें वजन व पत्रव्यवहार सर्वत्र होता. त्यानें मध्यस्थी करून बापूजीस सोडवून आणलें. तसेंच **संताजी** हाहि तसाच कैदेंत सांपडला होता त्यासहि स्वामीनें सोडवून आणलें. रघुजी भोसल्यास लिहिलेल्या एका पत्रांत[2] स्वामी लिहितात,

१ अप्रकाशित. (उम. भो. संग्रह).

२ ब्र. स्वा. चरित्र ले. २९५. याच पत्रांत स्वामीनें **नारो शंकर** (नागपुरच्या जामदार घराण्याचा मूळपुरुष) याजविषयीहि लिहिलें आहे तें असें:-

"यानंतर चिरंजीव **नारो शंकर** याणे वराडांत अकोटच्या अविधाकडेस सेवा केली. तीन चार वर्षे होते. सांप्रत याणे नारो शंकर याजवर तुफान करून सात सहस्र रुपये दंड ठरविले. त्यांपैकीं तीन हजार रुपये घेतले. बाकी- चऊ हजार रुपयाबद्दल जामिनाचे घरी चौकी बसविली. कांहीं खाल्ले पिल्ले नसतां नाहक याजवर दंड घातला आहे. तर याचे श्रीस बहुत अगत्य आहे म्हणून तुम्हास लिहिलें आहे. तर अकोटच्या अविधास व जमीनदारास ताकीद पत्रें लिहून देणे कीं, वाजवी त्याचे आंगी पैसा नसतां काय समजोन ब्राम्हणास कष्टी करतां. याउपर त्या ब्राम्हणाचे वाटे न जाणे. नाहीतर तुमचा आमचा स्नेह राहणार नाहीं. ऐसीं ताकीदपत्रें देऊन जे गोष्टीनें याची मुक्तता होय तो पदार्थ अगत्य करणें."

याप्रमाणें रघुजीनें नारो शंकराची सुटका करून त्यास नागपुरास आपलेकडे आणले. तेव्हांपासून तें घराणें अद्याप नागपुरास आहे. (वंशावळ जामदार पहा). अकोटचा अविध म्हणजे एलिचपूरकर नबाब तर नसावा ?

" पूर्वी **बापूजी** भोसले हबशीयापासून सोडविले व **संताजी** भोसले याची बेडी नानाकरवीं प्रयत्नें तोडविली. **बयाबाई** यांनीं पांडवगडीं होती तेव्हां त्याणी श्रीची सेवा केली तेव्हां आम्ही संतोषी जाहलों. ते समयीं त्याणी सांगितले जे. माझा **रघजी** यास आशीर्वाद द्यावा भाग्यास आला म्हणजे स्वामीचे सेवेसी चुकणार नाही. तर रघोजीस आशीर्वाद उत्तम प्रकारें द्यावा."

ही **बयाबाई** रघूजीची आजी असावी. रघूजीची आई **काशीबाई** इलाही स्वामींनीं पाठविलेलीं दोन पत्रें उपलब्ध आहेत. (ब्र. स्वा. च. ले.२९६-९७)

**कान्होजी भोंसले, दुसरा सेनासाहेब सुभा** (१७१०–१७३० इ.)— परसोजी मृत्यु पावला तेव्हां त्याचा पुत्र **कान्होजी** हा लष्करांत त्याच्या बरोबरच होता. शाहूराजाजवळून सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें घेऊन तो वऱ्हाडांत आला. याच वेळेस त्यानें परसोजीच्या स्मशानस्थळाच्या पूजेकरितां शाहूराजाकडून **खेड** येथील कांहीं जमिनीची सनद मिळविल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. कान्होजीनें वऱ्हाडांत आल्यावर **दारव्हा** हें महत्त्वाचें ठाणें काबीज केलें व त्यानंतर **भाम** येथें कायमचें ठाणें दिलें.

**दिल्लीची मोहीम व संताजीचा मृत्यु** (इ.१७१९)—परसोजीचे पुतणे बापूजीचे पुत्र **सताजी** व **राणोजी** हेहि शाहूच्या कारकीर्दींत प्रसिद्धीस आलेले होते. धाकटा सय्यद **हुसेन अल्ली** याचे बरोबर **बाळाजी विश्वनाथ** पेशव्यास व सेनापति खंडेराव दाभाडे यांस शाहूनें पाठविलें होतें. कान्होजीसहि जाण्याचा हुकूम झाला होता. परंतु तो स्वतः न जातां त्यानें आपले चुलत बंधु संताजी व राणोजी यांस पाठविलें.[१] पेशव्याबरोबर संताजी व राणोजीचीं पथकें होतीं. मराठ्यांनीं सय्यद बंधूंचा अंमल दिल्लीवर बसवून दिला. सय्यद बंधूनीं **फरुकशेर** बादशहास कैद करून नंतर ठार मारलें व महमदशहा बादशहास गादीवर बसविलें. त्यावेळेस मराठे लष्कर दिल्लीस मुक्काम करून होतें. **फरुकशेर** यास कैद केलें त्यावेळीं दिल्लीस मोठी धामधूम झाली व दिल्लीच्या मोंगल लोकांनीं दिल्ली शहराच्या रस्त्यांमधून संताजीच्या मराठी लष्करावर हल्ला करून

---

१ बखर पा. २७–२८.

**संताजी** व त्याचे पंधराशे लोकांची कत्तल केली. ता. (२८-२-१७१९ इ.) सय्यद बंधूनीं संताजीचा भाऊ **राणोजी** याचे समाधानार्थ त्यास "**सवाई संताजी**" असा किताब देऊन परत पाठविलें.[१] दिल्लीच्या कामगिरींत **संताजी** हा प्रमुख होता. बाळाजी विश्वनाथ हा शाहूची आई व बायको दिल्लीस मोगलांच्या अटकेंतच आतापर्यंत होती त्यांस बरोबर घेऊन व दक्षिणेंतील चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्य अशा तीन सनदा[२] घेऊन परत दक्षिणेंस आला. ( इ. स. १७१९ ).

याच वेळेस बाळाजी विश्वनाथ यानें सय्यद बंधूकडून भोंसल्यांच्या ताब्यांतील मुलखाबद्दल व गुजराथ व माळवा प्रांतांतील खंडणी मिळण्याबद्दल बादशहाची सनद मागितली. परसोजी व कान्होजी भोंसल्यानें वऱ्हाड व गोंडवण प्रांतांत जो मुलूख जिंकला होता त्याबद्दल त्यांच्या ताब्याशिवाय त्यांचेजवळ कायदेशीर अधिकार नव्हता. त्या सनदा या वेळीं बाळाजीस मिळाल्या नाहींत म्हणून बाळाजीनें **देवराव हिंगणे** यास दिल्लीस मागें ठेवून तो स्वतः परत दक्षिणेंत आला. पाठीमागेंहि ह्या सनदा ह्या वेळेस मिळाल्या नाहीत. परंतु त्यावेळेस याबद्दल तोंडी वाटाघाट मात्र झाली होती व त्यावरूनच व विशेषतः लष्करी जोरावर भोंसल्यांनीं व पेशव्यांनीं वरील प्रांतांत आपले हक्क कायम केले.

**वसईची मोहीम व राणोजी भोसले– राणोजी** ऊर्फ सवाई संताजी हा दक्षिणेंत आल्यावर त्यानेंहि अनेक मर्दुमकीचीं कामें केलीं. **चिमणाजी** आप्पानें वसईस वेढा देऊन इ. स. १७३९ मध्यें ती सर केली. त्या मोहिमेंत कोंकणांतील महत्त्वाच्या लढायांत **राणोजी** हा हजर होता.[३] **तारापुर** येथील किल्ला सर करतांना त्यानें खंदक ओलांडून तटास छिद्र न पडल्या-

१ ग्रँ. डफ. भा. १ पान ३२३ पहा

२ ह्या सनदा ता. १३ व २४ मार्च इ. स. १७१९ च्या आहेत. (Irvine Vol. 1 P. 407) तसेंच दिल्लीच्या रस्त्यांत राणोजी व पंधराशें मराठ्यांच्या झालेल्या कत्तलीची हकीकत Irvine's later mughals Vol I. P. 388-84 मध्यें सविस्तर दिलेली आहे.

३ Grant Duff 1 P. 325. ब्रम्हेंद्रस्वामीचें चरित्र ले. ४९ व ५२

मुळें शिड्या लावून हातांत तरवार घेऊन स्वतः आपले जमावानिशीं हल्ला केला. पोर्तुगीज लोक फार शौर्यानें लढले परंतु शेवटीं त्यांचा मोड होऊन ते शरण आले. खुद्द वसईच्या वेढ्यांतहि राणोजीकडेस तटाच्या कांहीं भागास सुरुंग लावून तट पाडण्याचें काम दिलें होतें. (पे. द. १६पा. १२७ पहा.) हा **राणोजी उमरावतीकर** या नांवानें जास्त प्रसिद्ध असून तो उमरावतीकर भोंसले नांवाची जी शाखा अस्तित्वांत आहे तिचा मूळ पुरुष[१] होय. या शाखेचा सविस्तर इतिहास पुढें दिला आहे ( पुरवणी १ पहा. )

**निजामाचा उदय**—कान्होजीच्या कारकीर्दीत निजामुल्मुल्क हा दक्षिणेंत येऊन स्वतंत्र झाला. सय्यद बंधूंच्या तर्फेचा **अलंअलीखान** म्हणून सुभेदार औरंगाबादेस होता. त्यास त्यांनीं निजामाचा मोड करण्यास सांगितलें होतें व निजामाच्या पाठीवरहि **दिलावरखान** नांवाचा एक सरदार पाठविला होता. निजामानें दिलावरखानाचा **बऱ्हाणपुरा**जवळ पराभव केला (१७२० इ.) व नंतर तो वऱ्हाडांत शिरला व पूर्णा नदी उतरून शेगांवास आला व तेथून **बाळापुरास** तळ देऊन राहिला. सय्यदबंधूंनीं शाहूस लिहून निजामाविरुद्ध अलंअलीखानास मदत करण्याबद्दल सांगितलें होतें. त्याप्रमाणें शाहूनें **बाजीराव** पेशव्यास व **कान्होजी** भोंसल्यास सांगितलें. त्याप्रमाणें दोघांनीहि अलंअलीखानास मदत केली. कान्होजीच्या लष्करानें बाळापुर व शेगांवच्या जवळपास निजामाच्या लष्करावर छापे घालून त्यास बेजार केलें. अलंअलीखानाची व निजामाची **बाळापुरा**जवळ[२] लढाई होऊन निजामाचा जय झाला. (१० ऑगस्ट १७२० इ.). **अलंअलीखान** रणांगणावर पडला. या युद्धांत मराठे फार निकरानें लढले. अलंअलीखानाच्या प्रेताजवळ शूर मराठ्यांच्या प्रेतांचा गंज पडला होता.

**बाळापूरची लढाई (इ.१७२०)**—बाळापूरच्या लढाईत शाहूच्या पक्षाचे सर्व मराठे अलंअलीखानाच्या बाजूस होते. त्याच्या उलट कोल्हापूरकर **संभाजी**च्या पक्षाची मंडळी व **चंद्रसेन** जाधव वगैरे मराठे निजामाच्या

१ Grant Duff Vol. I P. 392

२ Irvines Later mughals Vol. II. P. 47–50

बाजूस होते. शाहूकडील **संताजी** शिंदे, **खंडेराव** दाभाडे, **दमाजी** गायकवाड, **शंकराजी मल्हार, कान्होजी भोंसले** वगैरे सरदार या लढाईंत हजर होते. मोंगलांच्या बाजूस व निजामाच्या विरुद्ध एकंदर सतरा अठरा हजार मराठे सैन्य या वेळीं हजर होतें. **बाजीराव** पेशवा हाहि या लढाईंत हजर असावा असें वाटतें. निदान जवळपास तरी तो असावा, कारण पेशव्यांचे रोजनिशींत बाजीरावाचा मुक्काम या वेळीं बाळापुरास होता असें दाखविलें आहे.[१] बाजीराव हा यावेळीं नुकताच पेशवा झाला होता. (एप्रील १७२०)

शंकराजी मल्हार या लढाईंत जखमी होऊन निजामाच्या हातीं सांपडला व त्या जखमांनीं पुढें मरण पावला. दमाजी गायकवाडाच्या उदयाचा हा आरंभच होता.

**साखर-खेडर्याची लढाई (१७२४)**--ता. २-१०-१७२४ इ. रोजीं निजामानें हैदराबादेचा मोंगल सरदार **मुबारीजखान** याचा **साकरखेडर्याचे**[२] लढाईत पराभव करून त्यास ठार मारलें व दक्षिणेंत स्वतंत्र राज्य स्थापिलें. या लढाईत सिदखेडकर जाधवांचा वंशज **राघोजी** हा मुबारीजखानाकडून लढला व या लढाईत पडला. त्याची बायको आपला मुलगा **मानसिंग ऊर्फ बाबजी** यास घेऊन शाहूराजाकडे गेली व तेथेंच राहिली. हा बाबजी ( व रघूजीचा पुत्र निंबाजी) पुढें **ताराबाईच्या** पक्षाचा आधारस्तंभ होता. त्याची दौलताबादची देशमुखी निजामानें जप्त केली होती, ती सोडवून घेण्याबद्दल शाहूनें **बाजीराव** पेशव्यास लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे.[३] **कान्होजी** यानेंहि आपल्या पांच हजार मराठे लष्करानिशीं मुबारीजखानास मदत करण्याचें आश्वासन दिलें होतें. परंतु मुबारीजखानानें उर्मटपणानें त्याची मागणी नाकारली.[४]

**कान्होजी** हा शूर व पराक्रमी होता. कटक प्रांतांत पूर्ण अम्मल बसविण्याचें काम जरी पुढें रघूजी भोंसल्यानें केलें तरी त्याचा पाया कान्होजीनेंच घालून दिला होता.

---

१ सरदेसाई मध्य वि. पा. १९१. भारतवर्ष शकावलि.

2 Irvine's Later Mughals P. 144—150.

३ ऐ. पत्र. पा. १० व ४३६ व काळेकृत वऱ्हाडचा इतिहास पान १५१, ३३१ पहा.

4 Irvine Vol. II. P. 149.

**कान्होजी** हा मोठा धार्मिक असून त्याचें सोवळें व नेमधर्म कडक असत.[१] त्यास मूलबाळ कांहीं नव्हतें म्हणून त्यानें आपला चुलतभाऊ बिंबाजी याचा मुलगा रघूजी यास देशाहून आणवून आपलेजवळ **भाम** येथें लहानपणापासून ठेवलें[२] होतें. पुढें कान्होजीस पुत्र झाला. त्याचें नांव **रायाजी.**[३] त्यामुळें कान्होजीचें रघूजीवरील प्रेम कमी झालें. पुढें कान्होजीचा व रघूजीचा बिघाड होऊन रघूजी तेथून निघून गेला.

कान्होजीचा अंमल फार करडा असे. बखरकार म्हणतो, " अमल बहुत क्रूरतेचा सेनासाहेब सुभा करू लागले " (पान २९) यावरून कान्होजीचा स्वभाव फार तापट असावा. रघूजी मोठा झाल्यावर त्याचें कान्होजीशीं न जमण्यांत, पूर्वी सांगितलेलें कारण जरी असलें, तरी कान्होजीच्या तापट स्वभावामुळेंहि हा बेबनाव झाला असावा.

---

१ कान्होजीच्या सोंवळ्याची एक गोष्ट ना. भो. बखर पान ३१ मध्यें अशी आढळते कीं तो ब्राह्मणाशिवाय इतरांच्या हातचें अन्न ग्रहण करीत नसे. कान्होजी साताऱ्यास गेला असतां कोणी हें शाहूस विपर्यास करून सांगितलें. शाहूनें त्यास मुद्दाम जेवण्यास बोलावलें व बरोबर बसवून मराठ्यांच्या रीतीनें भोजन करविलें. कान्होजीनें बरीच टाळाटाळ केली. परंतु शाहूच्या आग्रहामुळें त्याचें कांहीं चाललें नाहीं. घरीं येऊन त्यानें गरम पाण्यांत मीठ मोहरी घालून तें पिऊन वमन केलें. हेंहि वर्तमान कोणीं शाहूस सांगितलें व विनाकारण दंभ माजवितात, जातीच्या आचाराप्रमाणें वर्तत नाहीत असें समजाविलें. त्यावरून शाहूची मर्जी कान्होजीवर खपा झाली. वरील गोष्टींत कितपत तथ्य असेल हें सांगतां येत नाही. एवढ्या क्षुल्लक कारणावरून शाहूचें व कान्होजीचें बिघडलें असावें असें वाटत नाहीं. ही बखरकारांची मखलाशी दिसते. कान्होजीवर गैरमर्जी होऊन त्यास काढण्याचीं कारणें दुसरींच होतीं तीं पुढें येतील. नाग. बखरींत (पा. २९) उल्लेख आहे कीं, "पोटीं संतति नाही ही चिंता करीत असतां कांहीं एक अनुष्ठानें, शतचंड्या, कित्येक होमहवनें ब्राह्मणद्वारां व आपण जातीनें सोंवळें फारच करावें. ब्राह्मणाच्या हातचें जेवावें असें चाललें " पुढें कान्होजीस पुत्र झाला.

२ रघूजी हा कान्होजीकडे येण्यापूर्वी साबाजीची बायको रामाबाई इजजवळ रहात होता. कारण तिलाहि मूलबाळ नव्हतें.

३ कांहीं ठिकाणीं त्याचें नांव रामाजी असेंहि दिलें आहे तें चुकीचें आहे. पण रायाजी हेंच नांव खरें आहे ( पेशवे दप्तर भाग २० पा. २३ पहा ).

**कान्होजीच्या** फौजेचाहि असाच **बेबंद कारभार** असावा **असें** वाटतें. त्याचे फौजेचा त्रास खुद्द त्याचे राज्यांतहि कितपत होता हें त्याच्या **एका** अभयपत्रावरून[१] दिसतें. कमीजास्ती प्रमाणांत ही स्थिति त्यावेळच्या **सर्वच** सैन्याची असे हें खरें व यामुळें कान्होजीसच विशेष दोष देतां येत नाहीं.

कान्होजीचा मुलगा **रायाजी** हा भाम येथें होता. त्याचेहि क्रूरपणाचा असाच बोभाटा होता.

**राणोजी व रघूजी यांची कान्होजीशीं वांटणी—राणोजी** भोंसले दिल्लीहून परत आल्यानंतर **रघूजी** व **राणोजी** यांचा एक विचार होऊन ते **कान्होजी**जवळ वतन व सरंजाम यांमध्यें हिस्से मागू लागले. तें भांडण शाहूराजापर्यंत जाऊन त्यानें प्रथम बाळाजी विश्वनाथ पेशव्यामार्फत व नंतर स्वतः इ. स. १७२७ मध्यें त्या तिघांत सरंजामांची वांटणी करून दिली.[२] रघूजी व राणोजी दोघांनींहि कान्होजीबरोबर राहून सलोख्यानें चाकरी करावी असें ठरविलें. परंतु राणोजी व रघोजी हे कान्होजीच्या हाताखालीं नोकरी करण्यास गेले नाहींत. इ. स. १७२५ ते १७२७ पर्यंत शाहूनें **बाजीराव, फत्तेसिंग भोंसले** या सरदारांस पाठवून कर्नाटकांत दोन स्वाऱ्या करविल्या. त्यांत **कान्होजी** भोंसल्यासहि पाठविलें होतें. त्या स्वाऱ्यांत रघूजी भोंसले हाहि हजर होता. त्यानंतर इ. स. १७४० मध्यें फत्तेसिंग भोंसले व रघूजी यांनीं कर्नाटकावर दुसरी स्वतत्र मोहीम केली.

**कान्होजीवर शाहूची गैरमर्जी—कान्होजी** हा **शाहूस** जुमानीनासा झाला. त्याचे सुभ्याचा वसूलहि बरोबर येईना. त्यामुळें त्यास शाहूनें साताऱ्यास समक्ष बोलावलें. त्याप्रमाणें कान्होजी साताऱ्यास शाहूच्या भेटीस गेला त्यावेळीं कान्होजीस प्रांताचे उत्पन्नाचा हिशेब देतां आला नाहीं व रक्कमहि पटवितां आली नाहीं. त्यामुळें शाहूचा व त्याचा बेबनाव झाला व तेथें राहणें धोक्याचें समजून एके दिवशीं **कान्होजी** शाहूची परवानगी न घेतां सैन्यासह आपले तळावरून पळून गेला. (इ. स. १७२५).

---

१ शारदाश्रम यवतमाळ संग्रह

२ इ. सं. वर्ष ६ अं. १०

**कान्होजी साताऱ्याहून पळून गेला १७२५ इ.– कान्होजी** साताऱ्याहून पळून गेला त्याची सविस्तर हकीकत आतां[१] उपलब्ध झाली आहे. कान्होजीचा तळ शहराबाहेर होता. तेथें तळावर डेरा टाकून एके दिवशीं (ता. २३–८–१७२५ इ.) दोन प्रहरीं कान्होजी बरोबरच्या लोकांसह स्वार होऊन **कुमठ्यास** गेला व तेथून गल्ला, कडबा व नगदी रकम आणण्याकरितां जातों असा त्यानें बहाणा केला. त्याची चुलती साबाजीची बायको **रमाऊ** ही कुमठ्यास रहात होती. तसाच तो **कण्हेरखेड** व **पुसे-सावळी** वरून दुसरे दिवशीं **तासगांवास** जाऊन मुक्कामास राहिला. **शाहू** राजानें कान्होजीच्या पाठोपाठ कान्होजीस अडविण्याकरितां दोन सरदार पाठविले. एवढेंच नव्हे तर स्वतःहि पहाटची प्रहर रात्र असतां कान्होजीचा पाठलाग करण्याकरितां निघाला. **यमाजी शिवदेव** हा बरोबर होता. त्यानें पुष्कळ सांगितलें कीं, " मी फौज घेऊन कान्होजीवर जातों, तुम्ही स्वतः येण्याची जरूरी नाहीं. " परंतु **शाहू** हट्टासच पेटला होता, तो पुसेसावळीच्या पुढें वडगांवपर्यंत गेलाच, व शेवटी यमाजी शिवदेव यास पुढें पाठवून आपण परत साताऱ्यास आला. तसेंच कान्होजी ज्या रस्त्यानें वऱ्हाडास जाणार त्या रस्त्यानें जेवढे मराठे सरदार होते त्यांजकडे शाहूनें पत्रें पाठविलीं कीं, कान्होजी येईल त्यास अडवून कैद करून साताऱ्यास पाठवा. **आवजी[२] कवडे** नांवाचा बाजीराव पेशव्याचा सरदार वऱ्हाडांत होता त्यासहि पेशव्यांकरवीं त्यानें असेंच पत्र पाठविलें.

**कान्होजी निजामाकडे गेला—कान्होजी** साताऱ्याहून पळून गेला तो कोणत्याहि मराठे सरदाराच्या हातीं न लागतां **निजामाकडे** गेला व त्याच्याशीं बोलणें लावून त्याच्या चाकरीस रहाण्याचा त्यानें ठराव केला. **चंद्रसेन** जाधव, **उदाजी** चव्हाण यांप्रमाणें मराठेशाहीतून असंतुष्ट होऊन निघालेल्या मराठे सरदारांस निजामाच्या चाकरीस जाऊन राहणें फावत असे व निजामहि अशी संधि वाया जाऊं देत नसे. निजाम व मराठे

---

१ पे. द. भा. २० ले. ३

२ रघूजीचा व बाजीरावाचा बिघाड झाल्यानंतर याच आवजी कवड्यास बाजीरावानें रघूजीवर स्वारी करण्यास सांगितलें. परंतु रघूजीनें त्याचा मोड केला. (पुढें रघूजीची कारकीर्द पहा).

यांचा यापूर्वीच असा तह झाला होता की, एकमेकांकडील नोकर दुसऱ्यानें चाकरीस ठेवूं नयेत. परंतु त्या तहाविरुद्ध निजामानें कान्होजीस ठेवलें हें कळतांच शाहूनें निजामास लिहिलें की,"कान्होजी भोंसले यास चाकर ठेवाल तर तुमचा आमचा तह रहाणार नाहीं."[१]

अखेरीस कान्होजीस निजामानें आपल्या चाकरीस ठेवून घेतलेलें दिसत नाही. तो मराठी राज्यांतच दंगाधोपा करीत कांहीं दिवस राहिला. असे करीत असतांना सुद्धां शाहूशी पुन्हां मिलाफ करून घेण्याचा त्याचा प्रयत्न सुरूच होता. **येसाजी सिद्धेश्वर** नांवाचा एक गृहस्थ या कामाकरितां त्यानें साताऱ्यास शाहूकडे पाठविला व इतर मध्यस्थीहि लावले. थोडा कालपर्यंत त्यांचा मिलाफ झालाहि. परंतु तो फार दिवस टिकला नाहीं.

**कान्होजीवर रघूजीची रवानगी**--कान्होजीचा बंदोबस्त अशा तऱ्हेनें होत नाहीं हें पाहून शेवटी शाहूनें कान्होजीचा पुतण्या **रघूजी**[२] याजकडेसच हें काम सोपविलें. रघजी हा वऱ्हाडांत राहिलेला व कान्होजीची त्याची आधीच भाऊबंदकी लागलेली होती. त्यामुळें तो हें काम मनापासून करील असें शाहूस वाटलें. **कान्होजी** या वेळेस वऱ्हाडांत **भाम** येथें आपल्या ठाण्यावर जाऊन पोंचला होता. म्हणून रघोजीनें तेथें जाण्याची तयारी केली. वऱ्हाडांत कान्होजीचे जागीं दुसरा मनुष्यहि नेमणे जरूरच असल्यामुळें शाहूनें कान्होजीस कामावरून काढून त्याजागीं रघूजीची नेमणूक केली व कान्होजीस पकडून आणण्याची आज्ञा केली.

**देऊर गांव मोकासा**— इ. स. १७२८ मध्यें रघूजी हा तयारी करून कान्होजी भोंसल्यावर जाण्याकरितां साताऱ्याहून निघाला. रघूजी हा जाण्यापूर्वी शाहूनें रघूजीस वांईजवळ 'देऊर'[३] हा गांव मोकासा देऊन

१ पे. द. भाग २० लेखांक १०.

२ रघूजी साताऱ्यास आल्यापासून शाहूची मर्जी त्याचेवर फारच बसली. एकदां वाघाचे शिकारीत रघूजीनें शाहूचा प्राण वाघाचे जबड्यांतून मोठ्या शौर्यानें वांचविला. शाहूनें आपल्या धाकट्या बायकोची ( सगुणाबाईची ) चुलतबहीण ही रघूजीस देववून आपला नातेसंबंध दृढ केला.

३ देऊरची सनद राज्या. शके ६० कार्तिक व।। १२ (इ. स. २२-११-१७३१) ची आहे. (अप्र. कागद प.) ही सनद पुढें दिली गेली असें दिसतें.

मुलेंमाणसें तेथें ठेवण्याची सोय केली, व रघूजीस सडे फौजेनिशी जाण्यास आज्ञा केली. हा गांव हल्लीं सातारा जिल्ह्यांत असून नागपूरकर भोंसल्यांचे वंशजांचे ताब्यांत अद्याप आहे व हल्ली भोंसल्यांचे वडील पुरुषास याच गांवावरून "देऊरचे राजे" असा वंश-परंपरेचा किताब आहे.

त्याचप्रमाणे शाहूनें सातान्याहून बरींच अनुभविक माणसें रघूजी बरोबर पाठविलीं व रघूजीनेंहि कांहीस मुद्दाम बरोबर घेतलें. सातान्यास रघूजीस मुख्य मदत **गोविंदराव चिटणीस, फत्तेसिंग भोंसले** व **श्रीतपराव प्रतिनिधी** यांची असे व ती शेवटपर्यंत तशीच राहिली. याशिवाय शाहूनें रघूजीजवळून दोन गृहस्थ जामीनदार म्हणून घेतले. प्रांताचा राजाचा हिस्सा ववतशीर येणें, तसेंच कान्होजीप्रमाणें उर्मट वर्तन न करणें ह्या शर्ती घातल्या होत्या. **रघुनाथभट झिपरे** आडनांव पटवर्धन म्हणून सावकार होता. त्याचेमार्फत कान्होजीचा वसूल शाहूस मिळे. परंतु कान्होजीच्या व्यवहारांत त्याचेंही कर्ज कान्होजीकडे बरेंच झालें होतें. तो रघूजीस जामीन होईना. शेवटी रघूजीचा गुरुबंधु **कोन्हेरराम**[१] कोल्हटकर पांडववाडीचा राहणार व झिपरे याचा आप्त याचे मार्फतीनें रघुनाथभट जामीन राहण्यास तयार झाला. व त्यानें एक लक्ष रुपये शाहूचे खजिन्यांत रघुजीबद्दल भरले. या व्यवहारांत त्यानेंहि रघूजीच्या शिक्केनवीसीच्या हक्काची

१ कान्हेरराम यांचे वडील **रामाजीपंत** हे सत्पुरुष म्हणून समजले जात होते व ते रामोपासक होते. त्यांच्या आशीर्वादानें रघूजीचा जन्म झाला होता. म्हणून रघूजीच्या आईबापांनी श्रीरामचंद्राचें नांव म्हणून या मुलाचें नांव **रघूजी** म्हणून ठेविलें. यामुळेंच रघूजीपासून नागपूरकर भोंसल्यांच्या घराण्यांत रामचंद्राचें मुख्य दैवत झालें व रामोपासना सुरू झाली. नाग० भोसल्यांचें मूळदैवत सातारच्या भोंसल्यांप्रमाणेंच शंकराचें होतें. व कांहीं अंशीं अद्यापहि आहे. रघूजीच्या पूर्वीं कान्होजीच्या पत्रावर "श्रीशंकर" असा मथळा सांपडतो. रघूजीपासून मात्र रामचंद्राच्या नांवाचा "श्रीसीताकांत" असा मथळा सांपडतो.

जागा रघूजीकडून कबूल करून घेतली.[१] रघुनाथभटातर्फे शिक्केनवीसीचें काम करण्याकरितां त्यानें **अनंतभट चितळे**[२] नांवाच्या इसमास रघूजीबरोबर दिलें. स्वतः **कोन्हेरराम** हाहि शाहूच्या तर्फेनें रघूजीबरोबर त्याचा दिवाण म्हणून गेला. याच कोन्हेररामाचा भाऊ **भास्करराम** हा बंगाल्याच्या स्वाऱ्यांत प्रमुख होता व पुढें **अलीवर्दीखान** नबाबानें तेथें त्याचा दग्यानें खून केला.

**रघूजीस सेनासाहेब सुभ्याची सनद**--शाहूनें रघूजीस सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें व सनद देऊन रवाना केलें. त्या सनदेंत वऱ्हाड गोंडवणा-शिवाय पूर्वेस बंगाल्यापर्यंत छत्तीसगड व पटणा, अलाहाबाद, मकसुदाबाद (बंगाल) व पाटणा वगैरे भागांत मराठ्यांचे चौथाईचे हक्क वाढविण्याबद्दल उल्लेख[३] केला आहे. तो बादशाही सनदेच्या आधारावर

१ रघूजीचा शिक्का रघुनाथभटाच्या बायकोच्या हातांतील पाटल्यांचा केला होता अशी आख्यायिका आहे. तो खाली लिहिल्याप्रमाणें होता:--

शाहुराजपदांभोजभ्रमरायितचेतसः ।
बिंबात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते ।।

रघूजीस सेनासाहेबीची सनद मिळण्यापूर्वी त्याचा शिक्का निराळा होता (उमरावतीकर भोसले पुरवणी पहा.)

२ हाच अनंतभट पुढें उमरावतीस साबाजी भोसल्याचा कमाविसदार होता. (अप्र. काग.)

३ ही सनद राज्या. शके ४९ फाल्गुन शु.५ (शके १६४४ इ. स.१७२३)ची असून त्यांत "परगणे सरकार गोवळप्रांत व वऱ्हाड,देवगड व चांदा प्रांत, गोंडवण मूळतापी प्रांत, वरघाट प्रांत व छत्तीसगड प्रांत, बस्तर प्रांत,मकसुदाबाद, पटणें, अलाहाबाद या प्रांतांची चौथ व मोकासा वसूल करण्याचे हक्क दिलेले आहेत ही मूळ सनद उपलब्ध नाहीं. परंतु तिची नक्कल उपलब्ध आहे (अ. प्र.) या सनदेचे सालाबद्दल संशय वाटतो. या सनदेचा काल बराच पुढें असावा. नाग. चे बखरींत पान ३२ वर या दोन सनदांचा वर प्रमाणें उल्लेख केला आहे. पुढें बाजीराव पेशव्याचा व रघूजीचा जो खटका उडाला त्यासंबंधांत ही सनद महत्त्वाची आहे. या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांना चौथाईचे, सरदेशमुखीचे कोणतेच कायदेशीर अधिकार नव्हते म्हणून उत्तरेस व पूर्वेस दिलेले हे अधिकार अनधिकृत असे आहेत.

नसून मराठी राज्याची सत्ता लष्करी जोरावर वाढविण्याच्या मामूली पद्धतीनें केलेला दिसतो. बादशाही सनद नसतांना अगर कोणताहि कायदेशीर अधिकार नसतांना आपल्या सरदारांस परराज्यांत पाय पसरण्यास अधिकार देऊन राज्य वाढविण्याकरितां अशा सनदा पुष्कळदां दिलेल्या आहेत. या वेळेस फक्त दक्षिणच्या साडेसहा सुभ्यांपुरतीच चौथाईची सनद मराठ्यांना मिळालेली होती.

रघूजीबरोबर जें जे मुत्सद्दी सरदार सातार्‍याकडून आले त्यांची यादी ना. भो. बखर पा. ३३, ३४ मध्यें दिली आहे.

**जालन्याजवळ रघूजीस प्रतिबंध**--ही सर्व मंडळी सातार्‍याहून निघाली ती औरंगाबादेच्या मार्गानें वर्‍हाडांत शिरली. जालन्याजवळ समशेर बहाद्दर **संताजी आटोळे**[१] या शाहूच्या मराठे सरदारानें रघूजीच्या फौजेस अडविलें व " आमचा मुलुख खराब होतो. फौजेचा नेहमीचा जाण्याचा जुना रस्ता नांदेड, वसमत, आष्टी या मार्गानें आहे तिकडून जा" म्हणून त्यानें हरकत घेतली. शेवटीं लढाईची वेळ आली. रघूजीच्या लष्करांत **दिनकर विनायक** व **शिवाजी विनायक** म्हणून दोघे प्रभू गृहस्थ होते त्यांचा आप्त कोणी **यशवंतराव पिलाजी** नावाचा आटोळ्याच्या पदरी होता, त्याचे मार्फत रघूजीने कशीबशी आटोळ्याची समजूत घालून पुढे मार्ग काढला. वर्‍हाडांत येतांच रघूजीनें शाहूच्या नांवानें खंडण्या घेणें सुरू केलें. **लाखनवाड्याचे** घाटानें तो वर्‍हाडच्या दक्षिणेकडील घाटाचा प्रांत उतरून **बाळापुरास** तळ देऊन राहिला व तेथून आपल्या तीस हजार फौजेच्या तुकड्या करून त्यानें सर्व वर्‍हाडभर खंडण्या घेणें सुरू केलें.

---

१ जालन्याच्या जवळचा देऊळगांवराजा व त्याच्या उत्तरेस समशेर बहाद्दर आटोळे यांचा मुलूख होता. वर्‍हाडांत चिखली तालुक्यांत शेळगांव आटोळे म्हणून त्यांचे पाटीलकीचें गांव अद्याप आहे व तेथें त्यांचे वंशज आहेत. शिवाय पुण्याजवळहि त्यांची पाटीलकी व वतन आहे. संताजी आटोळ्याच्या कारभाराचे बरेचसे कागदपत्र या बाजूस उपलब्ध आहेत. त्यांचा शिक्का 'श्री राजा शाहूचरणी तत्पर, सुभानजी सुत संताजी आटोळे नीरंतर" असा आहे.

**आकोला** येथें त्यावेळी एलीचपुरच्या नबाबाच्या वतीनें **सुजायतखां**[१] नांवाचा पठाण होता त्यानें तेथील ब्राह्मणांवर जुलूम केल्यामुळें रघूजीनें त्याच्यावर स्वारी करून त्याचा मोड केला व जागोजाग अंमल बसवीत तो उमरावतीकडे गेला.

**रघूजीची कान्होजीवर स्वारी व कान्होजीस कैद**--(इ. स. १७३०) वऱ्हाडांत चांगला जम बसल्यावर रघूजीनें **कान्होजीकडे** दृष्टि वळविली. शाहूनें आपणास काढून रघजीस सेनासाहेबीची वस्त्रें देऊन आपणाविरुद्ध पाठविलें हें त्याला समजलें. परंतु तो खुषीनें प्रांताचा ताबा सोडण्यास तयार नव्हता. त्यानेंहि रघजीच्या सैन्यास तोंड देण्याची तयारी केली. रघूजीचे सैन्याचा जमाव तीस हजार होता. त्यासह **रघूजीनें** कान्होजीवर चाल केली.

**रघूजीची कान्होजीवर चाल**--( इ. स. १७३० ) रघूजी वऱ्हाडांत येण्यापूर्वीच कान्होजी भाम येथें येऊन मजबूतीने राहिला होता. रघूजीनें बाळापुराहून उमरावती, तळेगांव या बाजूस मुक्काम हलविला. इकडे कान्होजीचा प्रयत्न निजामाकडे जहागीर व सरंजाम मिळवून तिकडे जाण्याबद्दल चालूच होता. माहूरचा सुभेदार हिरजुलाखान याचे मार्फतीनें हें बोलणें निजामाशीं चालू होतें. वासुदेवपंत म्हणून वकील कान्होजीनें या कामाकरितां औरंगाबादेस पाठविला होता. त्यास आनंदराव सुमंत यानें खूप दटाविलें कीं " तुम्ही मोगलाईत याल तर खापर हातीं घेऊन भीक मागाल." रघूजी व त्याचा चुलता राणोजी हे एक होऊन त्यांनीं भामच्या गढीस वेढा घातला व कान्होजीचा एक सरदार तुकोजी गुजर याशीं लढाई करून त्याचा पराभव करून तो लढाईत मारला. कान्होजी भामेहून माहूरचे बाजूस पळून गेला व रघूजी व राणोजी हे त्याच्या पाठीस लागले. [२]

---

१ याच सुजायतखाची व रघजीची इ. स. १७३८ मध्यें साळबर्डीनजीक पुन्हां लढाई होऊन रघूजीनें त्याचा पराभव करून त्यास कैद केलें. रघूजी हा बाजीरावास निजामुल्मुल्काविरुद्ध भोपाळचे लढाईंत मदत करण्यास जात होता. (पे. द. भा. १५ ले. ८२ पहा.)

२. पे. द. भा. १० पा. ७, २३, ६८, ६९ व भा. १३ पा. ४१ पहा.

या दोन्ही सैन्यांची गांठ वणीजवळ **मंदार** या गांवाजवळ पडली: व कान्होजीचा मोड झाला. थोड्याशा लोकांच्या जमावानिशीं कान्होजी हा रघूजीच्या सैन्याच्या घेऱ्यांत सांपडला. रघूजी स्वत, खालीं उतरून कान्होजीजवळ गेला व मर्यादेनें कान्होजीस पालखींत बसण्यास सांगूं लागला. रघजी आपणास कैद करणार हें समजल्यामुळें कान्होजी संतापलेलाच होता. त्यामुळें तो रघूजीस अद्वातद्वा बोलूं लागला. शेवटीं रघजीनें त्यास कैद केलें (इ. स. १७३०). रघूजीनें वणीजवळ **राजूर** म्हणून गांव आहे तेथें छावणी केली. रघजी कान्होजीस घेऊन साताऱ्यास शाहूकडे गेला. शाहूनें कान्होजीस साताऱ्यासच नजरकैदेंत ठेवलें. कान्होजी पुढें नजरकैदेंत असतांनाच मरण पावला.[१] रघूजीची छावणी **राजूर** या गांवीं सहा वर्षेपर्यंत होती.

कान्होजीस कैद करून साताऱ्यास ठेवल्यानंतर शाहूनें कान्होजीचीं मुलें-माणसें साताऱ्यास आणवून त्याजजवळ ठेविलीं (इ. स. १७३४). त्यास रस्त्यानें कांहीं त्रास न होतां सांभाळून आणण्याबद्दल शाहूनें हुकूम सोडले होते त्यावरून त्याचा उमदा स्वभाव दिसून येतो.[२]

**बाजीराव पेशव्याची उत्तरेकडे रवानगी व चिमाजीची माळव्यावर स्वारी**-(इ. स. १७२८-२९)—इ. स. १७२८ मध्यें बाजीरावानें चिमाजीअप्पास माळव्यांत पाठविलें. तो खानदेशांतून सरळ उत्तरेस गेला व बाजीराव मागाहून वऱ्हाड नागपूर मार्गानें देवगडच्या बाजूनें बुंदेलखंडांत गेला. चिमाजीअप्पा माळव्यांत पोंचण्यापूर्वीं पिलाजी जाधव, राणोजी भोसले, कृष्णाजी हरी, केशो महादेव वगैरे सरदार माळव्यांत जाऊन पोहोंचले होते. त्यांत रघूजी भोसले हाहि गेला होता. परंतु या

---

१ Grand duff Vol. P. 374.

नाग. कागदपत्र ले. १ पा. ३ टीप १०

परंतु नाग. बखर पा. ४० यांत रघूजी कर्नाटकांत चंदासाहेबाचे मोहिमेवरून परत साताऱ्यास आला तेव्हां कान्होजीस शाहूचे परवानगीनें घेऊन नागपुरास आला असें लिहिलें आहे. परंतु तसें झाल्याचें दिसत नाहीं.

२ पे. द. २० ले. १५ (पा. ११)

सर्व सरदारांस दाबणारा कोणी नसल्यानें ते आपआपसांतच भांडत राहिले व मुख्य शत्रु दयाबहादुर हा मोकळाच राहिला. शेवटीं चिमाजीअप्पा जातांच त्यानें गिरधर व दयाबहादुर या दोघांचा एकामागून एक असा पराभव केला. त्या युद्धांत ते दोघेहि ठार झाले व माळवा प्रांत चिमाजीच्या ताब्यांत आला. या युद्धांत राणोजी हा चिमाजीअप्पाबरोबर होता; परंतु रघूजी मात्र तिकडे थांबला नाहीं.

इकडे बाजीराव हा मोगलाईतून वऱ्हाडांत शिरला. वाशीम येथें मार्च इ. स. १७२९ मध्यें त्यास चिमाजीच्या विजयाचें वर्तमान समजलें. पुढें तो तसाच देवगडच्या रोखानें पुढें गेला. आपल्याबरोबर मदतीस येण्याकरितां त्यानें कान्होजी भोसल्याकडेहि माणसें पाठविलीं होतीं. परंतु तो आपल्याच बचावाच्या खटपटींत असल्यामुळें बाजीरावाकडे जाऊं शकला नाहीं. राणोजी भोसले हाहि माळव्यांतून निघून नागपूर, देवगड या बाजूस आला होता. त्यासहि बरोबरच घेऊन जाण्याचा बाजीरावाचा विचार होता, परंतु राणोजीच्या मनांत बाजीरावाबरोबर जावयाचें नव्हतें. म्हणून तो बाजीराव येण्यापूर्वीच तेथून निसटून माळव्यांत शिरला व तिकडे लुटालूट करूं लागला. म्हणून बाजीरावानें चिमाजीस अष्टे प्र. गिरड येथून ता. ९-१-१७२९ रोजीं लिहिलें कीं, "राजश्री राणोजी भोसले फौजेसहवर्तमान माळवा प्रांतीं जाणार. सांप्रत घाट उतरून नेमाडाकडे गेले. कदाचित् माळवियांत आले तरी लुटून काढणें" राणोजीनें[१] चिमाजीबरोबर सैन्यासह जाण्याबद्दल पूर्वीच बाजीरावास कबूल केलें होतें व त्याबद्दल त्यांचा कराराहि झाला होता.[२]

बाजीरावानें देवगडच्या गोंड राजाशीं तह ठरवून तो पुढें बुंदेलखंडांत गेला. राणोजी हा त्यानंतर बाजीरावास मिळाला व तो शेवटपर्यंत बाजीराव व चिमाजी अप्पा यांच हाताखालीं काम करीत होता.

**रायाजी भोंसले भामकर**--कान्होजीस कैद केल्यानंतर त्याचा मुलगा **रायाजी** हा बरेच दिवस भाम येथें होता. इ. स. १७३९ मध्यें रघूजी भाम

१ पे. द. भा. १३ पा. २२, २३, २७, ३१, ३३ पहा.

२ पुरवणी उमरावतीकर भोसले पहा.

च्या गढीस मोर्चे लावून ती जागा घेण्याच्या तयारींत होता. (पे. द. भा.१५ ले. ८२ पहा.) पुढें रायाजीनें नानासाहेब पेशव्यामार्फत शाहू राजाची भेट घेऊन त्याच्याशीं सलोखा करून घेतला. शाहूनेंहि रघूजी व रायाजी यांचे-मध्यें कांहीं तडजोड करून दिली व रायाजी यास सरंजाम दिला.[१] त्यांत ठरल्याप्रमाणें रायाजीनें रघूजीस लिहून दिलेला तहनामा उपलब्ध आहे.[२] (ता. १५–११–१७४८ इ०) त्यांत रघूजीनें रायाजीस दरसाल पन्नास हजार रु. खर्चास द्यावे. रायाजीस शाहूनें दिलेल्या २७ महालांशिवाय त्यानें दुसऱ्या महालांस उपद्रव देऊं नये, परमुलुखांत रघजीबरोबर स्वारीस जावें व त्या-बद्दल रघूजीनें रायाजीचे लष्कराचे मानानें खर्चास द्यावें, याशिवाय राया-जीचें ६ लक्ष कर्ज वारण्यासाठी रघूजीनें त्यास दरसाल पाऊण लाख रु. द्यावे याप्रमाणें करार ठरला होता.

**रायाजी** व **राणोजी** यांची रघूजीशी सरंजामाबद्दल व वतनाबद्दल कटकट बरेच दिवस चालू होती.[३] इ. स. १७४६ मध्यें **भाम** येथें रायाजी भोंसले हा आपलें ठाणें धरून होता असा उल्लेख आहे. बगाल्यांत आपले बरोबर रघूजीनें त्यास आणण्यास "भला माणूस व पत्रें" पाठविलीं परंतु तो कांहीं गेला नाही (ले.३८). रघूजीमध्यें व रायाजीमध्यें कुरबूर चालू होती ती मिटविण्याकरितां रघूजीने त्यास नागपुरास आणविलें. परंतु त्यांची समजूत न होतां " **रायाजी** भोसले भामेस आपले ठाणेयास गेले. याची त्याची समजावीस होता दिसत नाही. **संताजी** भोंसले यासहि निरोप दिला " अशी खबर पेशव्याचा नागपुरचा वकील ता. ३०–११–१७४६ इ. रोजीं देतो (पे. द. २० ले. ४२). ता. १-५-१७४७ रोजीं **रघूजी** व **रायाजी** हे दोघेहि साताऱ्यास होते तेथेंहि त्यांचे सरंजामाचे भांडणाबद्दल भानगड चालली होती.

साताऱ्याहून सदाशिवराव भाऊस ता.१–५–१७४७ रोजीं पत्र आलें त्यांत लिहिलें आहे कीं "राजश्री राघोजीबावासहि धाकटे बाईनें वस्त्रें दिलीं.

---

१ पे. द. भा. २० ले. ३२.
२ ऐ, प. ले. ४४०.
३ पे. द. भा. २० ले. ४८

परंतु येथेंच आहेत. त्यास राजश्री **रायाजी** भोंसले याचे सरंजामाचे कट-कटीचा वेध लागला आहे. तो निर्गम जाला म्हणजे राघोजी बावाचें जाणें होईल." यानंतर रायाजीचें एक पत्र नानासाहेब पेशव्यास पाठविलेलें उपलब्ध आहे (ले. ६७). त्यांत आपण "हिंगणीहून निघून श्रीगोंद्यास पेशव्यास भेटण्याकरितां येतो" म्हणून तो लिहितो. (तसेंच पे.द. भा. २१ पा. २५ पहा.)

**उमरखेड** वगैरे प्रदेश पेशव्याकडेस मोकासा होता त्यास **रायाजी**-कडून उपद्रव होत असे. त्याबद्दल वाटाघाट करणारें एक पत्रहि उपलब्ध आहे.[१] त्याजवरून रायाजी हा फौजबंद होता असें वाटतें.

**रायाजी** हा **भाम** येथें शेवटपर्यंत होता असे दिसतें. रघजीचा व त्याचा पुढें पुढें मिलाफ झाला होता. रघजीच्या बऱ्याच कामगिऱ्यांत तो रघूजीचा हस्तक होता असें उपलब्ध असलेल्या कागदपत्रांवरून[२] दिसतें. हिंगणीसहि तो मधून मधून आपल्या वतनाचे बंदोबस्ताकरितां जात होता.

**रायाजीची अखेर--रायाजी** हा कधी व कोठें मरण पावला हें सांगतां येत नाहीं व त्याबद्दल कांहीच कागदपत्र उपलब्ध नाहींत. एवढें मात्र खरें की, तो निपुत्रिक मरण पावला.[३] हल्लीं उपलब्ध असलेल्या

१ शारदाश्रम यवतमाळ संग्रह.

२ वागीश्वरी वर्ष ४ अं. २ पा. १३३.

३ एक अप्रकाशित अस्सल वंशावळ (काळे संग्रह). दारव्हयाजवळ अजंती येथें **मलक्या** या नांवाचा एक महार साधु होता. त्याजविषयीं एक पोवाडा त्याचे घराण्यांत उपलब्ध आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, कान्होजीनें त्या साधूस त्रास दिल्यावरून त्यानें त्यास शाप दिला कीं, तुझें राज्य जाऊन तुझा निर्वंश होईल. त्याप्रमाणें कान्होजीचा अधिकार जाऊन तो कैद झाला. नंतर त्याचा मुलगा रायाजी यानें त्या साधूची फार विनवणी केली व रायाजीची स्थिति थोडी सुधारली. परंतु "होयाचं तें झालं तुझ्या कुळीमधे अंधार । बोलला सबद माग परतुन नाहीं येणार" असें मलक्यानें सांगितलें व रायाजी निपुत्रिक मरण पावला.

यांतील शाप झाल्याचें कारण जरी सोडून दिलें तरी रायाजी निपुत्रिक मरण पावला ही गोष्ट मात्र त्यानें सिद्ध होते.

(वागीश्वरी वर्ष ४ अं. २ पान १३१ यांतील य. खु. देशपांडे यांचा लेख पहा.)

वंशावळीतून त्याचा वंश हा अमरावतीकर भोसल्यांचा वंश अशी समजूत आहे, पण ती अगदी चुकीची आहे. त्याचा विचार पुढे करण्यांत येईल. (पुरवणी १ उमरावतीकर भोसले पहा). याप्रमाणें **परसोजी** व **कान्होजीच्या** घराण्याचा दुःखकारक शेवट झाला.

---

## भाग ४ था

# पहिला रघूजी

## ( १७३०–१७५५ इ. )

**रघूजीचें लहानपण**—रघूजीच्या लहानपणची हकीकत फारशी उपलब्ध नाही. त्याचा बाप **बिंबाजी** याजविषयी फारशी माहिती आढळत नाहीं. तो रघूजीच्या जन्मानंतर लौकरच मरण पावला असावा. रघूजीबद्दल त्याची आई **काशीबाई** व आजी **बयाबाई** यांना त्यामुळे फार काळजी वाटत होती असें दिसते. त्याचेबद्दल त्या बायांनी देवांस व साधुसंतास बरेच नवससायास केलेले आढळतात.[१] लहानपणी तो त्यांचेजवळ पांडववाडीस रहात होता. **पांडववाडी** (वाईजवळ) येथे **रामाजीपंत कोल्हटकर** म्हणून एक रामभक्त होता त्याच्या वरदानानें त्याचा जन्म झाला असें त्याचे आईबाप मानीत म्हणून त्याचें नांव रघूजी ठेवलें होतें. रामाजीपंताचे पुत्र **कोन्हेरराम** व **भास्करराम** हे त्या संबंधामुळेंच रघूजीकडे नागपुरास आले. थोडासा मोठा झाल्यानंतर रघूजी हा आपली चुलती **रामाऊ** (साबाजीची बायको) इजपाशी रहात असे. तिला मूलबाळ नसल्यामुळें तिलाहि त्याचा फार लळा असे.

रघूजी मोठा झाल्यावर प्रथम आपला चुलता **राणोजी** याचे लष्करांत त्याचे हाताखाली राहिला. राणोजीस त्याने दिलेला नौकरनामा उपलब्ध[२]

---

१ मागें भा. ३ पा. ५१ पहा.

२ सदरहू अस्सल करारनामा नागपुर येथील उमरावतीकर भोसल्यांच्या प्रस्तुत वंशजांच्या ताब्यांत आहे. रा. गोपाळराव दळवी यांनीं तो आपले

आहे. त्यानंतर तो **कान्होजी**कडेस येऊन राहिला. कान्होजीशीं बेबनाव होऊन तो त्याजकडून निघाल्यावर शंभर स्वारांनिशी प्रथम देवगडचे **चांद सुलतानाकडे** गेला. त्यानें रघूजीस ठेवून घेतले. कांही दिवसांनीं रघजी तेथन निघन एलिचपुरच्या नबाबाकडे (इस्मायलखा) गेला व तेथन साताऱ्यास शाहूकडे गेला व तेथे स्थिर होऊन राहिला.

या स्थित्यंतरांतील त्याची कामगिरी विशेष महत्त्वाची दिसत नाहीं. साताऱ्यास असताना मात्र तो **फत्तेसिंग** भोंसल्याच्या सैन्यांत होता व त्याचे बरोबर मोहिमेसहि गेला होता. त्यांत त्यानें चांगली कामगिरी केली व म्हणूनच त्याची पुढें कान्होजी विरुद्ध नेमणूक झाली.

वरील सर्व स्थित्यतरात त्याची स्वतंत्र वृत्ति मात्र स्पष्टपणें दिसून येते. स्वतःच्या स्वतत्र कर्तबगारीची धमक असलेला रघूजी दुसऱ्याच्या ताब्यांत राहणें अशक्य होतें व म्हणूनच तो एक राज्यसंस्थापक होऊं शकला. पुढेंहि ही त्याची स्वतत्र वृत्ति शेवटपर्यत कायमच होती हें त्याच्या चरित्रांत वेळोवेळीं दिसून येईल.

**रघूजी भोसले ऊर्फ बाबासाहेब (तिसरा सेनासाहेब सुभा) इ.स. १७२९–१७५५**---शाहूने रघूजीस वऱ्हाड गोडवणाची सनद दिली त्यावेळेस त्याचेपासून खालील करार[१] करून घेतले:–

१ रघूजीनें पांच हजार स्वार सरकार चाकरीकरितां बाळगावे.

२ दरसाल नऊ लक्ष रुपये सरकारांत भरीत जावेत.

३ घासदाण्याची रक्कम रघूजीनें घ्यावी.

पहिले रघूजीचे चरित्रांत पान २३ वर छापला आहे. परंतु तो नजरचुकीनें कान्होजीस करून दिलेला म्हणून छापला आहे व तेंच विधान पुढेंही केलें आहे. त्यात इतर मोडी वाचनाच्या चुकाहि झाल्या आहेत. वरील पत्रावरील रघूजीचा शिक्का पुढील प्रमाणें आहे.– "पार्वतीकांतविश्रांत मनसोति यशस्विनः । बिंबात्मजस्य मुद्रैषा ...." रघूजीचा नंतरचा शिक्का प्रसिद्ध आहे. (मागें पा.६१ पहा.)

१ Grant Duff Vol. I P. 373.

४ इतर खंडण्या, लढाईंतील लूट, वगैरे उत्पन्नापैकीं निमें रघूजीनें घ्यावें व निम्में सरकारांत जमा करावें.

५ सरकारास जरूर लागेल तेव्हां रघूजीनें दहा हजार लष्कर उभें करावें.

६ पेशवा ज्या वेळेस मोहिमेवर जाईल त्यावेळेस रघूजीनें आपल्या लष्करासह पेशव्याबरोबर जावें अगर दुसरीकडे कोठें पाठविल्यास तिकडेहि जावें.

**रघूजीचा राज्यविस्तार-देवगड**—वऱ्हाडांत स्थिरस्थावर झाल्यानंतर रघूजीनें आपल्या राज्यविस्ताराकडे लक्ष लाविलें व त्यास पुढें लिहिल्याप्रमाणें योग्य संधि मिळत गेली. वऱ्हाडचे पूर्वेचा गोंडवण वगैरे भाग मोंगल साम्राज्यांत मोडत होता. परंतु वऱ्हाडच्या पूर्वेस त्या वेळी कोणीहि जोरदार संस्थानिक अगर मोंगलांचा सुभेदार नसल्यामुळें रघूजीस राज्यविस्ताराची चांगली संधि मिळाली. प्रथम देवगड येथील गोंड संस्थानांत भांडणें सुरू झालीं. **देवगड** हें गोंडांचें संस्थान पूर्वी[१] मोठें प्रसिद्धीस आलेलें असून तेथील राजा **बखतबुलंद** यानें त्या संस्थानाची हद्द बरीच वाढविली होती. सातपुड्याच्या शाखा पूर्वेस मध्यप्रांतांत दूरवर पसरल्या आहेत त्या डोंगराळ भागाच्या घाटावर देवगड हें गांव होतें. हल्ली नागपुराहून छिंदवाड्यास जी सडक जाते त्या रस्त्यावर थोडे बाजूस देवगडचा पडका किल्ला व त्याच्या पायथ्याशीं ओसाड झालेलें गांव आहे. तो सर्व भाग व त्या घाटाच्या खालीं दक्षिणेस नागपुरपर्यंत जो प्रांत आहे तो सर्व भाग देवगडच्या राज्यांत होता. त्या राज्याचे यामुळें दोन भाग झालेले असत. एक वरघाट म्हणून उत्तरेचा डोंगराळ प्रदेश व दुसरा खालीघाट म्हणून नागपुर, भंडारा यांच्या आसपासचा सपाटीचा भाग म्हणून दक्षिणेचा भाग असे. नागपुर हें त्या वेळीं महत्त्वाचें ठिकाण नसून भंडारा हें जास्त महत्त्वाचें ठाणें होतें.

**बखतबुलंद**—**बखतबुलंद** हा गोंड राजा मुसलमान झालेला होता व त्याचे वेळेपासून त्याचे वंशज सर्व मुसलमान आहेत. तरी त्यांचे लग्नसंबंध गोंडांशींच होत असून इतर मुसलमानांशीं अद्यापहि होत नाहींत. धर्मविधि

---

१ गोंड राजघराणीं भाग २ पहा.

गोंडी व मुसलमानी दोन्ही पद्धतीनें होतात. बखतबुलंद याचे पूर्वजांनीं नागपुरास किल्ला[१] बांधला होता. त्याचे जवळ बखतबुलंद यानें हल्लींचें नागपुर शहर वसविलें व तेथें पेठा वसविल्या. यापूर्वीं नागपुर हें "राजपुर बारसा, या नांवाचें खेडें होतें.

**चांद सुलतान**—बखतबुलंद याचा मुलगा **चांद सुलतान** हा इ. स. १७३५ चे सुमारास मरण पावला. त्यास **मीरबहादर** व **अकबरशहा** व **बुराणशहा** असे तीन औरस पुत्र होते व **वलीशहा** नांवाचा दासीपुत्र होता. वलीशहानें मीरबहादर याशीं तंटा करून त्यास ठार मारलें व राज्य बळकावलें. अकबरशहा व बुराणशहा हे दोघेहि अल्पवयी असल्यामुळें त्यांची आई **रतनकुवर** राणी हिनें वऱ्हाडांत रघूजी भोंसल्यास मदत मागितली. रघूजी त्यावेळेस भाम येथें रहात होता. त्यानें मदत देण्याचें कबूल केलें व त्याप्रमाणें वर्धा उतरून नागपुराकडेस चाल केली. (शके १६५८ इ. १७३६).[२] नागपुरच्या पश्चिमेस **पाटणसावंगी** येथें रघूजीची व वलीशहाच्या दोघां सरदारांची गांठ पडून लढाई झाली व **रघूजी** विजयी झाला व **केळझर** येथें येऊन राहिला.

**पवनी सर**—त्यानंतर रघूजीनें भंडाऱ्याकडे चाल केली. भंडाऱ्याच्या दक्षिणेस **पवनी**[३] येथें पवनीच्या ठाणेदाराशीं रघूजीची लढाई होऊन रघूजीनें पवनीचें ठाणें घेतलें व तेथें **तुळजोरामपत**[४] या सरदाराची नेमणूक केली.

**भंडाऱ्यावर स्वारी**—यानंतर रघूजीनें भंडाऱ्यावर[५] चाल केली व तेथील

१ हल्लीं देवगडच्या गोंड राजांचे वंशज याच किल्ल्यांत रहात आहेत व त्यांना "किल्लेवाले राजे" असें तेथें म्हणतात.

२ बखर पा. ३५, ३६

३ भंडाऱ्याच्या दक्षिणेस वाईन गंगेचे कांठीं, ही क्षेत्राची जागा समजली जाते.

४ हा तुळजोराम कोन्हेरराम अगर भास्करराम कोल्हटकर यांचे घराण्यांतील नसून दुसरा प्रसिद्ध ब्राम्हण सरदार होता.

५ भंडारा हें अलीकडील नांव आहे. त्यापूर्वीं भानारे, भानोरे असें नांव सांपडतें.

किल्ल्यास मोर्चे लावले. भंडाऱ्यास त्यावेळीं देवबा[१] म्हणून कोणी सत्पुरुष होते त्याचें दर्शन घेऊन रघूजीनें त्याचा आशीर्वाद घेतला. तसेंच **पीरशहा** नांवाचा मुसलमान साधु होता. त्याचेंहि दर्शन घेतलें व किल्ला सर करण्याचे उद्योगास लागला.

**सोनबरडीची लढाई**—वलीशहानें आपला दिवाण **रघुनाथसिंग** याचे हाताखालीं मोठें सैन्य देऊन त्यास रघूजीवर पाठविलें. रघूजीचे सैन्याचा तळ भंडाऱ्याजवळ वाईनगंगेच्या कांठी **शिरसघाट** येथें होता. रघूजीनें आपल्या सैन्याचे दोन विभाग करून एक **सोनबरडी** येथें वाईनगंगेच्या कांठीं ठेविला व दुसरा **गिरोली** येथें ठेवून रघुनाथसिंगास दोन्ही टोळ्यांच्या मध्यें गांठण्याचा संकेत ठरविला व त्या प्रमाणें आपला सरदार **रघूजी-करांडे** यास ही योजना सांगितली व आपण पळ काढल्याचें ढोंग केलें. रघुनाथसिंग व त्याचें गोंड लष्कर यांस वाटलें कीं मराठ्यांनी पळ काढला. म्हणून ते मराठी लष्करावर चाल करून गेले. तोंच दोन्ही टोळ्यांनीं रघुनाथसिंगाचे सैन्यावर एकदम हल्ला करून त्यांचा मोड केला. सोनबरडी पासून मीरनगर या गांवापर्यंत वाईनगंगेस मोठा डोह आहे त्याचे जवळच ही लढाई झाली. पुष्कळसे गोंड पळतांना या डोहांत बुडून मेले. **रघुनाथ-सिंग** जखमी होऊन पडला व रघूजीच्या हातीं सांपडला. रघूजीनें त्याच्या जखमा बांधवून त्याची फार काळजी घेतली. त्या उपकारानें रघुनाथसिंग रघजीस वश झाला. रघजीनें त्यास कांहीं लालूच दाखवून त्याचेकडून वलीशहास धरून देण्याचें कबूल करून घेऊन त्यास देवगडावर परत रवाना केलें.

**भंडारा सर**—भंडाऱ्याचे किल्ल्यास मोर्चे बसले होते. त्या किल्ल्यावर **हरीपाटील** म्हणून किल्लेदार होता. त्यानें बावीस दिवस किल्ला नेटानें लढविला. शेवटीं रघूजीनें फितूर करून किल्ला सर केला. **रघूजी करांडे**

---

१ नाग. बखर पान ३६ यांत हा रामदासी होता असें म्हटलें आहे परंतु पुढें "त्याचे खांद्यावरची धोकटी होती ती आपले खांद्यावर घेऊन त्यांतील अन्न घेऊन साद भक्षिला" असें वर्णन आहे. धोकटी, धोपटी या नांवावरून हा साधु न्हावी जातीचा तर नसावा ?

यानें हरी पाटलास कैद केलें व रघूजीसमोर आणलें. रघूजीनें त्यास जीवें मारण्याचा हुकूम दिला. परंतु रघूजी करांड्याच्या मध्यस्तीनें रघूजीनें त्यास जीवदान दिलें. याप्रमाणें भंडाऱ्याचें महत्त्वाचें ठाणें रघूजीच्या हातीं आलें.

**रामटेकास भेट**:— रघूजी पुढें रामटेकास गेला व तेथील तीर्थात (अंबाळे) स्नान वगैरे करून आपणास यश आल्यास तेथील गडावर श्री रामाच्या मूर्ति बसवूं व देवालय बांधूं असा त्यानें नवस केला. रामटेकाचें हल्लीचें देवालय व घाट रघूजी भोसल्यानें बांधला असून नाग. भोसल्यांनी त्या पुरातन क्षेत्रास[१] जास्त महत्त्व आणलें व त्यास कायमचें उत्पन्न करून दिलें तें अद्याप चालू आहे. हल्लींहि या देवस्थानाची व्यवस्था त्यांजकडेसच मुख्यत्वें आहे.

**देवगडावर स्वारी**—यानंतर रघूजीनें देवगडावर स्वारी केली. **वलीशहा** तेथें किल्ल्यांत होता. रघुनाथसिंगानें त्यास किल्ल्याबाहेर येण्याची सल्ला दिल्यावरून तो बाहेर आला. त्याची व रघूजीचे सैन्याची लढाई होऊन वलीशहा कैद झाला. रघूजीनें राणी **रतनकुवर** इची भेट घेतली व तिचे मुलास गादीवर बसविलें. रतनकुवर इनें रघजीस आपला तिसरा पुत्र म्हणून त्यास राज्याचा तिसरा हिस्सा त्याचे मदतीबद्दल दिला व दहा लक्ष रु.स्वारी खर्च म्हणून दिला. शके १६५९ ( इ. १७३७ सालीं). या तिसरें हिश्शाची वांटणी राणी **रतनकुवर** इचे हातानें रघूजीनें करून घेतली. त्यांत नागपूर, भंडारा वगैरे भाग रघूजीनें आपले हिश्शास घेतला.[२]

---

१ हें क्षेत्र बरेंच पुरातन आहे तेथील लक्ष्मणाच्या देवळांतील शिलालेख देवगिरीच्या (रामदेव) यादव राजाच्या कारकीर्दीतील आहे. अर्थात् त्या पूर्वीं तें क्षेत्र प्रसिद्ध होतें व रामाच्या मूर्ति वगैरे पूर्वीच असल्या पाहिजेत. मागें पा. ९ पहा

Indian antiquary Vol. 37 P. 204;

Hiralal's Incrip. in C. P. P. 3–4.

२ सदरहू सनद हल्लीं छापलेली आहे. (ऐ. प. ले. ४३९) **या सनदेंत** दहा लाख रु. व तीन परगणे मात्र **आहेत**. तेः—

या तहांत असेंहि कलम आहे कीं, रघूजीशिवाय राणीनें दुसरीकडे तहरह वगैरे करूं नये.

रघूजीनें नागपुर, भंडारा हा घाटाखालील सपाटीचा प्रदेश पूर्वींच काबीज केला होता. तेथें आपले सरदार वगैरे ठेवून त्यानें जागजागीं ठाणी वसविलीं. नंतर नागपुर ही सोइस्कर जागा समजून तेथेंच त्यानें या प्रांताचें मुख्य ठाणें केलें. पुढें पूर्वेसच राज्यविस्तारास जास्त जागा असल्यामुळें नागपुरासच तो जास्त राहूं लागला व हळूहळू वऱ्हाडांतील त्याचें ठाणें सुटून नागपुरासच रघूजीचें ठाणें कायम झालें. पुढें इ. स. १७४८ चे सुमारास देवगड संस्थानांत बंडाळी सुरू होऊन दिवाण रघुनाथसिंग यानें मराठ्यांचा अमल झुगारून देण्याचा प्रयत्न केल्यामुळें रघूजीनें **अकबरशहा** व **बुराणशहा** या दोघा राजपुत्रांसहि नागपुरासच आणून किल्ल्यांत ठेवलें व प्रथम त्यांचेतर्फे त्यांचे हिश्शाचे प्रदेशाचा कारभार रघूजी करूं लागला. परंतु याचा स्वाभाविक परिणाम असा झाला की, गोंडराजे नांवाचेच राहिले व रघूजी हाच वास्तविक सर्व राज्याचा मालक झाला. [१]

परंतु हा प्रकार एकदम न होतां हळुहळू झाला. पेशव्यांचे उत्कर्षामुळें ज्याप्रमाणें सातारकर छत्रपति निर्माल्यवत् झाले तसाच हाहि प्रकार झाला. तरी नागपुरकर भोसल्यांनीहि गोंडराजांचा मानमरातब शेवटपर्यंत चांगला

---

(१) किल्ले पवनी बमय बाळापूर

(१) प॥ मूलतापी बमय चिखली व जागीर फुटकर भाईखान बिबी दरोबस्त जे गांव प्र॥ मजकूरचे असतील ते दरोबस्त १५६

१ प॥ मारूड दरोबस्त.

एकूण तीन परगणे पानसुपारी ब॥ तुम्हास तुमचे वंशपरंपरा दिले असत. माघ शु॥ ५ सं. १७९५.

१ अकबरशहा पळून एलिचपुरच्या नबाबाकडेस गेला होता, परंतु त्यानंतर या गोंड राजांनीं भोंसल्यास कोणताहि त्रास दिला नाहीं व त्यांच्या कैदवजा आयुष्यामुळें म्हणा अगर इतर कारणामुळें म्हणा, त्यांच्यांत कर्तृत्ववान् मनुष्यहि कोणीच निघाला नाहीं. हल्लीचा पुरुष तर निवळ वेडा आहे.

ठेवला. गोंड राजांच्या हिश्शाचें त्यांच्या त्या वेळच्या प्रांताचें उत्पन्न भोंसले त्यांना दरसाल पावतें करीत असत व त्या वेळच्या जमाखर्चांतसुद्धां "गोंड राजाचा हिस्सा" म्हणूनच तें उत्पन्न दाखवीत असत. तसेंच गादीवर बसतांनासुद्धां पेशवे ज्याप्रमाणें छत्रपतीकडून वस्त्रें घेत, त्याप्रमाणें भोंसलेहि गोंड राजांकडून आपणास तिलक लावून घेत व याप्रमाणें एका प्रकारें त्यांची मालकी अंशतः कबूल करीत. दुसऱ्या नात्यानें सेनासाहेब सुभा म्हणून त्यांना साताऱ्याहूनहि वस्त्रें आणावी लागत असत. गोंड राजांना नागपुरकर भोंसले किती चांगल्या तऱ्हेनें वागवीत याची साक्ष तिऱ्हाईत इंग्रज वकिलांनींसुद्धां वेळोवेळीं दिली आहे व असें उदाहरण सर्व हिंदुस्थानांत पहावयास मिळणार नाहीं असें म्हटलें आहे.[१]

**खेमनसिंगाचें बंड**—याप्रमाणें रघूजीचा जम नागपुरास व सर्व गोंडवणांत बसला. मध्यंतरी किरकोळ दंगेधोपे झाले,परंतु रघूजीच्या सत्तेस त्यामुळें कांहीं बाध आला नाही. ब्रह्मपुरी येथील किल्लेदार **खेमनसिंग** व त्याचा भाऊ **अभेराय** यांनीं तिकडे दंगा आरंभिला म्हणून रघूजीनें **रघूजी करांडे** यास त्यांचेवर पाठविलें. खेमनसिगानें बारा दिवस किल्ला लढविला. शेवटीं मराठ्यांनीं किल्ल्यावर हल्ला करून तो सर केला व खेमनसिंगास कैद करून आणलें. त्यासहि रघूजीनें ठार मारण्याचा हुकूम दिला परंतु रघूजी करांड्यानें खेमनसिंगाच्या शूरपणाची तारीफ करून पुढें उपयोगी पडेल म्हणून त्यास जीवदान देवविलें व त्यास रघूजीच्या पदरीं ठेवविलें.

**हरी पाटलास काढलें**--भंडाऱ्याचा किल्लेदार हरी पाटील यांस पूर्वीं रघूजी करांड्यानें याचप्रमाणें जीवदान देववून किल्लेदारीवर पुन्हा ठेवलें होतें. परंतु **हरी** पाटील हा इमानानें राहिला नाहीं. त्याचा "डौल" बदललेला दिसला. म्हणून रघूजीनें त्यास काढून **खेमनसिंगास** भंडाऱ्याची किल्लेदारी दिली. खेमनसिग हा पुढें बराच उपयोगी पडला.

**शाहूकडून नवीन सनद्**--यानंतर रघूजीनें इ. स. १७३८ मध्यें शाहूकडून नवीन सनदा घेतल्या. त्यांत पुढील सुभ्यांवर मराठ्यांचा अंमल प्रस्थापित करण्याबद्दल अधिकार दिला आहे.

---

१ भाग ८ फॉर्स्टरची वकिली पहा.

१ लखनौ, २ मकसुदाबाद, ३ बेदर, ४ बंगाला. ५ बितीया, ६ बुदेलखंड, ७ इलाहाबाद, ८ हाजीपूर पाटणा शिवाय देवगड, गढा, भवरगड, चांदा ह्या प्रांतांची चौथाई व मोकासा हे हक्क वसूल करण्याचा अधिकार दिला आहे.[१]

**बाजीराव पेशव्याशीं विघाड इ. स. १७३८**—नागपुरकर भोंसल्यांचें पेशव्यांशीं सदैव वितुष्टच राहिलें. प्रसंगोपात् जरी ते एकमेकांस मदत करीत असत व पत्रव्यवहारांत अघळपघळ स्नेहभाव दाखवीत तरी अंतर्यामीं त्यांचें एकमेकांशीं कधींच सूत नव्हतें. या त्यांच्या भांडणामुळें मराठी साम्राज्याचें अतोनात नुकसान झालें आहे. निरनिराळ्या वेळीं कोणत्या पक्षाचें कसें चुकत गेलें हें पुढें वेळोवेळीं दिसून येईल. या वैमनस्याचा आरंभ इ. स. १७३८ मध्यें बाजीरावानें निजामुल्मुकावर माळव्यांत चालविलेल्या लढाईपासून झाला.' **बाजीरावानें** मोठ्या धाडसानें दिल्लीपर्यंत स्वारी करून दिल्लीवर मराठ्यांचा दरारा बसविला. **माळवाप्रांत** मराठ्यांना मिळवून शिवाय सर्व दक्षिणेंत चौथ व सरदेशमुखी सरदेशपांडेपणाचे[२] हक्क व बंगाल, अलाहाबाद गया, बनारस व मथुरा या भागांत जहागिरी हक्क अगर नगदी पन्नास लक्ष रुपये बादशहाचे खजिन्यांतून मिळविण्याची खटपट बाजीरावानें **खानडौरान** याचे मार्फत चालविली होती. या प्रकरणांत बाजीरावाची व निजामुल्मुल्काची **भोपाळ**जवळ लढाई होऊन बाजीरावानें निजामास भोपाळजवळ कोंडलें. निजामानें दक्षिणेकडून आपल्या मुलाकडून सैन्याची मदत मागविली. परंतु बाजीरावानें चिमाजी आप्पास व आपले इतर सरदारांस पाठवून मध्येंच निजामाचें सैन्य अडविलें. बाजीरावाचें हें जंगी कारस्थान सिद्धीस गेलें असतें तर बाजीरावाच्या मागणीप्रमाणें बादशहाकडून माळवा गुजराथ वगैरे प्रांत मराठ्यांस मिळून मराठी राज्याचा बराच फायदा झाला असता. कारण **खानडौरान** हा बाजीरावास अनुकूल असून **निजाम** व **खानडौरान** यांजमध्यें चुरस होती. त्यामुळें निजामाचा मोड व्हावा अशी

१ बखर पान ३८ ही सनद शके १६६० (इ. स. १७३८) मध्यें दिली आहे.

२ शेकडा पांच रुपये.

खानडौरानची इच्छा होती व तो बादशहास बाजीरावाच्या तर्फेनें समजावीत होता.

**भोपाळचा वेढा** (इ. १७३८)---या वेळेस बाजीरावास सैन्याचे मदतीची फारच जरूर होती. त्यामुळें त्यानें सर्व मराठे सरदारांस पत्रें लिहिलीं. त्याचप्रमाणें रघूजी भोंसल्यासहि लिहिलें. परंतु रघजीच्या मनांत बाजीरावास मदत करावयाची नव्हती.[१] त्यानें बळेंच कांहीं निमित्त दाखवून मदत पाठविण्याचें टाळलें. वऱ्हाडावर स्वारी होण्याचा संभव आहे अशी त्यानें सबब दाखविली. बाजीरावानें रघूजीस काकुळतीचीं, विनवणीचीं व शेवटीं धमकीचीं पत्रें पाठविलीं परंतु सर्व व्यर्थ. त्यानें बाजीरावास मुळींच मदत पाठविली नाहीं. उलट बाजीराव माळव्यांत गुतला आहे अशी संधि साधून रघूजीनें एकदम अलाहाबाद प्रांतावर स्वारी केली. बुदेलखंडांतील गढा--मंडला हे प्रांत जिंकून घेतले. यामुळें बाजीरावानें दिल्लीच्या बादशहाशीं जें धोरण बांधलें होतें त्यास बाध आला. बुदेलखंडांत पेशव्यांचा मुलूख पूर्वीचाच असल्यामुळें पेशवा तो प्रांत आपल्या कार्यक्षेत्रांतील म्हणून समजत असे. त्यामुळें रघूजीच्या या स्वारीचा बाजीरावास फार राग आला.

---

१ अलीकडे प्रकाशित झालेल्या साधनांवरून असें दिसतें की प्रथम तरी रघूजीचा विचार बाजीरावाचे मदतीस जाण्याचा होता. चिमाजी अप्पा हा तापीतीरीं वरणगांवानजीक दक्षिणेकडून निजामाच्या मदतीस जाणाऱ्या मोगल सैन्यास अडविण्याकरितां राहिला होता. त्यास रघूजीनें पत्र लिहिलें आहे त्यांत तो म्हणतो, " आमचा मनसबा होता जे राजश्री कान्होजी बावा भोंसले यांची जागा भांब येथें जाऊन मोरचे लावून ते स्थळ हस्तगत करावें परंतु हे कार्य मसलतीचें. अगत्यवाद जाणून तो विचार टाकून राजश्री रायाकडे जावयाचे उद्देशें कूच करून माघारे फिरून सालबरडी नजीक घाटतोंडे आलों तव सुजायतखान अळजपुरचा सुभा ......बहुतसा गर्वाभिमाने फौजबंदी पोख्त करून अडवा चालोन आला ...... त्यासी आम्हासी युद्ध तुंबळ झालें. राजश्री स्वामीचे पुन्यप्रतापें व आपले कृपेकरून त्यास हतप्रभाव करून हस्तगत केलें. . .या उपरी मजल दरमजल फौजेंनिसी राजश्री रायाकडे जात असो" (पे. द.भा. १५ ले. ८२.) परंतु या पत्राप्रमाणें रघूजी बाजीरावाकडे न जातां थेट उत्तरेस अलाहाबादेपर्यंत गेला.

**रघूजीची अलाहाबादेवरील स्वारी**—भोपाळच्या वेढ्यांत बाजीराव गुंतला असतां त्यास मदत करण्याचें सोडून रघूजीनें अलाहाबादेपर्यंत स्वाऱ्या करून पुष्कळ लूट आणली व तेथील सुभेदार सुजाखान याचा पराभव करून त्यास ठार मारिलें असा आतांपर्यंत इतिहासज्ञांचा समज आहे व ही गोष्ट सर्व ग्रंथांत आढळते. परंतु या अलाहाबादेच्या मोहिमेबद्दल व विशेषतः सुजाखानाच्या पराभवाबद्दल आम्हांस बरीच शंका वाटते. या स्वारीच्या हकीकतीचा उगम ग्रँट डफ भा. १ पा. ३९२ मध्यें आहे. ही हकीकत देतांना डफ साहेबानें त्या विधानास कांही आधार दिलेला नाही. या स्वारीचें वर्णन इतरत्र कोठें दिलेलें नाहीं. त्यामुळें सरदेसाई हेहि या स्वारीबद्दल साशंक आहेत. (मध्य वि. १ पा. ४२२) परंतु आतां अस्सल कागदपत्रांवरून एवढें तरी खास म्हणतां येतें कीं ज्या सुजायतखानाचा रघजीनें पराभव केला तो अलाहाबादेचा सुभेदार नसून एलिचपुरच्या निजामाचा सुभेदार होता. (पे. द. भा. १५ ले. ८२) रघूजीचें चिमाजीस पत्र पहा. नांवाचा थोडासा फरक सोडला तर हीच गोष्ट खरी दिसते. अलाहाबादेच्या सुजाखानाचा पराभव व मृत्यु, तशीच अलाहाबादेवरील स्वारीसुद्धां यावरून संशयित ठरते.

बाजीरावानें निजामाचा मोड करून त्याचेशीं तह केला. (फेब्रुआरी १७३८) त्यांत माळवा प्रांत मराठ्यांस मिळाला व नर्मदाचंबळा या दोन नद्यांच्या मधील मुलखावर मराठ्यांची सत्ता प्रस्थापित झाली. शिवाय मोंगल बादशहाकडून पन्नास लक्ष रुपये देवविण्याचें निजामानें बाजीरावास कबूल केलें.

रघूजीच्या सनदेंत जेव्हां पेशवा स्वारीस निघेल तेव्हां त्याचे बरोबर मोहिमेस जाण्याचा करार असून बाजीरावानें बोलावलें असतां रघूजी गेला नाहीं याबद्दलहि बाजीरावास रघूजीचा फार राग आला.

**आवजी कवड्याचा मोड** (इ. स. १७३९)—वर लिहिल्याप्रमाणें बाजीरावाचा व रघजीचा बिघाड झाल्यामुळें बाजीरावानें रघूजीस शिक्षा करण्याचें ठरविलें. निजामाच्या भानगडींतून मुक्त होताच त्यानें आपला सरदार आवजी कवडे यास रघूजीवर पाठविलें व त्याचे मदतीस अंताजी माणकेश्वर यास दिलें. पदमोजी जाचक हाहि या वेळीं आवजी-

बरोबर होता. रघूजीनें आवजीवर आपले सरदार भास्कर हरी, कृष्णाजी आटोळे व अलींखान[१] यांस पाठविलें. उमरावतीजवळ त्यांची लढाई झाली. ती साधारण सारखीच झाली. पुन्हां दुसरी लढाई नागपुर प्रांतांत झाली. त्यांत आवजीच्या पक्षाचा मोड होऊन ते पळून गेले.[२]

आवजी कवडे हा भोसल्यांच्या मुलुखांत लुटालूट करूं लागल्यामुळें रघूजीनें शाहूकडे बाजीरावाविरुद्ध तक्रार केली. त्यावरून शाहूनें बाजीरावास पत्र लिहिलें कीं, "राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांच्या सरंजामांत तुम्हांकडील फौज जाऊन धामधूम करतात ... तर औऊजी कवडे वगैरे आपणाकडील सरदारांस ताकीद करून वराड प्रांतास फौज न जाय . . ते गोष्टी करणें."[३]

बाजीराव हा स्वतःहि रघूजीवर स्वारी करण्याच्या विचारांत होता. परंतु शाहूराजाच्या वरील पत्रामुळें व दिल्लीवर नादिरशहाची स्वारी झाल्यामुळें त्यानें हे 'घरगुती तंटे' सोडून तो उत्तरेस जाण्याच्या तयारीस लागला. बाजीराव एका पत्रांत लिहितो--"रघूजी भोसल्याचा आपला घरगुती तंटा क्षुल्लक आहे. पोर्तुगीजांचा कांहीं हिशेब नाहीं. हिंदुस्थानांतील हिंदु-मुसलमानांस नादीरशहा हा एकच परकी शत्रु आहे. सर्वांनीं मिळून त्यास बाहेर हांकून लाविलें पाहिजे."[४]

बाजीरावानें चिमाजीआप्पास पोर्तुगीजांचा नाद सोडून देऊन सैन्यासह उत्तर हिंदुस्थानांत बोलाविलें. त्याचप्रमाणें निजामाचा पुत्र नासिरजंग यासहि बोलाविलें. परंतु नादीरशहा दिल्लीहून परत निघून गेल्यामुळें तिकडे जाण्याचें कारण पडलें नाहीं.

तसेंच चिमाजी अप्पानें बाजीरावास पत्र लिहून रघूजीशीं जास्ती विरुद्धपणा न दाखविण्याविषयीं सूचना दिली व "कागदोपत्रीं विखर कांहीं न

---

१ हे सरदार पुढें रघूजीच्या पदरीं प्रसिद्धीस आले.

२ पे. द. भा. १५ पा. ४१-४३. रघूजीची व आवजीची प्रत्यक्ष लढाई झाल्याचें दिसत नाहीं.

३ ऐ. प. ले. ४३७.

४ Duff Vol. I.P. 393.

लिहावें म्हणजे लगामी लागून कृतोपकार मानील. लगामी लावलिया आवजी कवडे याची वस्तभाव सुतलीचा तोडा तोहि देईल."

ही शहाणपणाची सल्ला बाजीरावानेंहि मान्य केली. चिमाजीस लिहिलेल्या उत्तरांत[१] बाजीराव लिहितो " चाकराचाकरांत होऊन गेलीयांत अन्याय त्याचा काय आहे आणि आम्ही विखर कशास दाखवावे. त्यास लिहिणें ते समाधानपूर्वकच लिहित असतो. व त्याणीही जाहले गोष्टीचे भय मानून नम्रतेचेंच पत्र पाठविलें आहे. वस्तभाव अवबाची सोडून देतील व आम्हासही सर्व प्रकारें त्याचे समाधान रक्षून लगामी लाऊन घेणें लागेल. प्राग्तनवान आणि बरा धाडसी आहे आणि आम्हास पुढें नादरशहाच्या उपमर्दाचा मनसुबा कर्तव्य. यास्तव सर्व प्रकारे गम खाऊन समाधान करून लगामी लाऊन घेऊं."[१]

बाजीरावाचें व प्रतिनिधीचें वांकडें होतें व रघूजीचें व प्रतिनिधीचें सख्य होतें. त्यामुळेंहि या दोघां पुरुषांत स्नेह असणें कठीण होतें. परंतु या कारणापेक्षां रघूजीची स्वतंत्रवृत्ति, त्याचा शाहूशीं प्रत्यक्ष संबंध व दोघा वीर पुरुषांची एकमेकांशी स्पर्धा ह्याच गोष्टी त्यांच्या वितुष्टास कारण झाल्या असाव्या. मराठी साम्राज्याचा मुख्य प्रधान या नात्यानें बाजीरावाचा हुकूम रघूजीनें मानणें रीतीचें होतें परंतु रघूजीनें व त्यानंतर त्याचे वंशजांनींहि तो कधींच मानला नाहीं हें पुढें वेळोवेळीं दिसेल. त्यामुळें मराठी राज्यांत इंग्रजांप्रमाणें एकसूत्रीपणा कधींच राहिला नाहीं.

**कर्नाटकावरील स्वारी**:– शाहूराजानें **फत्तेसिंग** भोंसले ह्यास कर्नाटकचे मोहिमेवर पाठविलें. त्यास मदत करण्याकरितां रघूजी भोंसल्यास इसवी सन १७४० चे आरंभीं निकडीचा हुकूम पाठविला. अर्काटचा नबाव **दोस्तअली** व त्याचा जांवई **चंदासाहेब** हे पांडेचरीचा फरेंच गव्हर्नर **डुमास** याच्या मदतीने तंजावरच्या **प्रतापसिंह** भोंसल्यास व त्रिचनापल्ली वगैरेच्या संस्थानिकांस त्रास देत होते. चंदासाहेबानें त्रिचनापल्लीचें राज्य जिंकून तेथें आपलें ठाणें वसविलें. प्रतापसिंहानें आपले बचावाकरितां शाहू राजाची मदत मागितली व वर लिहिल्याप्रमाणें फत्तेसिंग भोसले ह्यास शाहूनें ताबडतोब रवाना केलें. रघूजी भोंसले यानें ताबडतोब जावें परंतु

---

१ पे. द. भा. १५ पा. ७३–७४

इकडील बंदोबस्त करण्यास त्यास उशीर लागला त्यावरून शाहूनें त्यास खरमरीत पत्र लिहिलेलें उपलब्ध[१] आहे.

देवगड व नागपुर ह्या प्रांतांचा बंदोबस्त करून रघूजी वऱ्हाडांतून **नांदेडच्या** मार्गानें हैद्राबादेकडून कर्नाटकांत जाऊन फत्तेसिंगाचे लष्करास सामील झाला व तेव्हांपासून लढाईचीं सर्व सूत्रें त्यानें आपल्या हातीं घेतली. अर्काटचा नबाब **दोस्तअल्ली** हा मराठ्यांच्या फौजेवर चालून गेला. त्याची व मराठ्यांची लढाई **दमलचेरीच्या** घाटांत ता. २०।५।१७४० रोजीं झाली व त्यांत खुद्द **दोस्तअली** व त्याचा मुलगा **हसनअली** हे पडले व त्यांचा दिवाण **मीरआसद** हा मराठ्यांचे कैदेंत सांपडला. नबाब दोस्तअलीचा मुलगा व **सफदरअली** व नबाबाचा जांवई **चंदा-साहेब** हे वरील पराभवामुळे घाबरले व त्यांनी नबाबाच्या घरांतील सर्व बायका-मुलें व जडजवाहीर पॉंडेचरीस फरेंचांचे आश्रयास पाठवून दिले. **सफदरअली** हा **वेलोरच्या** किल्ल्यांत राहिला व **चंदासाहेब** हा **त्रिचनापल्लीस** राहिला. मराठ्यांनी अर्काट सर केलें व रघूजीनें पत्र लिहिल्याप्रमाणें फरेंच गव्हर्नर **डुमास** यास खरमरीत पत्र लिहिलें. त्या पत्रांत रघूजीनें त्यास धाक दाखवून लिहिले होतें की, "नबाबाचें कुटुंब व खजिना आमच्या ताब्यांत द्यावा, नाहीं तर आम्ही पॉंडेचरीवर स्वारी करू. परंतु फरेंच गव्हर्नर **डुमास** हाहि एवढ्या धाकानें भिणारा नव्हता. त्यानेंहि कांही गोडीचें व कांही धमकीचें असें उत्तर[२] पाठवून नबाबाचे कुटुबास स्वाधीन करण्याचें नाकारलें. **डुमास** याने वरील पत्राबरोबरच फरान्समधील उत्कृष्ट दारूच्या बाटल्या रघूजीस नजर पाठविल्या. त्या रघूजीस व त्याचे कुटुबास इतक्या आवडल्या की, रघूजीनें आणखी बाट-ल्यांची मागणी केली. **डुमास** यानें मागणीप्रमाणें दारू पाठविली.[३] शेवटी रघूजीनें पॉंडेचरीच्या स्वारीचा नाद सोडला व आपला मोर्चा **सफदरअली** व **चंदासाहेब** यांजकडेस वळविला.

१ राजवाडे खंड ६ ले. १४९.

२ सरदेसाई ब्रि. रि पा. ४७३–४७६.

३ " दारूपायी राज्य बुडविलें " असे रघूजीबद्दल शाहूनें उद्‌गार काढले होते ते याच प्रसंगास अनुलक्षून असावेत असा तर्क आहे.

इतक्यांत **बाजीराव** पेशवा मरण पावल्याची बातमी **रघूजीस** समजली. व बाजीरावाचे मुलास पेशवाई न मिळतां ती **बाबूजी** नाईकास मिळावी ह्या खटपटीकरितां फौज कर्नाटकांतच ठेवून **रघूजी** साताऱ्यास आला. परंतु नाईकाची व रघूजीची खटपट सफल न होतां रघूजी नाईकास घेऊन परत कर्नाटकांत आला. इकडे **चंदासाहेब** व सफदरअली यांचे मध्येंहि अविश्वास उत्पन्न होऊन प्रत्येकजण नबाब होण्याची खटपट करूं लागला. ही सधि पाहून रघूजीनें त्याच्या कैदेंत असलेला दिवाण **मीरआसद** यास बंधमुक्त करून **सफदरअली**कडे पाठविलें, व त्याच्याशी गुप्त तह केला की, मराठ्यांनीं त्रिचनापल्ली सर करून चंदासाहेबास पकडावें, व **सफदरअलीची** स्थापना अर्काटचे गादीवर करावी. याबद्दल सफदरअलीनें एक कोट रुपये हप्त्याहप्त्यांनीं मराठ्यांस द्यावे (ता. १६-११-१७४०).

इकडे **चंदासाहेबा**नें फरेंचांच्या मदतीनें मराठ्यांपासून आपलें रक्षण करण्याची तयारी केली. मराठ्यांनी त्रिचनापल्लीचे किल्ल्यास वेढा दिला. **सफदरअल्ली** यानेंहि आपलें सैन्य मराठ्यांचे मदतीस पाठविलें.[१] चंदासाहेबाचा भाऊ **बडासाहेब** हा मदुरेहून चंदासाहेबास मदत करण्यास निघाला. परंतु मराठ्यांनीं त्यास मध्येंच गांठून, त्याचा पराभव करून ठार मारिलें. फरेंचाकडूनहि चंदासाहेबास मदत झाली नाही. शेवटीं निरुपाय होऊन चंदासाहेबानें किल्ला मराठ्यांचे स्वाधीन केला. (ता. २६-३-१७४१) चंदासाहेब व त्याचा वडील मुलगा यांस रघजीनें कैद केलें. चंदासाहेबानें दोघांच्या सुटकेबद्दल आठ लक्ष रुपये देऊं केले, परंतु रघूजीनें तें मान्य न करितां दोघांस कैद करून साताऱ्यास आणिलें. तेथें ते ७ वर्षे कैदेंत होते. इ. स. १७४८ मध्यें **डुप्ले** यानें सात लक्ष रुपयांची जामिनकी घेतल्यामुळें त्यांची पुढें सुटका झाली.[२]

त्रिचनापल्ली व कर्नाटकांतील इतर ठाणीं हीं हातीं आल्यावर रघूजीचें कर्नाटकांतील काम संपलें. फरेंच गव्हर्नर **डुमास** यानें मराठ्यांवर चढाई केली नाहीं व रघूजीहि त्याचे वाटेस गेला नाहीं. **सफदरअलीची** स्थापना अर्काटचे गादीवर होऊन तो मराठ्यांचे अंकित झाला. इकडे तंजावरच्या

१ पे. द. २० ले. २१
२ डफ भाग २ पा. २, ४

राजाचीहि धास्ती दूर होऊन त्यास स्वस्थता मिळाली. त्याबद्दल त्यानें शाहू राजास कबूल केल्याप्रमाणें पंधरा लक्ष रुपये नजर दिले. याप्रमाणें कर्नाटकांत मराठ्यांचा जम चांगला बसला. या स्वारीत **फत्तेसिंग** भोंसले, **मुरारराव** घोरपडे व **रघूजी** भोंसले हे सरदार प्रमुख होते; परंतु रघूजी जातांच त्याच्या तेजस्वीपणामुळें मुख्य कारभार त्याचेच हाती आला. व **फत्तेसिंग भोंसले** मागे पडला. त्रिचनापल्लीचें ठाणें घेतल्यानंतर **रघूजीनें मुराररावास** त्या ठाण्यावर ठेविलें व आपण **फत्तेसिंगासह** सातार्‍यास परत आला. (जून १७४१) कर्नाटकची सुभेदारी आपण व **बाबूजी** नाईक यांनी मिळून करावी याबद्दल पुढ रघूजीनें पुष्कळ खटपट केली परतु ती साधली नाही. शाहूची धाकटी राणी सगुणाबाई ही रघूजीची मेहुणी असल्यामुळें तिचे मार्फतहि रघूजीनें हा प्रयत्न केला. शाहू राजा पुढें पुढें मनानें दुर्बल बनल्यामुळे त्याच्या दोन्ही राण्या पैशाकरतां राजकारणात ढवळाढवळ करूं लागल्या होत्या. थोरली राणी **सकवारबाई** इचें कर्जहि **बाबूजी** नायकाकडे होतें. तें कर्नाटकच्या वसुलीतून त्यानें द्यावें अशीहि लालूच रघूजीनें दाखविली होती. बाबूजी व आपण मिळून कर्नाटक व बंगालची सुभेदारी मिळवावी, कर्नाटकचा कारभार बाबूजी नायकानें करावा व बंगालचा कारभार आपलेकडे घ्यावा अशी रघूजीची खटपट होती. यासंबंधाचा बराच पत्रव्यवहार उपलब्ध आहे. बाबूजी नायकानें शेवटीं कर्नाटकच्या सनदा शाहूकडून मिळविल्या. परंतु नवीन जिंकलेल्या मुलुखांत शांतता प्रस्थापित करण्यास लागणारे शौर्यादि गुण त्याचे अंगी नसल्यामुळें त्यास फजीत होऊन परत यावें लागलें. शेवटीं नवीन पेशव्यानें तें काम पुढें इ. स. १७४६ मध्यें स्वत: अंगावर घेऊन अल्पवयी **सदाशिवराव** यास त्या मोहिमेवर पाठवून व त्याचे मदतीस **महादजीपंत** पुरंदरे यास देऊन कर्नाटकचा बंदोबस्त केला.

कर्नाटकच्या स्वारींत रघूजीची फत्तेसिंगास फार मदत झाल्यामुळें त्यानें इ. स. १७४१ मध्यें शाहूराजाकडून रघूजीस कान्होजीचे वेळचा सर्व पुरातन सरंजाम व **कडेवळीतची** देशमुखी व तीन गांव मोकासे देवविण्याचें[१] कबूल केलें व स्वतःचे वऱ्हाड प्रांतांतील मोकासेहि वहिवाटीस रघूजीकडे दिले.[२]

---

१ ना. भा. काग. ले. ९ (ता. ३–२–१७४१) ए. प. ले. ९

२ अप्रकाशित कागदपत्र.

# रघूजीच्या बंगाल्यावरील स्वाऱ्या

रघूजीच्या बंगाल्यावरील स्वाऱ्या हें त्याचे कारकीर्दीतील सर्वात मोठें काम होय. या स्वाऱ्यांचें वर्णन करण्यापूर्वी त्या पूर्वीच्या बंगालच्या स्थितीचें वर्णन केले पाहिजे.[१]

**बंगाल्याची पूर्वस्थिति**--दिल्लीस **महमदशहा** बादशहा असतांना या तीन प्रांतांचा सुभेदार **जाफरखान** नासिरी या नांवाचा होता. या जाफरखानाचें नांव **मुर्शिदकुलीखान**[२] असें असून हा औरंगजेबाचा एक कर्तबगार अधिकारी होता. त्यानें दक्षिणेंत जमाबंदीची नवीन व्यवस्था करून राज्याचें उत्पन्न वाढविलें होतें. त्यामुळें औरंगजेबानें त्यास **जाफरखान** असा किताब देऊन बंगाल्यांत सुभेदार नेमून पाठविले व सात हजारांची मनसब दिली. याने बंगालच्या सुभ्याचें उत्पन्न १॥ कोट पर्यंत वाढविले. या जाफरखानाची मुलगी **सुजाउद्दीन** नांवाच्या मनुष्यास दिली होती. हा सुजाउद्दीन बऱ्हाणपुरचा राहणारा असून जाफरखानाच्या वजनामुळे तो ओरिसा प्रांतांत '**नायब नाजीम**' म्हणून नेमला गेला. जाफरखान हा फार वृद्ध होऊन मरावयास टेकला होता; म्हणून त्याने आपल्या पाठीमागें बंगालची सुभेदारी आपला नातू सुजाउद्दीनचा मुलगा **सरफराजखान** यास मिळावी अशी खटपट चालविली. परंतु सुजाउद्दीन यानें दिल्लीस संधान बांधून **जाफरखान** मरतांच ती सनद आपल्या नांवानें करून घेतली. जाफरखान मरतांच तो मुर्शिदाबादेस गेला व सुभेदारीचे काम पाहूं लागला. **सरफराजखान** हा त्याचा मुलगा असल्यामुळें बापापुढ त्याचें कांही चाललें नाहीं. सुजाउद्दीन हा हलक्या दर्जाचा मनुष्य असून त्याचें वर्तनहि अशाच प्रकारचें होतें.त्याचे मुख्य सल्लागार म्हणजे **अलीवर्दीखान** व **हाजीअहमद** नांवाचे दोघे भाऊ व **राय** आलमचंद नांवाचा कायस्थ व **फतेचंद** नांवाचा मारवाडी बनिया असे होते. सुजाउद्दीन यानें ओरिसा प्रांतांत आपल्या दुसऱ्या बायकोचा मुलगा **महमदटाकी** यास नेमिलें व बिहार प्रांतावर अलिवर्दीखान यास नेमिलें. अलिवर्दीखान यानें या सुभ्याचा वसूल **फतेचंद** याचे दुकानामार्फत दिल्लीस रवाना करीत

१ Siyarul mutakherin & Banerji's History of Orissa.

२ याचे नांवावरून मुर्शिदाबाद शहर वसलेलें आहे.

जावा. यामुळें **फतेचंदाच्या** दुकानाचें महत्त्व वाढून त्याच्या दुकानाच्या शाखा सर्व बंगालभर व दिल्लीपर्यंत पसरल्या व फतेचंदास 'जगत्शेट' असा किताब मिळाला. मुर्शिदाबादेच्या जगत्शेटाची पेढी बंगाल्यांत फार प्रसिद्ध होऊन मराठ्यांच्या स्वारीत त्या पेढीवर मराठ्यांना अडीच कोट रुपयांची लूट पुढें मिळाली. अद्यापहि जगत्शेटाचें दुकान सर्व बंगाल्यांत प्रसिद्ध आहे. **सुजाउद्दीन** याचा तिसरा हस्तक **आलमचंद** यास सुजानें वाढवीत वाढवीत बंगालचा नायब दिवाण म्हणून नेमिले व '**राय-रायान**' असा त्यास किताब मिळाला. सुजाचा मुलगा **टाकीखान** हा ओरिसांत मरण पावल्यामुळे सुजानें आपला जांवई **मुर्शिदकुलीखान** (दुसरा) यास ओरिसा प्रांतावर नायब नाजीम म्हणून नेमिलें. या मुर्शिदकुलीखानाचा विश्वासू गृहस्थ **मीर हबीब** नांवाचा एक इराणी मुसलमान होता. त्या वेळच्या मुसलमान अधिकाऱ्यांत **मीर हबीब** हा फार प्रामाणिक व स्वामिभक्त म्हणून प्रसिद्ध होता. मराठ्यांच्या बंगाल्यावरील स्वाऱ्यांत मीर हबीब हा फार प्रसिद्धीस आला. त्याचें वर्णन पुढें येईल.

ओरिसा प्रांतांत प्रसिद्ध जगन्नाथपुरीचें[१] देवस्थान असून तेथील यात्रेकरूंवरील कराचें उत्पन्न नऊ दहा लक्षांचें होतें. **टाकीखानाचे** कारकीर्दीत त्याच्या जुलुमामुळें जगन्नाथच्या पुजाऱ्यांनीं जगन्नाथाची मूर्ति चोरून **चिलका** सरोवरांतील एका टेकडीवरील बेटांत नेऊन ठेविली. **मुर्शिदकुलीखान** व **मीरहबीब** हे ओरिसा प्रांतांत आल्यावर त्यांना आढळून आलें कीं, जगन्नाथाची यात्रा बंद झाल्यामुळें दरसालचें नऊ–दहा लक्षाचे उत्पन्न बुडालें. इकडे हिंदु लोकांनीहि त्याची विनवणी करून जगन्नाथाची मूर्ति परत आणण्याबद्दल परवानगी मिळविली. **राजा दंडदेव** नांवाच्या एका संस्थानिकानें ती मूर्ति चिलका सरोवरांतून परत देवळांत आणून बसविली.

**सुजाउद्दीन** हा इ. स. १७३९ मध्यें मरण पावला. त्यावेळीं नादीरशहाची स्वारी दिल्लीवर होऊन तेथें अव्यवस्था माजली होती. सुजाचा मुलगा **सरफराजखान** यानें खटपट करून आपल्या नावानें सुभेदारीचीं वस्त्रें

१ जगन्नाथपुरीसच 'पुरुषोत्तमपुरी' असेंहि नांव आहे. हल्ली नुसतें 'पुरी' असेंहि म्हणतात.

मिळविली. परंतु अलिवर्दीखान व त्याचे कपटपटु मित्र यांनीं सरफराजखानास सुभेदारी मिळूं न देतां अलिवर्दीखानास ती मिळवून घेण्याकरितां मोठा व्यूह रचून दिल्लीस सरफराजखानाविरुद्ध अनेक कंड्या पिकविल्या. त्यांतच ही एक होती कीं, सरफराजखानानें नादीरशहाच्या नांवानें नाणें पाडिलें. दिल्लीस **चिन्‌किलीचखान निजामुल्मुल्क** हा अधिकारारूढ होता. त्याचे मार्फत अलिवर्दीखानानें आपल्या नांवानें सुभेदारीची सनद मिळविली व राजद्रोहा- बद्दल **सरफराजखान** याचा शिरच्छेद करावा असाहि हुकूम मिळविला.

इतकें झाल्यानंतर सरफराजखान याच्या बापानें पोसलेल्या वरील चांडाळ चौकडीनें सरफराजखान याचा नाश करण्याचा उद्योग चालविला. **हाजीखान, आलमचंद** व **फतेचंद** हे मुर्शिदाबादेस राहून आंतून अलि-वर्दीखानाच्या साह्याची तयारी करीत होते व अलिवर्दी हा पाटणा येथे सैन्य जमवीत होता. अलिवर्दीनें सैन्य जमवून सरफराजखान याजवर स्वारी केली व त्यांची लढाई **गढिया** नांवाच्या जागीं होऊन **सरफराजखान** त्या लढाईत मारला गेला व **अलिवर्दीखान** हा बंगालचा सुभेदार झाला.

**सरफराजखान** यानें आपला मेहुणा **मुर्शिदकुलीखान** ओरिसाचा नायब याजकडून सैन्याची मदत मागितली होती. परतु ती वेळेवर येऊन पोहोंचली नाहीं. **अलिवर्दीखानानें** आतां आपला मोर्चा **मुर्शिदकुली-खानावर** फिरविला व ओरिसावर स्वारी केली. मुर्शिदकुलीखानानें आपल्या कुटुंबांतील माणसें कटकजवळील **बाराभाटीच्या** किल्ल्यांत ठेवून आपण स्वत: **कटकाहून** बलसोरचे बंदरास निघून गेला. यानंतर अलि-वर्दीची व मुर्शिदकुलीखानाची लढाई होऊन मुर्शिदकुलीखानाचा मोड झाला व तो बलसोरचे बंदरांतून समुद्रमार्गानें मच्छलीपट्टणास पळून गेला. **राम-चंद्र देव** नांवाच्या एका हिंदू राजानें मदत देऊन मुर्शिदकुलीखानाच्या बायकामुलांस सुरक्षितपणें त्याजकडे पोहोंचवून दिलें. याप्रमाणें ओरिसा प्रांत अलिवर्दीच्या ताब्यांत आला.

**मुर्शिदकुलीखानाचा** प्रामाणिक सरदार **मीर हबीब** यास **अलि-वर्दीखानाच्या** कपटी कृत्यांचा वीट आला व त्यानें आपल्या धन्याच्या नाशाबद्दल अलिवर्दीवर सूड उगविण्याचा निश्चय केला. अलिवर्दीविरुद्ध

उपयोगी पडण्याजोगें बळ मराठ्यांशिवाय दुसऱ्याजवळ नव्हतें. म्हणून मीरहबीब **नागपुरास** गेला. प्रथम **रघूजी** नागपुरास नसल्यामुळें त्याचा नागपुरचा सरदार **भास्करपंत** यास आपल्या धन्याच्या परवानगी-शिवाय मुर्शिदकुलीखानास मदत करतां आली नाही. परंतु **रघूजी** नाग-पुरास आल्यावर त्याची परवानगी घेऊन त्यानें अलिवर्दीविरुद्ध स्वारी केली. मराठ्यांच्या सर्व स्वाऱ्यांत **मीर हबीब** यानें त्यांना फार मदत केली व मराठ्यांच्या करवी अलिवर्दीखानास बारा वर्षे त्रस्त करून आपल्या धन्याच्या नाशाबद्दल पूर्ण सूड उगविला. तो प्रकार पुढें वर्णन केला आहे.

---

## बंगाल्यावरील पहिली स्वारी.

### इ. स. १७४२.

मागें सांगितल्याप्रमाणें **मीरहबीब** नागपुरास आला त्यावेळी **रघूजी** कर्नाटकावरील स्वारीस गेला होता. मागें नागपुरास त्याचा विश्वासू सर-दार भास्करराम उर्फ **भास्करपंत** हा अधिकारावर होता. परंतु रघूजीच्या परवानगीशिवाय एवढी मोहीम स्वतःच्या जबाबदारीवर करण्यास तो तयार नव्हता. शिवाय नागपुर प्रांताचाहि बंदोबस्त ठेवण्याची जोखीम त्याचे-वर होती त्यामुळे त्यावेळेस तो बंगाल्यावर गेला नाहीं.

रघूजी परत नागपुरास येतांच भास्करपतानें रघजीची परवानगी मिळविली. रघूजी हा बंगाल्याकडे हातपाय पसरण्याची संधीच पहात होता. ती आयतीच आल्यामुळें ती गोष्ट त्यास इष्ट अशीच होती.

नागपुराहून छत्तीसगडांतून बंगाल्यांत जाण्यास त्यावेळीं रस्ता चांगला नव्हता. मध्यें दाट अरण्यें व डोंगर व जंगली वस्ती होती. त्यामुळें बिहार प्रांतांतूनच रस्ता असे.

**भास्करपंताची बंगाल्यावर पहिली स्वारी इ. स. १७४२**—त्यामुळें **भास्करपंत** नागपुराहून प्रथम उत्तरेकडे जाऊन बिहार प्रांतांत शिरला. **अलिवर्दीखान** हा त्यावेळेस ओरिसा प्रांतांत बंडाळी माजली होती ती

थांबविण्याकरितां तिकडे गेला होता. तेथें त्याचा पुतण्या **सुजाउद्दौला**[1] हा अधिकारावर असून त्याचे जुलमामुळें त्या प्रांतांत बंड उत्पन्न झालें होते. मराठे आले हें कळतांच अलिवर्दीखान हा बंगाल्यांत परत आला. मराठे तोंपर्यंत **पचायत** नांवाच्या जिल्ह्यांत लूटमार करीत होते. मराठ्यांचे सैन्य दहा बारा हजार घोडेस्वारांचें होतें.

परंतु तेवढ्यांतच त्यांनी इतका धुमाकूळ माजविला की, त्याची संख्या किती आहे याचा अंदाज लागेना. अलिवर्दीखानानें मराठ्यांना अड- विण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु मराठ्यांनी त्याच्या सैन्यावर हल्ला करून त्याचें सर्व सामानसुमान लुटून नेलें व त्याच्या सैन्यास घेरा दिला परंतु वांचलेल्या थोड्याशा लोकांनिशी **अलिवर्दीखान** कसाबसा **कटवा** येथें पोहोंचला. या लढाईच्या धाम- धुमींतच **मीर हबीब** हा मराठ्यांच्या तावडीत सांपडला. त्यास त्यांनी कैद केलें. **मीर हबीब** हा मूळचाच अलिवर्दीच्या विरुद्ध होता, परंतु मराठ्यांची मदत पूर्वी न मिळाल्यामुळें नाइलाजानें अलिवर्दीखानास शरण जाऊन त्याच्या सैन्यांत नौकर राहिला होता. त्यास भास्करपंतानें वळवून आप- लेंसें करून घेतलें. असेंहि म्हणतात कीं, मराठ्यांनीं अलिवर्दीचा मोड कर- तांच तो योग्य संधि साधून भास्करपंताकडे पळून आला. **मीरहबीबाचा** या मोहिमेंत भास्करपंतास फार उपयोग झाला. मराठे लोकांचा रिवाज असा होता कीं, पावसाळ्यांत बाहेरच्या प्रांतांत मोहीम अगर मुक्काम न करतां परत देशांत येऊन मुक्काम करावयाचा व बरसातीनंतर पुन्हा मोहिमेवर निघावयाचें. कारण की, मराठ्यांचें कायमचें सैन्य फार थोडें असून हंगामी व स्वारीपुरतें जमा केलेलें सैन्यच फार असे. त्यांत बरेचसे शेतकरी असल्यामुळें ते पावसाळ्यांत शेती करीत व पावसाळ्यानतर मुलूखगिरी करीत. या रिवाजाप्रमाणें **भास्करपंत** हा पावसाळ्यांत परत देशीं येण्याच्या विचारांत होता. परंतु **मीरहबीब** यानें त्यास सल्ला दिली कीं, यावेळीं परत न जातां भास्करपंतानें **कटवा** येथें छावणी देऊन रहावे. परंतु भास्करपंताचा तसा निश्चय होईना. शेवटीं **मीर हबीब** यानें

१ यानेंच पुढें कलकत्त्यास सांपडलेल्या इंग्रजांना अंधार कोठडींत कोंडलें होतें. (इ. स. १७५६).

**भास्करपंता**जवळून कांहीं लष्कर मागून घेतलें व नबाबाच्या राजधानीचें मुख्य शहर **मुर्शिदाबाद** यावर चाल केली. तेथें त्याचा भाऊ अडकला होता त्यास सोडवून तें शहर त्यानें लुटलें. तेथील प्रसिद्ध सावकार **जगतशेट आलमचंद** याच्या एकट्या पेढीवरच त्यास अडीच कोटीची लूट सांपडली. ती घेऊन तो परत **भास्करपंतास** मिळाला. भास्करपंताची यामुळें खात्री झाली कीं, पावसाळ्यांत बंगाल्यांतच राहणें फायदेशीर आहे. म्हणून त्यानें बंगाल्यांतच राहण्याचा निश्चय केला. त्यानें **हुगळी** शहर काबीज केलें व कटवा, मिदनापुर वगैरे सर्व भागांत आपला अंमल बसविला.

**नानासाहेबाचें दिल्लीस कारस्थान**—याच सुमारास **नानासाहेब** पेशवा हा उत्तरहिंदुस्थानांत बुंदेलखंडांत तळ देऊन राहिला होता. बाजीराव पेशव्याचे वेळेपासून दिल्लीच्या बादशहाशीं राजकारण सुरू होऊन दिल्लीच्या बादशहास आपल्या हाताशी घालून दक्षिण हिंदुस्थानाप्रमाणेंच सर्व उत्तर हिंदुस्थानांत चौथाईची सनद वगैरे मिळवून आपला अंमल बसवावा असा उपक्रम **बाजीरावानें** सुरू केला होता. त्यानें निजामाशी लढून माळवा व बुंदेलखंड यांत आपलें बोट शिरकाविलेंच होतें. परंतु **बाजीराव** अकाली निवर्तल्यामुळें पुढील काम अपुरेंच राहिले होतें. **नानासाहेब** पेशवा गादीवर आल्यानंतर त्यानें वरील उद्योग पुढें चालविण्याचा निश्चय करून इ. स. १७४२ च्या आरंभी माळवा, बुंदेलखंड व गढामंडला हे प्रांत काबीज करून तो बुंदेलखंडांत तळ देऊन राहिला. तेथून दिल्लीच्या बादशहाकडे संधान लावून त्याचेकडून उत्तरहिंदुस्थानांतील चौथाईच्या सनदा व माळव्याच्या सुभेदारीची सनद मिळविण्याचा त्याचा प्रयत्न चालू होता. शिवाय दुसरें मोठें कार्य साधण्याचा नानासाहेबाचा विचार होता तो असा कीं, **प्रयाग, काशी, गया** वगैरे हिंदूंचीं प्रसिद्ध क्षेत्रें मुसलमानांच्या हातून सोडवून आपल्या ताब्यांत घ्यावीं. बादशहास कोणा तरी प्रबळ मनुष्याची लष्करी मदत पाहिजे होती. अशी मदत करणारा मराठ्यांशिवाय दुसरा कोणी नव्हता. हे कारस्थान राजा सवाई **जयसिंग** व **निजामुल्मुल्क** यांच्या मध्यस्थीनें चालू होतें व तें जमण्याच्या रंगांत होतें. सर्व बादशाही मुलखांतील

चौथाईची सनद मराठ्यांस देण्याचें, त्याचप्रमाणें माळव्याची सुभेदारीची सनद पेशव्याचे नांवानें देण्याचें बादशहानें कबूल केलें होतें. प्रत्यक्ष सनदा लिहून हाती मिळण्याचेंच काम बाकी राहिलें होतें.

याप्रमाणें इकडे उपक्रम चालू असतां **भास्करपंताची** बंगाल्यावर स्वारी झाली. बादशहाचे अधिकारी **अलिवर्दीखानाकडे** बंगाल्याच्या वसूलीची रक्कम मागण्याकरितां आले असतां **अलिवर्दीखानानें भास्करपंतानें** बंगाल्यांत चालविलेला धुमाकूळ दाखवून आपलें नुकसान अतिशय झाल्यामुळें खंडणीची रक्कम देणें आपणास शक्य नाही असें सांगितलें व मराठ्यांपासून आपलें संरक्षण करण्याकरितां बादशहाकडे सैन्याची मदत मागितली. त्याचप्रमाणें पेशव्यांचें व बादशहाचें सूत आहे असें पाहून **नानासाहेब** पेशव्याकडे लष्कराच्या खर्चाबद्दल रक्कमहि पाठवून त्याचीही मदत त्यानें मागितली. बादशहानें अयोध्येचा नबाब **सफदरजंग** यास अलीवर्दीचे मदतीकरितां बंगाल्यांत जाण्यास सांगितलें. तसेंच **नानासाहेब** पेशव्यासहि मराठ्यांपासून अलिवर्दीचें रक्षण करण्यास सांगितलें व स्वारीखर्चाकरितां बगाल्यांतील उत्पन्नांतून पेशव्यास रक्कम देण्याबद्दल अलिवर्दीखानास हुकूम दिला.

**नानासाहेबास** या कामगिरीत दोन्हीकडूनहि मोठाच पेंच होता. न जावें तर दिल्लीच्या राजकारणाचा डाव बिघडतो; कारण मग बादशहाकडून त्याचे मुलखाचें रक्षण केल्याशिवाय चौथाईच्या सनदा मिळविणें शक्य नव्हतें. जावे तर मराठी साम्राज्याच्या एका सरदारावर पेशव्यानें स्वारी करणें म्हणजे आपसांत दुही करून घेणें व ती सर्वांच्या निदर्शनास आणून देणें असें होतें. परंतु मराठी साम्राज्याच्या राजकारणांत असा एकसूत्रीपणा मुळीच नव्हता. त्यामुळें अशा प्रकारची शिस्तहि नव्हती. नानासाहेबानें अलीवर्दीस मदत करून मराठ्यांचे सैन्यास हाकून देण्याचें कबूल केलें व बगाल्याकडे मोर्चा फिरविला. शिवाय बाजीरावाच्या कारकीर्दीपासून पेशव्यांचा व नागपूरकर भोसल्यांचा उघड बिघाड झाला होता. बाजीराव पेशव्यानें इ. स. १७३८ मध्यें भोपाळजवळ निजामुल्मुल्कास कोंडलें त्यावेळीं **रघूजी** भोसल्यास त्यानें नानापरीनें मदतीस येण्याकरितां लिहिलें होतें. परंतु तो तिकडे गेला नाहीं व नंतर बाजीरावास अगर शाहूराजास

न विचारतां त्यानें उत्तर हिंदुस्थानांत स्वारी करून गढा, मंडला व अलाहाबादपर्यंत स्वारी करून बाजीरावाच्या दिल्लीशी चाललेल्या राजकारणांत व्यत्यय आणला हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. त्यानंतर नानासाहेबास पेशवाई मिळण्याच्या कामांतहि **रघूजीनें** त्यास शक्य तितका विरोध केला होता. त्यामुळें त्यांचे मध्येंहि तेढ उत्पन्न झालेलीच होती. त्याप्रमाणें दोघांतहि उघडपणें एकमेकांच्या विरुद्ध वागण्यास संकोच राहिला नव्हता. त्याच्याच उलट उदाहरण म्हणजे पुढील इंग्रजांचें हिंदुस्थानांतील राजकारण पहा. ग. जनरलनें ज्या संस्थानिकांशीं मैत्री अथवा शत्रुत्व जाहीर केलें त्याच्याशीं मुबई अगर मद्रासचे इंग्रज यांनी विरुद्ध वर्तन केलें नाही. पण मराठ्यांच्या इतिहासांत अशी पुष्कळ उदाहरणें दाखवितां येतील.

परंतु पेशव्याची मदत बंगाल्यांत येण्यापूर्वीच अलिवर्दीखानानें स्वतः जमवाजमव करून सैन्य जमा केले व पावसाळ्यांतच भास्करपंताच्या **कटवा** येथील छावणीवर हल्ला करण्याची तयारी केली. **हुगळी** नदीवर व **आजी** नदीवर नांवाचा पूल बांधून त्यानें आपलें सैन्य पलीकडच्या काठावर नेले. त्यातील कांही सैन्य नावा बुडून मेले, तरीहि न डगमगतां त्यानें मराठ्यांवर हल्ला केला. मराठे लष्करास या हल्ल्याची कल्पना नसल्यामुळें ते बेसावध होते. ते पळून ओरिसा प्रांतांत शिरले. **बलसोर**जवळ इ. स. १७४२ चे दसऱ्याचे सुमारास दोन्ही पक्षांची लढाई झाली व **भास्करपंताचा** मोड झाला. मराठ्यांनी हिंमत सोडली व ते ओरिसा प्रांतांतून व बंगाल्यांतून पाय काढन नागपुरास परत आले. **भास्करपन्तानें** बंगाल्यांतूनच रघूजी भोंसल्यास सैन्याची मदत पाठविण्या-बद्दल पत्रें पाठविली होती व रघूजीहि सैन्याची जमवाजमव करून भास्करपंताचे मदतीस निघाला होता. परंतु तितक्यांत **भास्करपंताचा** मोड होऊन तो परत नागपुरास आला.

---

## बंगाल्यावर दुसरी स्वारी.

(इ. १७४३)

**रघूजीनें** स्वतः बंगाल्यावर स्वारी करून **भास्करपंतानें** मिळविलेले अपयश धुऊन टाकण्याचा निश्चय केला व **भास्करपंत** गेला त्याच मार्गानें बहार प्रांतांतून बंगाल्यावर स्वारी करण्याचा त्याने विचार ठरविला नानासाहेब पेशवा गयेच्या जवळपास असतांना रघूजीहि जवळपास जाऊन पोहोंचला. पेशवा हा बादशहाशीं केलेल्या ठरावाप्रमाणें बंगाल्याकडेस जाण्याच्या वाटेवर होता व **रघूजी** हा अलिवर्दीविरुद्ध स्वारी करण्यास जात होता. उभयतांचे वकील एकमेकांकडेस गेले व पेशव्यानें रघूजीस बंगाल्यावर स्वारी करण्याचें मना केलें व आपलें राजकारण सांगितले. परंतु रघूजी पडला शिपाईगडी. त्यास पेशव्याचें राजकारण पटलें नाही व त्यानें बंगाल्यांत प्रवेश केला. मागाहून पेशवाहि **मुर्शिदाबादेस** जाऊन पोहोंचला व तेथें त्यानें अलिवर्दीखानाची भेट घेतली. बादशहाचे पत्राप्रमाणे पेशव्यास स्वारीखर्चाबद्दलची रक्कम देण्याचें अलिवर्दीने कबूल केलें.

**रघूजी** हा **कटवा** व **बरद्वान** या बाजूस गेला होता व तो **अलिवर्दीखान** व **पेशवा** यांच्या लष्करावर चालून येत होता. **अलिवर्दीखानानें** रघूजीवर चाल केली पण रघूजी हा त्यास झुकांडी देऊन मागें फिरला. मराठ्यांच्या चपळ घोडेस्वारांचा पाठलाग नबाबाकडून होणार नाहीं हें ओळखून पेशव्यानें दुसऱ्या रस्त्यानें जाऊन **रघूजीस** गांठलें व त्यावर हल्ला करून त्याचा पराभव केला[१] (इ. स. १७४३). **भास्करपंत** हाहि **रघूजी** भोंसल्याबरोबर या स्वारींत होता. तो **रघूजी** भोंसल्याच्या पिछाडीस असल्यामुळें रघूजीचा पराभव झाल्यानंतर तोहि मागें हटून ओरिसा प्रांतांत गेला. पेशवे व भोंसले यांचेंहि बंगाल्यांतच थोडेंबहुत समेटाचें बोलणें झालें. त्यावेळी मात्र **रघूजीनें** कबूल केलें कीं, मराठी साम्राज्याच्या दिल्लीच्या राजकारणाच्या दृष्टीनें पेशव्यानें बादशहाशीं चालविलेलें राजकारण मराठी

१ ही लढाई कोणत्या ठिकाणीं झाली हें कळत नाहीं.

राज्याच्या हिताचें आहे[१] व पेशव्याचेंच धोरण योग्य होतें. उलटपक्षीं पेशव्यानेंहि रघूजीस कबूल केलें कीं, इतःपर आपण सलोख्यानें वागूं व देशीं परत गेल्यानंतर शाहूराजाकडे जाऊन उभयतांच्या कार्यक्षेत्रांच्या मर्यादा ठरवून घेऊं. त्यानंतर **रघूजी** नागपुरास परत आला व **नानासाहेब** हा दिल्लीस आपलें राहिलेलें काम उरकण्याकरितां गेला. **भास्करपंत** हा ओरिसा प्रांतांत मागें राहिला होता तोहि मागाहून पेशव्याच्या मागोमाग बिहार प्रांतांतून नागपुरास परत आला.

बंगाल्यांतून **रघूजीचा** मोड करून **नानासाहेब** हा दिल्लीस **महमदशहा** बादशहाकडे गेला व **रघूजीच्या** बंगाल्यांतील मोहिमांनी जे राजकारण बिघडू पहात होतें तें त्यानें पूर्ण करून घेतलें. बादशहाने नानासाहेबास माळव्याच्या सुभेदारीची सनद दिली परंतु ती त्याचे नांवानें प्रत्यक्ष न देतां **शहाजादा महंमद** यास सुभेदार नेमून त्याचा नायब म्हणून पेशव्याने माळव्याच्या सुभेदारीचें काम करावें असें ठरलें. पेशव्यानें बारा हजार स्वारांचें पथक दिल्लीस बादशहाचे संरक्षणाकरितां ठेवावें, त्यापैकी आठ हजार स्वारांचा खर्च बादशहानें निराळा द्यावा असें ठरलें. पेशव्याने बादशहाशी केलेले ठराव पाळण्याकरितां **मल्हारराव होळकर**, **राणोजी शिंदे** व **पिलाजी जाधव** हे आपल्या तर्फेनें जामीनदार दिले. याप्रमाणें दिल्लीचें सर्व राजकारण मराठ्यांच्या हातीं आलें. यानंतर उत्तरेकडील बंदोबस्त करून नानासाहेब पुण्यास परत आला. **रघूजी** भोंसले व पेशवे यांच्या बंगाल्यांतील कटकटीची हकीकत **शाहू** राजास समजून त्यानेंहि उभयतांस साताऱ्यास बोलाविलेंच होतें. इ. स. १७४३ च्या सप्टेंबर महिन्याच्या आरंभी पेशवे व रघूजी भोंसले हे दोघेहि साताऱ्यास राहिले व **शाहूनें** त्यांचा समेट करून दिला. त्यांत शाहूने दोघाच्याहि हद्दी ठरवून दिल्या. त्यांत वऱ्हाडपासून कटक प्रांतापर्यंतचा सर्व मुलूख व बंगाल, बिहार व लखनौ एवढ्या भागांत पेशव्यानें ढवळाढवळ करूं नये व हे प्रांत भोंसल्यांच्या कार्यक्षेत्रांतील समजावे असें शाहूनें ठरवून दिले व अजमेर, आग्रा, प्रयाग व माळवा हे प्रांत पेशव्याचे म्हणून ठरवून दिले. याप्रमाणें बंगाल्यांतील खटपटीसंबंधानें भोसले व

१ ग्रँट् डफ भा. २ पा. १२.

पेशवे यांचा वाद मिटून रघूजीकडे तिकडील पूर्ण अधिकार आला.[१] बंगाल्यांत दिसून आलेली आपसांतील दुही ही मराठी साम्राज्याच्या एकंदर राजकारणांत फारच उणेपणाची गोष्ट झाली. याबद्दल बराचसा दोष रघूजीकडे येतो. पेशव्यानें मुख्य प्रधान या नात्यानें जें धोरण दिल्लीच्या बादशहाशीं लाविलें होतें त्याशी विसंगत वर्तन **रघूजीनें** करावयास नको होतें. निदान पेशव्यांचे व भोंसल्यांचे वकील एकमेकांकडे गेले त्यांत वरील राजकारणांचा खल झाल्यानंतर तरी **रघूजीनें** दिल्लीच्या राजकारणास जास्त महत्त्व देऊन बंगाल्यांतील राजकारण पेशव्यावर सोंपवावयाचें होतें. रघूजी भोंसल्यास शाहू राजानें ज्या प्रांतांच्या सनदा दिल्या त्यांत बंगालचा समावेश होत होता म्हणून रघूजी हा बंगाल हें आपलें कार्यक्षेत्र समजत असे ही गोष्ट खरी. परंतु वरप्रमाणें साम्राज्यांत एकसूत्रीपणा नसणें हा मराठ्यांच्या राज्यव्यवस्थेचा नेहमीचाच दोष होता. म्हणून वरील प्रकारांत कोणाचा दोष किती याची चिकित्सा करणें व्यर्थ होय.

शाहूनें वरप्रमाणें तडजोड करून दिल्यानंतर रघूजीस बंगाल्यांत पायबंद देण्यास कोणी उरलें नाहीं व त्यानें तें काम हातीं घेऊन तडीस लावलें.

---

## बंगाल्यावरील तिसरी स्वारी व भास्करपंताचा खून
### (इ. स. १७४४)

बंगाल्यांतील आपल्या पराभवाचें उणें भरून काढण्याची तळमळ **रघूजीस** लागलीच होती. इ. स. १७४४ चा पावसाळा संपतांच त्यानें आपला दिवाण **भास्करपंत** कोल्हटकर याचेबरोबर वीस हजार लष्कर देऊन त्यास बंगाल्यांत **अलिवर्दीखानावर** पाठविलें. भास्करपंत या वेळीं ओरिसाच्या मार्गानें बंगाल्यांत गेला. **अलिवर्दीखानानें**हि आपलें सैन्य तयार केलें. परंतु भास्करपंतापुढें आपला टिकाव लागेल असें त्यास वाटेना. शेवटी त्याचा सेनापति **मस्तफाखान** नांवाचा एक अफगाण

---

१ हा ठराव भाद्रपद व॥ ८ शके १६६५ (इ. ता. ३१-८-१७४३) चा असून भारतवर्ष वर्ष १-४६ ( ऐ. पत्र. ले. ३५-३६ ) मध्यें छापला आहे.

होता. त्यानें अलिवर्दीखानास असा सल्ला दिला कीं, मराठ्यांशीं लढून आपला निभाव लागणार नाही. तरी कपटविद्येचा प्रयोग केल्याशिवाय गत्यंतर नाही. **अलिवर्दीखानाला**हि हा विचार पसंत पडून उभयतांनी ठरविलें की, भास्करपंतांशी सल्ला करण्याचें बोलणें लावन त्यास मेज-वानीस बोलवावें व तो आला म्हणजे त्याचा खून करावा. नबाबाने हें काम **मुस्तफाखान** व **जानकीराम** नांवाचा त्याचा कारभारी होता, त्याचेकडे सोपविलें. **भास्करपंता**बरोबर **अलिकरवाल** नांवाचा सरदार होता. तो पूर्वीचा मराठा असून मुसलमान झालेला होता. त्याचे मार्फतीनें **मुस्तफा-खानानें भास्करपंताशीं** समेटाचें बोलणें लाविलें. कांही दिवस बोलणें चालल्यानंतर मुस्तफाखानानें नबाबातर्फे **भास्करपंतास** मेजवानीस बोला-विलें. नबाब अलिवर्दीखानानेहि **भास्करपंताच्या कटवा** येथील छावणी-जवळच तळ दिला व **भास्करपंतानें** नबाबाच्या डेऱ्यावर येण्याचा दिवस ठरविला. ठरलेल्या वेळीं **भास्करपंत** हा अलिभाई व दुसरे निवडक वीस सरदार घेऊन नबाबाचे भेटीस गेला. नबाबानें मोठा डेरा देऊन त्यांत भेटीची व्यवस्था केली होती. डेऱ्याचे तोंडाशी **मुस्तफाखान व जानकी-राम** हे स्वागत करण्याच्या तयारीनें उभे राहिले. स्वत: नबाब डेऱ्याच्या दारापर्यंत पुढे येऊन मंडळीस आंत घेऊन गेला व कांही वेळानें बाहेर निघून गेला. पूर्वसंकेताप्रमाणें नबाबाच्या लोकांनी तंबूचे तणावे कापून आंतील सर्व मराठे सरदारांस कापून काढलें. **भास्करपंत,**[१] अलिकरवाल व इतर वीस मराठे सरदार या दंग्यांत कापले गेले. **राघोजी गायकवाड**

१ मारलेल्या सरदारांची नांवें खालीं दिल्याप्रमाणें:—(१) भास्करपंत (२) अलिकरवाल (३) यशवंतराव गुजर (४) निळकंठराव मोहिते (५) दाजीबा भोंसले (६) बाबूजी महाडीक (७) शहामहमदखां (८) मानाजी भोंसले (९) नारायण भोंसले (१०) संभाजी भोसले (११) कृष्णराव निंबाळकर (१२) बापूजी कदम (१३) श्रीपतराव मेहेकर (१४) व्यंकटराव भाऊ (१५) दाजीबा पाटणकर (१६) बळवंतराव शिर्के (१७) गोविंदराव शेलकर (१८) सटवाजी जाधव (१९) शिवाजी जामदार (२०) सुभानजीराव (२१) नाना बक्षी (२२) जोतिबा कारभारी.
(बखरपा. ४३ टीप पहा.)

या नांवाचा एक सरदार फक्त तळावर राहिला होता. त्यास या दंग्याची हकीकत समजतांच तो व सर्व मराठे लष्कर घाबरून गेलें. **राघोजी** यानें सर्व सैन्य घेऊन नागपुराकडेस पळ काढला. रस्त्यांत त्याचेवर हल्ले होऊन त्यांपैकी पुष्कळ लोक मारले गेले व याप्रमाणें भास्करपंताच्या या मोहिमेचा शेवट झाला. भास्करपंत हा बंगाल्यांत मारला गेला तेव्हां त्याची बायको **ताईबाई** ही त्याचे बरोबर होती. ती त्या गडबडींत पळून[1] काही लोक बरोबर घेऊन काशीस गेली. ती त्या वेळीं गरोदर होती. तिला काशीसच एक पुत्र झाला. म्हणून त्याचें नांव **काशीराव** असें ठेवलें. तो पुढें मोठा होऊन प्रसिद्धीस आला. त्याचा पुत्र **रामचंद्र काशी** हाहि पुढें नागपूरच्या कारभारांत प्रसिद्धीस आला.

**भास्करराम** याचा बंधु **कोन्हेरराम** हा नागपुरास होता. नागपुरास हें वर्तमान समजतांच रघूजीनें कोन्हेररामाचें सांत्वन केलें व त्यास वंशपरंपरा दरसाल पंचवीस हजारांची नेमणूक करून दिली. तसेंच भास्करपंताची स्त्री **ताईबाई** इच्या नांवानें वऱ्हाडचे सुभ्याचा कारभार करून दिला व तिच्यातर्फे **कृष्णाजी गोविंद** यास कारभारी नेमले. तो बरींच वर्षें याप्रमाणें कारभार करीत होता.

भास्करपंतानें जातेवेळेस छत्तीसगड काबीज करून तेथें अंमल बसविला होता. यामुळें नागपुर व बंगाल यांमधील दुवा जुळला गेला व त्याचा पुढील स्वाऱ्यांत फार उपयोग झाला.

---

## बंगाल्यावर चौथी स्वारी (१७४८ ते १७५१)

**भास्कररामाच्या** खुनाचा सूड उगविण्याकरितां **रघूजी** संधि पहात होता. परतु इतर व्यवसायामुळें त्यास फुरसत सांपडली नाहीं. इ. स. १७४८ मध्यें ओरिसा प्रांतांत बंडाळी सुरू झाली. **मुस्तफाखान** यास अलिवर्दीखानानें ओरिसा प्रांतावर सुभेदार म्हणून ठेविलें होतें. त्यानें व इतर अफगाण

१ एका पठाणाच्या बायकोनें ताई हिला डोलींत घालून काशीस पोंचविलें अशीहि आख्यायिका आहे.

सरदारांनीं **अलिवर्दीखाना**विरुद्ध बंड करून मराठ्यांस मिळण्याचा धाक घातला. हें वर्तमान रघूजीचे कांहीं हेर गोसाव्याच्या वेषानें त्या प्रांतांत हिंडत होते त्यांनीं येऊन **रघूजीस** सांगितलें. ही संधि चांगली आहे असें पाहून **रघूजीनें** स्वतः **ओरीसा** प्रांतावर स्वारी केली. रघूजी बरोबर या खेपेस त्याचा मुलगा **जानोजी** व सरदार **तुळजोराम** व **मीरहबीब** हे होते. **रघूजीनें** प्रथम सर्व ओरीसा प्रांत हस्तगत केला व मग बंगाल्यावरहि स्वारी केली. पावसाळ्यांत मराठ्यांनीं बंगाल्यांतच तळ दिला. पावसाळ्यानंतर **अलिवर्दीनें** चांगली तयारी करून एका अंधाऱ्या रात्रीं रघूजीचे छावणीवर छापा घातला. मराठे बेसावध होते त्यामुळें त्यांना पळ काढावा लागला. मराठे जमवाजमव करून ओरीसा प्रांतांतच राहिले.[१]

इतक्यांत रघूजीस बातमी समजली कीं, नागपुराकडेस देवगडच्या संस्थानांत गोंधळ माजला आहे. त्यामुळें **रघूजी जानोजीस** ओरीसा प्रांतांत ठेवून आपण नागपुराकडेस परत आला. यानंतर **जानोजीनें** ओरीसा प्रांतावर **मीरहबीबाची** नेमणूक केली व तोहि नागपुराकडेस परत आला.

भास्करपंताचा खून झाल्यानंतर रघूजी भोंसल्यानें बंगाल्यावर स्वारी केली त्यावेळीं त्यानें ओरीसा प्रांत जिंकून घेतला व कटक येथें अलिवर्दीखानाचा सुभेदार **दुर्लभराम** नांवाचा होता त्यास कैद करून **नागपुरास** आणलें. हा **दुर्लभराम** अलिवर्दीखानाचा दिवाण **जानकीराम** याचा पुत्र होता. भास्करपंताचे खुनांत **जानकीराम** याचें आंग होतें म्हणून **रघूजीच्या** मनांत **जानकीरामा**विषयी सूडबुद्धि होतीच. दुर्लभराम याची सुटका करण्याकरितां **जानकीरामानें** पेशव्याच्या नागपुरच्या वकीलातर्फे पेशव्याचा दाब रघूजीवर घालण्याचीहि खटपट केली. परंतु वकीलानें पेशव्याचें व रघूजीचें सौजन्य नाहीं म्हणून खटपट करण्याचें नाकारलें.[२] शेवटीं **जानकीरामानें** तीन लक्ष रुपये **रघूजीस** देऊन दुर्लभरामाची सुटका करून घेतली.[३]

---

१ या वेळेस मराठ्यांनीं ओरीसा प्रांत जो आपल्या ताब्यांत घेतला तो कायमचाच आपल्या ताब्यांत ठेविला. तो इ. स. १८०३ पर्यंत त्यांचे ताब्यांत होता व देवगांवचे तहानें इंग्रजांकडेस आला.

२ पे द. भा. २० ले. ३७.

३ पे. द. भा. २० ले. ३७ बखर पान ४४.

तसेंच नानासाहेब पेशव्यानें बुंदेलखंडावर इ. स. १७४६ मध्यें स्वारी केली; त्यावेळीं त्याचेविरुद्ध रघूजी भोंसल्याकडून सैन्याची मदत मिळावी म्हणून बुंदेले राजांनी रघूजी भोंसल्याकडे **सुरतसिंग** नांवाचा वकील पाठविला१ होता. तो बारा लक्ष रुपये अगोदर व बारा लक्ष रुपये सैन्य आल्यानंतर देऊं, असा रघूजीशीं करार करूं लागला, परंतु रघूजीनें पेशव्याशी बिघाड करून घेण्याचें नाकारलें. इ. स. १७४४ मध्यें नानासाहेब पेशव्याचा व रघूजीचा मिलाफ शाहूराजानें करून दिल्यानंतर ते एकमेकांशी वचकूनच रहात होते हें वरील गोष्टीवरून दिसून येईल.[१]

**अलीवर्दीशीं तह इ.स. १७५१**—मीरहबीब हा मराठ्यांतर्फे ओरीसाचा सुभेदार होता त्यास **अलीवर्दीखानानें** त्रास दिल्यामुळें **रघूजीनें जानोजीस** पुन्हा ओरीसा प्रांतावर पाठविलें. **जानोजीनें** दोन वर्षे तवडेच राहून ओरीसा प्रांताचा पूर्ण बंदोबस्त केला व बंगाल्यावर स्वाऱ्या करून **अलीवर्दीखानास** इतकें त्रस्त करून सोडलें की, शेवटीं त्यानें भोंसल्याशी इ. स. १७५१ मध्यें तह केला. त्यांत बलसोर बंदरापर्यंत सर्व **कटक** प्रांत (ओरीसा) त्यानें भोंसल्यास दिला. **सुवर्णरेखा** नदी ही उभयतांची सरहद्द ठरली. याशिवाय बंगाल व बिहार यांच्या चौथाईबद्दल नबाबानें रघूजीस दरसाल १२ लाख रुपये देण्याचें कबूल केलें याप्रमाणें ओरीसा प्रांत कायदेशीर रीतीनें मराठ्यांच्या ताब्यांत आला. [२]

**देवगड संस्थान खालसा**:—देवगड संस्थानांत रघूजी भोंसल्यानें पूर्वी बंदोबस्त केला होता व बखतबुलंद याचे नातू **अकबरशहा** व **बुऱ्हाणशहा** यांस गादीवर बसविलें होतें. परंतु तेथील दिवाण **रघुनाथसिंग** यानें मराठ्यांची चौथाई देण्याचें बंद करून **चंद्रपुरच्या** गोंडराजाशी मिलाफ करून मराठ्यांचा अंमल झुगारून दिला. रघूजी हा बंगाल्यांतून नागपुरास परत येतांच त्यानें **रघुनाथसिंगावर** स्वारी करून त्याचा मोड केला, व पाटणसावंगी येथें गोंडाचा मोड करून कैक गोंडांस पेवांत घालून मारलें. त्यानंतर रघूजीनें देवगडच्या बुऱ्हाणशहास नागपुरास आणून ठेविलें व

---

१ पे. द. भा. २० ले. ३७ व ४०.

२ ओरीसांतील मराठी कारभाराची हकीकत पुढें स्वतंत्र भागांत दिली आहे. (भाग १० पाहा).

त्याच्या खर्चाकरितां रतनपुर सुभ्याचें उत्पन्न लावून दिलें. बुराणशहाचे वंशज आतांपर्यंत नागपुर येथें पेन्शन घेऊन आहेत. त्यांस किल्लेवाले अथवा गोंडराजे म्हणून म्हणतात. रघूजीनें देवगड संस्थान खालसा करून आपल्या राज्यास जोडलें. बुराणशहाचा भाऊ **अकबरशहा** हा निजामाकडेस पळून गेला व तिकडेच मरण पावला.[१] (देवगडच्या राजांचा वंशवृक्ष पुरवणी पहा)

**चंद्रपूर संस्थान खालसाः—चंद्रपुरच्या** संस्थानावर **निळकंठशहा** नांवाचा गोंड राजा रघूजीचा मांडलिक होता. चंद्रपुरास रघूजीचा सुभेदार **शिवाजीपंत टाळकुटे** नांवाचा होता व चंद्रपुरचा किल्लाहि मराठ्यांचे ताब्यांत होता. **निळकंठशहानें** माणसें जमवून किल्ला ताब्यांत घेतला व **शिवाजीपंतास** हाकून लाविलें. **रघूजी** भोंसल्यानें चंद्रपुरावर स्वारी करून **निळकंठशहाचा** मोड केला व चंद्रपुरास **कृष्णाजी नारायण** (कऱ्हाडे ब्राह्मण) यास सुभेदार नेमलें. चंद्रपुराहून तीन कोसांवर वर्धा नदीच्या कांठीं **बल्लाळपुर** नांवाचें ठिकाण आहे तें निळकंठशहास दिलें. हल्लीं निळकंठशहाचे वंशज चंद्रपुरास असून त्यांनाहि पेन्शन मिळत आहे.[२] (चंद्रपुरच्या राजांचा वंशवृक्ष पुरवणी पहा).

**नरनाळा, गाविलगड, माणिक दुर्ग घेतलेः**—याच सुमारास पेशवे व निजाम यांचेमध्यें लढाई सुरू झाली. ही संधि साधून रघूजीनें वऱ्हाडांतील निजामाच्या ताब्यांतील **नरनाळा** व **गाविलगड** हे किल्ले व माहूरचे दक्षिणेकडील **माणिकदुर्ग** हा किल्ला व वरील किल्ल्यांखालील प्रदेश हे काबीज केले. गाविलगड हें ठाणें भोंसल्यांनीं आपलें बंदोबस्ताचें ठिकाण केलें व संकटाचे प्रसंगीं भोंसले हे गाविलगडास आपले कुटुंबांतील माणसें व जडजवाहीर ठेवीत असत.

**छत्तीसगड घेतलें—छत्तीसगड** हा प्रांत नागपुरचें राज्य व बंगाल यांचेमध्यें असून **रघूजीच्या** बंगाल्यावरील स्वाऱ्यांस जातांना छत्तीसगडांमधून जावें लागत असे; म्हणून छत्तीसगड प्रांतांत अंमल बसविणें

---

१ रघूजीनें आपल्या हस्तकाकडून त्यास खाण्याचे पदार्थांत विष घालून मारविलें असाहि प्रवाद त्यावेळीं होता. (बखर पा. ४१)

२ चंद्रपुरच्या दक्षिणेस बल्लारशहा हें रेल्वेस्टेशनचें गांव असून तेथें एक मोठी कोळशाची खाण आहे.

फार अवश्य होतें. तेथें रायपुर, रतनपुर व बिलासपुर वगैरे ठिकाणी लहान लहान रजपूत राज्यें होतीं. **भास्करराम** यानें बंगाल्यावर पहिली स्वारी केली त्याच वेळीं त्यानें रतनपुरावर चाल करून किल्ला सर केला व तेथील **रघुनाथसिंग** राजास तेथलें राज्य देऊन त्यास आपला मांडलिक केलें. दुसरे स्वारीचे वेळीं रघूजी छत्तीसगडांतून गेला त्यावेळीं त्यानें **मोहनसिंग**[1] **भोंसले** यास बंदोबस्तास ठेविलें. इ. स. १७४५ चे सुमारास **रायपुर** व **संबळपुर** हीं ठाणीं घेऊन सर्व छत्तिसगड भोंसल्यांच्या ताब्यांत आला. तेथील सर्व संस्थानें कांहीं खंडणी देण्याचें कबूल करून मांडलिक म्हणून राहिलीं. छत्तीसगडांत भोंसल्यांचा एक सुभेदार रहात असून तें या राज्याचें एक महत्त्वाचें ठाणें होतें. हल्लीहि छत्तीसगडांत अनेक लहान लहान संस्थानें इंग्रज सरकारचे मांडलिक म्हणून आहेत. परंतु त्यांचेकरितां पुढें स्वतंत्र एजंट नेमण्याचें ठरलें आहे. त्यामुळें पुढें त्यांचा मध्यप्रांताशी कांहीं संबंध रहाणार नाही.

**गढा-मंडला**--उत्तर हिंदुस्थानांत आपला जम बसविण्याचें काम बाजीराव पेशव्यानें सुरू केलें होतें. त्या वेळेपासून उत्तर हिंदुस्थान हें आपले कार्यक्षेत्र आहे असें पेशवे समजत. बाजीरावानें **छत्रसाल** राजापासून बुंदेलखंडांत मुलूख संपादन करून तेथें आपलें ठाणें बसविलें होतें. तसेंच भोपाळ येथें निजामाचा पराभव करून माळवा प्रांतांतहि त्यानें आपलें ठाणें दिलें होतें. उत्तर हिंदुस्थानांत हळुहळू आपल्या राज्याचा प्रसार करण्याचा हा उपक्रम बाजीरावानें केला होता. त्याचप्रमाणें आपणहि उत्तर हिंदुस्थानांत आपले हातपाय पसरावे या हेतूनें **रघूजीनेंहि** उत्तर हिंदुस्थानांत स्वारी करून नर्मदेच्या कांठचे **गढा-मंडला** प्रांत जिंकून घेतले. रघूजीच्या देवगड वगैरे भागास हे प्रांत लागून असल्यामुळें त्यासहि पेशव्याप्रमाणेंच हे प्रांत आपल्या ताब्यांत असण्याची जरूरी वाटत होती. गढा हें ठिकाण हल्लींच्या जबलपुराजवळ असून त्यास लागून सागर, झांशी वगैरे पेशव्यांचा बुंदेलखंडांतील प्रदेश होता. त्यामुळें **गढा-मंडला** या प्रदेशाबद्दल पेशवे व भोंसले त्यांच्यामध्यें अनेक

१ रघूजीचा लेकवळा.

झटापटी व तहनामे झाले व अखेरीस हा प्रदेश भोंसल्यांना कायमचा मिळाला.

इ. स. १७४३ मध्यें नानासाहेब पेशवा उत्तर हिंदुस्थानांत गेला त्यावेळेस त्यानें गढा–मंडला हे जिंकून आपल्या ताब्यांत घेतले. पुढें रघजी व पेशवे यांचा आपसांत तह झाल्यामुळें पेशव्यानें **गढा–मंडला** हे प्रांत रघूजी भोंसल्यास देण्याचें कबूल केलें ( इ स. १७४४ ). परंतु पेशव्याचे तेथील अमलदारांनी भोंसल्याचे अंमलदारांस ताबा दिला नाही. रघूजी भोंसल्यानें **नारायण बाबूराव वैद्य** [१] यास याबद्दल लिहिलेलें एक पत्र [२] उपलब्ध आहे त्यात तो म्हणतो. " राजश्री **विठल बल्लाळ** [३] सुभेदार मंडळेप्रांतीं आहेत. त्यास त्याचे जाणे नर्मदा उतरून गढयास जाहले. तेथें राजश्री **विश्वासराव मोरेश्वर** [४] ठाण्यांत होते ते काबूत आले. तेव्हां त्याजपासून किल्लयाच्या व ठाण्याच्या व प्रांतांच्या सोड-चिठया घ्याव्या हे होते. परंतु मशारनिलेनी आपले जागा आंदेशा केला कीं आपला जाबसाल सनदी आहे तेव्हां याजला अटकावून याप्रो। घ्यावयाचे कारण नाही. हे समजोन अटकाव न केला. ते तेथून निघोन गेलियावर जमाव गोळा करून जागा जागा प्रांतात उपद्रव देऊन आहेत व जे जे जमीदार प्रांतात आहे याजलाही पत्रे पाठविली आहेत व गावखेडी व परगणे लेहून दिल्हे व देतात यैसा बखेडा करून आहेत. कटंगी म्हणून जागा आहे तेथें इकडील जमाव होता तेथें बुंधेले यानी जमाव करून चालून गेले, कटकट केली, तेव्हा दोन तीनदा नामोहरम होऊन **तेजगडास** वीस कोस पाठीमागे गेले. यैसेही असून राजश्री **विठल बलाल** सुभेदार याजकडेस वरचेवरी सांगोन पाठवितात व पत्रेंही लिहिली आहेत कीं, सनदी जावसाल आहे. हे समजोन आमची चाल

१ हे वैद्य वाईचे राहणारे असून त्यांनीं तीन पिढया पेशवे व भोंसले यांचे दरम्यान वकीली केली. त्यांचे वंशज हल्लीं वाईस रहात असून पुण्यासहि त्यांचा वाडा आहे. त्यांचा वंश–वृक्ष पुरवणी पहा.

२ पे. द. भा. २० ले. ३३.

३ भोसल्यांचा सरदार. उपनांव परांजपे.

४ पेशव्याचा कारभारी.

धारणा असे. तेव्हा तुम्हाकडूनहि तैसेच घडावे. सनदी जाबसालास कटकटीचे कारण नाही परंतु त्याची चाल आहे तीच आहे. याजकरिता येविसी तुम्ही राजश्री पंतप्रधान यासी बोलून रा। **आपाजी रघुनाथ** व हुजरे पत्रासुधा जलदीनें रवाना करून देवावे आणि कारभाराही पत्रे जावी कीं कटकटीचे कारण नाही."

गढा-मंडल्यासंबंधाचा उल्लेख पेशवे व भोंसले यांजमध्यें झालेल्या बहुतेक तहनाम्यांत दिसून येतो. त्याचें वर्णन पुढें योग्य प्रसंगीं येईल.

**रघूजीचा राज्यविस्तार**—रघूजीनें आपल्या हयातींत **वऱ्हाडा**पासून तों पूर्वेस **कटक**पावेतों व **गढामंडल्या**पासून तों दक्षिणेस **चंद्रपुरा**पर्यंत आपल्या राज्याचा विस्तार केला. एका पुरुषाच्या हयातीत एवढा राज्य-विस्तार क्वचित्‌च झाला असेल. या मुलुखापैकीं वऱ्हाडांत भोंसल्यांचा अंमल पूर्ण नव्हता. दक्षिणेचा सुभेदार या नात्यानें वऱ्हाडावर हुकमत निजामाची चाले व त्यावर मराठ्यांच्या चौथाई, सरदेशमुखी वगैरे हक्कांबद्दल वसुली भोंसले करीत. दोघांचेहि अधिकारी वऱ्हाडांत राहून जो जास्त जबरदस्त असेल त्याचा अंमल चाले. पुढें निजामाशीं भोंसल्यांचा तह होऊन एकंदर वसुलापैकीं भोंसल्यानें शेंकडा ६० व निजामानें शेंकडा ४० याप्रमाणें उत्पन्न घ्यावें असें ठरलें. याप्रमाणें वऱ्हाडावर दोन्ही पक्षांची सत्ता चालत होती म्हणून वऱ्हाडास "दोअमली मुलूख" असें म्हणत.

बाकीचा सर्व प्रदेश भोंसल्यांच्या पूर्ण अमलाखालीं असून छत्रपतीच्या सनदेप्रमाणें व पेशव्याशीं होणाऱ्या निरनिराळ्या करारनाम्यांप्रमाणें खंडणी अगर फौज देण्याच्या शर्तीवर भोंसल्यांकडे असे. **कटक**प्रांतावर रघूजीनें **शिवभट साठे** नांवाचा सुभेदार नेमला होता व तो बरेच दिवस तेथें राहून बंगाल्यांतील राजकारण चालवीत असे. छत्तीसगडांत **संबळपुरचें** संस्थान मांडलिक म्हणून कायम ठेवून **रायपुर** व **रतनपुर** हीं संस्थानें रघूजीनें खालसा केलीं व तेथें आपला एक सुभेदार ठेवला. तसेंच दक्षिणेस **चंद्रपुरासहि** एक सुभेदार नेमून तो एक सुभा केला. उत्तरेस **देवगडा-पासून** नर्मदाकांठापर्यंत एक निराळा सुभा करण्यांत आला. याशिवाय **बंगाल** व **बिहार** या प्रांतांच्या चौथाईबद्दल दरसाल १२ लाख रुपये

घेण्याचा करार **अलिवर्दीखानाशीं** इ. स. १७५१ मध्यें झालाच होता. वऱ्हाडांतील **गाविलगड** व **नरनाळा**, त्याचप्रमाणें माहूर पट्टींतील **माणिकदुर्गचा** किल्ला व तिन्ही किल्ल्यांखालचा प्रदेश हा स्वतंत्रपणें भोंसल्यांच्या ताब्यांत होता.

**रघूजीचा मृत्यु**—याप्रमाणें ऐश्वर्याच्या ऐन भरांत असतां **रघूजी** भोंसले याचा अंत नागपुरास फाल्गुन शु॥ ३ शके १६७६ शुक्रवारीं झाला. (इ. ता. १४-२-१७५५).[१] रघूजीस पोटदुखीचा आजार झाला होता. त्याच्या स्त्रियांपैकीं सहा स्त्रिया[२] त्याच्या बरोबर सती गेल्या. रघजीची समाधि नागपुरास भोंसल्यांच्या स्मशानभूमींत आहे. रघूजीस "बाबासाहेब" असें म्हणत असत. मृत्युसमयीं रघूजीचें वय ६० च्या वर होतें.

रघूजीनें मरणापूर्वीं **कोन्हेरराम** कोल्हटकर यास नागपुरास बोलाविलें होतें. दोघांचाहि फार ऋणानुबंध असून शेवटचे प्रसंगीं त्यानें जवळ असावें असी रघूजीची फार इच्छा होती. परंतु वृद्धपणामुळें व भास्करपंताच्या शोकामुळें तो नागपुराहून गेला तो परत आला नाहीं. परंतु त्यानें आपला पुत्र **बाबूराव** यास नागपुरास पाठविलें. मृत्यूचे पूर्वीं जानोजी व बाबूराव यांस रघूजीनें पुढील सर्व व्यवस्था सांगितली होती.

**रघूजीचें स्वभाववर्णन व गुणदोष—रघूजी** भोंसले हा त्या वेळच्या मराठे सरदारांत अत्यंत शूर होता. कर्नाटक व बंगाल या लांबलांबच्या

---

१ पे. द. भा. २० ले. ८०. नागपुरकरांचे छापील बखरीत शके १६७४ असा दिला आहे तो चूक आहे. छापील बखरीच्या प्रस्तावनेंतील पांच नंबरची हस्तलिखित बखर हल्लींच्या लेखकाजवळ आहे तींत मात्र शक व मिति बरोबर दिली आहे.

२ पे. द. भा. २० ले. ८१. किंकेड व पारसनीस भा. ३ पान ३५ मध्यें रघूजी हगवणीनें मृत्यु पावला व त्याचेबरोबर त्याच्या तेराहि स्त्रिया सती गेल्या असें म्हटलें आहे. ग्रँन्ट डफ हा रघूजीचा मृत्युकाळ मार्च १७५३ मध्यें झाला असें म्हणतो तें अर्थात् चूक आहे. वर दिलेली मृत्युतिथि त्या वेळच्या पेशव्यांच्या अस्सल पत्रावरून दिली असल्यामुळें पूर्णपणें विश्वसनीय आहे.

प्रांतांतील स्वाऱ्यांमधील त्याची धडाडी त्याचप्रमाणें नागपुरच्या भोंवतालीं त्यानें जिकलेलीं ठाणीं व राज्याचा बंदोबस्त हीं पाहिलीं म्हणजे त्याच्या कर्तृत्वाची जाणीव होते. नागपुरकर भोंसल्यांचे घराण्यांत याचेसारखा कर्तृत्ववान् पुरुष दुसरा झाला नाहीं. शिपाईगिरी हा रघूजीचा मुख्य गुण होता व त्याच मानानें तो मोकळ्या मनाचा व दिलदार मनुष्य होता. त्याचे संबंधानें वर्णन सांपडतें कीं, "रघोजीबुवा शिपाई दोस्त एक पैसा जवळ न ठेवितां तमाम खर्च फौजास देऊन फौजेस रजावंतीनें ठेवीत होते व अडचणीचे प्रसंगास कोणासहि शब्द टाकिल्यास माघारे घेत नव्हता. व कूच मुक्काम कोणासच कळवू नये. हरवख्त म्हणत असावे 'जे राम करील ते खरे' जवामर्दी जातीनी करावी. ऐशाराम बिल्कूल नाही. घोड्यावरच भाकर खावी, "[१]

रघूजीच्या स्वभावांत मानीपणा व स्वतंत्र वागण्याची प्रवृत्ति ही जास्त होती. दुसऱ्याच्या ताब्यांत राहणें हें त्यास आवडत नसे. कर्नाटकच्या स्वारींत फत्तेसिंग भोंसल्याच्या मदतीस म्हणून शाहूनें रघूजीस पाठविलें. परंतु तेथें गेल्यावर रघूजीनें फत्तेसिंगास मागें टाकून सर्व अधिकार आपणच बळकाविला व धडाडीनें स्वतःच सर्व मोहीम चालविली. भोपाळ येथें बाजीरावाच्या मदतीस जाण्याकरितां शाहूनें रघूजीस हुकूम केला असतांनासुद्धां व पेशवा मोहिमेस निघाला तेव्हां त्यास सैन्याची मदत करण्याचा करार असतांनासुद्धां रघूजीनें हुकूम न मानतां बाजीरावास मदत केली नाहीं व उलट आपणच उत्तर हिंदुस्थानांत स्वतंत्र मोहीम केली. बंगाल्यामधील स्वाऱ्यांतहि त्याची हीच स्वतंत्र वृत्ति दिसून येते.

रघूजी हा छत्रपतीकडे ठरलेली खंडणी केव्हांच पाठवीत नसे. त्याबद्दल सक्त तगाद्याचीं व रागाचीं अनेक पत्रें उपलब्ध आहेत. त्यावेळच्या पुष्कळ सरदारांप्रमाणें रघूजीसहि दारू पिण्याची संवय होती असें दिसतें. परंतु ती त्याच्या कर्तृत्वाच्या आड आली नाहीं. पाँडेचरीचा फरेंच गव्हर्नर **डुमास** याजकडून रघूजीनें दारूच्या बाटल्या मागविल्याचा उल्लेख मागें

१ बखर पा. ३८.

आलाच आहे. शाहूराजानेंहि एका रागाचे प्रसंगीं "दारूपायीं राज्य बुडविलें" असे उद्गार रघूजीसंबंधानें काढले आहेत.[१]

**रघूजी** हा धार्मिक असून मोठा रामभक्त होता. **रामाजीपंत** कोल्हटकर याचे प्रसादाची आठवण ठेवून त्या घराण्याविषयीची आदरबुद्धि त्यानें अखेरपर्यंत ठेविली. भोंसल्यांचें कुलदैवत मूळचें महादेवाचें; पण रघूजीपासून विशेषेंकरून रामचंद्राची उपासना या घराण्यांत सुरू झाली. **रामटेक** येथें हल्लींच्या रामचंद्राच्या मूर्ति रघूजीनें नवीन स्थापन करून त्या पुरातन क्षेत्राचें महत्त्व वाढविलें. भोंसल्यांच्या पत्रव्यवहारांत मथळयावर '**सीताकांत**' असा मायना असे हेंहि त्या रामभक्तीचेंच द्योतक होय. साधुसंतांचाहि तो नेहमीं सत्कार करीत असे. भंडाऱ्याचे देवबाबा रामदासी व पिराशा मुसलमान साधु यांचेविषयीं वर्णन मागें आलेंच आहे.

रघूजी कर्नाटकच्या मोहिमेस गेला असतांना एका साधूनें रघूजीस रामचंद्राची मूर्ति प्रसाद म्हणून दिली होती. त्या वेळेपासून रघूजीने शाहूराजाची परवानगी घेऊन रामचंद्राच्या नांवानें भगवा झेंडा सुरू केला व शाहूनें जरीपटका तयार करून रघूजीस दिला. तेव्हांपासून भगवा झेंडा व जरीपटका भोंसल्यांच्या लष्करांत चालू झाला.[२]

## रघूजीची जन्मकुंडली




(भारत इति. सं. मंडळ, पुणें. वार्षिक अहवाल शके १८३२, पा. ८७ वरून)

रघूजीच्या वेळचे मंडळींत **रघूजी करांडे, भास्करराम, तुळजोपंत,**

१ सरदेसाई मध्यविभाग. २ पान ४८ पहा.

२ ना. कागदपत्र ले. ८ ऐ. प. ले. ७.

**नरोजी जाचक, रखमाजी गणेश प्रभू, कृष्णाजी** आटोळे,[१] आनंदराव वाघ, बिंबाजी वंजाळ, गिरमाजी खंडेराव, **शिवाजी केशव** टाळकुटे, **विठल बल्लाळ** परांजपे वगैरे सरदार प्रमुख होते व त्यांनीं रघूजीस राज्यविस्ताराच्या कामांत फार मदत केली.

रघूजी भोंसल्याचा व बाजीराव पेशव्याचा बिघाड होऊन तो नानासाहेबाच्या वेळेस ज्यास्तच वाढला. परंतु शाहूराजानें त्यांचा तंटा मिटवून मिलाफ करून दिल्यानंतर दोघांनीं तो सलोखा कायमच ठेविला. रघूजीच्या मृत्यूचें वर्तमान समजलें तेव्हां नानासाहेब पेशव्यानें एक पत्र लिहिलें आहे. त्यांत तो म्हणतो, "(रघूजी भोंसले) मातबर सरदार होते. वाईट गोष्ट जाहली. होणार ईश्वर इच्छा प्रमाण. **अलीकडे आमचे कामाचे फार होत** "[२] तसेंच रघूजीचेहि उद्गार नानासाहेबास पुढील प्रमाणें आहेत, " पूर्वी श्रीमंतराऊ कैलासवासी (बाजीराव) यांची आम्हांवर कृपा होती. आवजी कवडे वऱ्हाड प्रांते आलीयावर त्याचे व आमचे कटाक्ष जालियावर मग अवकृपा झाली. सर्व गोष्टी मागील आम्हांस माफ करून पदरीं घ्यावें. "[३]

**रघूजीच्या वेळचे सरदार व मुत्सद्दी:**— रघूजीबरोबर व त्यानंतर सातार्‍याच्या बाजूकडून पुष्कळ पराक्रमी सरदार व कर्तृत्वान् मुत्सद्दी नागपुरास आले. त्यांचेपैकी बहुतेकांचे वंशज नागपुरास आहेत. (बखर पान ३३–३४).

## सरदार

**मराठे**—

१ रघूजी करांडे, २ आनंदराव वाघ, ३ बाबाजी घाडगे झुजारराव, ४ संभाजी शिरके, ५ जानराव गुजर, ६ नऱ्होजी जाचक, ७ गिरमाजी खंडेराव, ८ बिंबाजी वंजाळ, ९ त्रिंबकजी गव्हाणे.

---

१ बखरीत व इतर लेखांत यास आठवले असें म्हटलें आहे त्यावरून घराणें ब्राम्हण असावें असा भास होतो. परंतु हे ब्राम्हण नसून मराठे सरदार होते.

२ पे. द. भा. २० पा. ६८

३ पे. द. भा. २० पा. ३०

ब्राम्हण--

सरदार-१ तुळजोराम, २ भास्करराम कोल्हटकर, ३ शिवाजी केशव टाळकुटे.

मुत्सद्दी-१ कान्हेरराम कोल्हटकर, २ व्यंकाजी व राघो बक्षी ३ रघुनाथभट झिपरे पटवर्धन (शिवकेनवीस).

प्रभु--

सरदार-१ काशीराव लक्ष्मण, २ दिनकर विनायक, शिवाजी विनायक व उमाजी विनायक बंधु.

मुत्सद्दी-१ रखमाजी गणेश (चिटणीस).

२ नरसिंगराव तिमाजी (चिटणिसाचे हाताखाली).

३ यशवंतराव पोतनीस.

४ महादजीपंत फडणीस.

५ विश्वंभर वैद्य.

---

## भाग ४-पुरवणी

## महाराष्ट्र-पुराण

नागपुरकर भोंसल्यांनी बंगाल्यावर ज्या मोहिमा केल्या त्याचें तपशीलवार तत्कालीन वर्णन फारसें उपलब्ध नाहीं. मराठ्यांच्या धाकानें कलकत्त्यास त्या वेळच्या इंग्रजांनीं मराठा डिच म्हणून जो खंदक खणला होता त्यावरून मराठ्यांचा दरारा बंगाल्यांत किती होता हें दिसून येईल. मराठ्यांच्या स्वारीचें एक पुराणवजा वर्णन '**महाराष्ट्र-पुराण**' या नांवानें **गंगाराम** नांवाच्या मनुष्यानें इ. स. १७५१ मध्यें बंगाली भाषेंत लिहिलेलें हल्ली प्रसिद्ध झालें आहे.[१] **गंगाराम** हा बंगाल्यांतील **मैमनसिंग** येथील राहणारा असून तो या वर्णनाचे वेळी बंगाल्याची राजधानी **मुर्शिदाबाद** येथें हजर होता. त्यानें वर्णन केलेल्या बहुतेक गोष्टी कांहीं पाहिलेल्या व

---

१ याचें इंग्रजी भाषांतर टीपांसहित प्रो. जे. एन. समद्दर यांनी Bengal Past and Present मध्यें प्रसिद्ध केलें आहे.

कांही विश्वसनीय रीतीनें ऐकिलेल्या अशा लिहिल्या आहेत. या महाराष्ट्र-पुराणाचा फक्त पहिला अध्याय उपलब्ध असून त्यांत **भास्करपंताच्या** खुनापर्यंत हकीकत आली आहे. त्यांत इ. स. १७४३ मध्यें **भास्करपंतानें** बंगाल्यावर केलेल्या स्वारीचें वर्णन दिलें आहे. त्याचा सारांश खाली दिला आहे.

' पृथ्वीवर पाप अतिशय झाल्यामुळें **पृथ्वीला** तो भार सहन न होऊन तो **ब्रम्हदेवाकडे** गेली व त्यास तिनें आपल्या दुःखाचें कारण सांगितलें. ब्रम्ह-देवानें तिला संहारकर्त्या **महादेवाकडे** नेलें व त्याची प्रार्थना करून दुष्टांचा संहार करून पृथ्वीचा भार हलका करण्याविषयीं प्रार्थना केली. **महादेवानें** तें मान्य करून आपल्या नंदीस आज्ञा केली की, तू दक्षिण देशांत जाऊन तेथें **शाहूराजाच्या** शरीरांत संचार कर व त्याचेकडून दुष्टांचा संहार करून पृथ्वीचा भार हलका कर. **नंदीनें** जाऊन त्याप्रमाणें **शाहू** राजाच्या शरीरांत संचार केला.

**शाहूनें रघूराजास** [१] विचारलें कीं, बंगाल्यांतील चौथाईची रक्कम अलीकडे बरेच दिवसांत आली नाहीं याचें कारण काय? बादशहाकडे या-बद्दल पत्र पाठवा. **रघूराजानें** त्याप्रमाणें पत्र लिहून बादशहाकडे वकील पाठविला. बादशहानें तें पत्र वाचून जबाब दिला की, बंगालचा सुभेदार हा फार प्रबळ होऊन माझेंहि ऐकेनासा झाला आहे व माझीहि रक्कम या दोन वर्षांत त्यानें मला दिली नाहीं. मजजवळ सैन्य नसल्यामुळें मला त्याचेवर स्वारीहि करितां येत नाहीं. **शाहूनें** तें पत्र वाचून **रघूजीस** बंगाल्यावर स्वारी करून चौथ वसूल करण्यास सांगितलें. **रघूजीनें भास्करपंतास** बंगाल्यावर पाठविलें. **भास्करपंतानें** सैन्य जमा करून साताऱ्याहून कूच केलें. **विजापुरास** येऊन त्यानें एक दिवस मुक्काम केला व मजल दर-मजल तो **नागपुरास** आला. नागपुराहून बंगाल्याकडेस निघून **तो पंचकोटास** आला. तेथून त्यानें नबाब (अलिवर्दीखान) कोठें आहे **याचा** तपास केला. तेव्हां तो **बरद्वान** येथें असल्याचें त्यास समजलें. भास्कर-पंतानें रात्रीं कूच करून **वीरभूमचे** उजवीकडून **गवळाभूई** या ठिकाणाहून पुढें जाऊन **बरद्वान** शहरास वेढा दिला. सकाळीस **राजाराम** नांवाच्या

१ पहिला रघूजी भोंसले.

नबाबाच्या हस्तकानें नबाबास बातमी दिली कीं, **भास्करपंताचे** हाताखालीं चोवीस सरदार व चाळीस हजार लष्कर चौथ वसूल करण्याकरितां आलें आहे. नबाबानें भास्करपंताकडेस वकील पाठवून कळविलें कीं, **पूर्वीचा** सुभेदार **सुजाखान** याचे वेळेपासून वहिवाट आहे की, सुभ्याचें उत्पन्न सुभेदारानें दिल्लीस बादशहाकडे पाठवावें व बादशहानें मराठ्यांची चौथ त्यांतून द्यावी. त्याप्रमाणें आम्ही बादशहाकडे सुभ्याचें उत्पन्न पाठवीत असतों. तुम्हीं बादशहाकडून रक्कम घ्यावी. **भास्करपंतानें** निरोप पाठविला कीं, तुम्ही प्रांत बळकावून बसून बादशहासहि रक्कम पाठवीत नाही व आम्हांसहि देत नाहीं. तर आम्ही तुमचेपासून चौथ वसूल करूं. मग नबाबानें बादशहाकडून आपणास अद्याप सुभेदारीच्या सनदा मिळाल्या नाहींत म्हणून आपण रक्कम पाठविली नाहीं असें दुसरें निमित्त सांगितलें. परंतु **भास्करपंतानें** निर्वाणीचा निरोप पाठविला कीं, चौथाईची रक्कम न आल्यास आपण युद्ध सुरू करूं. नबाबानेंहि आपलेकडून युद्धाची तयारी केली व चौथ देण्याचें नाकारिलें. **भास्करपंतानें** कांहीं सैन्य आपले जवळ ठेवून बाकीच्या सरदारांस नबाबाच्या प्रांतांत शिरून लुटालूट करण्यास पाठविलें. त्याप्रमाणें दहा सरदार प्रांतांत लुटालूट करण्यास गेले व चौदा सरदार भास्करपंताजवळ राहिले.[१]

भास्करपंतानें सात दिवस **वरद्वान** शहरास वेढा घालून सर्व रसद बंद केली. शहरांत सर्वत्र महागाई झाली व खाण्यास न मिळाल्यामुळें लोक उपाशी मरूं लागले. आंतील लोक अन्नसामुग्री संपल्यामुळें केळीचे कद सुद्धां उकडून खाऊं लागले. याप्रमाणें चौदा दिवस गेले. शेवटीं नबाबाचा सेनापति **मुस्तफाखान** यानें बाहेर पडून बारगी[२] लोकांवर हल्ला केला. व त्यांना फेंटाळून लाविलें. परंतु पुन्हा हजारों स्वार 'हरहर' अशी गर्जना करीत मुस्तफाखानाच्या पाठीमागें आले. **मीरहबीब** हा मुस्तफाखानाच्या लष्कराच्या पिछाडीस होता तो बारगी लोकांच्या हातीं सांपडून

१ या सर्व २४ सरदारांचीं नांवें दिली आहेत परंतु त्यांपैकीं कांहीं नांवें बखरींतील नांवांशीं जुळत नाहींत.

२ मराठे घोडेस्वारास बारगीर असें म्हणतात. त्यावरून सर्वच मराठे लष्करास बंगाल्यांत बारगी, बरगी असें नांव पडलें.

त्यांनाच मिळाला.[१] पिछाडीच्या बारगी लोकांनीं मुस्तफाखानाच्या सैन्याची लूट केली व त्याचे हत्ती, घोडे, तंबू वगैरे सर्व सामान लुटलें. नंतर मराठे **निकुलसराई** येथें गेले व **मुसाहिबखान** नांवाचा नबाबाचा सरदार तेथें होता त्यास त्यांनी लुटलें. यानंतर नबाब पळून कटवा येथें गेला. नबाबाचा भाऊ **हाजी** यानें नावांमधून त्यास धान्य वगैरे पाठविलें व त्यामुळें त्यांचा बचाव झाला. **मुस्तफाखानाचे** हल्ल्यांत जी गडबड उडाली तींत नबाब **बरद्वानहून** पळून निसटला ही गोष्ट भास्करपंताचे मनास फार लागली.

मराठ्यांनीं सर्व बंगालभर लूटमार सुरू केली. जिकडेतिकडे पळापळ झाली. शास्त्री, पंडित आपल्या पोथ्या घेऊन जिकडे वाट सांपडेल तिकडे पळू लागले. वाणी, उदमी, कारागीर आपापली निर्वाहाची साधनें घेऊन चोहोंकडे पळूं लागले. कायस्थ आणि वैद्य लोक तर नुसतें 'बारगी' हें नांव ऐकतांच पळून जात. मोठ्यामोठ्यांच्या बायकाहि डोक्यावर आपलें सामान घेऊन पळून गेल्या. रजपूत लोक आपली शेती व हत्यारें टाकून पळून गेले. गोसावी आणि महंत हे आपापल्या म्यान्यांत बसून पळून गेले. शेतकरी लोक बीं व आऊतें बैलांवर लादून निघून गेले. शेख, सय्यद, मोंगल व पठाण हे तर बारग्यांचें नांव ऐकतांच पळ काढीत. कित्येक गरोदर बायका पळतां पळतां वाटेंत प्रसूत झाल्या. दहावीस माणसें एका ठिकाणीं जमलीं व त्यांना कोणी विचारलें कीं, तुम्हाला बारगी कोठें दिसले तर त्यांपैकी एकालाहि सांगतां येईना कीं, आम्हीं अमूक ठिकाणीं बारगी पाहिले. सर्व पळूं लागले म्हणून आम्हीं सुद्धां पळून आलों एवढेंच त्यांना सांगतां येई. याप्रमाणें पळून

---

१ वास्तविक मीरहबीब हा नाइलाजानेंच अलिवर्दीखानाकडे राहिला होता. त्याचा पूर्वीचा मालक ओरीसाचा सुभेदार **मुर्शिदकुलीखान** याचा अलिवर्दीखानानें मोड केल्यानंतर हबीबानें मराठ्यांस मदतीस बोलाविलें होतें; परंतु ते वेळेवर न आल्यामुळें त्याचा नाइलाज होऊन तो अलिवर्दी-खानास शरण गेला व त्याचे पदरीं राहिला व **भास्करपंत** आल्यावर योग्य संधि सांपडतांच त्यास जाऊन मिळाला. बरद्वानचे लढाईत तो मराठ्यांचे हातीं सांपडल्यामुळें त्यास आयतेंच निमित्त सांपडलें. (मागें भाग ४ पा. पहा)

जात असतांना त्यांना अचूक एखादी बारग्यांची टोळी गांठी. ते फक्त सोनें व चांदी लुटून घेत व बाकीचें सामान सोडून देत. अंगावरील दागिने काढून घेतांना कोणाचीं नाकें, कोणाचे कान तुटून दुखापती होत व कित्येक मारलेहि जात. कित्येक वेळां सुंदर स्त्रियांना ते धरूनहि नेत. याप्रमाणें लूटमार करून बारगी लोक गांवेंचीं गांवें जाळून टाकीत व त्यांत कित्येक वेळां देवस्थानेंहि जळून जात. जेथें जेथें बारगी लोक जात तेथें तेथें पैसा मागत व पैसा न मिळाल्यास नानातऱ्हेचे जुलूम करीत. ( त्यानंतर कवीनें जाळलेल्या गांवांचीं नांवें दिली आहेत त्यांत **बरद्वान**, **मेदिनी-पुर**, **चंडीपुर**, **शाभपुर**, वगैरे गांवें आहेत )

याप्रमाणें बरद्वान जाळल्यावर बारगी **हुगळीस** गेले. तेथें **शेरखा** नांवाचा नबाबाचा अधिकारी होता. त्यानें तेथें मराठ्यांचा प्रतिकार केल्यामुळें तें शहर बचावलें. इतर परगणेच्या परगणे मराठ्यांनीं लुटून जाळून टाकले. **कागा** आणि **मोगा** येथील डच लोकांच्या वखारीहि त्यांनी लुटल्या. **विष्णुपुर** हें गांव मात्र तेथील देव **गोपाळ** याच्या कृपेमुळें बचावलें. तेथून मराठे गंगा उतरून **मुर्शिदाबादेस** गेले. तेथें नबाबाचा भाऊ **हाजी** हा किल्लयांत जाऊन लपून बसला. मराठ्यांनीं **जगत्-शेटाचें** घर लुटलें. तेथें त्यांना अडीच कोट रुपये सांपडले. मराठे स्वारांनीं घोड्याचे खोगरांत व तोबऱ्यांत सुद्धां रुपये भरले व कांहीं रुपये तर नेतां नेतां सांडले ते गोरगरीबांनीं वेंचून घेतले.

**जगत्शेटाची** कोठी मराठ्यांनीं लुटून ते निघून गेले हें समजतांच नबाब **कटव्याहून मुर्शिदाबादेस** आला आणि इकडे सैन्य जवळ असतां मराठ्यांपासून **जगत्शेटाचा** बचाव न केल्याबद्दल त्यानें **हाजीस** फार दोष दिला. नंतर मराठे **कटवा** येथें गेले व **गंगा** व **अजय**[१] या दोन्ही नद्यांस पूर असल्यामुळें त्यांना पुढें जातां येईना. **भास्करपंतानें** **कटव्यास** मुक्काम केला व तेथें सर्व जमीनदारांस बोलावून त्यानें त्यांना प्रांताचा सरकारी वसूल जमा करण्यास सांगितला.

**मीरहबीब** हा मराठ्यांचे लष्करांत होता. त्यास **भास्करपंतानें** गंगेवर

१ इचें नांव अजी अथवा अडजी असेंहि सांपडतें.

पूल बांधण्यास सांगितलें. त्यानें ठिकठिकाणाहून पुष्कळ नावा जमवून त्या एकमेकींशीं बांधून त्यांचा पूल तयार केला.त्यावर बांबू घालून त्यावर गवत व चटया पसरल्या आणि या सर्वांवर माती पसरून जमीन तयार करण्यांत आली. याप्रमाणें पूल तयार झाल्यावर हजारों घोडेस्वार गंगा उतरून पलीकडच्या प्रांतांत लुटालूट करण्यास गेले.

**भास्करपंता**नें गंगेच्या काठीं मृत्तिकेच्या देवीची मूर्ति तयार करून नवरात्राचे वेळीं **दुर्गापूजेचा** उत्सव करण्याचें ठरविलें व त्याकरतां **डाईहाट** येथें केलेल्या नावांचे पुलानजीक त्यानें वरील उत्सवाची मोठी तयारी चालविली. मराठे लष्कर गंगा उतरून अलीकडेस आलें हें समजतांच नबावानेंहि चोहोंकडून आपलें सैन्य जमविलें व **कटव्याचे** रोखानें पुढे चाल करून **रहाणपुर** येथें तळ दिला. **पाटण्याहून जैनुद्दीन अहमद नांवाचा** त्याचा सरदार १२००० घोडेस्वार घेऊन त्यास येऊन मिळाला. त्यानें नबाबास सल्ला दिला कीं, **भास्करपंत** उत्सवाच्या गडबडींत आहे याच संधीत त्याचेवर हल्ला करावा. नबाबाचें म्हणणें पावसाळा संपल्यानंतर थोडीशी उघाडी झाल्यानंतर म्हणजे दसऱ्यानंतर लढाई द्यावी.

इकडे **मीरहबीब** मराठ्यांच्या लष्करांत होता. त्यानें हुगळीहून तोफा आणविल्या व त्या पुलावर ठेवून नबाबाच्या लष्करावर चालविल्या. याप्रमाणें नबाबाच्या सैन्यास त्यानें अडविलें; परंतु संध्याकाळचे सुमारास पुलावरील तोफ फुटली व बंद पडली.

इकडे नबाबाचा सरदार **जैनुद्दीन** यानें अडजी नदीवरून नावांचा तात्पुरता पूल तयार करून १०,००० लष्कर पलीकडच्या कांठी **उद्धरणपुर** येथें रात्रीं उतरविलें. इतक्यांत **रतनहजारी** नांवाचा नबाबाचा सरदार पुलावरून जात असतांना त्याचे २२०० लोक पूल मोडल्यामुळें नदींत बुडाले. त्यामुळें मोठा गोंगाट होऊन **कटवा** येथें **भास्करपंता**च्या लष्करांत एकच हुल्लड उठली कीं, मोंगलांचा छापा आला. मराठे लष्कर बेसावध असल्यामुळें फारच घाबरून सर्व सामान तळावर टाकून पळून गेलें. भास्करपंतानें सप्तमी व अष्टमी या दोन दिवशीं मात्र देवीची पूजा केली. परंतु अष्टमीचे रात्रींच ही गडबड उडाल्यामुळें देवीची बनविलेली प्रचंड

मूर्ति तशीच तळावर टाकून तो पळून गेला. नबाबाच्या सैन्यानें पाठी-मागून तळावरील सर्व सामान लुटून नेलें.

आश्विन महिन्यांत **भास्करपंत** पळून बंगाल्यांतून निघून गेला व पुन्हां जंगी तयारी करून चैत्र महिन्यांत परत बंगाल्यांत आला. त्यानें बंगाल्यांत सरसहा कत्तल करण्याचा हुकूम केला. त्यामुळें त्याच्या सैनिकांनीं एकसारखी कत्तल करण्यास सुरवात केली. ब्राह्मण, वैष्णव, संन्यासी, बायका व गाईसुद्धां मारल्या गेल्या. याप्रमाणें संहार झाल्यामुळें देवी **पार्वती भास्करपंता**वर संतप्त झाली व तिनें आपल्या हस्तकांना बोलावून आज्ञा केली कीं, 'तुम्ही **नबाबास** मदत करून **भास्करास** शिक्षा करा.'

याहि वेळेस **भास्करपंताचा** मुक्काम **कटवा** येथेंच होता, व **नबाबाची** छावणी तेथून जवळच **मानकुरा** येथें होती. भास्करपंताचे लष्करांत **अलिभाई** नांवाचा सरदार होता. त्यानें **भास्करपंतास** म्हटलें कीं, "तुम्ही किती दिवस बंगाल्याची लूट करणार ? आतां तुम्ही सैन्यास लूट करण्याचें मना करा. मीं नबाबाकडे जाऊन कांहीं तरी तडजोड काढतों" भास्करपंतानें तें कबूल केलें व अलीभाईस नबाबाकडेस पाठविलें. नबाबानें म्हटलें कीं, "बरद्वानचे वेढयाचे वेळींच मी भास्करपंताकडे तहाचें बोलणें लावण्याकरितां वकील पाठविला होता; परंतु भास्करपंतानें न ऐकतां माझा सर्व प्रांत लुटला. तरीहि मी तह करण्यास तयार आहें. भास्कर-पंतानें समक्ष येऊन मला भेटावें म्हणजे समक्ष भेटींत सर्व शर्ती पक्क्या ठरवूं." अलीभाईनें हें कबूल केलें व भास्करपंतास आणण्याकरितां नबाबानें आपला दिवाण **जानकीराम** व सेनापति **मुस्तफाखान** यास अलीभाई-चे बरोबर दिले. ते कटवा येथें **भास्करपंता**कडे आल्यावर **मीरहबीब** यानें **भास्करपंतास** तुम्ही **नबाबाच्या** भेटीस जाऊं नये व **मोगलांवर** कधींहि विश्वास ठेवूं नये असें सांगितलें. परंतु **मुस्तफाखानानें कुराणा-वर** हात ठेवून व **जानकीरामानें शालिग्राम** व **गंगोदक** हातांत घेऊन शपथा घेतल्या कीं, "भास्करपंतास कांहीं दगा होणार नाहीं व आम्ही त्यास येथें सुरक्षित आणून पोंचवूं." इतकें झाल्यावर **भास्करपंतास** विश्वास उत्पन्न झाला व तो त्याचा मृत्यु ओढवल्यामुळें फक्त बावीस

सरदार बरोबर घेऊन त्यांचे बरोबर निघाला. त्यांत **अलीभाई**हि होता. **भास्करपंतानें** आपलें सर्व सैन्य **प्लासी** येथें ठेविलें व वैशाख शु॥ २ रोजी तो नबाबाच्या भेटीकरितां मुद्दाम तयार केलेल्या जागेंत गेला. भास्करपंत व त्याचे सरदार निःशस्त्र होते. भास्करपंताचें व **नबाबाचें** बोलणें चालू असतां नबाब कांही निमित्तानें उठून गेला. उशीर झाल्यामुळें भास्करपंतानें सांगितलें कीं, "माझी स्नानाची व पूजेची वेळ झाली. तरी बाकीचें बोलणें नतर करूं." **मुस्तफाखानानें**हि सांगितलें की, "आतां आपण सर्वच जाऊं व पुन्हां येऊन दुसऱ्या बैटकीत बाकीचें सर्व बोलणें करूं" याप्रमाणें सर्व जण उठले व भास्करपंत घोड्यावर स्वार होणार इतक्यांत पूर्वी ठरल्याप्रमाणे **भास्करपंता**वर तलवार चालवून त्यास नबाबाचे लोकांनीं तेथेंच टार केलें. त्याचप्रमाणें **भास्करपंता**बरोबरच्या सर्व सरदारांसही मोंगलांनीं कापून टाकलें. त्यांतच **अलीभाई**हि मारला गेला. नबाबानें याबद्दल मोठा उत्सव केला. भास्करपंत **मानकुरा** येथें मारला गेला.

---

## भाग ५ वा

# जानोजी भोंसले

( इ. स. १७५५–१७७२ )

**रघूजी** मरण पावला त्यावेळेस त्यास चौघे पुत्र होते. **जानोजी, मुधोजी, बिंबाजी** व **साबाजी**. जानोजी व मुधोजी हे चांगले कर्ते होते. **जानोजी** व **साबाजी** हे धाकटे स्त्रीचे असून **जानोजी** हा चौघांत वडील होता. **मुधोजी** व **बिंबाजी** हे वडील स्त्रीचे होते. रघूजीनें मरणापूर्वी, वडील पुत्र **जानोजी** यानें सेनासाहेब सुभ्याचा मुख्य अधिकार चालवावा व बाकीच्या तिन्ही पुत्रांनाहि राज्यांत वांटणी देऊन त्यांचा परामर्ष घ्यावा असें सांगितलें होतें. रघूजीच्या मरणाचे वेळेस **जानोजी** व **साबाजी** हे रघूजीजवळ असून मुधोजी यास रघूजीनें गाविलगड किल्ला सर करण्यास पाठविलें होतें. **गाविलगड** किल्ला सर करून व तेथील बंदोबस्त



**जानोजी भोंसले,** सेनासाहेब सुभा ]　　[ पृ. ११४

करून **मुधोजी** परत येत असतांना वाटेंतच त्यास रघूजीच्या मृत्यूचें वर्तमान समजलें. त्यानें **सुर्जीअंजनगांव** येथें जाऊन क्रियाकर्मांतर केलें व परत नागपुराकडेस निघाला.

**मुधोजी** हा वडील बायकोचा मुलगा असल्यामुळें त्या नात्यानें त्यानें आपला वडीलपणा पुढें करून सेनासाहेब सुभ्याचें पद मिळविण्याचा विचार केला. इकडे **जानोजीनें**हि मुधोजीचें मन ओळखून आपली मजबुती करण्यास सुरवात केली. **गाविलगड**चा किल्ला **मुधोजीनें** नुकताच घेतला होता. तो कसा तरी युक्तीनें आपल्या ताब्यांत घेण्याकरितां जानोजीनें **जयाजीभाई** नांवाच्या मनुष्यास **मुधोजी**कडेस पाठविलें. त्यानें रस्त्यांतच **मुधोजीस** भेटून आपण **जानोजी**च्या विरुद्ध आहों असें खोटेंच भासविलें. त्यामुळें मधोजीस विश्वास वाटून त्यानें **गाविलगडचे** किल्ल्यावर त्याची नेमणूक केली. **गाविलगड** ताब्यांत येतांच त्यानें आपले खरें स्वरूप प्रकट करून जानोजीस कळविलें कीं, किल्ला आपल्या ताब्यांत आला.

**जानोजी व मुधोजी यांचीं भांडणें**—**मुधोजीनें जानोजीस** मार्गांतूनच पत्र लिहिलें. त्यांत वडीलपणाच्या नात्यानें 'आशीर्वाद' अशी सुरवात करून पुढें लिहिलें की, "आम्ही वडील मातोश्रीचे. तेव्हां कनिष्ठ तुम्ही. दौलतीची मालकी आम्हाकडेस. तुम्ही आमचे आज्ञेंत वागावें." याप्रमाणें लिहून मधोजीनें वऱ्हाडांत खंडण्या घेऊन फौजा ठेवण्यास सुरवात केली. **मुधोजी**जवळ **सदाशिव हरि** दिवाण होता. त्यानेंहि त्याचे आप्त **पारोळेकर देशमुख** यांचेकडून कर्ज काढून मुधोजीस पैसा पुरविण्याचें कबूल केलें. **मुधोजी**जवळ **दिनकर विनायक** व **शिवाजी विनायक** हे दोघे बंधु व **नरसिंगराव भवानी** हे तिघे प्रभु गृहस्थ आपल्या पथकांसह होते. तसेंच **महिपतराव दिनकर** (दिनकर विनायकाचा पुत्र) हा मुधोजीचा विश्वासपात्र बनला होता. वरील लोकांशिवाय मुधोजीकडेस कोणी महत्त्वाचे सरदार अगर मुत्सद्दी नव्हते. उलट **जानोजी**कडेस रघूजीच्या वेळचे सर्व सरदार व मुत्सद्दी होते. **बाबूराव कोन्हेर** मुजुमदार (कोल्हटकर) व **रखमाजी गणेश चिटणवीस**, **त्रिंबकजी राजे भोंसले**[1]

[1] वावीकर; पुढें पृष्ठ २४१ पहा.

हे प्रमुख गृहस्थ जानोजीच्या पक्षास होते. तसेंच वऱ्हाडचा सुभेदार **कृष्णाजी गोविंद**, नागपुरचा सुभेदार **नरहर बल्लाळ** (रिसबूड)[१] व कटकचा सुभेदार शिवभट साठे हेहि जानोजीच्या पक्षास होते. तसेंच सर्व जुने सरदार **रघूजी करांडे, बिंबाजी वंजाळ, नऱ्होजी जाचक, शिवाजी केशव टाळकुटे, गिरमाजी खंडेराव, आनंदराव वाघ** व **कृष्णाजी आटोळे** हेहि सरदार जानोजीकडेसच होते.

भोंसल्यांची सोयरेमंडळी मोठ्या विचारांत पडली. शेवटीं सर्वांनी विचार करून जानोजी वडील असल्यामुळें जानोजीसच सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें मिळणें योग्य आहे. असें ठरवून जानोजीस वस्त्रें मिळविण्याकरितां **त्रिंबकजी राजे भोंसले** व **बाबूराव कोन्हेर** या दोघांस पुण्यास पेशव्याकडे पाठविलें.

त्यावेळच्या वहिवाटीप्रमाणें राजास नजराणा दिल्याशिवाय वस्त्रें मिळत नसत. तो नजराणा किती ठरवावा याबद्दल बरीच वाटाघाट होऊन **देवाजी पंतांच्या**[२] मध्यस्थीनें अडीच लक्ष रुपये नजराणा ठरला.

---

१ प्रसिद्ध विठ्ठल बल्लाळ सुभेदार याचा मामा.

२ याविषयीं भोंसल्यांची बखर पान ५२–५३ मध्यें एक मनोरंजक आख्यायिका लिहिली आहे ती अशी :—त्रिबकजी राजे याचेकडेस **कोन्हेरराम उमरेडकर** म्हणून एक कारकून होता. त्याचेकडेस देवाजी म्हणून एक शागीर्द (उमेदवार) होता. राजे पुण्यास गेले तेव्हां हा शागीर्द त्यांचेबरोबर पुण्यास गेला होता. **त्रिंबकजीराजे** व **बाबूराव** यांचे नानासाहेब पेशव्याशीं नजराण्याबद्दल जें बोलणें चाललें तें सर्व हा लक्ष देऊन ऐकत असे. एकदां राजे व बाबूराव रात्रीं घरीं परत आले व देवाजी हा पेशव्यांचे वाड्यांत निजलेला होता तो तसाच राहिला. राजे गेल्यानंतर हा निजलेला कोण म्हणून याला उठविलें व नानासाहेबांशीं त्याचें बोलणें चालणें झालें. त्यांत देवाजीची हुषारी चांगली दिसून आल्यावरून नाना साहेबाचें मनांत हा हुषार कारकून भरला व त्याशीं प्रसंगोपात् एकांतीं बोलणें चालणेंहि होऊं लागलें. चाणाक्ष देवाजीपंतानें जाणलें कीं, त्रिंबकजी व बाबूराव हे १॥ लक्षापर्यंत नजराणा ठरविण्याच्या तजविजींत आहेत. त्रिबकजी व बाबूराव हे यानंतर जानोजीस विचारून नजराण्याची रक्कम

**देवाजीपंताचा उदय**—देवाजीपंत याचें संपूर्ण नांव दिवाकर पुरुषोत्तम चोरघोडे. हा महाराष्ट्रांतील साडेतीन शहाण्यांपैकीं एक असून या वेळेपासून प्रसिद्धीस आला. हा ऋग्वेदी[1] देशस्थ ब्राह्मण असून नागपूर जिल्ह्यांतील नरखेड येथे राहणारा होता. त्याचे प्रत्यक्ष वंशज कोणी राहिले नसून त्याचे भाऊबंद नरखेड व नागपूर येथें आहेत.

**पेशव्याकडून तडजोड**—पुण्यास वस्त्रें मिळण्याची खटपट चालू असतां जानोजी व मुधोजी यांचीं भांडणें चालूच होतीं व वऱ्हाडांत दोनतीन ठिकाणी त्यांच्या चकमकीहि झाल्या. मुधोजीनें पेशव्याकडेस पैगाम लाविला. शेवटीं नानासाहेब पेशव्यानें जानोजी व मुधोजी या दोघांसहि पुण्यास बोलाविलें व मुख्य अधिकार व सेनासाहेब सुभ्याचें पद जानोजीकडेस ठेवून चंद्रपूर व छत्तीसगड मुधोजीकडेस दिलें व **मुधोजीस सेनाधुरंधर** असा किताब दिला. तसेंच मुधोजीनें **चंद्रपुरास** व बिंबाजीनें **छत्तीसगडास** व

---

नक्की ठरविण्याकरितां नागपुरास परत आले व जानोजीस ७ लक्षांपर्यंत नजराण्याची रक्कम ठरेल असें सांगूं लागले. देवाजीच्या ध्यानांत ही लबाडी येतांच त्यानें जानोजीस भेटून मजकडे हें काम दिल्यास मी नजराण्याची रक्कम २॥ लक्षांवर ठरवून आणतों असें त्यानें जानोजीस सांगितलें. जानोजीनेंहि यांत आपला बराच फायदा होईल असें जाणून देवाजीकडेस हें काम दिलें. देवाजीनें पुण्यास जाऊन नानासाहेब पेशव्यास सांगितलें कीं त्रिंबकजी व बाबूराव १॥ लक्ष देतों म्हणतात तर मी जानोजीकडून २॥ लक्ष देववितों. पेशव्याचा एक लक्षाचा फायदा होत असल्यामुळें त्याला ही गोष्ट पसंत पडली, व देवाजीपंताच्या मध्यस्थीनें अखेर २॥ लक्ष रुपये नजराणा ठरून पेशवे व जानोजी या दोघांचीहि मर्जी देवाजीपंतावर बसली. वरील आख्यायिकेंत खरेपणाचा अंश कितपत असेल हें सांगतां येत नाहीं.

१ बखरींतील टीपेंत व भोसल्यांचे कागदपत्र ले. ३ टीप २ यांत यास यजुर्वेदी म्हटलें आहे तें चूक आहे. चिमूर येथें त्यानें बांधलेलीं देवालयें वगैरे आहेत. त्यावरून तो चिमूरचा राहणारा असें त्याच टीपेंत म्हटलेलें आहे, परंतु त्याचे भाऊबंद वगैरे सर्व नरखेडास आहेत व तोहि नरखेडचाच राहणारा होता असें पक्कें समजतें.

साबाजीनें **दारव्हें** येथें रहावें असें ठरविलें. साबाजी यास वऱ्हाडांतील दारव्हा वगैरे भाग निजामाकडून त्याच सुमारास जहागिर मिळाले होते. पेशव्यानें हा निकाल इ. स. १७५७ मध्यें केला. परंतु जानोजीस कायदेशीर सनद ता. ६-८-१७६१ मध्यें ताराबाईचे हातून माधवरावाचे कारकीर्दींत मिळाली.[१]

परंतु हें करण्यापूर्वी पेशव्यानें जानोजीस व रघूजीस कर्नाटकांत सावनूरच्या स्वारीवर सदाशिवरावभाऊबरोबर रवाना केलें. ही स्वारी इ. स. १७५६ मध्यें झाली. त्या स्वारींत दोन्ही भावांनीं कामगिरी चांगली केली. या स्वारीवरून परत आल्यावर जानोजी वऱ्हाडाकडेस निघून आला व मुधोजी कांहीं दिवस पुण्यास राहून चंद्रपुराकडेस गेला.

याच सुमारास कटक प्रांताचा सुभेदार **शिवभट साठे** हा तिकडील खजिना घेऊन नागपुरास येत असतां **बिंबाजीनें** मध्येंच त्यास छत्तीस-गडांत अडविलें. तरी तो तसाच १२ लक्ष रुपयांचा खजिना घेऊन नागपुरास आला. त्यांत **मुधोजी** हा निम्मे वांटणी मागूं लागला. शेवटीं **पैठणाजवळ** कायगांवकर **वासुदेव दीक्षिताचे**[२] मध्यस्तीनें वरील तंटा कसाबसा तुटला. त्या वेळीं पेशवाहि **पैठणासच** होता. (मार्च इ. स. १७५७) **शिवभट साठे** हाहि तेथेंच आला होता असें दिसतें. साताऱ्च्या मठांतील **हंसपुरी गोसावी** व **बाबुराव कोन्हेर** हेहि या भावांच्या भांडणांत मध्यस्थी करीत होते.

**मुधोजी चंद्रपुरचा किल्ला घेतो**—इ. स. १७५६ मध्यें चंद्रपुरचा गोंड राजा पुन्हा प्रबळ होऊन त्यानें या दोघा भावांच्या भांडणाची संधि साधून तो चंद्रपुरचा किल्ला बळकावून बसला. मुधोजी त्या वेळेस एलिचपुरच्या बाजूस होता. तेथून तो चंद्रपुरास येऊन त्यानें किल्ल्यास मोर्चे लावून चंद्रपुर काबीज केलें.

---

१ अप्र. कागद. हल्लीं ऐ. प. यांत ले. ४४३ म्हणून प्रस्तुत लेखकानें छापलेला.

२ हें दीक्षित घराणें कायगांवटोकें येथील असून बाजीरावाच्या वेळेपासून राजकारणांत व सावकारींत प्रसिद्धीस आलें. काशीसहि त्यांचें राहणें होतें. हल्लीं त्यांचे वंशज खानदेशांत शेंदुरणी येथें आहेत.

**जानोजीचें निजामअलीशीं युद्ध व तह इ. स. १७५७-५८**--मध्यें हैद्राबादच्या गादीसंबंधानें **निजामअल्लीखान** व त्याचे तिघे बंधु यांजमध्यें तंटे सुरू झाले. पेशवे व भोंसले हे **निजामअल्लीखान** याचे विरुद्ध पक्षास व **सलाबतजंगाचे** बाजूस होते. या वेळीं निजामअल्लीखान हा एलिचपुरचे बाजूस होता. त्यानें **जानोजी, पुणें** व **गंगथडीच्या** बाजूस आहे हें पाहून वऱ्हाडांतील मुलूख सर करून भोंसल्यांचे अंमलदार उठवून देण्यास सुरवात केली. **जानोजीनें** मागे **रघूजी करांडे** यास वऱ्हाडांत बंदोबस्ताकरितां ठेविलें होतें. निजामअल्ली बऱ्हाणपुरास जातांना त्यानें वऱ्हाडांतील सर्व मुलूख फस्त केला. **जळगांव** जामोद जवळ **इभ्राहीमखान गारदी**[1] व **रघूजी करांडे** यांची लढाई झाली. निजामअल्लीही तेथें हजर होता. परंतु लढाईंत न पडतां तो तसाच बऱ्हाणपुरास गेला व तेथें त्यानें आपल्या भावाविरुद्ध लढण्याकरितां सैन्य जमा केलें. पुढें मराठेशाहींत प्रसिद्धीस आलेला इभ्राहिमखान गारदी हा त्यावेळीं निजामाकडेस नौकर होता. तो निजामअलीस बऱ्हाणपुरास येऊन मिळाला. निजामअली बऱ्हाणपुराहून निघून दक्षिणेकडेस **वाशीम** येथें आला. निजामअलीचा भाऊ **सलाबतजंग** यानें **जानोजी** त्या बाजूस होता त्याशीं संगनमत करून **निजामअलीवर** हल्ला करण्यास सांगितलें. इतक्यांत

---

१ **इभ्राहिमखानाचा** नातलग **मुजफरखान सलाबतजंगा**कडेस नोकर होता. त्यास सलाबतजंगानें काढून दिल्यावर तो पेशव्याकडेस नोकर राहिला. इभ्राहिमखान हा निजामअलीकडे नोकर होता. निजामअलीचा व सलाबतजंगाचा सलोखा झाल्यामुळें निजामअलीनेंहि इब्राहिमखानास काढून दिलें. नंतर तोहि पेशव्याकडेस येऊन नोकर राहिला. निजामाचे सैन्यांत परेंचांची कवाइती पायदळें व तोफखाना होता. त्यांतच हा शिकलेला असल्यामुळें त्यास गारदी (गार्ड) असें म्हणत. मुजफरखानानें पुढें सदाशिवराव भाऊस दग्यानें मारण्याचा प्रयत्न केल्यावरून त्यास फांशी दिलें. इब्राहिमखान हा अखेरपर्यंत इमानानें राहून शेवटीं पानिपतच्या लढाईंत जखमी होऊन अबदालीचे हातांत सांपडला व त्यास त्यानें ठार मारिलें. इब्राहिमखान गारदी यास सदाशिवराव भाऊनें इ. स. १७५९ च्या अखेरीस मोठ्या युक्तीनें फोडून आपलें चाकरीस ठेवलें होतें. त्याचे हाताखालीं तोफखान्याचें काम जाणणारे फिरंगी होते. उदगीरच्या लढाईंत प्रथमच इब्राहिमखान याचा उपयोग झाला. (जान्युआरी १७६०)

**रघूजी करांडे** व त्याचा पुत्र **बापू करांडे** या सरदारांनीं बऱ्हाणपुराहून निजामाचा तोफखाना वगैरे सामान वाशमाकडेस येत होतें तें **बोरगांव मंजू**[१] येथें लुटलें. ही लढाई डिसेंबर १७५७ मध्यें झाली[२] त्यांत **इब्राहिमखान** गारदी हा निजामअलीकडून व **रघूजी करांडे** व **नऱ्होजी जाचक** भोसल्यांकडून हजर होते.

१ बखरींत कंडीचें बोरगांव लिहिलें आहे तें चूक आहे.

२ या मोहिमेसंबंधाचें खालील पत्र वाचण्यासारखें आहे. त्यावरून त्यावेळच्या स्थितीची कल्पना होते. पत्र पेशव्याचे वकीलाचे पेशव्यास निजाम अली बऱ्हाणपुरास जातांना मागें इब्राहीमखानाची व करंड्याची लढाई झाली त्यानंतरचें

श्रीशंकर

पौा छ १३ रविलाखर (ता. ५-१२-१७५७)

सेवेसी विनंती प्रार्थना येसीजे. करांडियाचा व नवाबाचा जुजाचा मजकूर कार्तिक वद्य नवमी सोमवारी जलगांव जामोदच्या पुढें लढाई मोटी जाली म्हणून लिहिली आहेत की मऱ्हाठी सारी फौज येकत्र होऊन जुज चांगले झाले. मऱ्हाटियानी इभ्रामखान गाडदी यासी मोका घेतला. तोफखाना देखील उडवून गाडदी सेदीडसे मारले. कांहीं जखमी झाले. इभरामखानकडील एक हवदा खालीं जाला. मऱ्हाटे याजकडीलहि पांचपंचवीस माणूस ठार झाले, त्याजमधे पांचसात माणूस नामांकित पडले. शेंभरपनास माणूस जखमीहि जाले. घोडी आराब्याखालीं[१] शंभर सवाशे मेलीं, उधलली याप्रो।। जाली. तेव्हां नवाबानी खासा कुमक केली तेव्हा तेथून साभालून करांडे, नऱ्होजी जाचक वगैरे निघाले. या प्रो।। जाली म्हणून बातमी आली. नवाब बुऱ्हानपुरास जाऊन दाखल जाले. हे बाहेर आहेत सरकारचा मुलूकहि खराबीत फार आला. वराडात मोगलाने जिकडून गेला तिकडून गाव मारीतच गेला. दहा हजार राड[२] लष्करात आली आहे. गाडदियाने अतिशय केला. हजार दोन हजार बायकानी जीव दिल्हे. गाव अस्तमान पावेतो राखावा आणि रात्रीस जाऊन गाडदी याणी मारावा या प्रो।। वर्तनूक करितात. बुऱ्हानपुरात पाहवे काये करितील हे नकले. साध्यंत वर्तमान मागाहून विनंती लिहून पाठऊन देईन. बातमीस दोन दिवस जाजती लागले म्हणून स्वामीनी रागास न आले पाहिजे. मी दूर गेलो होतो म्हणून विलंब लागला. माहाराजाचे शेवेसी श्रुत होये. हे बातमी मागे आठदाहा रोजात पाठऊन देईन हे विज्ञप्ति. (पे. द. भा. २० ले. ९३)

१ तोफा २ कचरा, लुटलेले लोक.

हें वर्तमान समजतांच **निजामअल्ली** वाशमाहून उत्तरेकडेस इब्राहिम-खानाच्या मदतीस आला व त्यानें **अकोला** शहर लुटलें. **जानोजी** हाहि त्याचा पाठलाग करीत मागेंच होता म्हणून **निजामअल्ली** पुनः ब्ऱ्हाण-पुरास निघून गेला. तेथें इब्राहिमखान गारद्याचा तोफखाना पुन्हां तयार करून त्यानें परत येऊन वऱ्हाडांत पूर्णेच्या कांठीं जानोजीस गांठलें व त्याचा पराभव केला (इ. स. १७५७). परंतु पुढें लवकरच (मे १७५८) जानो-जीचा व निजामअल्लीचा तह **एलिचपुरास** तेथील नबाब **सुलतानखापन्हीं** याचे मध्यस्थीनें झाला. त्यांत असें ठरलें कीं, वऱ्हाडांतील उत्पन्नापैकीं शेंकडा ४५ भोंसल्यांनीं घ्यावें व शेंकडा ५५ निजामानें घ्यावें.[१]

यानंतर वर्धेच्या कांठीं निजामअल्लीखान व जानोजी यांच्या मोठ्या समारंभानें ता. २५-३-१७५८ रोजीं भेटी झाल्या.[२]

---

१ ऐ. प. ले. ४४२ यांत प्रस्तुत लेखकानें हा तह छापला आहे. हा साठीचाळीशीचा तह नव्हे.

२ या भेटीचें वर्णन खालील एका पत्रांत केलेलें वाचण्यासारखें आहे. बातमीपत्र पेशव्याचे वकीलाचें.

छ. १४ रमजान (ता. २२-५-१७५८)

तिसा वैशाख श्रीशंकर

" सेवेसी प्रार्थना यैसीजे, वरधातीरी छ. १५ रजबी नवाब निजाम-आलीखान सेना साहेबसुभा याच्या डेरियासी आले होते. समागमे पांच हजार गाडदी व हजार दीड दोन हजार फौज होती. त्यासी त्यांच्या डेऱ्यापुढें येऊन हत्तीवर बसून दोन घडी पावेतो उभे राहिले आणि याणीं नबाब घरास येतात म्हणून सरांचे उभें करून तीन च्यार मसनती केल्या होत्या, त्यासी नबाबास भय प्राप्त जाले कीं, हे आर्जकू (?) केला आहे तेव्हा काही येथे म्हणून......चोबदार आले. मसनती पाहाण्यासी गेले कीं दारू पसरली कीं काय आणि तमाम कारकूण मंडली व हत्यारबंद बाहेर घातले.... इतबारी होते ते पाठविले. इभरामखान गाडदी पाहून गेले.मग विठलपंत येऊन पाहून गेले. तेव्हा मग नबाब हतीवरून उतरले. नबाब दुसरे मसनती पावेतो आले; तेथें बसले पूढे जागा खलबतखाना तमाम तसाच राहिला. तेथेंच नबाब बोलले कीं " बिचारे की तै हक नाहक खराब किया, आणि

**ताराबाई व पेशव्याचे भांडणांत बिंबाजीचें अंग--बिंबाजी** भोंसले हा पेशवे व **ताराबाईच्या** भांडणांत ताराबाईच्या पक्षास मिळाला होता बिंबाजीची बायको ताराबाईच्या आप्तांतील होती. तसेंच बिंबाजी व मुधोजी यांची आई ही शाहूच्या बायकोची ( सगुणाबाईची ) चुलत बहीण होती. सिंदखेडकर मानसिंग ऊर्फ बाबाजी जाधव [1] हाहि शाहूराजाचा भाचा व राजारामाचा नातू असल्यामुळें साताऱ्यास शाहूजवळ रहात होता. तोहि ताराबाईच्या पक्षास होता. **बिंबाजी** व **बाबाजी** या दोघांच्या सल्लयानें ताराबाईनें कांहीं दिवस पेशव्याशीं भांडण चालविलें. बिंबाजी व मुधोजी यांच्या पक्षपातामुळें ताराबाईहि जानोजीच्या पक्षास होती. ताराबाई पेशव्याशीं भांडण मिटविण्याकरितां पुण्यास आली. तेव्हां राजारामास, बाबूराव जाधवाच्या ताब्यांत ठेवून व बिंबाजीस बरोबर घेऊन पुण्यास आली. नंतर ताराबाईचा व पेशव्याचा सलोखा झाला. त्यांत ताराबाईनें बाबूराव जाधवास आपल्या कारभारांतून काढण्याचें कबूल केलें. पुढें भोंसल्यांचीहि वांटणी पेशव्यानें करून दिल्यामुळें बिंबाजीस व मुधोजीस नागपुराकडेस यावें लागलें.

---

आमची सरदारीहि खराबीत आणिली. आज आम्ही भागानगर पात्रेतो जाऊन कामकाज केले आसते. त्यासी बसल्या बसल्या खेळ करितात" म्हणून यैसे बोलले. चितांत बहुतसे खिन्न जाले. दुसरे सराच्याचा व डेऱ्याचा आर्जकू पाहून थोडेसे दुखहि जाले. पानदाने वगैरे सरंजाम पाहोन घरास गेलियाउपरी येका दोघा जनाजवल बोलूनहि लागले कीं आज जानोजीने आम्हास मोठासा थाट करून दाखविला की, आम्ही यैसे मातबर म्हणून आम्हास दाखविले. दुसरे दिवशी विठलपंतास पाठविले कीं साऱ्या तोफा व गाडदी याची एक रंजकी करवितो. तुम्ही जानोजी भोंसले यासी घेऊन येणे. त्यासी हेहि गेले. रात्र जाली; मग चौघडी रात्रीस तोफखाना वगैरे सोडला. प्रहरा रात्रीस आपल्या डेरियास आले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति." (पे. द. भा. २० ले. ९५).

[1] प्रस्तुत लेखकाचा वऱ्हाडचा इतिहास पा. १५१ व ३३१ पहा.

**बिंबाजी** हा मुधोजीबरोबरच पुण्यास राहून त्याचे बरोबरच वऱ्हाडांत आला. इ. स. १७५७–५८ मध्यें राघोबादादानें उत्तर हिंदुस्थानांत स्वारी केली. त्यावेळीं पेशव्यानें भोंसल्यासहि तिकडे मदतीस जाण्याचा हुकूम केला. मुधोजी हा उत्तर हिंदुस्थानांत जाऊन दादासाहेबाचे फौजेबरोबर कांहीं दिवस राहिला. परंतु पुढें दोघांचा बेबनाव होऊन तो परत वऱ्हाडांत आला व त्याची फौज आकोटाजवळ होती तीस येऊन मिळाला.

मुधोजीनें पारोळेकर देशमुखाकडून कर्ज काढलें होतें. मुधोजी उत्तर हिंदुस्थानांतून परत जातांना आकोटाकडेस आपल्या फौजेस मिळण्यास जात असतां मार्गात पारोळेकर यांनीं मुधोजीस मेजवानीच्या निमित्तानें बोलाविलें व त्यास कैद करून आपले कर्जाचा फडशा करून घ्यावा असा त्याचा विचार होता; परंतु याची बातमी मुधोजीस लागून त्यानें मेजवानीस जाण्याचें टाळलें. हे पारोळेकर मुधोजीचा दिवाण सदाशिव हरी याचे आप्त असल्यामुळें सदाशिव हरी याचा व मुधोजीचा यामुळें बेबनाव झाला (बखर पा. ६२).

**जानोजीचें व मुधोजीचें पुनः भांडणः**–जानोजी व मुधोजी यांची वांटणी पेशव्यानें करून दिल्यानंतर ते परत नागपुराकडेस आले. परंतु त्यांचा तंटा पूर्णपणें मिटला नाहीं. जानोजी हा नागपुरास येऊन पोहोंचला व मुधोजी हा मागाहून आला. परंतु एकदम नागपुरास न येतां तो बाहेरच आपली मजबुती करीत घुटमळत होता. दोघेहि आपापल्या पक्षास मदत मिळवीत होते.

वऱ्हाडच्या सुभ्याचें काम **भास्कररामाची** स्त्री **ताई** व तिचा पुत्र काशीराव यांचेतर्फे कृष्णाजी गोविंद हा करीत होता. त्यास **जानोजीनें** काढून[१]

---

१ कृष्णाजी गोविंद याजवर जानोजीची इतराजी होण्याचें कारण पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहे:—**पंचगव्हाण** व **पिंजर** येथील जमेदारां-मध्यें सोयरिकीवरून आपसांत कांहीं तंटा उत्पन्न झाला. कृष्णाजी गोविंद यानें पिंजरकरांचा पक्ष धरून **पंचगव्हाणाच्या जमेदारास** कैद करून फार त्रास दिला. जानोजीनें मना केले असतां ऐकलें नाहीं म्हणून जानोजीची त्याजवर अवकृपा झाली. (बखर पा. ६१).

वऱ्हाडच्या सुभ्याचें काम मानसिंगराव मोहिते[१] याजकडेस दिलें व त्याचेतर्फे **त्रिंबकराव कोन्हेर** प्रभु यास वहिवाटीस नेमिलें.

**मुत्सद्दी व सरदार यांच्या घडामोडी—कटकचा** सुभेदार **शिवभट साठे** हा जानोजीचे पक्षाचा होता. त्यास जानोजीनें कायम ठेविलें. तसेंच छत्तीसगडांत रघूजीचा लेकवळा **मोहनसिंग भोसले** हा होता त्यासहि कायम ठेविलें. **बाबूराव कोन्हेर** हा दिवाणगिरीचें काम करीत होता, परंतु तो आजारी झाल्यामुळें व **देवाजीपंताचें** महत्त्व जास्त वाढून **बाबूराव** मागें पडत चालल्यामुळें तो परत देशीं गेला व **देवाजीपंत** हाच दिवाणगिरीचें काम करूं लागला.

**सदाशिव हरी** हा पूर्वी मुधोजीचा दिवाण होता, परंतु त्याचे मार्फतीनें काढलेल्या पारोळेकरांच्या कर्जावरून त्याचा व मुधोजीचा बेबनाव होऊन **सदाशिव हरी** हा **जानोजी**कडेस गेला. **त्रिंबकजीराजे भोंसले** वगैरे जुने सरदार **जानोजी**कडेसच होते, परंतु **रघूजी करांडे** हा प्रमख सरदार मुधोजीकडेस जाऊन मिळाला म्हणून **देवाजीपंतानें पिराजी नाईक निंबाळकर** यास सहा हजार फौजेनिशीं देशांतून जानोजीकडेस आणिलें. तसेंच **उमाजी विनायक** प्रभु यासहि आपले पदरीं ठेविलें. **रखमाजी गणेश**[२] **चिटणवीस** हाहि जुना कारभारी जानोजीकडेस होता.

**मुधोजी**कडेस पूर्वी सदाशिव हरि दिवाण हा प्रमुख होता, परंतु तो जानोजीकडेस गेल्यावर **महिपतराव दिनकर** प्रभु हा मुख्य कारभारी झाला. महिपतराव दिनकर याचेमार्फतीनें गायकवाडाच्या पदरचे दोघे गृहस्थ **मोरोपंत** व **रामाजी केशव तिखे**[३] यांस मुधोजीनें आणून

---

१ यास जानोजीची बहीण बाकाबाई ही दिली होती. लग्न देऊरास रघूजीच्या वेळेस झालें. रघूजीनें त्यास सरदारी देऊन नागपुरास आणलें. त्यांचें घराणें नागपुरास आहे. भोंसल्यांच्या सोयरिकीच्या सात कुळींपैकीं मोहिते हे एक आहेत. (बखर पान ४८).

२ नागपुरच्या प्रसिद्ध चिटणवीस घराण्याचा मूळपुरुष.

३ हा पुण्याकडील राहणारा होता. याचे वंशज नागपुरास आहेत. वंशावळ पहा.

आपलेकडेस ठेविलें होतें. मोरोपंताकडून १॥। लाख व रामाजी केशव याजकडून पाऊण लाख रुपये नजराणा घेऊन त्या दोघांना त्यानें आपलें फडणिसीचें काम दिलें. कारण या वेळीं मुधोजीस पैशाची ओढ फार होती. मुधोजीचा चिटणवीस शंकराजीराम हा होता.

**दोघा बंधूंचीं भांडणें पुढें चालू**—पेशव्यानें पुण्यास व्यवस्था लावून दिल्यानंतर सुद्धां जानोजी व मुधोजी यांचें ऐक्य न होतां बेबनावच राहिला. पेशव्याकडून सरकारी रकमेची मागणी येतच होती. दोन सालच्या उत्पन्नाबद्दलचे २० लक्ष रुपये देण्याचे उभयता बंधू करार करून गेले होतेच व प्रत्येकानें आपापल्या प्रांतांतून प्रत्येकी १० लक्ष रुपये पाठवावे असा करार होता. परंतु वरील भांडणामुळें कोणाकडूनहि रक्कम येईना. पेशव्यानें आपला वकील **व्यंकटराव मोरेश्वर** व **त्रिंबकजी भोंसले** यांचेमार्फत पुष्कळ तगादे केले; परंतु कांहीच उपयोग झाला नाहीं.

माहे आक्टोबर १७५९ मध्यें मुधोजी व जानोजी यांजमध्यें मध्यस्थां-करवीं बोलणें सुरू झालें. मुधोजीचें म्हणणें जानोजीनें वडील या नात्यानें नागपुरास रहावें पण सर्व कारभार आपण करावा. जानोजीचें म्हणणें उभयतांनीं आपापल्या वाटणींतील प्रांतांचा कारभार करावा. मुधोजीचा फडणवीस **मोरो रघुनाथ** हा जानोजीकडेस गेला असतां जानोजीनें त्यास व **रघूजी करांडे** व बाळाजी केशव यास मुधोजीकडे पाठवून त्यास समजुतीकरितां नागपुरास आणविलें. मुधोजी चंद्रपुरास होता, तेथून तो वरील त्रिवर्गांबरोबर नागपुरास गेला व सीताबरडीवर मुक्काम करून राहिला. उभयता बंधूंच्या भेटी दसऱ्याचे दिवशीं व्हाव्या असें ठरलें. भेटी वगैरे झाल्यानंतर बोलणेंचालणें सुरू झालें. परंतु दोघांचें एकमत झालें नाहीं. इतक्यांत मधोजी व रघूजी करांडे यांस बातमी लागली कीं, जानोजी हा दगा करून दोघांसहि पकडणार आहे. हें समजतांच **मुधोजी** व **करांडे** हे वऱ्हाडच्या रोखानें निघून नागपुरापासून सात कोसांवर गेले व पुढें कांहीं दिवस वर्धेच्या कांठीं व्याहांडा नजीक जाऊन मुक्काम करून राहिले. जानोजी यानें मागाहून **त्रिंबकजी राजे** यास शिष्टाईस पाठविलें. परंतु **मुधोजी** व **करांडे** यांचें म्हणणें कीं, जानोजीकडील

**देवाजीपंत, बाळाजी केशव** व **शामजी फुलाजी** हेच सर्व फंद करितात त्याना आमचे स्वाधीन करावें. हा निरोप **त्रिंबकजीनें** जानोजीस सांगितला. जानोजीनें उलट निरोप पाठविला कीं, **देवाजीपंतास** आम्ही **पिराजी नाईक निंबाळकर** याचे स्वाधीन करतो. ते त्याचा बंदोबस्त करतील; परतु मुधोजीकडील **सदाशिव हरी, रामाजी केशव** व रघूजी करांड्याकडील **नानाजी कृष्ण** यास मुधोजीनें कारभारांतून काढून घरीं बसवावें. अखेर दोघाचें एकमत झालें नाही. मुधोजीनें फौज जमविणें सुरू केलें. ती ५॥ हजारपर्यंत जमा झाली व पुढेही वाढतच होती. हें समजताच जानोजीनेहि मुधोजीवर चाल करण्याचा निश्चय केला. दिवाळीचे प्रतिपदेस तो नागपुराहून डेरे–दाखल झाला. पुढे दोघाच्याहि फौजा वऱ्हाडात आल्या.[१]

**नांदगांव रहाटगांवची लढाई:**–जानोजी व **मुधोजी** या दोघांचीं सैन्यें **उमरावतीच्या**जवळ आल्यावर त्यांचे युद्ध **रहाटगांवच्या** मैदानांत झालें. लढाई ऐन रंगांत आली असतां मुधोजीकडील सरदार **रघूजी करांडे** याचे बसत्या घोड्यासारखा एक घोडा बिन स्वाराचा मोकळा **सुटला.** तो पाहून बातमी उठली कीं, **रघूजी करांडा** पडला. त्यामुळें सर्व **फौज** घाबरून **मुधोजीचा** मोड झाला. मुधोजीचा फडणवीस **मोरोपंत** हा **जानोजीच्या** ताब्यांत सापडला; परंतु **रघूजी करांडे** याने फौज सांवरून पुन्हां लढाई दिली व **मोरोपंतास** सोडवून आणिलें. परंतु एकंदरींत **जानोजीचा** जय होऊन **मुधोजीची** फौज मागें हटली. **जानोजीनें** मुधोजीचा पाठलाग केला परंतु तो **कारंज्याच्या** रोखानें निघून गेला.[२]

मध्यस्थाची मध्यस्ती दोघांहि भावांकडे चालू होती व दोघेहि आपआपली बाजू रंगवून पेशव्यांकडे पत्रें पाठवीत होते. प्रत्येक जण आपलेकडे चूक नाही असें दाखवीत होता. या बाबतीतील कांही अस्सल पत्रें उपलब्ध आहेत ती वाचण्यासारखी आहेत.[३]

---

१ पे. द. भा. २० ले. १०२ ता. ११–१०–११५९ चें मुधोजीचें पेशव्यास पत्र.

२ बखर पान ६२

३ पे. द. भा. २० ले. १०१ ते ११० पहा.



**मुधोजी भोंसले,** सेनाधुरंधर ] [ पृ.१२६

**जानोजी व मुधोजी यांचा तह**– या दोघा भावांच्या भांडणांत जानोजीकडून **त्रिंबकजी** राजे व **मुधोजी**कडून **रघूजी करांडे** हे मुख्य होते. जानोजीचे पक्षपाती **दिवाकरपंत** व **बाळाजी केशव** हे नागपुरास मागील बंदोबस्ताकरितां राहिले होते. राज्याचा कारभार चालवून शिवाय पेशव्यांच्या सरकारी रकमेची फेड करणें याची व्यवस्था त्यांचेकडे होती. **उदेपुरी गोसावी**[1] हा सावकार सातार्‍याहून नागपुरास येणार होता, व त्याचें कर्ज काढून पेशव्याकडे पैसा पावता करावयाचा होता. मुधोजी हा वर्‍हाडांत धुमाकूळ घालीत होता. त्यानें तमाम " वराड लोकांत वाटले, मोकासे दिले, अनागोंदीचें राज्य वाटले[2] " यामुळें सर्वत्र घोटाळा झाला. शेवटी वर्‍हाडांत लाडाचे कारंज्याजवळ दोन्ही पक्षांतील तहाची बोलणीं निकरावर आली. पेशव्याचा वकील **व्यंकटराव** मोरेश्वर हाहि स्वारींत असून आपल्यापरीं मध्यस्ती करीत होता व पेशव्यास वर्तमान कळवीत होता. **पिराजी नाईक निंबाळकर** हाहि स्वारींत जानोजी बरोबर असून दोघा भावांचा मिलाफ व्हावा अशी खटपट करीत होता. शेवटी **जानोजी** व **मुधोजी** यांजमध्यें तह झाला की, **मुधोजी** आप्पाने सर्व कारभार करावा व **रघूजी करांडे, त्रिंबकजी राजे** व **पिराजी निंबाळकर** या तिघांनी दोघा भावाचे दरम्यान राहून पुढें तंटा होऊं न द्यावा. या दोघा भावांचा तंटा पुन्हां मिटविण्याकरिता पेशव्यानें दोघांनाहि आपापल्या सैन्यासह आपणाकडे बोलाविलें होतें. कारण त्यावेळी मराठ्यांची निजामाशी लढाई चालू होती. हीच प्रसिद्ध उदगीरची मोहीम होय. या वेळेस सदाशिवराव भाऊ हा दौलताबादेच्या जवळपास होता. जानोजीचें म्हणणें होतें की, पूर्वीप्रमाणें पेशव्यांकडे जाऊन तंटा तोडावा. परंतु मध्यस्थांच्या आग्रहावरून वरप्रमाणें ठराव झाला.

---

१ हा उदेपुरीगोसावी सातार्‍याच्या बन्सीपुरीच्या मठांतील महंताचा शिष्य असून या मठाची सर्व संस्थानांत सावकारी होती व त्यांची दुकानेंहि जागोजाग होती. उदेपुरी हा नागपुरास राहिला होता. हाच उदेपुरी गोसावी पुढें कलकत्त्यास इंग्रजांकडेस नागपुरकर भोसल्यांतर्फे वकील म्हणून राहिला होता.

२. पे. द. भा. २० ले. १०६ पेशव्यांचा वकील व्यंकटराव याचें पेशव्यास पत्र.

ता. ९–१–१७६० रोजीं दोघांहि भावांनीं बरोबरच सदाशिवराव भाऊस पत्रें[१] लिहिली कीं," उभयपक्षी कलह न व्हावा. तेथील लक्षानरूप परस्परे समजोन दोन्ही फौजा तयार होऊन यावे म्हणोन लिहिले. यैसी यासी गोसावी याचे मर्जी प्रमाणें वर्तावे हेच उभयपक्षीहि आवश्यक. आज्ञो प्रो। कलह दूर होऊन यैक्यता जाली. अत:पर कोन्हे गोष्टीचा गुंता राहिला नाहीं. फौजा सिधच आहे. पत्रामागे अविलंबेच येऊन पाहोचत असो." दोघांच्याहि पत्रांतील मजकूर एकाच बैठकींत लिहिल्यासारखा दिसतो.

मुधोजी याचे पक्षांतील मंडळीचा रोख जानोजीचे कारभारी **दिवाकरपंत** व **बाळाजी केशव** यांचे विरुद्ध ज्यास्त होता. त्यांतच **त्रिंबकराजे** हाहि **सामील** झाला असें दिसतें. त्या सर्वांनीं मिळून जानोजीपासून कबूल करून घेतलें कीं, वरील दोघांस कैद करून एकास **देवगडचे** किल्ल्यांत व दुसऱ्यास **आंबेगडच्या**[२] **किल्ल्यांत** ठेवावें. ते मोकळे असले तर मुधोजी अप्पास सुरळीतपणें कारभार करूं देणार नाहीत. पिराजी नाईक व स्वत: **जानोजी** हे या गोष्टीचे फार विरुद्ध होते. विशेषत: **दिवाकरपंता**सारखा मनुष्य काढल्यानें कारभारांत दुसरा कर्तबगार मनुष्य नाहींसा होऊन अडचण पडेल असें त्यांना वाटलें. **दिवाकरपंत** व **बाळाजी केशव** यांना वरील वर्तमान समजतांच ते फार घाबरले. त्यांनीं पेशव्यास पत्र लिहून[३] विनंति केली कीं, त्यानें "दोघा भावांस पत्रें पाठवून वरील प्रकार घडूं न द्यावा."

तह झाल्यानंतर उभयता बंधू आपआपल्या सैन्यासह **वाशमा**जवळ पेनगंगेवर आले व सदाशिवरावभाऊचें पत्र आल्याप्रमाणें त्यास मिळण्याकरतां निघाले. **सदाशिवरावभाऊ** हा **उदगीरची** लढाई जिंकून पैठणचे जवळपास आला होता व खुद्द **नानासाहेब** पेशवा **अहमदनगरचे** बाजूस होता. निजामअल्लीशीं लढाई चालूच होती. त्यानंतर **जानोजी** हा **रघूजी**

---

१ पे. द. भा. २० ले. १११ व ११२.

२ हल्लींच्या भंडारा जिल्ह्यांत.

३ पे. द. भा. २० ले. १०८. ता. ३–२–१७६० इ.

**करांडयास** घेऊन **नडसी बाम्हनी**वरून **जोगाईचे** आंब्यास १२ हजार सैन्यासह आला व दुसरे दिवशी **सदाशिवरावभाऊस** मिळाला. मुधोजी हाहि निराळ्या मार्गानें त्याच सुमारास **सदाशिवरावभाऊ**कडे आला. निजामअल्ली व सलाबतजंग यांशी फेब्रुआरी १७६० मध्यें तह होऊन ही उदगीरची मोहीम लवकरच संपली. त्यामुळें **जानोजी** व **मुधोजी** यांचे सैन्याचा उपयोग उद्गीरच्या मोहिमेंत पेशव्यास झाला नाहीं. **आंबे** व **परतूड** येथें **सदाशिवरावभाऊ**, दादासाहेब व नानासाहेब पेशवे या त्रिवर्गाच्या भेटी होऊन उत्तर हिंदुस्थानांत मोहीम करण्याच्या मसलती झाल्या. याच मसलतीत सदाशिवराव भाऊ व दादासाहेब यांजमध्यें कडक भापणें होऊन सदाशिवराव भाऊनें उत्तरहिंदुस्थानच्या मोहिमेंत कर्ज केल्याबद्दल दादासाहेबास दोप दिला. त्यामुळें सदाशिवरावानें उत्तर हिंदुस्थानच्या मोहिमेस जावें व दादासाहेबानें पुण्यास राहून कारभार करावा असें ठरलें. हा ठराव **पडतूर** येथें रंगपंचमीच्या सुमारास झाला. **सदाशिवराव** भाऊ यानें प्रसिद्ध **पानिपत**च्या मोहिमेचा पहिला मुक्काम **शिंदखेड** येथें केला. मागें निजामावर दाब ठेवण्याकरतां **दादासाहेब** कांहीं दिवस गंगथडींत राहिला.

**इ. स. १७६०—सदाशिवरावभाऊ** बरोबर उत्तर हिंदुस्थानच्या मोहिमेस भोंसले बंधूपैकी कोणीच गेले नाही. त्या दोघांचा तंटा नुकताच तुटला असून मागें सर्व अव्यवस्था माजली होती, म्हणून दोघांनाहि परत नागपुरास जाणें जरूर होतें. शिवाय घरगुती तंटयामुळें व वऱ्हाडप्रांत फौजेच्या धामधुमीमुळें व विशेपतः निजामअल्लीच्या फौजेच्या जुलमामुळें वैराण झाला असून दोन वर्षात वसुली कांहीच झाली नव्हती. त्यामुळें दोघेहि भोंसले बंधु निर्धन झाले होते. शिवाय पेशव्यांचे २० लाख रुपये नजराणे देणें राहिलेच होते. याप्रमाणें भोंसलेबंधूंस पैशाची ओढ फारच होती. त्यामुळें त्यांनीं पानिपतच्या मोहिमेस जाण्याचें टाळलें. त्रिवर्ग पेशव्यांच्या व भोंसलेबंधूंच्या भेटी **पडतूर** मुक्कामीं झाल्या असाव्यात असें दिसतें. यानंतर भोसलेबधू हे नागपुरास परत आले व पावसाळाभर नागपुरास राहिले.

**दिवाकरपंत** व बाळाजी केशव यांस कैद करण्याचा ठराव भोंसले बंधूंच्या समेटांत झाला होता. परंतु पेशव्यांनीं या संबंधांत भोंसले बंधूंची कानउघाडणी केली असावी व भोंसले बंधू नागपुरास आल्यानंतरहि पेशव्याचीं पत्रें त्यांना त्या संबंधांत गेलीं होतीं. त्यावरून दिवाकरपंतास कैद करण्याचा विचार रहित होऊन त्यांचा सलोखा झाला.

**निजामअली** हा उदगीरच्या तहामुळें गेलेला मुलूख परत मिळविण्याची खटपट करीत होता म्हणून त्याचेवर दाब ठेवणें अवश्य होतें. बरेंचसें मराठे लष्कर उत्तर हिंदुस्थानांत गेल्यामुळें मोंगलांचे जवळपास मराठे सैन्याचा दाब ठेवणें जरूर होतें. तसेंच उत्तर हिंदुस्थानच्या मोहिमेस सदाशिवरावासहि सैन्याची मदत पाहिजे होती म्हणून नानासाहेब पेशव्यानें जानोजी भोंसल्यास पत्र लिहिलें [१] कीं, "आम्ही दसऱ्यास पुण्याहून निघून पैठणाकडेस जाऊं तरी तुम्ही सैन्यासह आम्हांस पैठणास मिळावें. त्यानंतर जिकडे स्वारीचा नेम ठरेल तिकडे तुम्हांस रवाना केलें जाईल." **जानोजी या** पत्राप्रमाणें सैन्य जमवून निघाला. **रघूजी करांडे** यास त्यानें १० हजार लष्कर देऊन पुढें रवाना केलें व आपण **बाळापूर, उंद्री** वगैरे ठिकाणी मुक्काम करून व वऱ्हाड प्रांताची व्यवस्था लावून पुढें पैठणाकडेस गेला. पेशव्यांचा वकील **व्यंकटराव मोरेश्वर** याने पेशव्यास यावेळी जें पत्र[२] लिहिलें आहे त्यावरून मोगलांच्या स्वाऱ्यांमुळें वऱ्हाड प्रांताची स्थिति कशी झाली होती तें दिसून येईल. मागील दोन वर्षांत निजामअलीनें औरंगाबादेपासून तों बऱ्हाणपुरापर्यंत मुलूख लुटून फस्त केला होता व हल्लीहि तो बऱ्हाणपुरास जाऊन राहिला होता.

व्यंकटराव लिहितो कीं, "वराड खराब बहुत जाले. गावचे गाव मारले. रांडा भ्रष्ट केल्या, यैसे मागे कधीहि जाले नाही. थोरले नबाब **आसफज्या** होते त्याणी कधी यैसे केलें नाहीं. याचा इतबार विश्वास तिलतुल्य नाहीं. महिना पंधरा दिवस जाजती लागतील परंतु त्याचा नेशनाबुद केलीया वांचून होणारच नाहीं कीं हा विस्वास देईल. कोणे

१ पे. द. भा. २० ले. १२४

२ पे. द. भा. २० ले. १२५ ता. १–१२ १७६०

समयी काये करील हे न कले. **सलाबतजंगाचें** व **बसालतजंगाचें** या दोघांचें भय तिलतुल्य नाहीं, याजसाठी आम्हीहि याचे पारपत्य बरेच करीतोत आणि बनेल तर साहेबीहि. याणे फारच शोखी केली तर उपराला करावा. परंतु निदानी सांप्रत्य तर नाहीं. परंतु शेवटीं बुऱ्हानपुरास भोवता मुलूख लुटला जाईल, त्यासी येथील तालुकदारास अज्ञा करावी कीं, मूलूख मारला जाईल, आणि लुटला जाईल, तर तुम्ही तमाम रयेतीस ताकीद करून रयेत थारीयासी येकीकडे न्यावी, नाहीतर खराब होईल. मागतीन फिरोन वराडात आला तर बरे जाले, नाहीतर संकट आहे. तसी तर ताकीद फारच आहे परंतु नाईलाज जाणून करावे लागते. वराडांत कितेक रांडानी जीव अडांत पडून दिल्हे; कितीकानी गलफास घेतले; कितीकानी पोट कटारीया करून घेतल्या. दहा हजार रांड भ्रष्ट केल्या. गाडदी मानीत नाहीत. तमाम गावचेगाव बलेच मारीतात. नबावा जवळ खर्चास नाहीं. शहरास गेला आहे. तमाम साहुकारा लुटावा आणि सिबंदीस द्यावे मग काय होईल ते सुखरूप हो, याजसाठी बुरानपुरास गेला आहे. तिथे यैवज पाहवे काये मिलवितो. परंतु रुपया नाही. याच्या चितांत आहे कीं पंचवीस लाख रुपये हरतजवीजीनें मिलवावे आणि इतक्यातच सिबंदीने फार मातबर काम करावे यैसी भाशने करितो. तर काये चिंता आहे ? आम्ही यासी हार येतो? आमची सरदारी येक्या आंगे उणी आहे की द्रव्य नाही. इतका कारभार मात्र कठिण आहे. ”

**निजामअली** यानें वर प्रमाणें उपद्रव करून तो बऱ्हाणपुरास गेला. **रघूजी करांडे** यानें मोगलांच्या फौजेशीं दोन लढाया देऊन त्याचे पुष्कळ लोक मारले, व निजामास बऱ्हाणपुरास कोंडून भोवतीं राहिला. **निजाम** बऱ्हाणपुराबाहेर निघतांच त्याचेवर हल्ला करावा असा **रघूजी करांड्यानें** विचार करून तो त्याच बाजूस राहिला.

**इ. स. १७६१**— पानिपतचा संग्राम होऊन मराठ्यांचा मोड झाल्याची बातमी कळण्यापूर्वींच **नानासाहेब** पेशवा हा सदाशिवरावभाऊस मदत करण्याकरितां सैन्य घेऊन उत्तरहिंदुस्थानांत गेला होता. त्यावेळीं त्याचेबरोबर **जानोजी** व **मुधोजी** भोंसले हे आपल्या लष्करांसह होते, परंतु मध्येंच

**भिलसा** येथें पानिपतच्या अपयशाची बातमी नानासाहेबास समजली व तो पुढें दिल्लीपर्यंत जाऊन नंतर त्याची प्रकृति बिघडून त्यास बरोबरच्या लोकांनीं परत फिरविलें. परंतु बरोबरची सरदार मंडळी व सैन्य उत्तर-हिंदुस्तानांतच राहून त्यांनीं मोडलेल्या मराठी सैन्याचा परामर्ष घेतला. तसेंच मराठ्यांच्या पराजयामुळें उत्तर हिंदुस्थानांतील लहान मोठे संस्थानिक मराठ्यांविरुद्ध उलटले होते त्यांस तंबी देऊन मराठ्यांचा जम त्यांनी पुन्हां बसवून दिला. **जानोजी** हा बुंदेलखंडांत **रेवामुकुन्दपूर**, सागर, हट्टा या बाजूस राहिला होता व तेथें त्यानें **हिंदुपत** राजे वगैरे बुंदेले संस्थानिकांना काबूंत आणिलें.

**जानोजी** भोंसल्यानें बुंदेलखंडांतून पेशव्यास ता. ८–५–१७६१ रोजी लिहिलेल्या पत्रांत तो लिहितो " माघारे जाता मुलुखाची पायमाली न करावी. वराड प्रांतीं गेल्यानंतर मोगलाई अमलाची जफती करावी म्हणोन लिहिलें. ऐसीयास गोसावी यांनी आम्हांस व राजश्री **गोपाळराव** यामि **खेचिवाडियाचे** पारिपत्त्याबद्दल ठेविलें होतें. त्यास तेथील गुता उरकून दरकूच **सुरंजेस** आलो. तेथून मंडले प्रांताचें बंदोबस्ताबद्दल सागराचें सुमारे आलो तो राजश्री **विसाजी गोविंद** कमाविसदार दिम्मत राजश्री **बाळाजी गोविंद** हे भेटीस येऊन निवेदन केलें की, **बुंदेलखडांत** बुंदेले यांनी जमाव करून तमाम ठाणी घेतली. एक **सागर** व **हाटे** राहिले त्याजमध्ये **हाटयास** मोर्चे लाविले आहेत. ते घेतल्यानंतर **सागरास** लागतील. म्हणजे बुंदेलखंडाचा अंमलच उठतो. याची साहित्य केलिया मुलुक राहतो. नाहींतर नाहीं. यास्तव या प्रांतीं येऊन **हाटयाचे** मोर्चे कापून काढिले. वरकड ठाणी घेऊन मशारनिलेचे स्वाधीन केलीं याचा मजकूर सविस्तर पेशजी लिहिलाच आहे. सांप्रत राजश्री हिंदुपत राजे यांचा वकील सौरस्या निमित्य आला आहे. त्यास कमावीसदार मशार-नीलेचा व त्यांचा तहरह करून देऊन सत्वरच आपले प्रांतास जावयास होईल. जाते समयीं उत्तम प्रकारें फौजेत ताकीद करून गोसावी याचे मुलुखांत पायमाली सर्वथैव होऊन येणार नाहीं वरकड वराड प्रांतीचे जफतीचा मजकूर तर प्रस्तुत इस्तमालतीचे दिवस आहेत या दिवसांत

जफती जहालिया इस्तमालतींत खराखना होती. यास्तव हे दिवस जहालिया नंतर गोसावी यांचे आज्ञेप्रमाणेच वर्तणूक होऊन येईल.''[१]

या सुमारास **मुधोजी** भोंसले यानें कांहीं कामगिरी केल्याचें दिसत नाहीं. भोंसल्यांच्या पदरचे **बाबूराव कोन्हेर** व **यशवंत कोन्हेर**[२] हे दोघे बंधू पानिपतच्या लढाईपूर्वी पेशव्यातर्फे उत्तर हिंदुस्थानांत गेले होते. ते **झांशी** येथें बंदोबस्त करीत होते. **बाबूराव कोन्हेर** हा **झांशी** येथें राहिला होता. **गणेश संभाजी खांडेकर** या गृहस्थानें पुढें झांशीची मामलत **बाबूराव कोन्हेर** याजकडून घेतल्याचा दाखला आहे. नागपूरकर भोंसल्यांचा अंमल झांशी प्रांतावर नव्हता व बाबूराव कोन्हेर हा आधीच नागपुर सोडून परत देशीं गेला होता. हा **गणेश संभाजी** पुढें नागपूरकर भोंसल्यांचेतर्फे कटक प्रांतांत सुभेदार होता त्याजविषयीं माहिती पुढें सविस्तर येईल. [३]

जानोजी हा उत्तर हिंदुस्थानांतील कामगिरी आटोपून इ. स. १७६१ च्या जून महिन्यांत परत नागपुरास आला.

**जानोजीस सेनासाहेबीची सनद (१७६१इ.)**—जानोजी व मुधोजी यांचा तंटा जरी नानासाहेब पेशव्याचे वेळेपासून तुटला होता (१७५७) व जानोजीस पेशवाईचीं वस्त्रें देण्याचें पेशव्यानें ठरविलें होतें तरी त्या दोघा भावांचें भांडण न थांबल्यामुळें त्यास छत्रपतीकडून वस्त्रें मिळालीं नव्हतीं. नानासाहेबांचे मृत्यूनंतर माधवराव पेशव्यास पेशवाईचीं वस्त्रें मिळविण्याकरितां राघोबादादा त्यास घेऊन सातार्‍यास गेला. त्याच वेळीं त्यानें **ताराबाईस** विनंति करून जानोजीसहि सेनासाहेब सुभ्याची सनद देवविली.[४] (ता. ६–८–१७६१ इ.)

---

१ का. सं पत्रें यादी वगैरे ले. १८८ (चित्रशाळा)

२ मुजूमदार. सरदेसाई म. रि. मध्य वि. भा. ३ पा. २१२

३ भाग १० पहा.

४ या वेळचीं दोन पत्रें हल्लीं उपलब्ध झालीं आहेत. त्यांपैकीं एक पत्र असें:— (ता. ६–८–१७६१ इ.)

'श्री' श्रावण शु.॥ ६ श. १६८३.

पु॥ राजमान्य राजेश्री जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा यास आज्ञा केली ऐसीजे. पेसजी पासून तुम्हांस हुजूरचे पत्री सेनासाहेब सुभ्याचा

# पेशव्याचे घरांतील गृहकलह

**दादासाहेब पेशव्याची कारकीर्द : निजामाशीं बेबनाव : जानोजी निजामास मिळतो**---नानासाहेब पेशवा मरण पावल्यानंतर त्याचा मुलगा **माधवराव** यास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. माधवराव त्या वेळीं १६।१७ वर्षांचा असल्यामुळें सर्व अधिकार **राघोबादादा**च्या हातीं आला. त्यानंतर लवकरच सातान्यास **ताराबाई** ही मरण पावली. ताराबाईनें छत्रपती **रामराजास** साताराच्या किल्ल्यावर कैदेंत टेविलें होतें. ताराबाईचे जागीं छत्रपतीस ताब्यांत घेण्याकरितां **जानोजी** भोसले व कोल्हापुरकर **संभाजी** हे उमेदवार होते. परंतु पेशव्यानेंच छत्रपतीस आपल्या ताब्यांत घेतलें व गडावरून कैदेंतून सोडवून त्यास खालीं शहरांत आणिलें आणि

---

किताब ल्याहावयाची आज्ञा नव्हती. त्यास पुणियाहून हुजूर राजश्री रघुनाथ बाजीराव व राजश्री माधवराव बल्लाळ सातारियास आले. कितेक विनंती करणें ते केली. राज्याचा कारभार त्याजवरच साहेबी टेविला आहे. यास्तव कृपा करून पेशवाईची वस्त्रें राजश्री माधवराव पंडित प्रधान यास दिल्ही. निरोप समयी पंतप्रधान व रघुनाथ बाजीराव यानी अर्ज करून तुम्हास सेनासाहेब सुभ्याचा किताब मागून घेतला. तुम्ही राज्यातील मातबर सरदार कार्यकर्ते जाणोन साहेबी तुम्हावर कृपाळू होऊन हुजुरचे पत्री ल्याहावयाची आज्ञा करून पत्र लिहविले आसे. तरी यंदा मोगलाने सोकी करून बिघाडाचा डौल धरला आहे तरी हे आज्ञापत्र पावतांच भारी फौजेसुधा जलदीनें पंडित मशारनिलेस सामील होऊन यवणाचे पारपत्य होये ते करणें. येन्हेकडुनच तुमचे सेवेचा मजरा होईल तुम्ही हुजूर दर्शनास याल तेव्हा तुम्हास किताबाचा सिरपावही साहेब कृपा करून देतील. तुम्हीं आपले चिताचे समाधान निश्चये पूर्वक आसो देणे तुमचे वडीली राज्यांत सेवा केली त्याची परिक्षा येंदा होईल जाणिजे छ. ५ माहे मोहरम सु॥ इसन्नेसीतैन मया व अलफ बहूत काये लिहिणे —सुज्ञ असा.

सदरहू पत्राप्रमाणें दिलेली सनद ऐ. प. ले. ४४३ मध्यें हल्लीं छापली आहे.

त्यास मोकळें राहूं दिलें. नंतर माधवराव पेशव्यानें त्यास त्याच्या खासगत वतनाचा स्वतंत्रपणें कारभार करण्यासहि मोकळीक दिली. याप्रमाणें ताराबाईच्या कडक कैदेंतून तो मोकळा होऊन त्यास कांहींशी स्वतंत्रता मिळाली.

पानिपतचे लढाईपूर्वी **सदाशिवराव**भाऊचीं व **विश्वासरावा**चीं नानासाहेबांस एकसारखीं पत्रें येत होतीं कीं, सैन्य व पैसा पाठवा. नानासाहेबानें ४० हजार फौज तयार केली. परंतु ती सर्व पाठवावी तर मागें निजामअली कांहीं गडबड करील ही भीति होती. त्यामुळें एक तर निजामाशीं गोडी करून त्याला सैन्यासह आपल्याबरोबर उत्तर हिंदुस्थानांत न्यावें अगर तें न जमल्यास त्याचेकरितां मागें सैन्याचा बंदोबस्त ठेवावा हे दोन मार्ग होते. नानासाहेबानें दादास निजामाकडे पाठविलें व त्यास हिंदुस्थानांत चलण्याबद्दल म्हटलें, परंतु त्यानें उडवाउडवीच्या गोष्टी करून जाण्याचें टाळलें. नानासाहेबाचें लष्कर उत्तर हिंदुस्थानांत गेल्यानंतर राघोबादादास निजामाकरितां मागें ठेवणें भाग पडलें, कारण निजाम या संधीचा फायदा घेतल्याशिवाय रहाणार नाहीं ही खात्री होती. उद्गीरच्या स्वारींत आपला गेलेला मुलूख परत मिळविण्याची खटपट निजाम जरूर करील हें दिसतच होतें व त्याप्रमाणें त्याचा रोख पाहून राघोबादादानें निजामावर चाल करून **मेदकचे** बाजूस त्यांच्या दोन तीन चकमकीहि झाल्या.

**निजामाची पुण्यावर स्वारी : उरळीची मोहीम–(इ. स. १७६१)—** नानासाहेब पेशव्याच्या मृत्यूनंतर निजामअलीस जास्तच हुरूप आला व त्यानें बेदर व औरंगाबाद येथें लढाईची तयारी चालविली. इ. स. १७६१ चे पावसाळ्यानंतर त्यानें पन्नास साठ हजार फौज जमवून पुण्याच्या रोखानें चाल केली व जातांना रस्त्यांत **कायगावटोकें** येथील देवालयांचा विध्वंस केला व त्याच्या सैन्यांतील मुसलमान शिपायांनीं व सरदारांनीं तर त्याबद्दल मोठा उत्सव केला; परंतु या त्यांच्या मूर्खपणाच्या कृत्यानें त्याच्या सैन्यांतील मराठे सरदार चिडून गेले व ते त्याचें लष्कर सोडून निघून गेले. त्यांतच प्रसिद्ध धनाजी जाधवाचा नातू व चंद्रसेन जाधवाचा मुलगा **रामचंद्रराव जाधव** हा निजामास सोडून पेशव्यास

येऊन मिळाला. तो थोडे दिवस पेशव्याकडेसच होता. इकडे **राघोबा**दादानें-हि मराठी सैन्य जमवून **निजामअल्लीवर** चाल केली व दोन्ही पक्षांच्या चकमकी झाल्या. ही मोहीम **उरळीची स्वारी** या नांवानें प्रसिद्ध आहे. या चकमकीचें वर्णन नारो शंकराचा पुतण्या विश्वासराव यानें ता. २०-१२-१७६१ च्या पत्रांत केलें आहे. [१]

या लढाईंत जानोजी भोंसला हा प्रथम सात आठ हजार फौजेनिशी राघोबादादास मिळाला होता व तो **चांभारगोंद्याच्या** लढाईंत हजर होता असें वरील वर्णनावरून दिसतें. निजामाचाहि प्रयत्न जानोजीस फोडण्याचा चालूच होता. शेवटीं जानोजीनें त्याच्या नेहमींच्या रीतीप्रमाणें राघोबादादाकडून आपला फायदा करून घेण्याकरितां करारमदार करून घेतले. राघोबादादाकडे त्यानें ता. १-८-१७६१ [२] रोजीं पांच कलमांची एक कलमबंदी ( अ.प्र.) पाठविली.

राघोबादादानें ही कलमें कबूल केलीं. कारण मोगलांचे जानोजीस फोडण्याचे प्रयत्न यशस्वी होण्याचा संभव आहे असें त्यास समजलें. या यादी-नंतर बोलणेंचालणें होऊन पक्की कलमबंदी ११ कलमांची राघोबादादानें पैठण मुक्कामाहून मंजूर करून जानोजीकडे पाठविली. (ता. ३१-१०-१७६१ कार्तिक शु।। ४ शके १६८३) [३] ती अशी:—

१ ऐति. पत्रव्यवहार पान ७८.

२ छ १ सफर इसने सीतैनमया व अलफ (भाद्रपद)

३ वरील मिति छापील पुस्तकांत दिली नाहीं; परंतु सदरहू कलम-बंदीची एक विश्वसनीय नक्कल आम्हास मिळाली, तींत वरील मिति दिली आहे. ऐ. पत्रव्यवहार ले. १०२ यांत दिलेली मिती चुकीची आहे. राक्षसभुवनच्या लढाईपूर्वीं राघोबादादानें ऑगस्ट (१७६३) जानोजीस फोडलें त्या वेळची ही यादी असावी अशा समजुतीनें ती तारीख घातली आहे. वरील कलमबंदीच्या शेवटीं खालील मजकूर आहे, तो छापील प्रतींत नाही.

"वीसा पंचवीसा कोसा अलीकडे यावें व वराडची जफती करावी. येणेंप्रमाणें लवकर करावे. फौज जी जमा जाहाली असेल तितक्याशीच लवकर हूजूर यावे. नावाचे सलाबतीनेंच बहुत काम होईल. यास्तव जलद यावे. बाकी फौज येतच आहे. . . छ. २ रबिलाखर सु।। इसन्ने. कार्तिक मास मुा पैठण गंगातीर."

जानोजीचा दहा लक्षांचा रोखा पेशव्याजवळ होता तो माफ करावा. मुधोजीचा पंधरा लक्षांचा मुलूख जानोजीस द्यावा. मुधोजीचें कर्ज जानोजीनें द्यावें. मोगल दरोबस्त बुडाल्यावर त्याचा वऱ्हाडचा मुलूख जानोजीस द्यावा. पेशव्याचे दिल्लीचे वकिलाबरोबरच भोंसल्याचाहि एक वकील रहावा, परंतु त्यानें पेशव्याचे वकिलामार्फत जाबसाल करावा. गंगथडी प्रांतांत जानोजीचा घासदाण्याचा हक्क होता, परंतु तो मुलूख सरकारांत आला, त्याचे बदली वऱ्हाडचे सरदेशमुखीचा ऐवज भोंसल्यास द्यावा. पटणें मुधोजीकडे आहे तें जानोजीस द्यावें. पेशव्यानें जानोजीचे भावाबंदांचा पक्ष धरूं नये. एकमेकांचे सरदार एकमेकानें ठेवूं नयेत वगैरे.

वरील चकमकीनंतरसुद्धां निजाम पुण्याजवळ उरळीपर्यंत चाल करीत आला व पुणें शहर सुद्धां गडबडलें. तेव्हां मात्र मराठे सरदारांनीं निरनिराळ्या बाजूंनीं निजामाच्या सैन्यावर हल्ले करून त्यास बेजार केलें व त्याचेभोवतीं वेढा देऊन त्यास त्यांत कोंडलें. तेव्हां त्याच नाइलाज होऊन त्यानें तहाचें बोलणें लाविलें. या वेळीं निजाम आयताच हातीं सांपडला आहे तर त्याचें अजीबात उच्चाटन करून त्याचें सर्व राज्य घ्यावें व दक्षिणेंतून हा कांटा काढून दक्षिण मोकळी करण्याचा मराठेशाहीचा संकल्प सिद्धीस न्यावा असा सर्व मराठे सरदारांचा आग्रह होता. त्यांत मुख्य **रामचंद्रराव जाधव, गोपाळराव पटवर्धन** व **बापूजी नाईक** हे होते. निदान उद्गीरच्या लढाईतून वांचलेला त्याचा बराचसा मुलूख तरी घेऊन त्यास पूर्णपणें निर्बल करावें असें त्यांचें म्हणणें होतें, परंतु **राघोबादादानें** सखाराम बापूच्या सल्ल्यानें निजामाशीं तह केला. त्यांत त्याचा मुलूख मुळींच न घेतां उलट पूर्वी उद्गीरच्या लढाईंत मिळालेला २७ लक्षांचा मुलूख **राघोबादादानें निजामास** परत दिला. यामुळें सर्व मराठे सरदार **राघोबादादा** व **सखारामबापू** यांचे विरुद्ध चिडून गेले. **सखारामबापू** यानें निजामाकडून कांहीं लुचपत घेतली असावी व **राघोबादादानें** त्याच्या भोळसट स्वभावास अनुसरून अगर पुढें मागें पुतण्याशीं बिघाड झाल्यास निजाम हा आपल्या उपयोगी पडावा या हेतूनें, असा तह

केला असावा असा संशय येतो. एकंदरींत राघोबादादाचें हें कृत्य निवळ आत्मघातकीपणाचें झालें यांत संशय नाहीं.

**गृहकलह**—**राघोबादादाच्या** या वर्तनामुळें **माधवराव** पेशवा व त्याची आई **गोपिकाबाई** यांचेंहि मन **राघोबादादावरून** उडालें व त्यांतच **आनंदीबाई** व **गोपिकाबाई** यांजमधील भांडणांची भर पडून गृहकलहास सुरवात झाली.

या गृहकलहाचा शेवट असा झाला कीं, चुलतेपुतण्यांचे उघड उघड दोन पक्ष होऊन दोघांच्या उघड उघड लढाया सुरू झाल्या. राघोबादादाचें म्हणणें राज्याची अर्धी वांटणी आम्हास द्यावी. अल्पवयी माधवरावानें पुष्कळ समजावून पाहिलें. परंतु राघोबादादा आपला हट्ट सोडीना. त्यानें व सखारामबापूनें निजामाची मदत मागितली. नुकत्याच झालेल्या तहांत **राघोबादादानें निजामास** उपकृत करून या गोष्टीचा पाया घालून ठेविलाच होता व निजामहि हीच संधि पहात होता. **निजामानें** राजे **विठ्ठल सुंदर** व औरंगाबादेचा सुभेदार **मुरादखान** यांस फौजेसह **राघोबादादा**-बरोबर पाठविलें व **राघोबादादा** त्या सैन्यासह पुण्याकडेस चाल करून निघाला. निजामअलीनें स्वतःहि मागाहून येण्याचें कबूल केलें. जानोजी भोंसले हाहि वऱ्हाडांत सैन्यासह येऊन पोंहचला होता व तोहि **राघोबादादास** मिळतो कीं काय अशी शंका येऊं लागली होती.

**आळेगांवची लढाई**—ता. ७ नोव्हेंबर १७६२ इ. रोजीं **घोडनदीवर** व त्याचे पांचवे दिवशीं **आळेगांव** येथें दोन्ही सैन्यांच्या लढाया झाल्या. **राघोबादादानें** व **सखारामबापूनें माधवरावाच्या** सैन्यांतहि फितूर केला होता, त्यामुळें त्याच्या पक्षाच्या कांहीं फितुरी सरदारांनीं ऐन वेळीं पळ काढला. या लढाईत १८ वर्षें वयाच्या तरुण **माधवरावानें** मोठा पराक्रम केला. परंतु त्याचा पराजय होऊन त्यास **भीमेच्या** पलीकडे पळ काढावा लागला. **राघोबादादानेंहि भीमा** उतरून पेशव्यास गांठलें. माधवरावाच्या फौजेस दोन दिवसांचा उपवास पडला होता व खुद्द पेशवाहि तापामें आजारी पडला होता. त्यानें राहिलेल्या सरदारांशी सल्लामसलत करून असें ठरविलें कीं, घरचा बखेडा जास्त वाढवन मोंगलांसारखा परशत्रु घरांत शिरूं देण्यापेक्षां राघोबादादाशीं समेट करून त्याच्या

स्वाधीन व्हावें हें बरें. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं माधवराव राघोबादादाकडे जाऊन त्याचे स्वाधीन झाला व राज्याचा सर्व कारभार राघोबादादानें करावा असें त्यानें कबूल केलें. वरप्रमाणें चुलत्यापुतण्यांचा समेट झाल्यानंतर निजामअल्ली हाहि मागाहून तेथें येऊन पोहोंचला व त्यास मराठी राज्यांत हात शिरकविण्याची आपली संधि गेल्याबद्दल वाईट वाटलें. परंतु समेट झाल्याबद्दल वरकरणी आनंद दाखवून आपल्या कामगिरीचें बक्षीस राघोबादादापाशीं त्यानें मागितलें.

राघोबादादानें निजामअल्लीस त्याचे मदतीबद्दल ५१ लक्षांचा मुलूख व दौलताबाद, शिवनेरी, अशीरगड व अहमदनगर हे किल्ले देण्याचें कबूल केलें होतें. या तहास **पेडगांवचा तह** असें म्हणतात. परंतु पुढें लवकरच निजामअल्लीचा व राघोबादादाचा बिघाड झाल्यामुळें दौलताबादचा किल्ला खेरीज करून या तहांतील मुलूख निजामाचे ताब्यांत दिला गेला नाही.

**राघोबादादाचा कारभार व पेशव्याविरुद्ध कट**--राघोबादादानें माधवरावास अटकेंत टेविलें व माधवरावाच्या बाजूस असलेल्या सर्व सरदारांना व मुत्सद्यांना त्रास देणें सुरू केलें. त्या सर्वांचीं पिढीजाद कामें त्यानें काढून आपल्या पक्षाच्या मंडळीस दिलीं. मिरजकर गोपाळराव पटवर्धनाला पळावयास लावून मिरजेचा किल्ला तोफा लावून राघोबादादानें घेतला व **गोपाळराव** पळत होता त्याजवर हल्ला करून त्याचा पराभव केला. त्यामुळें गोपाळरावानें निजामाकडे पळून जाऊन त्याचा आश्रय धरिला. याचप्रमाणें दादाविरुद्ध रुष्ट झालेले **भवानराव प्रतिनिधी**, यमाजी शिवदेवाचा मुलगा **गमाजीबाबा,**[१] **पिराजी नाईक** निंबाळकर हेहि मराठे सरदार मोंगलांकडेच जाऊन मिळाले.

इतकें झाल्यावर निजामाच्या मनांत मराठी राज्य जिंकून आपल्या घशांत घालण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली व त्याचा दिवाण विठ्ठल सुंदर[२]

---

१ याचें नांव सदाशिव यमाजी. हा विठ्ठल सुंदर याचा व्याही होता. सरदेसाई म. रि. म. वि. ४ पान १४४.

२ हाहि नागपूरच्या दिवाकरपंताप्रमाणेंच त्यावेळच्या ३॥ शहाण्यांपैकीं एक असा समजला जात असे. तिसरा शाहणा सखारामबापू व अर्धा शहाणा

यानें या सर्व मंडळीचा बहुमान करून त्यांना ठेवून घेतलें व मदत देण्याचें कबूल केलें.

नवीन आशा दिसूं लागतांच निजामानें **पेडगांवचा तह** पाळण्याचें सोडून दिलें व राघोबादादानेंहि निजामाकडे आपल्याविरुद्ध चाललेल्या तयारीकडे पाहून त्या तहांतील मुलखाचा ताबा निजामास दिला नाही. **रामचंद्रराव** जाधव हा मराठा सरदार निजामाकडून निघून पेशव्याकडेस आला होता त्यास **राघोबादादानें** त्याचे वडिलाचें सेनापतिपद दिलें होतें. परंतु त्या पदाबरोबरच गुजराथ प्रांत देण्याचें कबूल केलें होतें. तो न दिल्यामुळें तो नाखूष झाला व लौकरच परत निजामाकडे जाऊन मिळाला.

पेशवाईविरुद्ध निजामाकडेस हा जो प्रचंड व्यूह जमला होता त्यांतच **जानोजी** भोंसल्यास ओढण्याकरितां **गोपाळ**राव पटवर्धन, **गमाजी बाबा** वगैरे मंडळीनें प्रयत्न केला. राघोबादादानें मिरजेस वेढा दिला होता त्यावेळी आपणांस सैन्याची मदत करण्याकरितां **गोपाळ**रावानें जानोजीस म्हटलें व त्यानें कबूलहि केलें. परंतु त्याच्या नेहमीच्या धरसोडीच्या स्वभावाप्रमाणें पेशव्यांशी उघड उघड वैर करण्याचा त्याच्या मनाचा

---

नाना फडणवीस. कारण त्यास लढाईचें ज्ञान नसून तो नुसता मुत्सद्दी होता. या त्रयीस " सख्या देवा विठ्ठला" असे म्हणत असत. विठ्ठल सुंदर यजुर्वेदी देशस्थ ब्राम्हण असून मूळचा संगमनेरचा राहणारा. आडनांव परशुरामी होतें. तो वऱ्हाडांतहि राहिलेला होता व वऱ्हाडांतूनच तो अकोट, आडगांवाकडून हैद्राबादेस जाऊन तेथें त्यानें नांव काढलें. सकळकळे म्हणून कोणी प्रसिद्ध ज्योतिषी जळगांव जामोदच्या बाजूस होता. त्याचेकडून मुहूर्त पाहून तो हैद्राबादेस गेला. पुढें तो लौकिकास चढल्यानंतर सकळकळे याशी कृतज्ञता बुद्धीनें वागे अशी आख्यायिका आहे. हा मोगलाईत प्रसिद्ध मुत्सद्दी **रामदासपंत** याचे मार्फतीनें प्रथम निजामअलीजवळ नोकर राहिला. व निजामअलीस हैद्राबादची गादी मिळविण्याचे कामीं याचा फार उपयोग झाला. तो मुत्सद्दी असून सेनापति होता. **विठ्ठल सुंदर** यास **राजेबहादर** व प्रतापवंत असा किताब असे. विठ्ठल सुंदराचें घराणें हल्लीं 'राजा गणेश' या नांवानें हैद्राबादेस ओळखिलें जातें.

निश्चय अद्याप झाला नव्हता. त्यामुळें त्यानें आपलें सैन्य तिकडे पाठविलें नाहीं. तरी तो निजामाच्या कारस्थानांत सामील झाला होता व बाह्यात्कारी पेशव्यांशींहि सूत दाखवीत होता. ही धरसोडीची वर्तणूक त्यानें यापुढेंहि कायम ठेविली व कधीं निजामाकडेस तर कधीं पेशव्याकडेस याप्रमाणें वेळोवेळी मिळून त्यानें आपली पूर्ण फजीती करून घेतली हें पुढें दिसून येईल.

मागील वर्षी (१७६१) निजामानें **टोकें** क्षेत्राचा विध्वंस करून पुण्यावर चाल केली त्या वेळीहि राघोबादादानें जानोजी भोंसल्यास मदतीस बोलाविलें असतां त्यानें मदत करण्याची टाळाटाळच केली व कर्नाटकच्या स्वारींतहि **हैदरअल्ली** व **निजाम** यांच्याशी पेशव्याविरुद्ध मिळण्याचा जानोजीचा खटाटोप चालूच होता. ही बातमी राघोबादादास समजली नव्हती असें नाहीं; त्याचे वकील व हेर भोंसल्याचे स्वारींत व निजामाकडेसहि असून ते त्यास जानोजीचें निजामाकडेस सूत्र आहे, ही बातमी कळवीत होते. इ. स. १७६२ मध्येंहि त्याचा हाच धरसोडीचा प्रकार चालू होता; परंतु तो राघोबादादाचे पत्रास जबाब देतच होता व त्याचेकडून आलेल्या वकिलासहि थापा देतच होता की, आमचा विचार तुमचेविषयीं निर्मळच आहे व आम्ही तुमच्या मदतीस सैन्यासह येतच आहों. या वेळेस जानोजीचा मुक्काम गंगथडीतच होता.

**जानोजी**तर्फे **त्र्यंबकजी**राजे भोंसले हा **महिपतराव चिटनविसास** एका पत्रांत लिहितो.:–

" तुम्ही व राजश्री दादासाहेबी कितेक अर्थ लिहिला त्याप्रमाणें राजश्री सेनासाहेबसुभा यासी बोलाविलें. यास तिलमात्र याचा अर्थ राजश्री दादा साहेबासीं दुसरा नाही. तुमचे लिहिल्यावरून आमची रवानगी करून पाठविली असे. सत्वरीच येऊन पोहोचतो. या समयीं हे सरदारी तुमची जाणोन साहित । करणें. सरदारींत कांही ताकद राहिली नाहीं. सर्व प्रकारें हे सरदारीची उभारणी राजश्री दादासाहेबी करावी उचित असे. आम्ही पत्रामागेच येत असो." (ता.२०–७–१७६२)

तसेंच **राघोबा**दादानें जानोजीस आणण्याकरितां तीन पतकें व **रामाजी बल्लाळ नांवाचा** वकील पाठविला. जानोजी ता. १४–११–१७६२ रोजीं

**दादास** लिहितो कीं, "पतकें **ऊगांव**चे मुक्कामीं येऊन भेटली व आम्ही **पाचवडीस** मुक्कामास आलों. दरमजल सत्वरच गोसावी याजवळ पोहचतों" **रामाजी बल्लाळ** हाहि जानोजीच्या स्वारींतून जानोजीनें सांगितल्याप्रमाणें राघोबादादास पत्रें लिहीतच होता कीं, जानोजी लवकरच दादास येऊन मिळतो. **राघोबा**दादाहि या वेळेस **पैठण**चे बाजूसच होता व जानोजीस निकडीचीं पत्रें पाठवीत होता. मोगलांचें लष्कर **नेवाशा**-जवळ होतें (नोव्हेंबर १७६२). राघोबादादानें निरनिराळ्या तऱ्हेनें जानोजीस लिहिलें, मोगलानें "टोकें व देवस्थानचा हिंदुधर्म उच्छेद आरंभिला. याज करितां मोगलाचा निपात करणें जरूर यांचें येणें लवकर न होय." दादानें रागाची पत्रें लिहिलीं; परंतु दादाचे व जानोजीचे दोघांचेहि तळ पैठण व नगर यांचे दरम्यान एकमेकांपासून फार दूर नसतांनाहि कधीं मृत्युयोग तर कधीं आजारीपण या सबबीवर जानोजीनें दादास मिळण्याचें टाळलें.

इकडे **जानोजी** व **निजाम** यांचेमध्यें खलबतें चालूच होतीं. **गमाजी बाबा** हा दरम्यान दोघांमध्यें बोलणें करीत होता. या कटाचा निष्कर्ष असा होता की, या सर्वांनी मिळून पेशव्याचा मोड करून **साताऱ्याला** जाऊन **भवानराव प्रतिनिधी** व **गमाजी** यांच्या साह्यानें छत्रपती **रामराजाला** गादीवरून काढून **जानोजी** भोंसल्यास सातारच्या गादीवर बसवावें, निदान जानोजीची छत्रपतीचा पालक व सर्वाधिकारी म्हणून तरी स्थापना करावी. राघोबादादानें काढून घेतलेलीं जुन्या कामदारांची कामें त्यांचीं त्यांस परत द्यावीं. निजामास २० लक्ष रुपये खंडणी द्यावी व जितका नवीन मुलूख व खंडणीचा पैसा मराठ्यांस मिळेल त्यांत शेंकडा ६० निजामास द्यावा व ४० जानोजीनें घ्यावा.

या सर्व गोष्टींस **जानोजी** कबूल झाला; परंतु निजामअली हाहि मोठा राजकारणी व दुरप्पी मनुष्य होता जानोजीशिवाय दुसरेंहि सावज हातीं असावें म्हणून व पेशव्याविरुद्ध पूर्वींच असलेला एक शत्रु जागृत करून ठेवावा म्हणून **निजामानें कोल्हापुरकर संभा**जीची बायको **जिजाबाई** इला पत्र लिहून तीच लालूच दाखविली व याप्रमाणें पेशव्याविरुद्ध जंगी कट तयार झाला.

एवढी तयारी झाली असतांना सुद्धां **जानोजी राघोबा**दादास "आम्ही तुम्हांस लवकरच येऊन मिळतों" अशा थापा देतच होता. **दादास**हि वरील सर्व बातम्या समजतच होत्या. ता. २४–११–१७६३ रोजीं पेशव्याचा वकील **रामाजी बल्लाळ** हा दादास लिहितो कीं, जानोजीनें मुधोजीची रवानगी पेशव्याकडे केली आहे व आपण आजारीपणामुळें मागें राहिला आहे.

परंतु जानोजी लौकरच **परळी** येथें सैन्यासह आला व तेथें **गमाजी बाबा** हा जानोजीस येऊन भेटला व त्यानें जानोजीचें मन निजामास मिळण्याबद्दल वळविलें.

शेवटीं **गमाजी**बाबाच्या मध्यस्थीनें असें ठरलें कीं, जानोजीनें निजामाची समक्ष भेट घ्यावी व सर्व गोष्टी निश्चित कराव्या. पेशव्याचे वकील **व्यंकटराव मोरेश्वर** व **रामाजी बल्लाळ** यांनीं जानोजी व **दिवाकरपंत** यांची भेट घेऊन त्यांना या राज्यघातकी कटांत सामील न होण्याबद्दल पुष्कळ सांगून पाहिलें, परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं **कलबुर्ग्या**जवळ **जानोजीची** व **निजामाची** भेट झाली व त्यांचे विचार पक्के ठरले (ता. ९–२–१७६३). पेशव्याचे वकील **रामाजी बल्लाळ** व व्यंकटराव मोरेश्वर यांनीं वरील प्रकाराबद्दल सविस्तर माहिती दादास कळविली. **रामाजी बल्लाळ** भीमातीर अबदलपूर मुक्कामाहून फेब्रुवारी १७६३ मध्यें लिहितोः—

" राजश्री जानोजी भोंसले सेनासाहेबसुभा याणी वराडांतून राजश्री माणको शंकर व गणेश तुकदेव स्वामीकडे रवाना करून आपण फौजसुद्धां घासदाणा घेतघेत परलीपर्यंत आले. तेथें राजश्री सदाशिव[1] यमाजी नबाबाकडून येऊन भेटले. तदनंतर नवाबाकडे जावयाचा निश्चय करून छ. **२५ रजबीं**[2] **कलबर्ग्यानजीक याच्या व नबाबाच्या भेटी** जाहाल्या. नेच दिवशीं दाहा बारा कोसांची मजल करून भीमेवर येऊन देखील नवाब उतरले. दुसरे दिवसीं तेथें मुकाम करून हे नवाबाच्या डेरियास गेले. तेथें निश्चय केला कीं सातारीयापर्यंत जाऊन राजश्रीची भेट घ्यावी. सरकारकुनाची घालमेल जाली आहे ते ज्याचे धंदे त्याचे स्वाधीन करावे व पहिला

१. गमाजीबावा. २. ९ फेब्रु. १७६३.

मोंगलाकडे मुलूक भीमेपलीकडील होता त्याप्रमाणें त्याणें घ्यावा. चौथ सरदेशमुखी स्वराज्यांतील पेशजी तह आहे त्याप्रमाणें करार करावा. **पेशवे चालून आले तर युध्य करावें.** जसी निकड येईल तसी सोसून जाहाला करार सेवटास न्यावा. याप्रमाणें करारी करून तेथून मजल दर-मजल मुकाम मजकूर पर्यंत आले. आज नवाब यांच्या डेरीयास येणार यास्तव येथें मुकाम आहे. राजश्री माणको शंकर व गणेश तुकदेव नवाबाच्या भेटी अगोदर दोन दिवस येऊन पोहोंचले. त्याणी स्वामीकडील जो मजकूर करून आले असतील तो यांस सर्व सांगितलाच असेल. मागती येथून या उभयतांची रवानगी स्वामीकडे होणार आहे. परलीवरून मोंगलाकडे जावयाचा याचा निश्चय जाहाला ते वेळेस व्यंकटराऊ मोरेश्वर व सेवक उभयता सेनासाहेबसुभा याजकडे जाऊन पुसिलें कीं तुम्हीं राज्यांतील चाकर श्रीमंतास जाऊन सामील व्हावें तें न करितां मोंगलाकडे जातां उचित नाहीं. याचे पर्याय कितेक बोलिलों. त्याणीं उत्तर दिल्हे कीं यंदा पैका पदरीं नसतां पंचवीस हजार फौज धरली ते श्रीमंताच्याच कार्यानिमित्य. त्यास त्याणीं मोंगलासी सलूख करून राजश्रीस राज्यी बसऊन आपले अर्थ सिधिस नेले. आमचा अव्हेर केला. याउपर इतकी फौज जमा केली याचा परिणाम आम्हांस कांही तरी केला पाहिजे. यास्तव मोंगलास जाऊन भेटतों; मग जें ईश्वरइच्छेनें घडेल तें प्रमाण भाषण केलें. त्याउप्पर दोन दिवस जाहाले; मागती राजश्री दिवाकरपंत व खासा सेनासाहेब सुभा यांस सांगितलें की नबाबाचा मनसुवा कांहीं माघारे फिरावयाचा नव्हता. तुम्हीं सामील जाहाला म्हणून तुमच्या बलावर हे चालतात. मऱ्हाटे राज्य आहे म्हणून तुम्हास नबाब मानितो. मग याप्रमाणे तुमची मान्यता राहील की काय ? तुम्हास सरंजाम पाहिजे तर श्रीमंतास द्यावयास अशक्य आहे यैसें नाहीं. जे गोष्टी सध्यां तुम्ही योजिली याणे परिणाम शुध तुमचा नाहीं. दूरवर दृष्टी देऊन पाहोन जें कर्तव्य तें करावें; यैसें फारच निषेध करून बोलिलों. त्याचें उत्तर आम्हांस श्रीमंतासी विरोध करून आपलें राज्य बुडवणें नाहीं परिणाम काय करितों तो उगेच राहून पाहाणें यैसें म्हणतात."

तसेंच दुसरा वकील व्यंकटराव मोरेश्वर हाहि लिहितो[१] "येथील वर्त-

१ सदरहु ले. १३७

मान राजश्री माणको शंकर व राजश्री गणेश नुकदेव यास वराडांतून स्वामी-कडे रवाना केलें आणि कूच दरकूच गंगातीरास घामदाणे घेत आले. राजश्री जानोजी भोंसले सेनासाहेबसुभा गंगा उतरून आलीकडे परलीच्या मुक्कामास आले. तेथें राजश्री गमाजी येमाजी मोंगलाकडून आले. त्याणी मसलत दिल्ही की मोगलाकडे जावें; सर्व मनसबे सिधीस जातील. तेव्हां त्याणी कूच करून तेरा कोस आले. ते दिवशी राजश्री रागाजी बलाल व नवक, राजश्री सेनासाहेब सुभा व राव दिवाकरपंत यांजकडे गेलों आणि पुसले की तुमचा व श्रीमंताचा स्नेह येक मसलत येक्या राज्यातील राहणार आणि आंवधाकडे जाणार हें काये? तेव्हां त्याणी सांगितलें की आम्ही येथून उभयेतां वकील पाठविले. पत्रें वरचेवर पाठवितो परतु जासुदास जाब मिलत नाहीं. मन मानेशी भाशनें बोलतात. येदां आम्ही पंचवीस तीस हजार फौज ठेविली ती पेशव्याच्या कामावर पडावी यास्तव ठेविली; त्याणी आमची हेलसांड केली तेव्हां या फौजेस रुपया तर पाहिजे; रुपया-वांचून फौज कसी फिटेल याजसाठी तजवीज करून पाहतों यैसें बोलले आणि गमाजी बावाजी लांब लांब मजली करून घेऊन आले. मोगलानें भीमातीरींहून कूच करून कलबर्गीयापुढे सुलतानपूर आहे तेथें जाऊन मुकाम केला. मोंगल सेनासाहेबसुभा यांचे रोखें पंधरा कोस आला. सुल-तानपुरावर भेटी जाल्या तेच रोजी कूच करून भीमातीरावर येऊन मुकाम केला. छ २५ रजबीं बुधवारीं तेथें दोन मुकाम करून मसलत ठराऊन भीमातीरेच आज छ ४ साबानी मुकाम आवदुलपुरी केला. मोंगलाची व सेनासाहेबसुभा याची आणभाश क्रियाप्रमाण जाली व प्रतिनिधीचीहि जाली की स्वामीसी विरोध परिछिन करावे; मग जें होईल तें सुखरूप हो. त्याणी राजा आमचे इतेलीया वेगला कां बसविला व पदे कैलासवासी याणी दिल्हीं होती ती दूर करून दुसरीयासी दिल्ही. राजश्रीचे केले याणी मोडले हें आनुचित केलें. पूर्ववतप्रमाणें जें चालत आलें आहे त्याचप्रमाणें चालावें व नबाब आसफज्याचे वेलेस ज्याप्रमाणे तह चालत आला आहे त्याप्रमाणें चालावें. साल दरसाल कजिये नसावे, चौथ सरदेशमुखी वाजवी घ्यावी याप्रमाणें मोंगलाचा मनसबा आहे. केवल निकरच करावा हेंच दिसतें. दुसरा प्रकार येकंदर दिसत नाहीं. दुसरें स्वामीकडून राजश्री

माणको शंकर व गणेश तुकदेव पत्रें घेऊन आले. तेहि राजश्री सेनासाहेब-सुभा व राजश्री दिवाकरपंत यासी बोलत असतात. उभयेतां वकिलासी मागती बोलून स्वामीकडे रवाना करावे यैसें दिसतें. स्वामीस कलावें. येथें आज सध्या फौज नवाबाकडील चालीस पंचेचालीस हजार व भोंसले कसरेकम लोक तीस हजार व तोफखाना मोगलाकडील येकसें तीस जरब आहेत व भोंसलियाकडील तोफा वीस आहेत, गाडदी सात आठ हजार व भोंसलीयाकडे दोन हजार याप्रमाणें फौज आहे,"

जानोजीनें वरील दोघांजवळ आपण पेशव्याविरुद्ध वागण्यास कां तयार झालों याचीं जीं कारणें दिली आहेत ती किती पोकळ होतीं व खरीं कारणें निराळींच होतीं हें सहज दिसून येईल.

जानोजी निजामास मिळाल्याचें वर्तमान राघोबादादास समजल्यावर त्यानें जानोजी भोसल्यास धमकीचें पत्र लिहिलें त्यांत तो म्हणतो,

" तुम्ही या राज्यातील मातबर सरदार ज्या गोष्टी राज्यास उपयोगी त्या तुम्ही कराव्या, व तुमचे वडील व तुम्ही करीत आले, ऐसे असता कोती अंदेशी करोन नवाब निजामअलीखान यास जाऊन भेटला, बिघाडाचा प्रकार केला ये गोष्टीत कोणता नफा पाहिला आहे ? ही कर्मे मातबरा-योग्य नव्हेत, क्षुद्रानी करावी; ते (आ) चरण तुम्हाकडून जाले. आपण कोण, करितो (काय) हे न पाहिलें. तुमच्या वडीलानीं या राज्यात (श्र) मसाहस करोन राज्याच्या वृधीस * * * करून दौलत मेलविली त्याचे वंशज तुम्ही * * * (निजामा)स मिलोन इकडील नुकसानी इच्छितां * * * करून खानदानांस शब्द लावितात. असो. ज्या * * राज्यात दौलत मेलविली, मातबर पदवीस पा(वला) त्याच राज्यावरी फिरल्या परिणाम लागोन उतम फले प्रात्प होणे कळतच आहे. थोडक्याच रोजात वर्तणुकीनुसार फलप्राप्ति होईल."

**निजाम व भोंसले यांची पेशव्यावर स्वारी**—निजामाकडेस त्याच्या स्वतःच्या सैन्याशिवाय पेशवाईंतील **मोरोबा फडनवीस,सदाशिव रामचंद्र** (रामचंद्रबाबा शेणवी याचा मुलगा), **भवानराव प्रतिनिधी**, गोपाळराव पटवर्धन मिरजकर, **जानोजी भोंसले** व **पिराजी निंबाळकर** वगैरे सर-

दार आपापल्या सैन्यासह होते. **राघोबादादाकडे मल्हारराव होळकर** व **दमाजी गायकवाड** हेच सरदार राहिले. निजामाकडील फौज प्रचंड जमली. त्या मानानें पेशव्याकडे फौज हलकी होती; परंतु या वेळेस तरुण पेशवा **माधवराव** यानें आपली तडफ चांगलीच दाखविली व आपल्या पदवीचा व वजनाचा उपयोग करून त्यानें राहिलेले लहानमोठे सर्व सरदार एकत्र केले. त्याचप्रमाणें **सखारामबापू** यानेंहि आपलें वजन व बुद्धिकौशल्य खर्च करून व प्रसंगाचें महत्त्व ओळखून लहान मोठे सर्व सरदार एक केले. या सर्वांनीं आपले पूर्वीचे रागद्वेष विसरून एकजुटीनें २५ हजार फौज जमा केली. परंतु मोगलाकडेस या प्रसंगीं १ लाख फौज व जबरदस्त तोफखाना जमला होता. तेव्हां समोरासमोर लढाई देऊन आपला निभाव लागणार नाहीं, म्हणून गनिमी काव्यानें आपण लढाई करावी असें **नारोशंकर** व **विंचूरकर** या सरदारांनीं सुचविल्याप्रमाणें **राघोबादादानें** ठरविलें. निजाम हा **भीमेच्या** कांठानें आपल्या प्रचंड सैन्यासह **पुण्याच्या** रोखानें निघाला व लढाईस कांही तरी निमित्त पाहिजे म्हणून त्यानें पेशव्याकडेस आपल्या मागण्या कळविल्या त्या अशा:—

" प्रतिनिधी व त्याचे मुतालिक (**भवानराव व गमाजी बाबा**), **गोपाळराव पटवर्धन, पिराजी नाईक निंबाळकर** यांच्या जहागिरी व किल्ले तुम्ही घेतले आहेत ते त्यांचे त्यांस परत द्यावे, **जानोजी** भोंसल्यास आणखी नवीन जहागीर द्यावी, भीमेअलीकडे जितकें तुमचें राज्य आहे तें सारें तुम्हीं आम्हांस द्यावें. शिवाय तुमच्या राज्यांतील कित्येक बळकट किल्ले आहेत ते आमच्या स्वाधीन करावे व आम्ही नेमू तो कारभारी करून त्याच्या सल्लामसलतीनें राज्यकारभार चालवीत जावा. इतकें तुम्ही करीत असाल तर तुमचें आमचें सख्य राहील. तसें करावयाचें तुमच्या मनांत नसल्यास आम्हीं तुम्हावर चालून येतच आहों. आम्ही म्हणतों त्याप्रमाणें तुम्हास करावयास लावूं "[1] हा उद्दामपणाचा निरोप येतांच दादास समजलें कीं, आतां लढाईशिवाय गत्यंतर नाहीं. समोरासमोर लढणें शक्य नसल्यामुळें त्यानें मोगलांच्या राज्यांत जाऊन लुटालूट करण्याचा निश्चय केला व त्यामुळें मोंगल आपल्या पाठीवर येऊन आपल्या राज्याचें

---

१ खरे प्रस्तावना पा. २२

व राजधानीचें रक्षण होईल व शत्रूचा मुलख दोन्ही लष्करांच्या पायमल्ली-मुळें उध्वस्त होईल या जुन्या मराठ्यांच्या रीतीचा त्यानें अवलंब केला. जमलेल्या सैन्यासह औरंगाबादेकडे व तेथून जानोजी भोंसल्याच्या वऱ्हा-डांतील मुलुखांत धुमाकूळ घालण्याकरितां तो **औरंगाबादेकडेस** निघाला. त्याचप्रमाणें **मल्हारराव** होळकर हा खानदेशांत चांदवड येथें होता, त्यास परभारे **औरंगाबादेकडेस** आणण्याकरितां दादाने **विठ्ठल शिवदेव विंचूरकर** यास पाठविलें. तसेंच **दमाजी गायकवाड** यासहि आणण्या-करितां माणसें रवाना झाली. राघोबादादानें नगर मार्गानें लांब लांब मजला मारीत **औरंगाबादेवर** हल्ला केला व तटाबाहेरील पुरे जाळून लुटून फस्त केले. शहरावरील हल्ला शहरवाल्यांनी परतविला परंतु यापुढें निभाव लागणार नाही असें पाहून तेथील सुभेदार **मुरादखान** यानें दादास २ लक्ष रुपये खंडणी देऊन परतविलें व दादानें **जानोजी** भोंसल्याचा मुलूख लुटण्याकरितां वऱ्हाडाकडेस चाल केली.

**रामचंद्र जाधव** हा जरी मोगलांकडेस जाण्याच्या बेतांत होता तरी अद्याप पेशव्याच्या सैन्याबरोबरच होता. **औरंगाबादेकडेस** मुक्काम अस-तांना **राघोबादादा**वर एका मारेकऱ्यानें वार केला; परंतु दादास थोडीशी जखम होऊन तो गारदी मारेकरी पकडला गेला. त्याचेकडून समजलें की हा मारेकरी **रामचंद्रराव** जाधवानें पाठविला होता. शिवाय औरंगाबादेहून लष्कर निघालें त्यावेळी हा कूच करीना. शेवटीं त्यास **राघोबादादानें** कैद करून दौलताबादेच्या किल्ल्यांत टेविलें. तेथून सुटल्यानंतर पुढें कांही दिव-सांनी तो पुन्हां मोंगलाकडेस गेला.

**मल्हारराव** होळकरास आणण्याकरितां **विंचूरकर** हा गेला होता. परंतु त्याच्या मनांत या अडचणीचा फायदा घेऊन आपला लाभ करून घेतल्या-शिवाय जाण्याचें नव्हतें; म्हणून तो कूच करीना. दादानें नंतर दोन कारकून व तिसऱ्या खेपेस सखारामबापूसहि तिकडे पाठविलें व शेवटी खुद्द माधव-राव पेशवा दादाबरोबर लष्करांतच होता, तो स्वतः मल्हाररावाकडे गेला व त्यास १० लक्षांची नवीन जहागीर देण्याचें लिहून देऊन घेऊन आला. इतकें होईपावेतों **राघोबादादा** वऱ्हाड प्रांत लुटीत मलकापुरापर्यंत आला होता व जागोजाग खंडण्या घेत घेत व मुलूख उध्वस्त करीत चालला

होता. **मलकापुरा**पासून त्यानें ६० हजार खंडणी घेतली. **जानोजी** भोंसल्याचा मुलूख लुटल्याची बातमी त्यास लागतांच तो मोगलांस घेऊन दादाच्या पाठोपाठ वऱ्हाडांत आला. दादानें आपण मोगलांच्या लष्कराशीं लढाई देणार अशी हूल दाखवून त्यास आपल्या अंगावर घेतलें व मोगल लष्कर जवळ येतांच कूच करून पुन्हा औरंगाबादेचा रस्ता धरिला व **फर्दापुरचे** घाटाखालीं उतरून तो **औरंगाबादेस** आला व तेथून **सोलापुर-तुळजापुरा**कडे जाऊन मोगलाई मुलुखांत लुटालूट करूं लागला. मोगलांनी दादाचा पाठलाग करण्याचा प्रयत्न केला; परंतु गनिमी काव्यांत मुरलेले **राघोबादादा** व **मल्हारराव होळकर** यांचा पाठलाग करणें त्यांच्यानें होईना. दादानें **हैद्राबाद** व **बेदर**चा रोख धरिला व तीं शहरें लुटलीं जातील या भीतीनें मोगल आपल्या मागें येईल या हेतूनें पूर्वींचाच डाव त्यानें टाकला; परंतु या खेपेस तो साध्य झाला नाही. **जानोजी** वगैरे मराठे सरदारांनीं निजामास सल्ला दिला कीं, तुमच्यानें दादाचा पाठलाग होणें नाहीं, तर तुम्ही **पुण्यावर** चाल करून **पुणें** शहर व भोंवतालचा पेशवाई मुलूख लुटा. म्हणजे एक तर पेशवे आपल्या राजधानीचा व मुलुखाचा बचाव करण्याकरतां पुण्याकडेस येतील व त्यांच्याशीं समोरासमोर लढाई देण्याचा तुमचा हेतु सिद्धीस जाईल व आपलें सैन्य मजबूत असल्यामुळें आपल्या सैन्यापुढें पेशव्याच्या सैन्याचा टिकाव न लागतां त्याचा मोड होईल. पेशवे पुण्याकडे न आल्यास निदान आपण पेशव्याचे मुलुखांत लुटालूट करून राजधानी लुटल्यानें पेशव्यावर आपला मुलूख लुटल्याबद्दल सूड तरी उगविल्यासारखें होईल. मराठे घरभेद्यांची ही सल्ला निजामास पसंत पडून तो औरंगाबादेहून नीट पुण्यास आला.

**पुण्याची जाळपोळ व लूट इ.स. १७६३**:—निजामानें व त्याचेबरोबरच्या मराठ्यांनीं पुणें शहर जाळून लुटून टाकलें. पुण्यांतील सर्व श्रीमंत लोक निरनिराळ्या किल्ल्यांत व कोंकणांत पळून गेले व जितकी संपत्ति नेतां आली तितकी घेऊन गेले. पेशव्याची आई **गोपिकाबाई** कुटुंबांतील माणसें व जवाहीर घेऊन पुरंदरच्या किल्ल्यावर गेली. पुण्यांत कांहीं गरीब लोक व वाडे मात्र राहिले. निजामानें **पुणें** शहराजवळून जबर खंडणी मागितली. परंतु तेथें जे अधिकारी होते त्यांनीं

व गोपिकाबाईनें खंडणी देण्याचें नाकारलें. पुण्यांत कोणींच राहिलें नसल्यामुळें पुणें लुटून तरी निजामास काय सांपडणार असें त्यांना वाटलें. शेवटीं निजामानें पुणें शहर लुटून जाळून फस्त केलें ( मे १७६३ ). नंतर आपल्या लष्कराच्या निरनिराळ्या टोळ्या करून त्यांनीं भोंवतालचा सर्व प्रदेश लुटला. पुणें शहरांतील सर्व देवालयें व **पर्वतीचें** देवालय यांचा मोगलांच्या मुसलमान सरदारांनीं विध्वंस केला व मूर्ति फोडल्या, त्याचा सरदार **राजा विनायकदास** यानें **नाशीक** शहर लुटून लाखों रुपये खंडणी मिळविली. **जानोजी** भोंसल्याकडील **रघूजी करांडे** यानें **सिंहगड** व **पुरंदर** या किल्ल्यांभोंवतालचा सर्व मुलूख लुटला व पुरंदरच्या किल्ल्याच्या पायथ्याशीं असलेल्या सासवड या गांवीं पेशव्यांचा जामदारखाना व इतर कारखाने होते तेहि लुटले. शिवाय महत्त्वाचे सर्व कागदपत्र तेथें नेले होते तेहि जाळून टाकले. घरभेदे मराठे सरदार मोंगलाच्या लष्करांत असल्यामुळें त्यांनीं पुण्याहून पळून गेलेल्या श्रीमंत लोकांचा नेमका पत्ता काढून त्यांना लुटलें. यामुळें लाखो रुपयांची संपत्ति मोंगलांस मिळाली व सातान्यापर्यंत सर्व मुलूख कंगाल बनला.

**राघोबाची मोंगलाईंत लूटमार**—इकडे पेशव्यांनीहि **हैद्राबाद** व **बेदर** ही शहरें लूटून मोगलाई मुलखाची नासाडी केली व पुण्याची जाळपोळ व लुटालूट केलेली समजतांच त्याबद्दल राघोबादादानें मोगलाई मुलुखावर पुरा सूड उगविला व लाखों रुपयांची लूट गोळा केली. पुण्याची व भोवतालच्या मुलखाची झालेली दुर्दशा समजतांच राघोबादादाच्या डोक्यांत वारें भरलें की, कसेहि होवो, आपण निजामाच्या सैन्यावर तुटून पडून लढाई द्यावी. **सखारामबापू, मल्हारराव होळकर** वगैरे सरदारांनी त्यास पुष्कळ समजाविलें की, आपल्या सैन्याचा जोर कमी असल्यामुळें आपल्याच्यानें समोरासमोर लढाई देणें होणार नाहीं. तरी पावसाळ्यापर्यंत कालहरण करून तोंपर्यंत व पावसाळ्यांत लढाई बंद ठेवावी. दोन्ही पक्षांच्या छावण्या पडल्यानंतर जो अवधि सांपडेल त्या अवधीत निजामाकडे गेलेल्या आपल्या मराठे सरदारांस व विशेषतः **जानोजी** भोंसल्यास फोडून आपलेकडेस आणावें व निजामानें केलेल्या युक्तीचाच

अवलंब करून निजामाचें बळ हलकें करावें. हें साधल्यानंतर निजामाशीं लढाई द्यावी. मग हा प्रकार पावसाळ्याच्या पूर्वीं अगर त्यानंतर होवो.

**सखारामबापू** व **मल्हारराव होळकर** यांची ही शहाणपणाची सल्ला राघोबादादास पसंत पडली नाही व पुणे जाळल्याचा अपमान त्याच्या उतावळ्या व तापट स्वभावास दुःसह झाला. त्यानें **सखारामबापूची** व **मल्हारराव होळकराची** अशी भित्रेपणाची सल्ला देण्याबद्दल निर्भर्त्सना केली; व मी मेलों तरी बेहेत्तर, निजाम जेथें असेल तेथें त्याचेवर जाऊन मी हल्ला करणार असें तो म्हणूं लागला परंतु फार प्रयासानें वरील मंडळीने राघोबादादास थांबविलें.

यानंतर निजामाकडे रुसून गेलेल्या मराठे सरदारांस फोडून परत आणण्याचा प्रयत्न सुरू झाला. हें काम **मल्हारराव** होळकराकडेस सोंपविलें. माधवरावानें पूर्वी कबूल केलेल्या १० लक्षांशिवाय आणखी १५ लक्षाची जहागीर घेण्याचा पेशव्याकडून करार करून घेऊन त्यानें या कामास सुरवात केली. मल्हारराव होळकर हा सर्वांत जुना व वजनदार सरदार असून **राघोबा**दादा व **सखाराम**बापू यांचेप्रमाणें त्यानें या पळून गेलेल्या सरदारांस दुखविलें नव्हतें, म्हणून त्याच्या शब्दास कांहींतरी किमत राहिली होती.

**जानोजीस मोंगलाकडून फोडलें.**—फितुरी सरदारांत **जानोजी भोंसले** हाच विशेष प्रबळ होता, म्हणून त्याचेच विरुद्ध प्रथम उपाय सुरू झाले. होळकरानें त्यास मोंगलापासून उदगीरच्या लढाईत घेतलेल्या मुलखापैकीं ३२ लक्षांचा मुलूख देण्याचें कबूल केलें. तसेंच राघोबादादानें उत्तर हिंदुस्थानांत **महादजी** शिंद्यास हुकूम केला कीं, वऱ्हाडांत जाऊन भोंसल्यांचा मुलूख लुटावा. याप्रमाणें महादजी राजपुतान्यांतून उज्जनीवर येऊन त्यानें वऱ्हाडचा रोंख धरिला. तसेंच जानोजी विरुद्ध **मुधोजीस** उठवून भेदनीतीचाहि प्रयोग करण्यांत आला. पेशव्यानें मुधोजीकडेसहि निरोप पाठविला कीं, तूं सैन्यासह आमचे मदतीस येशील तर जानोजीचें सेनासाहेब सुभ्याचें पद तुला देऊं व जानोजीस काढून टाकूं. याप्रमाणें होळकराकडून सामदामाचा, शिंद्याकडून दंडाचा व मुधोजीकडून भेदनीतीचा याप्रमाणें सर्व प्रयोग होतांच जानोजीचें धाबें दणाणलें. पेश-

त्यांनीं वऱ्हाडांत पूर्वी लुटालूट केल्यामुळें त्याचें बरेंच नुकसान झालें होतें. व महादजी वऱ्हाड नागपुरांत शिरल्यावर आणखीहि खराबी होऊन आपणास इकडील मदत करण्याचें सोडून अखेर नागपुराकडेस जावेंच लागणार अगर मुधोजी व पेशवे एक होऊन आपलेच पाय नागपुराहून उठणार व आपण सर्वस्वास मुकणार अशी भीति त्यास वाटूं लागली. म्हणून होळकराचें म्हणणें कबूल करून पेशव्याशीं सलोखा करून आपलें सेनासाहेब सुभ्याचें पद व राज्य वाचवावें व शिवाय ३२ लक्षांचा मुलूखहि मिळवावा यांतच आपला फायदा आहे अशी त्याची खात्री झाली व त्यानें होळकराचे म्हणण्यास रुकार दिला व निजामाचा पक्ष सोडण्याचें कबूल केलें. भोंसल्यातर्फे या खटपटींत काशीराव लक्ष्मण प्रभू हा गृहस्थ होता. तसेंच **दिवाकरपंत** व **भवानी** मुनसी हेहि जानोजीचे सल्लागार होते. वर ठरल्याप्रमाणें यादी करून पेशव्यानें ती आपला नागपूरचा वकील **रामाजी बल्लाळ गुणे** याचे-मार्फत जानोजीकडेस पाठविली. जानोजी भोसल्यानें संकेत केला की, पेशव्यानें मोंगलाच्या फौजेवर चालून यावें व तसे ते जवळ आले म्हणजे मी कांहीं तरी निमित्त काढून मोंगलांपासून फुटून दूर जाईन. जानोजी, त्याप्रमाणेंच **भवानराव प्रतिनिधी, गमाजीबाबा, गोपाळराव पटवर्धन** व बाबूराव फडणीस यांसहि त्यांचीं पूर्वीचीं पदें व जहागिरी परत द्याव-याचा राघोबादादानें करार केला. **पिराजी नाईक** निंबाळकर याचीहि समजूत झाली. **मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव विंचूरकर** व **नारो शंकर** हे या सर्व गोष्टींबद्दल जामीन राहिले.

पावसाळा जवळ आल्यामुळें दोन्हीकडील फौजांस निरोप देणें सुरू झालें होतें. त्याप्रमाणें पुष्कळ लोकहि रवाना झाले होते. पावसाळ्याकरितां मोंगलानें बेदरास, व पेशव्यांनी **अहमदनगरास** छावणी करण्याचें ठरविलें होतें. त्यामुळें दोन्ही सैन्यें त्या त्या रोखांनी निघालीं. आतां लढाई बंद होऊन पावसाळ्याचे ४ महिने छावणी होणार म्हणून मोंगलाकडेस जाऊन मिळालेले मराठे सरदार आपापल्या फौजा घेऊन परत गेले व दसरा झाल्यावर परत येऊं अशा थापा त्यांनीं मोंगलास दिल्या. फक्त एक जानोजी काय तो मोगलांच्या सैन्याबरोबर होता. त्याचेबरोबर **भवानराव प्रतिनिधी** व **गमाजीबाबा**

हे मात्र होते. जानोजीच्या संकेताप्रमाणें पेशव्यानें मोगलांच्या सैन्यावर चाल केली. तोंपर्यंत पावसाळा सुरू होऊन अर्धा आषाढ महिना होऊन गेला होता. पेशव्यानें चाल केली हें पाहतांच निजामानें **बेदरचा** रोख सोडून मागें हटून औरंगाबादेचा रस्ता धरिला व **गोदावरी** उतरून औरंगाबादेस जाऊन छावणी करावी असें त्यानें ठरविलें.

**राक्षसभुवनची लढाई १०–८–१७६३. विठ्ठल सुंदर याचा मृत्यु**—इतक्यांत **जानोजीचा** निरोप पेशव्यास पोहोंचला की, मोंगल **गोदावरी** उतरून जाण्यापूर्वी त्यावर हल्ला करून त्याचा मोड करावा. त्यामुळें पेशवे आपल्या सर्व लष्करासहित घाईघाईनें निजामाच्या पाठीवर चाल करून गेले. पेशवे एक दोन मैलांच्या अंतरावर येतांच **जानोजी** व त्याचे बरोबरचे प्रतिनिधी व **गमाजीबाबा** हेहि लष्कराच्या खर्चाचे पैसे न मिळाल्याचें निमित्त करून निघून गेले व पूर्वेस १०, १२ कोसांवर जाऊन राहिले. निजामास यामुळें फितुरीचा सुगावा लागून तो फारच घाबरला. जानोजीहि पेशव्यास मिळून त्यांचे बरोबरच आपल्यावर हल्ला करील अशीहि त्यास भीति वाटली. यावेळेस त्याचा मुक्काम राक्षसभुवनाजवळ गंगेच्या दक्षिणकाठी होता. घाईघाईनें गंगा उतरून तो उत्तरेकडेस जाऊन **राक्षसभुवन** येथें मुक्काम करून राहिला. पावसाळ्यामुळें गंगेस पूर होता तरी त्यानें जवळ जवळ निम्में सैन्य, तोफा व बाजारबुणगें नावांवरून पलीकडे नेलें व गंगेच्या दक्षिण तीरास त्याचा दिवाण विठ्ठल सुंदर हा बाकीची फौज घेऊन राहिला. निजामाचें सैन्य पेशव्याच्या सैन्यापेक्षां पुष्कळ जास्त असून त्याचे-बरोबर तोफा व गारदी होते. तरीहि तो घाबरल्यामुळें त्याची पेशव्याशीं लढाई देण्याची हिम्मत झाली नाहीं. तो आपला जीव बचावून नदीपलीकडेस जाऊन सुरक्षित राहिला. इतकेंहि करून पेशवे नदी उतरून आपणावर येतील म्हणून त्यास अडविण्याकरितां त्यानें बाकीची फौज दक्षिण तीरावर ठेविली.

**राक्षसभुवनची लढाई—जानोजीचा** निरोप येतांच **पेशव्यांनीं** एकदम मजल करून ता. १० ऑगस्ट १७६३ रोजी **विठ्ठल सुंदर** याच्या फौजेवर हल्ला केला. **विठ्ठल सुन्दर** याचीहि फौज मोठ्या निकरानें लढली व एकदां तर खुद्द राघोबादादाचाच हत्ती वेढला जाऊन दादा शत्रूच्या

हातीं सांपडण्याच्या बेतांत आले. परंतु यावेळीं **माधवराव** पेशव्यानें चोहों-कडे दृष्टि टेवून सैन्याची मदत पाठवून **राघोबा दादास** सोडविलें. इतरहि सैन्य मोठ्या निकरानें लढून त्यानें विठ्ठल सुंदर याच्या सैन्याचा पूर्ण मोड केला. खुद्द **विठ्ठल सुन्दर, राजे विनायकदास** व **खंदारचा राजा गोपाळसिंग** हे मारले गेले व मोंगलांकडील २२ सरदार जखमी होऊन कैद झाले. त्यांतच औरंगाबादेचा सुभेदार **मुरादखान** व एलिचपुरकराचा सरदार **अजमतखान** हे होते. एलिचपुरचा नबाब इस्मायलखानपन्ही हाहि मोंगलांच्या सैन्यांत होता, तोहि या लढाईत जखमी झाला होता. भोंसले व एलिचपूरकर नबाब यांचा स्नेहसंबंध असल्यामुळें **जानोजीनें इस्मायलखान** यास आपल्या सैन्यांत आणिलें व त्याच्या जखमा वगैरे बांधविल्या. पेशव्यास लढाईत मोंगलांकडील पुष्कळ लूट सांपडली. तसेंच निजाम हाहि सर्व सामान टाकून औरंगाबादेस पळून गेला. राक्षसभुवनच्या लढाईनंतर पेशव्यानें गंगेच्या दक्षिण तीरास **पैठणाजवळ** मुक्काम केला व तेथें सर्व मराठे सरदार पेशव्यास जाऊन भेटले. खुद्द **सखारामबापू** जानोजी भोंसल्यास आणण्याकरितां त्याचे तळावर आला व त्यास व **प्रति-निधि, गमाजीबाबा** यांस घेऊन गेला. होळकरानें त्याची व पेशव्यांची भेट करविली. त्यानंतर राघोबादादा व जानोजी यांनी एकमेकांस पत्रें लिहून पुढें सलोखा ठेवण्याबद्दल शपथा घेतल्या.[१]

गोदावरीचें पाणी उतरल्यानंतर **जानोजी भोंसले** व होळकर हे प्रथम उत्तर तीरास गेले व मोंगलानें टाकून दिलेल्या तोफा व डेरे वगैरे सामान त्यांनी ताब्यांत घेतलें. पाठीमागून पेशव्याचें सर्व सैन्य नदी उतरून आलें व सर्व सैन्यानें औरंगाबादेकडे निजामावर चाल केली. या सर्व सैन्याची आघाडी जानोजी भोंसल्याकडे होती. **जानोजीनें** रस्त्यांत पेशव्यास मेज-वानी करून पुण्याहून त्यानें व मोंगलांनीं लूटून नेलेल्या तोफा पेशव्यास नजर केल्या. औरंगाबादेस वेढा पडल्यानंतर निजाम व पेशवे यांचा तह होऊन मोंगलानें पेशव्यास ८२ लक्ष उत्पन्नाचा मुलूख दिला. त्यापैकी जानोजी भोंसल्यास कबूल केल्याप्रमाणें पेशव्यांनीं ३२ लक्षांचा मुलूख दिला व त्यास निरोप दिला. महादजी शिंद्यास पूर्वीच पेशव्यांचा निरोप गेल्या-

१ ना. भो. का. ले. १३. (ऐ. प. ले. १०६).

मुळें त्यानें वऱ्हाडावर स्वारी केली नाहीं. मुधोजी भोंसले हाहि या प्रसंगीं येऊन पोहोंचला होता असें दिसतें.[१]

**चंद्रपुरच्या किल्लयाबद्दल जानोजी व मुधोजी यांजमधील तंटा--** **मुधोजी** भोंसले सेनाधुरंधर याचें मुख्य ठाणें चंद्रपुर येथें होतें व त्याचे तर्फे तेथें **आबाजी**[२] **भोंसले** व **गंगाधरपंत** हे कारभारी होते. ते फितूर होऊन **जानोजीस** मिळाले व चंद्रपुरचा किल्ला बळकावून बसले.[३] त्यांची व मुधोजीची चकमक होऊन मुधोजीस पळ काढावा लागला. त्याचा कारभारी **मोरोपत फडणीस** यास या लढाईत गोळचा लागून तो जखमी झाला. त्यामुळें त्यास घेऊन **मुधोजी** वर्धेच्या पश्चिमेस शिरपुर[४] येथें गेला. तेथील देशमुखाचा कारभारी **गोंदाजीपंत** यानें **मुधोजी** व **मोरोपंत** यांस ठेवून घेतलें. मोरोपंत हा जखमामुळे मरण पावला. या संधीचा फायदा घेऊन चंद्रपुर आपल्या ताब्यांत घ्यावें म्हणून **जानोजीनें चंद्रपुरावर** स्वारी केली, परंतु **आबाजी भोंसले** व **गंगाधरपंत** यांनीं जानोजीसहि दाद न देतां किल्ला लढविला. इतक्यांत मागें लिहिल्याप्रमाणें पेशव्याविरुद्ध निजामास मिळण्याची मसलत होऊन जानोजी निजामाकडेस निघून गेला. आपले मागें चंद्रपुरचें ठाणें घेण्याकरितां **जानोजीनें तुळजोपंत** हा **रघूजीच्या** वेळचा जुना सरदार व **मजीदखान रोहिला शिवणी छपारेवाला**[५] यांस पांच हजार सैन्यासह ठेविलें. तसेंच मुधोजीचा जुना दिवाण **सदाशिव हरी** जो मुधोजीकडून फुटून जानोजीकडेस आला होता तोहि जानोजीच्या लष्कराबरोबर वऱ्हाडच्या पलीकडेस गेला होता त्यासहि जानोजीनें तेथून चंद्रपुरास पाठविलें. तो मुधोजीच्या पक्षाकडील माहितगार

---

१ बखर पान ६९.

२. हा नाग. भो. च्या आप्तांपैकींच होता.

३. बखर पान ६६, ६७.

४. शिरपुर हें ठिकाण हल्लीं वऱ्हाडांत वणी तालुक्यांत आहे. तें वरील प्रसंगी चंद्रपुरच्या भोसल्यांच्या सुभ्याखालीं होतें.

५. याचे वंशज शिवणीचे नबाब म्हणून अद्याप शिवणीस आहेत. वंशावळी पुरवणी पहा.

असल्यामुळें तिकडील लोकांस फोडण्यास उपयोगी पडेल अशी जानोजीची अटकळ होती. **सदाशिव हरी** हा **चंद्रपुरास** जाऊन त्यानें तेथील प्रसिद्ध महाकालीचे देवळाजवळ तळ दिला व **आबाजी भोंसले** व **गंगाधरपंत** यांस १२ हजाराची जहागीर देण्याची लालूच दाखवून त्यास फोडण्याची त्यानें तयारी चालविली.

इकडे **शिरपुराहून मुधोजीनें**हि त्याचा कारभारी **महिपतराव दिनकर प्रभु** यांस आबाजी भोंसले व **गंगाधरपंत** यांचें मन वळविण्याकरिता पाठविलें. याप्रमाणें प्रयत्न करावा तर **भोंसले** व **गंगाधरपंत** हे **सदाशिव हरीच्या** आहारी गेल्यासारखे दिसूं लागले. तेव्हां **सदाशिव हरी**सच फोडावें असा महिपतरावानें विचार केला व त्यास लालूच दाखविली की, तुमचे बंधु **विष्णु हरी** यास मुधोजीकडून **चांदा** येथील सुभेदारी देववूं. याप्रमाणे लालूच दाखवून तो **सदाशिव हरीस** घेऊन **शिरपुरास मुधोजी**कडेस गेला. तेथें या त्रिकूटाचा विचार होऊन **मुधोजीनें जानोजी**कडे जाऊन समक्ष भेटावें व **सदाशिव हरीनें** उभयतांचा सलोखा करून द्यावा व भांडण मिटवावें असा विचार ठरला व त्रिवर्ग **जानोजी**कडेस जाण्यास निघाले. याच सुमारास मागें लिहिल्याप्रमाणें मुधोजीस आपलेकडे वळविण्याकरितां व त्यायोगानें **जानोजीस** भीति दाखविण्याकरितां **राघोबादादानें रामाजी केशव** यास पाठविलें होतें. रामाजी केशव हा **मोरोपंता**बरोबरच मुधोजीचा फडणीस असून **मुधोजीनें** त्यास **जानोजी**विरुद्ध तक्रार घेऊन राघोबादादाकडेस पाठविलें होतें व तो या वेळी राघोबादादाकडेसच होता. त्यामुळें त्याचीच रवानगी राघोबादादा[illegible]ली होती. **मुधोजी** हा प्रथम जानोजीकडेसच गेला. **राघोबा**दादाकडे मुळीच गेला नाही व जानोजीबरोबरच तो पेशव्याविरुद्ध राहिला. पुढें **जानोजी** व **मुधोजी** हे एकविचारेंच पुन्हां पेशव्याकडेस मिळाले व **राक्षसभुवनची** लढाई झाल्यानंतर औरंगाबादेहून परत नागपुराकडेस आले.

**जानोजी** व **मुधोजी** यांचा सलोखा झाल्यामुळें **जानोजीनें** चंद्रपुराकडील आपलें सैन्य बोलावून घेतलें व **चंद्रपुरचा** सुभा **मुधोजीच्या** ताब्यांत आला. **मुधोजीनें सदाशिव हरी** यास वचन दिल्याप्रमाणें त्याचा बंधु

**विष्णु हरी** यास चंद्रपुरचा सुभेदार नेमलें. परंतु **विष्णु हरी** पूर्वीच्या सुभेदारांप्रमाणेंच ठाणें बळकावील म्हणून **महिपतराव दिनकर** यास त्याच्या जोडीस दिलें. **आबाजी भोंसले** यास मुधोजीनें काढून टाकिल्यामुळें तो परत देशीं गेला. हा नागपुरकर भोंसल्यांच्या भाऊबंदांपैकींच होता.*

**मुधोजी** हा नंतर चंद्रपुरासच राहिला. तेथें **काशीराव लक्ष्मण प्रभु** यास त्यानें आपल्या खाजगी कामाकडील कारभारी म्हणून नेमिलें व त्याचे जोडीस **महादजी लष्करी**[१] नांवाच्या मनुष्यास ठेविलें. चंद्रपुरच्या सुभ्यांत गोसाव्यांनी बंडावा केला, तो मोडण्याकरितां **काशीराव लक्ष्मण** हा गेला असतां **बोरी** वगैरे भागांत त्यास गोळी लागून तो पडला. परंतु गोसाव्यांचा बंडावा मोडला.[२] काशीरावाचे पुत्र पुढील कारस्थानांत बरेच प्रसिद्धीस आले

इ. स. १७६४–६६ मध्यें पेशव्यानें दक्षिणेंत हैदरावर स्वारी केली. त्यावेळीं भोंसले बंधूंनीं त्याच्या मदतीस सैन्य पाठवावें म्हणून राघोबादादानें पत्रें लिहिलीं होतीं. परंतु आमची फौज बंगाल्यांत जाणार आहे या सबबीवर जानोजीनें फौज पाठविली नाही व स्वतःहि मदतीस गेला नाही. तिकडे कर्नाटकची मोहीम आटोपून माधवराव पुण्यास परत आला. जानोजीनें इ.स. १७६५ चे पावसाळ्यानंतर येऊं म्हणून पत्रें पाठविली. त्यावेळींहि निरनिराळ्या सबबींवर जाण्याची टाळाटाळ केली. राक्षसभुवनचे लढाईनंतर जानोजीनें कबूल केलें होतें कीं आपण नागपुरास जाऊन लौकरच तयारी करून परत येऊं व पेशव्यांबरोबरच कर्नाटकांत जाऊं. माधवरावाची स्वारी निघेपर्यंत जानोजी जाऊन पोहोंचला नाहीं. शेवटीं माधवरावानें लष्करांतून जानोजीकडे आपला नागपुरचा वकील **व्यंकटराव मोरेश्वर** व **गणेश तुकदेव** या दोघांस पाठविलें. ते नागपुरास गेल्यावरहि जानोजी लौकर गेला नाहीं व "मुलुखगिरीस दिवस थोडे राहिले व आपणास बंगाल्याकडील

---

*बखर पान ७२ पहा. मुधोजीचे यासंबंधीं उद्गार असे आहेत "ज्यास चंद्रपुरचा सुभा द्यावा तोच मालकी आंगास आणून बळकटीस येतो. असे दोघे तिघे झाले. आबाजी भोसलें आपणांतील असतां त्याजपासून या गोष्टी घडल्या."

१ हा वणीचा राहणारा होता. जात ऋ. देशस्थ ब्राह्मण.

२ बखर पान ७२.

कार्य उपस्थित जाहलें. आपण गढचा मंडलिया पावेतों जाऊन कांहीं फौज **कासमअल्ली**कडे मुधोजीबरोबर पाठवूं. बादबरसात आम्हीं पुढें लवकर येतो." याप्रमाणें जानोजीनें पत्रें पाठविलीं. तरी त्वरेनें निघून येण्याबद्दल पुन्हां दादासाहेबानें पत्रें पाठविलीं. निदान श्रावण महिन्यांत तरी बाहेर निघून यावें याप्रमाणें त्यानें निकडीचा निरोप जानोजीस पाठविला. **व्यंकटराव मोरेश्वर** हा ता. १७–८–१७६५ रोजी नागपुराहून दादास लिहितो "जानोजी बाबा भोंसले सेनासाहेब सुभा यांनीं बाहेर निघायासी श्रावण व॥ ११ चे मवर्त पाहून ते दिवशीं तयारी जाली. उंटे लादली. तोफखाना वगैरे कुल तयार जाला. त्यास सेनासाहेब सुभ्याचे नेत्रास दुखत होतें. फार श्रमी होते. त्यामुळें साऱ्यांनीं मिळून सांगितलें कीं, महत्कार्यास जाणे आहे. सावकाश वाटलिया उपरि मवर्त पहावें. त्यावरून याचे राहणें जाले." पुन्हा दुसऱ्या पत्रांत तो लिहितो, "जानोजीने दसरा जालिया उपरी मोहरते करून निघावे हा निश्चय केला आहे मग पाहावें." व्यंकटेश मोरेश्वर हा जानोजीचा पक्षपाती असल्यामुळें तो जानोजीच्या एकनिष्ठतेबद्दल वारंवार खात्री देत होता. त्याच वेळीं **सुजाउद्दौला** व **मीरकासीम** यांजकडून बंगाल्यांतून भोंसल्यांकडेस इंग्रजांविरुद्ध मदतीची मागणी येत होती व त्यांशीं जानोजीचें खलबत चालू होतें. शेवटीं जानोजी पुण्याकडेस गेला नाहीं यामुळें पेशव्यांची मर्जी भोंसल्यावरून उडाली. जानोजीनें **मीरकासीम** यासहि मदत न केल्यामुळें इंग्रजांनीं मीरकासीम यास काढिलें व बंगाल्यांतहि भोंसल्यांचें कांहीं वजन राहिलें नाहीं व इंग्रजांचा पाय तेथें पक्का झाला. रघूजी भोसल्यानें या संधीचा जो फायदा घेतला असता तो जानोजीस घेतां आला नाहीं. याप्रमाणें तिकडील राजकारणांतहि तो कच्चाच पडला.

---

# भाग ६ वा
# पेशव्याच्या जानोजीवर स्वाऱ्या

**पेशव्याचा निजामाशीं दोस्तीचा तह**--जानोजीनें पेशवे व निजाम या दोघांशीहि विश्वासघात केल्यामुळें तो दोघांनाहि अप्रिय झाला होता. तसेंच दक्षिणेंत **हैदरअल्ली** हाहि पेशवे व निजाम या दोघांशीं विरुद्ध झाला होता. त्यामुळें पेशवे व निजाम यांनीं एकमेकांशीं कायमच्या दोस्तीचा तह केला. **माधवराव पेशवा** हा आतां स्वतः कारभार करूं लागला होता व **दादासाहेबाचा** व त्याचा बेबनाव वाढत चालला होता. पूर्वीं मोगलांच्या मदतीनें दादासाहेबानें माधवराव पेशव्याचा मोड करून त्यास कैद केलें होतें. त्यामुळें पुढेंहि दादासाहेबाशीं लढाईचा प्रसंग पडल्यास मोगल त्यास अनुकूल होईल अशीहि त्यास भीति होती. तसेंच जानोजीच्या वर्तनाबद्दल त्यास शिक्षा केल्याशिवाय इतर मराठे सरदारांवर धाक रहाणार नाहीं हेंहि माधवराव जाणून होता. या सर्व शत्रूंशीं पेशव्यानें एकट्यानें तोंड देणें शक्य नव्हतें. म्हणून माधवरावानें मोगलांचा नवीन दिवाण सय्यद लष्करखान ऊर्फ रुकनुद्दौला याचे मार्फत निजामाशी कायमच्या दोस्तीचा तह केला व कोणाचेंहि दुसऱ्याशीं शत्रुत्व झाल्यास दोघांनींहि एकमेकांस मदत करावी असें ठरलें. जानोजी, राघोबादादा व हैदर या तिघांविरुद्ध काम पडल्यास निजामाची मदत पेशव्यास जरूरीची होती म्हणून त्यानें त्याशीं तह करून आपली मजबुती करून ठेवली व नंतर घरांतील व बाहेरील शत्रूंचा समाचार क्रमाक्रमानें घेतला.

वऱ्हाडांत निजाम व भोसले या दोघांचाहि अंमल चालत असल्यामुळें तेथें दोघांचेहि नेहमीं खटके उडत. **मोरो धोंडाजी** नांवाचा मोगलांचा सरदार २००० फौजेनिशीं वऱ्हाडांत होता. त्यावर भोसल्याच्या फौजेनें छापा घालून त्यास लुटलें व निजामाचा वऱ्हाडांतील इतरहि मुलूख लुटला. त्यामुळें मोगल भोसल्यावर चिडून जाऊन त्यानेंहि पेशव्याची मदत मागितली होती. तसेंच पेशव्याचे मनांत भोसल्याची खोड मोडावयाचीच होती. म्हणून पेशव्यानें व निजामानें भोसल्यावर स्वारी करण्याचें

ठरविलें. पेशव्यानें या कामांत राघोबादादाचाहि रुकार घेतला. **दादानें नाशकास** जाऊन तेथून वऱ्हाडांत यावें व **माधवरावानें** पुण्याहून **कायगांवटोकें** या मार्गानें परभारें वऱ्हाडांत यावें असें ठरलें. निजामानेंहि आपलें सैन्य हैद्राबादेकडून परभारें वऱ्हाडांत पाठवावें व तें मार्गात पेशव्याच्या सैन्यास मिळावें असा कार्यक्रम ठरला.[१]

**जानोजीवर स्वारी** ( १७६५–६६ इ. ) ता. १७ आक्टोबर १७६५ (कार्तिक शु।। ३) रोजीं **माधवराव** पुण्याहून निघाला. **कायगांवटोक्याच्या** जवळ मोगलांचा दिवाण **रुकनुद्दौला** हाहि सात आठ हजार फौजेनिशीं त्यास मिळाला. खासा निजाम हाहि हैदराबादेहून निघण्याच्या तयारींत होता. तो नांदेडावर गंगा उतरून वाशमावरून कारंज्यास आला. निजामाबरोबर बारा तेरा हजार फौज व शिवाय गारदी, तोफा वगैरे होत्या व त्याशिवाय आणखी लष्कर जमतच होतें.[२]

**माधवराव** व **रुकनुद्दौला** हे **कायगांव टोकावर गंगा** उतरून थेट उत्तरेस **दादासाहेबाचे** फौजेस मिळण्यास निघाले. **राघोबादादाची** व **माधवरावाची** भेट डिसेंबर १७६५ मध्यें खानदेशांत **एदलाबाद**[३] येथें झाली. तेथून कूच करून ते वऱ्हाडांत **बाळापुरास** आले. **कारंज्यास** निजामाची भेट होण्याचें ठरलें होतें, परंतु भोसले बंधु नागपुराहून **आमनेर** मार्गें निघाल्याचें समजल्यामुळें पेशवे कारंज्यास न जातां थेट पूर्वेस **दर्यापुरकडेस** निघाले.

पेशवे व निजाम यांचें सैन्य आपणावर चाल करून येत आहे हें ऐकतांच **जानोजी** व **मुधोजी** हे नागपुराहून निघून कुटुंबांतील माणसांस

१ खरे प्रस्तावना पान. ११०.

२ पे. द. भा. २० ले. १४६.

३ पे. द. भा. २० ले. १६० खरे प्र. पान १११ यांत उभयता पेशव्यांची भेट कसबे भंडारी परगणे बाळापूर येथें झाल्याचें लिहिलें आहे. सरदेसाई म. वि.भा. ४ पान १५०यांतही बाळापुराचा मुक्काम दिला आहे. परंतु हरिपंत फडक्याच्या मलकापुर मुक्कामाच्या अस्सल पत्रावरून एदलाबादेस दोघांच्या भेटी होऊन नंतर पेशवे बाळापुरास आले असें दिसतें.

वगैरे घेऊन पांचसातशें स्वारांनिशीं **आमनेरच्या** किल्ल्यांत गेले. **पाठी-**
मागून लष्कर जमा करीत करीत **साबाजी व देवाजीपंत** हे **आमनेरास**
आले. नागपुर शहरांत पळापळ सुरू झाली. नागपुरांतील पेशव्याचा बातमीदार
लिहितो " राजश्री **साबाजी** बाबा व राजश्री **देवाजीपंत** यानीं लोकांची
समजुती करून कोणास पावलें कोणास नाहीं ऐसेंकरून रवाना केलें.
राजश्री **साबाजीबाबा** व राजश्री **देवाजीपंत** हे उभयतां आज १६ रजब
शहरांतुन स्वार होऊन राजश्री **साबाजी भोसले** यांचे डेरे शहरापासून
कोसावर आले. व राजश्री **देवाजीपंत यांचे मागे** सीताबरडीवर आहेत. मागे
पथके या समागमे राजश्री **शंकराजी घोरपडा** व **सुंदरसिंग** हजारी व
किरकोळ सिलेदार वगैरे आहेत. बाजार दुकानसी आहेत पुढेहि **राजश्री**
जानोजी बाबा समागमें बाजार दोन तीन आहेत. राजश्री **देवाजीपंतानी**
सावकारावर तफरीक केली. ऐवज एकमेकास वगैरे तोडून देत आहेत. **येणें**
प्रमाणें फौजेचा बंदोबस्त करून बाहेर निघाले आहेत. शहरासहि पल
सुटला आहे. " [१]

भोसल्यांस पैशाची किती निकड होती हें वरील पत्रावरून दिसून
येईल. त्याच वेळेस पेशव्याचा एक बातमीदार लिहितो–" राजश्री सेना
धुरंधर याजपासी लोकाचे धरणे नालबंदी रोजमुऱ्याकरितां काल दोन
प्रहरांपासून बेसले ते अद्यापी उठले नाहीं. गारदीयाचे धरणें परवा होते
ते त्यास हत्ती उसना घेऊन दिला. बाकीचा ऐवज १२ हजारांत ६ हजार
त्याचा हवाला **मोरो रघुनाथ** यांनी घेऊन समजाविले. [२] "

पेशवे **बाळापुरास** गेले त्यावेळी त्यांचेबरोबर सतरा अठरा हजार
फौज होती. त्यांनीं वऱ्हाडांतील भोंसल्यांच्या महालावर जप्त्या बसविण्या-
करितां तीन चार टोळ्या रवाना केल्या. एकीकडे **शिवभट साठे** [३]
यास ४००० फौजेनिशीं पाठविलें. तसेंच **गोपाळ संभाजी खांडेकर**[४]

१ पे. द. भा. २० ले. १४५

२ पे. द. भा. २० ले. १५८

३ हा या वेळेस भोंसल्याकडून निघून पेशव्याकडे गेला होता. यापूर्वी
तो भोंसल्यातर्फे कटक प्रांताचा सुभेदार होता.

४ याचा भाऊ गणेश संभाजी हा १७६८ ते १७७० इ. मध्यें भोंसल्यातर्फ
ओरिसाचा सुभेदार होता.

व **कृष्णाजी अनंत तांबे** हे एका बाजूस दोन हजार फौज घेऊन व दुसरीकडेस **बच्याजा विश्वनाथ** यास दोन हजार फौजेनिशीं पाठविलें. पेशव्याकडे मागाहून फौज येतच होती. पेशवे बाळापुरास गेल्यावर त्यांनीं त्या शहराकडून १७५००० खंडणी घेतली व आकोल्याहून १७०००० खंडणी घेतली व याप्रमाणें खंडण्या घेत घेत ते पुढें चालले.

मोगलांचें व पेशव्यांचें हीं दोन्हीं लष्करें आपणावर येत आहेत हें पाहून भोंसल्यांस मोठी दहशत उत्पन्न झाली म्हणून त्यांनीं आपले कबीले **चंद्रपुराकडे** रवाना केले व सडे होऊन ते पुढें निघाले. लष्करांत **जानोजी, मुधोजी** व **साबाजी** हे तिघे बंधू व **देवाजीपन्त** हे कारभारी होते. त्यांचे बरोबर दहा हजार फौज होती. त्यांचा सरदार **तुळजोपंत** हा दोन हजार फौजेनिशीं पुढें चालत होता. **पिराजी नाईक निंबाळकर** हा जानोजीचा सरदार **साकरखेडर्याकडेस** होता त्यास त्यानें निकडीनें बोलाविलें. तसेच **भवानजी** व **मल्हारजी आटोळे**, सुरतसिग हजारी वगैरे सरदार मिळून भोंसल्यांनीं पंचवीस तीस हजार फौज जमा केली. शिवाय एलिचपुरकर इस्मायलखान हाहि तीन हजार फौज घेऊन जानोजीस मिळणार होता, पेशवे व मोंगल यांच्या सैन्यांपुढें आपला निभाव लागेल असें जानोजीस वाटेना म्हणून त्यानें होईल तोंपर्यंत पेशव्याशीं सलोखा करण्याचा निश्चय केला. पेशव्यांचा वकील **व्यंकटराव मोरेश्वर** हा त्याचे लष्करांत होता. त्याचेमार्फत तळेगांव मोझरीच्या (नांदगांव पेठेजवळ) मुक्कामाहून त्यानें पेशव्याशीं सलोख्याचें बोलणें लावलें. पेशव्यांचा मुक्काम त्यावेळीं दर्यापुराजवळ होता. पेशव्यांचा वकील व्यंकटराव यानें ता. ८-१-१७६६ रोजीं तळेगांव मोझरीहून पेशव्यास पत्र लिहिलें त्यांत जानोजीचें म्हणणें कळवून त्याशीं सलोखा करण्याबद्दल त्यानें शिफारस केली. तो म्हणतो—

"येथील वर्तमान तर राजश्री जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांजपासी खासगत फौज दहा हजार व पिराजी नाईक आठ हजार व तुलजोराम बाहेर आहे, उद्या भेटनार; आटोले मल्हारजी व भवानजी मंडळी मिळून तीन हजार; गोंविंदराव मुगुटराव व खानाजी सिंदे वगैरे हजार; सुरतसिंग वगैरे हजार मागून यावयाचे आहेत; येकून तीस हजार जमा जाली आहे; याचे चितांत कीं 'आम्हावर राग करून श्रीमंत वराडांत आले. आमचा

आन्याये कोणता? येक पुणे जालले म्हणतील तर पुणियाचा आन्याय आमचा नाही; मोगलाने जालले तेव्हाच त्यासी आम्ही बेरोखमोगलासी जालो. येक आमचा आन्याय कीं हैदरनाईकाकडे आम्ही आलो नाहीं इतका मात्र आन्याय आहे. तर चूक मनुशांपासूनच होतच असते; तर त्या आन्यायासी आसा दंड कीं काये आम्हांस तीसा लाखांचा सरंजाम दिल्हा तो मोगलास आमचा घेऊन द्यावा. सर्पास दुध पाजावे. आम्हास आज्ञा करावी की तुम्ही मोगलावर जाणे तेथें जाऊन त्याचें पारपत्य करितो कीं नाही हे पाहणे होते. आम्ही त्याच्या मुलकांत च्यार रुपये घेतले त्यासी श्रीमंतानी वराडात येऊन रुपये घेतले. जे जाले ते समर्थ. वडीलपणे आम्हास हती धरावे. आम्ही येसे काम करून दाखऊ कीं मागे जाले नाही, पुढें होणार नाही. तीसा लाखांची जागीर दिल्ही त्यापैकी रेवामुकुंदपूर व पंचमहाल अमलच नाहीं. येक गंगथडी मात्र च्यार परगणे, त्यापैकी वसमतीने सरेसाल लढाईच पुरवली. पिराजी नाईकासारखा सरदार खराब जाला. त्यासी आता आम्ही लेकर, आम्हावर केवल निकरच करतील तर आम्हास काही समोरून हलता येणार नाही-प्राण द्यावा लागल त्यासी आम्ही कूच दरकूच दाहा कोसावर येतो. वडिलाच्या मरजीस येईल ते करावे परंतु आम्हास हातचे दौडू नये.' त्यासी स्वामीनी विवेक करावा हे विहित आहे. आम्ही सेवक लोकानी विनंती मात्र करावी; तरतूद करणार धणी समर्थ आहेत. छ २७ रोजी याचा मुकाम नांदगाव पेठ येथें गुरुवारी मुकाम आहे; तर स्वामी यासी हती धरून न्यावे यांत उतम आहे राज्यातील मोहरा जाऊ देऊ नये. स्वामी वडील आहेत. इसमाईलखान इकडे तीन हजार फौज येणार आहे."

माधवरावानें ही शिफारस मान्य केली. यानंतर पेशवे व भोसले यांचे वकील एकमेकांकडे जाऊन सलोख्याचें बोलणें सुरू झालें. माधवरावास तरी आपल्याच एका सरदाराशीं लढण्याची हौस नव्हतीच. फक्त जानोजीच्या पूर्वीच्या वर्तनाबद्दल त्यास तंबी देऊन नरम करावयाचें होतें.

इकडे वकीलांच्या शर्ती ठरत असतां जानोजीनें पेशवे माधवराव व राघोबादादा यांची समक्ष भेट घ्यावी असें ठरलें व त्याप्रमाणें जानोजीनें पेशव्यांच्या भेटी घेतल्या. यावेळेस पेशव्यांचा मुक्काम दर्यापुरास होता. ता. १७-१-१७६६ रोजीं माधवरावाची व त्याचे दुसरे दिवशीं राघोबादादाची

याप्रमाणें ह्या भेटी झाल्या. ह्या भेटीची सविस्तर हकीकत नानाफडणीसाचे कारकुनांनीं त्यास दर्यापुरचे मुक्कामाहून ता. १९-१-१७६६ रोजीं कळविली ती येणेंप्रमाणें:—

"येथील वर्तमान तर चिंतो विठल व चिंतो अनंत, विठल सिवदेव भोसल्याकडे तहाच्या मजकुराकरितां पेशजी गेले म्हणोन लिहिलें होतें. त्यास याणी जाऊन तहाचा मजकूर पका बोलोन आले, त्याजवरून भेटीचा प्रकार केला. त्यास छ ५ साबानी भोसले कूच करून लस्करापासून चौ कोशावर आले. उभयेतां श्रीमंत तयार होऊन पुढें गेले, त्यास खासा रावसाहेब सारे सरदार समेत श्रेष्ठांपुढें आद कोशावर चालत होते, त्यास भोसल्यानें यावयास सायंकाल केला. त्याच्या मनांत पुन्हां कांहीं संदेह आला याजमुळें भयभीत जाले, त्याजवरून चितोपंत उभयतानी पुढें जाऊन संदेह निवारण करून त्यास घेऊन येत तों दोन घटका रात्र जाली; यांजकरितां रावसाहेब, धाकटे नाना व सरदार पुढें होते त्यांच्या भेटी होत तों रात्र च्यार पांच घटका जाली. पुढें जेष्टाकडे भेटीस यावें तों जेष्टानी सांगोन पाठविलें कीं आतां भेटीची मर्जी नाहीं, प्रात:कालीं भेटी होतील. त्याजवरून भोंसल्यांनीं कबूल केलें की प्रात:कालीं डेऱ्यास येऊन भेटू. त्याजवरून जेष्ठ श्रीमंत माघारे आले. रावसाहेब मागाहून आले. भोंसलेंहि आपल्या डेऱ्यास माघारे गेले. काल छ. ६ साबानीं दोन प्रहरीं जानोजीबाबा सडे येऊन भेटले या प्रमाणें मजकूर जाहला. याउपरी याजकडील प्रकर्णास आठ च्यार रोज लागतील. मोंगलहि समीप आला त्यांच्याहि भेटी सत्वरच होतील तदनंतर पुढें हिंदुस्थानांत अगर कर्नाटकांत जावयाचा मनसबा ठरेल. पनास लोकानिसी भेटीस येणे म्हणोन थोरल्या श्रीमंताची आज्ञा जाली. त्याचप्रमाणें भोसले दोन प्रहरी पनास लोकानिसी येऊन भेटोन माघारे गेले. भोसले फार नरम जाले. कांहींच यैवज नाहीं. परंतु येथील प्रकारामुळें कांहीं यथास्थित मनसबा सिधीस जाणार नाहीं. यासमई जें म्हटलें तें सिध होत; परंतु लाभकालानुरूप घडेल तें प्रमाण याप्रमाणें आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

**जानोजीशीं तह**—जानोजीकडून या खटपटींत देवाजीपंत हा दादासाहेबाकडे गेला होता. त्याचें वर्णन नागपुरकर भोंसल्यांचे बखरींत पुढें

लिहिल्याप्रमाणें दिलें आहे:—" जानोजीबोवा यांनीं देवाजीपंत याजला दादासाहेबांकडे रवाना केलें. मागाहून आपणहि तयारी करून चालले. आगाऊ **देवाजीपंत** दादासाहेबापाशीं पोहोचून पायावर डोई ठेवली. बहुत प्रकारें विनंती करून इकडेस जानोजी बोवाकडे लिहून पाठविलें कीं, लौकर येऊन पोहोचावें. तसेंच जानोजी भोंसले सेनासाहेब दरमजल जाऊन पोहोंचले. दादासाहेबांची भेट डेऱ्यांतच घेतली. देवाजीपंत यांनीं हरप्रकारें दादासाहेबांची मर्जी प्रसन्न करून **जानोजीबोवा**साहेबास **दादासाहेबांनीं** भोजनास तेथेंच उठविलें. ते समयीं बहुतां प्रकारें भाषणें होऊन कृपेस पात्र **जानोजीबोवा** झाले. **देवाजीपंताचा** आर्जव पाहून दादासाहेब कृपावंत होऊन ते वेळेपासून देवाजीपंतास ' **विनंती** ' लिहिण्याचा सांप्रदाय जाहला प्रसंगोपात सामोपचारें करून जानोजीबोवास मागती नागपुरास रवाना केलें."

या तहांत असें ठरलें की, राक्षसभुवनच्या लढाईनंतर मोगलाशीं पेशव्यानें केलेल्या तहांत मोगलांकडून मिळालेल्या मुलुखापैकी जो ३२ लक्षांचा मुलूख पेशव्यानें भोंसल्यास दिला होता त्यापैकीं ८ लक्षांचा मुलूख भोंसल्यांकडेस कायम ठेवावा व २४ लक्षांचा मुलूख भोंसल्यानें पेशव्यास परत द्यावा. या स्वारीचे आरंभीं निजाम व पेशवे यांचा करार ठरला होता की, भोंसल्यांकडून जो मुलूख मिळेल त्यापैकी १५ लक्षांचा मुलूख पेशव्यानें निजामास द्यावा. त्याप्रमाणें वरील २४ लक्षांपैकीं १५ लक्षांचा मुलूख पेशव्यानें निजामास दिला व ९ लक्षांचाच मुलख पेशव्यांना राहिला. एकंदरींत दोघांचें भांडणांत निजामाचाच जास्त फायदा झाला.

हा तह **दर्यापुरच्या** पूर्वेस **खोलापूर** येथें पक्का होऊन तेथें दोन्ही पक्षांच्या सह्या झाल्या. तेथून **माधवराव** व **दादासाहेब** वेगळे होऊन दादासाहेब बऱ्हाणपुराकडेस उत्तर हिंदुस्थानांत जाण्याकरितां रवाना झाले.

वरील मोहिमेंत **रघूजी** करांड्याचा पुतण्या **राणोजी** करांडे हा पेशव्यास साहृय झाला होता. म्हणून लढाई आटोपल्यानंतर **जानोजीनें** **राणोजीस** कैदेंत ठेविलें. **माधवरावानें** त्याची सुटका करण्याबद्दल **जानोजीस** लिहिलें परंतु **जानोजीनें** त्यास लौकर सोडलें नाहीं. शेवटीं

**माधवरावानें राघोबादादाकडून** जानोजीस पत्र लिहविलें तेव्हां **जानोजीनें** करांड्यास सोडलें.

यानंतरहि आठपंधरा दिवस दोन्ही पक्षांचे मुक्काम जवळ जवळच होऊन भेटी, परत भेटी झाल्या. निजाम हा **दर्यापुरचे** मुक्कामीं येऊन पोहोंचला नाहीं. तह झाल्यानंतर **राघोबादादा** लागलीच उत्तर हिंदुस्तानाचे स्वारीस निघून गेला. **जानोजीनें**हि आपलें कांही सैन्य दादाबरोबर उत्तर हिंदुस्थानांत पाठविलें व स्वतःहि खानदेशांत **एदलाबादे**पर्यंत जाऊन तो **परत** आला. इकडे माधवराव पेशव्याची व निजामाची गांठ ( २३-१-१७६६ रोजी ) कुरमखेडा[१] नजीक झाली व त्यानंतर कारंज्याजवळ माधवराव व निजाम यांच्या पुन्हां भेटी होऊन तेथें निजामास वरील तहांतील १५ लक्षांच्या सनदा माधवरावानें दिल्या व भोंसले व निजाम यांजमधीलहि पुष्कळ लढ्यांचा निकाल लाविला. त्यानंतर निजाम **लाखनवाड्याच्या** घाटानें वर चढून वऱ्हाडच्या दक्षिणच्या घाटावर आला व तेथून भोसल्यांकडून नुकत्याच झालेल्या तहांतील मुलुखाचा बंदोबस्त करीत करीत तो व त्याचा दिवाण **रुकनुद्दौला** व मुत्सद्दी **शेरजंग** व **मोरो-घोंडाजीचा** भाऊ **जगन्नाथपंत धोंडाजी** हे गंगातीरास आले. त्याचप्रमाणें **माधवराव** हाहि **मनरथ** येथें गंगातीरास आला. निजामाचा मुक्काम **राजेटाकळी** येथें ८ कोसांवर होता. तेथेंहि पुन्हां दोघांच्या भेटी होऊन मेजवान्या व वस्त्रें देणें घेणें वगैरे झालें. याप्रमाणें भोंसल्यांच्या विरुद्ध पेशव्यानें केलेल्या पहिल्या स्वारीचा लढाई वगैरे न होतांच शेवट झाला ( फेब्रुवारी १७६६ ).

---

१ सरदेसाई मध्य वि. ४ पा. १५२ मध्यें ही भेट **उमरखेडानजीक** झाली असें म्हटलें आहे तें चूक आहे. मूळपत्र छापण्यांत कुरमखेडाऐवजी उमरखेड असें चुकीनें छापलें गेलें असावें. या भेटीचें वर्णन खालील पत्रांत सविस्तर दिलें आहे. हें पत्र देऊळघाटाहून कृष्णराव बल्लाळ काळे यानें दादासाहेबांस लिहिलें आहे. या कृष्णरावाचा मुलगा गोविंदराव काळे हा निजामाचे दरबारीं पुढें पेशव्यातर्फें वकील होता. ( पे. द. भा. २० ले. १७४. )

राघोबादादानें होळकरास उत्तर हिंदुस्थानाचे मोहिमेस येण्यास उशीर कां लागला याचें कारण देतांना भोंसल्यावरील स्वारीमुळें दिवस गेले अशाबद्दल दर्यापुरच्या मुक्कामावरून पत्र लिहिलें आहे. मल्हारराव होळकरानेंहि भोंसल्याशी तह करण्याबद्दल शिफारस केली होती असें वरील पत्रावरून दिसतें त्या पत्रांत दादानें लिहिलें आहे कीं, " भोंसल्याकडील वकील आला तो बहुतच बजीदीचे निरोप सांगो लागला कीं, जें चित्तास येईल ते करावे पोटास मात्र द्यावें. वरकड कोणेहिविसी आग्रह नाहीं. भेटीस येत असो. यैसे त्याचे प्रकार पाहून मातबर माणसाचा केवलच उपहास करणें उचित नाहीं व आपलीहि पत्रें भोसले याविसीं सिफारसीचीं आलीं, आमचेंही मत भोंसल्याचे मसलतीचा उलगडा करून लवकर हिंदुस्थानांत चलावे. आमचा वोढा सर्व प्रकारें हिंदुस्थानचा येविसीं आपलींहि पत्रें येतात. यास्तव भोंसले यांस भेटीस बोलाऊन घेतले. येका दोहों रोजांत भेटी होईल."

---

## पेशव्यांची भोंसल्यांवर दुसरी स्वारी[१]

### ( ज्यानुआरी ते जून १७६९ )

इ. स, १७६६ चे पहिले मोहिमेंत तह झाला तरी जानोजी भोंसल्याचें मन पेशव्याविषयीं शुद्ध झालें नाहीं. इ. स. १७६८ मध्यें **माधवराव** व **दादासाहेब** यांजमध्यें भांडण सुरू होतांच **जानोजीनें राघोबादादास** सैन्याची मदत देण्याचें कबूल करून सैन्य उभें केलें. **जानोजी**प्रमाणेंच **गोविंदराव गायकवाड** यानेंहि **राघोबादादास** मदत करण्याचें कबूल करून तो प्रत्यक्ष जाऊन दादास सामीलहि झाला. भोंसल्यांवरील पहिल्या स्वारींत अखेर तह झाला तो राघोबादादाच्या मध्यस्तीनें झाला होता. **राघोबादादा** हा स्वभावानें भोळा म्हणून म्हणा अगर वेळ पडल्यास पुतण्याविरुद्ध निजाम, भोंसले वगैरे प्रबळ सरदार आपणास अनुकूल असावेत या दूरदर्शीपणामुळें म्हणा

---

१ खरे प्रस्तावना प्रकरण ७.
सरदेसाई मध्य वि. ४ पान १५४ ते १६४
पे. द. भा. २० ले. ११८ ते पुढें.

तो भोसले व निजाम यांशी सख्य ठेवीत होता. त्याप्रमाणें नुकत्याच झालेल्या तहांत **दादा** व **जानोजी भोंसले** यांचे मनांत एकमेकांविषयीं सहानुभूति उत्पन्न झाली होती. शिवाय पूर्वीं भोसल्यांच्या गृहकलहाचा जसा पेशव्यांनीं फायदा घेतला तसाच पेशव्यांच्या गृहकलहाचा फायदा आपण घ्यावा हा मोह जानोजीस आवरला नाही व त्यानें वरप्रमाणें माधवरावास पुन्हां डवचलें.

जानोजीचें सैन्य येऊन पोहोंचण्यापूर्वींच **माधवरावानें राघोबादादाचा** पराभव करून त्यास पकडून कैदेंत ठेविलें व **राघोबादादाच्या** पक्षाच्या मंडळीचा मोड केला. **गोविंदराव गायकवाड** याचा बाप **दमाजी गायकवाड** हा नुकताच मरून **गोविंदरावास** सरदारीचीं वस्त्रें मिळावयाचीं तीं पेशव्यानें अडवून दादास मदत केल्याबद्दल २३ लाख रुपये दंड घेऊन मग त्यास तीं वस्त्रें दिलीं. त्याचप्रमाणें पेशवे बोलावतील तेव्हां सैन्यासह नोकरीस येण्याचें त्यानें कबूल केलें. त्यानंतर भोंसल्यानें दादासाहेबास मदत केल्याबद्दल भोंसल्यावर स्वारी करण्याचा माधवरावानें निश्चय केला. माधवरावाची शिस्त मोठी कडक असून तो सरदारांचे गैरशिस्तीबद्दल क्षमा करणारा नव्हता. पेशव्याची स्वारी पुन्हां नागपुरावर होणार हें समजतांच **जानोजीस** भीति उत्पन्न झाली व त्यानें प्रथम **चिमणाजी रखमांगद चिटणीस** यास पेशव्याची समजूत करण्याकरितां पुण्यास पाठविलें. माधवरावानें जानोजीच्या वर्तनाबद्दल क्षमा करण्याचें नाकारलें व **देवाजीपंतास** पुण्यास पाठविण्याबद्दल **जानोजीस** कळविलें व स्वारीची सिद्धता करून कूच केलें. **जानोजीनें देवाजीपंतास** पुण्यास पाठविलें, परंतु त्यापूर्वींच माधवराव पुणें सोडून निघालाहि होता. दिवाकरपंत हा पेशव्यास मध्येंच वाशीमच्या जवळ लष्करांत भेटला. माधवरावाचें मन देवाजीपंताविषयीं फारच कलुषित झालें होतें व तोच **जानोजीस** आपणाविरुद्ध सल्ला देतो अशी त्याच्या मनाची समजूत झाली होती. त्यामुळें पेशव्यानें **दिवाकरपंतास** कैद करून आपल्याबरोबर लष्करांत ठेविलें व मजल दरमजल कूच करीत तो वऱ्हाडांत शिरला. त्याचेबरोबर **गोपाळराव पटवर्धन** व **रामचंद्र गणेश कानडे** हे मुख्य सरदार होते, शिवाय पेशव्यानें निजामासहि मदत पाठविण्याबद्दल लिहिल्यावरून निजामानें **रुकनुद्दौला** व **रामचंद्र जाधव** यांस आठ हजार फौजेनिशीं पेशव्याच्या मदतीस पाठविलें. **रामचंद्र जाधव**

यास दादासाहेबानें दौलताबादेस पूर्वी कैद करून ठेविलें होतें, त्यास पुढें पेशव्यानें सोडून देऊन तो पूर्वीप्रमाणें निजामाचे चाकरीस जाऊन राहिला होता. **पिराजी निंबाळकर** हा सरदार कधीं भोंसल्यांकडे व कधीं पेशव्यांकडे असे. तो या खेपेस पेशव्यास मिळाला. परंतु नंतर मोगलाईतील **पडतूर** प्रांतांतून तो भोंसल्याकडे निघून गेला. एकण पेशव्याबरोबर साठ हजार फौज व गारदी व तोफखाना वगैरे मजबूत साहित्य होतें. पेशव्याचें सैन्य **सोलापूर, तुळजापूर, धारूर, पाथरी, वाशिम** या मार्गानें[१] वऱ्हाडांत आल्यावर पेशव्यानें वऱ्हाडांतील भोंसल्यांचा सर्व अंमल उठवून आपला बसविला. याप्रमाणें माहे जान्यूआरी १७६९ मध्यें पेशव्यानें वर्धेच्या पश्चिमेकडील सर्व मुलूख आपल्या ताब्यांत घेतला.

भोंसल्यांच्या कुटुंबांतील माणसें **गाविलगडास** असल्यामुळें त्यांचे रक्षणाकरितां जानोजीनें नागपुरचा सुभेदार **नरहर बल्लाळ**[२] यास त्या बाजूस पांच हजार सैन्यानिशीं ठेवलें. नरहर बल्लाळ हा पुढें प्रसिद्धीस आलेला **विठ्ठल बल्लाळ**[३] सुभेदार याचा मामा होता. भोंसल्यांचा सरदार **बापू करांडे** हा बऱ्हाणपुरच्या बाजूस गेला. बऱ्हाणपुर शहर त्या वेळीं पेशव्यांचे ताब्यांत असून पेशव्यांतर्फे तेथें अधिकारी होते त्यांनीं दरवाजे बंद करून बंदोबस्त केला. नरहरपंत हा अकोला, पंचगव्हाण या बाजस लुटालूट करून पेशव्यांच्या सरदारांनी नुकत्याच घेतलेल्या प्रदेशांत खंडण्या घेत होता. नरहरपंत व बापू करांडे यांनी जळगांव–जामोद येथून १२००० व एदलाबाद येथून १५००० खंडणी घेऊन ते मलकापुरास आले. तेथून खानदेशांत जाण्याचा त्यांचा विचार होता; परंतु जामनेर येथे पेशव्याचे अमलदारांनी लष्कर वगैरे जमवून बंदोबस्त केला. त्यामुळें ते पुढें न जातां मागें फिरले. पेशव्यानें आपले तर्फेनें **आनंदराव गोपाळ** व

---

१ ऐ. ले. सं. भा. ३ ले. ७८१, ७८२ मधून या स्वारीचे मुक्काम पुढीलप्रमाणें दिसतात. बीड, पाथरी, नडसी, बाम्हनी, कळमनुरी, वाशीम, मंगरुळपीर, पिंजर, कारंजा, उमरावती, वरुड, आमनेर व नागपूर.

२ आडनांव रिसबूड.

३ विठ्ठल बल्लाळ याचें आडनांव परांजपे.

**बाळाजी केशव सप्रे** या दोघा सरदारांस बंदोबस्तास नेमिलें होतें. **बापू करांडा** हाहि ब-हाणपुराहून येऊन **नरहरपंतास** मिळाला. त्या दोघांचा मुक्काम **पंचगव्हाण** येथें असतां **आनंदराव** व **बाळाजीपंत** यांचे फौजेनें वरील दोघावर छापा घातला. त्या लढाईत नरहरपंत हा मारला गेला[१] व बापू करांडा २५ स्वारांनिशीं पळून गेला. तो मग जानोजी भोंसल्यांस जाऊन मिळाला व पुढें या मोहिमेंत अखेरपर्यंत जानोजीबरोबर राहिला.

नरहरपंत पडल्याचें वर्तमान ऐकून त्याचा भाचा **विठ्ठल बल्लाळ** हा दोन अडीच हजार सडी फौज घेऊन पेशव्याची थोडीशी फौज खानदेश-कडे होती तिकडे जाऊन लुटालूट करून ब-हाणपुराकडे गेला. नरहरपंत पडल्यानंतर पेशव्याचें कांहीं लष्कर आकोटावर होते, तेहि ब-हाणपुरास निघून गेलें. **विठ्ठल बल्लाळ** हा **जळगांव जामोदाहून सोनाळे** येथे

१ यासंबंधानें पे. द. भा. २० ले. २२४ (ता. १६-२-१७६९) यात पुढील मजकूर आहे:—

" मागे वराड प्रांती गडगावेल तेथें कबिले भोंसलियाचे आहेत. रक्षनार्थ रा. नरहर बल्लाळ फौजेसहवर्तमान होते. त्याणी संधल्याहून उगवे वगैरे गांव श्रीमंताचे मोकासियाचे मारिले. श्रीमंताकडून रा।। बालाजी केशव सपरे सुभा होऊन वराडचा बंदोबस्त करावयानिमित्य अकोलियावर आले होते. त्यांचा कांहीं जोर न पडतां रा।। नरहरराव बलाल याणी पूर्णातीर वराडांत कूल करून खंडन्या घेतल्या. हा बोभाट श्रीमंताजवळ गेला. तेथून श्रीमंतांनीं तीन तोफा व नबाबाकडील पथके बीडकर निंबालकर व खंदारचा राजा वगैरे तीन हजार फौज तीन तोफा कुमकीस येऊन प. त्यावर विपरीत काळाची छाया रा।। नरहर बलाल याजवर पडतांच पतंग-प्राये चालून पूर्णातिरी वराडांत लढाई जाली. सूर्योदई अंधकार लयास पावतो तद्वत रा।। नरहर बलाल सहसमुदाये गतप्राण होऊन श्रीमंताची फौज विजयी जाली. राहिली फौज पलायेन करून गडाकडे गेली. यापूर्वी रा।। नरहरराव याचा हेत उत्कर्ष होता कीं, घाट चढून मुलुक मारावा, तो मनोरथ ईश्वरे सिद्धीस पावविला नाहीं."

गेला व हीं दोन्हीं ठाणीं त्यानें घेतलीं. खानदेशचे बाजूस पेशव्याचा विशेष बंदोबस्त नव्हता त्यामुळें तिकडे आपणास विरोध होणार नाहीं व लूट वगैरे मिळेल अशा आशेनें **विठलराव** हा निघाला होता, परंतु पेशव्याच्या अम्मलदारानें **बऱ्हाणपुरचें** सैन्य आणून **बोदवड** येथें ठेविलें. तसेंच **बाळाजीपंत** सप्रे हाहि खानदेशांत गेला. पैठणाहून अजिंठ्याच्या घाटानें भोंसल्यांचे सरदार **जाचक** व **करांडे** हे **विठलपंतास** मिळण्याकरितां येत होते. त्यांची वाट पाहण्याकरितां **विठलपंत** हा **मलकापुरास** थांबला व नंतर वऱ्हाडांत येऊन घाट चढून दक्षिणेंत **अमडापुर** परगण्यांत दंगा करूं लागला. ता.२३–३–१७६९ रोजीं पेशव्यानें वऱ्हाडांत नेमलेला सुभेदार **बाळाजी केशव सप्रे** हा मलकापुराहून **नाना फडनीसास** लिहितो–

"विठ्ठल बल्लाल नरहरपंताचे भाचे सध्या तीन हजार फौजेनिसी आकोलियाचे दक्षिणेस पाचा कोसावर आहेत. आम्ही फौजसुद्धा मलकापुरावर आहो. हे ठाणे मातबर खानदेशची सरद व वऱ्हाडचा शेवट याजकरितां हे ठाणे व परगणा बालाजी केशव पलनिटकर याजकडे यवनाकडून जागीर; परंतु ठाणे बलकट. पंतमारनिलेपासी ऐवज तीनशे राऊत. तेव्हां ठाणे त्यांस हस्तगत होणे कलतच आहे. आम्ही बऱ्हाणपुराहून सडे होऊन येथें आलो. नाना प्रकारचे युक्ति करून लढाई न पडता ठाणे हस्तगत करून मारनिलेस दिल्हे. आम्हांसहि कालकला आसरा चांगला जाला. आम्हीं फौजसुधां वराडांत मध्यभागी जावे तर विटल बलाल खानदेशात भिरतो. पेशजी बऱ्हाणपुरास गेलो होतो तेव्हा मलकापुर परगणियता आला होता. आम्ही मलकापुरावर येताच मागती वऱ्हाडांत गेला. जुजावयास उभा राहात नाहीं. आम्हीं येकीकडे गेलो तर आपण मोहला चुकाऊन येकिकडे जातो. ऐसी रीत वराडियांची पुरातन आहे. आम्हीं सर्व मंडली तीन हजार कुलगणती आहों. आणिक पांच हजार फौज आम्हापासी असती तर त्यांचा राऊत वऱ्हाडांत न राहाता, पलून अन्य देशांत जाता. फौजहि आणिक श्रीमंत पाठविते परंतु खासा स्वारीचा शह लांब गेला तेव्हां फौज आम्हांकडे येणे न घडे."

**विठलपंतास** या मोहिमेंत जखम लागली होती व विठलपंताची बायको व मुलें बऱ्हाणपुरास एका आप्ताचे घरीं होतीं तीं पेशव्याचे कमाविसदारानें अटकेंत ठेवलीं.

इकडे जानोजी भोंसल्यानेंहि लढाईची तयारी केली. त्यानें आपली मुलें, माणसें व जडजवाहीर गाविलगडचे किल्ल्यांत पाठविलेंच होतें. सर्व बंधू एकत्र करून त्यानें सुमारें पंधरावीस हजार फौज जमविली व तो नागपुर सोडून **वर्धा** उतरून वऱ्हाडांत **नांदगांवपेठेच्या** बाजूस राहिला. वर्धेच्या कांठीं **पिराजी निंबाळकर** हा ता. ६-१२-१७६८ रोजी **जानोजीस** मिळाला. दुसरे दिवशी या सर्वांचा मुक्काम वर्धेच्या पश्चिमेस **तिवसें** येथें झाला. **तिवसें** मुक्कामाहून ता. ७-१२-१७६८ रोजीं पेशव्याचा बातमीदार **गोविंद मल्हार** यानें **जानोजीच्या** लष्करांतून या भेटीची व इतर बातम्या दिल्या आहेत त्या अशा:—

" येथील वर्तमान तरी रा. जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांची फौज मुकाम मजकुरी सात आठ हजारापावेतों जमा जाली. दुसरे छ २५ रोज मंगळवारीं गो॥ पिराजी ना॥ निंबालकर वरधा तीरास आले. इकडून सेनासाहेबसुभा तयार होऊन तीन कोसपावेतो त्यास सामोरे गेले. तेहि तिकडून आले. याजकडील व तिकडील सरदार याची भेटी जाल्या. उपरात हे त्रिवर्ग बंधू याची व त्याची भेट जाली, ते हे मिलोन डेऱ्यास आले तो आस्तमान जाला. उपरात खलबत जाले. मग सेनासाहेबसुभा यांचे घरी नाईक मजकुर याणी भोजन केले. दीड प्रहर रात्रपावेतो होते. उपरात आपले गोटास गेले. पिराजी नाईकासमागमे आटोले व गावडे व सुपेकर व खानाजी सिंदे (खोपे) व गोविंदराव भुगटराव व मीरखां ऐस झाडून मिलोन च्यार पाच हजारपावेतो फौज आहे. उभयेता येकत्र जाले. नाईक व भोसले मिलोन बारा तेरा हजारपावेतो फौज जमा जाली. काल भेटी वरधे नदीचे मुकामी जाल्या. तेथून आज कूच करून मुकाम मजकुरास आले. येथूनहि पुढें नांदगावाचें सुमारे कूच जाले. येथ रात्रीचे ठाई लस्करासभोवते छेबिना फिरत राहतो. दुसरे येथ वर्तमान आहे की खासा स्वारी शंक्रातीचे परवाकरिता लस्कराजवळ कोन्हे तीर्थ आहे तेथ स्ना-(ना)स जाणार; त्यास ते समई काही घालमेल करावी. त्यास तीर्थास गेलिया बहुत बंदोबस्त करवावा. दुसरे येथील दोनच्यार सरदारीयाचे व सेनासाहेबाची शपतक्रिया जाली कीं आम्ही तुमचे जिवाचे सोबती ऐसी

जाली. दुसरा, काल माहातास इजाफा [१] केला आणि हातीस सेर करावे ऐसी ताकीद केली आणि अंबारीस कमानी व तीराचे भाते लाविले. ते समई भाशन की येकदा सफेजंगी करावी. काल गोसावी व पठान ऐस आडून बसल की आमचे रुपयाचा निकाल करून देणे. त्यास गोसावियास भाशन केलें की तूर्त दम धरण. जरकरिता रुपया न मिले तरी तुमचे घरीं मोली टाकीन. मग ते गेले. पठाणाचा काही निकाल जाला नाही. तिवशाहून आज कूच होऊन नांदगावास मुकाम आहे. नांदगाव येथून दाहा कोस आहे."

भोंसल्यांचा सरदार **तुळजोपंत** याची पांच हजार फौज तो आजारी असल्यामुळें, त्याचे भाच्याच्या हाताखालीं नरनाळ्याजवळ होती. तीहि दुसरे दिवशीं **नांदगांवचे** मुक्कामीं **जानोजी** व **पिराजी** यांच्या फौजेस मिळाली. ता. १७-१२-१७६८ रोजीं **नांदगावचे** मुक्कामीं भोंसल्यांची एकंदर फौज तेरा चौदा हजार जमली. येथेंच **नागपुराहून** त्याचा तोफखानाहि येऊन त्यास मिळाला. एलिचपुरचा नबाब **इस्मायलखान** यास मदतीस आणण्याकरितां **जानोजीनें** आपला वकील पाठविला होता. परंतु माधवराव व निजामाचे सरदार यांचीहि त्यास पत्रें गेल्यामुळें तो भोंसल्यास मिळाला नाहीं.

ता. १-१२-६८ रोजीं पेशव्याचा मुक्काम **बडनेरगंगाई**पासून पांच कोसांवर होता व भोंसले व पेशवे यांच्या सैन्यांमध्यें अंतर २५ कोसांचें होतें, परंतु ता. १० चे सुमारास हें अंतर अगदीं कमी राहिलें. दुसरे दिवशीं भोंसल्यानें **नांदगावचे**[२] जवळ मुक्काम केला व पेशव्याची फौज उमरावतीजवळ होती तेथें तिजवर हल्ला करून लढाई देण्याचा निश्चय केला. पेशव्याचा बातमीदार १० तारखेस **नांदगांवचे** मुक्कामाहून लिहितोः-

" येथील वर्तमान तरी सेनासाहेबसुभा व **पिराजी न॥** याचा मुकाम मजकुरीं आज आहे. फौज तेरा चवदा हजार पावेतों जमा झाली. रा. **तुळजोपंत** याचे नि॥ ची फौजही काल येथ आली. नागपुरास तोफा राहिल्या

---

१ बक्षीस.

२ उमरावतीजवळ.

होत्या त्या ाटीखालीं आल्या आहेत * * ऊन पोहचतील. दुसरे येथून * शंकराजी घोरपडे दीढा ( हजारानसी) पुढे रवाना झाले आहेत. त्यास त्याची बातमी असो द्यावी. दुसरे यानी येथ कितेक लोकास चिलखते वाटलीं आनी दिलबरी केली; आणि तमाम सरदार यास ताकीद की फार सावद असावे. आपापली तयारी असो द्यावी, ऐसी ताकीद करून तह ठरविला की आज कर आहे. उदईक रविवारी मोकावला घ्यावा व मग जे होणें ते होईल. त्यास ऐसा करार जाला आहे. रविवारीं कूच करून सडी फौजनसी येणार त्यासी तेथ फौजेस ताकीद असो द्यावी की खबरदार असावे. खासा जातीनसी रात्रीस जागतात आणि स्वार सभोवते तयार असतात. अंतर उभयेपक्षी फार जवल राहात चालल्यास्तव सावधता असलिया कामाची आहे. "

**भोंसल्याची झकांडीः–** पेशव्यांबरोबर पन्नास साठ हजार फौज असल्यामुळे भोसल्याची हिम्मत त्या फौजेवर हल्ला करण्याची झाली नाही व त्या उभयतांची लढाई झाली नाहीं. **देवाजीपंत** हा पेशव्याच्या अटकेंत त्याच्या लष्करांतच होता. तो पेशव्यास भोंसल्यांकडून १५ लक्ष रुपये देवविण्याचें कबूल करून मोहीम थांबवावी अशी विनंति पहिलेपासून करीतच होता. परंतु पेशव्यानें तें कबूल केलें नाहीं. देवाजीपंत जरी पेशव्याच्या कैदेंत होता तरी सर्व बातम्या राखून जानोजीस सूचना देतच होता. त्यानें सूचना दिल्यावरून म्हणा अगर भीतीनें म्हणून म्हणा जानोजीनें लढाई न देतां अचानक मागें पाय घेतला व चंद्रपुराकडेस कूच केलें. पेशव्यानें जानोजीच्या फौजेवर एकदम हल्ला कां केला नाही हें समजत नाहीं. बहुधा जानोजीची फौज सडी असून पेशव्याबरोबर तोफखाना वगैरे लटांबर मोठें होतें. त्यामुळें जानोजीचा पाठलाग आपल्याच्यानें होणार नाहीं या कारणामुळें म्हणा अगर पेशव्याच्या मनांत जानोजीची राजधानी नागपूर हें लुटून फस्त करावें व पुणें जाळल्याचा वचपा काढावा ही इच्छा असल्यामुळें म्हणा त्यानें जानोजीचा पाठलाग केला नाहीं व नागपुरचा रोख धरिला. त्यानें **वरूडजरूडच्या** मार्गानें जाऊन जवळचा **आमनेरचा** भुईकोट किल्ला ता. २०–१–१७६९ रोजीं हस्तगत केला. तेथून मजल दरमजल तो नाग-

पुरास आला. २१-१-१७६९ रोजीं **कृष्णराव काळे** हा आमनेर मुक्कामाहून लिहितोः- "काल आमनेरच्या किल्याचें ठाणें हस्तगत केले त्यांत. राघोबुवाजीस ठेवावयाची नेमणूक केली आहे. त्यास आंत ठेऊन पुढें मजल दरमजल नागपुरावरून **देवगड, चांदे** वगैरे ठिकाणें हस्तगत करावयाचा उद्देश आहे. जानोजी **भोंसले** तूर्त **झाडींत** पळोन गेले. सात आठ हजार फौज आहे. वऱ्हाडांत वर्धे अलीकडे जपती भोंसल्याचें अमलाची जाहाली. सालमजकुरी गोंडवन तमाम पायमलीखाले जाले. मोगलाचीही फौज पंधरा हजार पर्यंत जमा जाहाली आहे. जमिदोज ठाणी कुलदो अडचा महिन्यांत हस्तगत होतील. श्रीमंतांचे ताले सिकंदर आहेत. प्रस्तुत भोंसले खराबींत आले. फौज श्रीमंताजवळ **रामचंद्र गणेश** व मोंगल मिळोन पनास हजार फौज जमा आहे. रा. **नारोशंकर**हि **लाखणवाडियाचा** घाट उतरोन आले. शहरांत लौकरीच येऊन दाखल होतील."

**नागपुर लुटलें- माधवराव आमनेराहून** नागपूरकडेस निघाला. तेथून नागपुरास जाऊन पेशव्यानें **नागपुर** शहर स्वस्थपणें लुटून फस्त केलें. याप्रमाणें नागपुरची लुटालूट [१] व जाळपोळ केल्यामुळें पूर्वी इ. स. १७६३ मध्यें जानोजीनें व मोगलानें मिळून पुणें जाळल्याबद्दल पेशव्यानें पूर्ण सूड उगविला.

**भंडारा घेतला**--नागपुर लुटल्यावर माधवरावानें **रामचंद्र गणेश कानडे** या सरदारास **भंडाऱ्याचा** भुईकोट किल्ला घेण्याकरिता रवाना केलें व त्यानें जाऊन तो किल्ला सर केला.

**चंद्रपुरचा वेढा**--पेशवे व मोंगल यांचे फौजेपुढें आपला निभाव लागत नाहीं असें पाहून जानोजीनें समोरासमोर लढाई न देतां गनिमी काव्यानें पेशव्यास हुलकावण्या देण्याचा व आपला बचाव करण्याचा निश्चय केला.

---

१ ही नागपुरची लूट जान्युआरी अखेर झाली असावी. सरदेसाई मध्य. वि. भा. ४ पान १५७ मध्यें ता. ११-१-१७६९ चें वर्तमान म्हणून लिहितात. त्यांत "श्रीमंत शनिवारीं नागपुरास आले. आज रविवारी सर्व लष्कर आले." असा उतारा देतात. या तारखेप्रमाणें ता. ८ जान्युआरीस पेशवे नागपुरास आले असें निघतें. या तारखेंत कांहीं चूक असावी. वरील तारखा आम्ही पे. द. भा. २० मधील अस्सल पत्रांवरून दिल्या आहेत.

नागपुरच्या खालोखाल **चंद्रपुर** ऊर्फ चांदा हें भोंसल्यांचें एक मजबूत ठाणें होतें. मुधोजीच्या वाटणीस हें ठाणें गेलें असून तेथें त्याचा चांगला बंदोबस्त होता. या शहरास मजबूत तट असून आंत किल्लाहि मजबूत होता. तेथें मुधोजी व त्याचे दुसरे दोघे बंधू जाऊन मजबुती करून राहिले व जानोजी कांहीं सैन्यासह सडा बाहेर राहिला. मुधोजीचीं मुलेंमाणसें त्यानें माहूरच्या दक्षिणेस माणिकगड नांवाच्या डोंगरी किल्ल्यावर ठेविलीं. मुधोजीचा विश्वासू सरदार **महिपतराव दिनकर** प्रभू[२] यास मुधोजीनें चंद्रपुरास ठेविलें.

महिपतरावाचे आप्त पेशव्याच्या सैन्यांत असल्यामुळें **जानोजीस महिपतरावाची** खात्री येईना, परंतु **मुधोजीनें** महिपतरावाची खात्री दिली व तो त्याप्रमाणेंच इमानानें वागला.

पेशव्यानें नागपुराहून चंद्रपुरास येऊन किल्ल्यास मोर्चे लाविले ( फेब्रुआरी आरंभ ) व शहरास वेढा दिला व स्वतः वर्धेच्या पश्चिमेस येऊन **पांढरकेंवडा** येथें तळ दिला. **जानोजी** हा चंद्रपुरच्या बाहेर मोकळा असल्यामुळें त्याचा पाठलाग करण्याकरितां माधवरावानें आपल्या लष्करापकीं एक भाग मोकळा ठेविला व त्यानें सडे होऊन जानोजीचा पाठलाग करावा असें ठरविलें.

जानोजी व त्याचे तिघे बंधू वरप्रमाणें चंद्रपुरचा बंदोबस्त करून सडे होऊन निघाले. जानोजी हा तोंपर्यंत आपल्या सैन्यासह झाडीच्या मुलुग्वांत (गोंडवणांत) राहून नंतर वर्धा उतरून माहूरचे बाजूस गेला व त्यानें उमरखेडचा रोंख धरला. उमरखेड परगणा हा पेशव्याच्या ताब्यांत होता. पेशव्यानें त्याचे पाठलागास **गोपाळराव** व **रामचंद्र गणेश** यांस पाठविलें. ता. १२ फेब्रुआरी रोजीं महादजी बल्लाळ ( गुरुजी) हा पुण्यास लिहितोः—

"ता॥ माघ शुध षष्टी पावेतो स्वामीचे कृपेकरून मु॥ नजीक चांदे सुखरूप असो विशेष. इकडील वर्तमान तरी भोंसले आजपावेतो झाडींतच होते. बातमीचाहि पता पुरता लागू दिल्हा नाही. हाली बातमी आज आली की भोसले * * * * येलगडयास गेले. पुढें मजल दरमजल

---

२ याचें आडनांव गुप्ते असें होतें. याचाच नातू काशीराव राजेश्वर गुप्ते यानें नागपुरकर भोंसल्यांची बखर लिहिली, तीच छापलेली आहे.

देशात जावे याप्रा ो त्याची कस्त आहे. जासूद सोडून तीन दिवस जाहाले. आजकाल उमरखेडचे सुमारे गेले असतील किंवा जातील. कमकसर वीस हजार फौज जरागी आहे. चौघा खाशांच्या मात्र चार चांदव्या व चार राहुटच्या आहेत. लस्करांत कोणाजवळ पाल राहुटी नाहीं. सडे जरारे जाहाले. गोपालराव व रामचंद्र गणेश आजच त्याचे पाठीवर पधरा आठ हजार फौजेनिसी होतील. मागून साहेबी दरमजल येतील. याप्रा ो मनसबा ठरला आहे. आपणहि तिकडील बातमी राखून सावध सत्वर करावी."

चंद्रपुरास पेशव्यानें फितूरी[1] करण्याचाहि प्रयत्न केला. चंद्रपुरचा किल्ला घेण्याकरितां सैन्य गुतून ठेवणें व स्वतःहि दिवस घालवून जानोजी व त्याचे बंधु यांस मोकळे ठेवणें हें पेशव्यास धोक्याचें वाटलें. त्यानें महिपतरावास पंचवीस हजारांची जहागीर देण्याचें आमिष त्याचे आप्त **बाबूराव हरी** व **सखाराम हरी** व **उमाजी विनायक** यांचेमार्फत दाखवून, त्यानें फितूर होऊन चंद्रपुरचा किल्ला पेशव्याचे स्वाधीन करावा असा प्रयत्न केला. परंतु महिपतराव हा फुटला नाहीं. उलट त्यानें किल्ल्यांतून पांचशे फौजेनिशीं बाहेर निघून पेशव्याच्या फौजेवर छापा घातला व थोडीशी नुकसानीहि केली.

महिपतराव हा फितुरींत येत नाही असें पाहून व जानोजी तिकडे मोकळा असून पश्चिमेचा रोंख धरून जात आहे व न जाणों कदाचित् पुण्याकडे जाऊन तेथें फंदफितूरी करील अशी पेशव्यास धास्ती वाटू लागली व ती अगदींच निराधार नव्हती. राघोबादादा हा पेशव्याच्या कैदेंत असून **दादाचें** व **जानोजीचें** पूर्वीपासूनच सूत होतें. जानोजीनें जाऊन दादास व त्याचे पक्षाचे लोकांस मिळवून घेऊन **दादाची** सुटका केल्यास सर्वच घोंटाळे माजतील व पूर्वीप्रमाणें **जानोजीनें पुणें** लुटल्यास

१ पेशव्यानें चंद्रपुरांतील ब्राम्हणांस पुढें लिहिल्याप्रमाणें पत्रें पाठविल्याचा मजकूर बखर पा. ७६ मध्यें आहे. "आपण बाहेर निघावे, आम्ही आल्यावर कठीण जाईल, आम्ही देव ब्राम्हणांचे भक्त आहोंत. अंतर पडू नये. सरकारासमागमें १५०० तोफा जरब मातबर शिवाय फौजहि आहे. एक किंवा दोन घटकेंत चंद्रपुर घेतलें जाईल."

पुन्हां फजीति होईल अशी भीति पेशव्यास वाटूं लागली. या सर्व गोष्टी संभवनीयहि होत्या. म्हणून चंद्रपुरचा वेढा जास्त लांबविणें हें त्यास इष्ट वाटलें नाहीं.

इकडे चंद्रपुरचा किल्ला जास्त दिवस टिकविणें महिपतरावासहि कठीण वाटलें. पेशव्याच्या तोफखान्यामुळें शहराचें नुकसान होऊन दोन चार दिवसांत किल्ला सोडावा लागेल अशी भीति महिपतरावास वाटली. इकडे पेशव्याच्या सैन्यांत कारस्थानी **देवाजीपंत** हाहि रिकामा न बसतां अनेक फंद करीत होता. जानोजीहि आपण पुण्यास जाऊन पुणें जाळणार व दादास सोडवून प्रतिनिधीच्या मार्फत सिंहगडास रवाना करणार अशी त्यानें हूल उठविली. त्याचप्रमाणें मोंगल व पेशवे यांचे मुलुखांत शिरले म्हणजे आपल्या मुलुखाची खराबी होऊं नये म्हणून ते आपल्या मागें येतील व चंद्रपुरचा वेढा उठेल अशीहि त्याची अटकळ होती. इतक्यांत दुसरीहि एक कपटनीति भोंसल्यानें व **महिपतरावानें देवाजीपंताच्या** सल्यावरून केली ती अशी : **महिपतरावानें देवाजीपंतास** अशा बेतानें पत्र पाठवावें कीं, तें पेशव्याच्या लष्करांत धरलें जाईल व त्यायोगानें पेशवे घाबरून जातील. त्याप्रमाणें **महिपतरावानें** पत्र लिहिलें कीं, " चंद्रपुरास पतप्रधान आले. फार चांगलें झालें. भोंसले यांची दौलत सारी हस्तगत होईल, ही जागा साध्य झाली म्हणजे सगळें राज्य आपलें झालें, असें तुम्हीं पंतप्रधानास सुचवून चंद्रपुरचे शहास आणावें. येथेंही सरंजाम मजबूत आहे. पंतप्रधान याजपुढें हा किल्ला राहत नाहीं. परंतु पंधरा दिवस किंवा आठ दिवस येथें गुतले म्हणजे यजमान पुण्यास जाऊन दादासाहेबास भेटून बाहेर काढतील, म्हणजे त्या प्रांतांची उद्यानता करीत कार्यसिद्धी होईल. "[१]

अशाच मजकुराचें एक पत्र **जानोजी**कडून देवाजीपंतास **माहुरा**कडूनहि पाठविलें. कल्पनेप्रमाणें हीं दोन्ही पत्रें पेशव्याचे लष्करांत धरलीं गेलीं. वरील गोष्टीची आवाईहि पूर्वी होतीच. त्यावरून वरील गोष्टी खऱ्या वाटून पेशव्यानें चंद्रपुरचा वेढा उठविला व आपण सर्व लष्करासह स्वतःहि जानोजीच्या मागें लागला. याप्रमाणें युक्ति सफल होऊन चंद्रपुरचा वेढा उठला (फेब्रुआरी १७६९).

१ बखर पान ७६.

**पुण्यास पळापळ**— पेशव्यानें पुण्यास नाना फडणिसास पत्रें लिहून, राघोबादादास व घरचे सर्व मंडळीस पुण्याहून काढून सिंहगडास नेऊन ठेवण्यास सांगितलें. त्याप्रमाणें नानानें सर्व तजवीज केली. त्यापूर्वी दादानें पेशव्यांच्या कैदेंतून सुटून पळून जाण्याचाहि प्रयत्न केला होता. परंतु तो उघडकीस येऊन फसला (ता. २३ मार्च ). भोंसले पुणें शहर लुटणार ही बातमी अगोदरच पुण्यांत पसरली होती. त्यांत पेशव्याच्या घरचीं माणसें व दादा यांस सिंहगडास नेऊन ठेविल्यामुळें पुण्यांतील लोक फारच घाबरले व पुणें सोडून बहुतेक लोक पळून गेले. चार हिस्से लोक निघून गेले व एक हिस्सा जावयाचे राहिले. इकडे पेशव्यानें चंद्रपुरचा वेढा उठवून स्वतःहि सर्व फौजेसुद्धां भोंसल्याच्या मागें चाल केली व आतां भोंसले एवढ्या सैन्याच्या कचाट्यांतून पुण्यास जाणें शक्य नाही असें पाहून पेशव्यानें पुण्यास पत्रें लिहिलीं कीं, भोंसले पुण्यावर येत नाहीत. त्याचप्रमाणें सिंहगडावरची मंडळी परत पुण्यास आणून सर्व लोकांसहि पुण्यास परत बोलाविण्याबद्दल पेशव्यानें लिहिलें. त्याप्रमाणें नाना फडणिसानें सिंहगडाहून सर्व मंडळीस परत आणिलें व गायकवाडाची तीन हजार फौज पुण्यास आणवून ठेविली. त्यामुळें लोकांना धीर येऊन ते हळूहळू परत आले.

**जानोजीचा पाठलाग**—जानोजीच्या मागें २५ कोसांवर **गोपाळराव व रामचंद्र** गणेश व त्यांच्याहि मागें २० कोसांवर पेशवे साहुरास, अशी तिन्ही सैन्यांची स्थिति होती. भोंसल्याबरोबर पंधरा हजार घोडेस्वारांचें सैन्य होतें व पेशव्याचें एकंदर सैन्य पन्नास साठ हजार होतें. भोंसले **उमरखेडाहून भालकी** व **मेदक** या मार्गानें गोदावरीच्या दक्षिणेस गेले व पेशव्याचें सैन्य त्याच्या मागें लागलें. एवढें मोठें सैन्य मागें असल्यामुळें व चंद्रपुरचा वेढा उठविण्याचा मुख्य हेतु साध्य झाल्यामुळें जानोजीनें पुण्याचा रोख सोडून दिला. पेशव्यानेंहि मोठमोठ्या मजली मारून आपल्या आघाडीच्या सैन्यास गांठलें. मोंगलांचें सैन्य इतक्या लांब मजली होत नाहींत या सबबीवर मागेंच राहिलें. **रामचंद्र जाधव** हा **भोंसल्यास** फितूर झाला आहे अशीहि बातमी पेशव्यास समजली;

दोन्हीहि फौजा धांवतां धावतां बेजार झाल्या. जानोजी पुन्हां मुसंडी मारून पश्चिमेस बेदर व औसा या परगण्यांत गेला.

**जानोजी मागें वळला**—पेशव्यानें आतां जानोजीस परत नागपुराकडे हुसकन लावण्याचा निश्चय केला व सरळ पश्चिमेस जाऊन **पाथरी** येथें त्यानें आपलें जड सामान व बुणगें ठेवून तो सडा झाला. इकडे त्याचे सरदार भोंसल्याच्या मागें होते. पश्चिमेस पेशवे व पूवस पेशव्याचे सरदार याप्रमाणें दोन्ही सैन्यांच्या मध्यें आपण कोंडलें जाऊं अशी आतां जानोजीस भीति वाटूं लागली. म्हणून त्यानें थेट उत्तरेस जाऊन नागपुरास जांण्याचा निश्चय केला व तो नागपुरच्या रोखानें निघाला. पेशव्याचे सैन्यानेंहि त्यास हळुहळू चोहोंकडून घेरलें. मधून मधून उभय सैन्यांच्या लहान लहान चकमकी होतच होत्या. एकदां भोंसल्याच्या **बापू करांडा** या सरदारानें पेशव्याच्या बुणग्यावर हल्ला करून तें लुटलें. जानोजीचें सैन्य बहुतेक घेरलें गेलें; पण स्वत: जानोजी कांहीं सैन्यासह वर्धा नदी उतरून पूर्वेस चिनूरकडे तेलंगणांत गेला.

वरप्रमाणें जानोजीचें सैन्य घेरलें गेल्यामुळें त्याचा नाइलाज झाला. त्याचें बहुतेक राज्य पेशव्याच्या ताब्यांत आलेंच होतें व आतां आपण पकडलों गेल्यास सर्व राज्यास मुकूं अशी भीति जानोजीस वाटूं लागली. शिवाय मुधोजीस फोडून त्यास सेनासाहेबाचें पद देण्याबद्दल पेशव्याचा फितूर चालूच होता, त्यामुळें जानोजीनें पेशव्यास शरण येऊन तह करण्याची इच्छा दाखविली व पेशव्याशीं त्याप्रमाणें बोलणें सुरू केलें.

इकडे पेशव्याची बाजू जरी सरसी होती तरी तोहि या मोहिमेस कंटाळला होता. भोंसल्यावरील मोहिमेमुळें उत्तर हिंदुस्थानांत फौजा पाठविणें थांबलें होतें. यामुळें पेशव्याचे सरदार गोपाळराव वगैरेंनीहि पेशव्यास तह करण्याची सल्ला दिली. पेशव्यानें मोगलांचा दिवाण रुकनुद्दौला याचा विचार घेऊन तह करण्याचें ठरविलें व ता. ७ मार्च रोजीं त्यानें आपण सल्ला करण्यास तयार आहों असें पत्र भोंसल्यास लिहून लढाई थांबविली. या वेळीं पेशव्याचा मुक्काम **निर्मळ** येथें होता.

**कनकापुरचा तह** (ता.२३-३-१७६९)- भोंसल्यातर्फे **देवाजीपंत** हा

पेशव्यांशीं तहाच्या शर्ती ठरवीत होता.[1] पूर्वी देवाजीपंत हा स्वारी–खर्चा-बद्दल पंधरा लक्ष रुपये पेशव्यास देऊन लढाई थांबविण्याबद्दल पेशव्यास म्हणत होता. शिवाय इ. स. १७६३ साली निजामाकडून मिळालेल्या ३२ लक्षांच्या जहागिरीपैकीं ८ लक्षांची जहागिरी अद्याप भोंसल्यांकडे राहिली होती तीहि परत देण्याचें कबूल करीत होता, परंतु माधवराव हा त्याशिवाय वर्धेच्या अलीकडील सर्व मुलुख मागत होता. हें न पट-ल्यामुळें लढाई पुढें चालली. शेवटीं देवाजीपंताच्या विद्यमानें पेशव्यांशीं पुढील शर्ती ठरल्या. त्यांत फक्त ८ लक्षांची जहागीर परत देण्याचा व इतर किरकोळ शर्तींवरच पेशव्यानें तह करण्याचें कबूल केलें. स्वारी–खर्चाबद्दल पूर्वी देवाजीपंत पंधरा लक्ष रुपये देत होता तेहि या तहांत पेशव्यास मिळाले नाहींत. यामुळें या तहांत पेशव्याचा कांहींएक फायदा झाला नाहीं व दोन्ही पक्ष खराबींत व खर्चांत आले. पक्का तह ब्रम्हेश्वर नजीक **कनकापुर**[2] (गोदावरीच्या काठी) येथें ता. २३–३–१७६९ रोजीं झाला. त्या तहाच्या शर्ती खालीलप्रमाणें होत्या.[3]

(१) जानोजीस पेशव्यांनीं सन १७६३ सालीं बत्तीस लक्षांची जहा-गीर दिली होती व तीपैकीं सन १७६६ च्या स्वारींत चोवीस लक्षांची परत घेतली होती. आतां आठ लक्षांची राहिली होती तीहि त्यानें पेश-व्यास परत द्यावी.

(२) अक्कलकोटकर भोंसले शहाजीराजे यांचीं कांहीं उत्पन्नें व हक्क वऱ्हाडप्रांतीं होते ते जानोजीनें जप्त केले आहेत. त्यावरची जप्ती उठवावी व त्याऐवजीं बाळापुर परगणा द्यावा.

(३) पेशवाई मुलुखापैकी औरंगाबाद सुभ्यांत भोंसले आजपर्यंत परभारें घांसदाण्याचा ऐवज घेत असत तो त्यांनीं आतां तसा घेऊं नये. त्याच-

---

१ ना. भो. का. प. ले. ३३, ३४, ३५ व ३७ पहा.

२ हा तहनामा ना. भो. का. प. ले. १९ व २८ (ऐ.प.ले.११७-११८) मध्यें संपूर्ण छापला आहे व ले. २५, २६ मध्यें मुधोजीनें पुढें त्यांत कांहीं फेरफार केला आहे.

३ खरे प्रस्तावना पान १६९-१७० व ऐ. प. ले. ११७-११८ पहा.

प्रमाणें इतर सुभ्यांत किंवा मोंगलाच्या राज्यांतदेखील फौज पाठवून घांसदाणा घेऊं नये. पेशव्यांचे त्या त्या तालुक्याचे अंमलदार असतील त्यांस सरकारांतून वेळोवेळीं भोंसल्यांचा ऐवज देण्याबद्दल ताकिदी होत जातील व त्याप्रमाणें ते ऐवज देतील. मोंगलांकडून याचप्रमाणें सामोपचारानें ऐवज मिळेल. तसा तो न मिळाल्यास मात्र मग भोंसल्यांनीं जबरदस्तीनें मोंगलाच्या मुलुखांतून घ्यावा.

(४) पेशवे सरकारांतून बोलावणें येईल त्या त्या वेळीं भोंसल्यांनीं फौजेसह चाकरीस हजर व्हावें.

(५) पेशव्याच्या आज्ञेखेरीज भोंसल्यांनी आपली फौज वाढवूं नये व कमीही करूं नये.

(६) पेशव्यांच्या राज्यापैकीं बखेडेखोर व फंदफितूर करणारे लोक असतील त्यांस भोंसल्यांनीं आसरा देऊं नये.

(७) दिल्लीचा बादशहा, औधचा नबाब, रोहिले, इंग्रज व मोंगल यांपैकीं कोणाशीही पेशव्यांच्या परवानगीशिवाय भोंसल्यांनीं राजकारण करूं नये.

(८) भोंसले यांनीं पेशव्यास दरसाल पांच लक्ष रुपये खंडणी पांच हप्त्यांनीं देत जावी.

(९) हिंदुस्थानप्रांतीं पेशवे सरकारची फौज जावयाची असेल तेव्हां ती मुद्दाम भोंसल्यांच्या मुलखांतून नवीन वाट पाडून जाणार नाहीं. जुन्या मार्गानें जात जाईल.

(१०) जानोजी आपल्या भावाबंदांचें जेथपर्यंत यथास्थित चालवीत जाईल तेथपर्यंत पेशव्यानें त्याच्या घरखटल्यांत पडूं नये.

(११) वाशीमचे कापड दोन हजारांचें व बाळापुरचें तीन हजारांचें याप्रमाणें चांगलें फर्मावसी दरसाल पाठवीत जावें.

(१२) रेवा मुकुंदपुर, महोबा, चारठाणें, जिंतूर, साकरखेर्डा, मेहकर हे सहा महाल भोंसल्यानें पेशव्यास परत द्यावे.

(१३) भोंसल्याच्या ओडीसाप्रांतांत कलकत्तेकर इंग्रज उपद्रव देत असतात. त्यांजवर स्वारी करण्यांकरितां भोंसल्यास फौज पाठवावयाची झाल्यास पेशव्यास विचारून त्यास फौजेची जरूरी नसेल तेव्हां पाठवावी.

(१४) भोंसल्यावर कांहीं परचक्र आल्यास पेशव्यानें त्याच्या मदतीस फौज पाठवावी.

तहाच्या शर्ती पक्या झाल्यानंतर जानोजी व पेशवे यांनीं एकमेकांच्या भेटी घ्याव्या असें ठरलें व माधवरावानें जानोजीकडे देवाजीपंतास पाठविलें व त्यांचे बरोबर आपणातर्फे **गोविंद शिवराम खाजगीवाले** यास रवाना केलें. दोघांच्या भेटी **वाशीमच्या** जवळपास व्हाव्या असें ठरलें, कारण जानोजी भोंसल्याचा मुक्काम तीस कोसांवर पूर्वेस **चिमूरचे** सुमारास असून त्यास यावयास अवकाश होता म्हणून माधवराव **कनका**पुराहून आवंढेनागनाथाचें दर्शन घेण्याकरितां रवाना झाला व वरीलप्रमाणें वाशीमचे जवळपास देवाजीपंतानें जानोजीस घेऊन यावें व पेशव्यानेंहि त्याच सुमारास आवंढेनागनाथाहून वर्षप्रतिपदेचे सुमारास वाशिमास यावें असें ठरलें. प्रसिद्ध **हरीपंत फडके** हा पेशव्याच्या लष्करावरोबर होता तो ता. ७ एप्रिल रोजी **आवंढया** जवळून पुण्यास लिहितो:-

"भोंसल्यास आणावयास राजश्री दिवाकरपंत गेले आहेत त्यांची भेट होऊन पत्रे आली नाहीत. पत्रे दोन चार रोजात येतील मग दोन मजली श्री. राजश्री दादास[१] पुढें जानोजीबाबास आणावयास जावें लागेल. येथें चारपांच मुक्काम होतील. त्रितीयेस येथून कूच करून आवढ्यास जातील. देवदर्शन करून तेथेच मुक्काम करतील. चतुर्थी पंचमीस कूच करून पेणचे[२] पाण्यानें वाशीमचे सुमारे जात असो, इतकियांत देवाजीपंत येतील. श्री. राजश्री दादा [१] तिकडे जाऊन भोसल्यास श्रीमंताचे भेटीस घेऊन येतील."

ता. १६ एप्रिल रोजीं पेशव्याचा मुक्काम वाशमाहून चार कोसांवर दक्षिणेकडेस पेनगंगेच्या कांठीं होता. तेथें **देवाजीपंत** जानोजीच्या पुढें येऊन पेशव्यास भेटला. जानोजीहि ५० कोस **माजरी तळेगांव** येथें मागें होता त्यास सामोरे जाऊन भेटीस घेऊन आणण्याकरितां पेशव्यानें **मोरोबादादा फडणीस** यास पाठविलें [२]

---

१ मोरोबा दादा फडणीस. २ पेनगंगा नदीच्या कांठानें.

२ याच सुमारास जानोजी भोंसल्याच्या मृत्यूचेंहि खोटें वर्तमान चोहोंकडे पसरलें होतें. पे. द. भा. २० ले. २६०, २७५, १९१.

जानोजी हा चैत्र शु॥ १ च्या (ता. ७–४–१७६९) सुमारास **वाशीम** येथें यावयाचा. परंतु वर्षप्रतिपदेपर्यंत आपल्या मुक्कामावरून हाललाच नव्हता. द्वितीयेस जानोजी आपल्या तळावरून निघून वाशीमकडे निघाला. माधवराव हा पेनगंगेच्या कांठानें वाशीमहून मेहकरास आला. **मोराबादादा फडणीस** व **हरीपंत फडके** हे दोन हजार फौज घेऊन जानोजीस सामोरे गेले. त्यांची भेट मार्गे चाळीस कोसांवर **मांजे** येथें झाली. तेथून ते जानोजीस घेऊन ता. २४ एप्रिल (चैत्र वद्य ३ सोमवार) रोजीं **मेहेकर** येथें पेनगंगेच्या कांठीं पेशव्याचा मुक्काम होता तेथें घेऊन आले व पेशवे व जानोजी यांच्या **मेहकर** येथें मोटचा समारंभानें भेटी झाल्या. [1] त्यापूर्वी दोनतीन दिवस आधीं पेशव्याचा मुक्काम **मेहेकर** येथेंच होता व या भेटीनंतरहि चारपांच दिवस सर्वांचा तेथेंच मुक्काम होऊन एकमेकांकडे मेजवान्या व मानसन्मान वगैरे झाले. मोंगलांचा दिवाण **रुकनुद्दौला** हाहि तेथेंच होता. त्याचेकडेहि उलटसुलट मेजवान्या झाल्या. मेहेकर मुक्कामी या नवीन तहापैकीं तीन लक्षांचे महाल मोंगलास देण्याचें कबूल केलें व भोंसल्याकडील मेहेकर वगैरे चार लक्षांचे महाल सुटले होते त्यांपैकी मोंगलास तीन लक्षांचे महाल पेशव्यानें दिले. [2]

---

१ पे. द. भा. २० ले. २७९.

सरदेसाई मध्य विभाग भा. ४ पा. १६१ मध्यें जानोजी व माधवराव यांची भेट ता. ७–४–१७६९ रोजीं वर्षप्रतिपदेच्या मुहूर्तानें वाशीम येथें झाली असें लिहिलें आहे परंतु तें बरोबर नाहीं. त्या दिवशीं वाशीम येथें भेटी होण्याचें ठरलें होतें, परंतु जानोजी तोंपर्यंत न आल्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें ता. २४ एप्रिल रोजी मेहेकर येथें त्यांच्या भेटी झाल्या. पेशवे दप्तरांतील वरील लेखांक त्यावेळीं उपलब्ध नसल्यामुळें पूर्वी ठरल्याप्रमाणें भेटी झाल्या असतील या अंदाजानें वरील विधान झालें असावें. जानोजीस उशीर लागण्याचें कारण देवाजीपंत गेल्यानंतर जानोजीचा विचार बदलला व त्यानें देवाजीपंतास मागाहून चिठी पाठविली कीं, आम्ही येत नाहीं. त्यामुळें माधवरावासहि संशय आला कीं, यांत देवाजीपंताचीच कांहीं तरी लबाडी आहे, परंतु पुन्हां निरोप गेल्यानंतर जानोजी निघून आला. (ले. १९७ पहा)

२ पे. द. भा. २० ले. २८०.

वरील निरवा–निरव झाल्यामुळें पेशवे पुण्यास गेले व भोंसले नागपुरास आले. वरील लढाईंत आपणास मदत करण्याबद्दल जानोजीनें कलकत्तेकर इंग्रजांस विनविलें होतें पण त्यांनीं कांहींएक मदत केली नाहीं. याप्रमाणें भोंसल्यावरील दुसऱ्या मोहिमेचा शेवट झाला.

भोंसल्याकडील खर्चाची ओढ या मोहिमेंत किती झाली होती, हें दिवाकरपंतांच्या पत्रावरून दिसून येईल. फौजेचा पगार तुबला असून त्यांनीं दिवाकरपंतास व जानोजीसहि अडविलें होतें. शेवटीं पेशव्यांकडून कांहीं द्रव्य कर्जाच्या रूपानें घेऊन त्यांनीं आपली सुटका करून घेतली व याच कारणामुळें बहुधा या स्वारीचा खर्च पेशव्यानें भोंसल्याकडून घेतला नाहीं. दिवाकरपंतानें माधवरावास वरील आणीबाणीच्या वेळीं पत्र पाठविलें तें असें:–

" आपले वचनावर लिहिल्यावर श्रीमंत येजमान आले. श्रीमंताची मसलत काही खराब जाली नाहीं; सोये पडली. यैसे असता आज दुसरा उपवास. सिलेदाराचे कारकोनाप्रमान घेऊन आटोपहार[1] तोंड वासाव तर हे उचित दिसत नाही; येतो. आपन आज्ञा करितात की दरबारात वोढ आहे बोलू नका. उठून येतो. त्यास श्रीमंत येथें आल्याचे फळ उपवास करावे, मराव हे ठाऊक नव्हत. लाख रुपये दिले तेहि बागलकोटी, साडेनवाची मोहर फौजेची येकच हाक जाली. दवलत पेचात यावी हा अर्थ घडल हे ठाव नव्हत. च्यार लक्ष रूपये आज पाहिजेत, नाहीतर परिछिन जीव वाचत नाही. कर्जबातरीक[2] घ्यावे. हती घोडी भरीस घालतो तरी पुरत नाहीत यैसा कहर. जर आठ सांगून पाठवितो तर पेच दिसता. सांडनीस्वार पाठविला. त्याचे उत्तर आले की येथे आलियावर सर्व घडल. तैसेच करार करून येथोवर आनिलें. च्यार काले कागद दिले ते आज काये उपयोगावर पडले. त्यास याजला आनिले तैसे याजला जिवंत वाचून येथून जात ते कराव. वाचायाचे असेल तर वेंकट रमनाची सेफत आहे. आजवरी यैसे लिहिले नाही. येथे उपाये आमचा नाही. लोकाची घोडी दोन लक्षा रूपयाची मेली आनी मानस मेली तीं मरोत. येकदा येजमानास

१ अष्टौप्रहर  २ कर्ज म्हणून.

वाचून येथून काढिता तर येक यत्ने करायाचे पुन्ये घडत. याहि वर इच्छा परिछिन. आज जीवत्वाची आशा नाही. "

या मोहिमेनंतर जानोजी व माधवराव यांचें सख्यच राहिलें. इ. स. १७७० मध्यें पेशव्यानें हैदरावर स्वारी केली त्या वेळीं जानोजी भोंसल्यानें साबाजीस ५००० सैन्यासह कराराप्रमाणें पेशव्याबरोबर पाठविलें. या स्वारींत भोंसल्याचें लष्कर शेवटपर्यंत हजर होतें. हैदराकडील माणसें जानोजीकडेस त्यास फोडण्याकरितां आलीं होतीं; परंतु त्यानें त्यास स्पष्ट नकार देऊन हैदराचीं पत्रें पेशव्याचे वकिलास दाखविलीं व माधवरावाकडेस पाठविलीं. यानंतर पेशव्याशीं जानोजीनें कांहीं कृत्रिमपणा केला नाहीं. इ. स. १७७३ चे एप्रिल महिन्यांत जानोजी माधवराव पेशव्यास पुण्याजवळ **थेऊर** येथें येऊन भेटला. माधवराव त्या वेळेस आजारी पडल्यामुळें थेऊर येथें येऊन राहिला होता व पुढें तो सहा महिन्यांनी तेथेंच निवर्तला (१८–११–१७७२). जानोजीहि आपला अंत:काळ जवळ आला असें समजून आपल्या मागें आपल्या राज्याची व्यवस्था करण्याच्या तयारींत होता व माधवरावाच्या आजारीपणाच्या निमित्तानें त्याची भेट घेऊन मागील व्यवस्था पेशव्याकडून मंजूर करून घेण्याचा त्याचा विचार होता.

जानोजीस मुलगा नव्हता म्हणून त्यानें मुधोजीचा वडील पुत्र रघूजो यास दत्तक घेण्याचें ठरविलें होतें. त्यामुळें मुधोजीचें व त्याचेंहि सख्य झालें. जानोजीनें **थेऊर** येथें पेशव्यांकडून कबूल करून घेतलें कीं, तुमच्या मागें सेनासाहेबसुभ्याचें पद **रघूजीस** दिलें जाईल. माधवरावानें जानोजीचा योग्य सन्मान केला. तेथून जानोजी निघून **पंढरपुरास** जाऊन देवदर्शन करून नागपुराकडेस परत निघाला. मार्गांत तो **तुळजापुराहून** जोगाईचे **आंब्यास** जात होता. सदरहू प्रांत निंबाळकराचे मुलुखांत होता. त्या भागांत मोंगलाचे सरदार **तहवरजंग** व **इब्राहिमखान ऊर्फ धवशा** हे मुक्काम करून होते. त्यांस भेटण्याकरितां तो त्यांचे मुक्कामीं गेला व परत आला तों पोटशूळाच्या व्यथेनें अंगाची काहिली होऊन ता. १६ मे १७७२

रोजीं मरण पावला. ( वैशाख शु॥ पौर्णिमा श. १६९४ ).[१] जानोजीचा मृत्यू मौजे **येरळ** प्र. **नळदुर्ग** येथें झाला. तेथें मुधोजीनें देऊळ व अन्नछत्र बांधल्याचा व पेशव्याकडून कांहीं इनाम करून घेतल्याचा उल्लेख सांपडतो.[२] 'मुधोजी हा कांही दिवसांपूर्वीच वऱ्हाडांतून बालाघाटावर जाऊन जानोजीस मिळाला होता, त्यामुळें मरणाचे वेळी तो जवळच होता. भोंसल्यांचे बखरींत पुढें लिहिल्याप्रमाणें माहिती दिली आहे :—

"इतक्यांत एकाएकीं शुळाची व्यथाहि सेनासाहेबांस होतीच आणि नित्य गोळी औषधाची खात होते. एक दिवशीं गोळी खाऊन लवकर जेवले नाहींत. सबब मात्रेनें अपचार केला. कठीण अवस्था जाहली. ते समयी सेनासाहेबांनीं सेनाधुरंधर यांस जवळ बसवून आपलें कपाळ सेनाधुरंधराचे कपाळास घांसिलें कीं आजपर्यंत दौलत आम्ही केली, दैव आमचें होतें. तुम्ही पराक्रमी भारी शाहणे होतां परंतु प्रारब्ध आमचें होतें. त्या योगेंकरून उत्कर्ष तो आमचा. तें दैव तुमचे दैवास घांसितो. आतां सर्वस्वी मालकच आहांत. असें म्हणून भवानीपंत मुनसी व दिवाण व कारभारी व बक्षी भवानी काळू वगैरे सर्वांस निरोप करून सेनाधुरंधराचे हातांत हात घातले आणि भगवंत स्मरण करून (हिजरी) सन ११८१ चे सालीं वैशाख शु॥ १५ स कैलासवासी झाले. मागें हाहाकार झाला. नाटकशाळा सती गेल्या."

**कारभाऱ्यांची घडामोड**—जानोजीचे कारकीर्दीचे अखेरीस **दिवाकरपंत** हा मागें पडून दोन नवीन मुत्सद्दी पुढें आले. ते म्हणजे **भवानीपंत मुनसी** व **भवानी काळो** हे होत, देवाजीपंतांविषयीं पेशवे व जानोजी या दोघांचीहि मनें कलुषित झालीं होती बखरकार म्हणतो:— " त्या दिवसापासून भवानीपंत मुनसीवर माधवराव यांची कृपा फार झाली दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. देवाजीपंतास आणून सेनासाहेबांनीं कैद केलें.

---

१ वरील मिती बखरीच्या आधारें दिली आहे. त्या वेळच्या समकालीन पत्रांत वैशाख व॥ ५ व वैशाख व॥१२ अशा निरनिराळ्या मिती दिल्या आहेत पे .द. भा. २० ले. ३००, ३०१ पहा; परंतु हीं पत्रें मृत्यूच्या ठिकाणाहून लिहिलीं नसल्यामुळें त्यांत चूक असण्याचा संभव आहे.

२ ना. भो. का. प. ले. २५ सवाल ८. ऐ. प. ले. २२९ पान १९९.

देवाजीपंताचे सोयरे व त्या पक्षांतील **शिवरामपंत बाबा टाळकुटे** व **दामाजी खोलकुटे** व **दिनाजी दशरथ सांड** व **चिमाजी रखमांगद चिटनवीस** आदिकरून बहुतांचे दंड करून पैका मिळविला. सबब सेनासाहेबाचें कृपापात्र **भवानीपंत मुनसी** झाले. फौजेचे कबजा घेणें **भवानीपंत काळूनें** ठरविलें, म्हणून देवाजीपंताचे पक्षास असतां त्याजवर लोभ राहिला."[१]

जानोजीनें **दिवाकरपंतास** कैद करून त्यास बराच त्रास दिला व त्याचे सर्व घर लुटून नेलें.

**दिवाकरपंतास उतरती कळा, कैद व लूट**—दिवाकरपंत फार कर्तबगार मनुष्य असून त्याच्याशिवाय भोंसल्यांच्या खर्चाची तजवीज करणारा मनुष्य कोणीही नव्हता. भोंसल्यांस पैशाची नेहमी अडचण असून त्याकरितां फौजांचें धरणें नेहमीं सुरू असे; परंतु दिवाकरपंतानें कांही सावकार मंडळी व कांही इतर मंडळी हाताशीं ठेवून कशी तरी वेळ मारून न्यावी, परंतु अखेरीस प्रत्येकाचें मन त्याचे विरुद्धच होत गेलें. मुधोजीस वाटे कीं, हाच जानोजीस बहकावतो. पेशव्यास वाटे कीं, याचेच सल्ल्यानें जानोजी मोगलास व राघोबादादाचे पक्षास मिळाला. म्हणूनच भोंसल्यावरील दुसऱ्या मोहिमेंत **देवाजीपंत** पेशव्याशीं बोलणें लावण्याकरितां आला असतां पेशव्यानें त्यास पकडून आपणाजवळ कैदेंत ठेविलें. तरी या मोहिमेंत अखेर तह झाला तो देवाजीपंताच्या मध्यस्तीनेंच झाला, कारण भोंसल्याच्या दौलतींत याच्याइतका माहितगार व हुशार मनुष्य दुसरा कोणीच नव्हता, परंतु जानोजीसुद्धां शेवटीं त्याचे विरुद्ध उलटला व आपल्या कृतकर्माचा पश्चात्ताप दाखवितांना तोहि दिवाकरपंतावरच सर्व दोष लोटी. नागपूरचा पेशव्याचा वकील विठ्ठल शामराज हा जानोजीशीं त्याचें झालेलें भाषण[२] कळवितो, त्यांत जानोजी म्हणतो:—"श्रीमंत कायम तर आमची दौलत कायम हे पुरती आमची समज आहे. पूर्वील सिलसिले चहूकडे जे जाले ते आम्हास बोलतां नये. परंतु हें इतकेंहि

१ बखर पान ७७ पहा.

२ पे. द. भा. २० ले. १९८, पान १८७.

कृत्य माझे नव्हे. हे **दिवाकरपंतांनीं** चहूकडे सूत्रें ठेविली होतीं मी त्यास सांगेहि परंतु त्याची समज कांही आनीख पाहता विभिचार भक्तीनें भगवत् प्राप्त नाहीं. येकनिष्टतेनेंच ईश्वर प्राप्त आहे...... सांप्रत आम्हीहि **दिवाकरपंता**च्या मसलतीनें उदंड करून पाहिले परंतु प्रांत कोटेहि न लागला. पाहता याचे कृत्य असे म्हणूनच आमचे दौलतीवर आफत हें जाणूनच **दिवाकरपंतास** घरी बसविलें."

जानोजीनें दिवाकरपंताचें घर लुटून त्याची सर्व दौलत नेली. त्याचें वर्णन वरील वकीलानें त्याच [१] पत्रांत केलें आहे:— " **दिवाकरपंताचा** मजकूर कांहीं नग जडावाचे व सोनें, रुपे, राहिलें होतें तेंहि घेऊन गेले. नवरात्रांत उछाहासाठीं पांच हजार रुपये टेविले होते तेहि नेले. उछाहास त्यांचे घरी कोण जातो म्हणाले. तमाम ब्राम्हण ज्यांस गांव स्वास्ती वृत्ती ज्यास आहेत व आपले चाकर जितके आहेत तितके कोनी **देवाजीपंताचें** येथें न जावे; गोसावी कोनी न जावे अशी परिछिन्न ताकीद केली आहे. कोनी त्याच्या घरास जात नाहीं. सुलाची व्येथा त्यास जाली आहे. त्यास औशद देयास कोनी वैद्य देखील जात नाहीं. असा बंदोबस्त केला आहे. कोनी त्याच्या घरास जात नाहीं. असा प्रकार जाला आहे. "

त्याचप्रमाणें **दिवाकरपंतानें** स्वत: वरील वकीलामार्फत कळविलेली हकीकत [२] खालील प्रमाणें आहे. " ठेवरेव कोठें काय आहे याची चौकशी करणें ते केली, आण करीत आहे. **दामाजीपंताचें** घरीं वस्त्रपात्र आदी करोन सर्व सोडून येक येक वस्त्रानसी नूतन ग्रह प्रवेश जालों. मध्यें मध्यें चतुर्विध साधना करीतच गेले. निकूरच्याहून अत्याग्रहें तीन लक्ष वीस सहस्र पर्यंत नख्त व जवाहीर, हती, घोडे, उंटे वगैरे तमाम नेऊन निदानी पोषाकी वस्त्रें नवीं जुनीं निवडून जुनीं द्यावीं, नवी न्यावीं, येथवर केल्यास धैर्याधिष्टित चित करोन श्रीहरी सेवेत सादर आहे. पुढें विजेया-दशमीचा उत्साह आहे. प्रतिवर्षी पंडित आदीं करोन येत असतां त्यास सहा हजार रु. मात्र ठेविले. हेहि त्या दिवसपर्यंत राहून उपेगी पडतील

१ पे. द. भा. २० पान १९१

२ पे. द. भा. २० ले १९७ पान. १८४

येसे निश्चये करणियांत येत नाहीं. अर्थ हरण तो जालें. पुढें प्राणाचाहि संकल्प केला. परंतु आतःपर याचा कारभार नको. येविषईची प्रतिज्ञा समर्थाचे पायासी ती खरीखुरी आहे. शरीरीहि शूळ निर्माण जाला. श्रेम होत आहेत मोहात्साह मात्र जाला पाहिजे, येवढी वासना. हे सिध्दीस गेल्यावर मग कांहीं आस्छा राहिली नाहीं. ”

भोंसल्यांच्या सर्व कारस्थानांत जरी **देवाजीपंत** मुख्य होता व त्याचे सल्ल्याशिवाय जानोजी हा मोंगलांस व राघोबादादास मिळाला नसेल हें जरी खरें असेल तरी जानोजी त्या गोष्टींस मुख्यत्वें राजी असल्याशिवाय वरील गोष्टी झाल्या नाहींत. त्यामुळें जानोजी वरील गोष्टीबद्दल स्वतःहि दोषी होताच. परंतु आपला दोष दुसऱ्यावर घालणें हा मनुष्यस्वभावच आहे.

**दिवाकरपंतास** वरप्रमाणें उतरती कळा लागली व कांहीं दिवस तो अडचणींतच राहिला. परंतु पुढें कलकत्तेकर इंग्रजांच्या व भोंसल्यांच्या दरम्यान ज्या मसलती होत होत्या त्यांत **दिवाकरपंताची** जरूर लागली व त्या खटपटींत मुख्य दिवाकरपतच होता व त्याच खटपटींत असतांना दिवाकरपंत हा इ. स. १७८१ मध्यें मरण पावला हा प्रकार पुढें येईल.

**भवानीपंत मुनसी**—जानोजीच्या कारकीर्दीच्या शेवटीं **भवानीपंत मुनसी** व **भवानी काळो** हे दोघे गृहस्थ पुढें आले व बरींच वर्षे ते नागपुरच्या कारभारात प्रमुख होते. **भवानी मुनसी**[१] हा एलिचपुराकडील राहणारा असून प्रथम तो एलिचपुरच्या नबाबाच्या पदरीं होता. तो फारशी लिहिणेंवाचणें उत्तम जाणत असे. एलिचपुराहून तो पहिल्या **रघूजीच्या** कारकीर्दीत नागपुरास आला व देवगडकर गोंड राजे **बुऱ्हाणशहा** याजकडेस फारशी पढविण्याकरितां राहिला. इ. स. १७५१ मध्यें **रघूजी** भोंसले व बंगालचा नबाब **अलीवर्दीखान** यांजमध्यें तह झाला त्यावेळीं भवानीपंताचे फारशी मसुदे फार पसंत ठरल्यामुळें रघूजीनें त्यास आपल्या पदरीं ठेविलें. भोंसल्याचे बखरींत भवानीपंताविषयीं पुढें लिहिल्याप्रमाणें माहिती दिली आहे :—

---

१ ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. यांचे वंशज नागपुरास आहेत. त्यांचा वाडा व देवळें प्रसिद्ध आहेत.

"वकीलाचे विचारास मसुदा न आला. तेव्हां भाऊसिंग लाला बुऱ्हाणशहाचे बक्षी बहुत हुशार मातबर यांजला बाबासाहेबांनीं बोलाविलें. आज्ञा केली कीं, 'तुमच्या येथें कोणी फारशीनवीस असल्यास आणावे.' त्यानीं विनंती केली कीं आमचे ज्ञातीत कोणी नाहीं. परंतु राजेसाहेबांचे पदरीं एक ब्राह्मण अळजपुराकडील कोणी एक दिवस आम्हाजवळ होता तो आमचे पाहण्यांत आहे. लिहिण्यांत चांगला आहे. आम्हापासोन राजेसाहेबांनीं फारशी पढविण्यास नेला आहे. त्याचा १० रुपये दरमहा करारानें ठेविला आहे. त्याजवरून बाबासाहेबांनी राजाकडेस निरोप सांगून पाठविला कीं, 'तुम्हाजवळ फारशीनवीस ब्राम्हण आहे त्याजला इकडे पाठवून द्यावे' तेव्हां भवानीपंत मुनसी यास पाठविलें. त्यानें बाबासाहेबांचे मर्जीनुरूप मसुदे लिहिले. तेव्हां वकीलाकडे तसेच मसुदे देऊन पाठविले. ते पाहून वकील खूष झाला. दोन हजार रुपये बक्षीस पंत मशारनिल्हे यांस दिले. तेथून सेनासाहेबांनी सुद्धां आपले तर्फेनें २०० रुपये बक्षीस दिले. तसेंच पंत निघून राजे बऱ्हाणशहापाशी आले. याणीहि शंभर रुपये यांस इनाम दिले. बाबासाहेबांस राजे याणीं सांगून पाठविलें 'पसंत असल्यास ठेवून घ्यावे' असा मजकूर समजण्यांत आला तेव्हां साहेबी सांगून पाठविलें की, "माणूस काबील आहे, तुमचे मर्जीस असल्यास बहुत चांगलें आहे." जेव्हांपासून ठेविले ते दिवसापासून राजाकडील निरोप बाबासाहेबाकडे आणीत जावा व उत्तरें नेत जावी असे कांहीं एक दिवस जानोजीबोवापर्यंत चाललें."[१]

इ. स. १७६३ चे निजाम व पेशवे यांच्या मोहिमेंत **भवानीपंत** मुनशी हा दिवाकरपंताबरोबर हजर होता. दिवाकरपंतावर इतराजी झाल्यानंतर मुनशी हा पुढें आला व जानोजीचा दिवाण बनला. हा देवाजीपंताच्या विरुद्ध पक्षाचा मुख्य होता.

**भवानी काळो—भवानी काळो** हाहि ऋग्वेदी देशस्थ ब्राम्हण असून वऱ्हाडांतील **मंगरूळ** तालुक्यांतील **खडीधामणी** वगैरे गांवचा वतनदार पटवारी होता. त्याचा भाचा **राजाराम वाळके** हा प्रथम जानोजीचा भाऊ साबाजी याचेकडेस नोकर राहिला. साबाजीचें ठाणें व जहागीर

---

१ ना. भो. बखर पान ४६ पॅरिग्राफ २ पहा.

दारव्हा येथें होती. राजाराम हा वाढत जाऊन साबाजीचा दिवाण झाला. त्यामुळें **गणेश काळोजी** व **भवानी काळोजी**[१] हे दोघे बंधु वऱ्हाडांत मामले करूं लागले. **राजारामपंताचे** मार्फतीनें भवानीपंताची व **साबाजी** नानाची ओळख होऊन **भवानीपंत** साबाजीचा दिवाण झाला. जानोजी व त्याचे बंधु यांचीं भांडणें चालू असतां **साबाजी** हाहि **माधवराव** पेशव्याशीं जानोजी विरुद्ध मिळण्याच्या बेतांत होता. परंतु भवानीपंतानें त्यास तसें न करण्याविषयीं बोध केला. तसेंच जानोजीसही ही बातमी देऊन त्याजकडून साबाजीशीं सख्य करून घेतलें. त्यामुळें जानोजीचाहि भवानीपंतावर विश्वास बसून त्यानें भवानीपंतास साबाजीकडून मागून घेतलें. भवानीपंत हळूहळू पुढें येऊन तो भोंसल्यांच्या फौजेचा मुख्य सेनापति झाला. हा देवाजीपंताच्या पक्षाचा असून अखेरपर्यंत त्याच्याशीं स्नेहभावानें वागला. त्यानेंच **वाशीम** येथील प्रसिद्ध बालाजीचे मूर्तीची स्थापना केली व देवालय बांधलें. त्याचे वंशज नागपुर व वाशीम येथें आहेत. भवानीपंत हा पुढें कटक प्रांताचाहि सुभेदार होता.

याच वेळेस रघोबा बक्षी, महादाजी बल्लाळ लष्करी वगैरे मुत्सद्दी पुढें आले. त्यांचा उल्लेख पुढें वेळोवेळीं येईल.

**गणेश संभाजी खांडेकर**—भवानी काळो याचे मागून ओरिसा (कटक) प्रांताची सुभेदारी **गणेश संभाजी खांडेकर**[२] याजकडे देण्यांत आली.

---

१ गणेश व भवानी याचे बापाचें नांव काळोजी असें होतें त्यावरून या घराण्याचें आडनांव काळो, काळू असेंच पडलें व तेंच अद्याप चालू आहे. नाग. भो. का. ले. ७१ (ऐ. प. ले. १०४) याचा लेखक भवानीशंकर गोपाळ हा भवानी काळोच असावा असा भास होतो व आंतील मजकुरावरूनहि तेंच वाटतें. परंतु पे. द. भा. २० ले २९६ (इ. स. १७७०) यांत खुद्द भवानीपंत "भवानी कालोजी" या नांवानें पत्र लिहितो. त्यावरून ले. ७१ मधील लेखक दुसरा असावा असें वाटतें.

२ या खांडेकराची एक शाखा साताऱ्यास फडणीस म्हणून प्रसिद्धीस आली व तेथेंच अद्याप आहे. या शाखेचा पूर्वज गोपाळ महादेव हा शिवाजीच्या व संभाजीच्या वेळेपासून कारभारांत होता. त्याच घराण्यांतील

(इ. स. १७६८). गणेश संभाजी हा उत्तर हिंदुस्थानांत पेशव्यातर्फे महत्त्वाचीं कामें केलेला सरदार असून पानिपतचे लढाईचे मोहिमेंत व त्यानंतर बुंदेलखंडांड व अंतर्वेदींत होता. त्यानंतर तो पेशव्यातर्फे झांशीची मामलत करून होता. **बाबूराव कोन्हेर** कोल्हटकर ( मुजुमदार ) याचे मार्फत जानोजी भोंसल्याचे कारभारांत तो शिरला.

बंगाल व बिहार प्रांतांचे चौथाईबद्दल इंग्रजांशीं बोलणें चालणें चालू होते व तें सर्व कटकचे सुभेदारांमार्फत चाले. म्हणून जानोजीनें **गणेश संभाजीस** कटकचे सुभेदारीवर नेमलें. गणेश संभाजीच्या नेमणुकीबद्दल जानोजीनें कलकत्त्याच्या गव्हर्नरास पत्र लिहिलें तें असे :—

" कटकच्या सुभेदारीवर हल्लीं आम्ही **गणेश संभाजी** यास **नेमलें** आहे. हा गृहस्थ फार शहाणा व अनुभविक असून फार सभ्य आहे. त्याचेबरोबर चांगलें सैन्यही आम्हीं दिलें आहे. तो आतां कटकांत येऊन पोहोंचलाहि असेल. तो तुमच्याशीं चौथाईचे रकमेबद्दल बोलणें करील"[१] गणेश संभाजी हा कटकचे सुभेदारीवर सप्टेंबर १७७० इ. स. पर्यंत होता.

बंगालचे चौथाईविषयीं **गणेश संभाजीचे** प्रयत्न सफल झाले नाहींत. उलट हा शिवभट साठ्याप्रमाणेंच आपणाशीं बदलून सुजाउद्दौल्यास मिळून जाईल असा संशय भोंसल्याचे मनांत कोणी उत्पन्न करून दिला; परंतु नंतर तो दूर होऊन त्यानें गणेश संभाजीस कटकांतच कायम ठेविलें. पेशव्याचा नागपुरचा वकील **विठ्ठल शामराज** हा ता. २६-९-१७६९ रोजीं पेशव्यास लिहितो " गणेश संभाजीविसीं कोनी कोनी त्याच्या चित्तांत संशय घातला होता जे ते सुज्यायेद्दौलासीं सख्य करितील. कुटुंबसुधाच तिकडेच आहेत. याच्या चित्तांतहि संवशये आला होता. गणेशपंताच्या वकिलानें येथून त्यास लिहून पाठविलें जे यांच्या चित्तांत असा संशय आला

---

**बापू कान्हो** हा सातारकर छत्रपतीच्या पदरीं असून **चतुरसिंग** भोंसल्याचा उजवा हात होता. त्याचेविषयीं ग्रँट डफच्या इतिहासांत उल्लेख आहे. ( Grant Duff Vol. III P. 158 ) मालकम साहेबाच्या सांगण्यावरून बापू कान्हो यानें इ. स. १८१८ मध्यें त्या वेळचा इतिहास मालकम साहेबास लिहून दिला.

1 Calendar of Persian correspondence Vol. IV No. 1027

आहे; त्यास त्यानी कटकीहून सेनासाहेबांस पत्रें पाठविलीं. जे–म्यां साहेबासीं इमान केलें आहे, वार्धिकदशा माझी जाली, आखरीस लेकराबालांस साहेबाचे पायेजोड केली आहे, तिकडे श्रीमंताकडेहि म्या चाकरी करून दुरारोप आला म्हणून हे पाये जवल केले. मजपासून आंतर किमपि होनार नाहीं. पुढें तरी प्रांत माझा काये होणे आहे ? कुटुब येथून रवाना करितों. नागपुरांत मुलें लेकरें कुटुंब तेथें राहील. आज्ञेप्रमाणें **दत्ताजी गणेश** कटकांत राहतील. कनिष्ठ पुत्रासह वर्तमान फौज मकसुदाबादेवर आपन जातो; याप्रमाणें पत्रें आलीं; त्यावरून तेथील खातरजमा होऊन वस्त्रें पत्रें बाहलीचीं त्यांजकडे जानार ''

**गणेश संभाजी** हा कऱ्हाडा ब्राह्मण असून **संगमेश्वर** तालुक्यांतील **बुरंबाड** येथील रहाणारा होता व **गोविंदपंत** बुंदेल्याबरोबर जीं कऱ्हाडयांचीं घराणीं उत्तर हिंदुस्थानांत गेलीं त्यांत **गणेश संभाजी** व त्याचा भाऊ **गोपाळ संभाजी** हे बुंदेलखंडांत गेले. बाबूराव कोन्हेर याचे मार्फतीनें गणेश संभाजी हा नंतर भोंसलेशाहींत आला व गोपाळ संभाजी हा पेशवाईंतच राहिला. गणेश संभाजी हा भोंसलेशाहींतून निघून गेल्यानंतर माळव्यांत एका चकमकींत मारला गेला. त्याचा मुलगा **मल्हार गणेश** हा पुढें महादजी शिंद्याकडे राहिला. पुढील वंशजांसबंधानें जास्त माहिती मिळत नाहीं.

गणेश संभाजीचा भाऊ **गोपाळ संभाजी** हाहि उत्तर हिंदुस्थानांत बराच प्रसिद्धीस आला. माधवराव पेशव्यानें त्यास माळव्यांत जहागीर दिली ती **पंथपिंपळोदा** जहागीर म्हणून त्याच्या वंशजांकडे अद्याप कायम आहे[१].

---

१. गोपाळ संभाजीचे वंशज गणपतराव हे हल्लीं उज्जनीस रहात असून त्यांचेकडून वरील माहिती व वंशवृक्ष मिळाला आहे. तसेंच सरदेसाई म. वि. ४ पा. ३०१ पहा. तसेंच वंशावळ पुरवणी पहा. या राण्यांतील हल्लींचे पुरुष चांगले सुशिक्षित आहेत.

# भाग ७ वा

# दुसरा रघूजी

## पूर्वार्ध-(१७७२-१७९०)

जानोजी मरण पावला त्यावेळेस **मुधोजी** हा स्वारीत त्याचेबरोबर होता जानोजीची बायको **दर्याबाई** व **साबाजी** हे आकोटास होते व रघूजी हाहि दर्याबाईजवळच होता. रघूजीस जानोजीनें दत्तक घेण्याचें ठरविलें होतें व त्यासच सेनासाहेब सुभ्याचें पद देण्याबद्दल त्यानें पेशव्यास सांगितलें होतें, परंतु दत्तविधान मात्र पूर्वी झालेलें नव्हतें. मुधोजी हा रघूजीचा बाप असल्यामुळें व रघूजी हा अद्याप स्वतः कारभार करण्याइतक्या वयाचा नसल्यामुळें[१] मुधोजीस वाटे कीं, राज्याचा सर्व कारभार आपल्या हातीं असावा इकडे साबाजीसहि वाटे की, रघूजी मोठा होईपर्यंत कारभार आपल्या हातीं असावा. म्हणून दोघांचीहि कारस्थानें सुरू झालीं. जानोजीची बायको **दर्याबाई** ही **साबाजी**चे पक्षास मिळाली व तिनें खोटेंच जाहीर केलें कीं, आपण गरोदर आहों. यावरून तिनें रघूजीस दत्तक घेण्याचा विचार तहकूब केला व साबाजीनें पेशव्याकडे वकील पाठवून आपल्या नांवें सेनासाहेब सुभ्याची वस्त्रें मागविली. **मुधोजी** हा राघोबादादाच्या पक्षाचा व त्याच्या सर्व कारस्थानांत सामील असल्यामुळें व **साबाजी** हा माधवरावाच्या पक्षास असल्यामुळें **माधवरावानें** साबाजीचे नांवे वस्त्रें पाठविलीं व बरोबरच आपला वकील **रामाजी बल्लाळ गुणे** यास नागपुरास पाठविलें.

---

१. रघूजीचा जन्म इ. स. १७५७ च्या सुमारास झाला. त्यामुळें रघूजी हा या वेळेस अजमासें १५ वर्षाचा होता. त्याचा धाकटा भाऊ खंडूजी ऊर्फ चिमणाबापू हा सुमारें ७ वर्षांनीं लहान होता व व्यंकोजी ऊर्फ मन्याबापू हा चिमणाबापूपेक्षां २ वर्षांनीं लहान होता. मन्याबापूचा जन्म इ. स. १७६६ चा आढळतो. रघूजीस बापूसाहेब असें म्हणत.

इकडे मुधोजी हा सैन्यासह गंगथडींतून आकोटाकडे दर्याबाईस भेटण्याकरितां आला. मुधोजीच्या पदरचा **व्यंकटराव काशी प्रभु** हा रघूजीजवळ होता. त्यानें मुधोजीस ही वरील बातमी अगोदरच कळविली होती. मुधोजीनें आकोटास जाऊन साबाजीची व दर्याबाईची भेट घेतली. परंतु उभयतांचा समेट न होतां **मुधोजी रघूजीस** घेऊन **चंद्रपुरास** गेला व **दर्याबाई** व साबाजी हे **नागपुरास** आले. चंद्रपुराहून मुधोजीनें आपला सुभेदार **महिपतराव** यास नागपुरास तेथील सर्व अंदाज पाहण्याकरितां पाठविलें. त्याचेबरोबर मुधोजीची बायको **चिमाबाई** व दुसरा मुलगा **व्यंकोजी ऊर्फ मन्याबापू** यांसहि नागपुरास पाठविलें.

महिपतरावानें नागपुरास सर्व मुत्सद्दी व सरदार यांच्या भेटी घेतल्या. तों त्यास दिसून आलें कीं जुन्या मुत्सद्यांपैकीं त्यावेळी कैदेंत असलेला **देवाजीपंत** व सरदारांपैकीं **भवानी काळो, शिवरामपंत टाळकुटे, जगदेवराव गुजर, गोविंदराव मुगुटराव, भवानी आटोळे,** हे मुधोजीच्या पक्षास मिळण्यास तयार आहेत. महिपतरावानें या सर्वांना जागोबाचे.[१] देवळांत नेऊन त्यांचेकडून बेल उचलून घेतला. साबाजीचे पक्षास **भवानीपंत मुनशी** व साबाजीचा कारभारी **भवानी शिवराम** एवढेच राहिले. एवढी तयारी करून ही सर्व मंडळी चंद्रपुरास मुधोजीकडेस आली.

मुधोजीनें आपले तिन्ही मुलगे **रघूजी, खंडोजी ऊर्फ चिमणाबापू, व्यंकोजी ऊर्फ मन्याबापू** व बायको चिमाबाई यांस चंद्रपुरास ठेवून तेथें **महिपतरावाचा** पुत्र **बळवंतराव** व **रामाजी केशव**[२] **तिखे** यास बंदोबस्तास ठेविलें व आपण सडा होऊन सैन्याचा जमाव करीत चालला. नागपुराहून **भवानी आटोळे, गोविंदराव मुगुटराव, शिवाजीपंत टाळकुटे** व **जगदेवराव गुजर** हे सरदार महिपतरावाशीं ठरल्याप्रमाणें मुधोजीस येऊन मिळाले. साबाजीनें वऱ्हाडांतील **खंडोजी आढाव** नांवाचा सरदार व देशांतून **शंकराजी घोरपडे, रणसिंग निंबाळकर व झुंझारराव घाडगे**

---

१ हें नारपूरचें मुख्य दैवत आहे.

२ रामाजी केशव तिखे हा मुधोजीचा फडणीस होता. त्याचा पुत्र गबाजी हा मुधोजीबरोबर स्वारींत होता. तो कुंभारीच्या लढाईनंतर नागपुरास परत येतांना रस्त्यांत मरण पावला. (ब. पा. ८९)

वगैरे सरदार सैन्यांसह आपले मदतीस बोलावले होते. त्यांसहि मध्येंच फोडून मुधोजीनें आपलेकडेस मिळवून घेतलें. एकूण त्याचा जमाव २५००० चा झाला.

**कुंभारीची लढाई (जान्युआरी १७७३ इ०)**—इकडे साबाजीहि सैन्य जमवीत होता. त्यानें पेशव्याकडून सैन्याची मदत मागितली. पेशव्यानें **बाळाजी पलांडे** यास सैन्यासह साबाजीच्या मदतीस पाठविलें. त्याचाहि जमाव वीस हजारांपर्यंत झाला. तसेंच मोंगलांकडूनहि त्यानें मदत मागितली होती. साबाजीचें सैन्य व पेशव्याकडील सैन्य वऱ्हाडांत असतां[1] त्यांची व मुधोजीच्या सैन्याची लढाई इ. स. १७७३ चे जान्युआरी महिन्यांत अकोल्या-जवळ **कुंभारी** म्हणून गांव आहे तेथें झाली. सदरहू लढाईचें वर्णन नागपुरचे बखरीत पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहे:—

"नंतर **अकोलें बाळापुराजवल कुंभारगांव**[2] येथें साबाजी भोंसले व मुधोजी भोंसले यांची लढाई जाहली. सेनाधुरंधराचा हत्ती निशाणाचा **मुलाना मदारी** या नांवाचा होता व साबाजीबोवाकडील निशाणाचा हत्ती **बरमबाली** या नांवाचा, याणें मदारीस लढाईचे समयीं टक्कर मारली. तो हत्तीवरील निशाण सेनाधुरंधराकडील खालीं आलें. लढाई शिकस्त जाहली. **जिजाजी**[3] **भोंसले** गोत्र पुरुष मारले गेले, सबब सुतकामुळें बारा दिवस लागले व उभयतांकडील सरदार यांणीं बोलण्यांत आणिलें कीं, भांडूं नये; सल्ला करून सफाई करावी. याजवरून मुधोजी भोंसले यांणीं लढाई दोन दिवस तहकुब केली. आणि सख्यत्वाचा विचार करून परस्पर लेख झाले कीं, रघोजी भोंसले यांजला जानोजीबोवांनीं मालक केलें, ती मालकी त्यांचीच आहे. साबाजी भोंसले यांणीं दिवाणगिरीचा कारभार मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांणीं मिळून करावा, असें होऊन सेनाधुरंधर यांणीं

१. साबाजी पुण्याहून सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें घेऊन येत असतां रस्त्यांत कुंभारी येथें ही लढाई झाली असें बखर पा. ८७ मध्यें म्हटलें आहे, परंतु इतर पुराव्यावरून साबाजी हा स्वतः पुण्यास गेला होता असें दिसत नाहीं.

२ पा. ८८. येथें 'कुंभारी' असें पाहिजे.

३ हा जिजाजी, राणोजी भोंसले उमरावतीकर याचा मुलगा.

शकट[1] भेद करून दर्याबाईसाहेबांस आपलेकडेस आणलें व ते सेनाधुरंधरापाशीं येऊन राहिले"[2]

याप्रमाणें मुधोजी व साबाजी यांचा तह ता. २८ जान्युआरी १७७३ रोजी पेशव्यांचा वकील **रामाजी बल्लाळ** याचे मार्फतीनें झाला.

**दुसऱ्या रघूजीस सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें आणण्याकरितां रवानगी**--या तहाप्रमाणें रघूजीस दर्याबाईनें दत्तक घेऊन त्याचे नांवें सेनासाहेब सुभ्याची वस्त्रें मिळवून कारभार मुधोजी व साबाजी या दोघांनीं एक विचारें करावा असें ठरलें व रघूजीच्या नांवें वस्त्रें आणण्याकरितां **व्यंकटराव काशी** व **लक्ष्मणराव काशी** प्रभू यांना पुण्यास **नारायणराव**[3] पेशव्याकडे रवाना केलें. **साबाजी** व **मुधोजी** यांनीं ते दिवशी एकमेकांस करारपत्रें लिहून दिलीं तीं खालीं लिहिल्याप्रमाणें:--

" श्री श. १६९४ माघ व. ११
(१७-२-१७७३)

तीर्थस्वरूप राजश्री मुधोजी भोंसले सेनाधुरंधर वडिलांचे सेवेशी

अपत्यें साबाजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विज्ञापना आपला व आमचा हर्षामर्ष वाढला, त्याजमुळें फौज ठेवून कलहास प्रारंभ झाला. याजकरितां चौघे मराठे मातबर दरम्यान होऊन राजश्री रामाजी बल्लाळ निसबत पंतप्रधान यांचे विद्यमानें तह ठरला. कलमें बितपशील:-

१ चिरंजीव राजश्री बापू यास मातुश्रीबाईच्या ओटींत घालावें.

२ तुमच्या संतोषास आलें तरी आमचे संमतें कारभार तुम्ही करावा.

३ दोन्हीकडील फौज भारी, इतके लोक ठेवावयाचें कारण सध्यां नाही. यास्तव जितकी फौज कार्याकारण ठेवावयाची तेवढी ठेवावी. जे दूर करणें त्याचा फडशा हिशेबाचा आम्ही करावा. याशीं तुम्हीं अनुकूल असावें सदर्हू तीन कलमांचे निभावणीस दरम्यान असाम्या बितपशील:-

---

१ फंदफितूर.

२ ना. भो. बखर पान. ८८

३ या अवधींत माधवराव पेशवा ता. १८-११-१७७२ रोजीं मरण पावला होता व नारायणराव पेशवा झाला होता.

१ लक्ष्मणराव पाटणकर, २ जोत्याजी व चिमणाजी घाडगे, ३ बाजीराव पाटणकर, ४ यशवंतराव नाईक निंबाळकर, ५ राणोजी नाईक निंबाळकर, ६ जगदेवराव नाईक निंबाळकर, ७ जगोजी यादव, ८ नऱ्होजी जाचक, ९ मजीतखान रोहिले, १० हणमंतराव बाजी घाडगे. एकूण असामी दहा यांचीं पत्रें अलाहिदा आहेत. त्याप्रमाणेंच उभयपक्षीं निभावणी होईल.

सु॥ सलास सबैन मया व अलफ, माघ मास छ २४ जिलकाद हे विज्ञापना[१].

हा तहनामा होऊन दोघेहि बंधू नागपूरास गेले. दर्याबाई मुधोजीस मिळाल्यामुळें आतां मुधोजीचें पारडें जड झालें व तो साबाजीस विचारीना. यामुळें दोन्ही भावांचा पुन्हां कलह सुरू झाला. **मुधोजीनें देवाजीपंतास** कैदेंतून काढून त्यास पुन्हां दिवाणगिरी दिली व भवानी मुनशीचा भाऊ लक्ष्मणराव यास व मुलांमाणसांस कैद केलें. **साबाजीचा** पक्ष पडता झाल्यामुळें तो नागपुराहून बाहेर निघून सैन्य जमा करूं लागला. त्यानें निजाम व पेशवे यांजकडेस सैन्याची मदत मागितली. त्याप्रमाणें निजामानें आपला दिवाण **रुकनुद्दौला** व सरदार धौशा (जकीरुद्दौला निर्मलचा सुभेदार) व **नारायणराव** पेशव्यानें **खंडेराव** दरेकर सरलष्कर यास फौजेसुद्धां रवाना केलें. पेशवे व निजाम यांचा सलोखा आतांपर्यंत कायम असून दोघेहि एकाच पक्षास होते.

**एलिचपुरचा वेढा (आगष्ट १७७३):-इस्मायलखान** हा **मुधोजीस** मिळाल्यामुळें **साबाजी** व **रुकनुद्दौला** यांनीं एलिचपुरास वेढा देऊन मोर्चे लाविले. त्यामुळें मुधोजी नबाबाचे मदतीस **एलिचपुरास** गेला.परंतु **साबाजी** व **रुकनुद्दौला** यांच्या फौजेचा जमाव मोठा असल्यामुळें तो लांबून लांबून त्यांच्या **कहीकबाडास** उपद्रव देत राहिला. तसेंच **गाविलगडचा** किल्लेदार **झामसिंग** हा **मुधोजीच्या** पक्षाचा असल्यामुळें तोहि मोंगल व साबाजी यांचे सैन्यांवर मधूनमधून छापे घालीत होता. **इस्मायलखान** हाहि तटाचे आंतून बाहेरील सैन्यावर मारा करीत होता. एकदां **इस्मायलखानानें** बाहेर निघून

१ ना. भो. का. प. ले. ३०-३१-३२ (ऐ. पत्रव्यवहार ले. १२८-२९-१३०).

हल्ला करून तोफांचे मोर्चे उधळून लाविले. मुधोजीनें **खंडेराव दरेकर** यास वाटेंतच अडविण्याकरितां चंद्रपुराहून सैन्य पाठविलें. त्यानें खंडेरावास लाख-नवाड्याचे घाटापलीकडेच अडविलें त्यामुळें तो एलिचपुरास पोहोंचला नाहीं.

मुधोजीतर्फे **व्यंकटराव काशी** व **लक्ष्मणराव काशी** (गुप्ते) हे रघूजीच्या नांवें वस्त्रें आणण्याकरितां **नारायणराव** पेशव्याकडे गेले होते. ते साबाजी व मुधोजी याचा तह झाल्यामुळें आतां पेशव्याकडे कांहीं अडचण पडणार नाहीं अशा समजुतीनें गेले होते, परंतु इकडे साबाजी व मुधोजी यांचा पुन्हां बेबनाव झाल्यामुळें ते पुन्हां अडचणींत पडले. **नारायणरावाचा** पक्ष **साबाजीकडे** व **राघोबा**दादाचा पक्ष **मुधोजीकडे**.परंतु राघोबादादा नारायणरावाच्या अटकेंत असल्यामुळें त्याचा कांहीं इलाज चालेना. नारायणरावाकडून आपणास मदत होणार नाहीं हें जाणून **मुधोजीनें व्यंकटराव** व **लक्ष्मणराव** यांस "**दादा**शीं राजकारण करून बनेल त्या तऱ्हेनें आपली गोष्ट सिद्धीस न्यावी" असें लिहून पाठविलें. याच सुमारास **नारायणरावानें प्रभु** लोकांच्या ग्रामण्यांत पडून त्यांना दुखविल्यामुळें सर्व प्रभू जात नारायणरावावर उलटली होती व त्यांचाहि प्रयत्न राघोबादादास कैदेंतून सोडवून गादीवर बसवावें व नारायणरावास काढावें असा होता. त्यांतच व्यंकटराव व लक्ष्मणराव हेहि सामील झाले.

एके दिवशी रात्रीं **लक्ष्मणराव काशी** याचा हात धरून **राघोबादादा** शनिवार वाड्यांतून बाहेर पळून जात असतां पाहरेकऱ्यांनीं त्यांस पकडलें व राघोबादादास आंत नेऊन बंदोबस्त जास्त कडक केला. **लक्ष्मणराव काशी** हा पळून वाड्याबाहेर ब्राह्मण बसले होते त्यांत जाऊन लपून बसला. नंतर तो पळून **कोथळ्यास** आपले गांवीं जाऊन राहिला. कांहीं दिवसांनीं तो परत पुण्यास येऊन नारायणरावाचे विरुद्ध कटांत सामील झाला व या कटाचा परिणाम नारायणरावाचे खुनांत झाला.

**नारायणराव पेशव्याचा खून ता. ३०-८-१७७३**:—नारायणरावाचा खून पुण्यास झाला त्या वेळेस मुधोजी, साबाजी, खंडेराव दरेकर, रुकनुद्दौला व मोंगलांचा दुसरा सरदार धौसा ही सर्व मंडळी एलिचपुरास होती. तेथेंच पेशव्याच्या खुनाचें व सर्व अधिकार राघोबादादाचे हातीं आल्याचें वर्तमान त्यांना समजलें. त्यामुळें मुधोजीचे पक्षास मोठाच जोर

आला. राघोबादादाविरुद्ध पुण्याचे सर्व कारभारी उलटल्यामुळें राघोबादादानें मुधोजीस आपले मदतीकरितां सैन्यासह पुण्यास बोलाविलें.[१] **व्यंकटराव** व **लक्ष्मणराव काशी** यांनीं वरील बातम्या मुधोजीस कळविल्या. तसेंच त्यांनीं रघुनाथरावाकडून रघूजीस वस्त्रें देण्याचा करार करून घेतला व साबाजी आल्यास त्यास वस्त्रें देणार नाहीं हेंहि त्याचेपासून लिहून घेतलें.[२] (ता. ४–९–१७७३).

**मुधोजी व साबाजीचा एलिचपुरास समेटः सप्टेंबर १७७३:**— त्यापूर्वींच **महिपतराव दिनकर** व मुधोजीचा उपाध्या **बाळकृष्णभट पटवर्धन** यांचेमार्फत **मुधोजीनें रुकनुद्दौला** याच्याशीं सलोखा करण्याची तजवीज चालविली होती. ती सफल होऊन एलिचपुरच्या नबाबाचा व रुकनुद्दौला यांचाहि सलोखा झाला. तसाच साबाजी व मुधोजी यांचाहि सलोखा होऊन असें ठरलें कीं, सेनासाहेब सुभ्याचें पद **साबाजी**कडेस कायम राहून अम्मल मात्र दोघांनीं सारखा करावा. यानंतर दोघांच्या भेटी व्हावयाच्या होत्या. इतक्यांत नारायणरावाच्या खुनाची बातमी एलिचपुरास येऊन पोहोंचली. त्यानंतर मुधोजी **गाविलगडास** जाऊन **दर्याबाईस** भेटला, पुण्याहून **लक्ष्मणराव काशी** हाही **मुधोजीस** पुण्यास नेण्याकरितां **एलिचपुरास** आला होता. **रुकनुद्दौला** व **धौसा** हे एलिचपुराहून निघून गेले व साबाजी एकटाच राहिला. मुधोजीहि पुण्याकडे निघून गेला व दादास मिळाला. पुण्याजवळ पेडगांवचे मुक्कामीं दादानें रघूजीस सेनासाहेबीचीं वस्त्रें दिलीं.[३]

लक्ष्मणराव काशी याजवर मुधोजीची मर्जी प्रसन्न होऊन उभयता बंधूंस त्यानें मोठें बक्षीस दिलें. यानंतर दादानें निजामावर स्वारी केली व बेदरजवळ निजामाचा व त्याचा तह झाला. त्यावेळीं मुधोजी व रघूजीहि

१ ना. भो. का. प. ले. १४,१५ (ऐ. प. ले. १३२–१३३).
ता. ४–९–१७७३

२ ना. भो. का. ले. १६ (ऐ. प. ले. १३४).

३ ऐ. प. ले. १३९ ब पा. १०२

दादाबरोबर होते. तेथेंच निजामाकडून वऱ्हाडांतील साठ–चाळीशीचा तह करून घेतला. [१]

**साबाजी बारभाईस सामील : राघोबादादाचा पाठलाग**:—पुण्यांत बारभाईचा कारभार सुरू झाल्यानंतर त्यांनीं निजामास व साबाजी भोंसल्यास दादासाहेबाविरुद्ध आपल्या पक्षास मिळवून घेतलें. साबाजी त्याप्रमाणें कारभाऱ्यांचे मदतीस गेला व दादा निजामावर चाल करून गेला असतां साबाजी औरंगाबादेजवळ [२] दादास शह देण्यास हजर होता. शेवटीं बारभाईचा जोर झाल्यामुळें दादास पळ काढून जावें लागलें व बारभाईचें सैन्य दादाचे पाठीस लागलें. साबाजी भोंसले हा हरिपंत फडक्याचे सैन्याबरोबर राघोबा दादाचे मागें लागला होता व ब्ऱ्हाणपुरापर्यंत बारभाईंचे सैन्याबरोबर होता. दर्याबाईही मुधोजीचा पक्ष सोडून साबाजीचे पक्षास मिळाली. याच सुमारास दर्याबाई साताऱ्यासहि गेली होती. रधूजी हाहि तिचेबरोबर साबाजीकडेस आला. बारभाईनीं मुधोजीच्या पक्षाचा **महिपतराव दिनकर** सुभेदार व **व्यंकटराव** काशी यांस कैद केलें. महिपतराव यास त्यांनीं चंदनवंदनचे किल्ल्यांत ठेविलें होतें पण त्यानंतर त्यानें मुधोजीस दादाकडून फोडतों असें कबूल केल्यावरून त्यास त्यांनी सोडून दिलें. हें समजतांच साबाजी व दर्याबाई यांनीं सखारामपंत पुरंदरे यास लिहून त्यास पुन्हां धरण्यास माणसें पाठविलीं. परंतु महिपतराव दिनकर हा महिपतराव [३] काशी यासह पळून तुळजापूर, परळी, आष्टी व मालगणी [४] या रस्त्यानें वऱ्हाडचा घाट उतरून एलिचपुरास मुधोजी हा होता

१ ब. पा. १०३ हा अस्सल तहनामा उपलब्ध नाहीं.

२ दादानें साबाजीस बत्तीस लक्षांचा मुलूख व अशीरगड किल्ला देण्याची लालूच दाखविली होती. (ऐ. प. ले. १४० ना. भो. का. ४)

ता. १८–३–१७७४

३ व्यंकटराव व लक्ष्मणराव काशीचा भाऊ.

४ बखर पा. ११०

मालगणी येथें तर ते जवळजवळ पकडलेच जात होते परंतु मोठ्या युक्तीनें वांचले.

तेथें जाऊन त्यास मिळाला. मुधोजी हा राघोबादादास मिळाल्यानंतर बऱ्हाण-पुरापर्यंत होता व तो नर्मदा उतरून पलीकडे गेल्यावर त्यास सोडून एलिच-पूर येथें आला होता व तेथेंच कांहीं दिवस राहिला होता. साबाजी, दर्याबाई व रघूजी हेहि नंतर नागपुरास आले.

**मुधोजीवर त्याचे पठाणांचा हल्ला**:—मुधोजी यास पैशाची फारच अडचण पडली. एकदां त्यानें उमरावतीवर चाल करून गांवकऱ्यांपासून जबर दंड घेतला, तरी लष्कराची ओरड न मिटल्यामुळें कांहीं पठाणांची व मुधोजीची बोलाचाली झाली त्यावरून मुधोजीच्या जिवावरहि वेळ आली होती. एकदां मुधोजी एलिचपूर शहरांत नबाब इस्मायलखान याचे भेटीस जाऊन परत आपल्या तळावर येत असतां तटाचे वेशीजवळ मुधोजीकडील कांहीं पठाण त्याचे पालखीवर येऊन पडले.

मुधोजीबरोबर **जगदेवराव गुजर**,[१] **देवाजी डोंगरदेव** व **चिमाप्पा चिटनीस**[२] हे होते. त्यांनीं पठाणांशीं झटापट केली व **जगदेवराव** गुजर त्या झटापटींत मारला गेला. **मुधोजीस** जखमा झाल्या व त्यानें पठाणाचे पेशकबज हातांनीं धरल्यामुळें त्याचा अगठा तुटला. **देवाजी डोंगरदेव** यानें जवांमर्दी करून कांहीं पठाणांस मारून मुधोजीस एका तेल्याचे घरांत लपविलें, तरी दोन रोहिले त्याचे मागोमाग आंत गेलेच व एका रोहिल्यानें मुधोजीस पाडून त्याच्या गळ्यावर सुरा ठेविला, तों एक भांगिरा भांग घोटीत बसला होता, त्यानें धांवून रोहिल्याचें डोकें फोडलें. दुसरा रोहिला तेथेंच गांवचा एक रजपूत होता त्यानें मारला. ही गडबड समजतांच नबाब **इस्मायलखान** हा तेथें आला व मुधोजीस आपल्या वाड्यांत घेऊन गेला व त्यानें आपल्या पदरच्या शस्त्रवैद्याकडून मुधोजीच्या जखमा बांधविल्या. **नबाब** नांवाचा एक पठाण मुधोजीच्या लष्करांत होता. तोहि या कटांत सामील असल्याचें दिसून आल्यावरून त्याचें डोकें मारलें. **महिपतराव सुभेदार** हा चंद्रपुरास मुलाचे लग्नाकरितां गेला होता, त्यास वरील वर्तमान समजतांच तो एलिचपुरास आला.

---

१ पुढें अप्पासाहेबाचे वेळेस प्रसिद्धीस आलेला गुजाबादादा गुजर याचा चुलता.

२ रखमाजी गणेश याचा मुलगा. नांव चिमाजी रखमांगद.

**नारायणरावाचा मारेकरी महमद ईसफ याची मुधोजीकडे रवानगी इ. १७७४:**—राघोबादादाचा मोड होण्याच्या सुमारास नारायणरावाचे खुनांत सामील असलेला गारदी **महमद ईसफ** यास दादानें याच वेळेस मुधोजीकडे एलिचपुरास पाठविलें. कारण बारभाई त्यास पकडण्याच्या खटपटींत होते. ता. २–८–१७७४ रोजीं दादानें आपल्या कारभाऱ्यामार्फत नर्मदेच्या उत्तरेकडून मुधोजीस **महमद इसफाबद्दल** जें शिफारसपत्र दिलें होतें तें खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:–

"यानंतर इकडील वर्तमान तरी श्रीमंत सरदारांसह नर्मदापार झाले. तेथून कूच करून तापीतीरास जाणार आहेत. वरकड सविस्तर वृत्त राजश्री आबाजी त्रिंबक आपल्यास लिहितात त्यावरून कळेल. सारांश आमचे लक्ष आपल्याकडे आहे. दुसरा प्रकार नाहीं. आपलेकडील वर्तमान वरचेवर लिहावें तेणेंकरून चित्त स्वस्थ होईल. महमद ईसफ याचें लक्ष सर्व प्रकारें आपल्याकडे. आम्हीहि बहुत त्याची खातरजमा आपल्याकडे जावयाविशीं केली आहे. तूर्त श्रीमंतापासून रुकसत केलें. हे जवळ असल्यास पुणेकर दहशत खाऊं लागले. सरदाराचेंही मानस असेंच पाहून चार दिवस यांजला आपणाकडे रवाना केलें. याचा गौरव सर्व प्रकारें आपण करावा. तूर्त नबाब इस्माईलखान बाहदर व आपण एकदील आहेत. या प्रसंगीं महमद ईसफ आपल्याजवळ पोहोंचले म्हणजे कोणतीही गोष्ट अगाध नाहीं. शत्रूचें पारिपत्य करतील. सारांश आप्पासाहेब तुम्ही कायम आहां तर श्रीमंतास व आम्हांस मोठा आश्रय आहे. यास्तव सुभेदार यांजला आपल्याकडे रवाना केलें. हे दोन हजार सामान आहे. कैसे आहेत तें ध्यानांत असेल. **श्रीमंताचे कमरेची समशेर आहे.** ती आपण जतन करावी. विशेष काय लिहिणें ! लोभ असावा. हे विनंति.[1]"

**महंमद ईसफ** २००० फौजेनिशीं एलिचपुरास आल्यावर मुधोजीनें त्यास आपले चाकरीस ठेविलें. त्याचप्रमाणें इतरहि सैन्य जमा करून मुधोजीनें त्या सालचा (१७७४) दसरा एलिचपुरास केला व पुढें कार्तिक महिन्यांत सर्व सैन्यासह तो नागपुराकडे निघाला. त्याचेबरोबर **महिपतराव दिनकर** याचें

१ ना. भो. का. प. ले. २१ (ऐ. प. व्यवहार ले. १४३)

चंद्रपुरचें सैन्य येऊन मिळालें होतें. इस्मायलखान नवाबासहि त्यानें सैन्याची मदत मागितली होती. परंतु त्यानें आपलें सैन्य दिलें नाहीं.

मुधोजीचे सैन्यापैकीं एक टोळी **महिपतराव दिनकर** व मुधोजीचा पुत्र **चिमणाबापू** यांचेबरोबर होती. तिची व साबाजीकडील **विठ्ठल बल्लाळ** सुभेदार यांची रस्त्यांतच लढाई होऊन विठ्ठलराव मागें हटून नागपुरास गेला. **मुधोजी** यानंतर **चंद्रपुरास**[१] गेला व तेथून चांगली तयारी करून पुन्हां नागपुराकडेस निघाला. त्यापूर्वींच साबाजी हा दादासाहेबाचा पिच्छा सोडून नागपुरास आला होता.

**पांचगांवची लढाई : साबाजीचा मृत्यु** (ता.२६–१–१७७५):–साबाजी हाहि नागपुराहून आपली फौज जमवून **मुधोजीवर** चाल करून आला. या दोन्ही सैन्यांची गांठ नागपूरचे आग्नेय बाजूस पांच कोसांवर **पांचगांव**[१] येथील मैदानांत पडली. ह्या लढाईत **साबाजीस मुधोजीची** गोळी लागून तो हत्तीचे हौद्यांतच ठार झाला व मुधोजीचा जय झाला. **महमद ईसफ** गारदी हाहि मुधोजीबरोबर या सैन्यांत हजर होता व त्यासहि या लढाईत जखमा झाल्या. या लढाईचें तपशीलवार वर्णन भोसल्यांचें बखरींत[२] दिलें आहे तें असें:—"याप्रमाणें फौजेचा जमाव करून साबाजीबुवा जंगी[३] हौद्यांत बसले व रघोजीबोवास अंबारीत समागमें ठेवून त्यांचेमागें खवासखान्यांत घाडगे यांस बसवावें हा नेम करून घाडगे मशारनिल्हेस ताकीद केली कीं, तुम्ही याचे मागें बसून आम्हांस कांहीं झालें असतां याजला मारून टाकावें" हा बेत जाहला. हें ऐकून बापूसाहेब हत्तीवर बसते वेळेस कृष्णा जी नलवडे यांचा हात धरून आपण हौद्यांत बसले व पाठीमागें नलवडे मजकुरास बसविलें. तेव्हां घाडगे मशारनिल्हे

१ बखर पान ११४ मध्यें चंद्रपुरास जाण्याचें कारण असें दिलें आहे **कीं**, चंद्रपुरास **हणमंत जोशी** नांवाचा एक चांगला ज्योतिषी होता त्याचे मुहूर्तानें चंद्रपुरास ही मोहीम सुरू करावी असें कोणीं मुधोजीस सुचविलें. त्यावरून तो नागपुरास न जातां चंद्रपुरास गेला.

१ उमरेड रस्त्यावर

२ लढाऊ

३ पान ११६

तसेच राहिले. दुसरे अंबारींत नाना जोशी व नाना करांडे, रघूजी करांड्याचे दिवाण याजवर लोभ साबाजीबुवाचा विशेष असे तयारीनीं मुकाबल्यास येऊन गोळे सुरू केले. **सिदोजी गुजर** मध्यस्तीस सेनाधुरंधराकडे पाठविले. ते सेनाधुरंधरांचे व्याही, साबाजीबुवाकडून आले की, आपसांत लढाई कशास पाहिजे ? बापूसाहेब आज अथवा उदईक मालकच आहेत. असे प्रकारें बोलले. यश आम्हांस द्यावें. अशीं भाषणें होतात. याजमुळें सेनाधुरंधरांकडील फौज थबकली. इतक्यांत साबाजीबोवांकडील गोळे सुरू होतच होते. त्या गोळ्यांनीं दलपत बेनिगीर गोसावी मातबर माणूस, जहामर्द माणूस एकांड्यांतील तो उडाला. निबाजी शिवदेव यांच्या अबदागिऱ्या मोडून घोडीं जखमीं जाहलीं. याजमुळें महिपतराव याजला विषाद येऊन महमद ईसफ गारदी याजला आपले जवळ बोलावून बोलले कीं, माणसें गोळ्यांनी जाया होतात. याप्रसंगीं कसूर करणें आतां टीक नाही." हें ऐकून रोषांनीं घोडीवरून **ईसफ** मजकुरांनीं उडी टाकून पाय उतारा होऊन जमाव समागमें घेऊन पुढें चालून गेले आणि सेनाधुरंधराकडेस महिपतरावांनीं जाऊन विनंति केली जे– "आपण उभयतां बंधूच आहांत, आम्हा सारख्यांनीं गोळ्यांनीं उडावें आणि आपण तमाशा पाहावा हें काय? याजकरितां पूर्वीच विनंती करीत होतों कीं, ही गोष्ट घडणार नाही." तेव्हां सरकार अज्ञा जाहली कीं, " आतां लढाईचें तोंड लागलें, याजवर काय पाहवयाचें आहे? सिदोजी गुजर बोलावयास आले यास्तव उभे राहून बोलणें प्राप्त; त्यांतूनहि शेंपन्नास लोक जाया जखमी जाहले. आतां व्याहीपणा हें कार्य झाल्यावर पाहण्यास येईल" याप्रमाणें बोलून समागमें लोक देऊन आपले फौज पलीकडेस गुजर मशारनिल्हेस पोहोंचवून दिल्हें. पुढें तोफांचा व बाणांचा मार साबाजीबुवाकडील चालला. लष्कर सेनाधुरंधराकडील जाया जखमी फार झाले. साबाजीबावाकडील लोक लुटीस लागले. इकडील बहुतेक लोक कामास आले व थोडासा जमाव राहिला. हें पाहून साबाजीबुवा जातीनें हौदा **सुकसेन** हत्तीवर (होता) त्यांत बसून अघाडीस चालले. दोन चार अंबाऱ्या बरोबर होत्या असें सेना धुरंधर याजवर चालून प्रथम सांग चालविली. ते सेनाधुरंधर यांचे हत्तीवरील माहूत नूरमहंमद फौजदार यांनीं गजबागांनीं सांग टाळिली.

मग तीर चालविला तो मुधोजीबोवा सेनाधुरंधर यांचे हातास लागला. मग सेना धुरंधरांनीं बंदूक जोड गोळ्या घालवून चालविली. ती गोळी साबाजी बोवांचे मस्तकास लागली. तसेंच खेलोजी पाटील यांनीं सेनाधुरंधराचे खवाशींतून बंदूक चालविली. ती गोळी साबाजीबोवाचे कानसुलाजवळ लागली ते समयीं साबाजी भोंसले सन ११८४ चे सालीं पौषमासी वद्य दशमीस[१] ठार झाले. तेव्हां नाना जोशी अंबारींत होते. त्याजला सेनाधुरंधरांनीं गोळी मारली, तोहि ठार झाला. नाना करांडे चिटनिशीचें लिहिणें साबाजी बोवाजवळ लिहित होते, म्हणोन कृष्णराव माधव चिटणवीस यांनीं महिपतराव सुभेदार यांजला शपथ घातली कीं, आमचा शत्रु याजला तुम्ही मारावें. याप्रमाणें बहुत निकटीनें बोलले. तें महिपतराव यांनीं ऐकून भाल्यांनीं नाना करांडे याजला मारिलें. नंतर साबाजी बोवाकडील निशाणी नौबत होती, त्या नौबतवाल्यास आज्ञा केली कीं, " फत्तेचे सैदोन वाजवावें " त्याजकडून सैदोन वाजूं लागलें. तेव्हां लोकांस भ्रम जाहला कीं, साबाजी बोवांची फत्ते होऊन मुधोजीबोवास धरलें. याजवरून लोक सारे मुजऱ्यास येऊं लागले. तो मुधोजीबुवास फत्ते पाहून निघोन जावें असें होऊं लागलें. तशांत भवानी शिवराम यांनी दुरूनच पाहून पळाले. तसे भवानी काळो आपले जमेतेनिशीं समागमें ज्येष्ठ पुत्र बळवंतराव नामें होते ते व आपण आले. सारांश मान मुधोजीबोवांचा पाहिला. तेथें रामचंद्र दादो व गोविंद दादो पुढें घोड्यावर स्वार होऊन उभे राहिले होते, त्यांनीं भवानी काळू यांशी बोलले कीं, आतां आपण यावें. आप्पासाहेबांची फत्ते जाहली, चिता नाहीं, आम्ही आहोंत." असें ऐकून भवानीपंत फिरले. ते पळून जाऊं लागले. ते वेळेस रामचंद्र दादोनें महिपतराव सुभेदार यांस सांगितलें कीं, " दिवाण भवानी शिवराम गेले व बक्षी भवानी काळो हेहि चालले हें ठीक नाहीं, कठीण दिसतें." असें सुभेदारांनीं ऐकून आपले जमेतानिशीं जाऊन मेळविले. तों शिरसोजी नामें आटोळे सुभेदाराजवळ होता, त्याजला बोलले कीं, " पाहतां काय ? तुमचा बाप चालला." याजवरून त्यांनीं घोडा चालवून भवानी काळोस मेळवून वार टाकला. तो जखम नाकावर लागली. रामचंद्र दादो हेहि

---

१ ता. २६–१–१७७५

पोंचले. त्यांनीं जखम हातावर मारली. जखमेनें जेर होऊन घोड्यावरून खालीं आले. त्यावेळेस पांडुरंग गणेश पळोन सिवनी छपाऱ्यास गेले. महिपतराव व रामचंद्र दादो यांनीं समीप येऊन रामचंद्र दादो यांनी शालजोडी, भवानी काळोचे अंगावर टाकली. मारो नका म्हणून ताकीद करून वांचविली. झोळी करून सरकारासमक्ष पुढें आणिलें; सरकारांनीं रोष करून सदाशिव माणकेश्वर याचे स्वाधीन केलें. "

मग महिपतराव सुभेदार बोलले की, सावाजी बोवांचीं अंबारी राहणें ठीक नाहीं. याजवरून हौद्याचे खांब तोडून पाडले. तें पाहून साबाजीबोवाची फौज पळूं लागली. मुक्काम तेथेंच जहाला. रात्रीं जखमी लोक पहाण्यास निघाले. सुरतसिंग हजारी व राजेश्वर दिनकर ठार झाले. निंबाजी शिवदेव व उमाजी विनायक जखमी; आणिकही फौजेपैकी ठार झाले व जखमी होऊन दुसरे दिवशीं साबाजी बोवाची फौज कांही पळाली, आणि थोडी-बहूत राहिली. त्या लोकांस भय उत्पन्न होऊन तेही जाऊं लागले. त्याज-वरून चिमणाबापूसाहेब ओलीस दिले. स्वारी नागपुरास आली. दर्याबाई-साहेबहि आल्या. साबाजीबोवाच्या दोन्ही स्त्रिया सती गेल्या. जवातुबाई राख ही सती पडली. दहन झाल्यावर त्यांचा विधी जहाला " १

**साबाजी** मेल्यामुळें **मुधोजीस** कोणीहि प्रतिस्पर्धी उरला नाहीं व तो नागपुरास आल्यावर **दर्याबाई** व साबाजीचे पक्षाची सर्व मंडळी यांचे अंकित झाली. **मुधोजीनेंहि** साबाजीचे पक्षाचे मंडळीस विशेष त्रास न देतां मिळवून घेतलें. रघूजी हा तर मुधोजीचा मुलगाच असल्यामुळें त्याचें व मुधोजीचें सख्यच होतें. पुढें **सवाई माधवरावाचे** कारकीर्दींत **रघूजीचें** नांवें सेनासाहेबसुभ्याचीं वस्त्रें व नेमणूक ता. २४-६-१७७५ रोजी रीतसर होऊन आली व रघूजी हा कायदेशीर रीतीनें सेनासाहेबसुभा झाला[२]. वाईकर **बाबूराव वैद्य** हा नागपुरचे दरबारीं पेशव्यांचा वकील होता. त्यासच मुधोजीनें या कामाकरितां पुण्यास रवाना केलें होतें. तसेंच मुधोजीनें **बाबूरावा**मार्फत बारभाईंशीं स्नेह करून **व्यंकटराव काशी**

---

१ ना. भो. बखर पान ११६, ११७, ११८,

२ ना. भो. का. पत्र ले. ७ (ऐ. प. ले. १४७-१४८).

ह्या पुण्यास कारभाऱ्यांचे कैदेंत होता, त्यासहि सोडवून आणिलें.[१] त्याचे बंधू **लक्ष्मणराव** व **महिपतराव** हे आधींच मुधोजीकडे पळून आले होते. राघोबादादाच्या पक्षाचा पाडाव होऊन सवाई माधवरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळून बारभाईच्या हातांत सर्व सत्ता आल्यामुळें **मुधोजीनें राघोबादादाचा** पक्ष सोडून बारभाईंशीं सख्य जोडलें.

**उमरावतीकर शिवाजी भोंसल्याचें बंड** इ. स. १७७५. परंतु यापूर्वी बारभाईनीं उमरावतीकर शिवाजी भोंसल्यास सेनासाहेब सुभ्याचें पद देण्याचें कबूल करून त्यास मुधोजीविरुद्ध उठविलें व याप्रमाणें मुधोजीस शह देण्याचें कारस्थान चालविलें. ता. ६–४–१७६५ रोजीं बारभाईंनीं शिवाजीच्या नांवें सेनासाहेब सुभ्याचे पदाची सनद दिली. या उमरावतीकर शिवाजी[२] भोसल्यानें सैन्य उभें केलें व पूर्वीच्या साबाजीच्या पक्षांतील माणसें मिळविण्याचा उद्योग सुरू केला. साबाजीच्या पक्षांतील **भवानी शिवराम**[३] हा मुत्सद्दी पांचगांवच्या लढाईनंतर पळून जाऊन त्यास मिळालाच होता. यानंतर त्यानें निजामाकडे माणसें पाठवून त्याची मदत मागितली. बारभाईकडील व निजामाकडील मदत त्यास मिळाली असती तर हें प्रकरण चांगलेंच रंगांत आलें असतें. परंतु मुधोजीनें दिवाकरपंतास निजामाकडे पाठविलें व त्यास मिळवून घेतलें. बारभाई आपल्याच उद्योगांत असल्यामुळें त्यांनाहि मदत पाठवितां आली नाहीं. शिवाजीजवळ पैसा नसल्यामुळें त्यालाहि विशेष सैन्य जमवितां आलें नाही. त्यामुळें हा बंडावा लौकरच मोडला. मुधोजीनेंहि बारभाईशीं नमतें घेऊन मिळतें घेतलें व वर लिहिल्याप्रमाणें रघूजीच्या नांवें सनदा मिळाल्या.

महिपतराव दिनकर याजवर मुधोजीची पुढें इतराजी होऊन त्यानें महिपतरावास गाविलगडचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. मागाहून गाविलगडा-

१ व्यंकटराव काशी हा गाविलगडचे किल्ल्यांत कांहीं दिवस भोसल्यांच्याहि कैदेंत होता. ना. भो. का. ले. ६८ ( ऐ. प. ले. १४६ पहा ) ता. १३–४–१७७५.

२ बखर पा. ११९ पुरवणी उमरावतीकर भोंसले पहा.

३ भवानी शिवराम हा (ऋ. दे. ब्रा.) यानंतर निजामाकडे व तेथून पुण्यास पेशव्याकडेस गेला व पुनः नागपुरास आला नाहीं. (अप्र. का.)

वरून काढून, नागपुरास गोंडराजाचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. कांहीं दिवसांनीं महिपतरावावरचा रोष जाऊन मुधोजीनें त्यास कैदेंतून सोडलें. पुढें कांहीं दिवसांनीं मंडल्यावरील मोहिमेसहि मुधोजीनें महिपतरावास पाठविलें; परंतु पुढें मुधोजीच्या कारकीर्दीत **दिवाकरपंत** हाच मुधोजीच्या विश्वासांत राहून त्याचा मुख्य कारभारी राहिला.

**मदमद इसफास पकडून तोफेच्या तोंडीं दिलें: २६–११–१७८५ इ.**— **नारायणरावाच्या** खुनाच्या कटांत जेवढे लोक होते त्या सर्वांची चौकशी होऊन त्यांना शिक्षा झाल्या. मुधोजीचा व बारभाईचा सलोखा झाल्यानंतर मुधोजीनें इ. स. १७७५ च्या जून महिन्यांत **महमद इसफास** काढून दिलें. तो २००० गारदी व १००० स्वार घेऊन सातपुड्याचे उत्तरेस **नेमाड** व **गढामंडळा** या बाजूस लुटालूट करूं लागला. बारभाईनी त्यास पकडण्याचा प्रयत्न चालविला. **हरीपंत फडके** हा त्या वेळेस नेमाड प्रांतांत होता. त्यानें **कृष्णराव काळे** व **परशुरामभाऊ पटवर्धन** वगैरे सरदारांस इसफावर पाठविलें. बारभाईनीं मुधोजीसहि इसफास पकडण्याकरितां लिहिलें. इसफ पळून पूर्वेस महादेवाचे डोंगरांत गेला व तेथें गोंडांच्या आश्रयानें कांहीं दिवस राहिला व नंतर **गढामंडल्याकडे** पळून गेला. तेथून तो नर्मदा उतरून उत्तरेकडेस जात होता परंतु भोंसल्यांच्या अधिकाऱ्यांनीं त्यास जाऊं दिलें नाहीं. त्यानें मुधोजीसहि नानाप्रकारें विनविलें. परंतु मुधोजीनें त्यास मदत न करितां **ताजखान** रोहिल्यास[१] त्यास पकडण्यास पाठविलें. इसफ हा **शिवणीकडे** परत येत असतां मुधोजीचा सरदार **ताजखान** रोहिला यानें त्यास पकडलें व मुधोजीस कळविलें. मुधोजीनें त्यास बारभाईचा सरदार **परशुरामभाऊ पटवर्धन** याचे स्वाधीन करण्यास **ताजखानास** सांगितलें. त्याप्रमाणें **ताजखानानें इसफास** पटवर्धनाच्या स्वाधीन केलें. तेथून **हरीपंत फडक्यानें** त्यास आपले छावणींत धुळें–मालेगांवचे बाजूस आणविलें व बारभाईंच्या हुकमानें तेथेंच तोफेच्या तोंडीं देऊन उडविलें (ता. २६–११–१७७५)[२]. **महमद इसफास** पकडून दिल्याबद्दल नाना फड-

---

१ याचे वंशज शिवणीछपारे येथें अद्याप असून त्यांना कांहीं जहागीर आहे. हा ताजखान मजीदखान रोहिल्याचा भाऊ.

२ सरदेसाई उत्तर वि. पा. २०

णीसानें **मुधोजीस** पत्र लिहून त्याचा गौरव केला[१] व **ताजखान रोहि-ल्यास** १००० रु. चा गांव इनाम दिला (ता. २१-५-१७७६).

**मुधोजीचा पुणें दरबारशीं बेबनाव इ. स. १७७९**--याच सुमारास **मुधोजीशीं हेस्टिंग्ज** यानें कारस्थान चालवून आपणाकडे मिळवून घेतलें. मुधोजीनें इंग्रज सेनापति **गॉडर्ड** यास हुशंगाबादेस सर्व प्रकारची मदत केली व पुढें मुंबईस रवाना केलें. हें इतरत्र वर्णन केलें आहे. यावेळेस इंग्रज व पुणें दरबार यांजमध्यें बेबनाव होऊन लढाई सुरू होण्याचा संभव होता. कनकापुरच्या तहाच्या शर्तीप्रमाणें व एकंदर राज-कारणाच्या दृष्टीनें **मुधोजीनें** परभारें दुसऱ्याशीं राजकारण करणें व तेंहि मराठी साम्राज्याच्या प्रच्छन्न शत्रूशी करणें गैर होतें. मराठे व इंग्रज यांची प्रत्यक्ष लढाई जरी सुरू झाली नव्हती तरी वादविवाद सुरू झाला होता. अशा वेळेस मुधोजीचें हें वर्तन पाहून **नाना फडणविसानें** मुधोजीचा भाऊ **बिंबाजी** हा छत्तीसगडांत होता त्यास चिथावणी देऊन पुन: गृहकलह उभा केला. पुण्याचा वकील **बाबूराव वैद्य** यानें नानास मुधोजीच्या व इंग्र-जांच्या गुप्त सलोख्याबद्दल बातमी दिली. **दिवाकरपंत** हा पुन: मुधोजीचा कारभारी झाल्यामुळें **महिपतराव दिनकर, व्यंकटराव** व **लक्ष्मणराव काशी** ही मंडळी मागें पडली होती. त्यांचेमार्फत **बिंबाजीस** फोडण्याचें काम नाना-फडणीसानें चालविलें. **बिंबाजीस** पूर्वी राघोबादादानें साबाजीस कबूल केलेला ३२ लक्षांचा मुलूख व **बऱ्हाणपूरचा** किल्ला राहण्यास द्यावा असें नानानें कबूल केलें. नानानें **महिपतराव काशी** याजबरोबर **बिंबाजीस** व **महिपतराव दिनकर** यांस पत्रें देऊन या मसलतीकरितां रवाना केलें. **महि-पतराव दिनकर** व **महिपतराव काशी** हे दोघेही छत्तीसगडास जाऊन त्यांनीं **बिंबाजीस** राजी केलें व त्यास घेऊन फौजेसुद्धां **नवागडचे** मुक्कामा-पर्यंत आणिलें.[२]

आपल्या घरांतील फंद समजतांच मुधोजीनें नानाशीं सलोखा करण्या-करितां **दिवाकरपंतास** पुण्यास रवाना केलें. नाना फडणीसानें दिवाकर-

---

१ ना. भो. का. प. ले. १० ( ऐ. प. ले. १५० ता. ३१-१०-१७७५)
२ बखर पा. १२५-१२७.

पंताजवळ मुधोजीचे वर्तनाचा फार निषेध केला व दादासाहेबांस हाती धरून इंग्रज हे मराठी साम्राज्य गिळंकृत करण्यास पहात असतांना भोंसल्यांनीं इंग्रजांस मदत करणें हें किती अनिष्ट आहे हें समजावून सांगितलें व मुधोजी इमानानें वागल्यास त्याचा पुत्र **खंडोजी** ऊर्फ **चिमणाबापू** यास **सेनाबहादर** हें नवीन पद व **गढामंडला** हे प्रांत देण्यांत येतील अशीहि लालूच दाखविली.[१] नाना फडणिसानें निजाम व हैदर यांचेशीं इंग्रजाविरुद्ध कारस्थान रचलें असून भोंसल्यांनीं कलकत्तेकर इंग्रजांवर चाल करून या जुटींत सामील व्हावें असेंहि या भेटीत ठरलें. ते सर्व कबूल करून **दिवाकरपंत** नागपुरास आला.

खंडोजीस पूर्वी ता. २१-४-१७७९ रोजी रघूजीनें दारव्हे, गिरोली, महागांव, खडी धामणी, माहूर, भाम वगैरे परगणे खाजगीचे सरंजामास दिले होते. ( ऐ. प. ले. १६०-१६१ पहा. )

दिवाकरपंतास पुण्यास पाठविल्यावर **मुधोजीनें** बिंबाजीची समजूत काढण्याकरितां आपली बायको **चिमाबाई** इची रवानगी केली. तिनें रायपुरास जाऊन बिंबाजीची समजूत केली व त्यास थांबविलें.

मुधोजीनें नाना फडणीसाच्या समजुतीखातर व निवळ बतावणी करण्याकरितां **चिमणाबापूस** बंगाल्यावर पाठविलें, परंतु हेस्टिंग्ज यानें **चिमणाबापूस** फोडून व त्यास १६ लक्ष रुपये लुचपत देऊन व आणखी देण्याचें कबूल करून गप्प बसविलें. या मोहिमेंत **चिमणाबापू**बरोबर मुधोजीनें **भवानी काळो** व **अमत माधव चिटणीस** यांस दिलें होतें. भोंसल्यांचे वकील **बेनीराम** व **विश्वंभर** हे हेस्टिंग्जजवळ होते. त्यांचे मार्फतीनें हेस्टिंग्जनें चिमणाबापूशीं सर्व बोलणें केलें.[२]

**चिमणाबापू** हा वर्षभर **कटक** प्रांतांत राहून छत्तीसगडमार्गानें नागपुरास आला. छत्तीसगडास त्यानें बिंबाजी भोंसले ऊर्फ आबासाहेब याची भेट घेतली. तसेंच **महिपतराव दिनकर** व **व्यंकटराव काशी** यांनाहि तो तेथून घेऊन नागपुरास आला. **व्यंकटराव काशी** हा छत्तीसगडास

---

१ ना. भो. का. प. ले २९ व ११ (ऐ. प. ले. १६८ ता.२२-९-१७७१)

२ वरील मोहिमांचें सविस्तर वर्णन पुढें भाग ९ यांत केलें आहे.

बिंबाजीजवळ राहिला होता व छत्तीसगडांतील लहान लहान संस्थानें काबीज करण्याकरितां बिंबाजीनें त्यास पाठविलें होतें.

इ. स. १७८० मध्यें **चिमणाजी रखमांगद** चिटनीस हा जुना मुत्सद्दी मरण पावला व त्याचे जागीं त्याचा भाचा कृष्णराव माधव हा चिटणीस झाला.[१] त्याप्रमाणें प्रसिद्ध मुत्सद्दी **दिवाकरपंत** हा ८० वर्षांचा म्हातारा होऊन नागपूर येथें मरण पावला[२] (ऑगस्ट १७८१). भोसले व इंग्रज यांजमधील कारस्थानाकरितां त्याला हेस्टिंग्ज यानें काशीस बोलाविलें होतें व तो काशीस जाण्याच्या तयारीत होता. परंतु दरम्यान तो मरण पावल्यामुळें त्याची व हेस्टिंग्जची भेट झाली नाही.

**बदामीची स्वारी** १७८६—इ. स. १७८५मध्यें नाना फडणिसानें टिपूवर स्वारी करण्याचें ठरविलें व **मुधोजी** भोंसल्यास मदतीकरितां बोलाविलें. मुधोजी हा ऑगस्ट १७८५ मध्यें सैन्यासह पुण्यास गेला. त्यानें आपणाबरोबर आपलीं बायकामुलेंहि खंडोबाचे यात्रेकरितां म्हणून नेलीं होतीं. यात्रा करून **मुधोजी** परत नागपुरास गेला व त्यानें **खंडोजी** ऊर्फ **चिमणाबापूस** पेशव्याचे लष्कराबरोबर **बदामीचे** स्वारीस रवाना केलें. एप्रिल १७८६ मध्यें **बदामीचे** हल्ल्यांत पेशवे, निजाम व भोंसले यांचीं सैन्यें हजर होती. या लढाईत **चिमणाबापूनें** पुष्कळ शौर्य दाखविलें. मुधोजीचा दुसरा पुत्र **व्यंकोजी** ऊर्फ **मन्याबापू** हाहि **बदामीचे** स्वारींत हजर होता.

**मुधोजीची कुटुंबयात्रा**—त्यावेळेस **मुधोजी** व त्याचें सर्व कुटुंब हें

---

१ याचेच वंशज हल्लीचे नागपुरचे प्रसिद्ध चिटणीस हे होत.

२ बखरीत दिवाकरपंत नागपूर येथें मेला असें लिहिलें आहे. परंतु त्या वेळच्या कांहीं कागदपत्रांत लिहिलें आहे कीं, तो हेस्टिंग्जला भेटण्याकरितां काशीस गेला परंतु हेस्टिंग्ज हा जलमार्गानें काशीस येण्याचे सुमारास त्याची भेट न होतांच तेथें मरण पावला. दिवाकरपंतास औरस पुत्र नसून कोकाबापू नांवाचा एक दासीपुत्र होता. दिवाकरपंताचे प्रत्यक्ष वंशज कोणी नसून त्याचे दूरचे भाऊबंद नरखेड व नागपूर येथें आहेत. चिमूर येथें दिवाकरपंतानें बांधलेलीं देवळें आहेत.

महाराष्ट्रांतील सर्व देवस्थानांच्या यात्रा करून व आपलें वतनाचें गांव **देऊर** येथें जाऊन साताऱ्यास गेलें व तेथें छत्रपतीच्या भेटी घेऊन परत पुण्यास आले व तेथून नागपुरास आलें. रघूजी हा नागपुरासच होता.

**मुधोजी व बिंबाजी यांचा मृत्यु १७८७-८८–बिंबाजी** हा छत्तीसगडांत रतनपुरास होता. तो ७–१२–१७८७ रोजी मरण पावला. त्यानंतर चार महिन्यांनीं म्हणजे वैशाख शु॥ पौर्णिमेस श. १७१० (ता. १९ मे १७८८) **मुधोजी** हाहि नागपुरास मरण पावला. **बिंबाजीची** बायको **आनंदीबाई**[1] ही **रतनपुर** येथेंच राहिली. तिचेजवळ कारभारी **महिपतराव काशी**, कृष्णंभट उपाध्ये[2] व **महादजी भोंसले** हे होते. **आनंदीबाईचा** विचार रघूजीच्या विरुद्ध दिसल्यामुळें व बिंबाजीस पुत्र नसल्यामुळें छत्तिसगडचा सुभा आपल्या ताब्यांत घेण्याचा रघूजीने निश्चय केला. भवानी काळोचा पुत्र **यशवंतराव, भवानीशंकर** व नथू भोंसले यांस रघूजीनें सैन्यासह छत्तीसगडास रवाना केलें. **महिपतराव काशी** व कृष्णंभट यांनी **आनन्दीबाईची** व **यशवन्तरावाची** सफाई करून दिली व यशवंतरावास रघूजीबरोबर पुण्यास जाणे असल्यामुळें रघूजीनें **महिपतराव दिनकर** यास आपले तर्फेनें छत्तीसगडास रवाना करून यशवंतरावास परत आणिलें.

**छत्तीसगडचा कारभार : संबळपुरचा वेढा**–बिबाजी मेल्यावर सुमारें एक वर्षभर **आनन्दीबाईनें** छत्तीसगडचा कारभार स्वतः केला. परंतु त्यानंतर रघूजीनें छत्तीसगडचा अंमल आपलेकडेस घेतला व आपल्या तर्फेचे सुभेदार छत्तीसगडचे सुभ्यावर पाठविले. प्रथम **महिपतराव दिनकर** याजकडेस हा सुभा होता. महिपतरावाचे कारकीर्दीत संबळपुरचा संस्थानिक बदलून त्यानें संबळपुरचा किल्ला ताब्यांत घेतला. त्यावर **महिपतराव दिनकर** व **महिपतराव काशी** यांनीं मोर्चे बसविले. चार महिने त्या किल्ल्यास वेढा द्यावा लागला. या वेढ्यांत महिपतराव काशी यास गोळी लागून तो मरण पावला. **महिपतराव दिनकर** यानें संबळपूरचा किल्ला घेऊन तो रायपुरास परत आला. **महिपतराव दिनकर** याजविषयीं रघूजीच्या मनांत संशय उत्पन्न

---

१ बिंबाजीची दुसरी बायको उमाबाई ही सती गेली.

२ पुढें अप्पासाहेबांचे कारकीर्दीत प्रसिद्धीस आलेला **मनभट** याचा चुलता.

झाला कीं, तो व्यंकोजीस रघूजीविरुद्ध फंद देतो. व्यंकोजी यास मुधोजीचें सेनाधुरंधर हें पद मिळालें होतें परंतु रघूजीचा व त्याचा आंतून बेबनाव होता. रघूजीनें **महिपतराव दिनकर** यास काढून छत्तीसगडचे सुभ्यावर **विठ्ठल दिनकर** यास नेमिलें.

टिपूवरील दुसऱ्या मोहिमेंतहि हरीपंत फडके याचे मदतीस रघूजीनें आपलें सैन्य **भवानी काळोचा** दुसरा पुत्र बळवंतराव याजबरोबर पाठविलें होतें.

**गंगथडीचा सुभा**—गंगथडीचा प्रांत भोंसल्याकडेस आला होता. तो रघूजीनें हरीपंत फडके याच्या मार्फतीनें **आनंदराव धुंडिराज कोठेकर** याजपासून एक लक्ष रुपये घेऊन त्यास दिला व त्यानें या सुभ्याचें काम १०।१२ वर्षे केलें. कोठेकर हा त्याच प्रदेशांतील म्हणजे हल्लीच्या मोंगलाईतील **कोठें** या गांवचा राहणारा असून पुढें तो नागपुरास आला.[१] गंगथडीचा सुभा भोसल्यांकडून दुसऱ्या मराठा युद्धानंतर झालेल्या तहानें गेला (१८०३ इ.).

**चिमणाबापूचा मृत्यु** (१७८९ इ.)—ता. १६–८–१७८९ रोजीं (श्रावण व. १० शके १७११) नागपुरास **खंडोजी** ऊर्फ **चिमणाबापू** हा एकाएकीं निवर्तला.[२] त्यास पुत्रसतति नव्हती. चिमणाबापू हा शरीरानें धिप्पाड असून त्या वेळीं त्याचेइतका सशक्त मनुष्य क्वचितच असेल. तो अत्यंत धाडशी व शूर होता. चिमणाबापू हा सशक्त व ऐन पंचवीशीच्या वयांत असल्यामुळें व आजारी नसतांना एकदम मरण पावल्यामुळें रघूजीनें त्यास जादूनें मारलें असा लोकप्रवाद त्यावेळीं उठला होता. चिमणाबापू हा रघूजीस आपली वाटणी मागत असे व त्यामुळें उभयतांचें मन शुद्ध नव्हतें. त्यावरून रघूजी व त्याचा विश्वासू कारभारी **महादाजी लष्करी** यांनीं मूठ मारून त्यास मारलें अशी बातमी उठली. त्यावेळीं अशा बातम्या नेहमीं उठत असत. चिमणाबापूचे मृत्यूसंबंधानें पुढील तपशील एका अप्रकाशित बखरीत उपलब्ध आहे.

---

१ कोठेकर याचे भाऊबंद वऱ्हाडचे दक्षिणेस मोंगलाईंत **कोठें** येथें असून आनंदरावाचे वंशज नागपूर व **बालाघाट** येथें आहेत.

२ औरंगाबादकर यांचे अप्रकाशित बखरींत चिमणाबापूच्या मृत्यूची मिती आश्विन शु. ८ संवत १८४६ (ता. १५–१०–१७९० इ.) अशी दिली आहे.

" ज्येष्ठांत रघोजी दाखल झाल्यावर त्यानें आपला मुलगा **परसोजी बाबासाहेब** याचें लग्न केलें. मुलगी **काशीबाई मोहिते**. त्यापूर्वी नुकतीच रघूजीची बहीण **झिंगाबाई** मेली होती. त्यामुळें चिमाबाईनें तीन महिने अन्न घेतलें नाहीं. तिला मरून महिना जाल्यावर **खंडोजी मूळतापीच्या** जत्रेस महिनाभर जाऊन आला. तदुत्तर एके दिवशीं रात्रीं बुधखान पठाणाचे येथें नाच होता, तो पाहून परत आल्यावर **खंडोजी** मध्यरात्री कांहीं खिचडी खाऊन निजला. सकाळी थोडा वेळ हनुमान-खिडकीजवळ बसला असतां एकदम छातींत मूठ मारल्यासाखें होऊन पागोटें पडलें आणि नाकातोंडांतून रक्त जाऊन तो लागलीच गतप्राण झाला. **चिमाबाई** त्यावेळीं पुराण ऐकत होती ती धांवत आली. पाहते तों प्राण गेलेला! शव उचलण्यास बारा आसामी लागले. बंधू व्यंकोजीनें उत्तरक्रिया केली. "[१]

**भवानी मुनशीचा मृत्यु १७९० इ.**—याच सुमारास **भवानी मुनशी** हा ता. १०-२-१७९० रोजीं नागपुरास मरण पावला. त्याचे मागें त्याची दिवाणगिरी त्याचा पुतण्या **श्रीधर लक्ष्मण ऊर्फ बापू मुनशी** यास मिळाली. त्याचे मदतीस **कृष्णराव माधव चिटणीस** यास रघूजीनें नेमिलें व दोघांनीहि मिळून कारभार करावा असें ठरविलें.

**राजाराम मुकुंद, कटकचा सुभेदार याचा मृत्यु**– **राजाराम मुकुंद** हा कटक येथें भोंसल्यांचा सुभेदार होता तोहि याच सुमारास त्याच प्रांतांत मरण पावला. त्याचे मागून त्याचा मुलगा **सदाशिव राजाराम** हा सुभेदार झाला.

**यशवंतराव रामचंद्र**– वरप्रमाणें या वेळेस भोंसलेशाहीतील मुत्सद्यांची जुनी पिढी खलास होऊन कांहीं नवीन माणसें उदयास आली. **भवानी मुनशी** याचा आप्त **रामचंद्र दादो** हा एलिचपुरच्या नबाबाकडून मुधोजी-च्या वेळेपासून नागपुरास वकील म्हणून होता. त्याचा भाऊ **गोविंद** हा **गाविलगडचा** किल्लेदार **झामसिंग** याजकडेस नोकर होता. हे दोघेहि बंधू मुधोजीच्या पक्षास असून त्याचेबरोबर पांचगांवचे लढाईंत हजर होते. राम-चंद्र यास तीन पुत्र. **यशवन्तराव, केशवराव** व **माधवराव. रामचन्द्र**

---

१ सरदेसाई उत्तर वि. पा. ५२४ व औरंगाबादकराची बखर. (अप्र.)

**दादो** हा भोंसल्यातर्फे हैद्राबादेस निजामाकडे जात येत असे. पुढें रघूजीनें **केशवराव** यास आपले तर्फेनें वकील म्हणून कायमचे हैद्राबादेस ठेविलें. यशवंतराव हा भोंसल्यांचे पदरीं नागपुरासच राहिला व पुढें प्रसिद्धीस येऊन त्याचेच हातानें इ. स. १८०३ मध्यें ज. वेलस्लीशीं **देवगांवचा तह** झाला. माधवरावाचा मुलगा **जयकृष्ण** हा भोंसल्यांच्या पायदळावर अंमलदार होता व पुढें शिंद्यांचे दरबारीं भोंसल्यांच्यातर्फे वकील म्हणून गेला.

**पांडुरंग गणेश बक्षी**—**भवानी काळो** याचे मागें त्याचे पुत्र **यशवंतराव** व **बळवंतराव** व पुतण्या **पांडुरंग गणेश** हे पुढें आले. हे सर्व लढाऊ होते व **पांडुरंग गणेश** याजकडेस सैन्याची बक्षीगिरी आली व ती त्याचेच घराण्यांत पुढें चालली.

**विठ्ठल बल्लाळ सुभेदार** (परांजपे):—हाहि लढाऊ मनुष्य म्हणून प्रसिद्धीस आला. हा जानोजीच्या वेळेपासून भोंसल्यांचे लष्करांत होता. याचा मामा नरहर बल्लाळ रिसबूड हा नागपुरचा सुभेदार होता. विठ्ठलराव यानें खड्यांच्या लढाईंत फार पराक्रम गाजविला. त्याचा मुलगा **गणपतराव सुभेदार** हा आप्पासाहेबांचे धामधुमींत पुढें प्रसिद्धीस आला. तसेंच **गुजाबादादा गुजर, रघुनाथराव बाजी घाडगे, महमद अमीनखान छपारेवाले, रामचंद्र वाघ** हेहि सरदार पुढें आले. तसेंच **बेनीसिंग जमादार** हाहि लढाऊ मनुष्य पुढें येऊन **गाविलगडाचा** किल्लेदार झाला. विठ्ठलपंत सुभेदार, रघुनाथराव घाडगे व बेनीसिंग यांनीं इ. स. १७९५ मध्यें हुशंगाबादेवर स्वारी करून भोपाळचे नबाबापासून तें ठाणें घेतलें.

**खड्यांची लढाई (१७९५ इ.)**—इ. स. १७९५ मध्यें प्रसिद्ध खड्यांची लढाई झाली. त्यांत भोंसल्यांचें लष्कर विठ्ठलराव सुभेदार याचे हाताखालीं हजर असून त्यानें लढाईंत मोठा पराक्रम केला.[1] या लढाईंत निजामाकडून पेशव्यास मिळालेल्या मुलुखापैकीं हल्लीं पुसद तालुक्यांत असलेला तीन लक्षांचा मुलूख व खंडणीपैकीं २९ लक्ष रुपये भोंसल्यास

१ खड्यांच्या लढाईचे पोवाड्यांत त्याबद्दल पुढील वर्णन आहे:—
"भोंसल्याचे खासे विठ्ठल पंडित पठाण।
"भले मर्द शिपाई रणामधिं भिडे जैसे पंचानन॥"

मिळाले. खडर्याचे लढाईनंतर पेशव्यानें **विठ्ठल बल्लाळ** यास मेजवानी करून मोठ्या सन्मानानें नागपुरास परत पाठविलें.

**कटक प्रांताकडील बंदोबस्त–कटक** ऊर्फ **ओरिसा** हा प्रांत बंगालचे दक्षिण भागास समुद्र किनाऱ्यावर असून त्यांत कटक हें मुख्य शहर आहे. कटक शहराजवळ **बाराभाटीचा** मजबूत किल्ला होता. तसेंच **बलसोर** ऊर्फ **बालेश्वर** म्हणून महत्त्वाचें बंदर या प्रांतांत होतें. बंगाल्यांतून मद्रासेकडेस जातांना या प्रांतांतून रस्ता होता व दरम्यान **चिलका** नांवाचें एक मोठें सरोवर होतें, तें उतरून पलीकडे उत्तर सरकार वगैरे इंग्रजांकडेस आलेला मुलूख होता त्यांत जावें लागे. त्यामुळें बंगाल्यांतून मद्रासेकडेस खुष्कीच्या मार्गानें फौजा पाठविल्यास इंग्रजांना या प्रांतांतून गेल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. म्हणून हा प्रांत आपलेकडे आणण्याची इंग्रजांची फार खटपट होती.

**शिवभट साठे** हा कटक प्रांतावरील भोंसल्यांचा पहिला सुभेदार होता. त्यापूर्वी **मीर हबीब** यास पहिले रघूजीनें कटकचा सुभेदार नेमलें होते. परंतु जानोजीशीं त्याचा बेबनाव होऊन तो मारला गेला हें इतरत्र लिहिलें आहे.

त्याचेनंतर **राजाराम मुकुंद** हा बरेच दिवस कटकचा सुभेदार होता. प्रसिद्ध जगन्नाथपुरीचें देवस्थान याच प्रांतांत होतें. इ. स. १७९८ चे कार्तिक महिन्यांत व्यंकोजी व त्याची आई **चिमाबाई** हे **जगन्नाथाचे** यात्रेकरितां **कटक** प्रांतांत जाऊन तिकडेच एक वर्षभर त्यांनीं मुक्काम केला. त्या प्रांतात अव्यवस्था झाली होती ती त्यांनीं मोडून टाकली. **बाराभाटीचा** किल्ला **रघुनाथ शेषाद्रि**, **भूपसिंग**, **बहिरामखान** व **शहाबाजखान** या चौघा सरदारांनी बळकाविला होता. तो त्यांना एक लाख रुपये देण्याचें कबूल करून व्यंकोजीनें आपल्या ताब्यांत घेतला व **अमृतराव ढगे** यास किल्लेदार नेमिलें. **व्यंकोजी**[१] **सगदेव** यास त्यानें या प्रांताचे बंदोबस्तास नेमून **बाळाजी कोन्हेर** यास फोजेचा अधिकार दिला व याप्रमाणें त्यांनीं सर्व प्रांताचा बंदोबस्त केला.

याच सुमारास विश्वंभर पंडित हा कलकत्त्यास भोंसल्यांतर्फे इंग्रजांकडे वकील होता. तो इंग्रजांशीं मिळून असल्यामुळें त्याचेविषयीं बेभरंवसा होऊन दुसऱ्या रघूजीनें **बगाजी** रघुनाथ यास त्या कामावर नेमिलें.

---

१ याचे वंशज नागपुरास आहेत.

# भाग ८

# दुसरा रघूजी (पुढें चालू)

## बंगाल सरकार व भोंसले यांचा संबंध[१]

### ( १७६१ ते १८०३. )

पहिल्या रघूजीच्या कारकीर्दीत सांगितल्याप्रमाणें अलीवर्दीखान ( बंगालचा नबाब ) यानें इ. स. १७५५ मध्यें रघूजीस ओरिसा (कटक) प्रांत कायमचा दिला व बंगाल व बिहार या दोन प्रांतांची चौथाई म्हणून दरसाल १२ लक्ष रुपये देण्याचा करार केला. रघूजी दक्षिणेकडील दुसऱ्या भानगडींत गुंतल्यामुळें व पुढें लवकरच (१४–२–१७५५ इ. )[२] मरण पावल्यामुळें त्याला बंगाल्याकडे लक्ष देण्यास फुरसत सांपडली नाही. ओरिसा प्रांतावर भोंसल्यांचा सुभेदार असे व तो त्या प्रांताची व्यवस्था करून बंगाल व बिहार प्रांतांची चौथहि वसूल करीत असे. सुवर्णरेखा नदी ही मोंगल व मराठे यांच्या प्रांतांची ठरलेली हद्द होती व मराठ्यांनी सुवर्णरेखेच्या पलीकडे बंगाल्यांत स्वारी करूं नये अशी या तहाची शर्त होती.

इ. स. १७६१ मध्यें **शिवभट साठे** हा नागपूरकर भोंसल्यांतर्फे कटक प्रांतावर सुभेदार होता. बंगालचा नवाब **मीरजाफर** यास इंग्रजांनी काढून त्याचे जागीं **मीरकासिम** यास बसविलें होतें व त्यास गादीवर बसविलें त्यावेळीं त्याचेकडून जे करार करून घेतले होते त्यांमुळें व इंग्रजांच्या लष्करी सामर्थ्यामुळें **मीरकासिम** हा नांवाचाच नबाब राहिला होता.

खरीखुरी सत्ता इंग्रजांच्याच हातांत आलेली होती. नबाबाची राजधानी **मुर्शिदाबादेस** होती. परंतु इंग्रजांनीं दिवाणीची सनद मिळविल्यावर हळूहळू सर्व कारभार **कलकत्त्यास** नेला. तेव्हांपासून मुर्शिदाबादेचें महत्त्व

---

१ हा भाग मुख्यत्वें Calendar of Persian Correspondence यांतील अस्सल पत्रव्यवहाराच्या आधारानें लिहिला आहे.

२ पे. द. भा. २० ले. ८०.

नाहीसें होत चाललें. पुढें हेस्टिंग्ज यानें आल्याबरोबर (इ. स. १७७२) बंगालच्या मुख्य कचेऱ्या व मुख्य न्यायकोर्ट जें मुर्शिदाबादेस राहिलें होतें तेंहि कलकत्त्यास नेलें व तेव्हांपासून मुर्शिदाबाद शहराचें व नबाबाचें सर्व महत्त्व नाहीसें होऊन कलकत्ता व इंग्रज यांकडे सर्व प्रांताचे डोळे लागले. **हेस्टिंग्ज** कोर्ट ऑफ डायरेक्टरास लिहितो "ही व्यवस्था केल्यामुळें प्रांताची सर्व सत्ता व राज्यकारभार कलकत्त्यास येईल व कलकत्ता ही आतां बंगाल प्रांताची राजधानी समजली जाईल. बंगालच नव्हे तर मागें पुढें तें सर्व आशिया खंडाचें मुख्य शहर होईल." लहान सहान गोष्टींतसुद्धा इंग्रज मुत्सद्यांची किती दूरदृष्टि होती याचें हें एक उदाहरण आहे. हेस्टिंग्जचें हें भविष्य हिंदुस्थानापुरतें तरी लौकरच खरें झालें.

मराठ्यांची लष्करी सत्ता जोंवर जोरदार होती तोंवर बंगाल व बिहार प्रांतांची चौथाई भोसल्यांचे कामदार वसूल करीत. परंतु लष्करी जोर कमी होतांच ती वक्तशीर पटेना. बंगाल्यांत इंग्रजांचा लष्करी जोर हळूहळू वाढतच होता व पानिपतच्या लढाईंत मराठ्यांचा पराजय झाल्यामुळें त्यांचा बोज बराच कमी झाला होता. पानिपतच्या लढाईत नागपूरकर भोंसल्यांचें विशेष नुकसान झालें नाहीं तरीसुद्धां वरील कारणामुळें बंगाल्यावर एकदम स्वारी करून चौथ वसूल करणें ही गोष्ट पूर्वींइतकी सोपी राहिली नव्हती.

तरीपण मराठे व इंग्रज हे दोघेहि एकमेकांस भीत व उघडपणें एकमेकांशीं वैर संपादन करण्याची दोन्ही पक्षांस भीति वाटत असे. त्यामुळें भोंसले व त्यांचे सुभेदार इंग्रजांस चौथाईबद्दल मध्यस्थी करण्यास सांगत व ते कधीं आपल्या आंगाबाहेर टाकीत तर कधीं नबाबातर्फे अनेक अडचणी दाखवून तो प्रश्न लांबणीवर टाकीत.

शेवटीं इ. स. १७६१ सालीं **शिवभटानें** बंगाल्यावर स्वारी करून **मिदनापुरावर** हल्ला केला. तेथें **जॉनस्टन** नांवाच्या अधिकाऱ्याच्या हाताखालीं इंग्रजी सैन्य होतें. त्याचे मदतीस कलकत्त्याहून कांहीं सैन्य गेलें व मुर्शिदाबादेवर मराठे हल्ला करतील म्हणून तिकडेहि कांहीं इंग्रजी सैन्य **कॅ. नॉक्स** याचे हाताखालीं रवाना झालें. बंगाल्यांत याच

वेळीं मराठे व इंग्रज यांचे शक्तींची तुलना व्हावयाची परंतु **शिवभट** लवकरच परत गेला.

इंग्रजांनीं बंगालचे नबाबाची त्यांना सोईस पडेल त्याप्रमाणें उलथापालथ केल्यानंतर इ. स. १७६५ मध्यें **शहाअलम** नांवाच्या नामधारी बादशहाकडून बंगाल, बिहार व ओरिसा यांच्या दिवाणीची सनद मिळविली. त्यामुळें बंगाल्यांत त्यांचा चांगलाच जम बसला व त्यांच्या अधिकारास कायदेशीरपणा आला.

वरील सनदेंत जरी ओरिसा प्रांत लिहिला होता तरी तो नांवाचाच होता. कारण **अलीवर्दीखानाच्या** तहापासून तो प्रांत प्रत्यक्ष मराठ्यांच्या ताब्यांत होता. तरी त्यास बादशाही मान्यता नसल्यामुळें व अलीवर्दीखान हा कागदोपत्रीं तरी बादशहाचा सुभेदार (नाजिम) असल्यामुळें त्यास तो प्रांत दुसऱ्यास देण्याचा हक्क नव्हता अशी तक्रार पुढेंमागें करतां येण्याजोगी होती व या गोष्टीचा फायदा घेण्याचा पुढें इंग्रजांनीं प्रयत्न केलाहि.

बंगाल व मद्रास या दोन्ही प्रांतांत याप्रमाणें इंग्रजांचा चांगला जम बसलेला होता. तसाच उत्तर-सरकार हाहि प्रांत निजामाकडून इंग्रजांस इ. स. १७५९ मध्यें मिळाला होता. त्यामुळें सर्व पूर्वकिनाऱ्यावरून मद्रास ते कलकत्ता पावेतों जाण्यास फक्त कटक प्रांत परकीय मुलूख म्हणून आडवा येत होता व तो मराठ्यांच्या ताब्यांतून आपले ताब्यांत आल्यास खुष्कीनें बंगाल्यांतून मद्रासकडे सैन्य पाठविणें त्यांना फार सोईचें होतें. म्हणून या प्रांतावर इंग्रजांचा डोळा होता.

**मीरकासिम** हा नांवाचा नबाब होता परंतु बंगालचा खराखुरा कारभार इंग्रजांकडे १८६५ चे पूर्वींच आला होता. प्रथम प्रथम इंग्रज व शिवभट यांचा बेबनाव नव्हता. परंतु इ. स. १७६१ मध्यें वर सांगितल्याप्रमाणें शिवभटानें बंगाल्यावर स्वारी केल्यामुळें मराठ्यांना कटक प्रांतांतून घालविल्याशिवाय आपणांस सुरक्षितपणा नाहीं हें इंग्रजांच्या लक्षांत आलें व त्यांनीं **मीरकासिम** यास मराठ्यांवर स्वारी करण्याची चिथावणी देणें सुरू केलें.

दिसेंबर १७६१ मध्यें **मीरकासिम** यानें **मीर अलीखान** नांवाच्या

सरदारास शिवभटावर पाठविलें व कलकत्तेकर गव्हर्नर ( **व्हॅन्सिटार्ट** )[१] यानें मेजर **कारनॅक** यास मीरकासिमाच्या सैन्याच्या मदतीस पाठविलें. दोन्ही लष्करांनीं शिवभटास कटक प्रांतांतून काढून लावावें असें ठरलें. वरील विचार नक्की करण्याकरितां **कर्नल कूट** व **हेस्टिंग्ज**[२] यांनीं मीरकासिमाचे भेटीस जावें व मीरकासिमातर्फे त्याचा एक नायबहि मे० कारनॅकबरोबर पाठवावा अशी गव्हर्नरानें व्यवस्था केली. कटकप्रांत घेतल्यानंतर त्या नायबास तेथें अधिकारावर ठेवावें, येथपर्यंत या कारस्थानाची मजल गेली. कटक प्रांत घेतल्यानंतर बंगाल, बिहारची चौथहि द्यावी लागणार नाहीं व मराठ्यांच्या बंगाल्यावरील स्वाऱ्याहि आपोआप थांबतील अशी आशा इंग्रज गव्हर्नरानें **मीरकासिमास** दाखविली. ता. १६-१-१७६२ चे पत्रांत इंग्रज गव्हर्नर **मीरकासिम** नवाब यास लिहितो.

" तुमचें पत्र आलें. त्यांत कटकवरील स्वारी संबंधानें गव्हर्नरचें मत काय आहे असें तुम्ही विचारलें. मराठ्यांस योग्य संधि सांपडतांच ते खात्रीनें बंगालवर स्वारी करतील. हल्लीं ते तीन वर्षाची चौथाईची बाकी मागतात. ती न देण्यानें जें लढाईचें निमित्त मराठ्यांना मिळणार तेंच आपण कटक प्रांतावर स्वारी करून तो आपल्या सुभ्यास जोडण्यानें मिळणार व आपल्या सुभ्याचाच वास्तविक कटक प्रांत हा एक भाग आहे. **कटक** मराठ्यांच्या ताब्यांतून गेल्यावर त्यांना बंगालमध्यें उठल्याबसल्या स्वाऱ्या करणे सोपें राहणार नाहीं. शेजारचा प्रांत त्यांच्या ताब्यांत ठेवणें अगर त्यांना पैसे देणें म्हणजे त्यांना आपल्या मागण्या वाढविण्यास व स्वाऱ्या करण्यास जास्त ताकद देणें असें आहे. म्हणून आमची तुम्हांस अशी सल्ला आहे कीं तुम्ही चौथ देणें अगदीं बंद करा. तुमचे दरबारी मराठ्यांचे जे वकील आहेत त्यांना संभावितीनें जाण्यास सांगा व कटकप्रांत एकदम हस्तगत करा. **जानोजी** भोंसल्याकडून कांहीं विशेष प्रतिकार होणार नाहीं परंतु त्यानें कांहीं खटपट केलीच तर तुमचें व आमचें लष्कर मिळून मराठ्यांना मागें हटविण्यास पुरेसें होईल.

१ क्लाईव्ह हा मध्यंतरी विलायतेस गेला तेव्हां हा गव्हर्नर होता.
२ भावी गव्हर्नर जनरल.

आमचें इंग्रजी लष्कर बरेच दिवसांपासून कटक प्रांतावर जाण्याकरितां दारूगोळा व सामानसमान तयार करून सज्ज आहे. तुम्ही हजार दोन हजार स्वार व पायदळ पाठवा. कटक प्रांताचा कारभार पाहण्याकरितां एक नायब पाठवा. कटक प्रांत मिळाल्यामुळें ज्या अर्थी तुमच्या सुभ्याचें उत्पन्न बरेंच वाढेल त्या अर्थी पूर्वी ठरल्याप्रमाणें इंग्रजी सैन्याचा सर्व खर्च तुम्ही देण्याबद्दल व्यवस्था करावी." [१]

इकडे हे बेत चालू असतां **शिवभटाकडून** चौथाईबद्दल मागण्या चालूच होत्या. नबाबास फूस मिळाल्यामुळें तो कांही देईना. शेवटीं **शिवभटानें** फेब्रुवारी १७६२ मध्यें इंग्रज गव्हर्नरास पत्र लिहिलें कीं, नबाबाकडून चौथाईची रक्कम न आल्यास बंगाल्यावर लष्कर रवाना होईल. एकदा **शिवभटानें** अशीहि इच्छा दर्शविली कीं, इंग्रज ज्या अर्थी नबाबाचे सल्लागार आहेत त्या अर्थी इंग्रज गव्हर्नरानेंच याबद्दल मध्यस्थी करावी. परंतु ही गोष्ट इंग्रजांस इष्ट नसल्यामुळे या बाबतींत आमचा संबंध नाहीं असें इंग्रजांनीं उत्तर दिलें.

याच वेळीं हें प्रकरण लढाईवर यावयाचें. परंतु मीरकासिमानें इंग्रजांचें धोरण ओळखलें व इंग्रजी खर्चाचें व कर्जाचें पिलूं आंत शिरल्यास नवीन मुलूख मिळण्याचें तर दूरच परंतु आपलाच मुलूख कर्जात जाईल या भीतीनें त्यानें सांगितलें कीं, कटक प्रांत घेतल्यास एखादा दुसरा परगणा आम्ही तुम्हांस देऊं. तुमचा लष्करी खर्च देणार नाहीं. लष्करी मदत जेथें लागेल तेथें देण्याचा तुमचा आमचा करार आहे. त्यांवर इंग्रजांनीं उत्तर दिलें कीं कटक प्रांत हा फार दिवस मराठ्यांच्या ताब्यांत असल्यामुळें आतां नवीन मुलूख जिंकून घेण्यासारखेंच होणार. म्हणून तो मामुली बंदोबस्ताच्या सदरांत येत नाहीं व एकंदर ५–६ लक्ष रुपयांचा खर्च या मोहिमेबद्दल द्यावा लागेल. नबाबास खर्चाचा बोजा अधिक वाटल्यामुळें त्यानें माघार घेतली व ही मोहीम करण्याचें मागें पडलें. याप्रमाणें गव्हर्नराचा प्रयत्न मराठे व नबाब यांजमध्यें लढाई घडवून आणण्याचा चालला असतांनासुद्धां शिवभटाशीं व नागपूर दरबारशींहि वरवर दोस्तीचें नातें चालूच होतें. एवढेंच नव्हे तर नागपुरास **शिवभटाचे** हाताखालचे

1 Calendar of persian correspondence Vol. I.

लोकांतहि गव्हर्नराचा पत्रव्यवहार चालूच होता. शिवभटाच्या हाताखालचे **रखमाजी** जाचक, **मुकुंदराव** व नागपुरचे **दिवाकरपंत** यांचेशीं इंग्रजांचा पत्रव्यवहार जागोजाग सांपडतो. बंगालचे बरद्वान, मिदनापूर व चितगांग हे जिल्हे मिरकासिमास इंग्रजांनीं सुभेदारी मिळवून दिली त्यावेळीं त्यानें इंग्रजांस दिले होते व तेथें त्यांचा प्रत्यक्ष अंमल होता व नंतर बंगाल बिहारचीहि दिवाणीची सनद बादशहाकडून मिळाल्यामुळें सर्व बंगालची खरी सत्ता इंग्रजांचेच हातीं आली होती. या परिस्थितीमुळें **शिवभट** यानें **बलसोर** येथें आपल्या पूर्ण भरंवशाचा मनुष्य असावा म्हणून आपला भाऊ **भास्करराव** यास नेमलें. बलसोर जिल्हा हा मिदनापुर जिल्ह्यास लागून असून शिवाय तें एक महत्त्वाचें बंदर असल्यामुळें शिवभटास ही खबरदारी घ्यावी लागली. बलसोर येथें युरोपांतील जहाजें उतरत असत.

एक वेळां असेंच एक तारूं या किनाऱ्यावर फुटून कांहीं माणसें व माल बुडाला व कांहीं माणसें वांचलीं तीं **पुरुषोत्तम**[१] येथील जमीनदारानें अडवून ठेविलीं. शिवभटास हें समजतांच त्यानें आपलीं माणसें पाठवून त्यांची योग्य व्यवस्था ठेविली व इंग्रज एजंटाच्या बरोबर तीं कलकत्त्यास रवाना केलीं. तसेंच कलकत्तेकरांचा मद्रासशीं सर्व पत्रव्यवहार कटक प्रांतामधून होत असल्यामुळें जासुदास परवाने देणें व कित्येक वेळां आपले माणसांकडूनहि पत्रें पुढें पोंचविणें वगैरे मामुली कामें शिवभटाचे अधिकाऱ्यांमार्फत होत असत. याप्रमाणें दोन्हीही पक्ष शिष्टाचार पाळून एकमेकांस वरवर लोभ दाखवीत. परंतु आंतून दोघांचाहि प्रयत्न एकमेकांस फसवून आपला मतलब साधण्याचा असे. शिवभट हा पुढें सुभेदारीवरुन निघाल्यानंतरहि त्यानें नबाबाकडे स्वतंत्रपणें व इंग्रजांमार्फत चौथाईची मागणी केली. परंतु तो कामावर असतांना सुद्धां ही रक्कम न देण्याची सल्ला इंग्रज नबाबास देत होते ते त्यास कामावरून काढल्यानंतर थोडेच देवविणार.

जानोजीसहि अनेक सबबी दाखविण्यांत आल्या. शेवटीं **जानोजीनें मसलुद्दीन** नांवाचा आपला वकील गव्हर्नराकडे पाठविला ( जुलै १७६१ ).

---

१ जगन्नाथपुरी.—जगन्नाथास पुरुषोत्तम पुरी अथवा नुसतें पुरी असेंहि नांव आहे.

व त्यानें त्यास मीरकासिमाकडे पाठविलें तरी चौथाईचा निकाल लागला नाहीं.

इ. स. १७६३ मध्यें मीरकासिम व इंग्रज यांचें युद्ध सुरू होऊन इंग्रजांनी पुन्हां **मीरजाफर** यास नबाब केलें. या युद्धांतहि शिवभट यानें इंग्रजांस लष्करी मदत पाठवितों म्हणून लिहिले. परंतु मराठ्यांवर इंग्रजांचा विश्वास नव्हता व त्यांना बंगालमध्यें येऊं देणें त्यांना धोक्याचें वाटलें म्हणून त्यांनी ती मदत नाकारली. मीरकासिमानें नागपुरास वकील पाठवून जानोजीस मदत मागितली होती व पुष्कळ रक्कम देण्याचें कबूल केलें. परंतु त्यास नागपुराहून मदत मिळाली नाही. जानोजीने व शिवभटानें इंग्रजांविरुद्ध आलेली ही संधि विनाकारण गमावली. याच वेळेस माधवराव पेशव्याकडूनहि कर्नाटकच्या स्वारीकरितां सैन्य पाठविण्याबद्दल मागणें आलें होतें परंतु जानोजीनें मीरकासिमाचा वकील आला होता त्याच्या मदतीस बंगाल्यांत सैन्य पाठविणें आहे या सबबीवर तिकडेहि मदत पाठविली नाहीं. जानोजीनें यावेळीं मीरकासिमाच्या मदतीस सैन्य पाठविलें असतें अगर आपण मदत करतों असें दाखविलें असतें तर त्याचा चौथाईचा प्रश्न तेव्हांच सुटला असता.

यानंतर जानोजीनें आपला मुलगा चिमणाबापू यास ओरिसाचे सुभेदारीवर नेमलें. तो ओरिसांत आल्यानंतरहि (इ. स. १७६४) बादशहा, वजीर व मीरकासिम यांनीं एकत्र होऊन मीरजाफर व इंग्रज यांजविरुद्ध युद्ध चालविलें. त्यावेळीं जानोजीनें मीरकासिमास मदत न करितां उलट इंग्रजांस मदत करण्याकरितां ५००० सैन्य पाठविलें. चिमणाबापूनें तुमचे मदतीकरितां सैन्य पाठवितों असें गव्हर्नरास लिहिलें. परंतु गव्हर्नरानें तुमचे सैन्याची जरूर नाहीं, आमचेजवळ पुरेसें सैन्य आहे. मदत लागल्यास तुम्हांस मागूं असें कळविलें. एकंदरींत दोन्ही पक्ष एकमेकांस भीत होते व दोघांचे एकमेकांविरुद्ध डावपेंच चालू होते व एकमेकांशी उघड लढाई करण्याची मात्र कोणाचीहि हिंमत नव्हती.

जानोजीनें चिमणाबापूबरोबर भवानीपंत काळू हा कसलेला योद्धा ओरिसांत पाठविला होता. त्यास ओरिसा प्रांतांत पाठविण्याचा मुख्य उद्देश बंगालची चौथाई वसूल करणें हा होता. मराठ्यांना कळून चुकलें

होतें कीं, सर्व किल्ली इंग्रज गव्हर्नराच्या हातांत आहे म्हणून नागपूर दरबार व ओरिसांतील मराठे अधिकारी इंग्रज गव्हर्नरास कधीं आपल्या दोस्तीची आठवण देऊन तर कधीं स्वारी करण्याचा धाक दाखवून चौथाईची बाकी मागत. परंतु सुरळीतपणें या प्रश्नाचा निकाल लागूं देणें इंग्रजांच्या फायद्याचें नव्हतें. कटक प्रांत आपल्या ताब्यांत येईल अशी परिस्थिति इंग्रजांस निर्माण करावयाची होती.

मराठ्यांच्या धरसोडीच्या वर्तनानें हा प्रश्न लवकर सुटण्याऐवजी इंग्रजांच्या लांबवालांबवीमुळें तसाच गुंतून राहिला. याच सुमारास हिमतीनें मराठ्यांनीं बंगाल्यांत एकदम लष्कर घालून हा प्रश्न सोडविला असता तर त्यांच्या फायद्याचें झालें असतें; परंतु जसजसे दिवस जास्त होत चालले तसतसे इंग्रज जास्त प्रबळ होत चालले व मराठ्यांच्या अतिसावध वर्तनानें त्यांचें पाणी इंग्रजांनीं ओळखिलें. मराठ्यांना चौथाई मिळूं द्यावयाची नाहीं असें धोरण ठरलेलें असतांनासुद्धां गव्हर्नर मराठ्यांना गोड गोड थापा देतच होता. परंतु मराठ्यांनीं जोर केल्यास त्यांच्याशीं लढण्याचा निश्चय व तयारी त्यांचेकडून नेहमीं होतीच. जोंपर्यंत कागदी व वकीलामार्फतच मागणी चालू होती तोंपर्यंत इंग्रजांनीं तरी कां भ्यावें?

सप्टेंबर १७६४ मध्यें जानोजीनें गव्हर्नरास पुढील पत्र लिहिलें."इंग्रजांचा व्यवहारांतील प्रामाणिकपणा व लढाईंतील शौर्य प्रसिद्ध आहे. चालू युद्धांत त्यांच्या पराक्रमाबद्दल आणखी प्रमाण मिळालें आहे. अशा लोकांशी स्नेह जोडण्याची आमची फार इच्छा आहे म्हणून **मीरकासिम** यानें गेल्या युद्धाचे वेळी आमचेकडे त्याचीं विश्वासू माणसें पाठवून व आम्हास पुष्कळ लालूच दाखविली असतांहि आम्ही अशा कपटी माणसाची साथ केली नाहीं. आमचेकडून आतां रघुनाथ पंडित हे अत्यंत विश्वासू व शहाणे गृहस्थ तुमच्याकडे पाठविले आहेत. तरी चौथाईची थकलेली बाकी देण्याची तजवीज करावी." वरील पत्रास धमकीचाहि जोर असावा म्हणून **भवानी काळू** यानें गव्हर्नरास पत्र लिहिलें कीं, " चौथाईचा प्रश्न लष्कराच्या जोराशिवाय आजपर्यंत निकालांत लागला नाहीं. तरी बंगाल्यांत लष्करासुद्धां मी येत आहें कारण लष्करी खर्च वाढत असून लष्कर त्रास देत आहे.

तशींच पत्रें नबाबासहि गेलीं परंतु कलकत्त्यास गेलों म्हणजे गव्हर्नराच्या सल्लेनें हुंड्या पाठवूं असा त्याचा जबाब आला व गव्हर्नरानें जानोजीस पत्र लिहिलें कीं, "लढाईमुळें मुलूख खराब झाल्यामुळें चौथाईचा प्रश्न पुढें ढकलणें भाग आहे तरी तो लवकरच निकालांत लावण्याची खटपट करूं."

**भवानी काळूनें** ओरिसांतून आपलें सैन्य हलवून हरिहरपुर व निलगिरी येथील जमीनदारांस शिक्षा करण्याच्या निमित्तानें तें तिकडे नेलें. हे जिल्हे बंगाल्यांतील मिदनापुर व बरद्वान या इंग्रजी जिल्ह्यांस लागून असल्यामुळें इंग्रजांस संशय येऊन त्यांनीं तिकडे लष्कर पाठवून बंदोबस्त केला. भवानीपंतानें मात्र इंग्रजांस तुम्ही भिण्याचें कारण नाही,आम्ही बंगाल्यावर स्वारी करीत नाहीं असें आगाऊ कळविण्यास कमी केलें नाही (दिसेंबर १७६४). तसेंच आपल्या मनाचे निर्मळपणाबद्दल गव्हर्नराची खात्री करण्याकरितां **महमद यारखान** नांवाच्या एका गृहस्थानें इंग्रजांविरुद्ध त्यास लिहिलेलें एक पत्रहि भवानीपंतानें गव्हर्नराकडे पाहण्यास पाठविलें. परंतु गव्हर्नरास खुष राखण्याकरितां जितके जास्त प्रयत्न करण्यांत आले तितका जास्त विपरीत परिणाम इंग्रजांच्या मनावर झाला असावा व वस्तुस्थितीहि अशीच दिसते कीं, इंग्रजांच्या मुलखावर हल्ला करण्यास मराठे भीत असावेत. नाहींतर इतक्या मिनतवारीनें त्यांनीं आपली मागणी केली नसती. खुद्द **जानोजीनें** कलकत्त्याच्या गव्हर्नरास लिहिलेलें निराशेचें पत्र पहा:—

"युरोपियन लोकांची प्रामाणिकपणाबद्दल सर्वत्र ख्याति आहे आणि म्हणूनच इंग्रजांचा सर्वत्र विजय होत आहे. इंग्रजांनीं मीरजाफरास हातीं धरलें तेव्हां मिरकासिम व वजीर हे आपलें जडजवाहीर व सामान घेऊन आमचेकडे आले तेव्हां गव्हर्नरानें आम्हांस लिहिलें कीं, 'तुम्ही त्यास साह्य होऊं नका. आम्ही मीरजाफराकडून तुमची चौथाईची रक्कम देववितों.' या वचनावर विश्वास ठेवून मीरकासिमानें आपल्या विश्वासू वकिलाबरोबर पाठविलेला नजराणा व तीस लाख रुपयांच्या हुंड्या आम्हीं परत केल्या. तसेंच शमसुद्दौला बहादुर (गव्हर्नर व्हॉन्सिटार्ट) यांच्या वचनावर विश्वास ठेवून आमच्या ओडिसांत

पाठविलेल्या सात हजार लष्करास आम्हीं सक्त हुकूम सोडले कीं, इंग्रजांच्या मुलखास मुळींच उपसर्ग देऊं नका. आतां लढाई संपून इंग्रजांना जय मिळाला, बंगाल्यांत सर्वत्र स्थिरस्थावर झालें, आमचा वकील **रघुनाथ पंडित** हा कलकत्त्यास जाऊन दोन वर्षे होत आली तरी अजून दोन लाख रुपये सुद्धां आमच्या पदरांत पडले नाहींत. हा वचनभंग नव्हे तर काय? आम्ही व आमचे दोस्त व आप्त मिळून काम पडल्यास तुमच्याकरितां एक लाख सैन्य तुमच्या मदतीस देऊं अशी हिंमत बाळगतों. त्याचा हा मोबदला काय? आज बारा वर्षें सतत श्रम करून व सुमारें पन्नास हजार माणसें व बावीस निवडक सरदार[1] खर्ची पाडून आम्हीं बंगाल्यावरील आमचा हक्क कायम केला आहे तो आम्ही आमचे कुडींत प्राण आहे तोंवर सोडणार नाही. परंतु आम्हास मोठी लाजिरवाणी गोष्ट ही आहे की, आम्हीं इंग्रजांच्या दोस्तीच्या पत्रांवर भरंवसा ठेविला व त्यांच्या म्हणण्याप्रमाणें चौथाईची रक्कम मिळेल अशी अशा बाळगली, तसेंच मीरकासिमास मदत न करण्याबद्दल पत्र आलें त्याप्रमाणेंहि वागलों. दोस्तीच्या नांवाखालीं असा वचनभंग झाला तर काय उपाय ? वचनभंग करणें हें इंग्रजांच्या नेहमींच्या वर्तनास शोभणारें नव्हे. म्हणून वाटतें की या गोष्टीस दुसरीं कांहीं कारणें असतील. परंतु लढाई आतां बंद झालेली आहे म्हणून रघुनाथ पंडितास पूर्वीं कबूल केल्याप्रमाणें रकम पावती करावी अगर आम्हास परवानगी द्यावी म्हणजे आम्हास सुचेल त्या रीतीनें आम्ही ती वसूल करून घेऊं. मग आमचें दक्षिणी लष्कर व बंगाल मिळून पाहून घेऊं. परंतु तुमचे परवानगीशिवाय मात्र आम्हास असें करतां येत नाहीं." इंग्रजांनीं मराठ्यांचें पाणी या वेळी चांगलेंच ओळखलें होतें असें दिसतें. वरील मिन्नतवारीचा व धमकीचा कांहींच परिणाम झाला नाहीं व यानंतर लवकरच ( इ. स. १७६६ ) हैदरअली विरुद्ध निजाम, पेशवे व इंग्रज यांची एकजूट झाली. त्यामुळें हें प्रकरण तसेंच मागें पडलें.

---

१ भास्करराम कोल्हटकराचा व त्याचे बरोबरच्या बावीस सरदारांचा अलीवर्दी खानानें दग्यानें खून केला त्यास अनुलक्षून.

शिवभटानें कटक प्रांताच्या उत्पन्नाचा हिशोब बरोबर न दिल्यामुळें जानो-जीनें त्यास सुभेदारीवरून काढून टाकलें ( इ. स. १७६१ एप्रील ); परंतु शिवभट गोडीनें तावा सोडीना. त्यानें बंडखोरी सुरू केली व कटक प्रांतां-तील जमिनदारांस चिथावणी दिली. ओरिसा व संबळपुरचे बरेचसे जमीन-दार त्यास साहृच होते. त्यामुळें तो कसाबसा इ. स. १७६४ पर्यंत तिकडे टिकाव धरून होता. यामुळें ओरिसा प्रांतांत सर्वत्र बंडाळी सुरू झाली. मागें सांगितल्याप्रमाणें **जानोजीनें चिमणाबापूस** सुभेदारीवर नेमून मुलखाचे बंदोबस्ताकरितां **भवानीपंत काळू** यास पाठविलें. भवानीपंतानें शिव-भटाचा मोड करून त्यास कटक प्रांतांतून हाकून लावलें. शिवभट पळून कलकत्त्यास गेला, तो इंग्रज व नबाब यांचे आश्रयास राहिला. भवानीपंतानें इंग्रजांस लिहून तो सांपडल्यास त्यास कैद करावें असें लिहिलें. परंतु इंग्र-जांनीं त्यास न पकडतां तेथेंच राहूं दिलें असें दिसतें. कारण पुढें झैनुला-बिद्दीन हा इंग्रजांचा वकील नागपुरास गेला तेव्हां त्यानें राजाजवळ ही गोष्ट कबूल केली व तो आमचे आश्रयास आहे असें सांगितलें. कटक प्रांत नद्या व जंगल यानें भरलेला. त्यामुळें शामजी नांवाच्या जमीनदारानें आपल्या दोन किल्ल्यांत मजबुती करून भवानीपंताशीं युद्ध चालविलें. भवानी पंतानें त्याच्या मुलखावरहि स्वारी करून त्याचे किल्ले घेतले व त्यास त्याच्या कुटुंबासुद्धां कैद केलें व त्याचा पूर्ण मोड केला. शामजीचा मोड होतांच त्याला मिळालेल्या इतर जमीनदारांनीहि भवानीपंताचा अधिकार मान्य केला व सर्व प्रांताचा बंदोबस्त झाला. यावेळीं भवानीपंतास मदत करण्याकरितां कलकत्त्याचा गव्हर्नर लॉर्ड क्लाईव्ह यानें कटक प्रांतांत इंग्रजी सैन्य पाठविलें व त्याप्रमाणें नागपुरास जानोजीस कळविलें. तसेंच मीरझैनुलाबिदीन नांवाचा आपला वकील नागपुरास जानोजीकडे रवाना केला. त्यांत चौथाईच्या रकमेचा निकाल करण्याची बाब ही दाखविण्या-पुरती होती. परंतु मुख्य गोष्ट म्हणजे जानोजीकडून मक्त्यानें अगर कसातरी कटक प्रांत मिळविणें ही मुख्य गोष्ट होती. इंग्रजांनीं ज्या-प्रमाणें आपला वकील नागपुरास पाठविला त्याचप्रमाणें जानोजीनेंहि

उदेपुरी[१] गोसाई यास आपला वकील म्हणून कलकत्त्यास इंग्रज गव्हर्नराकडे पाठविलें. ज्या प्रमाणें इंग्रजांचा उद्देश कटक मिळविणें हा होता तसाच जानोजीचा उद्देश बंगाल्याची चौथाई मिळविणें हा होता व याप्रमाणें दोन्ही पक्षांनीं आपापल्या वकिलांस सूचना देऊन ठेविल्या होत्या. इ. स. १७६७ च्या फेब्रुआरी महिन्यांत उदेपुरी हा कटक प्रांतांत आला व लॉर्ड क्लाईव्ह यानें कलकत्त्यास निघून येण्याबद्दल ता. २३–२–१७७७ रोजीं त्यास पत्र लिहिलें.

इकडे इंग्रजांचा वकील मीर झैनुलाबिद्दीन हाहि दरमजल करीत जात असतां मध्यें तीनचार जमीनदारांनी त्यास लुटलें व मोठ्या प्रयासानें तो रामटेक येथें येऊन पोहोंचला व ता. २५-१२-१७६६ रोजीं नागपुरास आला. लॉर्ड क्लाईव्ह यानें प्रथम उदेपुरी यास लिहिलें होतें कीं झैनुलाबिद्दीन

१ उदेपुरी गोसावी हा साताऱ्याच्या बनसीगीर गोसाव्याचा चेला होता. हा मठ हल्लीं मोडकळीस आलेला साताऱ्यास कायम आहे. त्या मठाचे महंत फार श्रीमंत असून सर्व मराठी संस्थानांत सावकारी करीत. त्याचप्रमाणें उदेपुरी हा नागपुरास आला. सावकारी करतां करतां तो वकिली करूं लागला व पुढें कलकत्तेकर इंग्रज व भोंसले यांचेमध्यें सर्व महत्त्वाच्या उलाढाली याचे मार्फत होऊं लागल्या.

या मठाच्या शाखा तळेगांव-दाभाडे व नागपुर येथें होत्या. नागपुरास उदेपुरी हा महंत होता. त्याचेनंतर त्याचा चेला जीवनपुरी हा नागपुरच्या मठावर राहिला. एकदां एका वेश्येच्या घरावर जीवनपुरीनें गर्दी करून तेथें खून केल्याचा आरोप आला. त्यावरून दुसऱ्या रघूजीनें त्याच्या घरावर शिपाई पाठवून त्यास पकडून त्याचें सर्व घर लुटून आणलें व आपले स्वतःचे साडेतीन लक्षांचे रोखे लुटून आणले (शके १६७२) व जीवनपुरीस आंबागडचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. साताऱ्याचे मठानें साताऱ्याहून छत्रपतीचें ताकीदपत्र नागपुरकरांस पाठविल्यावर त्याची सुटका झाली. कर्जमुक्त होण्याची ही एक चांगलीच युक्ति होती. या गोसाव्याचें नैतिक वर्तन चांगलेंसें नव्हतें. उदेपुरी हा रांडा ठेवतो अशा तक्रारी नागपुराहून त्याचा गुरु बनसीपुरी यास साताऱ्यास गेल्या होत्या.

(भा इ. मंडळांतील अप्रकाशित पत्रें नं.६८४१–६८७५–६८७८)

परत आल्यावर त्याचेबरोबरच तुम्हीं यावें; परंतु उदेपुरी कटकांत निघून गेल्यामुळें वर लिहिल्याप्रमाणें उदेपुरीस त्यानें कलकत्त्यास बोलाविलें व तो कलकत्त्यास जाऊन तेथें मुक्काम करून राहिला.

उभय पक्षांचे हेतु जानोजीनें लॉर्ड क्लाईव्ह यास लिहिलेल्या पुढील पत्रावरून स्पष्ट दिसतात:—

"पूर्वीं इंग्रजांची पत्रें आम्हांस आलीं कीं हीं पत्रें बंगालच्या चौथाईबद्दल जामीन म्हणून समजलीं जावीं व आम्ही मीरकासिमास मदत करूं नये व मीरजाफर यास त्रास देऊं नये. त्या पत्रांमुळें व इंग्रजांशीं आम्हांस दोस्ती ठेवावयाची असल्यामुळें मीरकासिमानें आम्हांस पाठविलेल्या हुंड्या व रकमा आम्ही नाकारल्या व त्यानें कटकप्रांतांत आम्हांस आश्रय द्या म्हणून आमची विनवणी केली तीहि आम्हीं मान्य केली नाहीं. इंग्रजांच्या या भलावणी पत्रावर आम्ही नागपूरच्या सावकारांकडून वीस लक्ष रुपये कर्ज काढलें व बंगाल्यावर पाठविलेल्या लष्कराचा पगार दिला. परंतु दोन वर्षें होऊन गेलीं तरी अझून पैसा आला नाही. इतकें झालें तरी इंग्रजांस धक्का पोहों-चेल असें वर्तन आम्हीं केलें नाही. आतां आम्हांस आनंद होत आहे कीं ही चौथाईची बाब मिटविण्याकरितां तुम्ही आमचेकडे वकील पाठविला आहे. बंगाल प्रांत सधन असल्यामुळें मोठ्या रकमासुद्धां सहज देतां येतात तरी तुम्ही उदेपुरी याजबरोबर शक्य तितकी रक्कम रवाना करावी. आम्ही रघुनाथराव पेशवे यांच्या मदतीकरितां नर्मदेच्या बाजूस जात आहों. तेथेंच उदेपुरीच्या हातानें आमचेकडे रक्कम रवाना केल्यास आम्हांस फार आनंद होईल. आपला वकील अद्याप येथें येऊन पोहोंचला नाहीं. तो आतां येऊन न येऊन सारखाच. कारण उदेपुरीमार्फत सर्व गोष्टींचा निकाल होईलच. उदे-पुरी ज्या ज्या गोष्टी ठरवील त्या त्या आम्हांस कबूल आहेत. तुमचे पत्रांत मजकूर कीं, 'आपणा दोघांचे शत्रु व मित्र एकच असल्यामुळें आम्ही तुमचे मदतीकरितां शिवभटावर लष्कर पाठविलें व त्याचा खर्चहि आम्ही तूर्त मागत नाहीं पुढें चौथाईच्या हिशेबांत पाहून घेऊं. तसेंच कटक प्रांतासंबंधीं आमचा वकील तुम्हांस सांगेल व तें जर तुम्हांस पसंत न पडलें तर कट-कचा नाद सोडून देऊं. आम्हांस फक्त तुमच्या दोस्तीची जरूर आहे.' हें वाचून तर आम्हांस फारच आनंद झाला व बंगालसंबंधाची आमची काळजी

दूर झाली. आम्हांस पाहिजे तसा शूर व सच्चा दोस्त आम्हांस आतां मिळाला. सध्यां **शिवभटास** आमच्या लष्करानें पूर्णपणें घेरलें आहे तरी आम्हीं भवानीपंडितास लिहिलें आहे कीं, इंग्रजांचें लष्कर आमचे मदतीस येईल तर त्यांच्याशीं दोस्तीच्या नात्यानें वागून ते व तुम्ही मिळून **शिवभटाचा** मोड करावा व यापूर्वींच शिवभटाचा पूर्ण मोड झाला असल्यास तुम्ही इंग्रज सरदारास स्वतः भेटावें व त्यांना परत पाठवावें. कटक प्रांताचें उत्पन्न थोडें असल्यामुळें आमच्या लष्कराचा बोजा त्या प्रांतास सहन होणार नाहीं. म्हणून हें काम होतांच **भवानीपंतानें** तेथून तळ उठवून रघुनाथरावाच्या मदतीस परभारेंच जावें असें आम्ही त्यास कळविलें आहे. तुमचा वकील आल्यावर त्याचें व आमचें काय बोलणें झालें हें तुम्हांस कळवूं. परंतु तुमची व आमची आतां दिलजमाई झाल्यामुळें दुसरे वकिलाची जरूरी राहिली नाहीं. उदेपुरी एकटा या कामास पुरेसा आहे. तो ठरवील तें दोघांनाहि मान्यच राहील. आतां तुम्ही व आम्ही एकच असल्यामुळें जें जें आमचें आहे तें तें तुमचेंच आहे व तुमचें तें आमचें आहे. यामुळें आमचा **कटकचा** सुभेदार हा तुमचा नायबच आहे असें समजावें. तो तुमच्या इच्छेनुरूप वर्तन करील."

इ. स. १७६७ च्या मार्च महिन्यांत **झैनुलाबिद्दीन** यास नागपुराहून रवाना केल्याबद्दल **उदेपुरी** गोसाव्यानें गव्हर्नरास कळविलें व तो लौकरच येईल व नंतर सर्व बाबीचा कलकत्त्यास निकाल होऊन इंग्रज व नागपुरकर भोंसले यांचा कायमचा दोस्तीचा तह होण्याचें ठरलें. उदेपुरी हा तोंपर्यंत कटक प्रांतांत **झैनुलाबिद्दीन** येण्याची वाट पहात बसला होता.

**झैनुलाबिद्दीन याची वकिली (१७६७ इ.)**—ता. २७–१–१७६७ रोजी **जानोजीनें झैनुलाबिद्दीन** यास जाण्यास निरोप दिला व ता. २९ रोजीं आपण परत कलकत्त्यास जाण्याकरितां निघणार म्हणून या वकीलानें **लॉर्ड क्लाइव्ह** यास पत्र लिहिलें. त्यांत त्यानें आपल्या प्रवासांतील हालाचें व राजाच्या भेटींत काय काय झालें तें लिहिलें आहे. तो म्हणतोः—

"मी मिरझापुराहून निघालों तों वाटेंत राजा बैजसिंग[1] याच्या मुलखांत जंगलांत त्यानें एक महिनाभर मला कैद करून ठेवलें व माझ्याबरोबरच्या

१ दिनाजपुरचा जमीनदार.

माणसांसहि हलूं दिलें नाहीं. आम्ही फारच वर्दळीवर आल्यावर त्यानें मजपासून पुष्कळसें द्रव्य घेऊन आपल्या सरहद्दीपर्यंत आपलीं माणसें देऊन पोहोंचवून दिलें. त्यानंतर हिंदुपत[१] राजाच्या मुलखांत आम्ही गेलों. तेथें धानोरा येथील अमीरानें आम्हांस अकरा दिवस अटकवून ठेविलें व त्याचप्रमाणें पैसे घेऊन सोडून दिलें. पुढें आम्ही राजा निजामशहा याच्या मुलुखांत गेलों तर तेथील अमलदारानें आम्हांस एक महिनाभर अडकविलें. शेवटीं मीं राजा जानोजी याजकडे दोन हरकरे पाठविले तेव्हां राजाचीं दोन माणसें पत्रें घेऊन निजामाकडे आलीं व निजामानें ती पत्रें पाहून आम्हांस ज्या अमलदारानें अडकवून ठेवलें होतें त्याचेकडे जासूद पाठविले. तो हुकूम पाहतांच त्या अमलदारानें आम्हांस सोडून दिलें. आम्ही ता. २५ दिसेंबर रोजीं नागपुरास पोहोंचलों व ता. २६ रोजीं मी राजाकडे व सरदारांकडे गेलों व त्यांना आपलेकडील नजराणे वगैरे दिले. त्यांपैकीं प्रत्येक वस्तु बारकाईनें पाहून राजास फार आनंद झाला. दुसरे दिवशीं पुष्कळ वेळपर्यंत इकडील कामकाजाचें बोलणें चाललें. राजाचें म्हणणें बंगालच्या चौथाईबद्दल आम्हांस ४८ लक्ष रुपये द्या. ओरिसासंबंधानें मात्र राजानें एक अक्षरहि काढलें नाहीं. कांहीं दिवसांनीं उदेपुरी गोसाव्याचें एक पत्र राजास आलें. त्यांत मजकूर कीं लॉर्ड क्लाइव्हचें म्हणणें बंगालच्या चौथाईचे प्रकरणांत उदेपुरीनें बोलण्याचें कारण नाहीं. त्या बाबतीत **झैनुलाबिद्दीन** यास आम्ही नागपुरास पाठविलें आहे. तेथें जो निकाल होईल तो आम्हांस कबूल आहे. माझ्याशीं व राजाशीं इतर कामकाजाच्या पुष्कळ गोष्टी झाल्या. अखेर त्यानें मजजवळ बेलभंडार दिला व सांगितलें कीं लॉर्ड क्लाइव्हकडून अशीच शपथेची खूण यावी की एकमेकांनी एकमेकांशी बंधुभावानें वागावें म्हणजे मग ओरीसा प्रांताबद्दल बोलण्याचें कामच उरत नाहीं. राजानें **उदेपुरीस** पत्र लिहिलें आहे कीं मी परत गेल्यावर त्यानें मजबरोबर कलकत्त्यास यावें व सर्व प्रकरणाचा निकाल लावावा.

यानंतर **जानोजीनें** परभारें **लॉर्ड क्लाइव्ह** यास पत्र पाठविलें. त्यांत झैनुलाबिद्दीनची भेट झाल्याबद्दल कळविलें. परंतु चौथाईचे रकमेबद्दल व ओरीसाच्या प्रश्नाबद्दल सर्व हवाला **उदेपुरी** गोसाव्यावर दिला व तो जें जें

१ बुंदेलखंड.

ठरवील त्यावर मी डोळे मिटून सही करीन असें सांगितलें. **चौथाईची** मागील सर्व बाकी सोडून द्यावी व पुढील सालापासून आम्ही ती वक्तशीर देत जाऊं अशी तडजोड क्लाइव्हनें सुचविली होती असें दिसतें. त्यावर **जानोजी लिहितोः**—

"पुढील सालापासून तुम्ही चौथाई दिली तरी हरकत नाहीं परंतु यंदाची अगर पुढील सालाची रकम आम्हास ताबडतोब द्या. कारण फौजेचा पगार तुबला आहे व आम्हांस ही फौज **रघुनाथरावा**बरोबर हिंदुस्थानांत पाठवावयाची आहे. ओरीसा प्रांत तुम्हास देण्यासंबंधानें आमचा वकील जें ठरवील तें आम्हांस कबूल आहे. ओरीसा तुम्हास देण्याबद्दल आमची कांहीच हरकत नाही. रघुनाथरावामध्यें व आमच्यामध्यें कांही महत्त्वाच्या बाबतींत मसलत ठरवावयाची असल्यामुळें मी नर्मदेच्या कांठी आलों आहें."

याच मजकुराचें एक पत्र भोंसल्यांचा मुत्सद्दी **दिवाकरपंत** याजकडूनहि **क्लाइव्ह** यास गेलें. बहुधा झैनुलाबिद्दीनाबरोबर **दिवाकरपंतासहि** क्लाइव्हचें निराळें पत्र गेलें असावें. त्याचेंच हें उत्तर असावें.[१]

रघुनाथराव पेशवे व जानोजी यांचा एक पक्ष होता. पुण्याच्या गादीशीं नागपुरकरांचें कधीच सौजन्य नव्हतें व पुण्याच्या गादीचा जो शत्रु तो नागपुरकरांचा मित्र असावयाचाच.

जानोजीचें पत्र झैनुलाबिद्दीनबरोबर क्लाइव्ह यास पोहोंचल्यावर मुर्शिदाबाद येथें नबाब **सैफउद्दौला**, त्याचा नायब **महमद रेझाखान**, **उदेपुरी गोसावी** व **झैनुलाबिद्दीन** यांचेशी क्लाइव्हनें वरील सर्व बाबीचा खल केला व जानोजीस कळविलें कीं, **रेझाखान** हा याबद्दल सर्व खुलासा करील. पैशाचे मागणीबद्दल पूर्वीप्रमाणेंच आशीर्वाद देऊन तुमचें मन स्वस्थ ठेवा. आम्ही तुमचे पैशाबद्दल जबाबदार आहों असें क्लाइव्हनें कळविलें (जून १७६७).

परंतु या कोरड्या आश्वासनांवर यापुढें भरंवसा ठेवण्यास **जानोजी** तयार नव्हता असें दिसतें. **रघुनाथराव** पेशवे व **जानोजी** यांचें एकमत होतें व ते दोघेहि आपल्या पक्षांत इंग्रजांस ओढण्यास पहात होते.

१ Calender vol. II no. 78, 107 A. B.

उलट पक्षीं मराठ्यांच्या अंतःकलहाचा फायदा घेण्यास इंग्रजहि टपलेलेच होते. या त्रिवर्गांचा या बाबतींत पत्रव्यवहार चालू होता व प्रत्येक जण आपआपला मतलब साधण्यास पहात होता.

इंग्रजांकडून **जानोजीस** पत्रें गेलीं तीं **उदेपुरी** गोसाव्याचे मार्फत न जातां परभारें रवाना झालीं. जानोजीनें इंग्रजांस या चौथाईच्या बाबतींत बरींच खरमरीत पत्रें लिहिली असें दिसतें. कारण सप्टेंबर १७६७ मध्यें **क्लाइव्ह उदेपुरी** गोसाव्यास लिहितो कीं, "जानोजी व रघुनाथराव यांजकडून आम्हांस अशीं कडक पत्रें आलीं आहेत कीं, तीं पूर्वीच्या दोस्तीच्या बोलण्यास अगदीं विसंगत आहेत व तीं खरीं तरी आहेत कीं नाहींत याची आम्हास शंका येते. तरी तुम्ही तपास करून कळवा की हीं पत्रें खरोखरच जानोजीकडून आलीं आहेत काय? "

वरील पत्रव्यवहार वास्तविक शिरस्त्याप्रमाणें उदेपुरी वकिलामार्फत होण्याचा, तो गव्हर्नरानें परभारें केल्यामुळें उदेपुरी हाहि इंग्रजांवर रागावलाच होता. त्यानें गव्हर्नरासच याबद्दल दोष दिला व पत्रांच्या नकला पाठवा म्हणजे तपास करतों असें कळविलें. क्लाइव्हनें उदेपुरीस पत्रांच्या नकला पाठविल्या व "राजाशीं आम्ही दोस्ती चाहतों परंतु राजा जर आम्हांस धमकावणीच्या गोष्टी सांगेल तर आम्हीहि भिणार नाहीं व पुढें जो कांही परिणाम होईल त्याबद्दल आम्ही दोषी नाहीं." अशी उलट तंबी दिली. उदेपुरीनें यास उत्तर म्हणून सामोपचाराचें पत्र पाठविलें व मी स्वतः नागपुरास गेल्याशिवाय याचा निकाल लागणार नाहीं तरी उभयपक्षीं दोस्तीबद्दल खात्री ठेवावी असें आश्वासन दिलें व तुम्ही पाठवाल तीं पत्रें आमचेमार्फत पाठवीत जावीं नाहींतर आम्हांस नकला तरी पाठवीत जाव्या असेंहि उदेपुरीनें सुचविलें.

**झैनुलाबिद्दीन** याचेमार्फत गव्हर्नरानें जें पत्र पाठविलें व त्यानें नागपुरला जो युक्तिवाद केला त्यांत ओरीसा प्रांत जानोजीनें इंग्रजांस द्यावा म्हणजे ते १३ लक्ष रुपये चौथाईबद्दल दरसाल देत जातील अशी बाजू मांडली. ही गोष्ट अर्थातच **जानोजीनें** नाकबूल केली व त्या वकीलास परत पाठविलें. यानंतर गव्हर्नरास व त्याचा हस्तक **महमद रेझाखान** यास जानोजीनें जें पत्र लिहिलें त्यांत झैनुलाबिद्दीन हा स्वतःस ओरीसाची सुभे-

दारी मिळवूं पाहतो असेंहि ध्वनित केलें व तो गैरविश्वासू मनुष्य आहे तर **उदेपुरीबरोबर** कोणी विश्वासू मनुष्य नागपुरास पाठवा म्हणजे तह होईल असें गव्हर्नरास कळविलें. **उदेपुरीनें**हि त्याचप्रमाणें कळविलें. अलिवर्दीखानाचे वेळेपासून दरसाल चौथाईची रकम येत गेली व त्या वेळी ओरीसाचा अगर तहाच्या अर्थाविषयींचा प्रश्न निघाला नाहीं व आतां हे प्रश्न निघतात यांत **झैनुलाबिद्दीन** व **शिवभट** हेच इंग्रजांस चिथावतात तेव्हां त्यांच्या म्हणण्यावर गव्हर्नरानें लक्ष देऊं नये व मागील तहाप्रमाणें व पूर्वीं दिलेल्या वचनाप्रमाणें वागावें असें जानोजीनें गव्हर्नरास लिहिलें.

वास्तविक **ओरीसाची** मागणी करण्यांत **झैनुलाबिद्दीन** याची अगर शिवभटाची लबाडी नसून ती इंग्रजांचीच क्लृप्ति होती व कोणत्या तरी तऱ्हेनें **ओरीसा** प्रांत मिळविल्याशिवाय चौथाईची बाब निकालांत काढावयाची नाहीं हा प्रथमपासून इंग्रजांचा डाव होता. फेब्रुआरी १७६८ मध्यें गव्हर्नरानें राजास पत्र पाठविलें कीं ओरिसाप्रांत तुम्ही खालीं करून आम्हास द्याल तरच आम्ही चौथाईची रक्कम देववूं. नाहीतर देवविणार नाहीं व तुमचे कबुलीचें पत्र आलें म्हणजे उदेपुरीबरोबर आमचा दुसरा वकील संपूर्ण तह ठरविण्याकरितां नागपुरास पाठवूं.

जानोजीनें अर्थातच हें कबूल केलें नाही व आपल्या नाकबुलीचे पत्र गव्हर्नरास पाठवून आम्ही आतां बंगाल्यांत लष्कर पाठवूं अशी धमकी दिली. **उदेपुरी** गोसावी यास त्यानें वकिलातीवरून परत बोलावून दुसरा वकील लाला **आनंदरूप**[१] नांवाचा पाठविला व भवानी काळू यास सुभेदारीवरून परत बोलावून त्याचे जागीं गणेश संभाजी[२] यास ओरीसाच्या सुभेदारीवर पाठविलें (एप्रिल १७६८).

**गणेश संभाजी खांडेकर सुभेदार**—यानेंहि निकराच्या गोष्टी न सांगतां सामोपचाराच्याच गोष्टी इंग्रजांशीं चालविल्या व तुम्हांस लागेल

---

१ पुणें दरबारचा कलकत्त्याचा वकील लाला सेवकराम याचा कोणी आप्त असावा.

२ याचें आडनांव खांडेकर. भाग ६ पा. १९४पहा. वंशावळ पुरवणी Calender मध्यें सर्वत्र संभाजी गणेश असें चुकीनें म्हटलें आहे.

तेव्हां आम्ही पन्नास हजार लष्कराची मदत करीत जाऊं, परंतु आमची चौथाईची रक्कम द्या म्हणून बोलणें लावलें. पण इंग्रजांस मराठ्यांच्या लष्कराच्या मदतीची जरूर नव्हती. त्यांना ओरिसा प्रांत पाहिजे होता.

इ. स. १७६८ चे जुलैमध्यें इंग्रजांनीं **गोपाळपुरी** नांवाचा वकील नागपुरास पाठविला. तो कटक मार्गे नागपुरास गेला व जानोजीस भेटला ( आक्टो. १७६८ ). त्यानें तह होण्याची बरीचशी आशा आहे असें गव्हर्नरास कळविलें. जानोजीनेंहि **गणेश संभाजी** यास व **उदेपुरी** ( जो अद्याप कटक प्रांतांतच होता ) यास व आपल्या वकिलास कळविलें कीं, ओरीसा प्रांत इंग्रज कांही ठरीव रक्कम कबूल करून ताब्यांत घेण्यास तयार असतील तर त्या तहावर इंग्लंडच्या राजाची सही त्यांना द्यावी लागेल. त्याचप्रमाणें बंगालच्या चौथाईची बारा लाख रक्कमहि पुढें दरसाल द्यावी लागेल. **संभाजी गणेश** हा नुसता २० हजार लष्कर घेऊन ओरीसा प्रांतांत राहिला. इकडे तहाचा निकाल होईना व राजाकडून बंगालवर स्वारी करण्याचाहि हुकूम मिळेना. त्यानें लष्कराच्या खर्चाबद्दलहि इंग्रजांस मागणी केली, परंतु इंग्रज थोडेच दाद देणार ?

इ. स. १७६९ मध्यें पेशवे व जानोजी यांचें वैमनस्य विकोपास जाऊन **माधवराव** पेशव्यानें नागपुरावर स्वारी[१] करून जानोजीचा पराभव केला. जानोजी पुण्याच्या रोखानें पळूं लागला व माधवरावानें त्याचा पाठलाग चालविला. त्या वेळीं वरील प्रकरण मागें पडून उलट जानोजीनें आपला सुभेदार **गणेश संभाजी** यास इंग्रजी सैन्याची मदत घेऊन मदतीस यावें म्हणून लिहिलें.

**गणेश संभाजीनें** त्याप्रमाणें गव्हर्नरास पत्र लिहून त्याचेकडे **गोविंदराव** नांवाचा वकीलहि पाठविला. गव्हर्नर व्हेरेल्स्ट यानें मदत वगैरे न पाठवितां "आतां लौकरच लढाई संपून तह होईल. तरी मदत पाठविण्याची जरूर नाहीं" असें कळविलें. आयत्या वेळीं इंग्रजांनीं जानोजीस पेशव्याविरुद्ध मदत देण्याचें नाकारलें. त्याबद्दल भोंसल्यांच्या मनांत इंग्रजांविषयीं बेभरंवसा उत्पन्न झाला.

---

१ माधवराव पेशव्याची भोंसल्यावर दुसरी मोहीम.

भोंसल्यांचा वकील कलकत्त्यास होता त्याप्रमाणें आपलाहि वकील ओरिसा प्रांतांत असावा असें गव्हर्नरास वाटलें. त्याप्रमाणें त्यानें **गणेश संभाजी** यास लिहिलें. अॅलन नांवाचा गृहस्थ कटक प्रांतांत वकीलासारखा रहात असून तो मध्यस्थाचें काम पूर्वीपासूनच करीत होता. गणेश संभाजी सुभेदार यास हा नवीन वकील नको होता म्हणून त्यानें आतां वकिलाचें काम नाही असें सांगून तो विषय टाळला. तसेंच इंग्रजी लष्कर कलकत्त्याहून मद्रासकडे जाण्याचें तेंहि त्यानें कटक प्रांतांतून जाऊं दिलें नाहीं.

**रेनेलचा हिं० नकाशा १७६९ इ.**—इ. स. १७६९मध्यें बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांची पाहणी करून इंग्रज अधिकाऱ्यांमार्फत त्यांचे नकाशे तयार करण्यांत आले. कॅ. **रेनेल** याचा हिंदुस्थानचा नकाशा अगदी प्रथमचाच म्हणून त्यास मोठा मान आहे. त्यानें याच वेळीं कामास सुरुवात केली. त्यास प्रथम हिंदी जमीनदार व संस्थानिक यांचेकडून बराच अडथळा झाला परंतु त्यानें व त्याचे हाताखालच्या इंग्रज अधिकाऱ्यांनीं मोठ्या कष्टानें तो नकाशा तयार केला. ओरिसाच्या मराठी सुभेदारानेंही दोस्तीच्या नात्यानें ही पाहणी करूं दिली. [१]

जानोजीच्या वेळेस राज्यकारभाराची व्यवस्था खुद्द नागपुरचा व त्याजवळचा भाग यांत चांगली जमली होती. नागपुर व चांदा येथें शांततेचें राज्य बहुतांशीं चालू होतें. परंतु राजधानीपासून दूर अशा भागांत लष्करी अंमलच चालू होता. दूरचा प्रांत हा नेहमीं तरवारीच्या जोरावरच ताब्यांत ठेवावा लागे. स्थानिक जमीनदार व संस्थानिक हे लष्करी बळ कमी होतांच मराठ्यांचा अंमल झुगारून देण्यास तयार असत. संबळपूर, ओरिसा व गढामंडला वगैरे प्रांतांत शांततेची राज्यव्यवस्था बसलेली दिसत नाहीं.

**मॉट याची वकीली १७६६ इ.**—इ. स. १७६६ मध्यें **क्लाइव्ह** यानें संबळपुरास मॉट नांवाचा एक इंग्रज व्यापारी पाठविला. संबळपुरच्या जवळ महानदीच्या कांठीं हिऱ्याच्या खाणी असल्यामुळें संबळपुरास जवाहिराचा मोठा व्यापार चालत असे. त्यावेळीं इंग्लंडास रकमा पाठविण्याची चांगलीशी सोय नसल्यामुळें जवाहिर पाठविल्यास थोड्या श्रमानें

१ इंगजांप्रमाणें देशी राजांनीं मात्र असे प्रयत्न केल्याचें दिसत नाहीं.

रकमा पाठवितां येतील असा क्लाइव्ह याचा इरादा होता. या निमित्तानें गेल्यावर एकंदर मराठी राज्याची स्थिति काय आहे तें पाहाण्यास व जमल्यास नागपुरच्या मुत्सद्यांकडून ओरिसा प्रांत इंग्रजांना मिळण्यासारखा आहे कीं नाहीं तेंहि पाहण्यास या गृहस्थास सांगितलें होतें. त्यानें आपल्या प्रवासाचें सविस्तर वर्णन लिहून ठेविलें आहे त्यावरून त्या वेळच्या स्थितीची कांहीं कल्पना येईल.

**मॉट** हा दोन इंग्रज नोकर व थोडेसे हिंदी शिपाई घेऊन मोठ्या अडचणीनें १७६६ चे मे महिन्याचे अखेरीस संबळपुरास आला व जवळच एका राईत तंबू देऊन उतरला. उन्हाळा संपून बरसात सुरू होण्याची ही वेळ होती. **मॉट** यानें शिपाई व सामान यांकरितां तंबू दिला होता व त्यांत हिंदी शिपाई व काडतुसें व दारू सामान वगैरे होतें. त्याच रात्री मोठें वादळ होऊन जोराचा पाऊस पडला. त्यांतच या तंबूवर वीज पडून आंतील दारूसामानानें पेट [१] घेतला व सर्व शिपाई होरपळून गेले व त्यांतील १६ शिपाई मरून गेले. या प्रसंगाचें मोठें हृदयद्रावक वर्णन मॉट यानें लिहिलें आहे.

संबळपुरच्या मांडलिक राजाची व त्याचे मुत्सद्यांची **मॉट** यानें भेट घेतली व खाणीहि पाहिल्या; पण व्यापार सुरू करण्याइतका तेथें जवाहिराचा सांठा नाहीं असें **मॉट** यास दिसून आलें. प्रवास करतांना प्रत्येक ठिकाणीं चौक्या असून प्रवाशाकडून व व्यापारी, यात्रेकरू वगैरे लोकांकडून जकाती वसूल करीत असत. त्यावेळीं **शिवभटाची** धामधूम सुरू असून शिवभटाच्या तर्फेनें बरेच लोक होते. **शिवभट** आपल्या मुलखांतील लोकांकडून ज्यास्त पैसे वसूल न करतां बाहेरच्या प्रांतांतून खंडण्या वगैरे घेऊन कारभार चालवीत असे. उलटपक्षीं **भवानीपंत** काळू आमच्या कडून पैसे मागतो म्हणून आम्हांस **भवानीपंतापेक्षां** शिवभटच ज्यास्त पसंत आहे असें सर्व लोक म्हणत, असें **मॉट** यानें लिहून ठेविलें आहे. सर्वत्र लुटालूट चालत असल्यामुळें व मराठे लष्कर वसुलीकरितां येईल या धास्तीनें लोक पावसाळ्याचे अखेरीस तयार होणारींच पिकें पेरीत. कारण

---

१ Early European Travellers. P. 1-32

रस्ते तयार होतांच मराठी लष्कर येऊन खंडणी मागे. मांडलिक व संस्थानिक हेहि लष्करच्या जोराशिवाय खंडणी अगर वसूल देत नसत.

**छत्तिसगडांतील नागपूजेचा एक प्रकार—मॉट** यानें संबळपुराकडील **नागपूजेचा** एक मनोरंजक प्रकार दिला आहे. तिकडील डोंगरी लोकांचें दैवत एक प्रचंड जिवंत सर्प असे व तो सर्प एका खडकाखालच्या बिळांत रहात असे व दर आठवड्यास एकदां बाहेर येत असे. त्याला नवस करणारे भक्त त्या वेळीं तेथें जमत. बिळाच्या बाहेर सुमारें चारशें यार्डाचें पटांगण असून त्याभोंवतीं एक खंदक करून त्यांत पाणी सोडलेलें असे. भक्त मंडळी सर्प बाहेर येण्यापूर्वी त्या पटांगणावर बकरी, पांखरें वगैरे त्याचे खाण्याचे पदार्थ ठेवून देत. सर्प बाहेर आला म्हणजे तीं जनावरें खाऊन खंदकांतील पाणी पिऊन तो परत आपल्या बिळांत जाई. **मॉट** व त्याचे सोबती यांनीं तो प्रकार पहिला व सर्प आंत गेल्यावर त्यानें खंदकाचे आंत जाऊन त्याची मोड मोजली. ती दोन फूट रुंद होती. हा सर्प इतका जुना होता कीं, तिकडील लोकांची अशी समजूत असे कीं तो सृष्टीच्या आरंभापासून आहे व तो मरतांच पृथ्वीचा अंत होईल.

**जानोजीचा मृत्यु व नंतरच्या उलाढाली—मॉट** याचे दोन्ही इंग्रज सोबती तिकडील दोषी तापानें मरण पावले. त्यामुळें नागपुराकडील उद्योग सोडून तो परत बंगाल्यांत गेला.

जानोजी इ. स. १७७२ मध्यें मरण पावल्यानंतर त्याचे बंधू **साबाजी** व **मुधोजी** यांजमध्यें अधिकाराकरितां भांडण सुरू झालें. रघूजी हा मुधोजीचा पुत्र असल्यामुळें आपल्या हातांत कारभार रहावा असें त्यास वाटे परंतु साबाजीचा जोर जास्त झाल्यामुळें पांचगांवच्या लढाईपर्यंत साबाजी सत्ताधीश होता. त्याहि वेळेस साबाजीनें **बेनीराम पंडित** नांवाचा वकील कलकत्त्यास पाठविला (इ. स. १७७३) व इंग्रजांचें साह्य रहावें अशी तयारी केली. हेस्टिंग्जनेंहि ही संधि न दवडतां आपल्या शर्ती कळवून **बेनीराम पंडितास** परत नागपुरास पाठविलें; परंतु पांचगांवच्या लढाईत **साबाजी** पडल्यामुळें तें प्रकरण तसेंच थांबलें. पुढें मुधोजी सत्ताधीश झाल्यानंतरहि इंग्रज व नागपुरकर यांची एकमेकांशीं दोस्ती ठेवण्याची इच्छा वाढतच

गेली. मुधोजीनेंहि **बेनीरामास** पुन्हा कलकत्त्यास पाठविलें. इंग्रज व भोंसले या दोघांस इतर शत्रु असल्यामुळें ते एकमेकांस हाताशीं धरण्याचा प्रयत्न करीत, परंतु या दोघांचेहि हितसंबंध एकमेकांच्या विरुद्ध असल्यामुळें त्यांचा पूर्ण एकोपा कधींच झाला नाहीं. इंग्रजांनीं मात्र प्रसंग पडेल तसा या दोस्तीचा उपयोग स्वतःच्या राष्ट्राच्या फायद्याकरितां पुष्कळ वेळां करून घेतला. इकडे नागपुरकरांना मात्र आपलें राष्ट्र अगर मराठी साम्राज्य यांच्या हिताहिताची कल्पनाहि नव्हती व तिकडे त्यांनीं दृष्टि न देतां स्वतःचे आकुंचित हिताकडेच सदैव दृष्टि ठेविली.

हिंदुस्थानच्या राजेरजवाड्यांच्या गृहकलहांत पडूनच परकीय इंग्रजांस सहज रीतीनें एवढें साम्राज्य स्थापन करतां आलें. इंग्रजांनाच काय परंतु कोणत्याहि राज्यसंस्थापकास दुसऱ्याच्या गृहकलहाचा जितका उपयोग होतो तितका त्याच्या निवळ लष्करी सामर्थ्याचाहि होत नसेल. इंग्रजांपूर्वीचा जो हिंदुस्थानचा इतिहास आहे त्यांतहि हाच प्रकार दृष्टीस पडतो. मराठी साम्राज्य हेंच इंग्रजांच्या आकांक्षेस विरोधक असें राष्ट्र होतें. परंतु मराठी साम्राज्याचे घटकावयव इंग्रजांसारखे शिस्तीनें व राष्ट्रैक्य बुद्धीनें प्रेरित झालेले नसून वैयक्तिक स्वार्थानें भरलेले होते व त्यांच्या गृहकलहांत उडी टाकण्यास इंग्रज सदैव तयार असत. भोसले व पेशवे यांच्या चुरशींत इंग्रज तेल घालण्यास तयार, रघुनाथराव पेशवे व पुणेदरबार यांच्या भांडणांत तयार, महादजी शिंदे व नाना यांच्या चुरशीतहि महादजीच्या पाठीशीं दडलेले, अशी त्यांची वृत्ति होती. परंतु नाना फडणीस खेरीजकरून शहाण्या शहाण्या मराठे मुत्सद्यांसहि पुढील संकटाची कल्पना आली नव्हती.

साताऱ्चा **रामराजा** निपुत्रिक मरण पावला. नागपूरकर भोसले हे साताऱ्च्या भोंसल्यांचे भाऊबंद असल्यामुळें त्यांचे घराण्यापैकीं कोणीतरी पुरुष दत्तक म्हणून साताऱ्च्या गादीवर बसणें शक्य होते; परंतु साताऱ्च्या राजघराण्याच्या जवळच्या[१] शाखेपकीं पुरुष मिळणें शक्य असल्यामुळें व पेशव्यांच्या नागपुरकरांशीं असलेल्या विरोधामुळें नागपूरकर व साताऱ्ची गादी एक होणें बरेच कठीण होतें व तसा

१ विठोजीच्या शाखेपैकीं वावीकर त्रिंबकजी राजे याचा मुलगा शेवटीं दत्तक दिला तो दु. शाहू छत्र. ( मागें पा. ११५ पहा )

प्रश्न कधींहि पुढें आला नाहीं. परंतु इंग्रजांनीं मात्र मुधोजीच्या मनांत पेशव्यासंबंधानें विष शिरवून देण्यास मुधोजीस या निरर्थक नादास लावून आपला स्वार्थ करून घेतला. **बेनीराम** पंडितामार्फत हेस्टिंग्जनें मुधोजीशीं बोलणें लावलें कीं, "तुम्ही साताराच्या गादीवर आपला हक्क जोरानें दाखवावा व आम्ही तुम्हांस हरतऱ्हेची मदत करूं." हेस्टिंग्ज याची पहिली चुकीची माहिती ही कीं नागपुरकरांची शाखा ही **शिवा**जीपासून पुढील शाखा आहे. तसेंच पहिल्या रघूजीस शाहूनें दत्तक घेतलें होतें अशीहि दुसरी चुकीची समजूत इंग्रजांची होती. असें जरी असलें तरी मुख्यत्वें मराठ्यांच्या राजकारणांत ढवळाढवळ करून त्यांची मुख्य सत्ता निर्बल करणें हाच हेस्टिंग्जचा मुख्य हेतु होता व तो त्याच्या सुदैवानें साध्यहि झाला. जुलै १७७८ च्या गुप्त खलित्यांत **हेस्टिंग्ज** इंग्लंडांतील कंपनीच्या डायरेक्टरांस लिहितो "साताऱ्चा **रामराजा** मरण पावल्याची एक खोटीच बातमी आम्हांस समजली. या गोष्टीचा मराठा राजकारणांत उपयोग करून घ्यावा म्हणून मीं भोंसल्यांच्या वकिलाची (बेनीराम पंडित) या कामीं योजना केली व त्याचेकरवीं **मुधोजी**च्या मनांतील साताऱ्च्या गादीच्या इच्छेस उत्तेजन दिलें. **रामराजा**ची अशक्त प्रकृति व पुण्याच्या दरबारांतील अंतःकलह या दोन्ही गोष्टींमुळें ही संधि **मुधोजीस** चांगली होती. ही गोष्ट घडवून आणावी म्हणून मीं भोसल्यांचा तीन पिढ्यांचा दिवाण दिवाकरपंत यासहि लिहिलें. हें पत्र रस्त्यांत असतांच **रामराजा** मरण पावला. आम्हीं दुसरीहि लालूच **मुधोजीस** दाखविली आहे ती ही कीं, निजामानें भोंसल्यांचा मुलूख घेतला आहे तो परत मिळविण्यास त्यास मदत करणें. या दोन्ही गोष्टीच्या लालचीनें **मुधोजी** आमच्याशीं दोस्तीचा तह करण्यास कबूल होईल असें वाटतें. असा तह झाल्यास पुणें दरबारच्या कारस्थानास हा एक मोठाच अडथळा उत्पन्न होईल व त्यायोगानें मराठ्यांची सत्ता उलथून पाडण्यास या दोस्तीचा आम्हास उपयोग करून घेतां येईल व तसेंच फरेंचांचाहि उद्देश साध्य होणार नाहीं याकरितां माझी सूचना आहे कीं, नागपुरदरबाराशीं असा तह करण्याकरितां पूर्ण अधिकार देऊन कंपनीतर्फे एक वकील नागपुरास पाठविण्यास तुम्हीं मला अधिकार द्यावा.

वरील सूचना मंजूर झाल्यामुळें ता. ११-७-१७७८ रोजीं कलकत्त्याच्या कौन्सिलानें ठराव करून अलेक्झांडर **इलियट**[२] यास पूर्ण अधिकार देऊन नागपुरास वकील म्हणून पाठविलें.

**इलियटची वकीली व मृत्यु. इ. स. १७७८ – इलियट** हा कटक मार्गानें नागपुरास येण्यास निघाला (जुलै १७७८) व कटक प्रांतांतून **सहारणगड** (सारंगड) नांवाच्या संस्थानांत आला. तेथें **समरा** नांवाच्या गांवीं तो आजारी पडून ता. १२-९-१७७८ रोजीं मरण पावला. **इलियट** याचें वय २३ वर्षांचें असून हा मोठा होतकरू होता. प्रसिद्ध **नन्दकुमार** याचे चौकशीच्या वेळीं हा वीस वर्षांचा असतांना पर्शियन व हिंदुस्थानी भाषेंत अत्यंत हुशार म्हणून त्याचेकडे दुभाषाचें काम दिलें होतें. याचाच भाऊ **हेस्टिंग्जवरील** चौकशीत त्याच्याविरुद्ध पक्षास होता व पुढें लॉर्ड मिंटो म्हणून हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल होऊन आला (१८०७).

**पुरंदरचा तह व इंग्रज-मराठ्यांच्या बेबनावाचीं पूर्व चिन्हें**:- ता. १-३-१७७९ रोजीं पुरंदर येथे इंग्रज व मराठे यांचा तह इंग्रज वकील कर्नल जॉन अपटन याचेमार्फतीनें होऊन मराठे व इंग्रज यांच्या युद्धास थोडी विश्रांति मिळाली परंतु ती तेवढ्यापुरतीच होती हें दोन्ही पक्षांस माहीत होतें. तशांत पुण्यास फरेंचांचीहि कारस्थानें चालू होतीच. फरेंच वकील सेट ल्युबिन हा कांहीं दिवस पुण्यास येऊन राहिला व त्याचें पुणेंदरबारशीं कांही बोलणेंहि सुरू झालें. तशांत इंग्रज व फरेंच यांच्यामध्यें युरोपांत लढाई सुरू झाली. मराठे व फरेंच यांचें सूत जमल्यास मुंबईचे इंग्रजांस फारच कठीण जाईल अशी धास्ती गव्हर्नर जनरल हेस्टिंग्ज यास पडली.

मुंबईकर इंग्रजांस फौजेची जास्त मदत केल्याशिवाय तिकडचा बंदोबस्त नीट राहणार नाहीं म्हणून **हेस्टिंग्जनें** उ. हिंदुस्थानांतली व बुंदेलखंडांतली इंग्रजी फौज मुंबईस पाठविण्याचा बेत केला व इ. स. १७७८ चा पावसाळा होतांच त्या सैन्यानें यमुना उतरून काल्पी, बुंदेलखंड, सागर, माळवा, बऱ्हाणपुर या मार्गानें मुंबईस जावें असें ठरविलें. परंतु ही फौज शिंदे, पेशवे, होळकर व भोंसले यांच्या मुलखांतून त्यांच्या परवानगीशिवाय जाणें कठिण

---

२ इलियटचा पगार सालिना चाळीस हजार असा ठरविलेला सांपडतो.

होतें. फ्रेंचांच्या बंदोबस्ताकरितां आम्ही ही फौज मुंबईस पाठवितों तिला तुम्ही जाऊं द्यावें अशीं गोडगोड पत्रें हेस्टिंग्जनें शिंदे, होळकर, भोंसले व पुणेंदरबार यांस लिहिलीं व परवाने मागितले. शिंदे होळकरांनीं परवाने दिले; भोंसल्यांनीहि संमति दिली एवढेंच नव्हे तर इंग्रजांच्या लष्करास सामुग्रीहि देण्याचें कबूल केलें. परंतु पुणें दरबारानें परवाने देण्याचें नाकारले. इंग्रजांचे सारे डावपेच नाना फडनिसास चांगले समजत होते. सागर व काल्पी हा प्रांत गोविदपंत बुंदेल्याचे पुत्र बाळाजी गोविंद व गंगाधर गोविंद खेर यांचे ताब्यांत होता व ते नाना फडणीसाच्या पक्षांतील होते. त्यांस नानानें लिहिलें कीं इंग्रजी फौजेस तुमच्या मुलखांतून जाऊं देऊं नये. तसेंच कलकत्तेकर इंग्रजांसहि त्यानें लिहिलें कीं तुमचा शिरस्ता समुद्रानें मुबईस फौजा पाठविण्याचा आहे तरी आमच्या प्रांतांतून तुम्ही फौजा पाठवूं नका. तुम्हांस परवाने मिळणार नाहींत. पण इतकें झाल्यावर इंग्रज थोडेच ऐकतात, जमेल तेथें गोडीनें व न जमल्यास जबरदस्तीनें आपलें काम करावयाचें हा इंग्रजांचा नेहमीचा मार्ग हेस्टिंग्जनें अवलंबिला व **क० लेस्ली** यांस इंग्रजी सैन्य बुंदेलखंडांतून पुढें नेण्यास हुकूम दिला.

**लेस्लीचा मृत्यु:–खेरांनीं** लेस्लीच्या सैन्यास अडविलें परंतु लेस्लीनें काल्पीवर हल्ला करून ते शहर व किल्ला काबीज केला व तेथें तळ दिला परंतु त्यास पुढें मात्र जातां आलें नाहीं. इतक्यांत उन्हाळा जाऊन पावसाळा लागला व चार महिने त्याचा तेथेंच तळ राहिला. इतक्यांत तो काल्पी येथें आजारी पडून ता. ३–१०–१७७८ रोजीं मरण पावला. त्याचे जागीं पूर्वीच **क० गॉडर्ड** यांची नेमणूक झाली होती. तो लेस्लीपेक्षां जास्त तडफदार असल्यामुळें त्यानें इंग्रजी सैन्य पुढें रेटीत रेटीत **भिलसा** व **भोपाळ** मार्गानें नर्मदेवर आणलें. भोपाळच्या नबाबानेंहि त्यास फार मदत केली.

नर्मदेच्या कांठचा मुलख भोंसल्यांचा होता. शिंदे–होळकरांप्रमाणेंच **हेस्टिंग्ज** यानें **मुधोजी** भोंसल्यासहि या सैन्यास वाट देण्याबद्दल लिहिलें होतें. **मुधोजी** व इंग्रज यांचा तर पूर्वीपासूनचा स्नेह. त्यानें परवानगी दिली एवढेंच नाहीं तर आपले अधिकारी गंगाधर पंडित व जगदीशराम पंडित व माधवराव यांना त्यानें नागपुराहून पाठविलें व बेनीराम पंडित

हा काशीस होता त्यास गव्हर्नरानें हुशंगाबादेवर इंग्रजांची सरबराई करण्याकरितां ताबडतोब पाठविलें व लेस्लीस जाऊन मिळण्याबद्दल व त्याचेच-बरोबर नर्मदेपर्यंत जाण्याबद्दल लिहिलें व त्यास मुधोजीनेंहि मान्यता दिली. याप्रमाणें तो **लेस्लीस** जाऊन मिळाला. पावसाळचांत **लेस्लीचा** मुक्काम काल्पीस झाल्यामुळें भोंसल्यांच्या अधिकाऱ्यांसहि उन्हाळा सपून पावसाळा लागेपर्यंत दोन तीन महिने हुशंगाबादेसच पडून रहावें लागलें पण लेस्लीच्या जागीं **क. गॉडर्ड** याची नेमणूक होतांच तो एकदम पुढें जाऊन नर्मदेच्या कांठीं आला. भोंसल्यांच्या लोकांनीं नर्मदेच्या प्रदेशांत त्यास सर्व प्रकारें मदत देऊन रसद वगैरे मिळवून दिली व गॉडर्ड हा ता. २।१२।७८ रोजीं हुशंगा-बादेजवळ नर्मदा उतरून दक्षिणेस आला. भोंसल्याशी कायमचा दोस्तीचा तह करण्यासंबंधानें कलकत्त्यास **बेनीराम** व **विश्वंभर**[१] पंडितांमार्फत पूर्वींच बोलणें चालणें चाललें होतें व त्या कामाकरितांच **हेस्टिंग्जनें** **बेनीराम** व **विश्वंभर** यांस लेस्लीच्या सैन्याबरोबर पाठविलें होतें व काल्पीस ते लेस्लीच्या सैन्यांत होते. लेस्लीच्या मृत्यूनंतर **गॉडर्ड** यास हेस्टिंग्ज़नें नागपुरकरांशीं तहाबद्दल बोलण्याचा अधिकार दिला होता. गॉडर्ड यानें बेनीरामास[२] नागपुरास बोलण्याकरितां रवाना केलें व त्याचे मागोमाग ले. वादरस्टन यासहि नागपुरास रवाना केलें व गॉडर्ड पुढें कूच करून निघून गेला. वादरस्टन ता. १९-२-१७७८ रोजीं नागपुरास आला तोंच कलकत्त्याहून संबळपुराकडून आलेले दुसरे इंग्रज वकील नुकतेच हुशंगाबादेकडे निघून गेले होते.

इकडे हेस्टिंग्ज यानें **इलियट** यास नागपुरास याच कामाकरितां पाठ-विलें होतें. परंतु तो मध्येंच ता. १२-९-१७७८ रोजीं सारंगड[३]

---

१ बेनिराम व विश्वंभर हे दोघेहि भोंसल्यांचे नोकर असून त्यांचेतर्फे कलकत्त्यास हेस्टिंग्जकडे होते. त्यांनीं हेस्टिंग्जकडून वारंवार भरपूर पैसे खाऊन इंग्रजांचें हित केलें.

२ बेनीराम नागपुरास जातांना आपला भाऊ रामभद्र व पुतण्या हरि-भद्र यांस गॉडर्डच्या सैन्याबरोबर ठेवून गेला. रामभद्र हा गॉडर्डबरोबर सुरतेस गेला व पुढील युद्धांत त्याचेच बरोबर होता. (वंशावळ पहा.)

३ सारंगड येथें इलियटचें थडगें आहे.

संस्थानांत मरण पावला ही हकीकत मागें आलीच आहे त्यानंतर त्याचा दुय्यम फारकहर हाहि रस्त्यांत मरण पावला. परंतु त्याचे बरोबरचे **कॅंबेल** व **अंडरसन**[१] हे दोघे नागपुरास मोठ्या कष्टानें ता. १४-११-७८ रोजीं येऊन पोहोंचले व १२ दिसेंबरपर्यंत नागपुरास राहिले.[२]

**बेनीराम** हा वरील दोघांशीं मुधोजीतर्फे बोलत होता परंतु कायमच्या दोस्तीच्या तहासंबंधानें निश्चित कांहीं ठरण्यासारखें न दिसल्यामुळें ते दोघे **गॉडर्डकडे** हुशंगाबादेस जाण्यास निघाले व सावनेर, पांढुरणा, मुलताई, बेतुल, शहापुर या मार्गानें हुशंगाबादेस गॉडर्ड यास जाऊन मिळाले. बेनीराम[३] हा मुधोजीचा निरोप घेऊन परत कलकत्यास गेला.

**वादरस्टनची वकिली : दिसेंबर १७७८--वादरस्टन** नागपुरास आल्यावर त्याचे डोळे उघडले. सातारच्या गादीची लालूच दाखवून मुधोजीस ताब्यांत घेण्याचा जो इंग्रजांचा डाव होता त्यांत कांहींच अर्थ नाहीं असें त्यास दिसून आलें. मुधोजी अगर त्याचे मुत्सद्दी यांजपैकीं कोणासहि ही गोष्ट शक्य कोटींतील वाटत नव्हती व खुद्द **मुधोजी**सुद्धां या गोष्टीस कबूल नव्हता. पुणेंदरबारचा त्याचा सलोखा झाला होता व तो तोडण्यास **मुधोजी** तयार नव्हता. अशा प्रयत्नांत यश येण्याऐवजीं सर्व मराठा संस्थानिक व खुद्द पेशवे भोंसल्यावर उलटले असते हें उघड होतें. भोंसल्यांचा

---

१ हाच अँडरसन पुढील युद्धांत महादजीकडे इंग्रजांतर्फे वकील होता व त्याचेच मार्फतीनें सालबाईचा तह ठरला. त्यास मराठी कागदांत इंद्रसेन असें म्हटलें आहे.

२ मुधोजीनें त्यांना आणण्याकरितां बेनीराम पंडित व महमदअली दोघांस कांहीं मजली पुढें पाठविलें होतें.

३ इ. स. १७८१ मध्यें काशीच्या चेतसिंगाच्या प्रकरणांत काशीचे लोकांनीं हेस्टिंग्जवर गर्दी करून त्यास मारण्याचा प्रयत्न केला त्या वेळीं याच बेनीराम व विश्वंभर बंधूंनीं त्यास आपल्या पालखीत लपवून पळवून चुनारगडास नेऊन पोहोंचविलें. बेनीराम व विश्वंभर पंडितांचे वंशज काशीचे बाजूस रहात आहेत व त्यांस इंग्रजसरकारनें दिलेलीं इनामें व जहागिरी चालू आहेत. वंशावळ पहा.

दिवाण **दिवाकरपंत** हा कसलेला मुत्सद्दी या जाळ्यांत सांपडणारा नव्हता. त्याचेकडे इंग्रजांचा प्रत्यक्ष पत्रव्यवहार व मायाजाळ चालूच होतें म्हणून तो तरी या कामांत मदत करील असें **वादरस्टन** यास वाटलें, परंतु त्यास अनुभव आला कीं आपणापेक्षां **दिवाकरपंत** फारच धूर्त आहे व तो इतक्या थरास मुधोजीस जाऊं देणार नाही. **वादरस्टननें** हेस्टिंग्ज यास जो रिपोर्ट केला त्यांत तो म्हणतो, "तेथील सर्व कारभार दिवाकरपंताचे स्वाधीन आहे व तोच सर्व कांही करतो. त्याचे वजन फार असून तो फार दूरदर्शी व कर्तबगार आहे. आपल्या मालकाला सातारच्या गादीच्या नादास पडूं देण्याची त्याची अनुकूलता दिसत नाहीं व नवीन भानगडी उपस्थित करून आपल्या हल्लींच्या राज्याच्या बळकटीस कमीपणा येईल असे कोणतेहि मनसुबे तो राजास करूं देत नाहीं. ज्यांत अपेश येण्याचा संभव नाहीं अशी खात्री आहे अशीच कामें तो राजास करूं देतो. सारांश **दिवाकरपंताशीं** झालेल्या माझ्या बोलण्यावरून मला असें वाटतें की राजाच्या मनांत जरी ही गोष्ट असली तरी दिवाण **दिवाकरपंतास** आवडत नसावें."

नागपुरचें राजकारण फसलें असें पाहून **वादरस्टन** [१] परत हुशंगाबादेस गेला. तितक्यांत मराठ्यांशीं युद्ध सुरू झाल्यामुळें **गॉडर्ड** यास मुंबईहून जलदीचें बोलावणें आलें व तो सुरतेकडे निघून गेला. त्याचेबरोबर **बेनीराम पंडित** होता तो नागपुरास परत आला व तेथून कलकत्त्यास भोंसल्याचा वकील म्हणून पूर्वीप्रमाणें जाऊन राहिला. **बेनीराम पंडित** व **दिवाकरपंत** या दोघांमधील फरक लक्षांत टेवण्यासारखा आहे. **बेनीराम पंडित** हा हेस्टिंग्जचे मनांतील हेतु साध्य करण्यास मनापासून मदत करीत होता तर **दिवाकरपंतानें** ते सर्व डाव हाणून पाडले. नाहींतर पहिल्या मराठा युद्धांतच मराठ्यांचा पाडाव झाला असता व मराठी राज्याचा बोज जो पुढें पंचवीस वर्षे तरी कायम होता तो याच वेळी उडाला असता.

**वॉदरस्टनचें नागपुराहून प्रयाण**—ही परिस्थिति ओळखून **वादरस्टन** यानें त्याप्रमाणें कलकत्त्यास निराशेचा रिपोर्ट केला व आपण **ता.**

---

१ वॉदरस्टन हा पुढें पुण्यास इंग्रजांचा वकील म्हणूस नाना फडणीसाकडे गेला होता. त्यास मराठी कागदांत उदिष्टीन असें म्हटलें आहे.

१७–१–१७७९ रोजीं नागपुराहून निघून हुशंगाबादेस जाऊन गॉडर्ड यास मिळाला व तेथून निघून तो मुबईस गेला. मुंबईकरांनीं याच **वॉट्रस्टनास** पुढील युद्धांत नाना फडणीसाशीं बोलण्याकरितां पुण्यास पाठविलें होतें परंतु हेस्टिंग्जनें महादजी शिंद्याकडे **अँडरसन** यास पाठवून त्याजकडे तहाचें बोलणें लावण्याचें काम दिल्यामुळें **वॉट्रस्टन** परत मुंबईस गेला व **अँडरसनामार्फत** महादजी शिंद्याशीं **सालबाईचा तह** झाला.

**गॉडर्ड याचें मुंबईस आगमन—गॉडर्ड** हा मुंबईस इतक्या आणीबाणीच्या वेळीं पोंहचला कीं, मुबईच्या गव्हर्नरास त्याबद्दल मोठा आनंद झाला व त्यानें त्यास आपल्या कौन्सिलांत जागा दिली. **गॉडर्ड** हा फार कर्तबगार मनुष्य असून पुढील युद्धांत तो फार उपयोगी पडला.

गॉडर्ड हा मुबईस जात असतां इंग्रजांची प्रत्यक्ष मराठ्यांशीं लढाई सुरू झालेली नव्हती; परंतु यापूर्वीं नुकतीच इंग्रज मराठ्यांची लढाई झालेली होतो व तंट्याचें मूळ जो **राघोबादादा** तो इंग्रजांजवळच होता. म्हणून मराठे व इंग्रज यांचें पुढेंमागें युद्ध सुरू होणारच होतें. मुबईकर इंग्रज पुणेदरबाराशीं वाकडेंच वागत असत व त्याबद्दल पुणेदरबारानें गव्ह. ज. याजकडे त्यांजविरुद्ध तक्रारीहि केल्या होत्या. मराठे सरदारांनीं **गॉडर्डचें** सैन्य आपल्या मुलखांतून जाऊं देणें दूरदर्शीपणाचें नव्हतें. **मोरोबादादा** जाणूनबुजून इंग्रजांचा व **राघोबाचा** पक्षपाती होता. परंतु त्याची सत्ता क्षणिकच राहिली व नानाचा पक्ष पुन्हां अधिकारारूढ झाला. नानास एकट्यासच हें संकट दिसलें. त्यानें **दिवाकरपंतास** व **मुधोजीस** या अदूरदृष्टीबद्दल व इंग्रजांस मदत दिल्याबद्दल दोष दिला व इंग्रजांचें संकट सर्वच मराठ्यांना व इतर राजेरजवाड्यांना कसें सारखेंच आहे तें दाखविलें. नाना एका पत्रांत म्हणतो " इंग्रजांची व चक्राची चाल एक. ज्या राज्यांत टोपीकरांची पैरव झाली तेथील गति काय हें कांहीं लोपलें नाहीं. " परंतु हें गूढ भोंसल्यांस व इतरांस त्यावेळीं पूर्ण उमगलें नाहीं.[१]

---

१ भोंसल्यांनीं वरप्रमाणें गॉडर्डच्या सैन्यास मदत केली एवढेंच नाहीं तर फरेंच व इंग्रज यांची लढाई सुरू झाल्यावर चंद्रनगरचा फरेंच अंमलदार शेवलियर हा पळून ओरीसांत गेला त्यास व इतर फरेंचांस पकडून कल-

**नानानें दिवाकरपंताची** कानउघाडणी केल्यावर **मुधोजीस** पुणें दरबारची भीति वाटली व त्यानें **दिवाकरपंतास** पुण्यास पाठविलें. तेथें नानानें त्यास सर्व गोष्टी समजावून पुढील राष्ट्रसंघाच्या जुटींत भोंसल्यांनीं बंगाल्यावर स्वारी करावी असें वचन **दिवाकरपंतां**कडून घेतलें व त्याप्रमाणें वागल्यास **गढामंडला** प्रांताच्या सनदा भोंसल्यांस देण्याचें वचन दिलें परंतु हें वचन पाळण्यांतहि भोंसल्यांनीं किती कृत्रिमपणा केला हें पुढें दिसून येईल.

महादजी शिंद्यानें जरी प्रथम लेस्ली याच्या सैन्यास अडविलें नाहीं तरी बुदेलखंडांत लेस्लीचें सैन्य येऊन त्यानें काल्पी शहर घेऊन तेथें तळ दिल्यानंतर महादजीस आपली चूक समजून आली. कदाचित् त्यास पुणेदरबाराकडूनहि सूचना गेली असावी. महादजीनें ग. ज. स पत्रें लिहिली कीं लेस्लीनें बुदेलखंडांत बराच घुमाकूळ चालविला आहे तरी इंग्रजी सैन्य तुम्ही परत बोलावून घ्यावें. नाहींतर तुमची आमची गोडी राहणार नाहीं. त्याचप्रमाणें त्यानें आपला वकील **सदाशंकर** व राजा **गोविंदराम** यांजकडूनहि गव्हर्नर जनरलास आपलें म्हणणें कळविलें परंतु ग. ज. नें तिकडे कांहींच लक्ष दिलें नाहीं व महादजीनेंहि इंग्रजी लष्करास अडविण्याचा प्रयत्न केला नाहीं.

---

कत्त्यास पाठविण्याबद्दल ग. ज. यानें ओरीसाचा सुभेदार राजारामपंत यास लिहिलें व मुधोजीनेंहि तसाच हुकूम पाठविला. त्याप्रमाणें राजारामपंतानें त्यांना पकडून कलकत्त्यास पाठवून दिलें. अंडरसन व क्यँबेल यांसहि ओरीसांतून जाऊं देण्याबद्दल ग. ज नें मुधोजीस परवाने मागितले होते. ते नागपुरास सडेच जाणार होते परंतु मुधोजीचा गैरसमज झाला कीं ते सैन्यासह ओरीसांतून काल्पीकडे लेस्ली यास मिळण्यास जात आहेत. मुधोजीच्या इंग्रजांविषयींच्या अकृत्रिम स्नेहाप्रमाणें मुधोजीनें या दोघा सरदारांसहि ओरीसांतून सैन्यासह जाण्याचे परवाने दिले. परंतु ग. ज. यानें ते सडेच नागपुर-संबळपुर मार्गानें येणार आहेत असें लिहून गैरसमजुतीनें कां होईना मुधोजीनें सैन्यासह त्यांना आपल्या मुलखांतून रस्ता देण्याचें कबूल केल्याबद्दल त्याचे फार आभार मानले.

हेस्टिंग्ज यानें मुधोजीस आपल्या प्रांतांतून गॉडर्ड याचें इंग्रजी लष्कर जाऊं देण्याबद्दल कळविलें एवढेंच नव्हे तर भोंसल्यांचें लष्करहि गॉडर्डच्या लष्कराबरोबर मुंबईपर्यंत द्या असेंहि त्यास लिहिलें होतें. परंतु मुधोजीनें तेवढें मात्र केलें नाहीं. यानंतर लवकरच इंग्रजांची मराठ्यांशीं उघड लढाई सुरू झाल्यानंतर मात्र बंगाल्यांतून मद्रासेकडे क. पीयर्स याचे सैन्या-बरोबर चिमणाबापूनें आपलें सैन्य उघडपणें दिलें. मराठी सैन्याचा आप-णास कांहीं प्रत्यक्ष उपयोग होईल अशी दोन्हीहि प्रसंगीं हेस्टिंग्जची कल्पना नव्हती, परंतु भोंसल्यांचे सैन्य इंग्रजी सैन्याबरोबर असल्यानें भोंसल्यांची इंग्रजांशीं उघडपणें दोस्ती आहे हें दाखवून दुसऱ्या पक्षाची हिम्मत खचवि-ण्याचा हेस्टिंग्जचा हा डाव होता

---

## भाग ९ वा

## दुसरा रघूजी ( पुढें चालू )

# पहिलें मराठा-इंग्रज युद्ध

( नागपुरास आलेले इंग्रज वकील व त्यांनीं केलेलें राज्याचें वर्णन )

( १७६१-१८०३ )

## नाना फडणीसाचें इंग्रजांविरुद्ध जंगी कारस्थान
## व
## भोंसल्यांचा इंग्रजांशीं गुप्त तह

इंग्रजांचें वाढतें बळ व मराठ्यांच्या राजकारणांत त्यांची ढवळाढवळ पाहून नाना फडणिसास इंग्रजांचें संकट कळून चुकलें. **राघोबादादास** हाताशीं धरून मुबईकर इंग्रजांनीं साष्टी वगैरे प्रांत मिळविला व पुणें दरबाराशीं युद्ध सुरू केलें. पुरंदरच्या तहाच्या शर्तीप्रमाणें राघोबादादानें पेन्शन घेऊन स्वस्थ बसावें असें ठरलें होतें; परंतु, राघोबा पळून पुन्हां सुरतेस गेला व मुंबईकर इंग्रजांनीं त्यास घेऊन पुण्यावर चाल केली. परंतु मराठ्यांनीं इंग्रजांच्या सैन्याचा पराभव करून **वडगांव** येथें ता. १७-१-१७७९ रोजीं तह केला. त्यांत मराठ्यांची वरचढ होऊन इंग्रजांस पूर्णपणें पडतें घेऊन वाटेल त्या शर्ती कबूल करून राघोबाचा पक्ष सोडून द्यावा लागला. त्यामुळें इंग्रजांची इभ्रत कमी होऊन मुबईकर इंग्रजांस ह्या अपजयाची फारच खंती वाटली. मुबईकरांनीं कलकत्तेकर इंग्रजांची मदत मागितली. त्याप्रमाणें त्यांनीं **क. लेस्ली** यास पूर्वीं सांगितल्याप्रमाणें मुंबईकडे रवाना केलें व मुधोजी भोंसल्यास त्यास मदत करण्यास लिहिलें. त्याप्रमाणें भोंसल्यानें आपलीं माणसें नर्मदेच्या कांठीं पाठविलीं. परंतु, सुदैवानें **लेस्लीच्या** सुस्तीमुळें तो बुंदेलखंडांतच बसून राहिल्यामुळें ती मदत मुबईकरांना लवकर न मिळून मराठ्यांचा बोज कायम राहिला.

वडगांवचा तह इंग्रजांना फारच नामुष्कीचा वाटल्यामुळें मुंबईच्या गव्हर्नरानें तो नाकबूल केला व त्या अधिकाऱ्यांना तह करण्याचा अधिकारच

नव्हता म्हणून तक्रार सुरू केली व जान्युआरी १७८० मध्यें त्यानें मराठ्यांशीं पुनः लढाई सुरू केली.

वरील तहानें इंग्रजांनीं राघोबादादास पुणें दरबारच्या ताब्यांत द्यावें व साष्टी सोडावी असें ठरलें असतां त्यांपैकीं इंग्रजांनीं एकहि केलें नाहीं. हेस्टिंग्ज यानें आपण मुधोजीशीं तह करतों तोंपर्यंत तुम्ही पुणें दरबारशीं भांडण सुरू करूं नका म्हणून मुबईकरांस आगाऊच सूचना केली होती. परंतु मुंबईकर इंग्रजांनीं तें न ऐकतां भांडण सुरू केलें. राघोबादादा सुरतेस येऊन बसल्यामुळें त्यांनाहि तें लांबविणें शक्य नव्हतें.

इकडे **हैदरअल्लीचें** व इंग्रजांचें कर्नाटकांत युद्ध सुरू झालें व हैदरानें इंग्रजांचा पराभव करून सर हेक्टर **मनरो** यास मद्रासपर्यंत पिटाळून लावलें. मुंबईकर इंग्रजांनीं **वडगांवचा** तह अमान्य केल्यामुळें नाना फडणीसानें एक जंगी कारस्थान रचलें व तें नानाच्या तजविजीप्रमाणें पूर्णपणें शेवटास गेलें असतें तर इंग्रजांची हिंदुस्थानांतील सत्ता पूर्णपणें मोडली असती. परंतु नानाइतका दूरदर्शी मुत्सद्दी सर्व मराठेशाहींत कोणीच राहिला नव्हता. यामुळें इंग्रजांची जरी पिछेहाट झाली तरी ती तात्पुरतीच होती व एवढ्या मोठ्या कारस्थानाच्या मानानें फलनिष्पत्ति कांहीं झाली नाहीं.

हिंदुस्थानांतील प्रमुख संस्थानिक एक होऊन चोहोंकडून इंग्रजांवर एकदम लढाई केल्याशिवाय इंग्रजांचा मोड होणार नाहीं हें नानानें ओळखलें. मुम्बई, मद्रास व बंगाल या तिन्ही ठिकाणीं इंग्रजांचें सैन्य होतें व एकाच ठिकाणीं लढाई सुरू केल्यास इतर दोन्ही ठाण्यांचीं इंग्रजी सैन्यें तेथें मदतीस येऊन त्यांचा बचाव करतील म्हणून नानानें असें कारस्थान रचलें कीं, पेशवे, शिंदे, भोंसले, हैदर व निजाम यांनीं एकजूट करून आपआपले बाजूस इंग्रजांचा मोड करावा. या बेताकरितां व त्याचे पुढील बजावणीकरितां नानानें आपलें बुद्धि–सर्वस्व खर्च केलें. परंतु नागपुरकर भोंसले व निजाम यांच्या विश्वासघातकीपणामुळें व कांहीं अंशीं महादजी शिंद्याच्या स्वार्थीपणामुळें या राष्ट्रसंघाचा नांवाचाच जय झाला व इंग्रजांचा पूर्ण मोड झाला नाहीं.

**मुधोजी** यानें इंग्रजांशीं उघड तह करण्याचें टाळलें तरी एकमेकांचे वकील एकमेकांकडे जात असत व दोस्तीचा पत्रव्यवहार चालच असे. भोंस-

त्यानें **लेस्ली** व **गॉडर्ड** यांस जें साह्य केलें त्यामुळें इंग्रजांना बरेंच उत्तेजन मिळालें व फेब्रुवारी १७६९ मध्यें हेस्टिंग्जनें 'अद्याप तुम्हीं ठरल्याप्रमाणें तह करीत नाहीं याबद्दल खेद वाटतो' अशा अर्थाचें पत्र पाठवून तह करण्याविषयीं भोंसल्यास आग्रह केला; परंतु अशा कोरड्या शर्तीवर भोंसले तह करण्यास कबूल होईनात. भोंसल्यांच्या मनांत ओरिसा प्रांत न सोडतां बंगालची चौथाईची रक्कम हस्तगत करावयाची होती. त्याशिवाय ते तह करण्यास तयार नाहींत हें **गॉडर्ड** याच्या पत्रावरून हेस्टिंग्ज यास कळून चुकलें. परंतु ओरिसा मिळाल्याशिवाय बंगालची चौथाई द्यावयाची नाहीं हें इंग्रजांचें धोरणहि ठरलेलेंच होतें. त्यामुळें तहाची गोष्ट तशीच राहिली.

माहे सप्टेंबर १७७९ मध्यें **क. गॉडर्ड** याचें पत्र ग. ज. यास गेलें. त्यांत त्याला सुगावा लागला की, नाना फडणीसानें शिंदे, भोंसले, हैदर व निजाम यांची एकजूट करून सर्व बाजूंनीं इंग्रजांवर हल्ला करून त्यांस घालवून लावण्याचा कट केला आहे. पेशवे व शिंदे यांनीं मुंबई, सुरत वगैरे ठिकाणच्या पश्चिमेकडील ठाण्यांवर हल्ला करावा, **हैदरानें मद्रासचे** ठाण्यावर हल्ला करावा, निजामानें शिकाकोल, राजमहेंद्री वगैरे उत्तर सरकारांतील इंग्रजांचीं ठाणीं उठवावीं व **भोंसल्यांनीं** बंगाल्यावर हल्ला करावा असा सर्वांचा विचार ठरून हैदर, पेशवे व शिंदे यांनीं आपलें सैन्य हलविलें. नानानें भोंसल्यांसहि बंगाल्यावर सैन्य पाठविण्याचा तगादा लावला. **मुधोजीनें** आपला पुत्र **चिमणाबापू** ऊर्फ खंडोजी यास दसऱ्याच्या मुहूर्तानें (ता. ११–८–१७७९) नागपुराहून चाळीस हजार स्वारांसह रवाना केलें. भोंसल्यांचा पेशव्यांशीं **गढामंडला** प्रांताचे सनदांबदल बरेच दिवस लढा चालू होता व भोंसल्याच्या मनांत तें एक शल्यच होतें; तें निघावें म्हणून नानानें मुद्दाम या प्रांताच्या सनदा भोंसल्यांस देऊं केल्या. हेतु हा कीं, भोंसल्यानें मनापासून या जुटीस मदत करून बंगाल्यावर हल्ला करून इंग्रजांस बेजार करावें. तसेंच भोंसल्यांचा दिवाण दिवाकरपंत याचेकडूनहि नानानें वरील गोष्टी समक्ष कबूल करून घेतल्या.

**चिमणाबापूनें** प्रथम **बिहार** प्रांतांत शिरावें व तिकडून बंगाल्यांत जावें असा क्रम सर्व दोस्तांच्या विचारानें ठरलेला होता व तोच रस्ता चांगला सोईचाहि होता. या कामास दोन महिने लागावयाचे; परंतु, चिमणाजीनें

मुद्दाम रस्ता बदलून तो प्रथम **कटक**प्रांताकडे गेला. रस्त्यानेंहि मुद्दाम तळ देऊन व मुक्काम लांबवून १७८० चे मे महिन्यांत म्हणजे आठ नऊ महिन्यांनी तो कटक प्रांतांत आला व एकदम बंगाल्यांत न शिरतां पावसाळा जवळ येण्याची वाट पहात बसला. पावसाळ्याचें निमित्त करून कटक प्रांतांतच सर्व पावसाळा घालवावा असा त्याचा उद्देश स्पष्ट दिसत होता, एकंदरीत पहिलेपासूनच भोंसल्यानें विश्वासघातास सुरवात केली. हेस्टिंग्जनें लिहिलेल्या पत्रांवरून ही योजना मुधोजीनें चिमणाबापूस नागपुराहून निघतांनाच सांगितली होती असें सिद्ध होतें.

हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख संस्थानिकांचें बळ आपल्या विरुद्ध एकवटलेलें पाहून सर्व इंग्रज घाबरले. तशांत फरेंचांचीहि या जुटीस मदत होईल ही भीति होती. या वेळीं **हेस्टिंग्ज**सारखा धीराचा मनुष्य असल्यामुळें व या एकजुटींतील भोंसले व निजाम हे फितुर झाल्यामुळेंच इंग्रजांचा बचाव झाला.

प्रथम **हेस्टिंग्ज** यानें मुधोजी भोंसल्याच्या मार्फत पुणें दरबारीं तह करण्याचा घाट घातला व तहाच्या शर्तीचा एक नमुना देऊन एक वकील नागपुरास पाठविला. ता. ९–१–८१ रोजीं त्याचें उत्तर आलें, त्यांत पुणेदरबारशीं तह होणें बरेंच दुरापास्त आहे असें त्यास लिहून आलें व त्यांतच **मुधोजीनें** आपल्या जुन्या मागण्या जास्त जोरानें पुढें मांडल्या; त्यामुळें तह होण्याचा संभव राहिला नाहीं.

भोंसल्यांचें इंग्रजांशी आतून सूत चालू आहे ही गोष्ट गुप्त राहिली नाहीं. हुशंगाबाद येथें भोंसल्यांनीं गॉडर्ड यास उघड मदत केल्यामुळें पुणेंदरबारास या कृत्याबद्दल भोंसल्यांचा राग आलाच होता. तो काढून टाकण्याकरितां मुधोजीनें आपला दिवाण **दिवाकरपंत** यास पुण्यास पाठविलें. त्याचप्रमाणें हेस्टिंग्ज यासहि कळविलें कीं, पुण्यास आम्हीं फरेंचांचा जम बसूं देणार नाहीं व पुणें दरबारशीं तुमचा तह करून देऊं व याच कामाकरितां आम्हीं दिवाकरपंतास पुण्यास पाठविलें आहे. इकडे सखारामबापू व नाना यांनीहिं हेस्टिंग्ज यास कळविलें कीं, आम्ही फरेंचांशीं संबंध ठेवतों व त्यांशींच तह करणार आहों ही जी बातमी

तुम्हांस समजली ती खरी नाहीं. सेंट ल्यूबिन यास आम्हीं परत पाठवून दिलें आहे व त्याच्याशीं कोणताहि करारमदार केला नाहीं. उलट मुंबईकर इंग्रजांनी मात्र पुरंदरच्या तहाप्रमाणें कांहीच वागणूक न करितां त्या तहाच्या शर्तीविरुद्ध पुन्हां राघोबाचा पक्ष धरला व पुण्यावर चाल केली. हेस्टिंग्जनेंहि पुणें-दरबारास कळविलें कीं, मुंबईकरांनी लढाई करून वडगांवचा तह केला. हीं दोन्हीं कृत्यें त्यांच्या अधिकाराच्या बाहेरचीं होतीं. म्हणून वडगांवचा तह नामंजूर करून पुन्हां पुरंदराच्या तहास अनुसरून नवीन तह करण्यास आम्ही ज. **गॉडर्ड** यास सर्वाधिकार दिले आहेत. त्याच्याशीं तुम्ही बोलणें चालणें करून दोस्तीचा तह ठरवा. नाना फडणीस व ज. **गॉडर्ड** यांजमध्यें पत्रव्यवहार होऊन पुण्याजवळ दोघांच्या भेटी होण्याचें ठरलें. या कामांत दिवाकरपंतानें दोन्ही पक्षांत मध्यस्थी करून तह घडवून आणण्याची फार खटपट केली. दोन्ही पक्षांच्या मनांतील गैरसमजुती काढून टाकून त्यांचा दोस्तीचा तह घडवून आणणें हें भोंसल्यांच्या हिताच्या दृष्टीनें दिवाकरपंतास जरूरीचें वाटत होतें. पेशवे व इंग्रज यांचा सलोखा नसतांना भोंसल्यांनीं इंग्रजांशीं तह करणें हेंहि त्यांना अनिष्टच होतें म्हणून दिवाकरपंतानें नाना फडणिसास व **गॉडर्ड** यांस वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु वरील भेटी होण्यापूर्वी नानानें गॉडर्ड यास अशी अट घातली कीं, राघोबादादास आमच्या ताब्यांत द्यावें व साष्टी बेट मराठ्यांच्या ताब्यांत द्यावें-हें कबूल असेल तर पुढील गोष्टी बोलूं. **गाडर्ड** यास वरील गोष्ट कबूल झाली नाहीं म्हणून प्रत्यक्ष भेटी होऊन तहाच्या वाटाघाटी होण्याचें कारणच उरलें नाहीं. हें पाहून दिवाकरपंत हा दसऱ्याकरितां नागपुरास येण्याचें निमित्त करून १७७९ च्या ऑगस्ट महिन्यांत नागपुराकडेस निघून आला.

इकडे मुधोजीनें **बेनीराम** व **इलीयट**चा पेशकार **रमाकांत** यांस नागपुराहून कलकत्त्यास पाठविलें. त्यांचेबरोबर हेस्टिंग्ज यास पत्रें दिलीं. परंतु हेस्टिंग्जच्या इच्छेप्रमाणें इंग्रजांशीं तह करण्याची पूर्ण तयारी न दाखवितां तुम्ही पुणें दरबारशीं तह करा त्यांत मीं तुम्हांस सर्वप्रकारें मदत करितों व तुम्हा दोघांमध्यें जामीनहि राहतों असाच आग्रह जास्त दाखविला. पुणें दरबारशीं भांडण असतां आपल्याशीं उघड तह करण्यास मुधोजी

तयार होणार नाहीं हें हेस्टिंग्जनें पक्कें ओळखलें व पूर्वीं हुशंगाबादेस ज. गॉडर्ड यांस केलेल्या मदतीबद्दल त्यानें कोरडे आभार मानून तह नाहीं तर नाहीं, परंतु पुढेंहि तशीच मित्रत्वाची वर्तणूक ठेवा असें लिहून तहाची गोष्ट तितकीच ठेविली. इकडे गॉडर्ड व नाना फडणीस यांजमध्यें तहाच्या शर्ती न ठरल्यामुळें इंग्रज व मराठे यांजमध्यें उघड युद्ध सुरू झालें.

दिवाकरपंत पुण्याहून निघण्यापूर्वींच नानानें निजाम व हैदर यांशीं एकमत करून चोहोंकडून सर्वांनीं इंग्रजांवर हल्ले करण्याचें टरविलें होतें. त्याचप्रमाणें भोंसल्यांनींही बंगाल्यावर स्वारी करावी असें नानानें दिवाकर-पंतांकडूनहि कबूल करून घेतलें होतें हें मागें सांगितलेंच आहे.

निजाम, हैदर, शिंदे व होळकर या सर्वांनीं इंग्रजांशीं युद्ध सुरू केलें असतां व पेशव्यानें भोंसल्यासहि तसा हुकूम केला असतां कांहींच न करणें हें मुधोजीस कठीण वाटलें. उलट इंग्रजांशीं लढाई करणें हेंहि मुधोजीच्या मनास येईना. मधोजीचा वकील **बेनीराम** हा कलकत्त्यास हेस्टिंग्जजवळ असून त्याचा भाऊ **रामभद्र** हा गॉडर्डच्या सैन्याबरोबर होता. ते दोघेही इंग्रजांच्या तर्फेनें खटपट करीत होते. इंग्रजांशी वैर केल्यानें बंगाल व ओरिसा इकडील आपलें राज्यकारण बिघडेल व इंग्रज आपले कायमचे वैरी होतील ही भीति मुधोजीस वाटत होती व इंग्रजांवर स्वारी कर-ण्याची लष्करी धमकहि त्याजमध्यें नव्हती. तसेंच दूरदृष्टीनें विचार कर ण्याची संवय नसल्यामुळें मराठी साम्राज्याच्या कल्याणाच्या दृष्टीनें आपण केवढें पातक करीत आहों याची शुद्ध मुधोजीस राहिली नाही. त्यानें नुसतें दाखविण्यापुरतें सैन्य तयार करून बंगालकडे पाठविलें व त्यावर आपला मुलगा **चिमणाबापू** यास मुख्य अधिकारी नेमून **भवानी काळू** यास सेनापति नेमिलें. या दोघांनाहि त्यानें आपले मनांतील गुप्त हेतु सांगून ठेविला तो असा कीं, ही स्वारी पेशवे वगैरे सरदारांस दाख-विण्यापुरतीच असून आपणास खरोखर इंग्रजांशीं युद्ध करावयाचें नाहीं. रस्त्यानें मुद्दाम वेळ घालवून पावसाळ्यांत ओरिसा प्रांतांत तळ देऊन बंगालवर स्वारी करण्याचें अजिबात टाळण्याचीहि सूचना त्यानें वरील दोघांस केली होती. तसेंच इंग्रजांविरुद्ध नानानें बनविलेल्या कटाची सर्व

माहिती मुधोजीनें हेस्टिंग्ज यास देऊन हेस्टिंग्जजवळ दोस्तीची याचनाही तो करीतच होता. त्यानें हेस्टिंग्ज यास कळविलें कीं, मी या कटात सामील झालों नसतों तर माझी अवस्था कठीण झाली असती. (पत्र नं. १९५७ पर्शियन कॅ. भा. ५)

या बाबतींत दिवाकरपंतानें **बेनीराम**पंतास कलकत्त्यास वरील पत्राबरोबरच ता. २५–६–१७८० रोजीं पाठविलेल्या सविस्तर पत्रांत तो म्हणतो " पुण्याहून हुकूम आल्यावरून मुधोजीनें इंग्रजांविरुद्ध लढाई करण्याचें नाइलाजानें कबूल केलें आहे व तसें सोंग दाखविण्याकरितां व निव्वळ जगास दाखविण्यापुरतें सैन्य उभें करून चिमणाजीबरोबर कटक प्रांताकडे तीस हजार स्वारांचें लष्कर पाठविलें आहे (आक्टोबर १७७०). परंतु आपला हेतु इंग्रजांस दुखविण्याचा नसून त्यांची याबद्दल खात्री पटावी म्हणून राजानें चिमणाजीस गुप्तपणें सांगून ठेविलें होतें कीं, तुम्ही जलद न जातां रस्त्यानें हळूहळू मुक्काम करीत करीत जावें व या सांगीप्रमाणें चिमणाजीनें रस्त्यांतच सात महिने लाविले. आणखीहि वेळ घालविण्याकरितां राजानें चिमणाजीस सांगितलें आहे कीं, पावसाळा संपेपर्यंत तुम्ही कटक प्रांतांतच तळ देऊन रहा. इंग्रजांशी दोस्ती टेवावयाची नसती तर आमच्या लष्करानें आजिमाबादेच्या[१] रस्त्यानें एकदम बंगाल्यावर स्वारी करून सर्व प्रांत उध्वस्त केला असता." (पत्र नं. १९५६)

हुशंगाबाद येथें गॉडर्डच्या सैन्याची भोंसल्यांनी जी सरबराई केली तिची भरपाई करण्याकरितां हेस्टिंग्जनें चिमणाजीचे सैन्यास कटक प्रांतांत दाणावैरण वगैरेची भरपूर मदत दिली. त्याप्रमाणें हेस्टिंग्जनें बंगाल्यांतून क. **बेली** नांवाच्या सरदारास सैन्यासह कटक प्रांतांतून मद्रासेकडे हैदरावर रवाना केलें. त्यास चिमणाजीनेंहि सर्व प्रकारची मदत देऊन पुढें रवाना केलें. हे सर्व खेळ पाहण्यास पेशव्यांचा वकील नारोपंत म्हणून भोसल्यांच्या लष्कराबरोबर होता परंतु त्यास सर्व प्रकार न कळावे म्हणून योग्य खबरदारी घेण्यांत येत असे.[२] चिमणाजीनें आपलें मुख्य काम सोडून जगन्नाथाचे

१ पाटणा.

२ पुण्याचा कलकत्त्याचा वकील लाला सेवकराम हा भोंसल्यांच्या व बेनीरामाच्या वर्तणुकीविषयीं व त्यांच्या गुप्त खलबतांविषयीं नानास वेळोवेळीं कळवीत होता.

यात्रेंतहि एक महिना घालविला. **भवानी काळू** हा **बेनीराम** यास लिहितो, "ग. ज. च्या इच्छेप्रमाणें क. **बेली** यास आम्ही आमचे प्रांतांतून सुरक्षितपणें मद्रासकडे पोंचवून देऊं. राजानें (मुधोजीनें) सांगितल्याप्रमाणें आम्ही संबळपुरास एक महिनाभर मुक्काम केला व मग हळू हळू फार दिवसांनीं कटक येथें आलों. पेशव्यांचा वकील **नारोपंत** हा आमच्या लष्कराबरोबरच आहे, आम्ही मुद्दाम हळूहळू जातों व आंतून इंग्रजांस अनुकूल आहों असा आमच्यावर आरोप तो रस्त्यानें करीतच होता. परंतु आम्ही त्यास वारंवार निरनिराळ्या सबबी सांगून त्याचा राग शांत करीत होतों. आतां क. **बेली** इकडे आल्यावर पेशव्यांच्या वकिलाचा संशय दृढ होईल आणि ही गोष्ट आपल्या दोघांच्याहि हितास विघातक अशी होईल. हें टाळण्याकरितां ग. ज. यास सांगावें कीं, क. **बेली** यानें आमच्या सैन्यापासून वीस कोस अंतर सोडून पलीकडून निघून जावें. क. **बेली** यास हें पटत नसल्यास व आम्ही स्वत: त्यास पलीकडे पोंचवून द्यावें असेच त्याचें म्हणणें असल्यास आम्हांस तसें कळवावें म्हणजे मी बलसोर येथें माझी माणसें पाठवून देतों. बेलीनें तेथें यावें म्हणजे आमचीं माणसें त्यास येथें घेऊन येतील व नंतर आम्ही त्यास पलीकडे पोंचवून देऊं.[१] (पत्र नं. १९५९)

रस्त्यानें सातआठ महिने फुकट वेळ घालविल्यामुळें व कटक प्रांतांतही एवढ्या मोठ्या सैन्याचा व्यर्थ तळ पडल्यामुळें मराठ्यांच्या सैन्याबरोबरचा खजिना संपून गेला. ओरिसा प्रांत आधींच गरीब, त्यामुळें तेथील उत्पन्नांतून एवढ्या मोठ्या सैन्याचा खर्च चालविणें शक्य नव्हतें. म्हणून चिमणाबापू व भवानी काळू यांस मोठीच अडचण येऊन पडली. राजाचा तसा हुकूम नसल्यामुळें त्यांना बंगाल प्रांतावर स्वारी अगर लुटालूट करितां येईना. इकडे सैन्याच्या खर्चाची रोज अडचण पडूं लागली. शेवटीं तुमच्या-

१ भवानी काळू हा मनापासून या गोष्टीचे विरुद्ध होता. परंतु, मुधोजीच्या स्पष्ट हुकुमापुढें त्याचें कांहीं चालत नव्हतें. पेशव्याचा वकील नारोपंत ओरिसांतून नानास लिहितो, "हल्लीं इंद्रसेन बडे साहेबांकडून बोलणें करावयास आला आहे. तो बारा लक्ष देतो. पूर्वीं तीस लक्ष दिले. त्यास भवानीपंत म्हणतो, माझा प्राण गेल्यावर पाहिजे तें करा. परंतु मी ही गोष्ट घडूं देणार नाहीं." ऐ. टि. सरदेसाई उत्तर २ पा. ३२४

मुळें आम्ही या अडचणीत सांपडलों म्हणून आतां आम्हांस पैशाची मदत करा. अशी दीन याचना चिमणाजी व भवानीपंत यानीं गव्हर्नराकडे सुरू केली. तो प्रकार पुढें दिसेल.

भोंसल्यांप्रमाणेंच निजामानेंही इंग्रजांकडून आपल्या स्वतःच्या तक्रारी दूर करून घेऊन त्यांच्याशीं लढाई करण्याचें सोडून दिलें. यामुळें बंगालचें सर्व सैन्य मोकळें होऊन मद्रासेकडे व उ. हिंदुस्थानांत उपयोगी पडलें. तरी हैदर, पेशवे व शिंदे यांनीं मनापासून लढाई सुरू केल्यामुळें हेस्टिंग्ज यास मोठी चिंता पडली म्हणून त्यानें शेवटीं मुधोजीस पुणें दरबारशीं मध्यस्थी करून तह घडवून आणण्याबद्दल लिहिलें.

मुधोजीनेंहि हा तह दोन्हीकडून पाळला जाईल याबद्दल आपण जामीन राहण्याचें कबूल केलें. या तहाच्या प्राथमिक शर्ती ठरविण्याकरितां दिवाकरपंतानें कलकत्त्यास यावें असें हेस्टिंग्जनें त्यास लिहिलें. परंतु दिवाकरपंतानें लिहिलें कीं, कलकत्त्यास येऊन ह्या शर्ती न ठरल्या तर व्यर्थ श्रम होऊन आमची इभ्रत कमी होईल. तरी पेशवे व इंग्रज यांजमध्यें होणाऱ्या तहाच्या कच्च्या शर्ती जर तुम्हास पसंत पडल्या तर मी कलकत्त्यास येऊन तुम्हास भेटेन. दिवाकरपंतानें कळविलेल्या शर्ती खालीलप्रमाणें होत्या.

(१) पुरंदरचा तह दोन्ही पक्षांनीं पुन्हां मान्य करावा. ज. गॉडर्ड यानें चालू युद्धांत अमदाबाद, बडोदें व गुजराथ या बाजूस व मुम्बईकर इंग्रजांनीं कोंकणांत पेशव्याचा जो प्रांत जिंकून घेतला आहे तो इंग्रजांनीं पेशव्यांस परत द्यावा.

(२) राघोबादादासंबंधानें पूर्वीं पुरंदरच्या तहांत ठरलेली शर्त पाळली जावी म्हणजे राघोबादादानें तीन लाख रुपये पेन्शन घेऊन कोपरगांवास राहावें.

(३) कोणत्याहि पक्षानें दुसऱ्यापासून नुकसानभरपाई मागूं नये.

(४) ज. गॉडर्ड व मुबईचा गव्हर्नर यांस युद्ध बंद करण्याबद्दल एकदम हुकूम व्हावा.

(५) ह्या शर्ती कबूल असल्यास इंग्रजांतर्फेच्या कोणा वकिलाबरोबर दिवाकरपंतानें पुण्यास जावें म्हणजे या तहावर पेशव्याच्या कारभाऱ्यांच्या सह्या इंग्रज वकिलासमक्ष घेतल्या जातील.

(६) इंग्रजांनीं साष्टी बेट पेशव्यांस द्यावें. (पत्र नं १९९५).

दिवाकरपंतानें या तडजोडीस दोन्ही पक्ष कबूल आहेत कीं नाहींत हें पहाण्याकरितां सदाशिवराव नांवाच्या गृहस्थास पुण्यास पाठविलें व विजयराम नांवाच्या दुसऱ्या गृहस्थास कलकत्त्यास पाठविलें.

भोंसल्यांमार्फत हे तडजोडीचे प्रयत्न चालू असतां महादजी शिंद्या-मार्फतहि समेटाचे प्रयत्न चालू होते व महादजी शिंदा हा पेशवाईंतील प्रबळ सरदार असून चालू युद्धांत त्यानें मनापासून युद्ध केल्यामुळें त्याच्या शब्दास भोंसल्यांच्या शब्दापेक्षां जास्त किंमत आली होती म्हणून या तडजोडीचें यश भोंसल्यास न मिळतां शेवटीं महादजी शिंद्यास मिळालें. तो प्रकार पुढें दिसून येईल.

इकडे **हेस्टिंग्ज** यास मद्रासेकडे सैन्य पाठविण्याची जरूरी होती व सैन्य जाण्याचा खुष्कीचा रस्ता **कटक** प्रांतांतून असल्यामुळें भोंसल्यांशीं सलोखा करणें अगर त्यांची पर्वा न करतां लष्कराच्या जोरावर सैन्य पाठ-विणें या दोन्ही गोष्टी अडचणीच्याच होत्या. भोंसल्यांशीं लढाई करावी तर बंगालचें सैन्य इकडेच गुंतून रहाणार व मद्रासेस मदत पोहोचणार नाहीं व तिकडची बाजू कमजोर पडेल. नागपुराहून तहाचें जुळेल असें दिसेना. शेवटीं या दोन्ही अडचणींतून हेस्टिंग्जनें पुढील मार्ग काढला व तो सफल झाला.क० **पीयर्स** याचे हाताखालीं सैन्य निघण्यास तयार झालें होतें तें त्यानें एकदम कटक प्रांतांतून मद्रासेकडे रवाना केलें व मराठे लष्करानें अडविलें तरी त्यानें आपल्या जोरावर पुढें जावें असा क० पीयर्स यास हेस्टिंग्जनें हुकूम दिला. त्याप्रमाणें तो **बलसोर** मार्गानें रवानाहि झाला (१४-१-१७८१).

इकडे **हेस्टिंग्जनें अँडरसन** यास ओरिसांत **चिमणाजी**कडे पाठविलें. **चिमणाजीनें** क० **पीयर्स** यास न अडवितां जाऊं द्यावें याबद्दल कांहीं तरी वाटाघाट सुरू करावी व बोलणें लांबवावें व त्या अवधींत क० पीयर्स निघून जाईल व चिमणाजीशीं लढाई करावी न लागतां आपलें काम होईल अशी ही युक्ति होती व ती सफल झाली.

**अँडरसन** यास **हेस्टिंग्ज** यानें ज्या धोरणावर काम करण्याचें सांगि-तलें होतें तें त्याच्या अस्सल पत्रावरून जास्त चांगलें लक्षांत येईल.

" तुम्हीं कटक प्रांतांत जाऊन **चिमणाजी** भोंसले यास भेटून तुम्हास

दिलेलीं वकिलातीचीं पत्रें दाखवावीं व भवानीपंत (काळू) आप्पा यास गव्हर्नर जनरल याचीं पत्रें द्यावीं.

"त्यांना तुम्हीं कळवावें कीं, ' ले. क. **पीयर्स** यास **मिदनापुराहून** कर्नाटकास जाण्याकरितां आम्हीं पाठविलें आहे. **कटक** प्रांतांतूनच रस्ता असल्यामुळें तो त्या प्रांतांतून जाईल हें आम्हीं तुम्हांस रितीचें नात्यानें कळविलें आहे कारण कीं दोस्तींत बिघाड होण्यास कांहीं निमित्त न व्हावें. रस्त्यांत तुमचें कांहीं सैन्य असल्यास तें तुम्हीं रस्त्याचे बाजूस काढून घ्यावें. विशेषतः बाजारबुणगें मार्गात राहू देऊं नये. कारण हेच लोक भांडण करण्यांत पटाईत असतात व कित्येक वेळां असल्या भांडणांचा परिणाम फार भयंकर होतो. आमचा सरदार हा भरंवशाचा व शहाणा माणूस असून त्यास आम्ही ताकीद दिली आहे कीं गैरसमज उत्पन्न होईल असें कोणतेंहि निमित्त होऊं देऊं नये. हें सैन्य आम्हीं आधीच जमवून ठेवलें होतें व पुणें दरबारशीं मुधोजीमार्फत तह करण्याचा खर्डाहि आम्हीं पाठविला होता. त्याचें उत्तर येईपर्यंत हें सैन्य तसेंच थांबवून ठेवलें होतें कीं, पुणें दरबाराशीं तह झाल्यास उघडपणेंच हें सैन्य कर्नाटकांत हैदरावर पाठवितां येईल. परंतु नागपुरचें उत्तर आलें तें संदिग्ध आलें. त्यांत अजून पुष्कळ गोष्टी नक्की व्हावयाच्या राहिल्या आहेत त्यास अवधि लागेल. तरी नागपुरच्या उत्तरांत राजानें आमची पूर्वीची दोस्ती कायम ठेवण्याबद्दल आम्हांस आश्वासन दिलें आहे. वरील तह पुरा होईपर्यंत आम्हांस थांबणें शक्य नाहीं. कारण आमचे लढाईचे दिवस निघून जातील व आमचे शत्रु मात्र लढाई करीत आहेत. आम्हीं आपल्या दोस्तीच्या नात्यानें आमचें काम केलें आहे. तुम्ही मात्र आपलें काम न कराल तर त्याचे परिणाम काय होतील त्याची जबाबदारी तुम्हावर आहे. क० पीयर्स यास निक्षून हुकूम दिला आहे कीं, कांहीहि अडथळा झाला तरी त्यानें पुढें निघून जावें ही गोष्ट तुम्हीं **चिमणाजीच्या** कानावर घालावी. चिमणाजीनें यापुढेंहि म्हणजे आपणांस प्रत्यक्ष मदत देण्याची तयारी दाखविल्यास तुम्हीं त्याचेशीं करार करावा कीं त्यानें आपले दोन हजार स्वार **क० पीयर्स** याच्या हाताखालीं देऊन त्याचेबरोबर रवाना करावे. त्यांचा योग्य पगार तुम्ही ठरवून घ्यावा. तो त्यांना इंग्रजी अधिकाऱ्याकडून मिळेल."

"वरील गोष्टींबद्दल तुम्हीं म्हटलें म्हणजे भोंसल्याकडून आणखी मागण्या पुढें येतील. त्यांबद्दल त्यांनीं विचारल्यास तुम्ही आमचेकडे लिहून आमचें उत्तर येईल त्याप्रमाणें ठरवावें. त्याबद्दल आतांच नक्की हुकूम देण्याची आम्हांस तूर्त जरूर वाटत नाहीं. ले. क. पीयर्स यांचेशीं तुम्हीं पत्रव्यवहार ठेवून काय काय होईल त्याची त्यास ताबडतोब बातमी देत जावी."

**अँडरसन** हा **बलसोर** येथें येतांच त्यास समजलें कीं **चिमणाजी** हा **ढेकानाल** नांवाच्या डोंगरी किल्ल्यावर चाल करून गेला आहे. तिकडील वाटा जंगली लोकांच्या ताब्यांत असल्यामुळें **अँडरसन** यास तिकडे जाणें कठीण होतें. कारण मध्यंतरीं १७ कोसांचें दाट अरण्य होतें. अँडरसन यानें हेस्टिंग्ज यास पत्र लिहून आपल्या अडचणी कळविल्या. त्यांत तो म्हणतोः—

"**बलसोर**–ता. २२–१–१७८१ आज सकाळीं मी आलों. मराठ्यांचें लष्कर **ढेकानालच्या** किल्ल्यास वेढा देऊन बसलें आहे. हें ठिकाण **कटकच्या** रस्त्याच्या पश्चिमेस बऱ्याच अंतरावर डोंगरांत आहे. कटक प्रांतांतून जाणारा रस्ता व हें ठिकाण यांमध्यें १७ कोस दाट अरण्य आहे व तें बंडखोर राजांनीं इतकें व्यापलेलें आहे कीं,मराठी लष्कराकडे सामुग्री घेऊन जाणारे कांहीं स्वार तिकडे गेले त्यांना मधूनच परत यावें लागलें. क० पीयर्सचें लष्कर येण्यापूर्वी मला **चिमणाजी** राजाकडे जाऊन तुम्ही सांगितलेली कामगिरी बजावणें शक्य नाहीं. मी **बेनीराम** पंडिताकडून तेथील फौजदारास पत्र आणिलें होतें; परंतु फौजदारहि तेथें नाहीं. त्याच्या नायबास पत्र दिलें परंतु कटकच्या सुभेदाराच्या हुकमाशिवाय आपण काय करावें या विचारांत तो पडला आहे. सुभेदाराचा हुकूम मिळण्यास चार-पांच दिवस लागतील. परंतु मी लौकरच पुढील व्यवस्था करण्याचा उद्योग करीत आहें."

"परंतु या अडचणींत आनंदाची गोष्ट ही कीं, ज्या अडचणीमुळें मी येथें अडकलों आहें त्याच अडचणीमुळें मजकडे दिलेल्या कामगिरीचेंहि विशेष महत्त्व राहिलेलें नाहीं. मराठ्यांचें लष्कर जर तिकडे गुंतलें नसतें व कटकच्या आमरस्त्याच्या जवळ असतें तर मात्र वरील कामगिरी तडीस लावल्याशिवाय गत्यंतर नव्हतें."

"मला नायब फौजदाराची परवानगी व माझे संरक्षणाकरितां कांहीं माणसें मिळालीं तर मी उद्यां कटकास जाईन व **चिमणा**जीकडून निरोप येईपर्यंत अगर त्या डोंगराकडे जाण्यास हत्यारबंद माणसें मिळेपर्यंत तेथेंच राहीन."

**अँडरसन** हा जान्युआरी अखेरीस **कटकास** गेला. मागील पत्र पोहोंचल्यामुळें व कटक प्रांतांतील रस्त्यावर अगर त्या प्रांतांत सुद्धां मराठ्यांचें कांहींच लष्कर नसून तें सर्व दूर **चिमणा**जीबरोबर आहे हें समजल्यामुळें क० **पीयर्स** यास अडथळा होण्याचा संभवच नव्हता, म्हणून अँडरसन यास त्या अरण्यांतून **चिमणाजी**कडे जाण्याची जरूरच राहिली नाहीं व चिमणाजीच्या मनांत आलें तरी तो परत येऊन पीयर्स यास अडवूं शकत नाहीं हें स्पष्ट दिसून आल्यामुळें कलकत्त्याच्या कौन्सिलनें **अँडरसन** यास परत कलकत्त्यास बोलाविलें, परंतु तें पत्र पोहोंचण्यापूर्वींच तो कटकेस जाऊन पोहोंचला होता. कटकाहून **अँडरसन** यानें **चिमणाबापू**कडे व त्याचेबरोबर असलेल्या **भवानीपंता**कडे वरील योजनेबद्दल पत्रें लिहून विचारलें कीं, वरील शर्तीबद्दल बोलण्यास राजाच्या मुक्कामास येण्याची जरूर आहे काय ? परंतु वरील पत्रें घेऊन जाणारे हरकारे परत आले व बंडाळीमुळें आपणांस लष्कराकडे जाणें शक्य नाहीं असें त्यांनीं सांगितलें. चिमणाजीचें लष्कर कोठें होतें याबद्दलहि नक्की बातमी कटकच्या अधिकाऱ्यांस नव्हती. कोणी म्हणत **संबळपुरच्या** राजावर हें लष्कर जाणार आहे, तर कोणी म्हणत बंगाल्याकडे जाणार आहे.

यावेळेस कटक प्रांताचा सुभेदार **राजारामपंत** म्हणून होता व **बेनीराम पंडिताचा** भाऊ **विश्वभरपंडित** हा **कटक** प्रांतांत इंग्रजांचा वकील म्हणून होता. **चिमणाजी**तर्फे **मनोजीपंत** म्हणून दिवाण व फडणीस होता. **हृदयराम** म्हणून कटकच्या सुभेदाराचा दिवाण होता. **राजारामपंत** व **विश्वंभरपंडित** हे **चिमणाबापू**बरोबर लष्करांत असल्यामुळें **मनोजी** व **हृदयराम** हेच त्यावेळीं कटक येथें अधिकारी होते व त्यांचेमार्फत **अँडरसननें चिमणाजी, भवानीपन्त, राजारामपन्त** व **विश्वम्भर** पंडित यांना वरील लष्करांत पत्रें रवाना केलीं. तीं वरील अधिकाऱ्यांनीं जास्त शिपाई वगैरे बरोबर देऊन बंदोबस्तानें रवाना केलीं.

**मनोजी** व **हृदयराम** यांस **अॅन्डरसन** यानें भेटून आपलें काम सांगितलें. प्रथम त्या दोघांनीं सांगितलें कीं, "तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें आम्हीं अगर चिमणाजीनें पीयर्सचें लष्कर आमचे प्रांतांतून जाऊं दिल्यास पेशवे व पुण्याचे मुत्सद्दी यांचा आमचेवर मोठा रोष होईल." परंतु पुढें त्यानी हळुहळू अँडरसन याजजवळ कबूल केलें कीं, "असें जरी आहे तरी इंग्रजांवर सर्व जण उलटले असतां मुधोजीनें त्याची दोस्ती कायम ठेविली आहे. त्याचप्रमाणें त्याचा मुलगा चिमणाजी यास एकदम बंगाल्यावर हल्ला करण्याचा पेशव्यांचा व पुण्याच्या मुत्सद्यांचा जोराचा आग्रह असतांना त्यानें बंगाल्यावर स्वारी करण्याचें टाळलें. आतां लहान सहान राजांशीं लढाई करण्याचें निमित्त करून मुद्दाम इंग्रजांचें लष्कर जाण्याच्या मार्गापासून तो दूर अंतरावर जाऊन राहिला यांत त्याचा उद्देश इंग्रजांचें लष्कर कटक प्रांतांतून मकाटयानें पुढें जाऊं द्यावें एवढाच आहे. हें तुम्हीं ओळखून घ्यावें."

हें अनपेक्षित गुह्य **मनोजी व हृदयराम** यांजकडून कळतांच अँडरसन यास फार आनंद झाला व पुढील उद्योग चालू ठेवण्यास त्यास उमेद आली. इंग्रजांच्या शिस्तीच्या व स्वदेशहिताच्या कळकळी-मुळें बिचाऱ्या **अँडरसनास** कधींहि कल्पना आली नसेल कीं, मराठी साम्राज्याच्या केंद्रानें उभारलेल्या महत्त्वाच्या लढाईत त्यांचाच एक अवयव व जाणूनबुजून सामील झालेला साथीदार हा त्या संघाचा एवढा मोठा विश्वासघात करील व आपल्या सैन्यास सुखानें कटक प्रांतांतून जाऊं देईल. परंतु त्याला हिंदुस्थानी राजकारणाचा हा नवीनच धडा मिळाला असेल. मुधोजीच्या हेतूबद्दल त्याला हा प्रत्यक्ष पुरावाच मिळाला व तो चिमणाजी-च्या उघड वर्तनानें सिध्द झाला. शिवाय **बेनीराम** पंडितानें आपला भाऊ **विश्वंभर**पंडित यासहि पत्रें दिलींच होतीं. अॅन्डरसननें तोच धागा पुढें चालवून **चिमणाजीचें** उत्तर येण्यापूर्वींच **मनोजी** व **हृदयराम** यांजकडून कटक प्रांतांतील रस्त्यावरील सर्व ठाणेदारांस पत्रें घेतलीं कीं त्यांनीं इंग्रजांचे लष्करास वाट द्यावी एवढेंच नव्हे तर त्यांना धान्य व इतर सामुग्री व लागेल ती दुसरी मदतहि द्यावी. अर्थात् वरील कारवाई **चिमणाबापूकडून** मंजूर होईल असाच वरील अधिकाऱ्यांचा अंदाज होता व तो खराहि ठरला. कदाचित् या बाबतींत त्यांचें बोलणेंहि झालें असेल.

इकडे **चिमणा**बापूकडून **विश्वंभर पंडित** हा ग. ज. याजकडेस पत्रें घेऊन परभारें निघाला तो **बलसोर** येथें आला. **ॲन्डरसन**हि गव्हर्नर जनरलच्या हुकुमाप्रमाणें कलकत्त्यास जाण्याकरितां **बलसोर** येथें आला होता. **बलसोर** येथें दोघांचीहि गांठ पडली. दोघेही कलकत्त्याकडे बरोबरच जाण्यास निघाले. इतक्यांत **ॲन्डरसन** यास बातमी लागली कीं, **चिमणा**बापूचें लष्कर अरण्यांतून उघडचा मैदानांत आलें आहे तसेंच **चिमणा**बापूचा सेनापति **भवानीपंत** काळू याचेंहि पत्र **ॲन्डरसन** यास आलें कीं, तुम्हीं पुढें न जातां **चिमणा**बापूचे छावणीस येऊन काय तें बोलावें. परंतु गव्हर्नर जनरलचा हुकूम कलकत्त्यास येण्याचा असल्यामुळें व तिकडे कांहीं जरूरीचें काम असेल या अंदाजामुळें तो छावणीस न जातां **कलकत्त्यास** गेला. मध्यंतरीं ग. ज. यांनें **ॲंडरसन** यास पत्रहि पाठविलें की तुम्हीं कलकत्त्यास न येतां **भवानीपंतास** जाऊन भेटा. परंतु त्या पत्राची चुकामूक झाल्यामुळें तें **ॲंडरसन** यास मिळालें नाहीं.

क० **पीयर्स** हा कटक प्रांतांत आला व पुढें चालला. यावेळीं **चिमणा**बापूचें लष्कर कटक प्रांतांत आलें होतें व तें इंग्रजी लष्कर जाण्याच्या वाटेच्या अगदीं जवळ होतें. परंतु **चिमणाबापूनें** त्या लष्करास न अडवितां सुखानें जाऊं दिलें. एवढेंच केवळ नव्हे तर आपला एक मोठा अधिकारी क० **पीयर्स**कडे पाठविला व क० पीयर्स यास लागेल ती मदत पुरविण्याकरितां त्या अधिकाऱ्यास त्यानें पीयर्सचे लष्कराबरोबर जाण्याचा हुकूम दिला. तो अधिकारी दरमजल **पीयर्सच्या** लष्कराबरोबर राहून त्यास मदत पुरवीत असे. **क० पीयर्स** यानें रोजच्या डाकेंत वरील मजकूर हेस्टिंग्ज यास कळविला व हा अधिकारी फार काळजीपूर्वक आम्हांस साह्य करतो व धान्य व इतर जिनसांचा आम्हांस त्यानें भरपूर पुरवठा केला याबद्दल **पीयर्स** यानें वारंवार कळविलें. हें सर्व कोणताहि तह करण्यापूर्वी अगर इंग्रजांचा वकील **चिमणाबापूस** भेटण्यापूर्वी **चिमणाबापूनें** आपखुषीनें केलें. यांत इंग्रजांचें नशीब थोर कीं चिमणाबापूचें हित-शत्रुत्त्व थोर हें सांगणें कठीण आहे. चिमणाबापू नागपुराहून निघण्यापूर्वीं व नंतरहि मुधोजीकडून सूचना येत असल्याच पाहिजेत; कारण चिमणाबापू हा जरी तरुण होता तरी भवानी काळू हा कसलेला सेनापति त्याचेबरोबर होता. त्यानें इंग्रजांस सुखानें जाऊं दिलें नसतें.

हें कर्तव्य करून **चिमणाबापूनें** मोठ्या गौरवानें ग. ज. यास लिहिलें कीं, "आम्ही इंग्रजांचे दोस्त आहों व **क. पीयर्स** यास आम्हीं सुखानें वाट दिली आहे. परंतु याचा मोबदला आपणास कांहींतरी मिळावा या आशेनें आपण हें सर्व केलें हें चिमणाजीच्या पत्रांतून छपून राहिलें नाहीं. चिमणाजी लिहितो कीं "आम्ही हें सर्व तुमच्या दोस्तीखातर करीत आहों; परंतु या तुमच्या दोस्तीमुळें आम्हीं किती आपत्तींत पडलों आहों तें तुम्ही पहा. लष्करास पगार न मिळाल्यामुळें त्यांना शांत ठेवणें आम्हांस फार कठीण झालें आहे व सर्व लष्कर बंगाल्यावर आम्हास हल्ला करून लुटालूट करूं द्या अशी ओरड करीत आहे."

**चिमणाबापूच्या** पत्रांत हेस्टिंग्जनें लिहिलें कीं, अँडरसननें त्याला न भेटतां परत जावयाचें नव्हतें. तसेंच **विश्वंभर**पंडिताबरोबर जें पत्र पाठविलें होतें त्यांतहि पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टी होत्या; म्हणून **हेस्टिंग्जनें अँडरसन** यास परत **चिमणाबापू**कडे पाठविलें. क. पीयर्स हा सुखरूप निघून पुढें गेला याबद्दल **हेस्टिंग्ज** यास पराकाष्ठेचा हर्ष झाला व भोंसल्यास या संघांतून आपण फोडूं शकूं अशी त्यास उमेद आली. तसेंच नागपुराहून खुद्द **मुधोजी**कडूनहि **भवानी मुनशीच्या** सहीचें पत्र हेस्टिंग्जकडे आलें. त्यांतहि अशाच दोस्तीच्या गोष्टी लिहिल्या होत्या. त्यावरून भोंसल्यांचें मन या लढाईत मुळीच नसून ते पुणें दरबारास नुसतें दाखविण्याकरितांच फक्त लढाईचा देखावा करीत आहेत ही हेस्टिंग्जची खात्री झाली व त्यांना या कटांतून फोडण्याकरितां त्यानें पुन: **ॲन्डरसन** यास रवाना केलें. इंग्रजांच्या पद्धतशीर व व्यवस्थित रीतीप्रमाणें त्यानें अँडरसन यास लेखी सूचना केल्या, त्या फार महत्त्वाच्या आहेत. त्यांवरून इंग्रजांचा धूर्तपणा व दूरदर्शीपणा चांगला दिसून येतो. ह्या गोष्टींत बरेंच गुप्त रहस्य भरलेलें असल्यामुळें वरील सूचना कौन्सिलच्या प्रोसीडिंगांत न लिहितां ग.ज. यानें गुप्तपणानें ॲन्डरसन यास दिल्या आहेत. या पत्रावरून इंग्रजांचा धूर्तपणा व भोंसल्यांचा मूर्खपणा व आत्मघातकी उद्योग स्पष्ट दिसून येतो. तें पत्र असें:—

"तुमची निकटची कामगिरी म्हणजे क० **पीयर्स** यास भोंसल्यानें ओरिसा प्रांतांतून जाऊं द्यावें ही होय. परंतु त्याबरोबरच दुसऱ्याहि गोष्टी उगवून घेतां येतील. नागपुरकरांचें म्हणणें पडतें कीं, आम्हीं एवढें मोठें

सैन्य तुमच्या सरहद्दीवर पाठविलें याचें कारण हें कीं पुणें दरबार व निजाम यांनीं आम्हांस एकदम हें काम करण्यास सांगितलें. त्यांचें म्हणणें आम्ही ऐकतों असें आम्हीं निदान वरपंगीं तरी दाखविलें नसतें तर त्याचे वाईट परिणाम आम्हास भोगावे लागते. कारण इंग्रजांविरुद्ध जो राष्ट्रसंघ तयार झालेला आहे त्या सर्वांचा आमचेवर रोष झाला असता. आम्ही दोस्तांस दाखविण्यापुरतें तुमच्यावर चालून येणार; परंतु शेवटी तुमच्या दोस्तींत अंतर पडूं देणार नाहीं असें त्यांनीं पूर्वींच आम्हांस कळविलें होतें व आम्ही तुमची दोस्ती कायम ठेवणार असा निश्चयहि त्यांनीं आम्हांस कळविला होता. या त्यांच्या आश्वासनावर माझा पूर्ण भंरवसा बसला आहे. भोंसल्यांच्या पुढील वर्तनावरूनहि वरील गोष्टीस पुष्टि मिळत आहे. **चिमणाजी** यास नागपुराहून हुकूम मिळाला व तो ता. ११-८-१७७९ रोजीं दसऱ्यास नागपुराहून बहार प्रांतावर येण्याकरितां रवाना झाला, परंतु मुद्दाम मजले घेत घेत व दिरंगाई करीत तो ठरल्याप्रमाणें बिहार प्रांतांत न जातां **कटक** प्रांताकडे गेला व तेथें मे महिन्यांत पोंचला व त्याला तेथें इतकी अडचण आहे तरीसुद्धां तो तेथेंच गुन्तून राहिला आहे. त्याच्या फौजेचा तगादा मिटविण्याकरितां आक्टोबर महिन्यांत मीं त्यास गुप्तपणें तीन लक्ष रुपये पाठविले व नागपुराकडून आम्हांस पाहिजे तसें उत्तर आल्यास आणखीहि रुपये तुम्हांस देऊं अशी मीं त्यास आशा दाखविली. पेशव्याशीं आमचा जो तह होणार त्यास मुधोजीनें जामीन व्हावें व **चिमणाजीचें** लष्कर आमचे लष्कराचे मदतीस द्यावें अगर तें परत नागपुरास बोलावून घ्यावें; अशाबद्दल मुधोजी भोंसल्यास माझीं पत्रें गेलीं आहेत. पण त्याचें उत्तर अनुकूल असें आलें नाहीं. परंतु मुधोजी त्या पत्रांतील प्रत्येक कलमास अशी दुरुस्ती सुचवितो कीं, ती आम्हांस कधींच पसंत पडूं नये. तो वरवर स्नेह दाखवितो. परंतु **चिमणाजीस** आम्ही म्हणतों तसा हुकूम मात्र पाठवीत नाहीं. परंतु **ढाकानाल** येथील निरर्थक मोहीम हें त्याचें सैन्य आमचे लष्कराच्या मार्गापासून दूर ठेवण्याकरितां एक निमित्त आहे असें दिसतें. **पीयर्स** यास **चिमणाजीनें** बिनहरकत ओरिसांतून जाऊं दिलें. एवढेंच नव्हे तर त्याच्याबरोबर त्याचे व्यवस्थेकरितां त्यानें आपला एक अधिकारीहि पाठविला. चिमणाजीच्या हुकमावरून म्हणा अगर त्यानें मुद्दाम कानाडोळा केला

म्हणून म्हणा **क० पीयर्स** यास आतांपर्यंत सामानाचा मुबलक पुरवठा होत आला आहे. माझा अंदाज खरा आहे कीं नाहीं हें तुम्हांस चिमणाजीच्या वर्तनावरून दिसून येईल व तुम्हीच त्याचा निर्णय करा.

"चिमणाजीच्या वरील वागणुकींत दोन उद्देश असूं शकतील. एक वर मीं सांगितलेला. दुसरा हा कीं आमचें एवढें मोठें सैन्य मद्रासकडे निघून जाऊं द्यावें व मग बिहार प्रांतावर हल्ला करावा म्हणजे तो प्रांत सहजच हस्तगत होईल. पण हा दुसरा उद्देश असेल असें नागपुरकरांच्या एकंदर वर्तणुकीवरून व पावसाळा फार नजीक आला आहे व ही मोहीम करण्याचे आतां दिवस राहिले नाहींत या गोष्टीवरून मला वाटत नाहीं.

"बंगालची चौथाई मान्य झाली कीं, भोंसल्यांचें साह्य आपण विकत घेतलेंच समजा व ते उघडपणेंहि आपला पक्ष जाहीर करतील. जरी उघडपणें त्यांनीं अद्याप असें लिहिलें नाहीं तरी त्यांचा हाच उद्देश आहे हें मला पक्कें माहीत आहे. कदाचित् तुम्हास ते याबद्दल विचारतील. जर **चिमणाजीस** या अगर दुसऱ्या विषयाबद्दल बोलण्याचा अधिकार असेल तर त्याचें काय म्हणणें आहे तें तुम्हीं ऐकून घ्या व तें बोर्डाकडे लिहून कळवा. त्याला असा अधिकार नसला तर तुम्ही राजाकडून तसा अधिकार आणण्याबद्दल त्याला सुचवा अगर राजाकडून त्या सूचना येऊं द्या. कारण जें ठरेल तें राजानें मंजूर केलें पाहिजे. तुम्ही अशी बतावणी करा कीं "माझ्या अधिकारपत्रांत ज्या गोष्टी लिहिल्या आहेत त्यांपेक्षां इतर गोष्टीबद्दल मला कांहीं ठरवितां येणार नाहीं. परंतु इतर गोष्टींत तुमचें म्हणणें काय आहे तें मी गव्ह. जन. यास कळवितों." त्याचें म्हणणें आम्ही मान्य करूं अशाबद्दल त्यांना जी आशा असेल ती तुम्ही वाढवा, ती खुंटवूं नका व आपण त्यांचें म्हणणें मान्य केल्यास ते आम्हांस काय कबूल करतात तें त्यांचेकडूनच काढून घ्या. ते आम्हास **हैदरा**विरुद्ध मदत करणार कीं नाहीं, बंगालच्या चौथाईच्या ऐवजीं आम्हीं त्यांस दुसरा मुलूख तोडून दिला तर ते कबूल करतील कीं नाहीं, उदा० **क. गॉडड** यानें जिंकलेला गुजराथ व कोंकण यांतील मुलूख, अगर **कारनाक** यानें माळव्यांत घेतलेला मुलूख अगर ते म्हणतील तो दुसरा मुलूख. तुम्ही त्याला आपलेकडून प्रत्यक्ष अशी सूचना करूं नका कारण त्या योगानें त्यांना वाटेल कीं आपण पडती

घेत आहों व आपणास त्यांच्या मित्रत्वाची इतकी जरूर आहे कीं आपण त्याकरितां वाटेल तितकी झीज सोसूं. निरनिराळे प्रश्न, खुलासे वगैरे विचारून किंवा शंका घेऊन त्यांचेकडूनच ही माहिती काढून घ्या व त्यांचें हृद्गत समजून घ्या."

" तसेंच ह्या तरुण राजाचे स्वतःबद्दलचेहि विचार काय आहेत हें काढून घेऊन त्यांचाहि आपणास कांही फायदा करून घेतां येईल तर पहा. मुधोजी भोंसल्याचा पुत्र म्हणून त्याला मराठ्यांच्या छत्रपतीच्या गादीवर हक्क दाखविणें शक्य आहे, पुढें स्वतंत्र रीतीनें रहातां येण्याचा त्याला तेवढाच उपाय आहे. **चिमणाजी** हा बाप मेल्यानंतर अगदींच उघडा पडणार व त्याला आपल्या भावाच्या ( रघूजीच्या ) अंकित होऊन रहावें लागेल. त्याचा भाऊ त्याच्याकरितां द्रव्य खर्च करून त्याला आपल्यापेक्षां मोठ्या पदावर ( छत्रपतीच्या जागेवर ) चढवील हेंहि संभवनीय नाहीं. मुधोजी मात्र या गोष्टीस मदत करील; कारण त्यामुळें त्याच्या दोन्ही पुत्रांचें कल्याण होईल. भोंसल्यांच्या दिवाणाचें ( **दिवाकरपन्त** ) लक्ष रघूजीच्या हितापेक्षां इतर गोष्टीकडे जाणार नाहीं. **बेनीराम पंडित** व **विश्वम्भरपण्डित** हे रघूजीचेच नोकर आहेत व त्यांचें लक्षहि त्याचेच हिताकडे आहे. भवानीपंत ( काळू ) हाहि रघूजीचेच पक्षाचा आहे व **दिवाकरपन्तानेंच** त्याची नेमणूक या विश्वासाच्या कामावर केली आहे. म्हणून तुम्ही वरील लोकांसमक्ष **चिमणाजीशीं** ही गोष्ट मुळीच काढूं नका. चिमणाजीशीं एकांत साधून एकांतांत त्याच्याशीं ही गोष्ट काढा. साताऱच्या गादीची लालूच त्याच्या मनांत उत्पन्न होईल अशा रीतीनें त्याच्याशीं बोला. त्याला म्हणावें कीं " हल्लीं तुला कामगिरी काय दिली आहे. बंगाल्याची चौथ मिळविण्याची असेल तर त्यांत तुला स्वतःला काय फायदा होणार ? ती बाब रघूजीला मिळणार व त्यामुळें तुझें पारतंत्र्य ज्यास्त ज्यास्त वाढत जाणार. शिवाय इंग्रजांच्या दोस्तीस तूं त्यामुळें मुकणार. इंग्रजांच्या मदतीनें तुला साताऱची गादी मिळवून तुझ्या घराण्यांत कोणासहि मिळालें नाहीं असें वैभव तूं मिळवशील. एकदम तूं आपला हक्क आतांच साताऱच्या गादीवर सांगशील तर तुझ्याविरुद्ध कोणीहि मराठा संस्थानिक जाऊं शकत नाहीं. उशीर

करशील तर हें पुन: जमणार नाहीं. बापानंतर तुझी स्थिति कशी होणार व बापासमक्षच तूं आपला फायदा करून घे " असें तुम्हीं त्याच्या मनांत भरवा. बाब नाजूक आहे. सबब तुम्ही युक्तीप्रयुक्तीनेंच त्याचेशीं बोला. याचा परिणाम दुसरा कांही न झाला तरी एवढा खासच होईल कीं चिमणाजी इंग्रजांशीं एकदम वैर करणार नाहीं व मोहिमेचे कामास ढिलाई करील व त्यामुळें आपणास वेळ मिळेल. तुमची गोष्ट त्याचे मनांत भरली तर तो आपले पक्षास मिळण्यासहि तयार होईल व बापास न विचारतांहि क० **पीयर्स**बरोबर आपलें लष्कर हैदरावरील मोहिमेकरितां देईल."

" **विश्वंभर पंडित** यास मी **चिमणाजी**कडे परत पाठवीत आहें व **चिमणाजी**कडून जे चार प्रश्न त्यानें मजकडे आणले होते त्यांचा मी जबाब दिला आहे, ते प्रश्न खाली दिले आहेत ":—

" भोंसल्यांनीं या संघांतून फुटण्यांत त्याची कांहीं बेमानी होत नाहीं. एक तर त्याला या संघांत जबरदस्तीनेंच सामील व्हावें लागलें. दुसरें इतर सर्व संस्थानिकांनीं या संघाचे एकजुटीविरुद्ध पूर्वीच वर्तन केलें आहे. हैदरानें बादशहाकडून दक्षिणच्या सुभेदारीची सनद मिळविली यांत त्यानें निजामाशीं द्रोह केला व पेशव्यांशीहि केला. निजामास पूर्वीच दक्षिणची सुभेदारी मिळालेली आहे व पेशव्यांचाहि मुलूख त्यांत येत आहे. त्याचप्रमाणें निजामानेंहि या संघाचे उद्देशाविरुद्ध वर्तन केलें आहे. त्यांच्या कराराप्रमाणें भोंसल्यांचें सैन्य बंगाल्याकडे रवाना होतांच निजामानें **शिकाकोलावर** स्वारी करावयाची होती; परंतु, त्यानें कांहीं देखील न करतां आपलें वचन मोडलें. पेशव्यांनीहि भोंसल्यांशीं केलेला करार मोडला; कारण ही जूट होतेवेळीं त्यांनीं **गढामंडला** हे प्रांत मुधोजी भोंसल्यास जहागीर दिले होते. परंतु त्यांनी **विसाजीपंतास** त्या प्रांताचा ताबा घेण्याकरितां तिकडे पाठविलें. तसेंच भोंसल्यांच्या खर्चाकरितां रक्कम पुरविण्याचेंहि त्यांनीं कबूल केलें होतें तेंहि वचन त्यांनीं पाळलें नाहीं. मग मुधोजीनें आपलें वचन मोडण्यास हरकत काय ? "

" **मुधोजी** व पेशव्यांची दोस्ती आहे ती आम्ही त्यास तोडण्यास सांगत नाहीं. आम्ही तरी पेशव्यांचे दोस्तच आहों व दोस्तीच चाहतों

आम्ही फक्त **हैदरअली** जो आपणा सर्वांचाच शत्रु आहे त्याचाच मोड करण्याची इच्छा धरतों. इंग्रजांविरुद्ध जर तो यशस्वी झाला तर तो मराठ्यांच्या नाशास कारणीभूत होईल. भोंसल्यास म्हणावें तुम्ही आमच्याशी दोस्तीचा तह करा की तुमचेमागें पेशवा आलाच. तो तरी कोणाच्या जिवावर उड्या मारणार, त्याचे जवळ आहे काय ? त्यानें ऐशी लक्षांचा मुलूख हैदरास तोडून दिला, खानदेश शिंद्यास दिला, औरंगाबाद निजामास दिला, गुजराथ व कोंकण इंग्रजांनीं घेतले, मुधोजी नेहमीं म्हणतो कीं, आमची मराठ्यांची गादी आम्ही जाऊं देणार नाहीं, ती आमचे वडिलांची मत्ता आहे तर त्याला म्हणावें तूं ती वांचीव व स्वतःचा हक्क त्या गादीवर सांग. मुधोजीला कोणीच प्रतिस्पर्धी नाहीं. हल्ली गादीवर हक्क सांगणारासुद्धां कोणी नाहीं आम्ही **चिमणाजीस** सातारच्या गादीवर बसविण्यास पूर्ण मदत करूं व त्याचे नांवानें मराठे राज्याची व इंग्रजांची कायमची दोस्ती होऊं द्या. चिमणाजीच्या प्रश्नांस पुढील उत्तर तुम्ही द्या.

(१) **चिमणाजीनें** आपलें सैन्य नागपुरास परत न्यावें अगर आमचेविरुद्ध त्याचा उपयोग करूं नये, म्हणजे आम्ही त्याला **बारा लक्ष** रुपये देऊं. मागील तीन लक्ष धरून त्याला आमचेकडन **पंधरा लक्ष** पावतील. ही रक्कम आम्ही त्याचे मनुष्यास देऊं अगर **बलसोरास** जहाजानें पाठवूं.

(२) **रघुनाथराव** पेशवे यास आम्ही कोणत्याहि प्रकारें पेशव्याच्या अगर दुसरे कोणाचे ताब्यांत देणार नाहीं. फार तर त्याशी आमचा संबंध सोडून देऊं.

(३) **चिमणाजीचें** म्हणणें कीं "आम्ही फक्त वर वर दाखविण्यापुरतें गयेकडे जाऊं" परंतु हें आम्हांस मान्य नाहीं. एकदां पुढें गेल्यावर मग पुढील गोष्ट स्वाधीनची नाहीं. शिवाय मधील रस्ते आमच्या सैन्यानें अडविले आहेत त्यांना ते सोडून निघून येण्यास आम्ही सांगणार नाहीं.

(४) **बंगालची चौथ--बेनीराम पंडिताचें** म्हणणें कीं बंगालची चौथाई कबूल केल्याशिवाय भोंसले व इंग्रज यांचा तह व्हावयाचा नाहीं. मीं त्याला स्पष्ट नाहीं तर सांगितलें नाहींच पण हें आम्हीं कबूल करूं अशी आशाही दाखविली नाहीं. तुम्हीहि तसेंच बोला.

" निजाम व भोंसले हे वरवर जरी एकमेकांविषयीं स्नेह दाखवितात तरी त्यांचीं मनें एकमेकांविषयीं शुद्ध नाहींत. ते एकमेकांचे स्वाभाविक शत्रु आहेत. **विश्वंभरपंतास** तुम्ही ही गोष्ट विचारा. भोंसला–अथवा त्याचा दिवाण दिवाकरपंत–( कारण भोंसला **दिवाकरपंत** सांगेल तसेंच वागतो) –यास निजामाची नेहमीं भीति वाटते व मीं असें भासविलें आहे कीं भोंसले आमचें न ऐकतील तर आम्ही निजामअल्लीशीं दोस्ती करूं."

"**पीयर्स** यास केलेल्या मदतीबद्दल चिमणाजीस माझे फार आभार सांगा व या मदतीचा त्यास योग्य मोबदला मिळेल असें त्यास आश्वासन द्या. **राजाराम**पंतासहि कळवा कीं त्यानें आम्हांस फार मदत केली आहे त्याची मला जाणीव आहे. जरूर पडल्यास **राजाराम**पंतास व **भवानी**-पंतास तुम्हांस योग्य वाटतील तितके पैसे देण्यास मी तुम्हास अधिकार देतों. परंतु ही रक्कम दोन **लाखांच्या**वर जाऊं देऊं नका."

वरील गुप्त सूचना घेऊन अँडरसन मराठ्यांचे छावणींत गेला व तेथें त्यानें **चिमणाबापूशीं** व त्याचे कारभाऱ्यांशीं खल चालविला. चिमणाबापूतर्फे कटकचा सुभेदार **राजाराम मुकुंद** व कारभारी व सेनापति **भवानी काळू** हे मुख्यत्वें बोलत होते व इंग्रजांतर्फे ॲन्डरसन हा बोलत होता. तो बारा लक्षांचेवर रक्कम कबूल करीना. चिमणाबापूची सर्व धडपड, इंग्रज देत होते त्यापेक्षां बरीच जास्त रक्कम मिळविण्याबद्दल होती. शेवटीं दोघांचा आकडा जमेना म्हणून भोंसल्यातर्फे **राजाराम**पंतानें स्वत: गव्हर्नर हेस्टिंग्ज याची कलकत्त्यास भेट घ्यावी व **ॲन्डरसन**नेंहि कलकत्त्यास जाऊन मराठ्यांच्या फौजेची पैशाची अडचण **हेस्टिंग्ज** यास समजून सांगावी असें ठरलें.

**अँडरसन** यास स्वतः **चिमणाबापूनें** केविलवाणें तोंड करून विनंति केली कीं, " इंग्रजांकरितां आम्ही मोठ्या अडचणींत पडलों असलों तरी नागपुरास परत जाईपर्यन्त आमच्या फौजेच्या खर्चास पुरेल इतकी रक्कम तरी तुम्ही गव्हर्नराकडून देववा. आमचें सैन्य तुमचेंच आहे असें गव्हर्नरास सांगा व आमचा सांभाळ करा. " एकंदरींत जें बोलणें बरोबरीच्या अगर जोराच्या नात्यानें चालावयाचें तें त्यांच्याच मूर्खपणानें व विश्वासघातामुळें मिन्नतवारीवर आलें. **राजारामपन्त** व **अँडरसन** कल-

कत्त्यास आले ( २५–३–१७८१ ). राजारामपंतानें गव्हर्नराची भेट घेऊन व आपण गाडर्ड यास हुशंगाबादेस मदत करून, पीयर्स यास ओरीसांतून मुकाटयानें जाऊं दिलें व आपल्या मराठे जातभाईंच्याहि विरुद्ध वागून इंग्रजांस वेळोवेळीं कशी मदत केली व त्यामुळेंच आपण कसे अडचणींत आलों याचें रसभरीत वर्णन केलें व सांगितलें कीं, दोन कोटीं रुपयांचे खालीं आमची खर्चाची सोय होत नाहीं. तरी इंग्रजांनीं मराठ्यांस ५० लक्ष रुपये तरी ताबडतोब द्यावे म्हणजे ते नागपुरास परत जातील. फक्त तीन हजार स्वार क० **पीयर्स** बरोबर हैदरावर जातील. हें झालें म्हणजे **भवानीपंत काळू** हे राजातर्फे सुवर्णरेखेपर्यन्त येतील. गव्हर्नरनें तेथपर्यन्त येऊन त्यांची भेट घ्यावी व तेथें नागपुरकर व इंग्रज यांच्या कायमच्या दोस्तीचा तह ठरविण्याबद्दल बोलणें होईल. गव्हर्नराचें म्हणणें पडलें कीं आम्ही १२ लक्ष रुपये नगदी देतों व क० **पीयर्स** बरोबर दीडदोन हजार सैन्य तुम्ही पाठवा व बाकीचें नागपुरास परत पाठवा. पुढें तुम्ही व आम्ही मिळून बऱ्हाणपुर, अशीरगड, खानदेश व गढामंडला हे प्रांत, जे पेशव्यानें भोंसल्यास देण्याचे कबूल केले होते ते जिंकून घेऊन ते भोंसल्यास देऊं. तसेंच भोंसले व इंग्रज यांनीं एक होऊन हैदरखानाचा नायनाट करावा. **पीयर्स** हह निघून गेला होता व या बोलण्याचालण्यांत जितका वेळ जाईल तितका इंग्रजांस विसावा मिळत होता. त्यामुळें **हेस्टिंग्ज** नरम होण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं **राजारामपंतानें** पडती घेऊन पुढील अखेरच्या शर्ती हेस्टिंग्जकडे पाठविल्या व आतां जास्त ताणण्यांत अर्थ नाहीं असें पाहून एक महिनाभर खल चालून हेस्टिंजनें त्या शर्ती ता. ६–४- १७८१ रोजीं बोर्डाकडून मंजूर करून घेतल्या त्या अशा—

१ भोंसल्यानें आपले निवडक दोन हजार स्वार **हैदरखानावर पीयर्सच्या** हाताखालीं पाठवावे. त्याचा पगार दरमहा एक लाख रुपये इंग्रजांनीं देत जावा.

२ मराठे लष्कर कटक प्रांतांतून एकदम हलवून **गढामंडल्यावर** न्यावें. इंग्रजानीं उत्तर हिंदुस्थानांतील इंग्रजी पलटणें त्यांचे मदतीस पाठवावीं व दोन्ही सैन्यांनीं **गढामंडलाप्रांत** पेशव्याचे अंमलदारांकडून जिंकून घेऊन भोंसल्यांचे ताब्यांत द्यावा.

३ इंग्रजांनीं मराठ्यांस १३ लक्ष रुपये फौजेच्या खर्चाकरितां द्यावे व शिवाय १० लक्ष रु. कर्ज म्हणून दरसाल दरशेंकडा ८ व्याजानें द्यावे. दोन वर्षांत कटकच्या उत्पन्नांतून या कर्जाची **राजाराम**पंतामार्फत फेड करून घ्यावी. सदहू रुपये **विश्वंभरपंडित** यांचे मार्फतीनें द्यावे.

४ इंग्रजांशीं कायमच्या दोस्तीचा तह ठरविण्याकरितां भोंसल्यांनीं नागपुराहून **दिवाकरपंतास** गव्ह० जनरलच्या भेटीस पाठवावें म्हणजे कायमचा तह ठरविला जाईल.[१] **दिवाकरपंत** येऊं शकत नसतील तर ग० ज० यानें नागपुरास त्याचे विश्वासांतील कोणी मनुष्य पाठवावा व नागपुरास कायमचा तह ठरवावा.

वरील तहानें इंग्रजांचा एवढा फायदा झाला कीं, त्यांच्या दीर्घ दृष्टीची तारीफ केली पाहिजे. क. **पीयर्स** बरोबर मराठी सैन्य गेल्यामुळें भोंसले या कटांतून फुटून इंग्रजांस साह्य झाले व हैदरखानाचे शत्रु झाले याचा उघड पुरावा सर्व हिंदुस्थानास मिळाला. तसेंच **गढामंडल्यावर** पेशव्यांच्या अधिकाऱ्यांवर हल्ला केल्यामुळें पेशव्यांचें व भोंसल्यांचें उघड शत्रुत्व होणार. हिंदुस्थानांतील सर्व प्रबळ संस्थानिक इंग्रजांवर उठले आहेत हा जो देखावा सर्व हिंदुस्थानभर दिसून इतरांना इंग्रजांविरुद्ध उत्तेजन मिळत होतें व त्यामुळें इंग्रजांस हिंदुस्थानांत कोणी मित्र राहिला नव्हता ती परिस्थिति बदलून गेली. भोंसल्यासारखा मराठी साम्राज्यांतील मोठा घटक फुटल्यामुळें व निजामानें यापूर्वीच आपल्या दोस्तांचा विश्वासघात केल्यामुळें इंग्रजांना बंगाल व मद्रासचा उत्तर भाग यांत कोणी शत्रु राहिला नव्हता. वरील तात्त्विक परिणामापेक्षांहि प्रत्यक्ष फायदा झाला तो असा कीं त्यांचें बंगाल्यांतील सर्व सैन्य व पैसा जो अडकून राहिला असता तो मोकळा होऊन पेशवे व हैदर यांच्याविरुद्ध उपयोगांत आला.

**मुधोजी** भोंसले व **दिवाकरपंत, भवानी काळू** व **राजारामपंत** यांच्यासारख्या कसलेल्या राजकारणी पुरुषांस, त्यांचे अकलेस व प्रामाणिकपणास या वरील तहानें कायमचा डाग लागला आहे. सार्वजनिक हिताची दूरदृष्टि टाकून भोंसल्यांनीं अत्यंत हीनपणाचा व आत्मघातकी देशद्रोह व

१ याच तहाकरितां दिवाकरपंत नागपुराहून काशी येथें हेस्टिंग्जची भेट घेण्याकरितां निघणार होता परंतु तितक्यांत तो मरण पावला.

विश्वासघात या वर्तनानें केला आहे. **चिमणाबापू** हा अननुभवी व तरुण असल्यामुळें त्यास इतका दूरवर पोंच नव्हता, यामुळें त्यास विशेष दोष देतां येत नाहीं. तसेंच **बेनीरामपंडित** व **विश्वंभरपंडित** हे दोघे उत्तर हिंदुस्थानी पंडित निवळ भाडोत्री व पोटभरू होते व देश व धर्म यांच्या प्रेमाचा त्यांना गंधहि नव्हता. त्यांचेपासून वरील दूरवर विचारांची कोणी अपेक्षाहि करीत नव्हते. परंतु वरील मुत्सद्दी व मुधोजी यांची वर्तणूक अत्यंत दोषास्पद आहे.

**भवानीपंत** व **राजारामपंत** यांना दोन तीन लक्षांची लुचपत देण्याची जी परवानगी **हेस्टिंग्ज** यानें **अंडरसन** यास दिली होती तिचा प्रयोग **अंडरसन** यानें उभयता गृहस्थांवर करण्यास कमी केलें नाहीं परंतु त्या दोघांनीहि ती रक्कम घेण्याचें नाकारलें[१] ही संतोष मानण्यासारखी गोष्ट आहे. नाहींतर हे प्रकार यापुढील काळांत वारंवार दिसून येतात. हिंदी लोक स्वार्थाकरितां राष्ट्रघात कसा करतात यांचीं उदाहरणें वेळोवेळीं सर्व ठिकाणी दिसून येतात.

या तहानें दोस्तांच्या संघाची कंबरच मोडली व नाना फडणीस व महादजी शिंद्यांसारख्या कर्तबगार माणसांनीं चालविलेला उद्योग त्यांना कसातरी आपला भ्रम कायम ठेवून आवरता घ्यावा लागला. मद्रास व बंगालचें सैन्य एक होऊन त्यांना एकटच्या हैदराचा पराभव करितां आला.

हेस्टिंग्जनें या करामतींत आपला किती फायदा झाला आहे हें विलायतेच्या बोर्ड ऑफ डायरेक्टरास कळविलें आहे तें असें:—

" **राजाराम**पंताची मागणी मान्य करून आम्ही आमच्या विरुद्ध असलेल्या राष्ट्रसंघांतून एक मोठा प्रबळ शत्रु फोडला आहे. या फुटीमुळें शत्रुपक्षाचें जितकें बळ कमी झालें तितकेंच आपलें सामर्थ्य वाढलें आहे. भोंसले या कटांतून फुटले हें पाहतांच इतर दोस्तांच्या मनांतहि एकमेकांविषयीं अविश्वास उत्पन्न होईल व तेंच उदाहरण दुसरेहि गिरवितील. निजामानें आमच्याशीं अद्याप कांहींच विरुद्ध वर्तन केलें नाहीं. पुणेंकर तर आम्हांस

१ Forests Selections Vol. II P. 240.
उलट या दोघांनीं अंडरसनवरच हा प्रयोग चालविला होता. परंतु कोण. त्याहि स्वार्थाकरितां इंग्रज हा देशद्रोह करणार नाहीं हें त्यांना माहीत नव्हतें.

थरथर कांपतात, वरील हकीकत कळतांच आपणहि इंग्रजांशीं तह करावा असें त्यांचे मनांत येईल. भोंसले व इंग्रज एक झाले याची नुसती प्रसिद्धि[१] होतांच त्याचा मोठा परिणाम होईल. हिंदुस्थानांतील सर्व राष्ट्रें आमचेवर उलटल्यानें त्यांचे शक्तीपुढें आम्ही चिरडले जाऊं ही जी भावना सर्वत्र पसरली होती ती आतां नाहींशी होईल व लढाईचें पारडें आतां आपले बाजूस फिरलें आहे असें समजा. युरोपांतली गोष्ट निराळी. तिकडे एखादे राष्ट्रावर इतर राष्ट्रें तुटून पडतांच बाकीचीं राष्ट्रें त्याचे मदतीस धांवून निरनिराळ्या राष्ट्रांच्या शक्तीचा कांटा समतोल ठेवतात. कारण त्यांचें स्वतःचेंहि अस्तित्व यावरच अवलंबून असतें. पण हिंदुस्थानांत तसें नाही. एखाद्या अशक्त राष्ट्रावर दुसऱ्यानें हल्ला केला तर इतर राष्ट्रें त्याचे मदतीस न धांवतां त्याचेच लचके आपणहि तोडूं पाहतात व प्रबळ पक्षाच्या वाटेसहि जात नाहींत व ज्याचा जोर ज्यास्त त्याच्याच बाजूस आपणहि झुकतात."

१ ही प्रसिद्धि खरोखर यापूर्वीच झाली होती. हैदरानें याबद्दल नाना फडणीसास पत्रें लिहिलीं पण धूर्त नानास खरी गोष्ट माहीत असतांहि तो हैदरास कळवीत असे कीं ही गोष्ट खरी नाहीं व लौकरच तुम्हास भोंसल्यानें बंगाल घेतल्याची खबर येईल. उदाहरणार्थ पुढील पत्र पहाः—

हैदरखानास नानाचें पत्र ता. २१-१-१७८१ इ.

". . . . इंग्रजांनीं नागपुरचे भोंसले यासी मकाफी जावसाल बोलोन सलुख करून घेतला. मोंगलाकडे तो मातबर फिरंगी जाऊन दरमदार जालाच आहे...म्हणोन कलमी केलें. . . .भोंसले स्वराज्याचे सिकमांत तेव्हां मक्फी सलूख करून घेतील हें कयासांत गुजरत नाहीं. थोडेच आरशांत बंगाला गारत केल्याच्या खबरा आपल्यास पोहोचतील ऐसे हमेश भोंसलें सरकारांत लिहितात. इकडूनहि हे शक्कल जलद नमूदास यावी म्हणून पत्रें जातात. इंग्रजाचे तंबीचा नक्षा नबाब निजामअलीखां बहादूर यांचे सल्ल्यानें ठरला. सालगुदस्त **अदवनीच्या** मंझेलामुळें नमूद न जाले. मंझेला फैसल झाला तों बरसात सुरू झाली. बादबरसात आजम करतील ऐसें होतें. बरसात गुजरली. ताहाल निघणें होत नाहीं व मिस्तर हालन यास लावून घेतलें. सबब सरकारांतून त्यासी लिहिण्यांत येतच आहे. हल्लीं

" **राजारामपंताशीं** केलेल्या तहामुळें भोंसले आपल्याशीं एकदां गुरफटले गेले कीं मग त्यांना त्यांतून मोकळे होणें दुष्कर आहे. **हैदराशीं** लढण्यांत त्यांचें सैन्य आपल्याबरोबर येणें म्हणजे **हैदरावर** भोंसल्यानें स्वारी करण्यासारखेंच आहे. **पीयर्सच्या** लष्करांत घोडेस्वारांची कमतरता मोठीच होती. ती दूर झाली व मराठी घोडेस्वारांचा उपयोग इंग्रजी स्वारांइतका जरी चांगला होणार नाहीं तरी हैदराच्या स्वारांच्या बरोबरीनें लढण्यास तरी ते चांगले उपयोगी पडतील."

" गढामंडल्यावर भोंसल्यांचें व आमचें लष्कर गेलें म्हणजे आपोआपच पेशव्यांशीं व भोंसल्यांशीं झुन्ज लागेल व भोंसल्यांस मग नेंहमीच आमच्या मदतीची जरूर लागून त्यांची व आमची दोस्ती कायम राहील."

" हा तह आम्हीं केला नसता तर **चिमणाजीचें** प्रचंड सैन्य जास्त दिवस रिकामें बसलें नसतें व त्यानें बंगाल प्रांतांत शिरून धुमाकूळ माजविला असता. त्याच्या स्वारीमुळें उद्योगधंदेवाले लोक पळून गेले असते. रेशमाचे किडे मरून जाऊन पुढें कैक वर्षेंपर्यन्त लाखो रुपयांचें नुकसान झालें असतें. तिकडचे लोक आमचेवर टीका करतील व आमचें कृत्य भ्याडपणाचें झालें असें म्हणतील परंतु यांत आमचा फार फायदा झाला आहे. एकदां पैसे दिले म्हणजे मराठे पुन:पुन्हां त्या लालचीनें बंगाल्यावर स्वाऱ्या करतील असेंहि कोणास वाटेल तर तसें शक्य नाहीं; कारण तीस चाळीस हजार लष्कर आणून कोट दोन कोटी रुपये खर्च करून शेवटीं बारापंधरा लक्ष रुपये मिळवून परत जाण्यांत तरी काय फायदा होणार?"

या तहानंतर मराठे लष्कर रुपये घेऊन निघून गेलें. **पीयर्स** बरोबर मराठा स्वारांची रवानगी झाली. नागपुरास या तहाची माहिती समजल्यावर **मुधोजीनें दिवाकरपंतास** हेस्टिंग्जच्या भेटीस पाठविण्याचें ठरलें होतें पण इकडे नाना फडणीसास ह्या तहाची बातमी लागतांच त्यानें **मुधोजीस** खरमरीत पत्र लिहून धमक्या दिल्या. त्यामुळें तो घाबरला व स्वत: पुण्यास जाण्याच्या व इंग्रज व दोस्तसंघ यांमध्यें तह घडवून आणण्याच्या

आपलें खत पोहोचल्यावरहि निकडीनें नबाब मवसूफ यास लिहिले आहे व कोणी मातबरहि त्याची मिजाज दरयाफ्त करण्यास रवाना करण्यांत येईल."
—काव्ये. सं. पत्रें यादी (चित्रशाळा प्रत) ले. ३०५ व ३०८ पहा.

गोष्टी बोलूं लागला. या कामाकरितां त्यानें **दिवाकरपंतास** ताबडतोब पुण्यास पाठविण्याचें ठरविलें. परंतु इंग्रजांशीं आधीं बोलून त्यांची तयारी कोठपर्यंत आहे हें अजमावण्याकरितां **दिवाकरपंतानें** प्रथम गव्हर्नर जनरलाची भेट घ्यावी व नंतर पुण्यास जावें असें ठरलें. **हेस्टिंग्जनें** काशीस यावें व **दिवाकरपंतानें** तेथें जाऊन हेस्टिंग्जची भेट घ्यावी असें ठरलें. **दिवाकरपंत** काशीस जाण्याचे तयारीस लागला. परंतु तो अति वृद्ध झाल्यामुळें आजारी पडून नागपुरासच मरण पावला. [१]

हेस्टिंग्ज याचे मनांत पेशव्यांशींहि कसाबसा तह करून घ्यावयाचा होता परंतु **दिवाकरपंत** मृत्यु पावल्यामुळें **मुधोजीस** मध्यस्थी करण्याकरितां त्यानें विनविलें व गॉडर्ड यानेंहि मुधोजीस लिहिलें. मुधोजीनें तें कबूल केलें. **हेस्टिंग्ज** यानें यापूर्वीं महादजी शिंद्याकडेहि संधान बांधलें होतें. महादजी शिंद्यासहि त्यानें बरीच लालूच दाखविली होती व ती पुढें उपयोगीहि पडली. परंतु तह घडवून आणण्याचें श्रेय आपणास मिळावें व त्याबरोबरच आपणास प्रत्यक्ष कांहीं लाभहि घडावा या लालचीनें भोंसले व शिंदे यांजमध्यें चुरस लावण्याकरितां **हेस्टिंग्जनें मुधोजीकडे** चार्लस **चॅपमन** नांवाचा वकील नागपुरास पाठविला. [२]

**चॅपमन याची नागपुरास रवानगी--महादजी शिंद्याचे**मार्फत इंग्रजांनीं तहाचें संधान लावलें हें ऐकून **मुधोजीहि** रागावलाच होता. **चॅपमन** आल्यामुळें त्यास थोडें बरें वाटलें. **चॅपमन** २२–१–१७८२ रोजीं नागपुरास येऊन पोहोंचला व त्यानें मुधोजीशीं बोलणें सुरू केलें. मुधोजीनें स्वतः पुण्यास जाण्याचें व नाना फडणविसाशीं बोलण्याचें कबूल केलें; पण-

१ **दिवाकरपंत** हा ऑगस्ट १७८१ इ. मध्यें मरण पावला. लाला सेवकराम याचे पत्रांत तो काशीस हेस्टिंग्ज यास भेटल्यावर तेथें मृत्यु पावला असें लिहिलें आहे परंतु तें खरें दिसत नाहीं ( सरदेसाई उ. वि. १ पा. ३३० पहा ).

२ हेस्टिंग्जनें याबद्दल म्हटलें आहे:–चॅपमन यास मीं पत्र वरवर दाखविण्याकरितांच पाठविलें आहे. शिंदे व भोंसले यांजमध्यें चुरस लावण्याकरितांच हें मीं केलें आहे. **Forests selections vol. III p. 821**

इकडे इंग्रजांचें **महादजी** शिंद्याशींहि ज. गॉडर्ड याचे मार्फतीनें संधान चालूच होतें व **महादजीच्या** लष्करी सामर्थ्यामुळें त्याच्या शब्दास किंमत होती.

मराठ्यांशीं कसातरी तह घडवून आणून आपली इभ्रत वांचवावी याकरितां इंग्रजांची चोहोंकडून धडपड चालू होती. मद्रासकर इंग्रज हैदराचे माऱ्यानें बेजार होऊन त्यांनीं गव्हर्नर लॉर्ड मॅक **कार्टने**, सर आयर कूट, सर एडवर्ड ह्यूजेज व मॅक **फर्सन** यांचे सहीनें अर्काटचा नबाब महमदअल्ली याचा वकील पुण्यास होता त्याचे मार्फतीनें नाना फडणीसाशी बोलणें सुरू केलें. मुंबईकर इंग्रजांनीं कॅ. **वादरस्टन** यास पुण्यास त्याच कामाकरितां पाठविलें. कर्नल **मूर** यानें महादजी शिंद्याशीं एक तात्पुरता तह करून कायमचा तह करण्याचें बोलणें सुरू केलें. **गॉडर्ड** हा तर गव्हर्नर जनरलातर्फे मुखत्यार म्हणूनच शिंद्याशीं बोलत होता. शेवटी **हेस्टिंग्ज** यानें महादजी **शिंद्या**कडूनच जास्त उपयोग होईल हा अंदाज पाहून कीं काय त्याचेकडे अंडरसन [१] यास मुद्दाम पाठविलें. त्यामुळें मुंबईकर इंग्रजांनीं वॉदरस्टन यास परत बोलावलें. आपलेमार्फत तह व्हावा ही नाना फडणीसाचीहि फार इच्छा; परंतु धूर्त नानाकडून जास्त फायदा होईल अशी इंग्रजांस आशा नव्हती व **महादजीचा** स्वार्थ त्यास कांहीं मुलूख देऊन जागृत करतां येण्यासारखा होता म्हणून त्यांनीं महादजीवरच जास्त भिस्त ठेविली. महादजीस त्यांनीं **भडोच** जिल्हा स्वतःकरितां देण्याचें कबूल केलें व **महादजी** शिंद्याच्या मध्यस्तीनें **सालबाई** येथें ता. १७-५-१७८२ रोजीं पक्का तह ठरला. लढाईपूर्वी ज्याकडे जो मुलूख होता तो त्याजकडे रहावा. **राघोबास** इंग्रजांनीं महादजी शिंद्याचे स्वाधीन करावें व त्यास दरमहा पंचवीस हजार नेमणूक करून त्यानें वाटेल[२] तेथें रहावें याप्रमाणें तह ठरला.

---

१ चिमणाबापूकडे जाऊन ज्यानें तह केला तोच हा. यास मराठी कागदपत्रांत इंद्रसेन असें म्हटलें आहे. (पत्रें यादी ले. ४१८ पहा.) वॉदरस्टन यास उदीस्टीन, डव्हटन यास दपटीन वगैरे अपभ्रंश मराठी पत्रव्यवहारांत नेहमीं होत त्यामुळें कित्येक वेळां खरें इंग्रजी नांव समजण्यासहि अडचण पडते.

२ राघोबादादा गोदावरीच्या काठीं कोपरगांव येथें राहिला व लौकरच तेथें मरण पावला. आनंदीबाई व बाजीराव हे पुढें तेथेंच होते.

वास्तविक मराठ्यांस अगर हैदरास या तहापासून प्रत्यक्ष फायदा कांहींच झाला नाहीं व इंग्रज मोठ्या अडचणींतून मुक्त झाले. एकट्या **नानाशिवाय** इंग्रजांविषयीं दूरवर दृष्टि एकाहि मुत्सद्याची राहिली नाहीं असें म्हणावें लागतें व उलट प्रत्येक इंग्रज अधिकाऱ्यानें प्रामाणिकपणानें व अकलेनें वागून या संकटांतून इंग्रजांचा बचाव केला.

नानास हा तह विशेष पसंत पडला नाहीं. इंग्रजांतर्फे वॉदरस्टन--साष्टी देण्यास तयार होता तीही घेतली नाहीं. नानाचे मनांत पुढील गोष्टी करून घ्यावयाच्या होत्या त्या मुळींच साधल्या नाहींत--

१ अर्काटचे नबाबाचा मुलूख सोडून दिला त्यावर मराठ्यांचा चौथाईचा हक्क कायम रहावा असें लिहून घ्यावें.

२ तंजावरचें राज्य भोंसल्याचें तें पुनः त्या घराण्यांत कायम ठेवावे.

३ फत्तेसिंग गायकवाडाकडील ऐवज बुडाला.

४ इतर युरोपियनांशीं स्नेह करूं नये हें कलम कबूल नाहीं.

परंतु शेवटीं **महादजी** शिंद्यानें तह पक्का केला म्हणून **नानास**हि हा तह कबूल करावा लागला. **महादजी** शिंद्यानें अँडरसन यास गुजराथेंत पेशव्याकडून दोन लक्षांची जहागीर देण्याबद्दलहि करार केला होता असें दिसतें. त्यावर नानानें कुरकुरून एक लक्षाची जहागीर कबूल केली व लिहिलें की, पूर्वी उदीष्टीन ( वॉदरस्टन ) साष्टीसुद्धां देण्याचें कबूल करीत होता तेंहि इंद्रसेनानें ( अंडरसननें ) मिळवून दिलें नाहीं. मग त्यास जहागीर कशाकरितां कबूल केली.[1] ही जहागीर अँडरसननें स्वतःकरितां खरोखरीच घेतली कीं मध्यस्थांची ही थाप होती हें समजत नाहीं. इंग्रज वकीलानें स्वतःकरितां या स्वरूपाची लुचपत अगर बक्षिसी घेतल्याचें प्रसिद्ध नाहीं. घेतली असल्यास ती इंग्रजी मुलखांत सामील झाली असावी. इंग्रजी कागदपत्रांत या गोष्टीचा उल्लेख नाही. उलट हिंदुस्थानी वकिलांनीं अशी बक्षिसी ऊर्फ लुचपत घेतल्याची अनेक उदाहरणें आहेत.

**चॅपमन** हा नागपुरास असतांच **महादजी** शिंद्यामार्फत **सालबाई**चा

---

१ काव्ये. सं. पत्रें यादी ले. ३९४–४१८

तह होऊनहि गेला होता (१७-५-१७८२) व याप्रमाणें मुधोजीचा डाव सपशेल फसला.

**सालबाईचा** तह हैदरानें मान्य केला नाहीं. परंतु तो मरण पावल्यामुळें (७-१२-१७८२) पुणें दरबारानें तो पक्का केला. हैदराचा पुत्र **टिपू** यानें इंग्रजांशीं लढाई चालूच ठेविली. या लढाईत पुणें दरबारास **हैदरा**-तर्फेंहि तह करण्यास अधिकार होता. तो **टिपूनें** मान्य न केल्यामुळें व लढाई पुढें चालविल्यामुळें टिपूचा व मराठ्यांचा बिघाड झाला. शिंद्यानें टिपूस लढाई न थांबवाल तर आम्ही इंग्रजांस तुमचे विरुद्ध मदत करूं असा धाक घातला. पण टिपूनें तें ऐकलें नाहीं. टिपूनें इंग्रजांस बेजार करून शेवटीं **मंगलोर** येथें आपला स्वतंत्र तह केला (११ मार्च १७८४).

या तहांत सालबाईच्या तहाचा उल्लेखसुद्धां केला नाहीं. त्यामुळें मराठ्यांनाहि राग आला. मद्रासकर इंग्रजांना **सालबाईच्या** तहास धरून टिपूशीं तह करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरल यानें दिला होता; परंतु मद्रासच्या गव्हर्नरास कशी तरी लढाई आटोपण्याची घाई झाली होती त्यामुळें त्यानें इंग्रजांना अपमानकारक अशा शर्ती कबूल केल्या. गव्हर्नर जनरलास हा तह पसंत पडला नाहीं. परंतु अखेर त्यानें त्यास मान्यता दिली.

इंग्रजांशीं चाललेलें पहिलें मराठा युद्ध **सालबाईच्या** तहानें बंद झालें. भोंसल्यांची या युद्धांतील वर्तणूक अत्यंत गर्हणीय होती म्हणून पुणें दरबारांत त्याचें वजन राहिलें नाहीं. नानाकडून त्यास तंबी मिळाली, शिवाय तह करण्याचें यश **महादजी** शिंद्यास मिळालें. त्यामुळें खजील होऊन **मुधोजी** स्वतः पुण्यास गेला. तेथें त्याचा बरेच दिवस मुक्काम होता. कृतकर्माबद्दल त्याला **नाना**जवळ पश्चात्ताप करावा लागला. शिवाय पुन्हां मराठ्यांविरुद्ध आपण इंग्रजांस मिळणार नाहीं अगर मदत करणार नाहीं असें त्यानें कबूल केलें व माधवराव पेशव्याशीं जानोजी भोंसल्यानें १७७१ साली कनकापूर मुक्कामीं जो तह केला होता त्याप्रमाणें प्रामाणिकपणें वागण्याचें कबूल केलें. त्या तहाप्रमाणें पेशवे सांगतील तेथें भोंसल्यांनीं आपली फौज घेऊन लढाईस जावें असा करार होता. गेल्या युद्धांत हा करार भोंसल्यांनीं निमित्तमात्र पाळलाच होता परंतु आंतून मात्र कुचराई

केली होती. तसें पुन्हां करणार नाहीं असें त्यानें कबूल केलें. त्याचप्रमाणें गढेमंडल्याच्या सनदाहि खंडोजीच्या नांवानें देण्यांत आल्या. त्याप्रमाणें लेखी करारमदार झाले. (ता. ६–९–१७८५. ऐ. पत्र ले. २२८–२२९ पहा.)

**हेस्टिंग्ज**८–२–१७८५ रोजीं विलायतेंत गेला व मध्यंतरीं कांहीं दिवस **मॅकफर्सन** हा गव्हर्नर जनरल होता. त्यानें **मॅलेट** नांवाचा रेसिडेंट पुण्यास पाठविला होता. **मुधोजी** पुण्यास असतांना त्यानें नानाच्या सांगण्यावरून बंगालच्या चौथाईबद्दल पुन्हां आपला हक्क दाखविला; परंतु इतके दिवस ज्या गोष्टीची दाद इंग्रजांनीं दिली नाहीं ती ते आतां थोडेच देणार होते ?

**टिपूवर स्वारी**—दक्षिणेंत **टिपू** यानें पेशवे व निजाम यांच्या मुलखास त्रास देणें सुरू केलें. तसेंच इंग्रजांचा तर त्यानें नक्षाच उतरविला होता. तसाच हिंदूंवर धार्मिक जुलूमहि त्यानें सुरू करून पुष्कळ हिंदूंस जबरदस्तीनें बाटविलें. एके ठिकाणीं तर दोन हजार ब्राह्मणांनीं टिपूच्या धाकानें जीव दिले. यामुळें निजाम व पेशवे यांनीं **टिपू**वर स्वारी करण्याचा निश्चय केला. (१७८५). पेशव्याचें सैन्य **हरीपंत** फडक्याचे हाताखालीं पुण्याहून ता. १–१२–१७८५ रोजीं निघालें व निजामाच्या सरहद्दीवर त्यांनीं निजामाच्या सैन्यास मिळून पुढें टिपूवर जावें असा बेत केला.

**बदामीचा वेढा इ. १७८५**—यावेळीं मुधोजी पुण्यासच होता. त्यानें स्वतः **हरीपंता**बरोबर सैन्यासह जाण्याचें कबूल केलें व त्याप्रमाणें तो कर्नाटकांत गेला. मराठे व निजामअल्ली यांच्या सैन्यानें ता. १–५–१७८५ रोजीं बदामीस वेढा दिला; पण तोफांनीं किल्ला फुटेना म्हणून शिडचा लावून भिंती चढून आंत प्रवेश करून शहर काबीज केलें. बदामीच्या लढाईंत मुधोजी व त्याचा पुत्र **खंडोजी** ऊर्फ **चिमणाबापू** हे दोघेहि हजर होते. **बदामी** सर झाल्यानंतर **मुधोजी** इ. स. १७८६ चा पावसाळा सुरू होण्यापूर्वीं नागपुरास परत आला व मागें **खंडोजीस** सैन्यासह त्यानें मराठा लष्करावरोबर ठेवलें. तसेंच दसऱ्यानंतर जरूर पडल्यास आणखीहि सैन्य नागपुराहून पाठविण्याचें त्यानें कबूल केलें. बदामीच्या वेढ्यांत खंडोजीनें बरेंच शौर्य दाखविलें.

# फॉर्स्टरचें वर्णन

**फॉर्स्टरची वकिली १७८८**--लॉर्ड **कॉर्नवालिस** १७८६ चे सप्टेंबरांत कलकत्त्यास आला. इंग्रजांनीं पेशवे व निजामाशी टिपूच्या लढाईत सामील व्हावें व टिपूशीं इंग्रजांनीहि लढाई सुरू करावी असें त्यानें ठरविलें. पुण्यास **मॅलेट**च्या वेळेपासून इंग्रजी रेसिडेंट होता त्यानें नाना फडणीसाशीं याबद्दल बोलणें चालविलें. तसें नागपुरकर भोंसल्याशीहि हेंच बोलणें लावण्याकरितां त्यानें जॉर्ज **फॉर्स्टर** नांवाचा मद्रासकडे नोकरीस असलेला एक वकील नागपुरास पाठविला. हें युद्ध मद्रासच्या बाजूनें सुरू होणार असल्यामुळें व बंगाल व मद्रास यांमध्यें भोंसल्यांचा मुलूख असल्यामुळें बंगालचें सैन्य मद्रासकडे नेण्यांत पूर्वीचीच अडचण पुनः उभी राहणार होती. याच कामाबरोबर भोंसल्यांची इंग्रजांशीं जी दोस्ती होती व जी मुधोजीस पुण्यास नाना फडणीसानें तंबी दिल्यामुळें ढांसळली होती ती पुनः जुळवून घेऊन भोंसल्यास पूर्ववत् आपलेकडे ओढावें हा या वकीलीचा मुख्य उद्देश होता.

**फॉर्स्टरनें केलेलें नागपुरचे राज्याचें वर्णन**--**फॉर्स्टर** हा ता. १५-१-१७८८ रोजी नागपुरास येऊन पोहोंचला. त्यानें तेथील सर्व परिस्थिति बारकाईनें पाहून गव्हर्नर जनरलाकडे जो रिपोर्ट केला तो वाचण्यालायक आहे. नागपुर दरबारची आंतून पोखरलेली परिस्थिति त्यानें पाहून पुढील चित्र रेखाटलें आहे. तो म्हणतोः—" राज्याच्या खजिन्याची स्थिति अगदीं वाईट आहे. त्याचप्रमाणें सैन्यहि कमकुवत आहे. राज्याचें उत्पन्न सुमारें साठ लक्षांचें आहे. सर्व लष्कर म्हणजे सहा हजार घोडेस्वार, हलक्या कामगिरीकरितां बिनकवाइती हिंदुस्थानी लष्कर (पायदळ) व फरेंच घडणीच्या बंदुका असलेलें व तांबडे डगले घातलेलें वेडेवांकडे चारशें कवाइती लष्कर एवढेंच आहे.[१] म्हैसूरकडे शांतता आहे तोंपर्यंत तरी अशा निर्बल संस्थानिकाशीं दोस्ती करण्यांत मला विशेष फायदा वाटत नाहीं.

---

१ शिंद्याप्रमाणें युरोपियन लोक नोकर ठेवून चांगलें कवाइती लष्कर व तोफखाना करण्याचा प्रयत्न भोंसल्यांनीं मुळींच केला नाहीं. मराठ्यांचें

**बदामीच्या** युद्धानंतर तर भोसल्यांचें लष्कर आणखीहि कमी झालें आहे. **मुधोजीचें** वजनहि पुणें व हैदराबाद दरबारांवर विशेष दिसत नाहीं व टिपूशींहि त्याचा पत्रव्यवहार नाही.

**गोंड राजाशीं वागणूक**—"मुधोजीतर्फे एक गोष्ट मात्र सांगितली पाहिजे ती ही कीं गोंड राजा **बुऱ्हाणशहा** यास तो इतक्या चांगल्या तऱ्हेनें वागवितो कीं असें उदाहरण सर्व हिंदुस्थानभर सांपडणार नाहीं. **बुऱ्हाणशहाच्या** वडिलांनींच आपल्या वडिलास राज्य दिलें ही गोष्ट तो नेहमीं स्मरतो. **बुऱ्हाणशहास** कोणत्याहि तऱ्हेची अटक नाहीं. त्यास तीन लक्ष रुपये पेनशन मिळतें व शहराच्या भर वस्तींत त्याच्या किल्ल्यांत तो आपल्या कुटुंबासुद्धां राहतो. **बुऱ्हाणशहा** हा हल्लीं साठ वर्षें वयाचा आहे व तोहि स्वभावानें चांगला आहे. भोंसले हे बुऱ्हाणशहास राजा य नांवानें संबोधतात व वर्षास एकदां त्याचे घरीं जाऊन त्यास नजराणा वगैरे देऊन त्याचा गौरव करतात.[१]

"**मुधोजीस** तीन पुत्र आहेत. **रघूजी** हा हल्लीं गादीवर असून तो राज्य-कारभारांतील बऱ्याच गोष्टी स्वत: पाहूं लागला आहे. **व्यंकोजी** ऊर्फ **मन्याबापू** हा नांवापुरता दिवाणगिरीचें काम करतो. तिसरा **खंडोजी** ऊर्फ **चिमणाबापू**. मुख्य कारभार **मुधोजीच्या** हातांत आहे. **रघूजी** स्वत: कारभार पाहूं लागल्यामुळें दोघेहि एकमेकांस वचकून असतात. रघूजींत युद्धकौशल्य अगर शौर्य मुळींच दिसत नाहीं. तो फार द्रव्यलोभी आहे व वाटेल त्या मार्गानें पैसे उकळण्याकडे त्याची प्रवृत्ति आहे. त्यामुळें त्याच्या अधिकाऱ्यांना राज्याचा कारभार करणें कठीण झालें आहे."

---

खडें लष्कर फार थोडें असें. मोहिमेचे वेळेस लष्कर जमा करीत व मोहिमे-वरून परत आल्यावर सर्व शिपाई आपापल्या घरीं जात व आपले इतर धंदे करीत. एका पोवाड्यांत वर्णन केल्याप्रमाणें "तेली कोळी उदमी नाईक पडले भरी कर्जाचीं घेतलीं घोडी आले चाकरी" असेंच लष्कर बरेंच असे.

१ गादीवर बसतानां भोंसले हे या किल्लेवाले गोंड राजांच्या हातून टिळा लावून घेत असत अशीहि आख्यायिका आहे.

**चिमणाबापू**—"चिमणाबापू हा निवळ लढाऊ वीर आहे. तो फार धीट व शूर आहे. मुधोजीचा भाऊ **बिंबाजी** यास पुत्र नसल्यामुळें त्यानें **चिमणाबापू**सच आपला पुत्र म्हणून मानलें होतें व आपलें ठाणें जें **रतनपुर**, येथील कारभार आपले मागें चिमणाबापूनें करावा असें बिंबाजीनें ठरविलें होतें. **बिंबाजी** मेल्यावर त्याचे बायकोनेंहि हीच तजवीज मान्य केली. मुधोजीची या गोष्टीस हरकत नाहीं; परंतु **रघूजीस** धाक वाटतो कीं **चिमणाबापू रतनपुरचें** राज्य बळकावून बसेल व तो शूर असल्यामुळें प्रबळ होऊन आपल्या राज्यासहि त्यापासून धोका होईल. म्हणून तो **मुधोजीस** ही गोष्ट करूं देत नाही."

**मन्याबापू**—"**मन्याबापूस** दिवाणाचा हुद्दा दिला आहे परंतु तो निवळ त्या जागेचें उत्पन्न त्यास मिळावें एवढ्याकरितांच. कारण त्या जागेचें कामकाज तो मुळींच पहात नाहीं."

**इतर अधिकारी-बक्षी, चिटणीस, मुनशी व काळू.**—" राज्यांतील हल्लींचे मुख्य अधिकारी म्हणजे **बक्षी** याजकडे फौजेच्या व्यवस्थेचें काम आहे. दुसरा **मुनशी**—हा फारशी पत्रव्यवहाराचें काम करतो. तिसरा **चिटणीस**—हा मराठी भाषेंत होणारा सर्व पत्रव्यवहार करतो. चवथा **खजिनदार**. जुना दिवाण **दिवाकर**पंडित हा (१७८१ इ.) मेल्यापासून या सातआठ वर्षांत या जागेवर कोणीहि मनुष्य नेमला नाहीं. मुधोजी व त्याचे पुत्र अगर दुसरे तात्पुरते नेमलेले लोक हेच या जागेचें काम करतात. हल्लींचा बक्षी **भवानी काळू** हा ७० वर्षे वयाचा असून भोंसलेशाहींतील फार जुना नोकर आहे व भोंसल्यांच्या चाकरींत त्यानें मोठें नांव व पैसा कमाविला आहे. **दिवाकरपंत** असेपर्यंत त्याचें काम फौजेवरच असे. परंतु दिवाकरपंत मेल्यापासून हा दिवाणाचेंहि काम करतो व राजा व सर्वजण याला दिवाण म्हणूनच म्हणतात. **मुधोजी** हा परराष्ट्रीय राजकारणांत व लष्करी हालचालींत विश्वासू व अनुभविक मनुष्य म्हणून त्याचीच सल्ला घेतो. तसेंच त्याच्या पैशामुळें व त्याचे चोहोंकडे मोठमोठ्या लोकांशीं जे संबंध आहेत त्यामुळें त्याची आपणास सदैव मदत होईल म्हणून **मुधोजी** त्यास फार मान देतो. परंतु **रघूजीची** मर्जी **भवानी** काळूवर मुळींच नसून तो त्याला

कामावरून काढण्याच्या खटपटींत आहे. **रघूजीच्या** मनांत **महादाजी लष्करी** यास दिवाणगिरीवर नेमावयाचें आहे. कारण **महादाजी** हा कोणाजवळ द्रव्य आहे ह्या गुप्त बातम्या रघूजीस देतो व त्यांचेकडून पैसे उकळण्याच्या युक्त्या **रघूजीस** सांगतो; त्यामुळें त्याचेवर रघूजीची मर्जी आहे. परंतु मुधोजीस **भवानी** काळूची योग्यता माहीत असल्यामुळें तो या गोष्टीस संमति देत नाहीं. **भवानी** काळूवर रघूजीचा राग होण्याचें दुसरें एक कारण असें कीं, तो **चिमणाबापू**च्या पक्षाचा आहे व चिमणाबापूस रतनपुरचा कारभार देऊन पाठवावें असा तो मुधोजीस सल्ला देतो. मुधोजीसहि ही सल्ला पसंत पडते. कारण **चिमणाबापू** हा शूर असल्यामुळें छत्तीसगड, बलसोरकडील संस्थानिकांना तो दाबांत ठेवील व नागपुराहून कटकाकडे जाणारे मराठे सैन्यास रस्त्यांत जो अडथळा होतो तो दूर होऊन नागपूर ते **बलसोर**पर्यंत रस्ता निर्विघ्न होईल व कटक प्रांताचाहि चांगला बंदोबस्त होईल. ही गोष्ट मुधोजीस पटते पण रघूजीच्या संमतीशिवाय ही गोष्ट त्याला करतां येत नाहीं."

**भवानी मुनशीः**—"**भवानी नागनाथ मुनशी** हा हल्लीं ८० वर्षांचा म्हातारा झाला असून अगदींच पिकलें पान झाला आहे. मुसलमान संस्थानिक व इंग्रज यांजमधील दरबारी काम हा करतो; परंतु ह्या कामाच्या फार दिवसांच्या अनुभवाशिवाय इतर कर्तबगारी या गृहस्थांत विशेष दिसत नाहीं व त्याच्या कामाबाहेर त्याची सल्लामसलतहि कोणी घेत नाही. **बाबाजी चिटणीस** व **चिमणाजी आप्पा** खजिनदार हे आपापलें काम करतात व त्यांचे कामाशिवाय मुधोजीजवळ कांहीं वजन नाहीं. **दिवाकरपंत** मेला तेव्हां त्याचेजवळ पुष्कळ द्रव्य होतें परन्तु तो मरतांच **मुधोजीनें** त्याची **सर्व इस्टेट भरून** आणली. १ **जानराव** नांवाचा मनुष्य **दिवाकर**पंताचे घरींच वाढला होता. त्याला **दिवाकर**पंताचें द्रव्य कोठें आहे हें माहीत होतें. त्यानें तें मुधोजीस सांगितलें व मुधोजीनें तें सर्व भरून आणलें. त्या वेळेपासून **जानरावावर** मुधोजीची मोठी मर्जी बसली आहे व बऱ्याचशा

१ दिवाकरपंत जिवंत होता तेव्हांहि ही गोष्ट एकदां झालीच होती हें इतरत्र लिहिलें आहे. दिवाकरपंतास पुत्र नसून फक्त एक दासीपुत्र होता यामुळें ही गोष्ट सुसाध्य झाली असावी.

गुप्त मसलतींत जानराव हा मुधोजीचा हस्तक झाला आहे. मुधोजीप्रमाणेंच रघूजीचीहि त्यानें मर्जी संपादन केली आहे. राजाचा शिक्का त्याचेजवळ असतो."

**महमदअल्ली**—"**शेख महमदअल्ली** नांवाचा भोंसलेशाहींतील एक जुना घरगुती नौकर आहे तो राजाच्याजवळ नेहमीं राहून राजाच्या करमणुकीच्या विषयांत भाग घेतो. त्याला फारशी चांगलें येत असून दरबारी रीतरिवाज चांगले अवगत आहेत, म्हणून कोणी इंग्रज गृहस्थ नागपुरास आला म्हणजे त्याचे आदरसत्कारास त्याला पाठवितात.[१] नागपुर शहरांतील न्यायाधिशाचें काम याचेकडेच आहे; परंतु महत्त्वाचे निवाडे राजा स्वतः करतो"

खुद्द **मुधोजी**विषयीं व त्याच्या दरबारांतील लोकांविषयी फॉर्स्टर यानें असेंहि लिहिलें आहे :—**मुधोजी**—"**मुधोजी** हा वयानें पन्नास व साठीच्या दरम्यान आहे. तो धीट व शूर म्हणून प्रसिद्ध आहे. तो बांध्याने ठेंगणा पण त्याचें शरीर कसलेलें आहे. शरीरानें तो अद्याप टुणटुणीत[२] आहे. तो शेतकरी, उदमी, व्यापारी वगैरे लोकांना दयेनें वागवितो अशी त्याची ख्याति आहे. परंतु राजकारणांत पुष्कळदां त्यानें क्रूरपणाचीं व विश्वासघाताचीं कामें करण्यास कमी केलें नाहीं असें म्हणतात. लष्करास पगार देण्यांत तर तो फारच कुचराई करतो. त्यामुळें कित्येक वेळां त्याचें लष्करच त्याचेवर बदलून त्याच्या अंगावर सुद्धां त्यांनीं हल्ले केले आहेत व त्यास जखमीहि केलें आहे.[३] वाटेल तीं वचनें देऊन तीं मोडण्यांत त्याचा हातखंडा आहे. एखाद्या अधिकाऱ्यावर गैरमर्जी झाली कीं त्याचेवर जुलूम करून त्याचेजवळून तो खूप पैसे काढतो.

अशीं एक दोन उदाहरणें **फॉर्स्टर** यानें ऐकलेलीं लिहिलीं आहेत.

---

१ कँबेल व अंडरसन हे कलकत्त्याहून आले. त्यांना आणण्यास हाच सामोरा गेला होता.

२ परंतु या वर्णनानंतर लौकरच म्हणजे ता. ९ मे १७८८ रोजीं मुधोजी मरण पावला.

३ एलिचपुरास मुधोजीवर त्याचे लष्करांतील पठाणांनीं हल्ला करून त्यास जखमी केलें. त्यास अनुलक्षून हें वर्णन दिसतें.

"सातआठ वर्षांपूर्वी एक अशीच गोष्ट घडली. **उदेपुरी** गोसाव्याचें राजाकडे सुमारें पन्नास लाख रुपये कर्ज झालें व त्याचा पैशाबद्दल तगादा लागला. **उदेपुरीस** दोन चेले असून त्यांना तो पुत्रांप्रमाणें वागवीत असे. त्यांपैकीं एका मुलाची एक राख ठेवलेली होती. एकदां रात्रीं तो तिच्या घरीं गेला असतां तिचा कोणी खून केलेला असून ती मरून पडलेली सांपडली. त्यावरून त्या मुलावरच खुनाचा आरोप ठेवून त्यास पकडण्याकरितां **मुधोजीनें** त्याच्या घरावर शिपाई पाठविले. त्या गर्दीत ते दोन्ही मुलगे मारले गेले. त्यांतच **उदेपुरीस**हि धाक दाखवून राजाचे पन्नास लाखांचे रोखे **उदेपुरी**कडून जबरदस्तीने काढन घेतले. तेव्हांपासून **उदेपुरी** अगदीं गरीब झाला व नागपूराहून निघून गेला."

**बेनीराम** पंडिताजवळ पुष्कळ द्रव्य आहे अशी मुधोजीस बातमी लागली. एकदां त्याचा भाऊ **विश्वंभर** हा नागपुरास असतांना **मुधोजीनें** त्याजकडून पैसे मागितले. तो घाबरला व त्यानें **बेनीराम** काशीस आहे तेथें जाऊन त्याचेजवळून आणून देतो असें सांगून पळून जाऊं लागला. शेवटीं भवानी मुनशीनें मध्यस्थी केल्यावरून व बेनीरामाचें व इंग्रजांचें सूत आहे हें ओळखून मुधोजीनें त्याचा नाद सोडला.

" भोंसल्यांचे मुलखाची उत्तरेकडील सरहद्द **लाखना**दौनच्या उत्तरेस चार कोसांवर **शेर**नदी ही आहे. पलीकडेस **काल्पीचे**[१] **बाळाजीचा** मुलूख आहे. पूर्वेस **रतनपुरच्या** प्रदेशापर्यंत तसेंच **सम्बळपूर** व इतर संस्थानें धरून **कटका** पर्यंत त्यांचा अंमल आहे, दक्षिणेस गोदावरीच्या उत्तरेस दहा कोसांपर्यंत भोंसल्यांचा अमल चालतो. पश्चिमेस सर्व वऱ्हाडप्रांत भोंसल्यांच्या अमलाखालीं आहे. एकंदरींत दक्षिणेस गोदावरीपासून उत्तरेस नर्मदेपर्यंत यांचा अमल आहे."

" भोंसल्यांच्या मुलखाचें उत्पन्न साठ* लक्षांचें आहे तें पुढीलप्रमाणें—

१ गोविंदपंत बुंदेल्याचा मुलगा बाळाजी गोविंद खेर

* फॉर्स्टर यास मिळालेले आंकडे बरेच कमी दिसतात. भोंसल्यांचें यावेळचें सर्व उत्पन्न एककोटी पर्यन्त असावें.

| | |
|---|---|
| नागपूरप्रांत | १८ लक्ष |
| वऱ्हाडचें निमें उत्पन्न | १० लक्ष |
| गंगथडीप्रांत | २ लक्ष |
| कटक प्रांत | १७ लक्ष |
| रतनपुर | ३ लक्ष |
| मुलताई परगणा | २ लक्ष |
| इतर उत्पन्न | ७ लक्ष |
| | ५९ |

परंतु ह्या रकमांपैकीं १६ लक्ष रु. परभारेंच खर्च होतात ते:—

| | |
|---|---|
| बुऱ्हाणशहा गोंडराजाची नेमणूक | ३ लक्ष |
| शिवणीचा जहागीरदार महमद[1] | |
| अमीनखान याची नेमणूक | ३ लक्ष |
| वऱ्हाडचा लष्करी खर्च | ३ लक्ष |
| कटक प्रांताचा लष्करी खर्च | ७ लक्ष |
| | १६ |

" भोंसल्यांचें लष्कर पुढीलप्रमाणें आहे.

(१) घोडेस्वार

२००० बारगीर ( यांचे घोडे सरकारी असत ).
४७०० नागपूरचे शिलेदार ( यांचे घोडे खाजगी असत )
३०० शिवणीच्या जहागीरदाराचे स्वार
२००० कटक येथील स्वार
१५०० गंगथडींतील स्वार.

१०५००

(२) बिनकवाइती पायदळ. याची संख्या माहीत नाहीं.

(३) हत्ती दोनशें.

---

[1] हा भोंसल्यांच्या पदरीं फार दिवस असून **लाखनादौनपासून रामटेक पर्यन्त** मुलूख याचे ताब्यांत होता. याचे वंशज शिवणी येथें आहेत. **वंशा**-वळ पहा.

(४) तोफा–१५[M] ह्या नागपुरासच ओतल्या आहेत त्यांवर अंमलदार दोन इंग्रज व एक फरेंच व इतर पोर्तुगीज आहेत. हे भोसल्यांकडे नोकर आहेत.

" भोंसल्यास शेजारच्या संस्थानिकांपासून कांहीं भीति नसल्यामुळें व पुणें दरबारापासून तो जवळ जवळ स्वतंत्रच असल्यामुळें त्यास कोणाची भीति राहिली नाहीं. **गढामंडला** प्रांत देण्याची लालूच पेशव्यानें त्यास दाखविल्यामुळें तो टिपूच्या युद्धांत पडला."

**महाल राजवाडा**—नागपुरास महाल म्हणून जो राजवाडा होता तो बांधण्यास मुधोजीनें या सुमारास सुरवात केलेली दिसते (इ. १७८८). फॉर्स्टरच्या रिपोर्टांत उल्लेख आहे कीं, " राजानें हल्लीं नागपुरास मोठा वाडा बांधण्यास सुरवात केली आहे व त्यास बराच खर्च लागत आहे. तसेंच आजूबाजूसहि त्यानें बऱ्याच इमारती बांधल्या आहेत." हा वाडा इ. स. १७९० चे अखेरीस पूर्ण झाला. **लेकी** नांवाचा इंग्रज फॉर्स्टरच्या दुसऱ्या वकीलातीच्या वेळीं त्याचेबरोबर आला होता तो लिहितो कीं, " ह्या वाड्याचें काम आतां पूर्ण होत आलें आहे. वाडा निळ्या दगडानें बांधलेला असून ते दगड नागपुर शहरच्या पश्चिमेस जवळच सांपडत असत." **लेकीच्या** मतानें दगडाचे वर विटाचें काम बांधल्यामुळें दगडाची भव्य शोभा नाहींशी झाली.

वाड्याचा कांहीं भाग हल्लीं राहिला आहे, परंतु मुख्य भाग नाहींसा झाला आहे. याचे निरनिराळे चौक व दालनें यांचें वर्णन ना० भोस० कागदपत्र लेखांक १२[N] वरून अजमावतां येतें. तसेंच कोलब्रुक यानें सहा चौक व दिवाणखाने यांचें वर्णन केलें आहे.

---

[M] याशिवाय हिंदुस्थानी लोकांचा तोफखाना निराळा असावा. १५ ही संख्या फार कमी दिसते.

शिवाय भोंसल्यांच्या पदरीं बाणांचें (दारूचें) लष्कर प्रसिद्ध असे. त्याचा यांत उल्लेख नाहीं. सीताबर्डीचे टेकडीवर बाणाचे खपरेल म्हणून इमारत होती. खड्यांचे लढाईचे पोवाड्यांत भोंसल्यांचे बाणांचे सैन्याचा उल्लेख आहे.

[N] पान ४११ पहा ऐ० प० ले. ४३२

यानंतर दुसऱ्या रघोजीनें दुसरा वाडा बांधला. त्यास नवीन हवेली असें म्हणत. पुढें त्यांत बाकाबाई परसोजीस घेऊन जाऊन राहिली. नंतर त्यास बाकाबाईचा वाडा म्हणत. हल्ली तेथें सिटी स्कूल आहे.

शिवाय तेलंगखेडी येथेंहि राजाचा एक वाडा होता. तेथें आप्पासाहेब कांहीं दिवस जाऊन राहिला होता. पारडी येथेंहि एक वाडा होता. सक्करदरा येथील वाडा अद्याप कायम आहे. शिवाय तुळशीबागेंतहि एक वाडा आहे.

राजाच्या बागांपैकीं तुळशीबाग, केळीबाग, तेलंगखेडी, बजरंगबाग(काग० १०५ ) नजरबाग, गणेशबाग ( ब. ८२ ) इत्यादिकांचीं नांवें कागदोपत्रीं सांपडतात.

**मुधोजी** हा ता. ९–५–१७८८ इ. रोजीं मरण पावला. त्यापूर्वीच त्याचा भाऊ बिंबाजी हा इ. स. १७८७ मध्यें मरण पावला होता. आतां रघोजीच्या हातीं सर्व कारभार आला. **खंडोजी** यास छत्तीसगड व **व्यंकोजी** यास चंद्रपुरचा कारभार प्राप्त झाला.

**फॉर्स्टर** याचा रिपोर्ट लॉर्ड **कार्नवालीस** यास मिळाल्यावर त्यानें नागपुरचा नाद कांहीं काळपावेतों सोडून दिला व **फॉर्स्टर** यास नागपुरहून कलकत्त्यास परत बोलावलें. फॉर्स्टर ता. १०–२–१७८९ इ. रोजीं नागपुराहून निघाला. फॉर्स्टरच्या भेटीवरून लॉर्ड **कार्नवालीस** यास पुढील गोष्टी कळून आल्या. त्या त्यानें आपल्या मिनिटांत लिहून ठेवल्या आहेत. तो म्हणतो—" नागपुरच्या राजाशीं दोस्ती करण्यांत आपला विशेष फायदा आहे असें नाहीं. उलट भोंसल्यांचा कटकप्रांत त्याच्या राजधानीपासून इतका दूर आहे व तेथें बंदोबस्त इतका कमी आहे की, आम्ही तो वाटेल तेव्हां जिंकून घेऊं शकूं म्हणून इंग्रजांशीं दोस्ती ठेवण्यांत भोंसल्यांचाच फायदा आहे. दुसरी गोष्ट ही कीं सामोपचारानें भोंसल्यांकडून कटकप्रांत आपणास मिळणें शक्य नाहीं. कितीहि रक्कम कबूल केली तरी तो प्रांत भोंसले देण्यास तयार होणार नाहींत. दुसरा प्रांत त्याचे मोबदल्यांत भोंसल्यास द्यावा तर तसा प्रांत आपलेजवळ नाहीं व पुढेंहि येण्यासारखा नाहीं. शिवाय पुणें दरबारची संमति असल्याशिवाय भोंस-

त्यासमुद्धां तो इंग्रजांस देतां येणार नाहीं व पुणेकरांचा स्वतःचा कांहीं फायदा झाल्याशिवाय ते अशी संमति कधींहि देणार नाहींत. इंग्रजांना कटकप्रांत घेणें तो केव्हां तरी जबरदस्तीनें सैन्याच्या जोरावरच घ्यावा लागणार आहे व अशा तऱ्हेनें हा प्रांत इंग्रजांस केव्हांहि सहज घेतां येईल. "

शिंदे, होळकर, पेशवे व निजाम यांनीं मिळून टिपूशीं लढाई सुरू केली त्यावेळीं नाना फडणीसानें नागपुराहून रघूजीसहि बोलाविलें होतें. त्याचें सैन्य न आल्यामुळें नानानें रघूजीस स्वतःस पुण्यास बोलावून त्याची कानउघाडणी केली. रघोजी ता. २३-३-१७८९ रोजीं पुण्यास जाऊन पोहोंचला.मी टिपूवर गेल्यास मागें चिमणाबापू काय करील याचा नेम नाहीं असें म्हणून दहा लक्ष रुपये लढाईचे खर्चास देऊं करून त्यानें वेळ मारून नेली व ता. ७-५-१७८९ इ. रोजीं पुणें सोडून तो परत नागपुरास आला. तो परत आल्यावर चिमणाबापू हा लौकरच ( १६-८-१७८९ इ. ) मरण पावला व रघोजी निर्धास्त झाला. छत्तीसगड व चंद्रपुर हे दोन्ही प्रांत व्यंकोजीच्या ताब्यांत आले.

**फॉर्स्टरची दु. वकीली-इ. सन** १७०९-बरेच दिवसांपासून धुमसत असलेलें टिपू-विरुद्ध इंग्रजांचें युद्ध सुरूं झालें व इंग्रज हे मराठे व निजामाच्या संघांत सामील झाले. पुणें येथें या त्रिकुटांचा ता. १-६-१७९० रोजीं तह ठरला. अर्थातच इंग्रजांचें बंगालमधील सैन्य मद्रासकडे नेण्याची वेळ पुन्हां आली. नागपुरकराशीं तह करण्याची आतांपर्यन्त जी जरूर वाटत नव्हती ती आतां अवश्य झाली. म्हणून **कॉर्नवालीस** यानें **फॉर्स्टर** याची पुन्हां नेमणूक करून त्यास नागपुरास पाठविलें. **फॉर्स्टर** ता. ७-३-१७९० रोजीं कलकत्त्याहून निघाला तो **बलसोर** येथें ता. २२ व **कटक** येथें ता. ३१ रोजीं आला.

**लेकीचें वर्णन-कटक—फॉर्स्टर**बरोबर **लेकी** नांवाचा इंग्रज गृहस्थ होता. त्यानें या प्रवासाची सविस्तर हकीगत लिहून ठेविली आहे. त्यामुळें आपणांस तत्कालीन परिस्थिति बरीच समजते. कटकसंबंधानें तो म्हणतो--

" येथील सुभेदार **राजारामपंत** हा हल्लीं नागपुरास गेला आहे. दोनतीन वर्षांनीं एकदां त्याला हिशेब देण्याकरितां नागपुरास जावें लागतें. **कटकची** जमा मक्तेदारीच्या पद्धतीसारखीच वसूल केली जाते. या प्रांताचें उत्पन्न बावीस लक्ष आहे. त्यांतून दहा लक्ष रुपये **नागपुरास** पाठवावे लागतात. बाकीचें उत्पन्न प्रांताचे खर्चाकरितां सुभेदारानें खर्च करावें व उरेल तें त्यानें घ्यावें अशी ही तजवीज आहे. नागपुराहून तो परत आला म्हणजे बहुधा त्याचा खिसा अगदींच रिकामा होतो. कारण आपलेकडे सुभेदारी चालू ठेवण्याकरितां त्याला बरेच नजराणे द्यावे लागतात व पुष्कळांचे खिसे भरावे लागतात. हें सर्व नुकसान भरून काढण्याकरितां व प्रांताच्या खर्चाकरितां त्याला हे सर्व पैसे प्रजेकडूनच उकळावे लागतात. कटक प्रांतांत सोनें व चांदीचा व्यवहार फार कमी असून सर्व देवघेव कवड्यांनीं होते. "

**जगन्नाथाच्या यात्रेचें उत्पन्न**—ओरिसांतील उत्पन्नाची मुख्य बाब म्हणजे जगन्नाथाचे यात्रेस जाणाऱ्या लोकांपासून वसूल करण्यांत येणारा कर हा होय. एका बैलाचे पाठीवरील रेशमी कापडाच्या मालास सहा रुपये जकात द्यावी लागते व याच प्रमाणांत इतर मालावरहि जकाती आहेत. दक्षिणेकडील यात्रेकरू प्रत्येकीं सहा रुपये कर देतात. बंगाल्यांतील लोक श्रीमंत असल्यामुळें त्यांचेपासून प्रत्येकीं दहा रुपये घेतात. परंतु हा कर नक्की नसून जसा मनुष्य दिसेल त्या मानानें कमीजास्तीहि घेतात. "

**बारमलची खिंड**–बंगाल्यांतून नागपुरास येणारा रस्ता **महानदीच्या** कांठाकांठानें होता व "**बारमल**" नांवाची एक खिंड आहे तेथून प्रत्येकास जावें लागे. दोन्ही बाजूंनीं दाट अरण्यें व मोठाले डोंगर व मधून हा रस्ता असे. येथें वाघ वगैरे हिंस्त्र पशूंची समृद्धि आहे. **बारमल** या गांवाजवळ एक लहानशी खिंड लागते व त्या खिंडींतून **महानदी** ही वळसे घेत घेत डोंगरांतून आपला मार्ग काढते. या खिंडीस कटकचें द्वार असें म्हणतात. या गांवच्या आसपासच्या प्रदेशास **दासपल्ला** असें म्हणतात व **तो बारमलच्या** जमीनदाराच्या ताब्यांत आहे. या खिंडीच्या पश्चिमेस दाट

अरण्य असल्यामुळें हा जमीनदार तेथें बराच प्रबळ झाला आहे. तो भोंसल्यांस-सुद्धां जुमानीत नाहीं व खंडणीहि देत नाहीं. कटक व नागपूर येथील भोंसल्यांचें लष्कर व लोक यांना येऊं व जाऊं द्यावें या शर्तीवर भोंसल्यांनीं त्याची खंडणी वगैरे सर्व माफ करून त्यास निशाण वगैरे देऊन नांवापुरता आपला मांडलिक म्हणून ठेवलें आहे.

**सोनपुर संस्थान**—"**सोनपुर** येथील राजा **पीरतसिंग** हा अल्पवयी दहा वर्षांचा आहे. तो आम्हांस येऊन भेटला. त्याचा दिवाण एक उडिया ब्राह्मण असून राज्याचा कारभार तोच करतो. मराठी लष्करापासून होणाऱ्या त्रासाच्या कागाळ्या त्यानें आम्हांस सांगितल्या. रायपुरचा सुभेदार **महिपतराव** याचा पुतण्या **पांडूजी** याच्या हाताखाली या प्रांताचें लष्कर असे. दिवाणानें **फॉर्स्टर** यास विनंति केली की, ही गोष्ट तुम्ही नागपुरास राजाच्या कानावर घाला व आमचा त्रास वाचवा. या प्रांतांतील लोक उडियाच आहेत व ते बरेच शूर आहेत. ते नेहमीं तीरकमटा अगर तरवार बाळगतात. मराठ्यांसंबंधीं त्यांचे मनांत पराकाष्ठेचा तिरस्कार आहे. मैदानावर मराठ्यांच्या पुढें त्यांचें कांही चालत नाही, परंतु दाट अरण्यांत ते मराठ्यांस आटोपत नाहीत व मराठा भेटला कीं कापून काढतात." (३–५–१७९०).

**रायपुर**—"रायपूर हें मोठें शहर आहे. तेथें आम्ही ता. १८–५–१७९० रोजी मक्काम केला. तेथें बरेच श्रीमंत लोक व व्यापारी आहेत. तेथें एक किल्ला आहे. त्याच्या खालील भिंती दगडाच्या व वरच्या मातीच्या आहेत. त्याला पांच दरवाजे व पुष्कळ बरूज आहेत. तेथें एक सुंदर बांधीव तळें आहे, परंतु त्यांतील पाणी वाईट आहे. **रतनपुर** प्रांत फार सुपीक आहे व तेथें तांदूळ फार पिकतो. इकडचें हें **बरद्वान**च होय. **बिंबाजींची** बायको (आनंदीबाई) येथें रहात असते व तिला सर्व जण मोठा मान देतात. परंतु सर्व कारभार नागपुरचा एक ब्राह्मण **महीपतराव** हाच पाहतो. **रायपुर**चें उत्पन्न सत्तर हजार रुपये व **रतनपुर**चें दीड लक्ष रुपये आहे. **बिंबाजीचे** वेळेस पांचसहा लक्ष रुपये उत्पन्न होत असे. हे लोक आमच्याशीं फार चांगल्या तऱ्हेनें वागत. कारण आमची सरबराई चांगली करावी म्हणून

राजानें हुकूम पाठविले होते." **फॉर्स्टर** हा ३-६-१७९० रोजी नागपुरास येऊन पोहोचला. कलकत्त्यापासून नागपुरास येण्यास त्यास एक महिना चौदा दिवस लागले.

**लेकी** यानें रघोजी व त्याचे मुत्सद्दी यांचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे–

"**रघोजी** राजा हा लढाऊ किंवा राज्यकारभार या दोन्ही कामांपैकीं एकांतहि तरबेज नाहीं. त्याची राहणी अगदीं साधी व त्याचे कपडे शुभ्र असतात, परंतु मोतीं व हिरे यांचे डागिने अंगावर असतात. परकीयांशीं त्याची वागणूक संभावितपणाची असते. हत्ती व घोडे यांचें त्यास अतिशय वेड आहे. त्याचेजवळ सरकारी दोनशें हत्ती आहेत व ते इतके उत्तम आहेत कीं, तसे उत्तम हत्ती मीं अद्याप पाहिले नाहींत. त्यांना ऊंस, तूप व पुलावसुद्धां खाऊं घालतात व ते इतके मस्त होतात कीं, सांखळदंड तोडून खूप दांडगाई करतात. यांतहि मराठे लोकांना खूप मजा वाटते."

"राजाजवळचे मुख्य लोक म्हणजे एक त्याचा भाऊ **मन्याबापू**. हा फार शांत गृहस्थ आहे. दुसरा **भवानी काळू**. हा फार धूर्त म्हातारा आहे. त्याचा पुतण्या **पांडुरंग** हा लष्कराचा सेनापति असून लष्करी पैशाची व्यवस्था ठेवतो. (बक्षी) तसेंच **श्रीधरपंत मुनशी** व **महादाजी लष्करी. लष्करी** हा राजाच्या विश्वासांतला आहे व त्याची सल्ला राजा नेहमी घेतो. राजाजवळ कांहीं कवाइती लष्कर आहे व त्यावर अंमलदार हे लखनौच्या नबाबाच्या व आमच्या नोकरींत पूर्वीं असलेले काळे लोकच आहेत. परंतु त्या लष्करास कांहींच येत नाहीं व तें अगदीं टाकाऊ आहे.

ज्या मुख्य कामासंबंधानें **फॉर्स्टर** नागपुरास आला होता त्या संबंधानें तो लिहितो :—" पुण्याहून व हैदराबादेकडून राजासहि टिपूवरील स्वारीबद्दल पत्रें आलीं आहेत; परंतु इतक्या लांबवर सैन्य पाठवून आपला स्वतःचा काय फायदा होणार, म्हणून त्याचे मनांत तिकडे लष्कर पाठवावयाचें नाहीं. तो इंग्रजांस आठ हजार स्वार दर माणशीं चारशें रुपये सालाप्रमाणें देण्यास तयार आहे. परंतु हा पगार मला फार वाटतो. **रघोजी गढामंडल्याच्या** लालचीनें मात्र या युद्धांत पडेल; जर त्याच्या मदतीची जरूरच लागली तर आपण पुणें दरबारशीं मध्यस्थी करून **गढामंडलाप्रांत** त्याचे ताब्यांत देववावा म्हणजे काम होईल."

**मिदनापुरचे** बाजूस मराठ्यांच्या लष्करानें बंगाल्यांतील लोकांवर हल्ले करून लूटमार केली होती. त्यांना शासन देऊन पुनः असें न होण्याबद्दल बंदोबस्त करविण्याचें कामहि **फॉर्स्टर** यास सांगितलें होतें. त्याबद्दल राजाशीं बोलणें करून **फॉर्स्टर** यानें आपला ग्रह कळविला. तो म्हणतो "राजाकडून या गोष्टीचा बंदोबस्त होईल अशी मला आशा वाटत नाहीं. या लोकांना अशा प्रकारच्या धामधुमीची संवयच होऊन गेली आहे. आपणच आपलें लष्कर पाठवून त्या दंगेखोरांना शिक्षा करावी; म्हणजे आपोआपच बंदोबस्त होईल. राजानें मला सांगितलें आहे कीं, याचा बंदोबस्त करण्याकरितां मी **महादाजी हरी** यास ओरीसांत पाठवितों. परंतु महादाजीस पाठविण्याचें खरें कारण असें आहे कीं, तो **राजारामपंताच्या** कारभारावर नजर ठेवण्याकरितां जात आहे. हा पूर्वीं कटकचा सुभेदार होता व त्याचेवर जास्त रक्कम कबूल करून **राजारामपंतानें** सुभेदारी आपलेकडे करून घेतली आहे. जास्त पैसे मिळूनसुद्धां राजाची तृप्ति होत नाहीं व यापेक्षांहि जास्त रक्कम मिळावी म्हणून राजानें **महादाजीस** पाठविलें आहे. यामुळें कटक प्रांतावर आतां दोघांचा दाब राहील व रयत पिळली जाईल. **महादाजी** हा तेथील रयतेचीं कांहीं दुःखें निवारण करील अशांतला मुळींच प्रकार नाहीं. (१-१-१७९१)

**फॉर्स्टर** हा तीनचार दिवस आजारी पडून वरील पत्र लिहिल्यानंतर चारच दिवसांनी ( ता. ५-१-१७९१ ) नागपुरास मरण पावला. त्याला नाग नदीच्या[१] कांठावर म्हणजे नागपुर शहराच्या पूर्व बाजूस पुरलें होतें. नदीच्या प्रवाहानें वरील जमीन वहात चालल्यामुळें हल्ली हे थडगें खणून ता. ६-३-१९१५ रोजीं फॉर्स्टरचीं हाडें नागपुरचे प्रॉटेस्टंट सिमेटरीमध्यें नेऊन पुरून तेथें हल्ली नवीन थडगें केलें आहे.

**फॉर्स्टर** हा असाधारण धाडसी मनुष्य होता असें दिसतें. याने हिंदुस्थानांतून काश्मीर, अफगाणिस्तान, इराण, रशिया या खुष्कीच्या मार्गानें युरोपापर्यंत प्रवास केला होता व असा प्रवास करणारा हा पहिलाच इंग्रज होता. त्यानें आपल्या धाडसाचें वर्णन आपल्या पुस्तकांत[२] लिहून ठेविलें

१ सदरहू जागा नकाशांत दाखविली आहे.

२ Forsters travels.

आहे. तो **बनारस** येथून ता. १२-१२-१७८२ इ. रोजीं निघाला. प्रथम तो आपणास जॉर्जियन म्हणवीत असे. त्याला फारशी व उर्दू उत्तम येत असल्यामुळें व पुढील मुसलमानी देशांतून जावें लागणार असल्याकारणानें तो स्वतःस तुर्की मुसलमान म्हणवूं लागला व अशा तऱ्हेनें वेष पालटीत युरोपांत गेला व तेथून तो इंग्लंडांत जुलै १७८४ मध्यें जाऊन पोहोंचला.

**रेनेलचा हिं० चा नकाशा इ. १७८८**—बंगाल सरकारच्या प्रयत्नानें मेजर **रेनेल** यानें सर्व हिंदुस्थानचा पहिला पद्धतशीर नकाशा काढून तयार केला. या कामाकरितां सर्व हिंदुस्थानभर हिंडून व सर्व हिंदी संस्थानिकांची परवानगी घेऊन त्यास मोठा खटाटोप करावा लागला. परंतु जी गोष्ट हिंदी लोकांना सुसाध्य असतांनासुद्धां त्यांनीं केली नाहीं ती इंग्रजांनीं दीर्घ परिश्रमानें कैक वर्षे शांतपणानें काम करून इ. स. १७८८ मध्यें पूर्ण केली. या नकाशांत नागपुरच्या पूर्वेपासून तों कटकपर्यंत व नर्मदेच्या दक्षिणेस उत्तर सरकारपर्यंतचा भाग "पाहणी न केलेला मुलूख" म्हणून कोरा लिहिला होता. ती पाहणी पूर्ण करून ही उणीव भरून काढण्याकरितां इ. स. १७९४ मध्यें बंगाल सरकारनें रघूजी भोंसल्याची परवानगी मागितली व ती त्यानें दिली.

**ब्लंट याचा हिं० नकाशा**—या कामावर कॅ० **ब्लंट** याची नेमणूक झाली व तो एक जमादार व तीस शिपाई घेऊन **चुनारगडाहून** २८-१-१७९५ रोजी निघाला. त्याचा मार्ग छत्तीसगडांतील **कोरिया** संस्थान, **कांकेर**पासून तों चांद्याचे पूर्वेस **वैरागड**, सिरोंचा या बाजूनें होता. **ब्लंट** यानें मोठ्या कष्टानें या जंगली प्रदेशाची पाहणी केली व तो. २४-५-१७९५ रोजी आपलें काम संपवून **राजमहेंद्रीस** पोहोंचला. त्याला एकंदर ११२५ मैल प्रवास करावा लागला.

इंग्रज लोकांच्या चौकस स्वभावानुरूप **ब्लंट** हा नुसती भौगोलिक पाहणी करूनच थांबला नाहीं. त्यानें या भागाचा राज्यकारभार, व्यापार व एकंदर सर्व परिस्थितीचें निरीक्षण करून तें सर्व वर्णन लिहून ठेवलें आहे. त्यावरून आपणांसहि तत्कालीन परिस्थितीचें चित्र पहावयास सांपडतें.

**कोरिया, बिलासपुर** या भागांत जवळजवळ अंदाधुंदीचें राज्य होतें व जमीनदार मराठयांची सत्ता जुमानीत नव्हते. **प्रतापगड** व **लोरमी** येथें गोंडाचेंच प्राबल्य होतें व ते नेहमीं लूटमार करीत. त्यांच्या धाकानें **अमरकंटकच्या** यात्रेस कैक वर्षे कोणी गेलें नाहीं. बस्तर संस्थानांतहि राजा जवळजवळ स्वतंत्रपणेंच वागत होता. **रतनपुर** येथें **विठ्ठलपंत**[१] सुभेदार होता. त्यानें बस्तरच्या राजास वठणीस आणून त्याच्यापासून खंडणी घेणें सुरू केलें. **दर्यावदेव** ( बस्तरचा राजा ) यानें आपल्या दोन भावांचे डोळे काढून त्यांस कैदेंत टाकलें व तिसरा पळून नागपुरास गेला. दर्यावदेव आपली राजधानी **जगदलपुर** हें सोडून जवळच **केशलूरच्या** किल्ल्यांत राहण्यास गेला व मराठयांस खंडणी देईना. मराठयांनीं सर्व मुलूख लुटला व दुसऱ्या जमीनदारांस उठवून **बस्तरचा** मुलूख घेण्यास चिथावलें. **कांकरचा** राजा **शामसिंग** हा मात्र बराच उपयोगी पडला. त्याचे मुलखांतून **ब्लन्ट** हा निघून बस्तरचे संस्थानांतून न जातां पश्चिमेस वळून **वैरागडच्या** रस्त्यानें गेला; कारण **बस्तरमधून** आपणास **दर्यावदेव** सुखानें जाऊं देईल असें त्यास वाटेना. हल्लीं द्रुग जिल्हयांत असलेले **पानाबारस** व **मालेवाडा** येथील गोंड राजांनीं विशेष त्रास दिला नाहीं. परंतु **मालेवाडयाचा** गोंड राजा **दुरूगशहा** यानें मराठयांच्या परवान्यास कांहीं आदर न दाखवितां उलट त्याचा अपमान केला. या दोन्ही संस्थानिकांनीं **ब्लन्ट** यास कांहीं मदत न करितां वाट मात्र दाखविली.

पुन्हां **ब्लंट** यानें छत्तीसगडांतून बस्तर संस्थानांतून **भोपाळपट्टणच्या** मार्गानें थेट दक्षिणेस जाण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यास प्रत्यक्षच अडथळा झाला व स्थानिक लोक पुढें जाऊं देईनात. सबब तो परत पश्चिमेकडे **वैरागड,** चांदा या रोखानें फिरला. **बस्तर** व **भोपाळपट्टण** व त्याच्या दक्षिणेकडील प्रदेशाची माहिती **ब्लंट** यास मिळाली ती अशी:—"तिकडचे लोक अगदींच रानटी आहेत. ते गोंड आहेत व स्त्री-पुरुष पूर्ण नागवे राहतात व कंदमुळांवर बारा महिने उपजीविका करतात. खुद्द वैरागडचे सुभ्यांतील छत्तीसगडकडील भागांत तीन महिने लोकांस खाण्यास धान्य मिळतें व बाकीचे नऊ महिने कंदफळांवर उपजीविका करावी लागते. **बस्तरकडे**

१ हा प्रसिद्ध विठ्ठल बल्लाळ सुभेदार नव्हे. हा विट्ठल दिनकर.

तर वंजारी लोकांशिवाय कोणीच जात नाही. त्यांच्या साखरेच्या व मिठाच्या व्यापारानें रानटी गोंडांना या वस्तूंची चटक लागली व ते श्रम करून लाख, लोखंड व इतर जंगली उत्पन्न वाढवीत आहेत व बाहेरच्या लोकांची जरूर त्यांना भासूं लागली आहे. मराठे लोक तरी या वंजाऱ्यांच्या मध्यस्थीनेंच त्यांना आतां माणसाळवूं लागले आहेत.

"छत्तीसगडांत **रायपुर व रतनपुर** या भागांत मात्र चांगला बंदोबस्त दिसला. तिकडे राज्यव्यवस्थाहि ठीक होती. सर्व तऱ्हेची धान्यें व विशेषतः तांदूळ पिकत व त्याचा नागपुराशीं मोठा व्यापार चाले. **विठ्ठलपंतास** हा सुभा मुक्त्यानें दिला होता. सुभेदार लहान लहान गट करून तशाच शर्तीवर ते गट निरनिराळ्या लोकांस पोटमक्त्यानें देत असे. शेतकऱ्यांकडून वसूल येणें तो धान्यरूपानें येत असे. त्यामुळें तें विकून त्याची रक्कम तयार करणें फार त्रासाचें पडे. रस्ते सुरक्षित नसल्यामुळें धान्य नागपुरास पाठविणेंहि धोक्याचें असे. व्यापारावर जबर कर असल्यामुळें व्यापारीहि या प्रांतांत येण्यास फारसे धजत नसत. इतर व्यापारहि थोडा चाले. वंजाऱ्यांनासुद्धां धान्याच्या व्यापारांत रस्त्याचा फार त्रास पडे. परंतु इतकेंहि सोसून छत्तीसगडांतून नागपुरास एक लाख बैल धान्याची वाहतूक करीत. सर्वांत जास्त त्रास म्हणजे छत्तीसगडांतील मांडलिक संस्थानिकांकडून खंडणी वसूल करण्याचा. ते जबरदस्तीशिवाय खंडणी कधीच देत नसत. त्यामुळें सुभेदार ऊर्फ मक्तेदार हा स्वतः शूर असावा लागे व त्याचेजवळ सैन्याचीहि तरतूद नेहमीं असावी लागे.

"वैरागड हें चांद्याच्या जवळपास असून तेथील परिस्थितीहि चांद्यासारखीच आहे. ही आतां निराळी सुभेदारी केली आहे. **बिसन पंडित** म्हणून हल्लीचा सुभेदार आहे व छत्तीसगडाप्रमाणेंच त्यालाहि सुभ्याचा ठरीव मक्ता राजास द्यावा लागतो. **वैरागड** हें मोठें शहर आहे व तेथें व्यापारहि मोठा चालतो. तेथें छत्तीसगडांतून व उत्तर सरकार प्रांतांतून येणारे लमाणांचे मोठमोठे तांडे येतांना दिसतात. वऱ्हाड—नागपुरकडून इकडे पुष्कळ कापूस येतो. तो उत्तर सरकारांतील व्यापारी खरेदी करतात व त्याचेऐवजीं ते तिकडील सुपारी, नारळ व मीठ हे समुद्रकिनाऱ्याचे

पदार्थ तेथें आणून विकतात. या कापसाचें तिकडील उत्तर सरकारांतील लोक फार सुंदर कापड विणतात.

"वैरागड येथें नागपुराहून **मच्छलीपट्टणास** जाणारा मोठा आमरस्ता लागतो त्यास आम्ही मिळालों. **वैरागड** येथून निघाल्यावर आम्हांस कांहीं त्रास झाला नाहीं व आम्ही कांहीं दिवसांनीं **राजमहेंद्रीस** (ता. २४-५-१७९५) रोजी पोहोंचलों."

**खडर्याची लढाई: ता. ११ मार्च १७९५**—रघूजीच्या कारकीर्दीचें सर्व धोरण आपण कोणत्याहि लढाईंत न पडतां आपल्या स्वार्थावर टपून असावें असें होतें. टिपूवर लढाईस जाण्याचें त्यानें युक्तीनें टाळलें. इंग्रजांशीं वर वर गोडी ठेवून स्वतःस मात्र बांधून घेतलें नाहीं. पुणें दरबाराशींहि गोडी ठेवली व शेवटीं निजामअल्लीशींहि त्यानें दोस्तीचा तह केला. महादजी शिंदा इ. स. १७९४ मध्यें मरण पावल्यामुळें मराठ्यांच्या राजकारणांत नाना फडणीसाशिवाय प्रबळ कोणी राहिला नव्हता, म्हणून नानास खूष ठेवण्याची संधि रघूजी वाया जाऊं देत नसे. अशा स्थितीत पेशवे व निजामअल्ली यांची आकस्मिक रीतीनें लढाई सुरू झाली. मराठ्यांच्या चौथाई सरदेशमुखीची बाकी निजाम देईना. टिपूविरुद्ध लढाई चालू असल्यामुळें व त्यांत निजाम व पेशवे यांची एकजूट असल्यामुळें पेशव्यांस ही गोष्ट भांडणावर नेतां येईना. परंतु ही लढाई आटोपतांच पेशव्याचा हैदराबादचा वकील **गोविंदराव काळे** यानें वरील बाकीची मागणी केली. एकमेकांकडून याद्या जात जात शेवटीं निजामाचा वजीर **मशीरउल्मुल्क** याच्या उर्मट भाषणानें गोष्ट निकरास आली.

रघूजी भोंसल्यास नानाचें बोलावणें येतांच तो अनमान न करतां आपलें लष्कर घेऊन निघाला व **अहमदनगराजवळ** पेशव्याचे सैन्यास मिळाला. त्याचेबरोबर पंधरा हजार स्वार व पायदळ होतें व त्याच्या सैन्यावर **विठ्ठल बल्लाळ सुभेदार** हा कसलेला सेनापति हजर होता. सर्व मराठी सैन्याचें अधिपत्य परशुरामभाऊ पटवर्धन याजकडे असल्यामुळें त्याचें सैन्य मध्यभागीं होतें. रघूजी भोंसल्याचें सैन्य भाऊच्या उजवीकडेस व दौलतराव शिंद्याचीं पलटणें डावीकडेस होतीं. या लढाईंत नागपूरच्या सैन्यानें चांगली कामगिरी केली. खडर्याचे लढाईचे पोवाड्यांत भोंसल्यांच्या

सैन्याचें व विशेषत: विठ्ठलपंताचे कामगिरीचें वर्णन केलें आहे.

विठ्ठलपंत या वेळीं वऱ्हाड प्रांतांतच सुभेदारीवर होता.

खर्ड्यांचे लढाईनंतर **रघूजी** व **विठ्ठलपंत** पुण्यास गेले. त्यांचा नानानें मोठा सत्कार करून ठेवून घेतलें. निजामाकडून घेतलेल्या **मुलखाची** विल्हेवाट नानानें नंतर लावली. त्यांत भोंसल्यांस निजामाकडून खर्ड्याच्या तहांतच गंगथडीच्या प्रांताच्या घासदाण्याबद्दल साडे तीन लक्षांचा मुलूख मिळाला होता. शिवाय भोंसल्यांची निजामाकडे असलेली बाकी एकूणतीस लक्ष रुपये निजामानें देण्याची कबूल केली व वऱ्हाडचें उत्पन्न पूर्वींच्या वहिवाटीप्रमाणें दोघांनींहि घ्यावें असें ठरलें. याशिवाय पेशव्या-कडून रघूजीस नर्मदेचे दक्षिणेकडील मुलखाच्या नवीन सनदा मिळाल्या. ह्या प्रदेशाच्या सनदा पूर्वी नानासाहेबानें पहिले रघूजीस दिल्या होत्या; परंतु त्यावेळीं त्यापैकीं बराचसा भाग मराठ्यांच्या ताब्यांतच आला नव्हता. हल्लीं तो ताब्यांत आला होता. त्यांतच हुशंगाबाद, चौरागड, बचाई वगैरे ठिकाणें रघूजीच्या प्रथम ताब्यांत आलीं. रघूजी १७--१०--१७९५ रोजी पुण्याहून निघून कोरेगांव, वाशीम या मार्गानें नागपुरास आला. जातांना त्यानें मुंबईहून इंग्रजी तऱ्हेच्या कांहीं बंदुका खरेदी केल्या होत्या.

या लढाईंत रघूजीचा बराच फायदा झाल्यामुळें तो नानास चिकटून राहिला. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतरहि त्यानें नानाच्या पक्षास फार मदत केली. यामुळें नानानें रघूजीशीं नवीन करार करून पंधरा लक्ष रुपये नगदी देवविले व **गढामंडला** प्रांताचा ताबा दिला. तसेंच भोंसल्यानें पेशव्यास लागतील तेव्हां तीन हजार स्वार द्यावे हा पूर्वीचा करार होता तो बदलून निकडीच्या कामाच्या वेळेसच ते द्यावे असा नवीन करार झाला व त्याप्रमाणें नंतर बाजीरावाची त्यास मंजुरात होऊन अंमलबारीहि झाली. (१३–७–१७९७)

रघूजी परत नागपुरास आल्यावर पुढील दोन वर्षांत नर्मदेकडील प्रांत व **गढामण्डला, तेजगड, चौरागड** हे सर्व प्रांत रघूजीच्या अधिकाऱ्यांच्या ताब्यांत आले. सागरच्या राजावर **अमीरखानानें**

चढाई केली होती त्यावेळीं रघूजीनें सागरकरांस मदत केली. सबब त्यानेंहि हा मुलूख लौकर भोंसल्यांचे ताब्यांत दिला. तसेंच **धामोनीचा** किल्ला एका लोधी रजपुताकडून रघूजीस मिळाला. **हुशंगाबादचा** ताबा भोपाळच्या नबाबापासून पूर्वींच मिळाला होता. याप्रमाणें इ. स. १८०० चे सुमारास रघूजीच्या राज्यांत महत्त्वाची भर पडली.

इ. स. १८०० म्हणजे **खड्यांचे** लढाईनंतरचा काळ हा भोंसल्यांच्या पराकाष्टेच्या उत्कर्षाचा समजला पाहिजे. या वेळेस भोंसल्यांची सत्ता उत्तरेस नर्मदेपासून तों दक्षिणेस गोदावरी व पश्चिमेस वऱ्हाडपासून तों पूर्वेस समुद्रकिनाऱ्यापर्यंत अविछिन्न कायम झाली. मराठी साम्राज्यांत अगर हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणाहि संस्थानिकाच्या ताब्यांत या वेळेस एवढ्या मोठ्या विस्ताराचा प्रदेश नव्हता. **रघूजी** भोंसल्याच्या आंगीं पहिल्या रघूजी अगर महादजी शिंद्याप्रमाणें धडाडी, पराक्रम, बुद्धिबल व संघटनाचातुर्य हे गुण असते तर तो सर्व हिंदुस्थानांत अत्यंत प्रबळ असा संस्थानिक झाला असता व सर्व हिंदुस्थानच्या राजकारणांत त्याचा शब्द निर्णायक झाला असता. परंतु दुर्दैवानें यांपैकीं एकहि गुण रघूजीमध्यें नव्हता. तो जरी टाकाऊ मनुष्य नसला तरी अगदीच दुय्यम प्रतीचा लोकनायक होता. त्यामुळें सुदैवानें त्याच्या हातीं आलेल्या एवढ्या सत्तेचा त्यास कांहींच उपयोग करून घेतां आला नाहीं.

रघूजीच्या यावेळच्या राज्याचे भाग व उत्पन्न पुढें लिहिल्याप्रमाणें होतें.--

| भाग | उत्पन्न |
|---|---|
| १ देवगडप्रांत—नागपुरासुद्धां— | ३० लक्ष |
| २ गढामंडला | १४ |
| ३ हुशंगाबाद, शिवणीमाळवा. चौरागड व० | ७ |
| ४ मुलताई | २ |
| ५ वऱ्हाडचें निमें उत्पन्न व गाविलगड, नरनाळा वगैरे | ३० |
| ६ ओरिसा व मांडलिक | १७ |
| ७ चंद्रपूर | ५ |
| ८ छत्तीसगड व मांडलिक संस्थानें ( बस्तर, सिरगुजा, संबळपूर, कांकर, कालाहंडी वगैरे) | ६ |
| | १११ लक्ष |

१ **देवगड**--यांत छिंदवाडा, बालाघाट वगैरे घांटावरील मुलूख व नागपूर, भंडारा वगैरे घाटाखालचा मुलूख येत असे. हा प्रदेश मूळ **देवगडच्या बखतबुलन्द** या गोंड राजाचा होता व पहिल्या रघूजीनें तो मिळविला होता. त्या गोन्ड राजांचे वंशज हल्लीं किल्लेवाले राजे म्हणून नागपुरास रहात आहेत. या सुभ्यांत **शिवणीचा** पठाण जहागीरदार व **खैरागड**, **राजनांदगांव**, छुईखदान वगैरे मांडलिक येत. या सर्वांवर **लांजी** येथें मराठ्यांचा एक अमीन म्हणून अधिकारी असे.

२ **गढामण्डला**--येथेंहि पूर्वीं गोंडांचें राज्य होतें. तें अखेरीस सागरच्या मराठ्यांच्या ताब्यांत आलें व पेशव्यांतर्फे **सागर** येथें **गोविंदपन्त** बुंदेल्याचे वंशज सागर, काल्पी, बुन्देलखंड व हा प्रदेश बाळगून होते. भोसल्यांचा व पेशव्यांचा या प्रदेशाबद्दल बरेच दिवस झगडा चालू होता; परंतु खड्यांच्या लढाईनंतर भोंसल्यांस या प्रदेशाचा ताबा मिळाला. **मण्डला** येथें भोंसल्यांनीं एक सुभेदार व कांहीं लष्कर ठेवलें व तेथें जरीपटक्याचें निशाण वगैरे सर्व राजचिन्हें ठेवली.

३ **हुशन्गाबाद**, शिवणी, माळवा व चौरागड- हुशंगाबाद हें ठाणें नर्मदेच्या उतारास महत्त्वाचें असल्यामुळें भोपाळच्या नबाबाच्या मूळपुरुषानें तें देवगडच्या गोंडापासून त्यास लष्करी मदत देण्याचें कबूल करून मिळविलें व तेथें त्यानें हल्लीचा किल्ला बांधला. इ. सन १७९६ मध्यें तो दुसऱ्या रघूजीच्या लष्करानें नबाबापासून लढून घेतला व इसवी सन १७९९ मध्यें नर्मदा नदी ही भोंसल्यांची व नबाबाची सरहद्द ठरली. भोपाळचे नबाब व भोंसले यांनीं पुढें वेळोवेळीं हा किल्ला आपले ताब्यांत घेतला. पण शेवटीं तो भोंसल्यांच्याच ताब्यांत राहिला. **गॉडर्ड** हा येथेंच नर्मदा उतरून तळ देऊन राहिला व रघूजीनंतर भोंसल्यातर्फे हें ठाणें कायमचेंच इंग्रजांच्या ताब्यांत राहिलें व तेथें इंग्रजी लष्कराची छावणी कायमचीच झाली.

चौरागड हा किल्ला व त्याभोंवतालचा प्रदेश **खड्यांच्या** लढाईनंतर पेशव्यांकडून रघूजी भोंसल्यास मिळाला व नर्मदेच्या दक्षिणेकडील सर्व भाग आतां सलग झाला.

४ **मुलताई, बैतुल, बदनूर** वगैरे हा भाग मूळ देवगडचे राज्यापैकीं होता. मुलताई येथें भोसल्यांचा एक सुभेदार असे. यांत **सावळीगड**, भवरगड, खेरडा वगैरे डोंगरी किल्ल्यांचा समावेश होतो.

५ **गाविलगड**, नरनाळा वगैरे–हे किल्ले पहिल्या **रघूजीनें** इ.स. १७५१ मध्यें जिकून घेतले होते व ते तेव्हांपासून भोंसल्यांच्या ताब्यांत होते. वऱ्हाडच्या इतर भागांप्रमाणें, हे किल्ले व त्याखालचा प्रदेश यांत साठ-चाळीशी नसून सर्व उत्पन्न भोंसल्यांस मिळत असे. **आकोट** वगैरे भाग नरनाळ्याखालीं असून नरनाळ्याचा किल्लेदार बहुधा आकोटास[१] राहत असे. इ. स. १७७५ मध्यें निजामानें मुधोजीकडून हे दोन्ही किल्ले घेतले. परंतु नंतर निजाम एलिचपुरास आला तेव्हां मुधोजी स्वतः एलिचपुरास गेला व ते किल्ले त्यानें सलोख्यानें त्याजपासून परत घेतले. **गाविलगड** येथें अडचणीच्या वेळीं भोंसल्यांचा खजिना ठेवीत असत. इ. स. १८०३ मधील **देवगांवच्या** तहानें बाकीचा वऱ्हाड निजामकडे आला; परंतु हे किल्ले भोंसल्यांकडेच राहिले होते. ते नंतर ता. ६--१--१८ च्या आप्पा-साहेबाचे तहानें इंग्रजाकडे आले. ते इ. स. १८२२ मध्यें इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घेतले व निजामास दिले. हल्लीं ते वऱ्हाड प्रांतांत आहेत.

६ **ओरिसा** व मांडलीक संस्थानें:—हा प्रांत हल्लींचे **बालसोर** ( बालेश्वर ), **कटक** व **जगन्नाथपुरी** हे तीन जिल्हे मिळून झालेला आहे. यांत **बालसोर** व **पुरी** हीं बंदरें महत्त्वाचीं आहेत. जगन्नाथाचें प्रख्यात देवस्थानहि यांतच असल्यामुळें या प्रांतास विशेष महत्त्व होतें. बंगाल व हा प्रांत यांच्यामध्यें **सुवर्णरेखा** नदीची हद्द आहे. पश्चिमेस **चिलका** नांवाचें सरोवर समुद्रकिनाऱ्यास लागूनच आहे व त्या पलीकडे उत्तर सरकार प्रांताचा **शिकाकोल** हा जिल्हा लागतो. ओरिसाच्या उत्तरेस व पश्चिमेस **मयुरभंज, कुंझर, ढाक्कानल, अनगल, दासपल्ला, बस्तर** वगैरे जंगलीं संस्थानें होतीं. व तीं भोंसल्यांचीं मांडलिक होतीं

---

१ नरनाळ्याचा भोंसल्यांचा किल्लेदार दिवाकरपंत याचे घराची जागा आकोटास दाखविण्यांत येते. तो देवनाथ महाराजांचा समकालीन होता. ( देवनाथांचें चरित्र पहा ).

**अनगल** व **दासपल्ला** या जमीनदारीच्या दरम्यान ओरीसांतून पश्चिमेकडे येणारी प्रसिद्ध "**बारमल**" नांवाची खिंड होती व तिच्यांतून **महानदी** ही मोठी नदी रतनपुर, संबळपुर या छत्तीसगडाचे भागांतून ओरिसांत शिरून पुढें **कटक** शहरावरून जाऊन समुद्रास मिळते. महानदीच्या कांठाकांठानें कटकवरून **रायपुर, रतनपुरास** येऊन तेथून पश्चिमेस नागपुरास येण्याचा रस्ता असे.

**कटक**प्रांत १८०३ पर्यंत भोंसल्यांच्या ताब्यांत होता. १८०३ च्या देवगावच्या तहानें भोंसल्यानें वऱ्हाड व कटकप्रांत निजामास दिला. त्यानंतर तो इंग्रजांच्या ताब्यांत गेला. या लढाईचे वेळेसच बंगालच्या इंग्रजी सैन्यानें **कटक** प्रांतावर हल्ला करून तो तहापूर्वीच आपल्या ताब्यांत घेतला होता.

७ **चंद्रपूर**—हा सुभा पूर्वीच्या गोंडराजांचा प्रांत होता. पहिल्या रघूजीनें तो जिंकून घेतला. तेथील पूर्वीचे गोंड राजे नागपुरच्या गोंड राजांप्रमाणेंच **चांदा** येथें अद्याप पेन्शन घेऊन आहेत. या सुभ्यांत हल्लींचा **चांदा** जिल्हा, **औंढी, पानाबारस, आंबागड** चौकी ह्या जमीनदाऱ्या व हल्लीं निजामाकडे असलेला **माणिकदुर्गचा** किल्ला व परगणा येत असे. माणिकदुर्ग हा निजामानें भोंसल्यांपासून बळकावला होता; परंतु एलिचपुरास मुधोजीनें निजामाशीं जो तह केला त्यांत **चन्द्रपूर, गाविलगड** व **नरनाळा** हे परत घेतले व **माणिकदुर्ग** निजामास सोडून दिला. तेव्हांपासून तो निजामाचे ताब्यांत आहे. **माणिकदुर्ग** हें ठिकाण **माहूर** या प्रसिद्ध देवस्थानाच्या दक्षिणेस आहे.

**चंद्रपूरचा** सुभा पहिल्या रघूजीनें आपल्या चार पुत्रांत ज्या वांटण्या करून दिल्या त्यांत मुधोजीचे वाटणीस दिला होता व तेथें सुभेदार नेमून त्याच्या मार्फतीनें कारभार करीत असे. मुधोजीच्यानंतर तो व्यंकोजीस मिळाला. नागपुरच्या खालोखाल महत्त्वाचें असें हें भोंसल्यांचें ठाणें होतें व तेथें उद्योगधंदे, व्यापार वगैरे मोठा चालत असे. दक्षिणेंतून समुद्राकडून येणारा नारळ, सुपारी, मीठ वगैरे माल इकडे आणून वऱ्हाडचा कापूस तिकडे पाठविण्यांत या मध्यवर्ती ठिकाणाचा मोठा उपयोग होत असे. खुद्द **चांदा** येथें विणकरी लोकांची मोठी वस्ती असून तेथें उत्पन्न होणारें

कापड सर्व हिंदुस्थानांत व परदेशींहि जात असे. **चांद्याचे** सुभ्यांत पूर्वेकडील **वैरागड** हें ठाणेंहि येत असे व चंद्रपूरचे खालोखाल तेंहि व्यापारी महत्त्वाचें ठाणें होतें.

८ **छत्तिसगड सुभा**—यांत रतनपुरचें प्राचीन **हैहयवंशी** राज्य व इतर लहानमोठा अनेक संस्थानें यांचा समावेश होत असे. यांपैकीं कांहीं संस्थानें व जमीनदाऱ्या अद्याप कायम आहेत. यांत छत्तीस लहान मोठे किल्ले व गढ्या यांचा समावेश होत असे. **रायपुर व रतनपुर** ही दोन मोठी शहरें व त्याभोंवती असलेला मोकळा प्रदेश हाच काय तो महत्त्वाचा व उत्पन्नाचा भाग होता. बाकीचा संस्थानी मुलूख अगदीच जंगली व नापिकीचा होता व त्यांतून कांहीं उत्पन्न होत नसे. संस्थानिक भोंसल्यांची सत्ता नांवापुरतीच मानीत. जबरदस्त सुभेदार असला म्हणजे तो त्यांची खडणी वसूल करी. तसा नसला म्हणजे हे खडणी मुळीच देत नसत. कांही भागांतले लोक तर अगदींच जंगली व मानवी सुधारणेचें वारेंहि न लागलेले असे असत व वन्य पशूंप्रमाणें त्यांची राहणी असे.

मोठालीं संस्थानें **सिरगुजा, संबळपुर, बस्तर, कांकर, कालाहंडी, जसपुर, गंगपुर,** हीं असत. त्यांपैकीं बहुतेक आज शिल्लक आहेत. बाकीच्या जमीनदाऱ्या **पेंड्रा, केंडा, लाफा, मातीन, अपरोरा, छरी, कोरबा** याप्रमाणें सात असून त्यांना "सातगड" असें म्हणतात. बाकीच्या **सोनाखान, भटगांव, बिलाईगड, कटगी, कोरिया, बिरकोनी, सुवारमार** व **नारा** यांना **खोंडवण** जमीनदाऱ्या असें म्हणतात.

हा सुभा **बिंबाजीचे** वाटणीस गेला होता व बिबाजी स्वतः रतनपुर येथें रहात असे. नागपुराप्रमाणेंच येथेंहि तो स्वतंत्र दरबार व कारखाने चालवीत असे, बिबाजी मेल्यावर त्याची बायको आनंदीबाई येथें राहून सुभेदारामार्फत कारभार चालवी. नंतर हा सुभा **चिमणाबापूकडे** गेला व तो मेल्यानंतर त्यास पुत्र नसल्यामुळें **व्यंकोजीकडेच** हा सुभा व चंद्रपूरचा सुभा आला. **चिमणाबापू** व **व्यंकोजी** यांपैकीं कोणीच रतनपुरास राहिला नाहीं.

**सिरगुजा**—हें डोंगरी संस्थान इ. स. १७६० चे सुमारास

भोंसल्यांचे लष्करानें घेतलें.त्यांत **सिरगुजा, जसपुर व उदेपुर** या हल्लींच्या तीन संस्थानांचा समावेश होत होता. भोंसल्यांना या संस्थानांतून तीन हजार रुपये खंडणी मिळत असे व उत्तरेकडून **काशी, गया, मिरझापुर** व बंगाल वगैरे प्रांतांतून नागपुरास येण्याचा रस्ता तेथून असल्यामुळे भोंसल्यांतर्फे तो सांभाळून त्याची आवकजावक होण्यास मदत करण्याची जबाबदारी **सिरगुजाच्या** मांडलिकावर असे.

**कोरिया**--हेंहि लहानमें संस्थान छत्तीसगड सुभ्यांत मोडत असे.

**संबळपूर**--येथील संस्थानिक बरेच दिवस स्वतंत्रपणें रहात असत. भोंसले त्यांना आपले मांडलिक म्हणत; परंतु ते त्यांचा अधिकार क्वचित् मानीत. संबळपूरच्या आसपास लहानमोठीं दहापंधरा संस्थानें असून तीं मराठ्यांविरुद्ध एकजुटीनें रहात. मराठ्यांचा नागपुराहून कटक-बंगाल्यांत जाण्याचा रस्ता येथून असल्यामुळें भास्करपंतापासून तो प्रत्येक मराठा अमलदारास त्यांच्याशीं लढून पुढें जावें लागे. इ. स. १८०० च्या एप्रिल महिन्यांत **सम्बळपूर** भोंसल्यांच्या पूर्ण ताब्यांत आलें. **कोलब्रुक** या सुमारास नागपुरासच होता. **सम्बळपूर** ताब्यांत आल्याबद्दल नागपुरास खुषीच्या तोफा उडवून मोठा आनंद प्रदर्शित करण्यांत आला.*

संबळपुरचे जवळ पुढील लहान संस्थानें होतीं:--

---

* संबळपूर मराठ्यांनीं घेतलें त्याबद्दलची एक मनोरंजक हकीकत कोलब्रुकनें दिली आहे ती अशी:--**चंदाजी** भोंसले नांवाचा मराठा सरदार **संबळपूरच्या** जवळपास लष्करासह होता. तो संबळपुरच्या किल्ल्याच्या आसपासच्या वेळूच्या रानांत शिकार करीत भटकत असतां किल्ल्यास एका जागीं खिंडार पडलें होतें त्याचे जवळ आला व त्यांतून त्यानें आंतील गवती घराच्या छपरास सहज एक गोळी मारली. तिच्या योगानें त्या छपरानें पेट घेतला व इतर घरेंहि पेटून आगीचा डोंबाळा झाला. ही संधि हल्ला करण्यास चांगली आहे असें **चंदाजीस** वाटून त्यानें आपल्या जवळचीं माणसें छावणींत पाठवून एकदम आपलें लष्कर आणविलें व त्याच खिंडारांतून हल्ला करून किल्ल्यांत प्रवेश करून किल्ला व शहर काबीज केलें.

सोनपुर, सारणगड, रायगड, बारगड, साकती, रेहराखोल, वामरा, बोनाई, गांगपुर, पाटणा, बिंद्रानवागड, खरियार, फुलझर व बोरासांबर.

याशिवाय **बस्तर** हें मोठें संस्थान व **कांकर** व **कालाहंडी** हीं लहान संस्थानें याच सुभ्यांत मोडत असत. हल्लीं हीं सर्व संस्थानें मध्यप्रांतांतून काढून त्यांची एक स्वतंत्र एजन्सी करण्यांत आली आहे.

१८०३ च्या देवगांवच्या तहानें वरील संस्थानें व ओरिसाच्या उत्तरेकडील संस्थानें यांजवरील भोंसल्यांचा संबंध सुटत चालला. कारण बंगाल्याकडून इंग्रजांनी या संस्थानांशीं स्वतंत्र करारमदार व तहनामे करण्यास सुरवात केली होती व देवगांवच्या तहानें त्या संस्थानिकांशीं इंग्रजांनीं केलेले करारमदार भोंसल्यानें मान्य करून वरील मांडलिकांवरील आपला सार्वभौमत्वाचा हक्क सोडण्याचें कबूल केलें होतें व त्याबद्दल भोंसल्यांची नुकसानी इंग्रजांनी भरून द्यावी असेंहि ठरलें होतें. त्याचीहि भानगड पुढें बरेच दिवस चालू होती. तो प्रकार पुढील भागांत दिसेल.

---

# भोंसल्यांच्या तीर्थयात्रा.

इ. स. १७९० चे सिंहस्थांत **रघूजीनें** मातोश्री **चिमाबाईसह** गंगेची (गोदावरीची) यात्रा केली होती. त्यावेळीं ही मंडळी **चिमणाबापूचे** मृत्यूमुळें दुःखांतच होती. यावेळीं **रघूजीनें चिन्नूर**जवळ **त्र्यंकोबाशास्त्री** याचेमार्फत सोमयाग करविला. त्याचें वर्णन उपलब्ध आहे.[१]

इ. स. १८०१--०२ ( १२११ फसली ) मध्यें सिंहस्थाचे पर्वणीनिमित्त **रघूजी** हा पुन्हां गोदावरीचे स्नानास सर्व कुटुंबासुद्धां गेला. बरोबर त्याची आई **चिमाबाई,** भाऊ **त्र्यंकोजी** व मुलगा **परसोजी** हे सहकुटुंब होते. वृद्ध **भवानी काळू** व **गंगाधरराव चिटणवीस** हेहि होते. ही सर्व मंडळी **चिन्नुराहून धर्मपुरी**[२] येथें गेली व परत माघमासीं नागपुरास आली.

---

१ सरदेसाई उत्तर वि. २ पान ५२७–२८.

२ हें ठिकाण माहूरचे दक्षिणेस निजामाचे राज्यांत गोदावरीचे काठीं आहे.

इ. स. १८०७–८चे सुमारास **चिमाबाई** व **व्यंकोजी** यांनीं नर्मदेच्या उगमाजवळ अमरकंटकची यात्रा केली. अमरकंटकची यात्रा करून **चिमाबाईस व्यंकोजीनें** परत नागपुरास पाठविलें व आपण छत्तीसगडांत बंदोबस्ताकरितां गेला.

इ. स. १८१०–११ मध्यें व्यंकोजी आपल्या कुटुंबासह काशीयात्रेस गेला व तिकडेच गयावर्जन करुन परत काशीस आला असतां प्रकृति बिघडून तेथेंच त्याचा अंत झाला ( ऑगस्ट १८११ इ. श्रावण ). रघूजीनें व्यंकोजीचे मानगीचें वर्तमान समजतांच त्यास आणण्याकरितां आपला भाचा **गुजाबादादा गुजर** यास पाठविलें होतें. तो रामटेकच्या मार्गानें काशीकडे जात असतां काशीस व्यंकोजीचा काळ झाला. व्यंकोजीबरोबर त्याची बायको मैनाबाई व मुलगा मुधोजी ऊर्फ आप्पासाहेब हे होते; रघूजीनें माणसें पाठवून त्या सर्वांस नागपुरास आणविलें.[१] चिमाबाईचा मृत्यु नागपुरास इ.स. १८१० मध्यें झाला.[२]

इ. स. १८०१ चे सुमारास वऱ्हाडांत **गाजीखान** नांवाच्या मनुष्यानें सैन्य जमवून लुटालूट चालविली. त्यामुळें रघूजीनें **भवानी काळू** याचा मुलगा **यशवंतराव भवानीशंकर** याजबरोबर ५००० फौज देऊन त्यास वऱ्हाडांत पाठविलें. त्याचेबरोबर **मालजी अहीरराव** व नबाब **सिद्दिकअल्लीखान**[३] हे सरदार होते. त्यांनीं **गाजीखानाशीं** लढाई दिली. **गाजीखान** हा **जामोदचा** किल्ला बळकावून बसला होता. त्यावर तोफा लावून तो सर करण्यांत आला. गाजीखान पळून गेला व जामोदच्या किल्ल्यांत भोंसल्यांचें ठाणें बसलें.

---

१ बखर पान १८१ मध्यें व्यंकोजीबरोबर मातोश्री चिमाबाई होती असें लिहिलें आहे; परंतु चिमाबाई ही अगोदरच मरण पावल्यामुळें वरील विधान चुकीचें दिसतें.

२ बखर पान १७७.

३ हा सरदार पूर्वीं टिपूकडे नोकर होता. तो रघूजीकडेस टिपूकडून राजकारणाकरितां आला असतां रघूजीनें त्यास आपलेकडेस नोकर ठेवून घेतलें. पुढें त्यानें मोठमोठीं कामें केलीं. हल्लीं त्याचे वंशज सिद्दिकअल्लीखान याच नांवाचे नागपुरास आहेत. ( वंशावळ पहा. )

# कोलब्रुकची नागपुरास वकिली

( १८-३-१७९९ते१८-५-१८०१ )

इ.स.१७९८ चे मे महिन्यांत लॉर्ड वेलस्ली हा हिंदुस्थानांत ग.ज. होऊन आला. त्यानें म्हैसूरशीं १७९९ इ. मध्यें सबसिडियरी तह केला. निजामाशीं इ. स. १८०० सालीं, अयोध्येच्या नबाबाशीं इ. स. १८०१ मध्यें व गायकवाडाशीं १८०२ मध्यें त्यानें असेच तह केले. तसाच तह नागपुरच्या राजाशीहि करण्याकरितां त्यानें प्रयत्न चालविला. या उद्देशानें त्यानें हेन्री टॉमस **कोलब्रुक** यास या कामाकरितां नागपुरास वकील म्हणून पाठविलें व तो ता. १८-३-१७९९ रोजी नागपुरास येऊन पोहोंचला.

कोलब्रुक याचें नांव प्रख्यात संस्कृत पंडित म्हणून हिंदुस्थानांत व युरोपांत प्रसिद्ध आहे. यानें केलेलीं संस्कृत ग्रंथांची इंग्रजी भाषांतरें व इतर ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

असा हा विद्याव्यासंगी पंडित राजकारणाच्या डावपेंचांत निरुपयोगी ठरावयाचाच व हाच अनुभव पुढें आला. त्याच्या मनाचा स्वाभाविक कल अशा कामांत नव्हता. परंतु त्यास डिप्लोमॅटिक ( राजकारणी ) खात्यांत घालण्यांत आलें. कोलब्रुक याचा मुलगा सर टी. इ. कोलब्रुक यानें त्याचें चरित्र लिहिलें आहे त्यांत त्यानेंहि ही गोष्ट कबूल केली आहे.

कोलब्रुक यानें राजाजवळ व नागपुरच्या मुत्सद्यांजवळ इंग्रजांशी दोस्तीचा व सबसीडियरी सैन्य ठेवण्याबद्दलचा तह करण्याबद्दल गव्हर्नर जनरलची इच्छा कळविली. राजानें व मुत्सद्यांनीं अर्थात् राजकारणाच्या नेहमींच्या रीतीप्रमाणें स्पष्ट न सांगतां नुसत्या गोड गोड थापा देण्यास सुरवात केली. इंग्रजांशीं कायमची दोस्ती करावी अशी आमचीहि फार इच्छा आहे व या गोष्टीचा आम्ही जरूर विचार करूं; अशा गप्पा राजानें चालविल्या व साध्या मनाच्या कोलब्रुकास तें सर्व खरें वाटून त्यानें कलकत्त्यास गव्हर्नर जनरल यास त्याप्रमाणें कळविलें व नागपुरशीं सबसीडियरी तह होण्याची फार आशा आहे असें वारंवार लिहिलें. इकडे कोलब्रुकची भेट

घेऊन तहाच्या शर्ती ठरण्याची वेळ ठरवावी व मध्येंच राजा कोठें शिकारीस जावा, कधीं दुसरीच कांहीं सबब निघावी अशी लांबवालांबव चालली.

निजाम, म्हैसूर, गायकवाड व अयोध्येचा नबाब यांनीं आपल्या दुबळेपणामुळें व त्यांच्या शेजारच्या शत्रूंपासून बचाव करण्याकरितां म्हणून हे तह इंग्रजांशीं केले. या तहानें आपण इंग्रजांच्या जबड्यांत सांपडलों हें न कळण्याइतके ते मूर्ख नव्हते. परंतु ज्यांना असें कांहीं संकट नव्हतें ते संस्थानिक हा तह कबूल करतील हें शक्य नव्हतें. एका इंग्रज ग्रंथकारानें म्हटल्याप्रमाणें इंग्रजांचें सबसीडियरी तहाचें आमंत्रण म्हणजे कोळीदादानें माशीस माझ्या घरांत येऊन रहा असें म्हणण्यासारखेंच आहे.

निजामाशीं इंग्रजांचा दोस्तीचा तह झाल्यामुळें त्याचे जे शत्रु व मित्र ते इंग्रजांचे शत्रु व मित्र होणार. निजामाचें व मराठ्यांचें नेहमी वांकडें. शिवाय सबसीडियरी तह केल्यास लष्करी सत्ता इंग्रजांच्या हातीं जाऊन प्रत्येक गोष्टींत राजास इंग्रजांच्या तोंडाकडे पहावें लागणार; एवढी साधी गोष्ट रघूजीसारख्या अनुभवी मनुष्यास समजण्यासारखी नव्हती असें नव्हतें. रघूजी शौर्याचे बाबतींत जरी कमी होता तरी एवढें कळण्याइतकी बुद्धि व अनुभव त्यास पूर्ण होता; म्हणून त्यानें इंग्रजांशीं सबसीडियरी तह करणें शक्य नव्हतें व त्याजवर असें कोणतें संकटहि पडलेलें नव्हतें.

निजामाप्रमाणें तो दुर्बळ नव्हता व निजामाप्रमाणें त्यास सभोंवतीं कोणी शत्रूहि नव्हता, त्याच्या राज्याचा विस्तार एवढा मोठा होता कीं, त्याचेवर आपण होऊन कोणी हल्ला करण्यास सहसा धजला नसता व तोहि सहसा कोणाच्या वाटेस जाऊन आपल्या अंगावर संकट ओढून घेण्यास तयार नव्हता.

दोन वर्षेपर्यंत कोलब्रुक नागपुरास राहिला. शेवटीं त्याचे डोळे उघडले व त्यास स्पष्ट दिसून आलें कीं, राजाचे मनांत सबसीडियरी तह करण्याचा नाहीं व तो उगीच चाळवा-चाळव करीत आहे. उलट इंग्रजांचा वकील त्याचे दरबारीं राहिल्यानें त्याची इभ्रतहि उगीच वाढली आहे. म्हणून गव्हर्नर जनरल यास कळवून नागपुर येथील वकालत काढून आप-

णास परत बोलावण्याचा हुकूम पाठवावा असें त्यानें कलकत्त्यास लिहिलें. त्याप्रमाणें गव्हर्नर जनरल यानें हुकूम पाठवून कोलब्रुक यास परत बोलाविलें. त्याप्रमाणें कोलब्रुक हा १८-५-१८०१ रोजीं नागपुराहून निघून गेला. जातांनाहि रघूजीनें कोलब्रुकच्या मार्फत गव्हर्नर जनरल यास अघळपघळ आश्वासनें देऊन दोस्तीचा निरोप पाठविला. पण राजाचा भाऊ व्यंकोजी हा कोलब्रुक यास परत जातांना पहिल्या मुक्कामींच भेटला व त्यास त्यानें सांगितलें कीं ही सर्व दरबारी भाषा आहे. यांतील एक अक्षरहि खरें मानूं नका. कोलब्रुक यास त्याबद्दल मोठें आश्चर्य वाटलें.

कोलब्रुक यानें नागपूरच्या दरबाराचें व रघूजीसंबंधानें वर्णन आपल्या खाजगी टिपणांत लिहून ठेवलें आहे तें त्याच्या चरित्रांत दिलें आहे, तें असें:-

नागपुर शहर एका खोल जागीं वसलेलें असून त्याच्या भोंवतीं लहान लहान टेकड्या आहेत. हिंदुस्थानांतील बहुतेक शहरांप्रमाणें हें शहरहि अरुंद व गलिच्छ रस्त्यांनी भरलेलें आहे. मात्र राजवाड्याभोंवतालची जागा मोकळी आहे. राजवाडा बराच मोठा असून भव्य आहे. त्यांत सहा चौक[1] असून प्रत्येक चौकाभोवतीं दोन दोन अगर तीन तीन मजली उंच इमारती आहेत. बाहेरून सर्व वाड्याभोंवतीं पक्का उंच परकोट आहे. मला फक्त बाहेरचा सर्वांना मोकळा असलेला भागच पहावयास मिळाला. हा भाग मोठा व मोकळा आहे. दरबारचा दिवाणखाना विशेष चांगला असून हंड्या, झुंबरें व तसबिरी यांनीं सुशोभित केलेला आहे. राजाला नक्षीच्या बांधीव कामाची गोडी असून ती त्यानें स्वतःकरितां बांधलेल्या महालामध्यें[2] दिसून येते. राजाला बागबगीच्याचीहि बरीच आवड आहे. मला एका बगीच्यांतील सुन्दर वाड्यांतच राहण्यास जागा दिली आहे. या वाड्याभोंवतालच्या बगीच्यांत रेखीव रस्ते केले असून त्याचे भोंवतीं चांगलें कापलेलें कुंपण आहे.

दरबारांत राजा वागतो तो राजाप्रमाणें न दिसतां एकाद्या साध्या खाजगी

---

१ आंतील चौकांची कांहींशीं कल्पना ना. भो. का. ले. १२ ( ऐ. प. ले ४३२ ) वरून येण्यासारखी आहे.

२ हा बहुधा नवा वाडा, ( ज्यांत सिटी स्कूल आहे तो ) असावा.

माणसाप्रमाणें दिसतो. त्याची रीतभात अगदीं साधी असून तींत डामडौल अगर गर्व मुळींच दिसत नाहीं. त्याचे मुत्सद्दीहि यामुळें त्याचेसारखेच साधे राहतात व राजाशीं नौकर नात्यानें न वागतां जवळजवळ मित्रत्वाच्या नात्यानें वागतात. तरीसुद्धां दरबारांत शोभा व भव्यपणा नसतो असें नाहीं. निवडक मुत्सद्दी दरबारांत राजाच्या गादीच्याजवळ बसतात; परंतु इतर सरदार व मानकरी दूर अंतरावर भिंतीशीं ओळीनें बसतात. तेहि मधून मधून राजाशीं बोलतात. पण बहुधा कामकाज नसलें म्हणजे दरबारांत गाणारणींचीं गाणीं व नाच चाललेला असतो तो सर्वजण ऐकतात व पहातात. राजासहि या करमणुकीचा बराच नाद आहे. तलावांत होड्यांत बसून माशांची शिकार चालली असतांनासुद्धां होड्यांमधून गाणारणीचे ताफे बरोबर असतात.

राजास वाघाचे शिकारीचा फार नाद आहे. कधीं कधीं तर दरबारी काम चाललें असतांनासुद्धां वाघाची खबर आली कीं सर्व कामें सोडून राजा वाघाचे मागें जातो व कैक दिवस शिकारीच्या नादांत राहतो. हल्लीं राजा वाघाचे शिकारीलाच गेला आहे व तिकडे त्यानें एका दिवसांत चार वाघ मारले.

राजा शिकारींत व चैनींत बराच वेळ घालवितो. परंतु त्यामुळें राज्यकारभाराकडे त्याचें दुर्लक्ष असतें असें मात्र नाहीं. राज्यकारभाराच्या प्रत्येक गोष्टींत लक्ष घालून कितीहि श्रम झाले तरी तो त्यांत कुचराई करीत नाहीं व रोज कैक तास तो राज्याच्या कामांत आपल्या मुत्सद्यांबरोबर खर्च करितो.

हल्ली राजाच्या मर्जीतला मुत्सद्दी म्हणजे **श्रीधर लक्ष्मण मुनशी** हा होय. याचें काम परराष्ट्रीय राजकारणाबाबत आहे. पण इतर बाबतींतहि हा राजास सल्ला देतो. याच्या खालोखाल मर्जीतला मुत्सद्दी **कृष्णराव चिटणीस** हा आहे. याचेकडे राज्यांतील अंतर्गत कारभार आहे. **भवानी काळू** हा दिवाण व फडणिसाचें काम करतो; परंतु याचेवर राजाची मर्जी विशेष नाहीं.

वरील मुत्सद्दी व त्यांचे आप्त, तसेंच राजाची आप्तमंडळी ही नेहमीं राजाच्या जवळ असते व ते गादीच्या जवळ बसतात. बाकीचे आपापल्या

इतमामाप्रमाणें दूर व भिंतीजवळ रांगेनें बसतात. दरबार असला म्हणजे सर्व मानकऱ्यांना दिवसांतून दोन वेळां जाऊन हजेरी द्यावी लागते.

**दसऱ्याच्या स्वारीचें वर्णन १७९९ आक्टोबर ३०**—कोलब्रुक यानें नागपुरच्या दसऱ्याचें वर्णन केलें आहे तें असें—

"आम्हांस दसऱ्याच्या समारंभाकरितां हजर राहण्यास बोलावणें आलें. आम्ही गेलों. समारंभ खरोखर पाहण्यालायक होता. नागपुर शहराच्या दक्षिणेच्या मैदानावर[१] इतकी गर्दी झाली होती कीं, सर्व नागपुर शहरांतहि इतके लोक नसतील. या समारंभाकरितां पुष्कळ लोक लांबलांबून पहाण्यास आले होते. दोन्ही बाजूनें लष्करी शिपाई रांगेनें उभे होते. तसेच नदीपासून समारंभाचे जागेपर्यंत दोन्ही बाजूनी प्रेक्षकवर्ग उभा होता. सायंकाळच्या पूर्वी एक तास राजा सीमोल्लंघनाकरितां निघाला. मला त्याचवेळीं निघून शिलंगणाचे पटांगणांत राजास येऊन मिळण्याबद्दल सूचना आली. गांवाबाहेर नदी उतरून राजा पलीकडे जाण्यासच सूर्यास्त होऊन गेला. स्वारीचे आघाडीस राजाचें, त्याचे भावाचें, मुलाचें व आईचें याप्रमाणें निरनिराळीं जरीपटक्याची निशाणें होती व ती मोठमोठ्या हत्तींवर उभीं केलीं होतीं. त्याचप्रमाणें निरनिराळ्या सरदारांचींहि निशाणें हत्तीवर मिरवत होतीं. उंटावर अनेक चौघडे झडत होते. राजा स्वतः एका हत्तीवर रुपेरी अंबारीत बसला होता व जातांना सर्वांचे मुजरे घेत घेत पुढें चालला होता. त्याच्या बरोबरच एका हत्तीवर एक रुपेरी रिकामा हौदा असून त्यांत मयूराच्या आकृतीचें एक छत्र[२] ठेविलें होतें. राजाचा मुलगा आपला हत्ती स्वतःच हांकीत होता. मराठे लोकांस या गोष्टीची मोठी करमणूक वाटते. सीलोन व दक्षिण इकडील मोठमोठाले हत्ती स्वारीबरोबर असून त्यांत निरनिराळे सरदार व मानकरी उंची पोषाख व अलंकार घालून बसलेले होते. सर्व मिरवणूक पटांगणावर थांबली. तेथें एका मातीचे ओट्यावर (शमीचें) एक झाड होतें अगर त्या झाडाची फांदी आणून रोंवली होती. तेथें सर्व जण आपापल्या वाहनांवरून खालीं उतरले. राजा व इतर लोक

१ सक्करदऱ्याचें मैदान.

२ Parasol.

त्या झाडाची पूजा करूं लागले. त्यावेळीं ती पूजा न दिसेल अशा ठिकाणीं आम्हांस बसण्यास सांगितलें. पूजा झाल्यानंतर सर्व जण एकत्र असले व तेथें एकमेकांना भेटले व गोष्टी वगैरे झाल्या. यानंतर आम्ही जाण्याची परवानगी घेऊन परत निघून आलों. राजा व इतर लोक नतर मिरवत मिरवत परत राजवाड्यांत आले.[१] "

---

# भाग १० वा

# दुसरा रघूजी (पुढें चालू)

## दुसरें इं० मराठा युद्ध १८०३ इ०

महादजी शिंद्याचे वेळेपासून पुण्याचे दरबारांत व एकंदरीत मराठी राज्यांत शिंद्याचें महत्त्व जास्त वाढलें. महादजी शिंद्यानंतर दौलतराव गादीवर बसला; परंतु त्याच्यामध्यें महादजीची धमक नव्हती. उलट यशवंतराव होळकर हा बराच पाणीदार असून त्याच्यामध्यें व दौलतराव शिंद्यामध्यें चुरस सुरू झाली. काशीराव होळकर व यशवंतराव होळकर यांजमध्यें इंदूरच्या गादीवरून तंटा सुरू झाला. यशवंतराव हा तुकोजी होळकराचा दासीपुत्र असल्यामुळें त्यानें काशीरावाचा पुतण्या खंडेराव याच्या नांवानें काशीरावाशी भांडण सुरू केलें. त्यांतच पुण्याजवळ शिंदे-होळकरांच्या झटापटीत यशवंतरावाचा एक भाऊ पडला व दुसरा विठोजी हा कैद झाला. खंडेराव होळकरासहि शिंद्याच्या सांगण्यावरून बाजीरावानें कैदेंत टाकलें. यशवंतराव हा पळून नागपुराकडे गेला. तेथेहि शिंद्याच्या

---

१ कोलब्रुक यास या स्वारीबरोबर जाण्यांत कांहीं अधर्म घडला असें वाटलें नाहीं. पण पुढें टॉमस हिस्लॉप यानें त्याबद्दल रेसिडेंट वगैरे इंग्रज दसऱ्याचे स्वारीबरोबर असत, त्यांना दोष देऊन त्यांवर सडकून टीका केली. ( पुढें भाग १३ पहा. )

सांगण्यावरून रघूजी भोंसल्यानें त्यास पकडून कैदेंत ठेविलें. त्यास सीताबर्डीचे टेकडीवर "बाणाच्या कैच्याचें खपरेल" म्हणून एक इमारत होती तीत ठेवलें होतें. तेथूनहि यशवंतरावानें आपली कशी तरी सुटका करून घेतली व माळव्याकडे पळून गेला. त्यानें सैन्य जमा करून शिंद्याचे मुलखांत लुटालूट चालविली. हळुहळू त्यास होळकराचें स' लष्कर अनुकूल झालें व होळकराच्या गादीचा मालक म्हणून होळकरशाहीच्या सर्व लोकांनीं यशवंतरावास मान्य केलें. शिंदे व पेशवे यांनी यशवंतरावाचा मोड करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परन्तु महादजी शिंद्याच्या बायकांशी दौलतराव शिंद्याचें भांडण चालू असल्यामुळें व त्या कोल्हापुरकरांचा आश्रय धरून राहिल्यामुळें दौलतरावास लवकर उत्तर हिंदुस्थानांत जातां आलें नाहीं शेवटीं आपला सासरा सर्जेराव घाटगे यास पुण्यास ठेवून दौलतराव माळव्यांत गेला.

**विठोजी होळकराचा खून:**—इकडे बाजीरावानें यशवंतराव होळकराचा भाऊ **विठोजी** यास भर दिवसां आपल्या वाड्यासमोर हत्तीच्या पायाशी बांधवून तुडवून क्रूरपणानें मारलें. हें यशवंतरावास कळतांच तो रागाने बेफाम झाला व आपल्या भावाच्या मृत्यूचा सूड घेण्याकरितां पुण्यावर चाल करून आला. फत्तेसिंग माने व शहा अहमदखान नांवाचे सरदार त्यानें प्रथम पुढें रवाना केले व त्यांनीं गोदावरीपासून पुण्यापर्यंत पेशव्याच्या मुलखांत लुटालूट चालविली. बाजीरावानें त्यांवर कांहीं लष्कर पाठविलें परंतु तें पराभव पावलें. यशवंतराव मागाहून स्वत: खानदेशांतून पुण्याच्या रोखानें आला. त्याच्या पाठोपाठ दौलतरावानें पेशव्याचे मदतीकरितां सदाशिव भाऊ भास्कर हा सरदार पाठविला. तो बऱ्हाणपुराहून जालना, बीड या मार्गानें पुण्याजवळ आला व दोन्ही सैन्यांचे तळ पुण्याच्या आसपास पडले.

**यशवंतराव होळकराची स्वारी व बाजीरावाचें पलायन:**—पुण्याजवळ शिंदे होळकरांची लढाई होऊन यशवंतरावाच्या स्वत:च्या शौर्यानें त्याचा जय होऊन शिंद्याचे व पेशव्याचे सैन्यांचा पूर्ण मोड झाला. दोन्हींकडेहि युरोपियन सरदार व कवाइती सैन्य होतें. परंतु यशवंतरावानें स्वत: या युद्धांत मोठा पराक्रम दाखविला. यशवंतराव पुण्याकडे येतांच पुण्यास

पळापळ सुरू झाली. खुद्द बाजीरावाचें मन विठोजीच्या खुनाबद्दल त्यास खात होतें व यशवंतराव पुण्यावर आला हें ऐकतांच त्याच्या अंगाचा थरकांप झाला. लढाई सुरू होतांच तो पांच हजार सैन्य घेऊन शहराबाहेर गेला; परंतु, लढाईंत न जातां लढाईचा परिणाम काय होतो याची वाट पहात शहराच्या दक्षिणेस जाऊन राहिला. यशवंतरावाचा जय होऊन शिंद्याचा मोड झाला हें कळतांच त्यानें पोबारा केला व सिंहगडास येऊन राहिला. तेथें तीन दिवस राहून नंतर तो रायगडास गेला व तेथून महाडास जाऊन त्यानें मुंबईस इंग्रजांस पत्रें लिहिलीं कीं, मी तुमचे आश्रयास येतों तरी तुमचीं जहाजें मला येण्यास पाठवा. इंग्रजांना ही सोन्याचीच संधि आली. त्यांनीं समुद्रमार्गानें जहाज रवाना केलें. इकडे होळकराचे सैन्याच्या तुकड्या बाजीरावाच्या पाठीवर होत्याच. त्यांच्या भीतीनें तो सुवर्णदुर्गच्या किल्ल्यावर गेला. तेथें त्यास समजलें कीं, अमीरखान पेंढारी यशवंतरावाकडून कोंकणांत शिरला आहे. म्हणून तो तेथून रेवदंड्यास गेला व तेथें इंग्रजी जहाज आलें होतें त्यांत बसून मुंबईस गेला व इंग्रजांच्या ताब्यांत आयताच सांपडला.

नागपुराप्रमाणेंच बाजीरावाशीहि सबसीडियरी तह करून आपलें सैन्य पेशवाई मुलखांत ठेवण्याचा इंग्रजांचा एकसारखा प्रयत्न चालू होता. मार्क्विस ऑफ **वेलस्ली** हा गव्हर्नर जनरल आल्यापासून त्यानें हिंदी संस्थानिकांशी सबसिडियरी तह करण्याचा सपाटा चालविला. प्रथम निजाम व म्हैसूरच्या राजानें हा तह केल्यावर उत्तर हिंदुस्थानांतील व मारवाडांतील लहानमोठ्या संस्थानिकांनीं भराभर हे तह करून इंग्रजी लष्कर आपल्या मुलखांत घेतलें व आपलें स्वातंत्र्य गमाविलें. त्यामुळें इंग्रजांचें सैन्य व सामर्थ्य फारच वाढलें. फक्त मराठेशाहींत मात्र इंग्रजांचा हात घुसेना. नागपुरकर भोंसल्यांनीं इंग्रजांस चकविलें. शिंदे, होळकर तर भोंसल्यांपेक्षांहि वस्ताद व प्रबळ. ते हा तह करतील ही आशाच करणें व्यर्थ होतें. त्या दोघांनींहि बरेच इंग्रज व फरेंच अंमलदार नोकरीस ठेवून आपलें स्वतःचेंच कवाइती सैन्य तयार केलें. फक्त बाजीराव पेशवा राहिला. तो स्वतः नामर्द व भित्रा असल्यामुळें व त्याच्या क्रूरपणाच्या वर्तनामुळें त्याला त्याच्या राज्यांतसुद्धां कोणी मित्र म्हणून राहिला नव्हता. यशवंतराव होळकर त्याचा वैरी बनला, शिंद्याची त्याची दोस्ती; परंतु त्याचा वरचष्मा व सासुरवास

बाजीरावास असह्य झाला होता. शिवाय महादजी शिंद्याचें सामर्थ्य व अक्कल दौलतरावांत राहिली नव्हती.

इंग्रजांचे मदतीशिवाय आपला तरणोपाय नाहीं ही गोष्ट भित्र्या परंतु धूर्त बाजीरावाच्या लक्षांत आली. इकडे इंग्रजहि पेशव्यांशीं सबसीडियरी तह करून पेशवाई गिळंकृत करण्यास टपून बसलेले होते.

शेवटीं इंगजांनीं मुंबईहून कर्नल **क्लोज** यास पुण्यास रेसिडेंट म्हणून पाठविलें व त्यानें बाजीरावाशीं वरील तह करण्याबद्दल बोलणें लावलें. इंग्रजी सैन्य घेण्यास बाजीरावानें कबुली दिली; परंतु पेशव्याच्या राज्याचे हद्दीचे आंत तें कायमचें आणून ठेवण्यास तो कबूल होईना. त्याचें म्हणणें मला लागेल तेव्हां मी सैन्य मागवीन व तेव्हां तें तुम्ही पाठवा. इंग्रजांचा आग्रह कीं हें सैन्य पुण्यास व पेशव्याच्या राज्यांत राहील. इंग्रजाचें सैन्य पुण्यास राहिल्यावर सर्व लष्करी सत्ता इंग्रजांच्या हातांत जाऊन आपण त्यांच्या हातांतलें बाहुलें होणार व इंग्रजांचे मांडलिक बनणार इतकें न समजण्याइतका बाजीराव भोळा नव्हता. म्हणून त्यावेळी तेवढ्यावर ती गोष्ट राहिली. परंतु गरजवंतास अक्कल नाही असाच त्याचा प्रकार अखेरीस झाला.

शिंदे, होळकरांच्या पुण्याच्या लढाईच्या वेळी क. **क्लोज** पुण्यासच होता. परंतु त्यास दोघांनींहि कांहीं त्रास दिला नाहीं. यशवंतराव होळकरानें प्रथम पुण्याचे लोकांसहि कांहीं त्रास दिला नाही व आपल्या शिपायांस लूटालूट वगैरे करूं दिली नाहीं. उलट **क्लोज** यास बोलावून त्यानें त्यास विनविलें की, तुम्हीं मध्यस्थी करून शिंदे व पेशवे यांच्याशीं माझें भांडण मिटवा. परंतु हें करणें इंग्रजांस मुळींच फायद्याचें नव्हतें.

बाजीराव पुण्याहून पळाला तेव्हांच त्यानें जातांना क० **क्लोज** याजकडे निरोप पाठविला कीं, " आतां मी तुम्हीं म्हणतां त्याप्रमाणें सबसीडियरी तह करण्यास कबूल आहें व तुमच्या सहा पलटणी दरसाल पंचवीस लक्ष रुपयांवर माझे राज्यांत ठेवा " क्लोज यानें हें मुंबईस कळविलें परंतु बाजीराव पळून गेल्यामुळें क्लोज यास बाजीरावाशीं पुढें बोलणें करतां येईना.

**वसईचा तह** ३१-१२-१८०२:—बाजीराव पुण्यास परत येईल या हेतूनें यशवंतरावानें प्रथम जो सभ्यपणा धारण केला होता तो त्यानें लौकरच सोडून दिला व पुण्यांतील लोकांकडून जबरदस्तीनें व क्रूरपणानें पैसे वसूल करण्याचा सपाटा चालविला. याप्रमाणें त्यानें पुष्कळ द्रव्य जमा केलें. बाजीराव परत येत नाहीं असें पाहून त्यानें जुन्नराहून बाजीरावाचा भाऊ **अमृतराव** यास पुण्यास आणविलें व पेशव्याच्या गादीवर त्याची स्थापना करण्याचा यानें विचार केला. अमृतराव या गोष्टीस कबूल होईना. परंतु बाजीराव येत नाहीं असें पाहून त्यानें कारभार करण्याचें कबूल केलें. तरी तो शहराबाहेरच तंबूत राहिला व पुण्यांत येऊन गादीवर न बसतां तसाच कारभार करूं लागला. अमृतराव ऐकत नाहीं असें पाहून यशवंतरावानें शेवटी अमृतरावाचा पुत्र **विनायकराव** यास पेशवाईचे गादीवर बसविण्याचा विचार करून साताऱ्याहून छत्रपतीकडून त्याच्या नांवाचीं वस्त्रें आणविलीं व त्यास गादीवर बसविलें व त्याच्या नांवानें कारभार सुरू केला.

**बाजीराव** हा वसईस ता. ३ डिसेंबर रोजीं उतरला. क० **क्लोज** हाहि पुण्याहून निघून मुंबईस त्याच दिवशीं आला व त्यानें बाजीरावाची भेट घेतली. बाजीरावानें त्यास आपण सबसीडियरी तह करण्यास कबूल आहों असें सांगितलें. ता. १८ डिसेंबर रोजी तह पक्का करण्याचें ठरून बोलचाल सुरू झाली व ता. ३१ डिसेंबर १८०२ रोजीं तो **वसईस** पक्का होऊन उभयपक्षांच्या सह्या झाल्या.

**वसईच्या तहाच्या शर्ती पुढीलप्रमाणें होत्या:—**

पेशवे व ईस्ट इंडिया कंपनी यांनीं एकमेकांच्या मुलखाच्या संरक्षणार्थ एकमेकांस मदत करावी. या कामाकरितां इंग्रजांनीं पेशव्यास सहा हजार कवाइती पायदळ व तोफखाना व युरोपियन गोलंदाज द्यावे व त्यांना पेशव्याच्या मुलखांत कायमचें राहूं द्यावें. लढाई चालू असतांना दोन हजारांच्या दोन पलटणी पेशव्याच्या संन्निध ठेवाव्या व बाकीच्या पलटणी, सहा हजार पायदळ व दहा हजार स्वार लढाईवर पाठवावे. इंग्रजांशीं शत्रुत्व असलेला कोणीहि युरोपियन पेशव्यानें आपल्या पदरीं ठेवूं नये. सबसीडियरी सैन्याच्या खर्चाकरितां सव्वीस लक्ष रुपये उत्पन्नाचा मुलूख पेशव्यानें इंग्रजांस तोडून द्यावा. इंग्रजी लष्कराच्या खर्चाकरितां जें धान्य व माल येईल त्यावर

जकात माफ करावी, सुरतेवरील हक्क पेशव्यानें सोडून द्यावा. निजाम व गायकवाड यांशीं पेशव्याचे जे गुन्हे होते ते सर्व इंग्रजांच्या मध्यस्थीनें तोडावे. इंग्रजांची आगाऊ संमति घेतल्याशिवाय पेशव्यानें दुसऱ्या कोणाहि संस्थानिकाशीं युद्ध करूं नये व इतर संस्थानिकांशीं कोणतेंच बोलणें करूं नये

स्वतःच्या भित्रेपणामुळें बाजीरावानें आपलें व सर्व मराठी साम्राज्याचे स्वातंत्र्य एका क्षणांत गमावलें. आपण इतर मराठे संस्थानिकांस—निदान आपला पक्षपाती शिंदा यास तरी—विचारावयास पाहिजे होतें. ही गोष्ट त्याच्या मनांत बोचूं लागली. म्हणून हा तह केल्यावर लागलीच बाजीरावानें इंग्रजांस कळविलें कीं, निदान मला शिंद्याची तरी सल्ला घेऊं द्या. आपल्या मनाचें समाधान करण्याकरितां त्यानें **बाळोजी कुंजर** यास **दौलतराव** शिंद्याकडे पाठविलें व पेशव्यांचा नागपुर दरबारचा वकील **नारायणराव बाबूराव वैद्य** यास नागपुरकर **रघूजी** भोंसल्याकडे पाठविलें. होळकराच्या धाकानें आपणास हा तह करणें भाग पडल्याबद्दल त्यांची समजूत घालण्याबद्दल त्यानें दोघांस सांगितलें. यापूर्वीहि शिंदे व भोंसले हे बाजीरावास इंग्रजांशीं तह न करण्याबद्दल आग्रह करीतच होते व त्या दोघांसहि हा तह आवडणार नाहीं हें बाजीरावास माहीत होतें म्हणून त्याची नक्कल वगैरे त्यानें शिंदे व भोंसले यांजकडे पाठविली नाहीं व इंग्रजांबद्दल उल्लेखहि केला नाहीं. फक्त तुम्ही दोघेहि ताबडतोब पुण्यास या व होळकराच्या त्रासांतून मला सोडवा एवढाच दोघांच्याहि पत्रांत त्यानें मजकूर लिहिला होता. बाजीरावाची खात्री होती कीं, शिंदे व भोंसले या तहामुळें इंग्रजांवर चिडून जातील व त्यांच्यांत व इंग्रजांत लढाई सुरू होईल. परंतु कसेंहि झालें तरी जो जिंकील त्याचेकडे पगडी फिरविण्यास बाजीराव सदैव तयारच होता. सर्वांशींच संधान कायम ठेवून वेळ पडल्यास सर्वांनाहि फसविण्याची त्याची नेहमीची संवय होती. परंतु या त्याच्या वर्तनामुळें त्याला कोणीच मित्र राहिला नाहीं.

वसईचा तह होतांच मद्रासेहून जनरल **वेलस्ली** सैन्य घेऊन पुण्यास आला. तसाच क० **स्टिव्हनसन** हा हैद्राबादचें सबसीडियरी सैन्य घेऊन आला व त्यांनीं पुण्यास बाजीरावाची गादीवर स्थापना केली.

१३-५-१८०३). **अमृतराव** पेशवा पळून संगमनेरावरून नाशकास गेला व तेथें त्यानें नाशिक शहर लुटून धामधूम चालविली. परंतु त्याला कोणाचीहि मदत नसल्यामुळें त्यानें ज. **वेलस्ली**कडे सल्ल्याचें बोलणें लावलें. परंतु **बाजीराव** हा कोणतीच तडजोड ऐकेना. शेवटीं वेलस्लीनें बाजीरावाच्या इच्छेविरुद्धच **अमृतरावास** दरसाल आठ लक्ष रुपयांची नेमणूक देऊन त्यास गप्प बसविलें. अमृतरावानें ही नेमणूक घेऊन काशीस रहावें असें ठरलें.

याप्रमाणें अमृतराव हा इंग्रजांचा गुलाम बनला व तो पुढील युद्धांत वेलस्लीस फार उपयोगी पडला. दुसरें मराठा युद्ध संपल्यानंतर तो उमरावती, नागपूर मार्गानें काशीस गेला. जातांना त्याचा नागपुरास कांहीं दिवस मुक्काम होता. **अमृतराव** बरेच दिवस काशीस होता. हल्लीं त्याचे वंशज **बरेली** येथें आहेत.

दौलतराव शिंदे व रघूजी भोंसले यांस वसईच्या तहाची व पुण्यास इंग्रजी सैन्य आल्याची बातमी समजतांच त्यांना इंग्रजांचा व बाजीरावाचा मनस्वी राग आला व आतां मराठी राज्याची इतिश्री जवळ आली हें भविष्य समजलें. शिंदे, भोंसले, होळकर व इतर मराठे संस्थानिक एक होऊन जोराचा प्रयत्न करून मराठेशाही इंग्रजांच्या घशांतून सोडवावी म्हणून अखेरचा निकराचा प्रयत्न करण्याचा त्यांनीं निश्चय केला. दौलतराव शिंद्याचा मुक्काम ब्ऱ्हाणपुरास होता; म्हणून त्यानें **बाळाजी यशवंत** यास नागपुरास रघूजीकडे पाठविलें. त्यावरून **रघूजी** हा शिंद्यास मिळण्याकरितां मलकापुरच्या रोखानें पुढें आला व शिंदाहि रघूजीस मिळण्याकरितां मलकापुरचे रोखानें ब्ऱ्हाणपुराहून निघाला. दौलतराव शिंद्याचा दिवाण **यादव भास्कर** याचा भाऊ **माधवराव भास्कर** यास दौलतरावानें रघूजी भोंसल्याकडे पाठविलें होतें व **यशवंतराव** होळकरास वळविण्याचें काम रघूजीस सांगितलें होतें. त्याप्रमाणें रघूजीनें यशवंतराव होळकरासहि येऊन मिळण्याबद्दल पत्रें पाठविलीं. होळकराच्या मिळण्यावरच सर्व गोष्टी अवलंबून होत्या. पेशवे, इंग्रज व निजाम या तिघांची लष्करी सत्ता एकट्या इंग्रजांच्या हातीं होती. शिवाय इंग्रजांचें चोहोंकडचें सैन्य

व म्हैसूर वगैरे संस्थानिकांचीं सबसीडियरी सैन्यें मिळून इंग्रज या वेळीं सर्वांस भारी झाले होते. गायकवाड तर पूर्णपणें इंग्रजांच्या ताब्यांत गेला होता. दक्षिणचे पटवर्धन सरदार हे पेशव्यांचे हस्तक बनले होते व इंग्रजांच्या ताब्यांत गेले होते व त्यांच्याशीं वेलस्लीनें वेगवेगळे तहहि केले होते. मराठ्यांच्या सैन्यापैकीं शिंदे व होळकर यांचींच सैन्यें सज्ज होतीं व त्यांत युरोपियन तऱ्हेनें शिकलेल्या पलटणी व तोफखाना होता. शिवाय इंग्रज, फरेंच, पोर्तुगीज अधिकारीहि त्यांच्या फलटणीवर अद्याप नौकरीस होते. भोंसल्यांचें सैन्य बरेंच मोठें ; परंतु नवीन पद्धतीनें शिकलेलें नव्हतें. यशवंतराव या दोघांना मिळाला तरच यश येण्याची आशा होती.

शिंदे व भोंसले यांनीं इंग्रजांशीं युद्ध करण्याचें ठरविलें. यशवंतराव पुण्यास असतांना रघूजी भोंसल्याचे मुत्सद्दी **श्रीधर लक्ष्मण मुनशी** व **कृष्णराव माधव चिटणीस** हेहि पुण्यास होते. त्यांचेबरोबर यशवंतरावानें रघूजीस पत्रें दिलीं होतीं व त्यांत इंग्रजांविरुद्ध चढाव करण्याची वेळ आली आहे असें स्वतःच सुचविलें होतें.

परंतु इकडे इंग्रजहि होळकरास आपलेकडे ओढण्याचा— निदान त्यानें शिंदे व भोंसल्यांस मिळूं नये असा—प्रयत्न करीत होते. क० **क्लोजच्या** मार्फत यशवंतराव होळकराशीं पुण्यास बोलणें सुरू झालें होतें व बाजीरावाचा व यशवंतरावाचा मिलाफ करण्याबद्दल क्लोज यानें कबूल केलें. परंतु बाजीराव कोणत्याहि तडजोडीस कबूल होईना. यशवंतरावाचा भाऊ त्यानें मारल्यामुळें त्यास यशवंतरावाची मोठी दहशत बसली होती व तो कोणत्या वेळेस आपला सूड घेईल याचा त्यास भरंवसा वाटेना. यशवंतराव होळकर पुण्यास या कामाकरितां बरेच दिवस राहिला होता; परंतु तडजोड होत नाहीं असें पाहून तो पुण्याहून निघून गेला.

शिंदे व होळकर यांचे उ. हिंदुस्तानांतील मुलखाच्या वांटणीचा लढा होता. ती वांटणी करून द्या म्हणजे मी इंग्रजांविरुद्ध जुटींत सामील होतों असें यशवंतरावानें रघूजीस कबूल केलें. परंतु ही मुलखाची वांटणी होळकराच्या मनाप्रमाणें अखेर झाली नाहीं. यशवंतराव पुण्याहून निघून औरंगाबादेपर्यंत आला व भोंसल्याच्या सांगण्यावरून खानदेशांत चांदवड येथें तळ

देऊन राहिला. त्यास शिंदे होळकरांनीं पुन्हां औरंगाबादेकडे बोलावलें. दौलतराव शिंदा बऱ्हाणपुराहून व भोंसले वऱ्हाडांतून येऊन मलकापूरच्याजवळ येऊन राहिले.

रघूजीनें आपले वकील **यशवंतराव रामचंद्र** व **व्यंकटराव कृष्ण** यांस यशवंतरावाकडे चांदवडास पाठविलें व त्यांचेमार्फत जाबसाल सुरू झाले. या वकिलांच्या मार्फत बोलणें चालून शेवटीं यशवंतरावाच्या म्हणण्याप्रमाणें दौलतराव शिंद्यानें यशवंतरावाचा पुतण्या **खंडेराव होळकर** व **मल्हार शामजी** हे बऱ्हाणपुरास कैदेंत होते त्यांस सोडून दिलें. माळव्यांतील होळकराचा मुलूख शिंद्यानें घेतला होता तोहि सोडून दिला व उत्तर हिंदुस्तानांतील होळकराच्या मुलखास काहीं उपसर्ग न देण्याचें कबूल केलें. शिंदे व होळकर यांच्यामधील मुलखाची वांटणी करून देण्याचेंहि रघूजीनें कबूल केलें.

**श्रीधर लक्ष्मण** यानें यशवंतरावास लिहिलेल्या पत्रांत तो म्हणतो :– "आपलीं बोलणीं पुणियाचे मुक्कामीं इंग्रजप्रकरणीं होत गेलीं त्या अन्वयें आम्ही यजमान (रघूजी) साहेबाजवळ येऊन त्यांस बोलावून त्याजला बाहेर काढून शिंद्याच्या भेटीवरून आपल्याकडील जाबसाल उरकून पाठविले. कांहीं तथा राहिली नाहीं. हल्लीं इंग्रजांनीं नगरचा किल्ला घेतला. नमूदी होण्यांत कांहीं कसर राहिली नाहीं. उभयता सडे होऊन मुकाबल्यास गेले. या प्रसंगीं आपलें येणें घडावें यांत उपयोग फार आहेत." शिंदे व भोंसले उत्तरेकडून अजिंठ्यावरून औरंगाबादेकडे कूच करीत होते; त्यांना मिळावें व त्रिवर्गांनीं औरंगाबादेहून पुण्याकडे जाऊन इंग्रजांवर हल्ला करावा असा त्यांचा इरादा होता. परंतु यशवंतरावानें त्यावर उत्तर दिलें, "आम्ही तुम्हांशीं बोललों त्याप्रमाणें पुणियाहून कूच करून इकडील जाबसाल उगवून न येतां कूच करून माघारें चांदवडचे सुमारास जाण्याविषयीं तयनायत केली. आम्हांस सर्वप्रकारें सेनासाहेबसुभा यांची मर्जी दरकार तेव्हां लाचार होऊन माघारे आलों. मुख्य जाबसाल मुलखाचे वांटणीचा त्याजला ठिकाण नसतां, कांहीं तथा उगवण्यांत राहिली नाहीं हें लिहितां अपूर्व आहे. मल्हार शामजी वगैरेची रवानगी तिकडे (भोंसल्यांकडे) केली आहे व आम्हीहि कूच करून

भीमगांवापर्यंत आलों. त्यांचीं बोलणीं होऊन उत्तराची मार्गप्रतीक्षा आहे. उत्तर उगवून समर्पक सत्वर यावी.[१]"

या पत्राचीं उत्तरें घेऊन श्रीधर बापु मुनशी याचा मेहुणा यशवंतराव रामचंद्र व व्यंकटराव कृष्ण हे परत यशवंतरावाकडे आले. ते यशवंतरावास घाटखेड नजीक बोदवड (खानदेश) येथें भेटले (ता. २५–६–१८०३). यशवंतरावाचे व शिंद्याचे वांटणीचा प्रश्न वाटाघाटींतच राहिला. परंतु यशवंतराव हा भोंसले व शिंदे यांच्या कुचाच्या धोरणानें औरंगाबादेच्या रोखानें कूच करीत चालला. तो भीमगांव, बोदवड, भिकनगांव, रहिमाबाद मार्गानें येत येत ता. २८–८–१८०३ चे सुमारास देऊळगांवराजानजीक तळ देऊन राहिला. त्याचा मुक्काम तेथें बरेच दिवस होता. तसेंच शिंदे व भोंसले हे अजिंठ्याचा घाट चढून देऊळगांवराजापासून पांचसहा कोसांवर जाफराबादेनजीक डोणगांव [२] येथें तळ देऊन राहिले. तरी शिंदे व होळकर यांजमधील वाटाघाटीचा खल चालूच होता व त्यांची दिलसफाई झाली नाहीं.

त्रिवर्गांनीं एकजुटीनें इंग्रजांविरुद्ध लढण्यांतच सर्वांचा फायदा आहे ही गोष्ट यशवंतरावासहि मान्य होती किंबहुना तोहि याच गोष्टीचा आग्रह धरीत होता. परंतु शिंद्याचे व आपले वांटणीची भानगड मिटविल्या-शिवाय मात्र तो यांत मनापासून पडण्यास तयार नव्हता. वेळींप्रसंगीं आपले घरचे अंतस्थ तंटे बाजूस ठेवून सर्वसामान्य शत्रूस एकजुटीनें तोंड देण्याचें शहाणपण शेवटीं यशवंतरावानें दाखविलें नाहीं [३] व शिंदे भोंस-ल्यांसच अखेर इंग्रजांशीं झुंजावें लागलें.

१ ऐ. प. ले. ३६९–३७८ पहा.

२ डोणगांव हें "लोणगांव डोणगांव" या नांवानें प्रसिद्ध असून याचे-जवळच ब्रह्मेंद्रस्वामीचें "गणपतीचें राजूर" हें प्रसिद्ध स्थान आहे.

३ ज. वेलस्लीनें यशवंतरावास फोडण्याकरितां अमृतराव पेशव्यामार्फत प्रयत्न चालविला होता. अमृतरावानें दौलतरावाचा बाजीरावाशीं यशवंत-रावाविरुद्ध चालू असलेला पत्रव्यवहार पकडून यशवंतरावास दाखविला. त्यामुळें तो बिथरून जाऊन शिंद्यास मिळाला नाहीं व रस्त्यांतूनच परत गेला असें वेलस्लीनें लिहिलें आहे.

परंतु पत्रोपत्रीं उलट भोंसल्यांसच ब्रह्मज्ञान सांगण्यास यशवंतराव कमी करीत नव्हता. तो अघळपघळ रीतीनें वरील उपदेश भोंसल्यांस व शिंद्यास करीतच होता. त्याच्या एकदोन पत्रांवरून त्याच्या मनःस्थितीची कल्पना येण्यासारखी आहे.

**कॉलिन्स याचें शिंद्याच्या लष्करांतून प्रयाण व युद्धाला सुरवातः**- शिंदे, होळकर व भोंसले यांच्या ह्या आपसांतील भानगडी चालू असतां इंग्रज त्यांच्या हालचालीवर नजर ठेवून जागरूक होते. दौलतराव शिंदे ब्ऱ्हाणपुराहून निघून भोंसल्यांस मिळण्याकरितां खानदेशांत उतरला. त्या वेळेस त्याचेबरोबर क. **कॉलिन्स** [१] म्हणून इंग्रजांचा वकील होता. त्यानें शिंद्यास अभिवचन मागितलें कीं, ही सैन्याची हालचाल इंग्रजांवर नाहीं असें तुम्ही जाहीर करा; परंतु दौलतरावानें भोंसल्यांची भेट होईपर्यंत मी कांहीं सांगू शकत नाही असें त्यास सांगितलें. भोंसल्यांची व शिंद्याची भेट होऊन तें सैन्य निजामाच्या हद्दीवर आलें तेव्हां मात्र जनरल **वेलस्ली** यानें **कॉलिन्स** याचेमार्फत शिंदे व भोंसले यांस निरोप पाठविला कीं, तुम्ही निजामाच्या सरहद्दीपासून दोन्हीकडे आपलें सैन्य हलवा नाहीतर तुमचे मनांत लढाई करावयाची आहे असें आम्ही समजून लढाई सुरू करूं. शिंदे व भोंसले यांनीं यासहि समाधानकारक उत्तर दिलें नाही. कारण यशवंतराव होळकर आपणांस मिळण्याची ते वाट पहात होते. म्हणून त्यांनीं लांबवालांबव चालविली. शेवटीं **कॉलिन्स** हा शिंद्याच्या छावणींतून ता. ३ ऑगस्ट १८०३ रोजीं निघून गेला. उघड लढाई जाहीर केल्याची ही खूणच होती.

**अहमदनगर सर** (१२-८-१८०३ इ.):--जनरल **वेलस्ली** हा पुण्याहून निघून **अहमदनगरास** आला. **अहमदनगर**चा किल्ला त्यावेळी शिंद्याच्या ताब्यांत होता. **वेलस्लीनें** अहमदनगराच्या दक्षिणेस **वाळकी** येथें तळ दिला व तेथून किल्ल्याबाहेरील शहरावर हल्ला करण्याकरितां सैन्य पाठविलें (आगस्ट ता. ८). शहरांत शिंद्याचें अरब सैन्य व पलटणी होत्या-त्यांची व इंग्रज सैन्याची चांगली घुमश्चक्री झाली. परंतु मराठ्यांचा मोड झाला

१ मराठी कागदांतील कल्याणसाहेब.

व इंग्रजांनीं किल्ल्यास मोर्चे लावले ( ता. १० ). किल्ल्यावर दोन दिवस तोफांचा मारा सुरू राहिला; परंतु ता. १२ रोजीं किल्लेदार व आंतील शिबंदी यांनीं धीर सोडला व ते पुढें लढाई न करितां आपली मालमत्ता घेऊन किल्ला इंग्रजांच्या स्वाधीन करून बाहेर निघून गेले. या भ्याडपणाच्या वर्तनाबद्दल किल्लेदार मल्हारराव गोंदेकर याजवर शिंद्याची गैरमर्जी झाली. परंतु हें महत्त्वाचें ठाणें विशेष लढाई न होतां इंग्रजांच्या आयतेंच स्वाधीन झालें. ( ता १२-८-१८०३ ).

मराठ्यांचें सैन्य ता. २४ आगस्ट रोजीं **अजिंठ्या**चा घाट चढून ता.२९ रोजीं **औरंगाबादेस** आलें होतें. निजामाचे सबसिडियरी सैन्यासह क० **स्टिव्हनसन** हा औरंगाबादेच्या बाजूस होता व कांहीं दिवस दोन्ही सैन्यांचे डावपेंच चालू होते. मराठ्यांचा तळ **जालन्यास** पडला हें समजतांच ज० **वेलस्ली** गोदावरी उतरून औरंगाबादेस आला. मराठ्यांनीं दक्षिणेस हैदराबादेकडे जाण्याची हूल दाखविली. म्हणून **वेलस्ली** त्यांचे मागोमाग गोदावरीचे उत्तर कांठानें त्यांचे मागें गेला. तों त्यांनीं उत्तरेकडचा मार्ग धरून **भोकरधन** व **जाफराबाद** यांचे दरम्यान तळ दिला ( २१ सप्टेंबर ). **स्टिव्हनसननें** शिंद्याचें **जालना** शहर ताब्यांत घेतलें व ता. २१ रोजींच **स्टिव्हनसन** व **वेलस्ली** यांची बधनापुरास भेट होऊन त्यांनीं दोन टोळ्यांनीं मराठ्यांस गांठून लढाई देण्याचा कार्यक्रम ठरविला.

स्टिव्हनसन व वेलस्ली हे तारीख २२ ला **बधनापुरा**हून निघाले. स्टिव्हनसन पश्चिमेकडून गेला व वेलस्लीनें पूर्वेकडचा रस्ता धरला व दोघांनींहि उत्तरेकडेस जाऊन मराठे लष्करास मध्यंतरीं भोकरधनाचे सुमारास गांठावें व दोहोंकडून एकदम हल्ला करावा असें ठरविलें.

ता. २३ रोजीं वेलस्ली नळनी नांवाच्या खेड्यास येऊन पोहोंचला व तेथें त्याच्या सैन्याचा तळ पडणार तोंच त्याच्या हेरांनीं बातमी आणली कीं, मराठ्यांचे लष्कराचा तळ तेथून तीन कोसांवर **खेळणा** नदीच्या कांठीं आसई येथें पडला आहे. दुसरे दिवसापर्यंत वाट पाहिल्यास मराठ्यांशीं गांठ पडणार नाहीं असें वाटून वेलस्लीनें तेथें तळ न देतां एकदम आपणच मराठे लष्करावर हल्ला करावा असें ठरविलें व एकदम कूच करून

**आसई**कडे मोर्चा फिरविला. स्टिव्हनसन यास हें माहीत नसल्यामुळें त्याची आपली चुकामूक होईल म्हणून त्याचेकडे आसईवर त्यानेंहि एकदम येऊन मराठ्यांवर हल्ला करावा असा वेलस्लीनें तांतडीचा निरोप रवाना केला.

मराठे लष्कराच्या युक्त्या, आपण हल्ला न करितां इंग्रजांच्या फौजेस चुकविण्याच्याच दिसत होत्या. रघूजी भोंसले व दौलतराव शिंदे हे दोघेहि स्वतः शूर नसून आपण होऊन हल्ला करण्यास जी धडाडी पाहिजे ती त्यांजमध्यें नव्हती. त्यामुळें लष्कराच्या अंगांतहि चढाऊ वृत्ति नसून बचावाचीच वृत्ति होती. उलट इंग्रजी लष्कराच्या अंगीं चढाऊपणाचा उत्साह भरलेला होता. या वृत्तीचाहि बराचसा परिणाम सैन्याच्या मनोवृत्तीवर होतो. **स्टिव्हनसन** व **वेलस्ली** हे एकएकटे असतांना त्यांची एकजूट होण्याच्या पूर्वीच मराठ्यांच्या एकत्रित सैन्यानें अगर दोन टोळ्यांनी क्रमशः अगर एकाच वेळीं त्या दोघांस वेगवेगळे गांठून त्यांचेवर हल्ला केला असता तर जास्त फायद्याचें झालें असतें. परंतु तसें न करितां ते इंग्रजी सैन्यास चुकवीत राहिले.

वेलस्लीनें आपलें बुणगें नळनी येथें ठेविलें व सडें लष्कर घेऊन तो आसईच्या रोखानें निघाला. आसईच्या जवळ येतांच टेकड्यांवरून त्याला मराठी फौज आसईजवळ खेळणा व जुवा या दोन नद्यांच्या दरम्यान तळ दिलेली दिसली. दोन्ही सैन्यांच्या दरम्यान खेळणा नदी होती.

वेलस्लीनें एकट्यानेंच मराठे लष्करावर हल्ला करण्याचा निश्चय केला व मराठे लष्करावर सरळ न जातां जुवा व खेळणा यांच्या संगमाजवळ आपलें लष्कर आणलें. प्रथम मराठे लष्कर आसईगांवास पाठीस घालून इंग्रजांच्या समोर आडवें रांगा लावून उभें असल्यामुळें वेलस्ली संगमावर येतांच त्यांनींहि डावीकडे फिरून आसई गांव डावीकडेस घेतलें व आपलें लष्कर लढाईच्या तयारीनें उभें केलें. ( नकाशा पहा. )

प्रथम मराठ्यांच्या तोफखान्यानें इंग्रज तोफखान्यावर इतका जोराचा मारा केला की, त्यांच्या तोफा अजीबात बंद पडल्या. तोफांचे बैल मरून पडले. मराठ्यांनीं इंग्रजांच्या तोफखान्यावर हल्ला केला व सर्व तोफा मराठ्यांच्या हातीं सांपडतात असा रंग दिसला. वेलस्लीनें तोफखान्यावरच्या

अंमलदारास पुढें हल्ला करण्यास हुकूम पाठविला. परंतु तो बिचारा काय करणार? त्यानें निरोप पाठविला कीं, "तोफा बंद झाल्या. बैल मरून गेले. कशाच्या भरंवशावर पुढें जावें." परंतु वेलस्लीनें पुन्हां हुकूम केला कीं, तोफा मागें टाकून तुम्हीच पुढें हल्ला करा. त्यांनीं पुढें हल्ला करतांच मराठ्यांच्या स्वारांनीं त्यांचेवर हल्ला केला व इंग्रजी सैन्याची बरीच कत्तल झाली; परंतु त्यामुळें मराठ्यांच्या तोफा बंद होऊन स्वार व पायदळ यांची लढाई सुरू झाली. इंग्रजी स्वार व पलटणी यांनीं एकदम मराठे स्वारांवर व पायदळांवर हल्ला करून त्यांची पुढील रांग मागें हटविली, ती पिछाडीच्या रांगेवर पडली व याप्रमाणें मराठी सैन्य हटत हटत जुवा नदी ओलांडून मागें गेलें. एकदां सैन्य मागें हटतांच इंग्रजांनीं जोराचा हल्ला केला व मराठी सैन्य पळत सुटलें.

मराठी कागदांवरून असें दिसतें कीं, मराठ्यांच्या तोफांनीं इंग्रजी लष्कराची दाणादाण झाली हें पाहून दौलतराव शिंद्यानें इंग्रजी लष्करावर आपले स्वारांचा हल्ला केला. त्यामुळें मराठ्यांच्या तोफा बंद पडल्या; कारण तोफा चालू ठेविल्यास आपलेंहि लष्कर मरेल ही भीति होती. शिंद्यानें हल्ला केला त्यावेळीं रघूजी भोंसले लढाईच्या जागेवरून स्वतः निघून गेला होता तो स्वतः हजर नसल्यामुळें त्याच्या लष्कराचा जोर कमी पडला. शिंद्याकडील **सिंगरूचे** तोफखान्यानें कामगिरी चांगली केली. मराठी सैन्याचा मोड झाल्यावरसुद्धां कांहीं लष्कर पुन्हां जळून पाठलाग करणाऱ्या इंग्रजी सैन्यास टोळ्या टोळ्यांनी तोंड देतच होतें व शिस्तीनें निघून जात होतें.

मराठ्यांच्या एका टोळीनें तर इंग्रजी लष्करास कांहीं वेळ पावेतों चांगलेंच फसविलें. विजयानें गाफिल झालेलें इंग्रजी सैन्य कांहीं मराठे लष्कराच्या जवळून गेलें त्यावेळीं मराठे शिपायांनीं जमिनीवर अंगें टाकून मेल्याचें सोंग घेतलें व इंग्रजी लष्कर पुढें निघून जातांच त्यांनीं उठून आपल्या बंदुका इंग्रजांवर चालविल्या. त्या मारानें पुष्कळ इंग्रजी लष्कर घायाळ झालें व त्यांचा अमलदार क० **मॅक्सवेल** ठार झाला. मुख्य लढाईनंतर मुद्धां मराठी लष्कर बराच वेळपर्यंत इंग्रजांशीं लढत होतें. परंतु शेवटीं त्यांचा जोर न चालून लढाई थांबली. इंग्रजांना मराठ्यांच्या ९८ तोफा मिळाल्या

परंतु हा जय इंग्रजांना बराच महाग पडला. इंग्रजांच्या लष्करापैकीं ⅓ सैन्य मारलें गेलें अगर जखमी झालें; परंतु त्यांना जय मिळाल्यामुळें त्यांचें पुढील काम सोपें झालें.

उलट मराठ्यांचाहि नाश बराच झाला व अपजयामुळें त्यांची हिंमत खचली. शिंद्याचा दिवाण **यादव भास्कर** हा या लढाईत पडला. **रघूजी भोंसले** हा तर लढाईच्या सुरवातीसच कांहीं कारण नसतांना पलायन करून निघून गेला व लढाईस तोंड लागल्यानंतर **दौलतराव शिंद्यानेंहि** त्याचाच कित्ता गिरविला. या भ्याडपणामुळें फौजेचा हुरूप आधींच कमती झाला. स्वतः हजर राहून फौजेस व सरदारांस उत्तेजन देण्याचेऐवजीं स्वतःच निघून जाण्यानें फारच उलट परिणाम होतो हें उघड आहे.

**वेलस्ली** यास गव्हर्नर जनरल यानें आपला एजंट म्हणून सर्व अधिकार दिले होते. त्याअन्वयें त्यानें शिंद्याचे लष्करांतील सर्व युरोपियन व विशेषतः इंग्रज अधिकाऱ्यांना उद्देशून एक जाहीरनामा काढला होता कीं, जे कोणी शिंद्याची नोकरी सोडून इंग्रजांकडे येतील त्यांना शिंद्याकडे जो पगार मिळत होता तोच दिला जाईल. या जाहीरनाम्यावरून सर्व इंग्रज अधिकारी व बरेचसे दुसरे युरोपियन अंमलदार शिंद्याचें लष्कर सोडून इंग्रजांकडे गेले. ऐन वेळीं हा विश्वासघात झाल्यामुळें शिंद्याचे लष्करावर योग्य अंमलदार राहिले नाहींत व त्यांची बाजू लंगडी पडली.

तरी सुद्धां शिंद्याचे पलटणींनीं व तोफखान्यानें बरीच कामगिरी केली. **डीबॉइन** यानें शिकविलेल्या पलटणी तर अंमलदार नसतांना[१] अखेरपर्यंत लढल्या. युरोपियन अधिकारी आपल्या लष्करावर नौकर ठेवण्यांत

---

१ **डीबॉइन** हा या वेळीं रजेवर युरोपांत गेला होता व त्याचे जागेवरील **पेरन** हा उत्तर हिंदुस्थानांत होता. तोहि अखेर फितूर होऊन ज. **लेक** याजकडे बोलणें लावून शिंद्याकडून इंग्रजांकडे निघून गेला. उ.हिंदुस्थानांतील शिंद्याचे बरेच अंमलदार फितुरीनें जरी नाहीं तरी क्रमाक्रमानें इंग्रजांस शरण गेले. **बॉर्किन, दुद्रनेक** हे यांपैकीं होत. आग्र्याच्या किल्ल्यांतील मराठा शिबंदीनें तर आपले इंग्रज अधिकारी फितूर होतील म्हणून त्यांस कैद करून ठेविलें होतें.

हाहि धोका होण्याचा किती संभव असतो हें प्रथमतःच यावेळीं हिंदी संस्थानिकांच्या लक्षांत आलें असेल.

मराठी लष्कर **भोकरधन** येथेंच आहे अशा समजुतीनें **स्टिव्हनसन** हा त्या दिशेनें गेला. ता. २३ चे रात्रीं त्याला एका नाल्यावरून पलीकडे जाण्यास फार त्रास झाला. त्याला वेलस्लीचें पत्र ता. २३ रोजीं मिळालें नाहीं. ता. २४चे सकाळीं वरील पत्र पोहोंचल्यावर तो निघाला व ता २४ चे सायंकाळीं **आसई** येथें येऊन पोहोंचला. वेलस्लीनें त्यास मराठे लष्कर उत्तरेकडे अजिंठ्याचा[१] घाट उतरून पळत चाललें होतें त्याचा पाठलाग करण्यास पाठविलें. शिंद्याचें मुख्य सैन्य खानदेशांतून कासारबारीच्या घाटानें पुण्याकडे रोख धरून निघालें. **स्टिव्हनसन** हा (१५–१०–१८०३) थेट उत्तरेकडे जाऊन त्यानें **बऱ्हाणपुर** शहर व **अशीरगड**चा किल्ला ( २१–१०–१८०३ ) हस्तगत करून शिंद्याचें उत्तरेकडील द्वार अडविलें व सर्व खानदेशभर इंग्रजांचा अंमल बसवून निजामाच्या सैन्यांतील अधिकारी प्रांतभर नेमून तेथील वसूल घेणें सुरू केलें. **वेलस्लीनें**हि त्याचप्रमाणें **अहमदनगर** व **औरंगाबादचे** आसपास शिंद्याची सर्व ठाणीं हस्तगत करून तेथें आपला अंमल सुरू केला.

मागें निजामाचा मुलूख मोकळा राहील म्हणून **वेलस्ली** हा **औरंगाबादे**कडे निघाला. तों त्याला बातमी लागली कीं, शिंदे व भोंसले हे **स्टिव्हनसन**वर चाल करून **बऱ्हाणपुर** व **अशीरगड** घेण्याकरितां जात आहेत. म्हणून तो **अजिंठ्या**चा घाट उतरून खालीं आला. हें समजतांच मराठे लष्करानें उत्तरेचा रस्ता सोडून दिला व **रघूजी** भोंसल्यानें दक्षिणेचा रोख धरला. **अनकाई, टणकाई** ( मनमाडजवळ ) च्या खिंडीनें तो निजामाच्या राज्यांत धुमाकूळ घालण्याकरितां गोदावरीचा रोख धरून निघाला व **टोकें** येथें त्यानें कांहीं दिवस तळ दिला. त्यामुळें निजामाच्या राज्याचें रक्षण करण्याकरितां **वेलस्ली** पुनः घाट चढून दक्षिणेस फिरला

---

१ मराठी लष्करानें आश्विन शुद्ध ८ व ९मीस तोंडापुराजवळ घाट उतरून तोंडापुरास मुक्काम केला व तोंडापुरासच दसरा केला.

( मराठी का. प. अप्रकाशित )

**व औरंगाबादे**च्या रोखानें पुढें आला. कॅ. **बेन्स** नांवाचा अधिकारी १४००० बैल धान्यानें भरून इंग्रज लष्कराकडे नेत होता; त्यावर रघूजीनें **आंबड** येथें हल्ला करून त्याचे २०० बैल नेले. परंतु वेलस्ली त्याचे मागोमाग येऊं लागल्यामुळें रघूजी **शेंदुर्जन, राक्षसभुवन, पैठण** व **रामपुरी** या मार्गानें गोदावरीच्या कांठानें वेलस्लीस झुकांड्या देत राहिला व नंतर वऱ्हाडांत शिरून त्यानें उत्तरेचा रोख धरला. त्यापूर्वी **रघूजीनें व्यंकोजीस** पुढें वऱ्हाडांत सैन्य जमा करण्यास पाठविलें होतें. व्यंकोजी व भोंसल्याचे दुसरे सरदार **रामचंद्र वाघ** व **माधवराव नीलकंठ** हे बाळापुरास तळ देऊन सैन्य जमा करीत राहिले. तसेंच **विठ्ठल बल्लाळ** सुभेदार हाहि सैन्य जमा करून **बाळापुरास** पाठवीत होता. **व्यंकोजीनें** दौलतराव शिंद्यास व रघूजीस पत्रें पाठवून **आकोटा**चे जवळपास सर्वांनीं जमावें असा संकेत केला. **नरनाळा** व **गाविलगड** किल्ल्यांच्या अलीकडे इंग्रजांना अडवावें व आपणांसहि किल्ल्यांचा आधार असावा असा व्यंकोजीचा बेत होता.

**स्टिव्हन्सन** यानें बऱ्हाणपुर घेतल्यानंतर त्यानें **मेळघाटां**तून परभारे जाऊन **गाविलगडास** वेढा द्यावा असा **वेलस्लीनें** त्यास हुकूम पाठविला होता. **गाविलगड** हें भोंसल्यांचें मुख्य मजबुतीचें ठिकाण असल्यामुळें गाविलगडास वेढा पडतांच भोंसल्यास तिकडे जावें लागेल या उद्देशानें वेलस्लीनें ही योजना केली होती. **स्टिव्हन्सन** हा **गाविलगडच्या** रोखानें निघाला, हें समजतांच रघूजी त्या बाजूस निघाला व **वेलस्लीहि** पश्चिम वऱ्हाडांतून **लोणार, मेहकर** या मार्गानें बुलढाण्याजवळील **राजूरचा** घाट उतरून उत्तरेकडील बऱ्हाडच्या मैदानावर आला व शिंदे व भोंसल्यांच्या हालचालीवर नजर ठेवून तेथेंच थांबला.

शिंद्यानें पुण्याचा रोख सोडून तोहि मलकापुर मार्गानें पूर्वेकडेस वऱ्हाडांत शिरला. भोंसले व शिंदे यांचें सैन्य एकमेकांच्या जवळ येऊन त्यांचा मिलाफ झाला व ते पुढें **आकोटाकडे** निघाले.

**स्टिव्हन्सन** एकदम **गाविलगडावर** न जातां मराठे लष्कर **आकोट, अडगांव** या भागांत आहे असें समजल्यामुळें तो त्या रोखानें तिकडे आला.

पश्चिमेकडून **वेलस्ली** हाहि मराठे लष्कराच्या रोखानें पूर्वेस येत होता.त्याची व **स्टिव्हनसनची बाळापुरा**जवळ गांठ पडली. **आसईच्या** लढाईनंतर पंधरा दिवसांनीं शिंद्याकडून वेलस्लीकडे तहाचें बोलणें सुरू झालें.बाजीरावाचा हस्तक **बाळोजी कुंजर** हा शिंद्याच्या लष्करांत होता. त्यानें वेलस्लीस पत्र लिहून एक इंग्रज अधिकारी व एक निजामाचा अधिकारी यांनीं शिंद्याचे लष्करांत यावें व तहाची वाटाघाट करावी असें वेलस्लीस सुचविलें.परंतु आपण आपले वकील शिंद्याच्या लष्करांत पाठविले म्हणजे इंग्रज हेच तह करण्यास चाहतात असा समज होईल म्हणून **वेलस्लीनें** तें नाकारलें व तुमचे वकील आमचेकडे बोलण्यास पाठवा म्हणून शिंद्यास उत्तर दिलें. शिवाय वेलस्ली-बरोबर **आप्पा देसाई निपाणकर** हा पेशव्याच्या लष्करांत होता. त्याच्या मार्फतीनेंहि शिंद्यानें बोलणें लावलें व **यशवंतराव घोरपडे** व **नारोपंत** नांवाचे गृहस्थ त्याचेतर्फे वेलस्लीचे लष्करांत आले. तहाची वाटाघाट सुरू आहे तोंपर्यंत वेलस्लीनें मराठ्यांवर चाल करूं नये असें शिंद्याचे वकिलांचें म्हणणें पडलें व त्याप्रमाणें वेलस्लीनें ता. २३ नोव्हेंबर रोजीं कबूल केलें कीं शिंद्यानें आपलें लष्कर एलिचपूरचे पूर्वेस वीस कोसांपलीकडे न्यावें म्हणजे इंग्रज पुढें चाल करणार नाहींत. भोंसल्यांकडून कोणी वकील आला नव्हता म्हणून त्याचेवर मात्र चाल करण्यास इंग्रज मोकळे राहतील असें वेलस्लीनें शिंद्याचे वकीलांस बजावलें.

भोंसल्यांस सोडून आपणच तह करणें शिंद्यास पसंत पडलें नाहीं म्हणून शिंद्यानें आपलें लष्कर भोंसल्यांस सोडून पलीकडे नेलें नाहीं. त्यामुळें हें बोलणें येथेंच थांबलें व वेलस्लीनें मराठ्यांवर चाल केली.

भोंसल्यांचे लष्कराचा तळ **नरनाळ्याच्या** दक्षिणेस (आकोटच्या पश्चिमेस ) **अडगांव** येथें पडला होता. **रघूजी** स्वतः तेथें हजर नसून त्याचा भाऊ **व्यंकोजी** ऊर्फ **मन्याबापू** हा त्यावर मुख्य होता. रघूजी हा पूर्वेकडे अंतरावर जाऊन राहिला. शिंद्याचे स्वारांचा जमाव तेथून दोन कोसांवर **शिरसोली** या गांवावर होता व **दौलतराव** शिंदे स्वतः तेथें हजर होता. **वेलस्ली** व **स्टिव्हनसन** यांचीं लष्करेंहि ता. २८ नोव्हेंबर रोजीं एकमेकांच्या जवळ आलीं व दोघेहि मराठ्यांवर हल्ला करण्याचे तयारीनें चालले.

ता २९ नोव्हेंबर रोजीं **वेलस्ली** व **स्टिव्हन्सन** दोन्ही सैन्यें एकत्र करून मराठे लष्करावर हल्ला करण्यास निघाले तों त्यांस समजलें कीं, मराठे तळ हलवून पलीकडे जातात. म्हणून **अडगांवाचे** जवळपास आपण तळ द्यावा व मराठे पुढें कोणीकडे जातात हें पहावें म्हणून वेलस्लीनें अडगांवचे रोखानें जाऊन तेथें मुक्काम करण्याचें ठरविलें.

**वेलस्ली** व **स्टिव्हनसन** तिसरे प्रहराचे सुमारास **अडगांवचे** दक्षिणेस **पाथरडी** या गांवीं पोहोंचले तों त्यांना दिसून आलें कीं, मराठे लष्कर पुढें निघून गेलें नसून तेथेंच युद्धाचे तयारीनें राहिलें आहे. त्यांची व इंग्रजांची म्हैसुरी तुकडी पुढें टेहळणीस गेली होती त्यांची थोडीशी चकमकहि झाली.

इंग्रजी लष्कर मजलीनें थकून गेलें होतें व ऊनहि कडक होतें म्हणून एकदम हल्ला करावा कीं दुसरे दिवशीं करावा याचा वेलस्लीस मोठा विचार पडला. आज हल्ला केला नाहीं तर रात्रीच मराठी लष्कर कूच करून निघून जाईल हाहि संभव होता. **पाथरडीचे** गढीचे बुरजावर **वेलस्ली** जाऊन त्यानें तेथून दुर्बिणीनें मराठी लष्कराची नीट टेहळणी केली व एकदम हल्ला करण्याचा हुकूम दिला.

इंग्रजी लष्कर आपल्या रांगा जमवूं लागतांच हे एकदम लढाई देणार हे मराठी लष्कराच्या ध्यानांत आलें. तें लढाईच्या तयारीनें अगोदरच उभें राहिलें होतें. त्यांनीं इंग्रजी लष्करावर एकदम तोफा सुरू केल्या. त्यामुळें प्रथम इंग्रजी लष्करांत मोठाच गोंधळ झाला. परंतु लौकरच तेहि शिस्तीनें उभे राहिले व निकरानें लढाई सुरू झाली.

मराठी लष्कर **अडगांवच्या** दक्षिणेस **अडगांव** व **शिरसोली** यांमध्यें असलेल्या मोठ्या मैदानावर उभें होतें. अडगांवचें गांव व मळे यांच्या पाठीस होते. त्यांच्या फौजेची रचना अशी होती कीं मध्यभागीं भोंसल्यांचा तोफखाना व त्याचे पाठीमागें **मन्याबापूचें** व **बेनीसिंग** किल्लेदार याचें पायदळ, त्याचे डावीकडेस **विठ्ठल बल्लाळ** याचे हाताखालीं त्याचे घोडेस्वार, उजवीकडेस **दौलतराव** शिंद्याचे घोडेस्वार व त्याचे उजवीकडेस व पाठीमागें पेंढारी व बाजारबुणगें. शिंद्याचे लष्करांत मुख्यतः घोडे-

स्वारच होते. पायदळ फार थोडें होतें. भोंसल्याचे व इंग्रजांचे लष्करांचे दरम्यान एक नाला होता व मैदान पूर्ण सपाट नसून बारीकसारीक नाल्यांनीं भरलेलें होतें. मराठी लष्कराचा तळ एकंदरींत पांच मैलांवर पसरलेला होता. (नकाशा पहा)

इंग्रजांकडे मध्यभागीं सामन्यास **वेलस्ली** व **स्टिव्हनसन** यांचीं पायदळें व त्यांचेमागें स्वार, उजवीकडेसहि घोडेस्वार, डावीकडेस निजामाचे घोडेस्वार राजा **महिपतराम** याचे हाताखालीं व एलिचपुरच्या **नामदारखां** नबाबाचें लष्कर **सलाबतखां** याचे हाताखालीं, तसेंच म्हैसूरचें लष्कर **बिष्णाप्पा** नांवाचे सरदाराचे हाताखालीं याप्रमाणें होतें. पेशव्याचें लष्करहि **अमृतराव** पेशव्याचे हाताखालीं इंग्रजांबरोबर होतें. परंतु त्याचा तळ जवळच दुसरीकडे होता व त्यानें वेलस्लीकडे निरोप पाठविला कीं, लढाई केव्हां सुरू करणार, त्याचप्रमाणें वेलस्लीनेंहि लढाई सुरू होतांच त्याचेकडे निरोप पाठविला. परंतु तो वेळेवर न पोहोंचल्यामुळें लढाई संपेपर्यंत तो येऊं शकला नाहीं.

**अडगांवची लढाई** २९–११–१८०३:—इंग्रजी लष्कर पुढें येत आहे ही बातमी मराठ्यांना समजली होती असें दिसतें व ते येतांच हल्ला करतील म्हणून मराठी लष्कर लढाईच्याच तयारीनें होतें. इंग्रजी लष्कर मात्र **पाथरडीस** तळ देण्याच्या विचारानें तेथें आलें होतें. परंतु त्यांच्या तलाव्याच्या म्हैसूरच्या तुकडीची मराठ्यांच्या तुकडीशीं चकमक झाल्यामुळें वेलस्लीस त्याच्या मदतीस सैन्य पाठवावें लागलें. तें सैन्य पुढें येतांच त्यांना मराठे लष्कर तयारीनें उभें आहे असें दिसलें. मराठ्यांनीं आपणावर हल्ला करण्यापेक्षां आपणच हल्ला करणें बरें असें वेलस्लीनें ठरविलें. त्यानें मराठ्यांच्या समोर आपलें पायदळ पुढें घातलें तोंच मराठ्यांच्या तोफा सुरू होऊन त्यांचे गोळे पायदळावर येऊं लागले. परंतु एकदां इंग्रजी सैन्य तोफांच्या माऱ्याचे बाहेर शिस्तीनें उभें राहिल्यानंतर तें व्यवस्थेनें हल्ला करीत चाललें. प्रथम मराठ्यांच्या लष्करांतील अरब पायदळानें मोठ्या निकरानें इंग्रजी पायदळावर हल्ला केला व त्यांच्या पांचशें माणसांची कत्तल होईपर्यंत ते निकरानें लढले. शिंद्याचे स्वारांनीं **गोपाळराव भाऊ** याचे हाताखालीं इंग्रजी लष्करावर हल्ला केला पण तो इंग्रजांनीं

मागें हटविला व भाऊ जखमी झाला. भाऊ जखमी होऊन पडतांच शिंद्याचें लष्कर पळत सुटलें व त्यांचेमागें मोंगल व इंग्रजी लष्करानें पाठलाग केला. अरबांचा हल्ला मागें हटतांच इंग्रजी पायदळानें व स्वारांनीं मराठ्यांच्या मध्यभागचे व डावीकडचे भागांवर हल्ला करून त्यांची पिछेहाट केली व त्यांना पळवून त्यांचा पाठलाग केला. [१] इतक्यांत संध्याकाळ झाली परंतु रात्र चांदणी असल्यामुळें त्यांनीं बराच वेळपावेतों पाठलाग करून मराठ्यांची कत्तल केली. भोंसल्यांच्या ३८ तोफा व सर्व दारूगोळा इंग्रजांचे हातीं सांपडला. तसेंच बरेचसे हत्ती व सामानहि सांपडलें. बेनीसिंगाचें लष्कर निकरानें लढलें व बरेंचसें कापलें गेलें.

प्रथम मराठ्यांच्या तोफांनीं इंग्रजी लष्करांत जी धांदल उडाली त्यामुळें त्यांचें सर्व लष्कर पळत सुटलें व जवळजवळ इंग्रजांचा मोड होण्याचीच वेळ आली होती, त्याच धांदलींत मराठ्यांनीं चोहोंकडून एकदम हल्ला केला असता व इंग्रजी सैन्य पुन्हां व्यवस्थेनें उभें राहण्यास अवसर मिळाला नसता तर लढाईचा परिणाम वेगळाच झाला असता. खुद्द वेलस्ली या प्रसंगाबद्दल म्हणतो:--

" मराठ्यांच्या तोफा सुरू होतांच तीन सबंध पलटणी, ज्यांनीं आसईच्या लढाईंत फार उत्तम कामगिरी केली होती त्या धूम पळत सुटल्या, याला तुम्ही काय म्हणाल ? शिवाय आसईच्या लढाईइतकी अडगांवची लढाई प्रखरहि झाली नाहीं. सुदैवानें मी तेथें जवळच होतों म्हणून बरें झालें. मी एकदम त्यांना मागें हटवून जमा केलें व सुव्यवस्थित रीतीनें उभें केलें. नाहींतर ही लढाई गमावलीच होती. या गोंधळामुळें तोफांची जमवाजमव करण्यांत फारच वेळ गेला; म्हणून संध्याकाळीं जास्त वेळ राहिला नाहीं. नाहीं तर आम्हांस आणखीहि कामगिरी करतां आली असती. मी स्वत: सकाळीं सहा वाजल्यापासून रात्रीं बारा वाजेपर्यंत सारखा घोड्याच्या पाठीवर होतों व सर्व सैन्यहि दिवसभर सशस्त्र होतें. " [२]

जनरल वेलस्ली याचेबरोबर या मोहिमेच्या आरंभापासून पुढें प्रसिद्धीस

---

१ Wellesley's despatches & Elphinstone's life.

२ Wellington's despatches II P. 561.

आलेला **माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन** हा फार्शी दुभाष व असिस्टंट म्हणून होता. त्यानें **आसई, अडगांव** वगैरे ठिकाणच्या हल्ल्यांचें वर्णन लिहून ठेविलें आहे[१]. **अडगांवच्या** लढाईच्या दुसरे दिवशीं सकाळीं **एल्फिन्स्टन** हा लढाईच्या जागेवरून हिंडला. त्यानें पाहिलेली हकीकत पुढीलप्रमाणें लिहिलेली आहे. "सकाळीं न्याहारीनंतर मी व इतर मंडळी लढाईच्या जागीं गेलों. भोंसल्यानें टाकून दिलेल्या २९ तोफा आम्ही मोजल्या. त्यांपैकीं तीन लोखंडी होत्या. ७४ व ७८ नंबरच्या पलटणींनें जेथें हल्ला केला तेथें प्रेतांचे ढीग पडले होते. पडलेले सर्व लोक मुसलमान असून त्यांचे पोषाख निळ्या रंगाचे होते. त्यांना लांब दाढ्या असून ते रूपानें देखणे होते. त्यांत पुष्कळ म्हातारेहि होते. त्यांपैकीं तिघे तर रंगानें इतके गोरे होते की अत्यंत उत्तम युरोपियनांच्या रंगाचेच ते होते. फक्त ऊन लागतें तेवढ्या भागावर काळसर छटा होती. यांना फारशी रिसाला असें म्हणत होते. कोणी म्हणतात हे अरब शिपाई होते. हे एकंदर तीनचारशें एकाच जागीं पडले होते. नंतर आम्ही जेथें आमच्या स्वारांनीं हल्ला केला होता त्या जागीं गेलों. तेथें आम्हांस वाटलें होतें तितकीं प्रेतें दिसलीं नाहींत. कांही लोकांना मात्र भयंकर जखमा होत्या व कित्येकांचीं शिरें कापून नेलीं होतीं. आम्ही अडगांवच्या मळ्यापर्यंत गेलों[२]."

अडगांवच्या लढाईनंतर मराठे सैन्याची पांगापांग झाली व वेलस्लीने भोंसल्यांचा मुख्य किल्ला **गाविलगड** हा घेण्याकरितां तिकडे चाल केली. **बेनीसिंग** किल्लेदार व त्याचें राहिलेलें सैन्य किल्ल्यांत जाऊन बसलें होतें. **वेलस्ली** व इंग्रजांचें दुसरें सैन्य एलिचपुरास जाऊन तेथील नबाबाच्या मदतीनें त्यांनीं वेढ्याची सर्व तयारी केली. **स्टिव्हन्सन** हा अशीरगडाहून गाविलगडास वेढा देण्याच्या तयारीनें सर्व सामान घेऊन आला होता. शिवाय **अडगांवच्या** लढाईंत भोंसल्यांच्या सर्व तोफा इंग्रजांच्या हातीं सांपडल्यामुळें त्याहि वेढ्याच्या कामास उपयोगी पडण्यासारख्या होत्या.

---

१. इंग्रज लेखकांचीं वर्णनें एकतर्फी असल्यामुळें जरी त्यांत थोडीबहुत अतिशयोक्ति असली तरी दुसऱ्या बाजूचें वर्णन तपशीलवार आढळत नसल्यामुळें तुलना करण्यास जागा नाहीं.

२. Life of Elphinstone. Vol. I. P. 90.



[पृष्ठ ३३७

गाविलगड किल्ल्याचा बाहेरचा भाग]

**गाविलगड** हा किल्ला फार मजबूत म्हणून त्यावेळीं त्याची प्रसिद्धी होती. मेळघाटाच्या अत्यंत डोंगराळ व बिकट भागांत तो असल्यामुळें **अशीर-गडा**प्रमाणें एकदम किल्ल्याच्याजवळ तोफा, गाड्या वगैरे अवजड सामान नेणें कठीण असे.

**गाविलगड** किल्ला मूळ तेथील गवळी राजांनी बांधला अशी आख्यायिका आहे. त्याचें पूर्वीचें नांव 'गवळीगड' होतें अशीहि दंतकथा आहे. परंतु ऐतिहासिक पुराव्यावरून हल्लीच्या स्थितीत तो प्रथम **बहामनी** घराण्यांतील नववा राजा **अहमदशहा वली** यानें इ. स. १४२५ मध्यें बांधल्याबद्दल फेरिस्त्याच्या ग्रंथांत उल्लेख सांपडतो. त्यानंतर इ. स. १४८८ मध्यें इमादशाही घराण्यांतील मूळ पुरुष **फतेउल्ला** यानें त्याची दुरुस्ती केली. त्यानंतर १५७७ मध्यें निजामशाही कारकीर्दीत **बहिरामखा** नांवाच्या सरदारानें त्याची आणखी दुरुस्ती केली.

आंतील किल्ल्याच्या बाहेर "बाहेरचा किल्ला" म्हणून दुसरा कोट भोंसल्यांनी बांधला असून त्यावर बालबोधी लिपींत कांही मजकूर खोदलेला आहे. परंतु तो अस्पष्ट असल्यामुळें वाचतां येत नाहीं.

नरनाळा, गाविलगड व मेळघाटांतील इतर लहान मोठे किल्ले **बेनीसिंग जमादार** या रजपुताचे ताब्यांत असत व प्रत्येक किल्ल्यावर त्याचेतर्फेचा एक एक किल्लेदार असे. बेनीसिंगाचा मूळ पुरुष **झामसिंग** यास पहिल्या रघूजीनें बंगाल्यांतून **बक्षीराम** या सरदाराबरोबर पाडाव करून आणिलें. परंतु तो शूर व इमानी आहे असें पाहून रघूजीनें त्यास वाढवीत वाढवीत त्याचे ताब्यांत मेळघाटांतील सर्व किल्ले व सातपुड्याच्या उत्तरेकडील **सावळीगड, भवरगड, भैरवगड** वगैरे लहान किल्ले दिले. **झामसिंग** मेल्यावर त्यास पुत्र नसल्यामुळें त्याचा पुतण्या **प्रमोदसिंग** यास त्याचें काम दिलें. **प्रमोदसिंग** हा अल्पवयी असल्यामुळें त्यास शिकवून तयार करण्यास व त्याचे वतनाचें रक्षण करण्यास राजानें त्याचा आप्त **दर्यावसिंग** रजपूत व **रामाजी केशव** नांवाचा ब्राम्हण असे नेमले व त्यांचे जवळून **प्रमोदसिंगाशीं** प्रामाणिकपणें वागूं अशा शपथा घेवविल्या. **प्रमोद-**

**सिंग** मोटा झाल्यावर त्याजवर भोंसल्यांची गैरमर्जी होऊन **दर्यावसिंगास** किल्लेदारी मिळाली परंतु पुढें राजानें प्रमोदसिंगास कामावर घेतलें. **प्रमोद-सिंगा**नंतर तें काम **बेनीसिंगास** दिलें. बेनीसिंग हा फार शूर व कर्तबगार निघाला. तोच यावेळी या किल्ल्याचा मुख्य अधिकारी होता व तो गाविल-गड किल्ल्यांतच सहकुटुंब रहात असे. याच किल्ल्यांत दुसरेहि रजपूत अधि-कारी बेनीसिगाचे आधारानें रहात असत. त्यांतच हल्लीच्या कळमगव्हाणचे जहागिरदाराचे पूर्वज असत. हल्लीं बेनीसिंगाचे वंशज **भैसदेही** (बैतूल) येथें राहतात.[१]

**गाविलगडची लढाई** ता. १३–१४–१५ डिसेंबर १८०३:—वेलस्ली हा ता. ५ डिसेंबर १८०३ रोजीं एलिचपुरास आला व लागलीच निघून ता. ७ रोजी गाविलगड किल्ल्याचे पायथ्याशी दक्षिणेस **देवगांव** नांवाचें लहानसें खेडें आहे तेथें आला व तेथेंच त्यानें आपल्या सैन्याचा तळ दिला. देवगांवचे बाजूनें किल्ला फार उंच असल्यामुळें किल्ल्यावर चांगला मारा होणार नाहीं म्हणून उत्तरेकडील बाजूनें मारा करण्याकरितां त्यानें **स्टिव्हन-सन** यास दुसरे रस्त्यानें पाठविलें. तिकडील रस्ता दाखविण्यास एलिच-पुरच्या नवाबाच्या पदरचे लोक स्टिव्हनसनच्या बरोबर होते. स्टिव्हन-सनच्या मर्जीप्रमाणें माऱ्याची जागा सांपडतांच तेथें स्टिव्हनसननें तोफांचे मोर्चे बांधले. स्टिव्हनसन यास तीस मैलांचें चक्कर घेऊन या जागीं यावें लागलें. वर चढण्यास रस्ता नसल्यामुळें नवीन रस्ते तयार करून हातानें सामान व तोफा ओढीत वर न्याव्या लागल्या. तीस मैल जाण्यास त्यास पांच दिवस लागले. परंतु एवढ्या कष्टाचें फळ **स्टिव्हनसन** यास मिळालें. कारण याच जागेवरून मारा यशस्वी झाला. दुसरीकडील मारा फुकट गेला. स्टिव्हनसन यानें ता. १२–१२–१८०३ रोजी उत्तरेकडील बाजूच्या **लबाडा**[२] या खेड्याजवळ आपला तळ दिला.

ता. १२ रोजीं रात्री **स्टिव्हनसन**नें उत्तरेकडील दरवाजावर मारा कर-ण्याकरितां मोर्चे बांधून तयार केले व दुसरे दिवशीं वेलस्लीनेंहि दक्षिणेकडून

१. नाग. भोंसले. कागदपत्र. ले. ६३–६५

२. हल्लीं ओसाड.

**पीरफते** या दरवाजावर तोफा चालवून हल्ला करण्याचा उभयतांचा संकेत ठरला.

ता. १३ चे सकाळपासून दोन्हीकडून किल्ल्यावर तोफांचा मारा सुरू झाला. वेलस्लीकडील हल्ल्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. कारण तोफा टेकडीवर चढवितां येईनात. त्यामुळें किल्ल्यावर मारा लागू होईना. पितळी लहान तोफा टेकडीवर चढविल्या. परंतु त्या लहान असल्यामुळें त्यांचा जोर चालेना व दरवाजा व तटबंदी पडेना. परंतु या माऱ्यामुळें किल्ल्यावरील लोकांचें लक्ष उत्तरेकडून दक्षिणेकडे लागलें व **स्टिव्हनसन** यास बरीच मदत झाली. **स्टिव्हनसन**चे माऱ्याचे जागेवरून मात्र चांगला उपयोग झाला; कारण ती जागाच मारा करण्यास सोईस्कर अशी होती. असें म्हणतात कीं, एलिचपूरच्या नबाबाच्या पदरच्या एका गोंडानें वेलस्लीस सांगितलें होतें कीं, तुम्हीं कांहीं केलें तरी किल्ल्यावर मारा लागू होणार नाहीं व तुम्हांस माऱ्याची जागा कधींच सांपडणार नाहीं. वेलस्लीनें त्याच्या पोटांत शिरून उत्तरेकडील माऱ्याची जागा समजून घेतली व तिकडे जरी रस्ता मुळींच नव्हता तरी त्या गोंडास बरोबर देऊन **स्टिव्हनसन** यास त्याच कारणानें तीस मैलांचें चक्कर घेऊन पाठविलें व त्यामुळेंच किल्ला हातीं आला.

ता. १४ चे सायंकाळपर्यंत उत्तरेकडील दरवाजाकडून बराच मारा होऊन किल्ल्यास भगदाडें पडलीं व त्यांतून हल्ला करण्याची तयारी रात्रभर **स्टिव्हनसन** यानें करून ठेवली.

**केनी** नांवाच्या इंग्रज सरदाराच्या हाताखालीं मद्रासचें हिंदी पायदळ व **स्टिव्हनसनचें** हिंदी लष्कर व कांहीं इंग्रजी पलटणी देऊन ता. १५ रोजीं दिवसा १० वाजतां हल्ल्यास उत्तरेकडून सुरवात झाली. इंग्रजांकडील लष्करानें पडलेल्या तटबंदींतून आंत घुसून आंतील लष्कराशीं लढाई सुरू केली.

इकडे दक्षिणेकडे वेलस्लीनें आपल्या सैन्याच्या दोन तुकड्या केल्या. आपण स्वतः दक्षिण दरवाजावर राहिला. व क० **चामर्स** यास त्यानें वायव्येकडील दरवाजावर पाठविलें. या दोन्ही तुकड्यांची कांहींच डाळ शिजेना. किल्ल्यास अगर दरवाजास भोंक पडेना व हल्ला करण्यास प्रसंग

येईना. त्यांनीं एकसारखा तोफांचा मारा चालविला पण व्यर्थ. परंतु त्यामुळे आंतील लष्कर इकडे गुंतून उत्तरेकडील दरवाजाकडील जोर कमी होऊन केनीच्या हल्ल्यास मदत झाली.

**केनीच्या** हल्ल्यानें किल्ल्यावरील लष्कर हटून वायव्येकडील दरवाजानें बाहेर पडण्यास पहात होतें. त्यांना दुसरा मार्ग न राहिल्यामुळें तें वायव्येकडील दरवाजा उघडून बाहेर पडले. दरवाजा आयताच उघडल्यामुळे **चामर्स** यास आयतेंच आंत घुसण्यास सांपडलें. **केनीला** पहिल्या हल्ल्यांत यश मिळालें. परंतु किल्ल्यावरचे रजपूत व मराठे निकरानें लढले व कदाचित् आणखी नेट धरते तर केनीच्या लष्करास पंचाईत पडली असती. म्हणून केनी यानें प्रथम वायव्येकडील दरवाजा उघडून **चामर्स** यास आंत घेण्याकरितां एक टोळी पाठविली. हेतु हा कीं दरवाजा उघडून आपलें लष्कर आंत घ्यावें म्हणजे आयतीच कुमक मिळेल. तीहि टोळी याच वेळीं वायव्य दरवाजाजवळ येऊन पोहोंचली. **चामर्स** यानें पळणाऱ्या लोकांची कत्तल करून आंतील लष्करास आयते वेळीं मदत पोहोंचविली.

पण एवढ्यानें अर्धेंच कार्य झालें. **गाविलगड** किल्ल्यास दोन तटबंद्या असून एक आंतील किल्ला व एक बाहेरचा किल्ला असा दुहेरी बंदोबस्त होता. बाहेरचा किल्ला ताब्यांत आला. पण आंतील किल्ल्यास तोफा आणून भोंक पाडणें अगर दरवाजे फोडणेंहि शक्य नव्हतें. दिल्ली दरवाजा हा फारच मजबूत केलेला व त्यावर बंदोबस्तहि खूप होता. किल्लेदार व स्वत: **बेनीसिंग** मुख्य रक्षक तेथें जातीनें खपत होता.

किल्ल्यावर चढून जाण्याशिवाय दुसरा इलाज दिसेना. शेवटीं शिड्या लावून इंग्रजी लष्कर वर चढलें व हल्ला करून आंत घुसून दरवाजा उघडला. दिल्ली दरवाजा उघडतांनासुद्धां भयंकर लढाई झाली. बाहेरील किल्ल्याच्या रक्षणांत किल्ल्यांतील बरेचसे लोक मेले व पुष्कळ पळून गेले. शूर किल्लेदार व इमानी **बेनीसिंग** मात्र अखेरपर्यंत आपल्या थोड्याशा लोकांसह मरेपर्यंत लढले. दरवाजा उघडला तेव्हां दरवाजांत प्रेतांचा खच पडला होता. खुद्द **बेनीसिंगाचें** व किल्लदाराचें प्रेत दरवाजांतच सांपडलें.

बाहेरील किल्ला पडतांच आंतील किल्ल्याच्या उरलेल्या शिबंदीस पुढील

भविष्य कळून चुकलें. दोन्ही बाजूंनीं आंत घुसलेल्या प्रचंड सैन्यापुढें आंतील थोडेंसें लष्कर काय करणार? हा परिणाम जाणून रजपूत स्त्रियांनीं जोहार केला व **बेनीसिंग** व इतर रजपूत दिल्लीदरवाजावर आपला देह ठेवण्याकरितां निश्चयानें पुढें आले. पुरुषांचे मनोरथ पूर्ण झाले. परंतु गडबडींत व्यवस्थित रीतीनें जोहार न झाल्यामुळें बायकांपैकीं दोघी जणी मेल्या परंतु बाकीच्या जिवंत राहिल्या.

खुद्द कर्नल **केनी** या लढाईत पडला. त्यास एलिचपुर येथें पुरण्यांत आलें. हल्लींच्या म्युनिसिपल ऑफिसाचे मागें त्याची कबर आहे.

गाविलगडच्या किल्ल्यांत वरीच लूट सांपडली. या किल्ल्यांत भोंसल्यांचा बराचसा खजिना रहात असे. यांतच एक बहुमोल कुराणाची प्रत होती. ती एलिचपुरच्या नबाबानें नेली व त्याचे संग्रहीं ती बरेच दिवस होती.

**केनी**बरोबर ता. १५ च्या हल्ल्यांत **एल्फिन्स्टन** हा स्वतः गेला होता. त्यानें या हल्ल्याची हकीकत पुढीलप्रमाणें लिहून ठेविली आहे. "हल्ल्याचें काम क० **केनी** याजकडे दिलें आहे हें समजतांच मी केनीकडे गेलों व त्यास आपलेबरोबर येऊं देण्याबद्दल मी परवानगी मागितली. त्यानें रुकार देतांच मी जाण्यास तयार झालों आम्हीं आमच्या तरवारी उपसल्या, कंबरपट्ट्यांस पिस्तुलें लटकावलीं व कंबरांस रुमाल गुंडाळले व पडलेल्या भगदाडाकडे निघालों. आमचे मागें आघाडीस स्वतः **केनी** व इतर ऑफिसर्स असून पलटणीतील शिपाई होते. तटाचें संरक्षण करणाऱ्या किल्ल्यांतील शिबंदीकडून नेटानें प्रतिकार होईल हें आम्ही जाणून होतों. तटाजवळ येतांच तटावरून भगदाडाकडे पळत येतांना आंतील लोक आम्हांस दिसले. **केनी** म्हणाला 'ते पहा भगदाडाचें संरक्षण करण्यास किल्ल्यांतील लोक येत आहेत.' मी म्हटलें 'ते पळून तर जात नाहींत ना?' केनी म्हणाला, 'छे, छे, ते इतक्यांतच पळून जाणार नाहींत!' आम्ही तसेच पुढें चाललों. आम्हांस आश्चर्य वाटलें कीं, आंतील लोक आम्हांवर गोळ्या कां झाडीत नाहींत. आमच्या तोफांचे गोळे मात्र आमच्या मागून व आमच्या डोक्यांवरून किल्ल्यांत जाऊन पडत. आम्ही भगदाडाजवळ गेलों, थोडा वेळ तेथें थांबलों व एका सार्जंटाची तुकडी पाठवून मागाहून आम्हीं सर्व भग-

दाडावर चढून मोठी गर्जना करून आंत उड्या टाकल्या. आंत आम्हांस अडविण्यास लोक आले होते. त्यांवर आम्ही संगीनींचा मारा करतांच ते पळाले व वायव्येकडील दरवाजानें बाहेर पळून जाण्याकरितां तिकडें धावले व तो दरवाजा उघडून बाहेर पडले. तोंच त्या दरवाजावर हल्ला करण्याकरितां वेलस्लीनें क० **चार्नर्स** यास पाठविलें होतें. तो किल्ल्याच्या बाहेरच उभा होता. त्यानें त्यांची कत्तल चालविली. इकडे मागाहून आमचे बरोबरच्या लष्करानेंहि त्यांचा पाठलाग केला होता. त्यांनीं किल्ल्यावरून त्यांचेवर बंदुकांचा मारा केला. याप्रमाणें या लोकांचा पूर्ण नाश झाला.

"नंतर आम्ही किल्ल्याकडे परत वळलों, तों आम्हांस आढळून आलें कीं, आम्ही मुख्य किल्ल्यापासून दूर अशा एका स्वतंत्र टेकडीवरच अद्याप आहों व मुख्य किल्ला पलीकडच्या दुसऱ्या टेकडीवर असून दोन्ही टेकड्यांच्या दरम्यान एक मोठा खोरा आहे व त्याचे पलीकडे दुसरी एक दुहेरी तटबंदी असून तेथेंहि मजबूत दरवाजे आहेत. आम्ही अगदीं आश्चर्यचकित व निराश झालों व आम्हांस असें वाटलें कीं, किल्ल्याबाहेरच्या तोफा आंत आणून त्या या टेकडीवरून किल्ल्यावर लावून आंतील भिंत पाडीपर्यंत आपणांस येथेंच दबा धरून रहावें लागणार. क० **केनी** हा आम्हांस कोठें दिसेना. शेवटीं कांहीं वेळानें **केनी** हा खोरा चढून एकटाच आंतील तटबंदीच्या दरवाजाजवळ उभा असलेला आम्हांस दिसला.

"आम्ही व सर्व युरोपियन शिपाई एकदम दरी ओलांडून **केनी**कडे गेलों. आंतील तटाबाहेर टेंकडीचा कडा तुटलेला असल्यामुळें एक एक मनुष्य वर चढून जाऊं लागलों, आंतील तटावरून आमचेवर बंदुकींचा मारा सुरू झाला. परंतु बाहेरच्या तटबंदीच्या भगदाडांतून हळूहळू सर्व लष्कर आंत येऊन आंतील टेकडी आमच्या लष्करानें भरून गेली व त्यांनींहि किल्ल्यांतील लोकांवर बंदुकांचा मारा सुरू केला व सर्व टेकडीभर बंदुकांच्या गोळ्यांचा निनाद दुमदुमत राहिला. हा देखावा अवर्णनीय होता. शेवटीं आमचें लष्कर तट चढून आंत शिरलें व त्यांनीं पहिला दरवाजा उघडला. लागलीच शिड्या आणवून त्या आंतील दुसऱ्या भिंतीस लावल्या व आमच्या लष्करानें आंत उड्या टाकल्या. मराठ्यांचें लष्कर पळून गेलें व किल्ला आमच्या स्वाधीन झाला.

" जनरल वेलस्ली हा किल्ला पडल्यावर किल्ल्यांत आला व त्यानें प्रथम किल्लेदाराबद्दल तपास केला व तो पहिल्यानें त्याचे घरीं गेला. घरीं त्याचा नऊ दहा वर्षांचा एक उमदा मुलगा होता. त्याला बापाबद्दल कांहींच माहीत नव्हतें. तो म्हणाला 'किल्लेदार घरीं नसून दोन तासां-पासून बाहेर गेला आहे.' त्याला बिचाऱ्याला कांहींच माहीत नव्हतें. नंतर तपास केल्यावर किल्लेदाराचें व बेनीसिंगाचें प्रेत आंतील दरवाजाजवळील प्रेतांचे ढिगांत सांपडलें. ते दोघेहि प्रामाणिकपणें व निकरानें लढले. मरणा-पूर्वीं त्यांनीं रजपुतांच्या रीतीप्रमाणें आपल्या स्त्रियांचा जोहार करविला. चौदा बायकांपैकीं तिघी मरण पावल्या होत्या व दोघीतिघींस जबर वार लागले होते. शस्त्रांचा घात करणाऱ्या इसमाचे हात हें कृत्य करण्यास वाहवले नसावे. **वेलस्ली** स्वतः त्या बायकांकडे गेला व त्यानें त्यांची चांगली बरदास्त ठेवविली. **बेनीसिंग** व किल्लेदार फार जहांमर्दीनें लढले परंतु त्यांच्या लढण्यांत किल्ल्याचे रक्षणाचा सुव्यवस्थितपणा दिसून आला नाहीं. स्वतःच्या शूरपणानें इतरांना उत्तेजन देण्याचें कार्यहि त्यांचेकडून झालें नाहीं. **बेनीसिंगानें** पडतां पडतां दोघातिघा इंग्रज शिपायांना ठार मारलें."

गाविलगडचा वेढा उठविण्याकरितां बाहेरून भोंसल्यानें कांहीं मदत केली नाहीं. आंतील शिबंदी वाढवून अगर अन्नाचा पुरवठा करून वेढा जास्त दिवस टिकविण्याचीहि खटपट झालेली दिसत नाहीं.

**अडगांव**ची लढाई झाल्यानंतर **वेलस्ली**कडे रघूजी भोंसल्याकडून तहाचें बोलणें लावण्याकरितां त्याचा वकील **यशवंतराव रामचंद्र** हा आला होता व गाविलगडची लढाई चालू असतांना तो त्याचे छावणींतच होता. **गाविलगड** किल्ला पडल्यावर त्यानें तहाची वाटाघाट निकरानें चाल-विली. वेलस्लीनें त्यामुळें **देवगांवासच** मुक्काम केला. **यशवंतरावाचें** म्हणणें कीं ही लढाई करण्यांत आमच्या मालकाची मुळींच चूक नाहीं. रघूजी हा इंग्रजांशीं लढण्याकरितां खानदेशांत आला नसून शिंदे, होळकरांचे भांड-णांत शिंद्यास मदत करण्याकरितां आला होता. शिवाय मराठी राज्याच्या वहिवाटीप्रमाणें पेशव्यानें इंग्रजांशीं असा महत्त्वाचा तह केला तो शिंदे,

होळकर व भोंसले यांच्या संमतीशिवाय करावयाचा नव्हता व इंग्रजांनीं असा तह त्या सरदारांच्या संमतीशिवाय करणें गैर होतें. वेलस्लीचें म्हणणें पडलें कीं पेशव्यानें तह करण्यापूर्वी सरदारांची संमति घेण्याचें कांहींच कारण नव्हतें व त्यांत इंग्रजांची कांहींच चूक झाली नाहीं. इंग्रजांचा दोस्त निजाम याच्या सरहद्दीजवळ सैन्य जमा करण्यांत व तेथून दूर निघून जा असें सांगितलें असतांना न जाण्यांत शिंदे व भोंसले यांनींच आगळीक केली.

**देवगांवचा तह १७–१२–१८०३** :––यानंतर तहाच्या शर्तींची वाटाघाट सुरू झाली व शेवटीं खाली लिहिल्याप्रमाणें तह ठरला:––

१ **कटक** व **बलसोर** हे प्रांत व **वर्धा** नदीच्या पश्चिमेकडील वऱ्हाडचा सर्व भाग भोंसल्यानें इंग्रजांस व त्यांचे साथीदारांस द्यावा. फक्त **गाविलगड** व **नरनाळा** हे किल्ले व त्यांखालचा चार लक्षांचा मुलूख ( आकोट, अडगांव, बडनेर, भातकुली व खटकाळी हे परगणे) मात्र भोंसल्यांकडे रहावे.

२ निजाम, पेशवे व भोंसले यांजमधील तंटे इंग्रजांच्या मध्यस्थीनें तोडावे.

३ कंपनी सरकाराशिवाय इतर युरोपियन व अमेरिकन लोकांशीं भोंसल्यानें कोणताच संबंध ठेवूं नये. इंग्रजांनीं भोंसल्याचे बिरादर व शत्रु यांशीं संबंध ठेवूं नये.

४ भोंसल्यानें मराठी राष्ट्र—संघापैकीं इतरांशीं कांहीं संबंध ठेवूं नये.

५ एकमेकांचे वकील एकमेकांच्या दरबारीं रहावे.

६ ओरिसा व छत्तीसगडचे दरम्यान भोंसल्यांचे मांडलिक संस्थानिकांशी इंग्रजांनीं अलीकडे तहनामे केले आहेत ते भोंसल्यानें मंजूर करावेत. ज्या संस्थानिकांशीं असे तहनामे केले आहेत त्यांच्या याद्या गव्हर्नर जनरलकडून भोंसल्यांस दिल्या जातील. [१]

---

१ या कलमास भोंसल्यानें पराकाष्टेचे आढेवेढे घेतले व शेवटीं बरेच दिवस या प्रकरणांत नागपुरास पत्रव्यवहार चालून तुम्हीं या याद्या मंजूर न केल्यास पुन: लढाई करूं अशी इंग्रजांनीं रेसिडेंटामार्फत भोंसल्यांस धमकी दिली; तेव्हां त्यानें ह्या याद्यांवर सही केली. ( Nagpur Residency Records )

वरील तहाप्रमाणें वेलस्लीनें **एल्फिन्स्टन** यासच नागपुरास रेसिडेंट म्हणून नेमण्याबद्दल शिफारस केली व गव्हर्नर जनरल यानें त्याची नेमणूक केली. हा नागपुरचा पहिला रेसिडेंट होय.

यशवंतराव रामचंद्र यानें भोंसल्यातर्फे या तहावर सही केली व इंग्रजातर्फे जनरल वेलस्ली यानें सही केली. यशवंतराव रामचंद्र यास हा तह घडवून आणल्याबद्दल तहाह्यात १५००० रु. दरसाल इंग्रजांकडून पेनशन मिळत होतें.[1] या तहाची वाटाघाट चालू असतां रघूजी हा उमरावती जिल्ह्यांतील कुऱ्हें येथें मुक्काम करून होता. तेथें जाऊन यशवंतरावानें त्याची देवगांवच्या तहास मान्यता घेतली.

देवगांवच्या तहाबद्दल जनरल वेलस्लीनें गव्हर्नर जनरल यास जें पत्र पाठविलें तें पुढें पुरवणींत दिलें आहे.

१८०३ चें दुसरें मराठा युद्ध चालू असतां बंगालच्या इंग्रजी सैन्यानें क० हारकोर्ट याच्या हाताखालीं भोंसल्याच्या कटक प्रांतावर स्वारी केली व तो प्रांत जिंकून घेतला. तेथें भोंसल्यांचा बंदोबस्त विशेष नव्हताच.

या मोहिमेंत भोंसल्यांचें फार नुकसान झालें. त्याचा सर्व खजिना रिकामा झाला. कटकप्रांत गेल्यामुळें त्याचें पूर्वेकडील वर्चस्व नाहीसें झालें. तसेंच तिकडचे सर्व मांडलीक इंग्रजांचे अंकित होऊन त्यांची खंडणीहि बंद झाली. वर्धेच्या पश्चिमेकडील वऱ्हाडचा श्रीमंत भाग गमावल्यामुळेंहि उत्पन्न बरेंच कमी झालें. त्याचें पूर्वीचें उत्पन्न एका कोटीच्यावर होतें. तें साठ लक्षांवर आलें व त्याची लष्करी सत्ता दुय्यम दर्जाची झाली.

कटकप्रांत मिळविण्याची इंग्रजांची फार दिवसांची इच्छा तृप्त होऊन बंगाल्यापासून तों मद्रासेपर्यंत सर्व किनारा इंग्रजांच्या ताब्यांत आला. मराठेशाहीतील एक मोठा घटक कायमचा जायबंदी होऊन बंगाल ते मुंबई-

---

१ अशी बक्षिसी देण्याची रीत हिंदुस्थानांत होती परंतु ती वकीलाच्या प्रामाणिकपणास बाधणारी होती. हाच अनुभव या सबंधांतहि आला. यशवंतराव हा यापुढें इंग्रजांचाच पक्षपाती राहिला.

पर्यंत इंग्रजांचें वर्चस्व प्रस्थापित झालें. पूर्व व दक्षिण हिंदुस्थानांत त्यांना कोणीच प्रतिस्पर्धी राहिला नाहीं. उत्तरेसहि शिंदे व होळकर यांच्या मोडक्या सत्तेशिवाय त्यांना भिण्याचें कारण राहिलें नाहीं. सबसीडियरी व इतर तहांनीं जवळजवळ सर्व हिंदुस्थानचें सैन्य त्यांच्या एकछत्री अमलाखालीं आलें व कोणताहि एक अथवा अनेक शत्रू त्यांच्याशीं तोंड देण्यास समर्थ राहिला नाहीं. शिंद्यांचीहि सत्ता पुढील सुर्जी अंजनगांवच्या तहानें व होळकराची पुढील युद्धांत पूर्णपणें ढांसळली.

**सुर्जी अंजनगांवचा तह** (ता. ३०–१२–१८०३)–भोंसल्याची अवस्था पाहून शिंद्यानेंहि इंग्रजांशीं तह करण्याचा निश्चय केला परंतु मुलूख सोडून देण्याबद्दलची शर्त तो लौकर कबूल करीना. उत्तर हिंदुस्थानांत त्याचेविरुद्ध इंग्रजांची मोहीम सुरू झाली होती व बराच प्रांत इंग्रजांनीं काबीज केला होता. तसाच अहमदनगर व जालन्यापासून बऱ्हाणपूरपर्यंत सर्व मुलूख इंग्रजांच्या ताब्यांत गेला होता. शेवटीं दुसरा इलाज नाहीं असें पाहून एलिचपुरच्या दक्षिणेस सुर्जी अंजनगांव या गांवीं वेलस्लीचा व शिंद्याचा खालीलप्रमाणें तह ठरला (ता. ३०–१२–१८०३).

१ गंगा व यमुना यांचेमधील शिंद्याचा मुलूख, जयपुर, जोधपुर व गोहद या संस्थानांच्या उत्तरेकडील सर्व मुलूख (जयपुर व जोधपुर यांचे दरम्यानचा मुलूख सोडून ) अहमदनगर व भडोच हे किल्ले, त्यांचे खालचा प्रांत व अजिंठ्याचा घाट व गोदावरी यांचे दरम्यानचा मुलूख शिंद्यानें इंग्रज व त्यांचे साथीदार यांस द्यावा.

२ मोंगल बादशहा, इंग्रज, निजाम, पेशवे व गायकवाड यांचेविरुद्ध असलेले आपले सर्व हक्क सोडून द्यावे.

३ या मोहिमेंत जे राजे व जहागिरदार इंग्रजांशीं तह करून त्यांचे दोस्त झाले असतील त्यांजवर आपला कांहीं हक्क सांगूं नये.

४ दुसरे युरोपियन व अमेरिकन लोकांशीं संबंध ठेवूं नये. एकमेकांचे वकील एकमेकांचे दरबारीं रहावे.

५ इंग्रजांनीं वरील युद्धांत शिंद्याचे जिंकलेले किल्ले–अशीरगड व पावनगड, दोहद– यांचेखालील प्रांतासह व बऱ्हाणपुर शहर शिंद्यास परत द्यावें.

६ बादशहापासून शिंद्यास इनाम मिळालेला कांहीं मुलूख व त्याच्या घरच्या जहागिरी, वतनें वगैरे इंग्रजांनीं घेतलीं तीं परत द्यावीं. शिंद्याचे पदरच्या कांहीं लोकांस इंग्रजांनी १५ लाखांच्या जहागिरी दिल्या. यांत शिंद्यानें लष्कर ठेवूं नये.

७ वरील इंग्रजांस दिलेल्या प्रांतांच्या उत्पन्नांतून शिंद्यास वाटल्यास त्यानें इंग्रजांचें सबसीडियरी सैन्य ठेवून घ्यावें.

या शेवटच्या कलमाप्रमाणें शिंद्यानें बऱ्हाणपुर मुक्कामी ता. २७-२-१८०४ रोजीं इंग्रजांतर्फे मेजर **मालकम** यांशीं नवीन तह करून इंग्रजांचें ६००० पायदळ व त्यांचेबरोबर कांहीं तोफखाना इतकें लष्कर सबसीडियरी सैन्य म्हणून ठेवून घेतलें व एकमेकांच्या बचावास दुसऱ्यानें जावें असा संरक्षक तह केला. इंग्रजी लष्कर शिंद्याच्या मुलखाचे हद्दींत मात्र न राहतां इंग्रजी हद्दींत रहावें असें ठरलें.

मेजर **मालकम** यासच शिंद्याच्या दरबारीं पहिला इंग्रज रेसिडेंट म्हणून नेमण्यांत आलें. **एल्फिन्स्टन** व **मालकम** यांच्या कर्तबगारीचा १८०३ चे युद्धांत उदय झाला व तो १८१८ चे मराठा युद्धांत पूर्ण विकास पावला.

या युद्धांत इंग्रज, निजाम व पेशवे हे साथीदार होते म्हणून भोंसले व शिंदे यांपासून या नवीन जिकलेल्या प्रांतांची वांटणी वेलस्लीनें केली. त्यांत वऱ्हाडचा वर्धेच्या पश्चिमेकडील मिळालेला प्रांत व शिंद्याचा त्यालगतचा प्रांत निजामास दिला. अहमदनगर व त्याचे खालचा मुलूख पेशव्यास दिला व बाकीचा इंग्रजांनीं घेतला.

याच युद्धांत जनरल **लेक** यानें उत्तर हिन्दुस्थानांतील जयपुर, जोधपुर, गोहद, बुंदी, भरतपुर वगैरे बऱ्याच संस्थानांशीं वरच्या नमुन्याप्रमाणेंच तह करून सर्वांना आपल्या अंकित करून ठेविलें. भोंसले व होळकरांखेरीज सर्व हिन्दुस्थानांतील संस्थानिकांच्या राज्यांत इंग्रजी लष्कर ठेवलें गेल्यामुळें इंग्रजांच्या लष्कराचें जाळें हिन्दुस्थानभर पसरलें व कोणीहि त्यांच्याशीं लष्करी स्पर्धा करूं शकेल असा उरला नाहीं. इंग्रजी साम्राज्य याच वेळीं हिन्दुस्थानांत कायमचें स्थापलें गेलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## भाग ११ वा.

# ओरिसांतील मराठी कारकीर्द*

मराठ्यांच्या स्वाऱ्यांची व ओरिसा प्रांत मराठ्यांच्या ताब्यांत आल्याची हकीकत पूर्वीं आलीच आहे. बंगाल व ओरीसा या प्रांतांची सरहद्द सुवर्णरेखा ही नदी ठरविली गेली. रघूजीनें मीरहबीब यासच ओरिसाचा पहिला सुभेदार म्हणून नेमिलें व त्यास सर्व अधिकार दिला. त्याच्या हाताखालीं कांहीं मराठे सरदार व लष्कर ठेविलें होतें. मीरहबीब यानें प्रांताचा बंदोबस्त चांगला ठेविला होता. त्याचप्रमाणें अलिवर्दीखानाकडून बंगालची चौथाई बारा लाख रुपये तो दरसाल वसूल करीत असे. परंतु कांहीं दिवसांनीं रघूजीनें आपला मुलगा **जानोजी** यास ओरिसाचा कारभार पाहण्यास पाठविलें. मीरहबीब याच्या हाताखालचे लोक त्याचा मत्सर करीत होते व त्यांनीं जानोजीचें मन मीरहबीबाविरुद्ध भरविलें. जानोजीनें कांहीतरी निमित्त काढून त्यास प्रांताच्या वसुलीचा हिशेब मागितला व तो बरोबर नाहीं असें कारण दाखवून त्यास एकदम कैद केलें. त्यानंतर मीरहबीब यानें कैदेंतून सुटण्याचा प्रयत्न केला व तो पळून जात असतां पहारेकऱ्यांची व त्याची झटापट होऊन त्यांत तो पडला. दुसरें वर्णन असें सांपडतें की, अलिवर्दीनें मीरहबीबाच्या नांवाचीं बनावट पत्रें करून तीं जानोजीच्या हातांत पडतील अशी व्यवस्था केली. त्यामुळें **जानोजीचें** मन **हबीबा**-विरुद्ध बदलून त्यानें अविचारानें त्यास ठार मारण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें जानोजीच्या शिपायांनी हबीबास ठार मारलें. याप्रमाणें या इमानी व शूर मनुष्याचा अंत झाला.

**मीरहबीबानंतर मिर्झामस्लुद्दीन** या नांवाच्या मनुष्यास रघूजीनें ओरिसाचा सुभेदार नेमिलें. अलिवर्दी व रघूजी भोंसले यांजमध्यें इ. स.

* या भागांतील माहिती अन्यत्र प्रसंगानुसार आली आहे. परंतु येथें ती सोईसाठीं एकत्र दिली आहे. अर्थात् यांत बरीच द्विरुक्ति आहे.

१७५१ मध्यें जो तह झाला तो याच्याच मध्यस्थीनें झाला होता. या मनुष्याच्या नेमणुकीस आलिवर्दीखानानेंहि संमति दिली होती. यानें पूर्वी-पेक्षां चार लक्ष रुपये आपण जास्त वसूल देऊं असें कबूल केलें होतें. ते तर त्यानें दिले नाहींतच परंतु पूर्वीपेक्षांहि प्रांताचा वसूल कमी झाला. त्यामुळें **मस्लुद्दीन** यास सुभेदारी सोडावी लागली. ही गोष्ट इ. स. १७५५ मध्यें रघूजी मरण्याचे सुमारास झाली.

यानंतर ओरिसाचे सुभेदारीवर प्रसिद्ध **शिवभट साठे** याची नेमणूक झाली. हा इ. स. १७५६ पासून आठ वर्षें ओरिसाच्या सुभेदारीचें काम करीत होता. **शिवभट साठयाच्या** कारकीर्दीतील बराचसा भाग हिंदुस्थान सरकारच्या रेकॉर्ड ऑफिसनें प्रसिद्ध केलेल्या पत्रव्यवहारावरून[१] आपणास कळून येईल.

या वेळेपासून ओरिसाप्रांत मराठ्यांच्या ताब्यांतून आपल्या ताब्यांत मिळविण्याविषयीं व त्या योगानें मद्रास व बंगाल या दोन्ही टोकांच्या मधील मुलूख जोडून बंगालपासून मद्रासपर्यंत प्रदेश सलग करण्याची इंग्रजांची धडपड सुरू झाली व त्याचा इलाज म्हणून मराठ्यांस नबाबाकडून मिळणारी बंगालच्या चौथाईची बारा लक्षांची रक्कम देणें इंग्रजांनी बंद केलें व ही रक्कम मिळविणें हेंच ओरिसाच्या मराठी सुभेदाराचें मुख्य काम झालें. वरील छापील पत्रव्यवहार सर्व याच गोष्टीनें भरलेला आहे व तो मागें भा. ८ मध्यें सविस्तर वर्णन केला आहे.

वरील छापील पत्रव्यवहारावरून आपणांस समजून येतें की इ. स. १७६१ मध्यें ओरिसा प्रांतांत **शिवभट साठयाच्या** हाताखाली **मुकुंद** पंडित **व रखमाजी जाचक**[२] हे अधिकारी होते व त्यांच्याशीहि इंग्रजांचा स्वतंत्रपणें पत्रव्यवहार चालू होता. ओरिसा प्रांतांत कटक व बलसोर येथें इंग्रजांचे एजंट रहात असत व ते कलकत्ता व मद्रास यांमधील इंग्रजी टपाल खुष्कीच्या मार्गानें पाठवीत असत. ओरिसा प्रांतास लागून बंगालचा मेदिनीपुर म्हणून एक

१ Calendar of Persian correspondence Vols. I–V.

२ प्रसिद्ध नरोजी जाचक हा बाराभाटीच्या किल्ल्यावर पहिला किल्लेदार होता. त्याचे वंशज आर्वी तहसिलींत आहेत. वंशावळ पहा.

परगणा इंग्रजांच्या ताब्यांत होता. त्यावर ओरिसांतील मराठी लष्करानें शिवभटाचे वेळेस हल्ला केल्याबद्दल उल्लेख सांपडतो. त्यामुळें तेथें इंग्रजांचा विशेष बंदोबस्त होता. तेथील लष्कर काढून घेण्यासंबंधानें शिवभटानें कलकत्याच्या गव्हर्नरास लिहिलें. परंतु त्यानें तेथून आपलें लष्कर काढण्याचें नाकबूल केलें व तुम्हीं जास्त आग्रह केल्यास तुमचा आमचा बिघाड होईल असेंहि दटाविलें. शिवभटानें आपणास चौथाईची रक्कम न मिळाल्यास आपण बंगालवर स्वारी करूं असाहि धाक घातला, त्यामुळें इंग्रज शिवभटाचा द्वेष करीत. उलट रखमाजी जाचक यास इंग्रजांनीं गोड गोड पत्रें व घड्याळें वगैरे जिनसा देऊन बरेंचसें मिळवून घेतलें होतें. त्यामुळें इंग्रजांची व त्याची दोस्ती जमली. शिवभट साठे हा इ. स. १७६४ पर्यंत ओरिसाचा सुभेदार होता. परंतु त्याच्या शत्रूंनीं व विशेषतः इंग्रजांनीं त्याच्या विरुद्ध जानोजीचें मन वळविल्यामुळें जानोजीनें त्यास कामावरून काढून टाकिलें.[१] शिवभटाचा एक भाऊ भास्करपंत या नांवाचा बलसोर येथें फौजदार होता.

शिवभटास सुभेदारीवरून काढल्यानंतरहि तो बंगाल व ओरिसा या प्रांतांत राहून दंगाधोपा करीतच होता व त्यास ओरिसा व बंगाल या प्रांतांतील बरेचसे जमीनदार अनुकूल असल्यामुळें त्याचेंहि बरेंच फावलें.[२] एवढेंच नव्हे तर कलकत्तेकर इंग्रज व बंगालचा नबाब यांनींहि त्यास आश्रय दिला होता.

शिवभटानंतर जानोजीनें प्रसिद्ध भवानी काळू यास बंगालच्या सुभेदारीवर पाठविलें. त्यानें शिवभटाचा दंगा मोडून सर्वत्र स्थिरस्थावर केलें. इंग्रजांनींहि मराठ्यांस खूष करण्याकरितां बलसोरकडे आपलें लष्कर पाठवून शिवभटास हुसकून लाविलें. भवानी काळू याजबरोबर मुधोजीचा मुलगा चिमणाबापू हाहि ओरिसांत होता व नांवानें तरी तोच खरा सुभेदार होता. भवानी काळूनें शिवभटाचा मोड करून त्यास कैद केलें.

१ सरदेसाई म. वि. भा.४ पा. ३०८ .
Banerji's History of Orissa Vol. II P., 32

२ यानंतर शिवभट पेशव्याकडे जाऊन नौकर राहिल्याचा दाखला सांपडतो. त्याची पुढील हकीकत उपलब्ध नाहीं.

ओरिसा प्रांतांतील शिवभटाचा अंमल प्रजेस बराच सुखावह झाला होता. तो आला त्यावेळीं सर्व प्रांत उध्वस्त झाला असून सर्वत्र अव्यवस्था माजलेली होती. त्यानें सुव्यवस्था करून प्रांताची जमाबंदी उतरविली व त्यामुळें प्रांताचें उत्पन्नहि वाढलें. त्याचे वेळेस ओरिसाचें उत्पन्न १८ लक्ष रुपये होतें व त्यापैकीं १४ लक्ष रुपये फक्त जमीनमहसुलाचें होतें. भवानी काळू ओरिसांत येण्यापूर्वीं चिमणाबापू व उदेपुरी गोसावी हे ओरिसांत येऊन पोहोंचले होते. परंतु शिवभटानें त्यांना दाद दिली नाहीं. शेवटीं भवानी काळू आल्यानंतर शिवभटास त्यानें कैद केलें व त्याचा साथीदार मुकुंद पंडित याचाहि मोड होऊन तो पळून गेला.

भवानी काळूनेंहि गव्हर्नरास नबाबाकडून चौथाईची रक्कम देवविण्याविषयीं तगादा लाविला. यापूर्वीं गोविंदराव नांवाचा वकील जानोजीनें गव्हर्नराकडे पाठविला होता. हल्लीं दुसरा वकील रघुनाथ पंडित या नांवाचा कलकत्त्यास पाठविला. परंतु नबाब मीर जाफरअली हा लवकरच कलकत्त्यास येणार आहे व तो आल्यावर त्यास विचारून चौथाईच्या रकमेबद्दल त्याचें काय म्हणणें आहे तें कळवूं असा गव्हर्नरानें जबाब दिला. इंग्रजांनीं पूर्वींचा नबाब मीर कासीमअली यास काढून मीर जाफरअली यास नबाब केलें त्यावेळीं कासीमअलीनें जानोजीकडे वकील पाठवून व आगाऊ रक्कम पाठवून इंग्रजांविरुद्ध मदत मागितली होती व इंग्रजांचा पाडाव करण्यास ही संधि फार चांगली होती. परंतु जानोजीनें या संधीचा फायदा घेतला नाहीं व नंतर चौथाईच्या रकमेची मागणी करतांना वारंवार लिहिलें कीं, आम्हीं तुमचा स्नेह कायम ठेवण्याकरितां मीरकासीम आमचेकडे आला असतां तुमचेविरुद्ध त्यास मदत केली नाहीं व त्यानें पाठविलेल्या रकमेच्या हुंड्याहि परत केल्या. आम्हीं इतकें केलें असतां तुम्ही आमच्या चौथाईची रक्कम नबाबाकडून देववीत नाहीं हें योग्य नाहीं. परंतु अशा कोरड्या लिहिण्यानें इंग्रज थोडेच ऐकणार होते. भवानीपंतानें ओरिसांतील जमिनदारांना व मांडलिकांना तंबी देऊन बंगालवर स्वारी करण्याचा बेत केला. परंतु खरोखर स्वारी करण्याची त्याची हिंमत झाली नाहीं. नाहीं तर चौथाईच्या रकमेबद्दल त्याच वेळीं कांहींतरी निकाल लागला असता. नबाब मीर जाफरअली व त्याचा दिवाण राजा दुर्लभराम यांनीं रक्कम पाठविण्याच्या थापा देऊन व इंग्रज

गव्हर्नरानेंहि तशाच थापा देऊन काल-हरण मात्र केलें. परंतु मराठ्यांनीं मात्र बंगालवर स्वारी करण्याचें टाळून हा प्रश्न धसास लावण्याचें टाळलें त्यामुळें इंग्रजांनीं मराठ्यांचें पाणी ओळखून चौथाईची रक्कम अजीबात मिळूं दिली नाहीं.

भवानी काळू हा जरी ओरिसाचा खरा अधिकारी होता तरी सुभेदारीची सनद चिमणाबापूच्या नांवानें होती. इ. स. १७६८ मध्यें भवानी काळू परत नागपुरास गेला व जानोजीनें त्याचे जागीं गणेश संभाजी खांडेकर यास नेमिलें. हा इ. स. १७७१ पर्यंत ओरिसाचे सुभेदारीवर होता इंग्रजी लेखांत त्याचें नांव चुकीनें संभाजी गणेश असें लिहिलें आहे.[1]

यापूर्वीं गोविंदराव व रघुनाथराव या नांवांचे वकील नागपुराहून कलकत्त्यास गेले होते. त्यांचेमागून उदेपुरी गोसावी हा कलकत्त्यास जानोजीचा वकील म्हणून गेला. उदेपुरीचा मुलगाहि कटक येथें गणेश संभाजीकडे होता. यानंतर लाला आनंदरूप या नांवाचा वकील नागपुराहून कलकत्त्यास गव्हर्नराकडे गेला व उदेपुरी हा परत नागपुरास आला. यानंतर इंग्रजांनीं चौथाईचें बोलणें सोडून देऊन ओरिसाप्रांत आपणास देण्याबद्दल जानोजीकडेस बोलणें लाविलें व ओरिसाप्रांत आपणांस मिळाल्यास आपण चौथाईची रक्कम देऊं असें जानोजीस आमिष दाखविलें व तहाचें बोलणें करण्याकरितां आपलेतर्फे महमद रेझाखान व सैफुद्दौला या वकीलांस पाठविलें. जानोजीनें गणेश संभाजीमार्फत गव्हर्नरास कळविलें कीं, जो कोणता तह करणें असेल तो आपण कंपनीशीं करण्यास तयार नसून इंग्लंडच्या राजाशीं करूं व त्यावर इंग्लंडच्या राजाची सही व शिक्का झाला पाहिजे. यानंतर पेशवे व भोंसले यांजमध्यें लढाई सुरू झाली. जानोजीनें या लढाईत इंग्रजांनीं आपणास मदत करावी अशी मागणी केली होती, परंतु इंग्रजांनीं त्यास मदत केली नाही.

जानोजीनें भगवंत विष्णु नांवाच्या मनुष्यास इ. स. १७६१ मध्यें नागपुराहून कलकत्त्यास पाठविलें. परंतु चौथाईच्या बाकीबद्दल इंग्रजांनीं

१ गणेश संभाजी याच्या घराण्याविषयींची माहिती अन्यत्र दिली आहे. पुरवणी वंशावळ पहा.

कांहींच निकाल लाविला नाहीं. बापूजी नाईक या नांवाचा सरदार या वेळेस ओरिसाप्रांतांत होता असें दिसतें व तोच गणेश संभाजीचे नंतर सरासरी दोन वर्षे सुभेदार असावा. लक्ष्मणजी जाचक या नांवाचा दुसरा मराठा सरदार संबळपुरास होता. दोन्ही जागीं इंग्रजांचे एजंट होते; त्यांना मदत कर याविषयीं गव्हर्नराचीं वरील दोघांस पत्रें गेलेलीं सांपडतात. नागपुरचा वकील भगवंत विष्णु हा कलकत्त्यासच मरण पावला.

इ. स. १७७३ चे सुमारास बापूजी नाइकाचे वेळेस कटक जिल्ह्यांत मोठा दुष्काळ पडला होता. त्यांतच मराठी लष्करांत बंडें झाल्यामुळें या दुष्काळांत भर पडून पुष्कळ लोक नाश पावले. इ. स. १७७३ मध्यें महादाजी हरी या नांवाचा मनुष्य ओरिसाचा सुभेदार झाला. त्याच्या नेमणुकीबद्दल उल्लेख सांपडतो. महादाजी हरी याचेविषयी जास्त माहिती उपलब्ध नाहीं. यावेळीं ॲलन नांवाचा इंग्रज कटक येथें वकील म्हणून होता. याच सुमारास बेनीराम पंडित हा भोंसल्यांचा वकील साबाजीकडून कलकत्त्यास गेला. हा पुढें बरेच दिवस भोंसल्यांचा वकील होता. महादाजी हरी इ. स. १७७५ पर्यंत ओरिसाचा सुभेदार होता असें खात्रीलायक सांपडतें. दरम्यान थोडे दिवस बापूजी नाईक हा[१] सुभेदार होता असें दिसतें. परंतु त्याची सुभेदारी एक दोन महिन्यांपेक्षां जास्त दिवस राहिली नाहीं.

इ. स. १७७८ मध्यें राजाराम मुकुंद याची नेमणूक ओरिसाच्या सुभेदारीवर झाली. त्यापूर्वीं बरेच दिवस हा सुभेदाराचा दिवाण म्हणून ओरिसा प्रांतांत होता व त्यामुळें या प्रांताचा हा चांगला माहितगार होता.

इ. स. १७७६ मध्यें गव्हर्नरानें ओरिसांतील समुद्रकिनाऱ्याजवळील 'कनीका' व 'महानदी' या दोन नद्यांमधील समुद्रकांठचा प्रदेश ठराविक खंडानें ताब्यांत देण्याविषयीं मुधोजी भोंसल्यास मागणी केली. हा प्रदेश समुद्रकांठीं असून तेथें इंग्रजी गलबतें अडचणींत सांपडून लागत अगर

१ याचें पूर्ण नांव व माहिती सांपडत नाहीं. त्याच्या बापाचें नांव अनंत असावें असें एका पत्रावरून दिसतें.

फुटत. त्या प्रदेशांत 'कनीका' व 'कुजांग' येथील जमीनदारांचा अंमल चाले. ते अशा फुटलेल्या जहाजांतील माल वगैरे लुटून घेऊन त्यावरील खलाशांस व उतारूंस कैद करून नेत. कॅ. रॉजर्स व त्याबरोबर कांहीं माणसें अशींच एकदां वरील किनाऱ्यास लागलीं. कुजांगच्या राजानें त्यांना कैद करून कॅ रॉजर्स व त्याच्या कांहीं सोबत्यांस ठार मारलें. यावरून गव्हर्नरानें असे प्रकार पुन्हां न व्हावेत याकरितां वरप्रमाणें हा प्रदेश खंडानें मागितला. याबद्दल वारंवार पत्रव्यवहार होऊन मुधोजीनें ओरिसाचा त्या वेळचा सुभेदार महादाजी हरी यास कुजांगच्या राजास शिक्षा करण्याबद्दल लिहिलें. महादाजी हरी याजकडूनहि वरील बंदोबस्त न झाल्यामुळें मुधोजीनें महादाजी हरी यास सुभेदारीवरून काढून राजाराम मुकुंद याची नेमणूक केली व समुद्रकांठचा प्रदेश इंग्रजांना देण्याबद्दलची मागणी संभावितीनें नाकारिली.

जाचक घराण्यांतील बरेचसे गृहस्थ ओरिसा प्रांतांत लष्करी अंमलदार म्हणून होते. इ.स. १७७४ मध्यें दारकुजी जाचक हा कटकजवळील बाराभाटीच्या किल्ल्यावर किल्लेदार म्हणून होता. त्यास व महादाजी हरी सुभेदार यास गव्हर्नरकडून नजराणे गेलेले आढळतात. महादाजी हरी हा सुभेदार असतांना गणेश संभाजी हाहि ओरिसा प्रांतांतच होता अशाबद्दल पत्रव्यवहार सांपडतो. हैबतराव जाचक हाहि बाराभाटीचा किल्लेदार होता. तो बहुधा वरील दारकुजीचा मुलगा असावा. त्याचा बाप मेल्यानंतर त्यास गव्हर्नरकडून एप्रिल इ. स. १७७६ मध्यें दुखवटचाचें पत्र गेलें आहे.

बेनीराम पंडित हा इ. स. १७७४चे ऑगस्ट महिन्यांत कलकत्त्याहून काशी मार्गानें नागपुरास परत गेला. त्याच्याबरोबर गव्हर्नरानें (हेस्टिंग्जनें) साबाजीस व दर्याबाईस हत्ती, जवाहीर व कापड नजराणा म्हणून पाठविलें आहे.

राजाराम पंडित हा इ. स. १७९२ पर्यंत ओरिसाचे सुभेदारीवर होता असें कांहीं आधारांवरून दिसतें; परंतु याचें नक्की साल सांगतां येत नाहीं. कारण त्यावेळचा इंग्रजी पत्रव्यवहार छापलेला नाहीं. राजाराम [१] मुकुंद याचेनंतर त्याचा मुलगा सदाशिव राजाराम हा ओरिसाचा सुभेदार झाला.

---

१ राजाराम मुकुंद याचे घराण्याविषयीं पुढें माहिती मिळत नाहीं.

हा इ. स. १७९२ पासून १७९७ पर्यंत सुभेदार होता असें दिसतें. त्याचे वेळेस व्यंकाजी त्रिमळ फडणीस हा कटक येथें दिवाण होता व मुरारपंत नांवाचा गृहस्थ बलसोर येथें फौजदार होता. तसेंच व्यंकाजी सकदेव[१] व बाळाजी कोन्हेर हींहि नांवें ओरिसांतील अधिकाऱ्यांत सांपडतात. इ. स. १७९७ मध्यें व्यंकाजी सकदेव याचें नांव सुभेदार म्हणून सांपडतें व बाळाजी कोन्हेर हा ओरिसांतील लष्करी अंमलदार म्हणून आढळतो. व्यंकाजी सकदेव याचेनंतर बाळाजी कोन्हेर हाच सुभेदार झाला व तोच इ. स. १८०३ पर्यंत मराठ्यांचा अखेरचा सुभेदार होता.

ओरिसामध्यें मयूरभंज या नांवाचें मोठें मांडलिक संस्थान होतें. तेथील राजे मराठ्यांस खंडणी देत असत. दामोदरभंज या नांवाचा राजा आठव्या शतकाच्या अखेरीस मयूरभंजच्या गादीवर होता. बामनहट्टी नांवाची जमीदारी मयूरभंजचे संस्थानांत असून तेथील जमीदार मयूरभंजचे राज्यांत होता. तसेंच बाड, खुर्दा, पटना, सोनापुर नांवाचीं अनेक संस्थानें ओरिसाच्या सुभ्याखालीं मोडत असत. याशिवाय छत्तीसगड व ओरिसा यांचे दरम्यान अनेक लहानमोठीं संस्थानें असून तीं मराठ्यांस खंडणी देत असत.

स्टर्लिंग यानें ओरिसांतील जुने कागदपत्र जमवून ओरिसाच्या सुभ्याचें निरनिराळ्या वेळचें उत्पन्न काय होतें हें लिहून ठेविलें आहे. त्याचे लेखावरून मराठ्यांच्या कारकीर्दींत ओरिसा प्रांताचा उत्कर्ष होत जाऊन त्यामुळें उत्पन्न वाढतें होतें हें दिसून येईल[२].

१ शिवभट साठे.

| | | |
|---|---|---|
| मोहरा— | २३१ | |
| रुपये (निरनिराळ्या शिक्क्याचे)— | ३८२८२९ | = १०७८४४१ रु. |
| कवडी कहान— | २७८२४४६ | |

४ कहान = १ रुपया. ओरिसा प्रांतांत कवड्यांच्या नाण्याचा फारच प्रचार होता.

---

१ सकदेवाचे वंशज नागपुरास आहेत.

२ Banerji's History of Orissa Vol. II P. 244

२ गणेश संभाजी.

आशरफी— ११
रुपये— ५०१३९४ } = १५६०८११ रु.
कवडीकहान— ४२३७६६६

३ राजाराम मुकुंद

रुपये— ११०३१८
कवडीकहान— ५३३७६८५ } = १४४४७४० रु.

व्यंकाजी सकदेव

रुपये— १५१४३५
कवडीकहान— ५७७८२२४ } = १५९५९११ रु.

ओरिसांतील मराठी कारभार त्यावेळच्या मानानें प्रजेस सुखकर झाला असावा असें एकंदरीनें दिसतें. पुष्कळशा इंग्रज लेखकांनीं मराठ्यांच्या ओरिसांतील राज्यकारभाराविषयी निंदा केली आहे. परंतु **शिवभट साठे व राजाराम मुकुंद** यांच्या कारभारासंबंधानें त्यांनाहि स्तुतीच करावी लागली. राजाराम मुकुंद याजसंबंधानें स्टर्लिंग हा म्हणतो, "त्याचे वैयक्तिक गुण व कर्तबगारी संभावितपणाची होती. ओरिसांतील स्थानिक माहिती फार असल्यामुळें त्याचे कारकीर्दीस स्थाईकपणा प्राप्त झाला होता व त्याची बरोबरी पूर्वीच्या कोणत्याहि सुभेदारास करतां आली नाहीं." पूर्वीचें वतनदार चौधरी व कानगो यांजमार्फत जमा वसूल न करतां त्यानें आपले स्वतंत्र अधिकारी नेमिले व त्यांजकडून प्रत्यक्ष सारावसुली करण्याची पद्धत त्यानें पाडली.

**ओरिसाप्रांत इंग्रजांनीं काबीज केला. इ. स. १८०३**:—इ. स. १८०३ चें मराठी युद्ध सुरू होतांच इंग्रजांनीं मराठ्यांवर ओरिसाप्रांतांत लष्कर पाठविलें. ओरिसा प्रांतात मराठ्यांचें लष्कर फार नसल्यामुळें व हा प्रांत नागपुरापासून फार दूर असल्यामुळें तो जिंकून घेणें इंग्रजांना अवघड गेलें नाहीं. कटकांत भोंसल्यांचे दोन सरदार बापू घाटगे व महाडीक असे होते. बंगालहून ५०० शिपाई व सहा तोफा जहाजांतून बलसोर येथें जाऊन उतरल्या. हें सैन्य उतरतांना मराठी लष्करानें त्यांना कांहीं प्रतिबंध केला नाहीं. इंग्रज

लष्करानें बलसोर बंदर काबीज केलें व तेथील फौजदार मुरारपंत हा थोडासा लढून कटक शहरास निघून गेला. मेदिनीपुराहून इंग्रज सैन्याची दुसरी एक तुकडी बलसोरकडे आली व वरील लष्करास मिळाली.

परंतु इंग्रजांचें मोठें लष्कर मद्रासहून निघालें व गंजम येथें जमा होऊन ओरिसाच्या दक्षिण सरहद्दीवर १८०३ च्या सप्टेंबर महिन्यांत जमा झालें. या वेळेस मराठ्यांशीं युद्धसुद्धां जाहीर झालें नव्हतें. परंतु युद्ध सुरू होण्याचीं चिन्हें दिसूं लागतांच ओरिसाप्रांत हस्तगत करण्याची इंग्रजांनीं तयारी केली होती. मद्रासचें सैन्य कर्नल **हारकोर्ट** याचे हाताखालीं असून तें **चिलका-सरोवर** व समुद्र यांमधून समुद्र—कांठानें पुरी जिल्ह्यांत **माणिकपट्टण** येथें ता. १६ ऑगष्ट रोजीं आलें. इतकें होईपर्यंत सुद्धां मराठ्यांनीं त्यांना अडथळा केला नाहीं. तेथून तें लष्कर जगन्नाथपुरी येथें येऊन तें क्षेत्र इंग्रजांनीं काबीज केलें. तेथें ज. **हारकोर्ट** यानें दोन दिवस मुक्काम केला व **जगन्नाथाचे** देवळावर हिंदु शिपायांची एक तुकडी ठेवून **हारकोर्ट** हा पुढें कूच करीत चालला. त्यानंतर मराठ्यांनीं हारकोर्ट यास अडवून लढाई दिली; परंतु त्यांचा पराजय होऊन ते झाडींत पळून गेले. यानंतर गनिमी काव्यानें कांहीं दिवस लढाई करून मराठ्यांनीं **हारकोर्ट** याचे लष्करास त्रास दिला व ता. ४ आक्टोबर रोजीं **मुकुंदपूर** येथें त्यांनीं इंग्रजी लष्करावर हल्ला केला. परंतु तेथेंहि मराठ्यांचा मोड होऊन ते खुर्दा संस्थानच्या जंगलांत पळून गेले. **हारकोर्ट** हा **कटज्युरी** नदी उतरून **कटक** येथें ता.८ आक्टोबर रोजीं आला व ५—६ दिवसांनंतर त्यानें **बाराभाटीच्या** किल्ल्यावर हल्ला करून तो घेतला. बंगालचें लष्कर क० फर्ग्युसन याचे हाताखालीं बलसोरहून कटक येथें येऊन हारकोर्ट यास मिळालें.

ओरिसाप्रांत याप्रमाणें काबीज केल्यानंतर इंग्रजी लष्कर **छत्तीसगड** सर करण्याकरितां तिकडे निघालें. मे. **फॉर्ब्ज** यानें बारमलची खिंड काबीज केली व ले. क. ब्रौटन यानें ता. २ जान्युआरी १८०४ रोजीं **संबळपूर** जिंकून घेतलें. ओरिसा व छत्तीसगड ताब्यांत आल्यानंतर तेथील सर्व संस्थानिकांशीं[१] इंग्रजांनीं तह केले व हे तहनामे कायम ठेव-

१ हीं सर्व संस्थानें आपणास रजपूत वंशोत्पन्न असें म्हणवितात. परंतु

ण्याबद्दल पुढें देवगांवच्या तहांत एक कलम घातलें गेलें. **देवगांवच्या** तहानें ओरिसाप्रांत इंग्रजांना कायमचा दिला गेला व **छत्तीसगड** भोंसल्यास परत मिळाला. ता. २४ ऑगष्ट १८०६ रोजीं रघुजी भोंसल्याशीं सर जॉन **शोअर** यानें निराळा तहनामा केला; त्यांत **पटणा** व **संबळपूर** ही संस्थानें भोंसल्यांस परत दिलीं.

---

## भाग १२ वा

# दुसऱ्या रघूजीच्या कारकीर्दीची अखेर

१८०३–१८१६

**एल्फिन्स्टन रेसिडेंट १८०४ इ.**—देवगांवच्या तहाच्या नवव्या कलमाप्रमाणें एकमेकांचे वकील एकमेकांचे दरबारीं रहावे असें ठरलें होतें. त्याप्रमाणें इंग्रजांतर्फे मांऊट स्टुअर्ट **एल्फिन्स्टन** यास नागपुर दरबारीं पहिला रेसिडेंट म्हणून नेमलें. त्यावेळी एल्फिन्स्टन हा जनरल वेलस्ली याचा फारशी दुभाषी होता व त्याचेबरोबरच मराठ्यांचे युद्धांत होता. पुढें हा पुण्याचे दरबारीं पेशवाईचे अखेरीस रेसिडेंट होता व त्यानंतर त्यानेच तिकडे इंग्रजी अंमल बसविला. यानें हिंदुस्थानचा एक मोठा इतिहासहि लिहिला आहे. **एल्फिन्स्टन** हा ता. २६ डिसेंबर १८०३ रोजीं इंग्रजी लष्कर सोडून निघाला व भोंसल्यांच्या लष्करास वर्धेच्या पश्चिम

यांची रजपूत वंशोत्पत्ति किती पोकळ आहे हें बॅनर्जी यानें आपल्या ओरिसाच्या इतिहासांत नमूद केलें आहे. (भा. २ पुरवणी ६ पहा) यापैकीं बरेचसे संस्थानिक खरोखर क्षत्रिय वंशीय व रजपुतांच्याहि पूर्वीचे असूनहि त्यांना आपलें क्षत्रियत्व मान्य करून घेण्याकरितां रजपुतांचीच कांस धरावी लागली.

कांठीं ३१ तारखेस जाऊन मिळाला. भोंसल्यांचें लष्कर कांहीं दिवस त्याच प्रांतांत रेंगाळत राहिलें व लढाई बंद झाल्यामुळें कमी केलेलें लष्कर टोळचाटोळचांनीं वऱ्हाडच्या हद्दींत लुटालूट करीत राहिलें. तहाच्या शर्तीं-प्रमाणें भोंसल्यांची हद्द वर्धेच्या पूर्वेस ठरली असल्यामुळें व पश्चिमेकडील मुलूख निजामास दिल्यामुळें वेलस्लीनें मराठी लष्करास वर्धा नदी-पलीकडे आपल्या हद्दींत जाण्याबद्दल तगादा लावला व नंतर मोठ्या मुष्किलीनें तें लष्कर ता. ४ जान्युआरी १८०४ रोजीं वर्धेपलीकडे गेलें व पुढें हळूहळू मुक्काम करीत करीत ता. २९ रोजीं नागपुरास येऊन पोहोंचलें.

**छत्तीसगड व ओरिसांतील मांडलिक संस्थानें**:—दोन्ही पक्षांकडून तहाच्या कलमांची अंमलबजावणी सुरू झाली. देवगांवच्या तहाचे दहाव्या कलमा-प्रमाणें असें ठरलें होतें कीं, " ब्रिटिश सरकारानें भोंसल्यांच्या मांडलिक राजांशीं अगर संस्थानिकांशीं जे कांही कराररमदार केले असतील ते भोंस-ल्यानें मान्य करावे. नागपुरकरांशीं युद्ध सुरू होतांच कटक प्रांतांत इंग्रजी सैन्यानें शिरून तो प्रांत काबीज केला होता व तिकडील पुष्कळशा संस्था-निकांशीं तहनामे करून त्यांचें संरक्षण करण्याचें त्यांना वचन दिलें होतें व त्याच धोरणानें वेलस्लीनें हें कलम तहांत घातलें होतें. तसेंच तहानंतरहि इंग्रज सरदार क. ब्राउटन यानें कटक प्रांताच्या पश्चिमेकडीलहि भोंसल्यांचा कांहीं मुलूख काबीज केला होता. भोंसल्यांनींहि हा प्रांत परत मागितला व तहाच्या मंजुरीपर्यंत केलेले त्यांच्या मांडलिकांशीं झालेले सर्व करार रद्द करण्याबद्दल रेसिडेंटामार्फत मागणें लावलें. इंग्रजांनीं तहाप्रमाणें फक्त कटक प्रांत घेऊन बाकीचा मुलूख परत देण्याचें कबूल केलें. परंतु भोंसल्यांच्या मांडलिकांशीं जे संरक्षक करार केले होते ते रद्द करण्याचें नाकारलें व आपली इभ्रत त्यांत कमी होते असें सांगितलें. त्यांची खंडणी बंद झाल्या-मुळें जें नुकसान होईल तेंहि भरून देण्याची इंग्रजांनीं तयारी दाखविली. परंतु भोंसले ऐकेनात. शेवटीं "बळी तो कान पिळी" या शस्त्राचा उपयोग रेसि-डेंटानें केला. ता. ९ जून १८०४ रोजीं रेसिडेंटानें सदरहू संस्थानिकांची एक यादी तयार केली व या मांडलिकांवरील आपला सार्वभौम हक्क आपण सोडून देऊन ते स्वतंत्र आहेत अशी कबुली देऊन त्या कागदावर राजानें सही करावी व चोवीस तासांचे आंत सही करून न पाठविल्यास इंग्रज

सरकार लढाई सुरू करील असा धाक दाखविला. हा कागद राजाचे दिवाण श्रीधर पंडित (श्रीधर लक्ष्मण मुनशी) याचेमार्फत रेसिडेंटानें पाठविला. तेव्हां राजास मात्रा लागू पडली व त्यानें ता. ११ जून रोजीं मुकाट्यानें त्या कागदावर सही करून पाठविली[1] व लौकरच आपलें एकंदर साडेतीन लक्षांचें नुकसान झालें म्हणून त्याची यादी पाठवून रेसिडेंटानें कबूल केल्याप्रमाणें तें नुकसान भरून द्यावें म्हणून मागणी केली. परतु तुम्हास म्हटलें त्यावेळीं तुम्हीं ही योजना नाकबूल केली; सबब आतां त्याबद्दल आम्ही जबाबदार नाहीं व त्या संबंधांत आतां आम्हीं कांही बोलूं इच्छीत नाहीं असें एल्फिन्स्टन यानें राजास कळविलें व या प्रश्नाचा याप्रमाणें तात्पुरता निकाल लागला.

**रघूजीचें होळकराशीं गुप्त खलबत इ. १८०४:— यशवंतराव होळकर** व **रघूजी भोंसले** यांचा पत्रव्यवहार आसईच्या लढाईपूर्वी झाला होता व इंग्रजांविरुद्ध शिंदे, होळकर व भोंसले यांचें त्रिकूट बनविण्याचे प्रयत्न चालले होते ही गोष्ट पूर्वींच नमूद झाली[2] आहे. परंतु त्यावेळीं या तिघांच्या दीर्घसूत्रीपणामुळें व विशेषतः शिंदे होळकरांच्या आपसांतील दुहीमुळें ही गोष्ट साधली नाहीं. जनरल **वेलस्लीच्या** तडफीमुळें त्यानें या त्रिकूटास एकत्र होऊं देण्यापूर्वींच शिंदे व भोंसले यांस गांठून त्यांचा मोड केला व त्यांच्याशीं तह केला व नंतर एकट्या होळकराशीं युद्ध सुरू केलें. होळकरास अद्याप आशा वाटत होती की, भोंसले आपणास साहय देतील. होळकरानें **अमीरखान** पेंढारी व भरतपुरचा राजा यांना साहय करून घेऊन इंग्रजांशीं लढाई सुरू केली होती व मराठ्यांच्या गनिमी पद्धतीनें लढाई चालवून इंग्रजांविरुद्ध दोनतीन जागीं जयहि मिळविले होते. कर्नल **मॉनसन** यास मध्य हिंदुस्थानच्या डोंगराळ प्रदेशांत चकवून आपणामागें दूरवर आणून त्यानें एकदम मागें परतून त्याचेवर हल्ला केला व त्याचा पराभव करून

---

१ याबद्दलचा बराचसा अस्सल पत्रव्यवहार नागपुरच्या सरकारी दप्तर खान्यांत आहे.

२ मागें पान १०३ पहा.

आग्र्यापर्यंत पाठलाग करून त्याच्या बहुतेक सर्व सैन्याचा नाश केला. तसेंच भरतपुरच्या किल्ल्यावर लॉर्ड **लेक** यानें तीनदां हल्ले केले ते होळकरानें परतून लावले. नोव्हेंबर १८०४ मध्यें **डीग** येथेंहि इंग्रजी लष्कराशीं निकराची लढाई देऊन होळकरानें असाच पराक्रम दाखविला.

उत्तर हिंदुस्थानांत इंग्रजांचा मोड होत आहे याबद्दलच्या कमीजास्त हकीकती नागपुरास येऊन पोहोंचल्या. रघूजी भोंसल्याचें मन इंग्रजांविषयीं शुद्ध नव्हतेंच. **अडगांवच्या** लढाईत पराभूत झाल्यामुळें व त्यानंतर सैन्याचा जोर अगदीच कमी झाल्यामुळें त्याचा इलाज चालेना. तशांत **देवगांवच्या** तहांतील कलमांची अंमलवारी रघूजीस पसंत पडली नाहीं व वारंवार रेसिडेंटाच्या दटावणीमुळेंच त्याला पड घ्यावी लागली. म्हणून होळकराच्या युद्धाच्या परिणामाकडे भोंसल्यांचें बारीक लक्ष होतें व तिकडच्या बातम्या येतात त्यांत कितपत तथ्य आहे याची दुरून दुरून चौकशी रेसिडेंटाजवळ भोंसल्याचे वकील करीत असत. चाणाक्ष **एल्फिन्स्टन** यास त्याचा अर्थ तेव्हांच समजला व त्यानें भोंसल्यांचे हालचालींवर बारीक नजर ठेविली. थोडीशी शांतता मिळाल्यामुळें **रघूजी भोंसल्यानें** आपल्या सैन्याची सुधारणा करण्याचें काम चालविलें. पूर्वी सैन्याचा पगार वक्तशीर मिळत नसल्यामुळें तें नाराज असे. पुष्कळदां तर लढाईस निघण्याच्या ऐन वेळीं सैन्य तुंबलेल्या पगाराकरितां अडून बसे. आतां सैन्यास वक्तशीर पगार मिळणें सुरू झालें. त्यांचे कपडेलत्ते, युद्धसामुग्री यांत सुधारणा झाली. दारुगोळ्याचा सांठा चांगला झाला. रेसिडेंटाचें ठाणें जवळच झाल्यामुळें व त्यांचे गुप्त हेर चोहोंकडे असल्यामुळें दरबारच्या कमीजास्त व खऱ्याखोटया बातम्या रेसिडेंटास रोज मिळूं लागल्या. राजाच्या व त्याच्या मुत्सद्यांचीं गुप्त खलबतें वारंवार होतात, होळकराकडे राजाचीं माणसें जातात व येतात, योग्य संधि दिसतांच राजे होळकरास उघड मिळणार आहेत व त्याकरितांच सैन्याची हो तयारी आहे अशा बातम्या रोज रेसिडेन्सीमध्यें येऊं लागल्या. **डीगचे** लढाईचे पूर्वी कांहीं दिवस म्हणजे आक्टोबर मध्यें **अमीरखानाच्या** पदरचा एक वकील **हैबतराम** हा अमीरखानाचें व यशवंतराव होळकराचें पत्र घेऊन नागपुरास राजाकडे आला होता. हीहि गोष्ट रेसिडेंटास समजली. शेवटीं ता. २१ ऑक्टोबर रोजी

**एलिफन्स्टन** यानें राजाचा वकील **यशवंतराव रामचंद्र** (ज्याचेमार्फत देवगांवचा तह झाला होता तो ) यास बोलावणें पाठविलें व आपला सर्व सशय सांगितला व राजानें होळकराशीं संबंध ठेवूं नये. नाहीं तर विनाकारण तुमचें नुकसान होईल असा निरोप पाठविला.

**मन्याबापूस नजरकैद**:--राजानें रेसिडेंटाच्या या निरोपाकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. नवीन सैन्याची भरती सुरूच होती. होळकराकडील आवकजावक चालूच होती. इकडे रेसिडेंटानेंहि वेळप्रसंग आल्यास सैन्याची मदत मागितली. त्याला लवकरच एक निमित्तहि मिळालें. राजाचे बंधु **व्यंकोजी** ( मन्याबापू ऊर्फ नानासाहेब) याचे सैन्यानें निजामाच्या मुलखांत स्वारी करून कांहीं लुटालूट केली. निजाम हा इंग्रजांचा मित्र असल्यामुळें रेसिडेंटानें याबद्दल राजास तंबी दिली कीं **मन्या**बापूचें सर्व लष्कर निजामाच्या हद्दींतून काढून घ्यावें, **मन्या**बापूची जहागीर जप्त करून नजर कैदेंत ठेवावें; याप्रमाणें न केल्यास आपण दोन दिवसात नागपूर सोडून जाऊं व लढाई सुरू करूं व इंग्रजी लष्कर नागपुरास येण्यास तयार आहे. असाहि निकराचा निरोप राजाकडे आला. इंग्रजांशी युद्ध करण्याची राजाची तयारी नव्हती. शेवटीं राजानें वरील सर्व गोष्टी कबूल केल्या व त्याप्रमाणें अंमलवारीहि केली. त्याच सुमारास तिकडे होळकर व त्याचे साथीदार **अमीरखान** व इतर पेंढारी यांचा मोड होऊन इंग्रजांचा जय होत चालल्याच्या बातम्या येऊं लागल्या, पेंढाऱ्यांनीं नागपुरकरांच्या **जबलपूर** वगैरे उत्तरेकडील मुलखांत धामधूम चालविली होती तीहि इंग्रजांनीं पेंढाऱ्यांचा मोड केल्यामुळें बंद झाली व इंग्रजांचें सैन्य मोकळें होत चाललें. राजानें पड घेतल्याबरोबर **एलिफन्स्टन** यानेंहि थोडेंसें नरमाईचें वर्तन सुरू केलें. त्यानें राजास कळविलें कीं इंग्रजी लष्कर नागपुरावर येण्यास निघालें होतें तें आतां आम्हीं थांबविलें आहे.

देवगांवच्या तहाअन्वयें फक्त कटकप्रांत राजानें इंग्रजांना दिला होता. त्याशिवाय संबळपुर व पटणा वगैरे प्रदेशहि इंग्रजांनीं घेतला होता तो भोंसल्यांस परत मिळावयाचा होता परंतु तो अद्याप मिळाला नाहीं व तो परत देण्याचा इंग्रजांचा विचारहि नव्हता असें दिसतें. कारण तहानंतर

राजानें वारंवार मागणें केलें असतांहि तो प्रांत भोंसल्यांस परत मिळाला नाहीं. तसेंच भोंसल्यांच्या मांडलिकांना इंग्रजांनी आश्रय दिल्यामुळें ते भोंसल्यास खंडणी देईनात. हें नुकसान आपण दरसाल नगदी रक्कम देऊन भरून देऊं असेंहि इंग्रजांनीं कबूल केलें होतें. परंतु राजाचें म्हणणें कीं त्याचें दर साल साडेतीन लाख रुपयांचें नुकसान झालें तें द्यावें. इंग्रज इतकी रक्कम देण्यास तयार होईनात. यावर प्रकरण तसेंच थांबलें व खंडणीचे नुकसानीचा प्रश्न तसाच मागें पडला. राजाचे मनांत हीं दोन्हीं शल्यें तशींच राहिलीं. राजाचें होळकराशीं जें संधान चाललें होतें त्यावरून राजाचें मन इंग्रजांविषयीं शुद्ध नाहीं व राजा हतबल असल्यामुळेंच हा जुलमाचा रामराम चालला आहे हें इंग्रजांस कळून चुकलें. होळकराचे युद्धाचे वेळीं व इंग्रजांची पडती असतांना राजानें होळकराशीं मिळून इंग्रजांशीं युद्ध सुरू केलें असतें तर फारच पंचाईत झाली असती. हेंहि संकट गव्हर्नर जनरल व रेसिडेंट यांच्या लक्षांत आलें व निवळ **एल्फिन्स्टन** याच्या चातुर्यामुळें व प्रसंगावधानामुळें वेळ पडेल तसें धमकावून अगर गोडी दाखवून या मोठ्या अडचणीच्या प्रसंगीं त्यानें वेळ मारून नेली याबद्दल मार्क्विस ऑफ **वेलस्ली** यानें **एल्फिन्स्टन** याची पाठहि थोपटली.

**मन्याबापूची सुटका**:—परंतु भोंसल्यांस असंतुष्ट ठेवणें पुढेंमागें धोक्याचें आहे हें वरील दोन्ही मुत्सद्यांच्या लक्षांत आलें व वरील दोन्ही प्रश्नांचा निकाल करण्यास आम्ही तयार आहों असें त्यांनीं राजास कळविलें. परंतु त्याबरोबरच अशीहि अट घातली कीं, नागपुरास इंग्रजांचें सबसीडियरी सैन्य राजानें ठेवून घ्यावें. सबसीडियरी सैन्या-बरोबरच, सैन्याचा खर्च राजावर व सैन्यावर अंमल इंग्रजांचा हा प्रश्न आलाच. **रघूजी** इतका भोळा नव्हता व सबसीडियरी सैन्याच्या पद्धतीनें हिंदुस्थानातील इतर संस्थानिकांचें स्वातंत्र्य जाऊन ते इंग्रजांचे निवळ मांडलिक कसे बनले हाहि अनुभव आतां सर्वांच्या डोळ्यांपुढें होताच. त्यामुळें रघूजीनें सबसीडियरी सैन्याची गोष्ट नाकारली. परंतु प्रांत व नुकसानी याचा निकाल करण्याची कबुली दिली. इंग्रजांना दोन्हीहि गोष्टी पाहिजे होत्या. राजास एकच गोष्ट पाहिजे होती. शेवटीं पूर्वीप्रमाणें रकमेबद्दल एकमत न होऊन तो प्रश्न पुन्हां मागें पडला. राजास थोडेंबहुत खुष

करण्याकरितां **एल्फिन्स्टन** यानें **मन्याबापूस** कैदेंतून सोडून त्याची जहागीर जप्तींतून मोकळी करण्याची परवानगी दिली.

**मा० हेस्टिंग्जच्या वेळची हिं.ची स्थितिः**—दुसऱ्या मराठा युद्धानंतर (१८०३) शिंदे, होळकर, भोंसले यानीं पुन्हां एकजूट करण्याचा कसा प्रयत्न केला, परंतु रघूजी भोंसला त्या जुटींत न शिरतां कसा बाहेर राहिला याचें वर्णन त्याच्या कारकीर्दींत आलेंच आहे. यानंतर इंग्रजांना नेपाळ, पंजाब, ब्रह्मदेश इकडे लढाया कराव्या लागल्या व प्रत्येक लढाईंत जरी इंग्रजांचा जय झाला तरी पराभूत केलेल्या प्रत्येक राजाच्या मनांत इंग्रजांविषयीं द्वेषाग्नि जळत राहिला होता हें इंग्रज विसरून नव्हते. त्यांचा व्याप अतिशय वाढला होता व चोहोंकडे लक्ष देण्यास त्यांचेजवळ इतकें सैन्य नव्हतें. इंग्लंडांत कंपनीच्या डायरेक्टरांना पैसे पाठविण्याच नेहमीं तगादा असल्यामुळें व राज्य वाढविण्यापेक्षां पैसा मिळवून कंपनीच्या हिस्सेदारांना नफा वांटण्याकडे त्यांचा ओढा व्यापारी नात्यानें साहजिकच जास्त होता. इकडील गव्हर्नर जनरल व इतर अधिकारी यांना आपली सत्ता कशी टिकेल व कशी वाढेल ही जास्त काळजी. सर्व हिंदुस्थान खिळखिळें झाल्यामुळें प्रत्यहीं येणाऱ्या सोन्यासारख्या संधी त्यांना सोडवेनात व एकतंत्री राज्य स्थापण्याचा मोह सोडून, मिळविलें तेवढेंच राखावें हेंहि त्यांच्याच्यानें होईना. किंबहुना त्यांनीं जरी तसा निश्चय केला असता तरी संरक्षणाच्या कामांत सुद्धां त्यांना लढायांत पडावें लागलेंच असतें. इतके शत्रू कोणत्या वेळेस एक होतील व आपला नाश करतील ही चाणाक्ष इंग्रजांस सदैव काळजी होती व तिचा प्रतिकार करण्याचा इलाज ते नेहमीं करीत असत.

**मा० हेस्टिंग्जनें केलेलें हिं. च्या परिस्थितीचें वर्णनः—लॉर्ड मिंटोच्या** कारकीर्दीच्या अखेरीस वरप्रमाणें स्थिति होती. त्याचेनंतर **मॉर्क्विस ऑफ हेस्टिंग्ज** हा गव्हर्नर जनरल आला. हा मनुष्य मोठा कर्तृत्ववान् होता. येतांनाच त्यानें गव्हर्नर जनरल व कमांडर–इन–चीफ ( मुख्य सेनापति ) हे दोन्हीहि अधिकार आपलेकडेच मागून घेतले होते. हा. इ. स. १८१३ च्या सप्टेंबर महिन्यांत हिंदुस्थानांत आला व तीन चार महिन्यांत त्यानें

एकंदर सर्व परिस्थितीचें आकलन केलें. तो आपल्या खाजगी डायरींत म्हणतोः– "इंग्लंड, इराण, सिलोन, जावा इतक्या जागीं पैसे पाठवावे लागत असल्यामुळें आमचा खजिना रिकामा झाला आहे. पैसे नसल्यामुळें सर्व ठिकाणीं पुरेसें लष्कर आमचे जवळ नाही. बंगालमध्यें गांवोगांवाहून कलकत्त्यास येणाऱ्या खजिन्याबरोबर रक्षण करण्यासमुद्धां आमचे जवळ लष्कर नाहीं. हत्यारबंद पोलिसांच्या बरोबर खजिना आणावा तर त्याचें ताजें उदाहरण नुकतेंच घडलें आहे, असा एक खजिना पोलिस गार्डाबरोबर येत असतां मध्येंच लुटारू लोकांनीं त्यावर हल्ला करून एक गार्ड ठार मारला. १५ जखमी केले व सर्व खजिना लुटून नेला. सबंध कलकत्ता शहरांत गव्हर्नर जनरलचे १२५ बॉडीगार्डांशिवाय एकहि लष्करी शिपाई नाहीं. कलकत्ता ते सुलतानपुर या सहाशें मैलांचे टापूचे दरम्यान मुळींच लष्कर नाहीं. हुगळी व रघूजी भोंसल्यांचा प्रांत याचे दरम्यानचा सर्व भाग असंरक्षित आहे. रघूजी भोंसल्याची सर्व सरहद्द अगदीं मोकळी आहे व तिकडून पेंढाऱ्यांच्या स्वाऱ्या बंगालमध्यें येतात. पेंढाऱ्याचें एकंदर लष्कर तीस हजार घोडेस्वारांचें आहे. निजाम, भोंसले, शिंदे या सर्वांच्या मुलखांत ते धुमाकूळ घालतात. पण या राजांना आपल्या प्रजेच्या संरक्षणाची कांहींच काळजी नाहीं व ते या पेंढाऱ्यांकडे दुर्लक्ष करतात. उलट इंग्रजांशीं लढाईचा प्रसंग आल्यास आयते वेळीं या पेंढारी लष्करास आपले पदरीं ठेवून आमच्याशीं लढण्याची या संस्थानिकांची तयारी आहे.

"मी चार्ज घेतांच माझे डोळ्यांसमोर सात तंटे असे दिसतात कीं ते लढाईवर येतील. त्यांपैकीं रेवा, सांवतवाडी, कर्नूल वगैरेंशीं शस्त्राचा प्रसंग आलाच पण आम्हांस जय मिळाला. सिंध, नेपाळ, आवा येथील तंटे मीं आपसांत मिटविले. पण या सर्वांच्या मनांत आमच्याविषयींचा द्वेष शिल्लक आहेच.

"आमच्या वाढत्या सत्तेविषयीं साधारणपणें वाटणारा मत्सर जरी सोडून दिला तरी क्षुल्लक कारणाकरितां आम्हीं भोंवतालच्या संस्थानिकांस जाणूनबुजून जो त्रास देतों त्यामुळें तर आमचेविषयीं फारच द्वेष उत्पन्न होतो. आमचें सैन्य एखाद्या लढाईत गुंतलें कीं सर्व शत्रू आमचेवर हल्ला

करण्याची अगदीं वाट पहात असतील व असा एखादा शत्रु केव्हां तयार होईल याचा मुळींच नेम नाहीं. रणजितसिंगाच्या मनांत आमच्याविषयी द्वेष व स्वतःच्या सैन्याच्या पराक्रमाचा भरंवसा आहे व आमचेशिवाय त्यास शत्रु उरलेला नाहीं. आवाच्या राजालाहि आपल्या सैन्याची खात्री आहे व त्यानें चितगांगवर हल्ला केल्यास या पूर्वपश्चिम दोन्ही टोकांस लढाई चालविण्यासच आमचे जवळ सैन्य नाहीं. असें झाल्यास पेंढारी व हिंदुस्थानांतील मराठे वगैरे इतर शत्रू कांहीं कारण नसतांनाहि सहज आमचे विरुद्ध लढाई पुकारतील. अयोध्येच्या नबाबानें आम्हांस जो मुलूख दिला तो अशा समजुतीवर कीं, आतां राहिलेल्या प्रांतांत तरी इंग्रजांची ढवळाढवळ रहाणार नाहीं व आपलें संरक्षण मात्र इंग्रज करतील. पण आम्हीं त्याच्या राहिलेल्या प्रांताच्या अंतर्गत कारभारांतहि इतकी ढवळाढवळ करतों की त्याला कांहीं स्वातंत्र्य नाहीं. यामुळें त्यानें आपली नाराजी भर दरबारांत बोलून दाखविली आहे. वऱ्हाडचा राजा[१] आमच्याविषयींचा संशय उघड बोलून दाखवितों. निजामाच्या मनांतहि आमचेविषयीं पूर्ण द्वेष आहे परंतु तो अगदीं जखडून गेला आहे. म्हैसूरचा राजा व रेसिडेंट यांजमध्यें सारखीं भांडणें चालू आहेत. शिंद्याला आपलें लष्कर आवरून धरणें कठीण झालें आहे व आमचे शेजारच्या मुलखांत तें मोकळें सोडल्याशिवाय त्याला वाव नाहीं. अमीरखानहि आमचे विरुद्धच आहे.

"होळकराचे सैन्यास उद्योग नसल्यामुळें तें कायम ठेवण्याकरितां त्यानें पेंढाऱ्यांशीं एकजूट करून भोंसल्यांच्या मुलखावर पेंढारी सोडले आहेत. भोंसल्यांच्या मुलखाचें संरक्षण करण्याची जबाबदारी जरी आमचेवर नाहीं तरी त्यामुळें आम्हांलाहि त्रास होण्याचा संभव असल्यामुळें मागील प्रसंगीं लॉर्ड मिंटो याला सैन्य पाठवून नागपुरच्या मुलखांतून पेंढाऱ्यांना घालवावें लागलें. इतकें करूनहि आपलेवरील संकट दुसऱ्यावर घालण्याकरिता नागपूरकर पेंढाऱ्यांना इंग्रजी मुलखावर हल्ला करण्याबद्दलहि सल्ला देणार नाहींत असें नाहीं."

१ नागपूरकर भोंसले. यांना सर्व इंग्रजी कागदपत्रांतून चुकीनें वऱ्हाडचे राजे व नागपुर राज्यास वऱ्हाड असें म्हटलें आहे. खुद्द भोंसले मात्र आपणास वऱ्हाडचे राजे असें कधीं म्हणत नसत.

"एकंदरींत पूर्वीं कधीं न आलेलें संकट येण्याचीं चिन्हें मला माझेभोंवतीं दिसत आहेत व हें सर्व संकट आम्हीं या संस्थानिकांना आमच्याशीं त्यांचा संबंध कसा राहणार याची खरी कल्पना न दिल्यामुळें व आम्हीहि स्वतः करून न घेतल्यामुळें उत्पन्न झालें आहे. आमच्या सर्व तहनाम्यांत आम्हीं त्यांना स्वतंत्र राजे म्हणून लिहितों व मग हळूच आम्हीं त्यांचे दरबारीं आपला रेसिडेंट पाठवितों. हा रेसिडेंट परराष्ट्राचा वकील या नात्यानें त्या संस्थानिकाशीं न वागतां त्याचेवर हुकमत गाजवितो. त्याच्या सर्व अंतस्थ कारभारांत ढवळाढवळ करतो. संस्थानिकाच्या विरुद्ध असलेल्या त्याच्या प्रजेस आपल्या पाठीशीं घालतो व आपल्या अधिकाराचें खूप प्रदर्शन करतो. या सर्व प्रकारांत रेसिडेंटास आमच्या कौन्सिलाचें पाटबळ असतें.

"**इंग्रजी रेसिडेंटाचा हिं. संस्थानिकांवर वरचष्मा**—संस्थानिकांच्या मनांत अत्यंत बोंचणारी गोष्ट म्हणजे ही कीं आम्ही एक राजा मेला म्हणजे त्याच्या गादीवर कोणास बसवावें हें ठरविण्याचा अधिकार आमचा आहे असा हक्क दाखवितों. मुसलमानी रिवाजाप्रमाणें संस्थानिक मेला म्हणजे त्याच्या मुलांपैकीं ते सर्व मिळून जो योग्य म्हणून ठरवितील तो मनुष्य गादीवर बसवावयाचा; पण आम्हीं त्याविरुद्ध वडील मुलाचाच हक्क रेटतो. तो गादीवर बसला म्हणजे तेवढ्यापुरतें त्याला बरें वाटतें; परंतु नंतर त्यालाहि आपल्यामागें काय होईल याची भीति व संशय वाटूं लागून तो मनापासून आमचा द्वेष करतो. एवढा द्वेष उत्पन्न करून त्या मानानें फायदा कांहींच होत नाहीं.

"माझ्या मतें आम्हीं संस्थानिकाच्या इतर कोणत्याहि कामांत हात घालू नये. लढाईच्या प्रसंगीं त्यांनीं आम्हांस मदत करावी व आमचे इतर स्नेही आहेत त्यांच्यावर हल्ला करूं नये व त्यांच्यामध्यें एकमेकांत कांहीं लढा असल्यास आमच्या मध्यस्थीनें तो तोडावा. न तुटल्यास जो आमचा निकाल ऐकणार नाहीं त्याचा तहनामा रद्द समजावा. एवढ्याच दोन शर्ती असाव्यात म्हणजे मग आमचेविषयीं या संस्थानिकांची द्वेषबुद्धि राहणार नाहीं."

वरील विचारसरणी अगदीं सरळ व स्वाभाविक होती. परंतु इंग्लंडातून नुकत्याच आलेल्या या हुशार गृहस्थास हिंदुस्थानांतील लोकांमध्यें

संरक्षणाकरितां एकजूट करण्याची साधी अक्कलहि राहिली नव्हती, तेथें दूरदर्शीपणा, एकमेकांत विश्वास व परिणामास तयार राहाण्याइतक्या स्वार्थत्यागाची तयारी ही कोठून राहणार या गोष्टीचा कयास सहाजिकच बाधतां आला नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांची अवनति कोणत्या पायरीवर गेली होती हें त्याला समजलें नाहीं. शिंदे, होळकर, भोंसले व पेशवे हे नांवानें व परंपरेनें एकाच मराठी साम्राज्याचे घटक जर एकसमयावच्छेदें करून दुसऱ्या व तिसऱ्या मराठी युद्धांत एकजुटीनें लढूं शकले नाहींत तर **रणजितसिंग**, अयोध्येचे नवाब, ब्रम्हदेश व नेपाळचे राजे, निजाम व मराठे हे परस्परांपासून अगदींच भिन्न भिन्न मनोवृत्तीचे लोक कसचे एकजूट करणार ? **यशवंतराव होळकर** पंजाबापर्यंत स्वत: जाऊन आला व भोंसले पेशवे, शिंदे, रजपूत यांच्याकडे पत्रद्वारें व माणसें पाठवून त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. शिंद्यानेंहि भोंसल्याकडे वकील पाठविले. परंतु एके वेळी एकजुटीनें सर्वांनीं लढाई दिली नाहीं. आंतून मात्र प्रत्येक जण खरोखरीच इंग्रजांचा द्वेष करीत होता व सर्वजण मिळून इंग्रजांच्या कचाटयांतून सुटून मराठी साम्राज्याची घडी पुन्हा बसवावी ही सर्वांची प्रामाणिक इच्छा होती. परंतु या इच्छेस लागणारी खटपट व स्वार्थत्याग करण्यास कोणीच तयार नव्हता. या व इतर अनेक कारणांनीं हा योग सिद्धीस गेला नाहीं.

**नाग.शी तैनाती तह करण्याचा पहिला प्रयत्नः**—लॉर्ड **हेस्टिंग्ज** यानें हा कच्चेपणा पाहून सर्व इंग्रजी सैन्याची सुधारणा करून त्यांना निरनिराळया योग्य जागीं ठेवण्याची खटपट चालविली. पुणें खेरीज करून मराठयांच्या इतर दरबारांशीं सबसीडियरी तह झालेले नव्हते. त्यामुळें नागपुर, इंदूर व ग्वाल्हेर येथें इंग्रजी लष्कर नव्हतें. पूर्वेस बंगाल व पश्चिमेस पुणें यांचे दरम्यानचे टापूंत मुळींच सैन्य नव्हतें म्हणून नागपुरास सबसीडियरी तह करून इंग्रजी लष्कराचें एक तरी ठाणें असावें व भोंसल्यांचें सैन्य कमी होऊन त्यापासून आपणास भीति नसावी; याकरितां लॉर्ड हेस्टिंग्ज यानें फारच धडपड केली, हेस्टिंग्जच्या पूर्वींच **लॉर्ड वेलस्ली** यानेंहि म्हैसूर, निजाम, अयोध्येचे नवाब व गायकवाड यांशीं १७९९ ते १८०२ पर्यंत सबसीडियरी तह केले व नागपुर व पेशवे यांच्याशीं तह करण्याचे प्रयत्न चालविले होते. नागपुरास मुद्दाम रेसिडेंट पाठवून राजाशीं एकमेकास मदत

करण्यापुरता मित्रत्वाचा तह करण्याचें संधान लावण्याकरितां प्रख्यात संस्कृत पंडित **कोलब्रुक** यास वेलस्लीनें नागपुरास इ. स १७९९ मध्यें पाठविलेंच होतें. राजाच्या व दरबारी मंडळीच्या गोड गोड भाषणानें फसून बिचाऱ्यानें खूप उमेदीची पत्रें गव्हर्नर जनरल यास लिहिलीं होतीं कीं राजा असा तह करण्यास कबूल आहे एवढेंच नव्हे पण अत्यंत उत्सुक आहे. नागपुरच्या सरकारी दप्तरखान्यांतील इंग्रजी पत्रव्यवहार या पत्रव्यवहारानें पूर्ण भरलेला आहे. तह करण्याचें कबूल पण तह मात्र होईना. एक वेळां तर उद्यां तह करण्याचें पक्कें ठरलें व **कोलब्रुक** साहेब आतां तह होऊन पुष्कळ दिवसांची आपली इच्छा पूर्ण होऊन गव्हर्नर जनरलास ही आनंदाची बातमी केव्हां कळवूं अशा सुख-स्वप्नांत होता; तों दुसरे दिवशीं राजा वाघाच्या शिकारीस निघून गेल्याची बातमी बिचाऱ्यास समजली. इ. स. १८००मध्यें राजानें रेसिडेंटामार्फत निजामाशीं नुकत्याच झालेल्या तहाचा नमुना पाहाण्याकरितां मागविला. **वेलस्लीनें** तो राजास पाहण्यास पाठविला व तशाच प्रकारचा एक मसुदा नागपुरकराशीं करण्याच्या तहाकरितां म्हणून कोलब्रुक याजकडे पाठविला व कोलब्रुक यानें राजाकडे पाठविला. त्यांत इंग्रज, निजाम व भोंसले यांच्या त्रिकूटामध्यें एकमेकांशीं संरक्षक व लढाऊ सोबतीच्या शर्ती होत्या. त्यामुळें इंग्रजांचा जो शत्रु अगर मित्र तोच या सोबत्यांचाहि होणार. शिवाय यांत हळूच निजामाप्रमाणें नागपुरासहि इंग्रजी लष्कर राजाच्या खर्चानें ठेवावें असें कलम घातलेलें होतें. रघूजी भोंसल्यासारखा मुरलेला व चाणाक्ष मनुष्य अशा डावपेचांनीं फसला जाणारा नव्हता, त्यानें असा तह करण्याचें स्पष्ट न नाकारतां उडवाउडवी चालविली. शेवटी कोलब्रुकच्या लक्षांत आलें कीं राजा आपल्या जाळ्यांत सांपडत नाहीं. शेवटीं लॉर्ड **वेलस्लीनें** १८०१ मध्यें ( ता. १८ मे १८०१ ) **कोलब्रुक** यास परत बोलावून नागपुरची रेसिडेन्सी मोडली व नागपुरच्या दरबाराशीं काम पडल्यास बोलण्याचें काम त्यानें पुण्याच्या रेसिडेंटांकडे दिलें.[१]

---

१ मागें भाग १० पहा.

**आसईच्या** लढाईनंतर रघूजीच्या मरणापर्यंत गव्हर्नर जनरल वेलस्ली, मिंटो व हेस्टिंग्ज यांनींहि दुसरे रघूजीस इंग्रजी लष्कर घेऊन सबसीडियरी तह मान्य करण्याकरितां किती खटपटी केल्या हें इतरत्र दिलेंच आहे. परंतु त्यानें आपल्या हयातींत इंग्रजांचा हा डाव साध्य होऊं दिला नाहीं व नागपुरच्या राज्यांत इंग्रजांचें ठाणें टिकूं दिलें नाहीं.

**पेंढारी**—लॉर्ड **हेस्टिंग्ज** आला त्या वेळीं मध्य हिंदुस्थानांत पेंढाऱ्यांचें ठाणें असे. त्यांना शिंदे, होळकर यांचें मुख्यत्वें साह्य असे, ते नांवाला शिंदे होळकरांचे नोकर म्हणवीत पण त्यांच्या ताब्यांत कधींच रहात नसून चारी दिशेस लुटालूट करीत हिंडत. जरूरीच्या प्रसंगीं मात्र शिंदे, होळकर लढाईच्या वेळेपुरते त्यांना हाताशीं धरून व थोडेबहुत पैसे देऊन अगर नुसता मुलूख लुटण्याची परवानगी देऊन लढाईच्या बरोबर बाळगीत. कित्येक वेळां त्यांच्या लुटींतला हिस्साहि घेत. परंतु मुख्यत्वें शत्रूचा मुलूख लुटून दाणावैरण नाहींशी करण्याकडे त्यांचा विशेष उपयोग करीत. फुरसतीच्या वेळांत ते शिंदे, होळकर व राजपुतान्यांतील जयपुर, जोधपूर वगैरे भाग सोडून सबंध महाराष्ट्र, निजामाचें राज्य, उत्तर हिंदुस्थान वगैरे सर्व भागांत लुटालूट करीत. ते मद्रासपर्यंत दक्षिणेस गेले होते. त्यांचें लष्कर तीस हजारांपर्यंत होत असे. त्यांचें ठाणें मध्य हिंदुस्थान म्हणजे माळव्यांत असल्यामुळें त्या लगतच्या भोंसल्यांच्या मुलखास त्यांचा उपद्रव फार असे. जबलपुर, सोहागपुर, नर्मदेचे दोन्ही कांठ या भागांत तर त्यांचा उपद्रव नेहमीचाच असून कित्येक वेळां तर ते नागपुरापर्यंत येऊन लुटालूट करीत. पुढें पुढें तर त्यांच्या स्वाऱ्या दरसाल नागपुरापर्यंत येऊं लागल्या. जबलपुरची लूट व श्रीनगरचा हल्ला याविषयीं वर्णन इतरत्र दिलेंच आहे. कित्येक वेळां तर नागपुरच्या पेठा पेंढाऱ्यांनीं लुटल्या त्यावेळीं जहांमर्दी केल्याबद्दल **रघूजीनें** सरदारांस प्रशस्ति पत्रें व आश्वासन पत्रें दिलेलीं उपलब्ध आहेत.

भोंसल्यांचा प्रांत सर्वांत मोठा, बंगाल्यांतीलहि आवक पूर्वी बरी झालेली. असें असतां पेंढाऱ्यांचा बंदोबस्त भोंसल्यांस कसा करतां आला नाहीं याबद्दल आश्चर्य वाटतें. दुसरा रघूजी कृपणपणाबद्दल बराच प्रसिद्ध आहे. त्याचे-

जवळ पैसाहि पुष्कळ होता असें तो मेल्यावर धर्माजी भोंसल्याजवळ जो खजिना निघाला त्यावरून वाटतें. परंतु यांतील पैसा राज्याचे मजबुती-करितां खर्चण्याचे ऐवजी स्वत: खाजगी संपत्ति म्हणून ठेवण्याकडे त्याची प्रवृत्ति असे ही इंग्रजांची ओरड खरी दिसते. शिवाय पेंढाऱ्यांचा मोड करण्याकरितां नवीन लष्कर ठेवण्याचाहि त्यानें पुष्कळ वेळां प्रयत्न केला; व शिपायांचीं हत्यारें, घोडीं, कपडे, वगैरे सुधारण्याचाहि प्रयत्न केला परंतु आमच्याविरुद्ध लढण्याचीच ही तयारी आहे असा संशय इंग्रज रेसिडेंटास येऊन तो वर गव्हर्नर जनरल याजकडे विरुद्ध रिपोर्ट पाठवी व राजास तंबी देववी. तशांत शिंदे, होळकर व पेशवे यांचा गुप्त पत्र-व्यवहार व जासूद, वकील यांचें येणेंजाणें नेहमीं चालू असे व राजाच्या पदरचे मुत्सद्दी व इतर हेर फितूर झालेले असून सर्व बातम्या रेसिडेंटाच्या कानावर घालीत. त्यामुळें राजा त्रासून गेला होता. इंग्रजांस दुखविण्याची त्याची हिमत नव्हती. स्वत: उतारवय झालेला, मुलगा वेडसर, भाऊ व्यंकोजी याशीं वांकडेपणा, मुत्सद्दी अविश्वासू या कारणांमुळें त्याला कोणावरहि विश्वास ठेवतां येईना म्हणून सर्व स्थिति कळत असतांहि अत्यंत शांततेनें व शहाणपणानें स्वसंरक्षणावरच त्यानें भिस्त ठेविली.

**पेंढाऱ्यांचा जुलूम**:—पेंढाऱ्यांच्या दुष्कृत्यांचीं वर्णनें वाचलीं म्हणजे अंगावर कांटा उभा राहतो. **जयराम घाटग्याचे** वेळीं **जबलपुर** शहराची त्यांनीं मोठी दुर्दशा केली. पण यापेक्षां शतपट घोर कृत्यें खेडोपाडीं व प्रवासांत ते नित्यशः करीत असत. त्यांच्या दुष्कृत्यांचें लॉर्ड हेस्टिंग्ज यानें एका ठिकाणीं केलेलें वर्णन पुढीलप्रमाणें आहे.

" ता. १५ एप्रील १८१६ इ.—गंतूर सरकार (मद्रास)हून मला आज जें एक पत्र आलें आहे तें फार हृदयद्रावक आहे. एका गांवास पेंढाऱ्यांनीं वेढा दिला. इतर गांवीं या पेंढाऱ्यांनीं केलेल्या क्रूर कृत्यांची बातमी ऐकून या गांवच्या असहाय व दीन लोकांनीं आपल्या बायकामुलांसुद्धां जाळून घेण्याचा निश्चय केला. सर्व घरें लाकडी व ताडपत्र्यांचीं होतीं. त्यामुळें झोपड्यांस आग लावतांच सर्व जळून गेलीं. कांहीं मुलांना आगीच्या ज्वाला सोसवेनात. तीं पळून बाहेर निघालीं व त्यांनीं इतर ठिकाणीं जाऊन ही

हकीकत सांगितली. बाकीचे सर्व लोक जळून मेले. इतकें असूनहि मराठयांशीं (शिंदे होळकर) लढाई ओढवेल या भीतीनें या नरराक्षसांशीं (पेंढाऱ्यांशीं) वैर करूं नये म्हणून कोर्ट ऑफ डायरेक्टरांचा मला सक्त हुकूम आहे. भोंवतालच्या गांवांच्या बायकांवर बलात्कार झाल्यामुळें, आपले पातिव्रत्याचा भंग झाल्यामुळें व जगांत तोंड दाखविण्याची लज्जा वाटल्यामुळें शेंकडों बायकांनीं विहिरींत जीव दिले. जितक्या तरुण मुली त्यांना सांपडल्या तितक्या तीन तीन, चार चार एकेका घोड्यावर वासरांप्रमाणें बांधून त्यांनीं विकण्याकरितां धरून नेल्या. निजामाच्या व आमच्या मुलखांत शिर-लेल्या पेंढाऱ्यांचीच बेरीज तेवीस हजार होईल व त्यांनी लुटलेल्या द्रव्याचा हिशेब दहा लक्ष पौंडांवर येईल. ''

याशिवाय जबरीनें द्रव्य काढण्याकरितां ते घरमालकाचे जे हाल करीत व घरें दारें, भिंती वगैरेसुद्धां खणून टाकीत त्याचीं वर्णनें आतां-पर्यंत कागदोपत्रीं व परंपरेनें ऐकूं येतात. नर्मदेच्या कांठी गिराशी म्हणून पेंढाऱ्यासारखेच लोक असत तेहि रस्त्यानें जाणाऱ्या मोठमोठ्या लोकांच्या बायकामुलांना पैशाकरितां धरून नेत मग त्यांच्या नातेवाईकांनीं जबर पैसे देऊन त्यांना सोडवून न्यावें. ''

**नागपुरचे मुलखांत पेंढाऱ्यांचा उपद्रव**—या सुमारास उत्तर हिंदुस्थानांत पेंढाऱ्यांचा फार उपद्रव होता. शिंदे, होळकर व इतर लहानमोठे संस्थानिक त्यांचा लढाईत व विशेषतः शत्रुपक्षाच्या मुलखांत लुटालूट करण्यांत उप-योग करून घेत असत. त्यामुळें शिस्तवार लढाई न करतां लुटालूट करून धुमाकूळ घालण्यास त्यांना वाव मिळे. त्यामुळें पेंढाऱ्यांचा वर्ग फारच वाढला होता. त्यांच्या मोठमोठ्या टोळ्या निरनिराळ्या नाईकांच्या हाताखालीं असत. त्यांत **अमीरखान**[१] व **चित्तू** पेंढारी हे विशेष प्रसिद्ध असत. **अमीरखान** हा **यशवंतराव** होळकराचा हस्तक होता. तसेंच शिंद्याचें व त्याचेंहि सूत

---

१ **अमीरखान** हा टोंकच्या नबाबाच्या संस्थानचा संस्थापक. हा पेंढा-ऱ्यांच्या वर्गापैकी होता. तो स्वतःस यशवंतराव होळकराच्या पदरचा सर-दार म्हणवीत असे. परंतु वास्तविक त्याचा संबंध सरदाराप्रमाणें नसून होळ-कर त्याचा उपयोग शत्रूंच्या विरुद्ध करून घेऊन त्यास आपले राज्यांत आश्रय

होतें. होळकर व इंग्रज यांचें युद्ध चाललें त्या वेळेस भोंसल्यांनीं आपणास मिळावें म्हणून यशवंतराव होळकरानें आपली पराकाष्ठा सुरू केली. त्यानंतर अमीरखानानें भोंसल्याच्या उत्तरेकडील मुलखांत लुटालूट सुरूं केली. शिंदे व होळकर या दोघांचीहि या पेंढाऱ्यांस भोंसल्याविरुद्ध चिथावणी होती असा त्यावेळीं संशय होता. तसेंच भोपाळचा मुलूख भोंसल्यानें १८०७ मध्यें घेतल्यामुळें भोपाळच्या नबाबानें **अमीरखाना**बरोबर आपलें सैन्य दिलें व भोंसल्यांचे मुलखांत लुटालूट सुरू केली. पेंढाऱ्यांपासून व बुंधेल्यांपासून आपल्या उत्तरेकडील राज्याचें संरक्षण कसें करावें हा राजास मोठाच प्रश्न पडला. प्रथम त्यानें पैसे देऊन चित्तू पेंढाऱ्यास आपलेकडे वळविण्याचा प्रयत्न केला पण तो फारच पैसे मागूं लागला म्हणून भोंसल्यानें त्याचा नाद सोडला. त्यानें लष्कर वगैरे वाढविल्यास रेसिडेंटास संशय येई. शेवटीं रेसिडेंटाच्याच सल्ल्यानें वरील कारण दाखवून त्यानें सैन्य वाढवून निरनिराळ्या टोळ्या निरनिराळ्या ठाण्यांवर पाठवून दिल्या.

**जबलपूर लुटलें १८०९ इ०**----वर सांगितल्याप्रमाणें अमीरखानानें भोपाळचें सैन्य मदतीस घेऊन जबलपुरावर अचानक हल्ला केला. त्यावेळीं जबलपुरचे ठाण्यावर **जिजाबा घाटगे** म्हणून भोंसल्यांचा सुभेदार होता व त्याचेपाशीं फक्त पांचशें स्वार व चार तोफा होत्या. **अमीरखान** जबलपुरावर चालून येतो अशी घाटग्यास बातमी लागली व त्याचेबरोबर **करीमखान** पेंढाऱ्याची टोळी, भोपाळ व होळकरशाहींतील पेंढारी मिळून बराच जमाव आहे हेंहि समजलें. एवढ्या मोठ्या सैन्याशीं तोंड देण्याइतकें सैन्य त्याचेजवळ नव्हतें सबब जबलपुरचे लोक मंडल्याकडे पळून जाण्याचे तयारींत होते व ते **जिजाबाची** परवानगी मागूं लागले. परंतु धाडशी **जिजाबा** तें ऐकेना. त्यानें आपले थोडे लोकांनिशीं **मीरखानाशीं** तोंड देण्याचें ठरविलें व सामोरा झाला. पेंढाऱ्यांचा जमाव मोठा, त्यामुळें त्यांनीं **जिजाबा**-

---

देत असे. जयपुर, जोधपुरचे संस्थानांतहि त्याचें ठाणें असे. दूर दूर मजला मारून मुलूख लुटणें हा त्याचा धंदा. त्याचें सैन्य बरेंच मोठें झाल्यावर मात्र तो आपणास पेंढारी म्हणवीत नसे. इंग्रजांनीं पुढें त्यास टोंकचे संस्थानिक बनवून गप्प केलें.

चा पराभव करून त्याच्या चारी तोफा हिसकून घेतल्या. **घाटगे** जखमी होऊन मंडल्याच्या किल्यांत पळून गेला. **मीरखानानें** जबलपुरावर येऊन तिलवाड्यावर [१] मुक्काम केला. त्याच्या धाकानें जबलपुरची सर्व रयत घरें वगैरे सोडून पळून जबलपुराचे पूर्वेस चार कोस पहाडाचे माचीस तळ्याच्या कांठीं [२] उतरली. पेंढारी तेथेंहि त्यांचेवर जाऊन पडले. पेंढाऱ्यांनीं बरींच माणसें कापून काढलीं. तीनचारशें माणसें, बायकामुलें तळ्यांत पडून मेलीं. कांहीं लोक नावांमधून नर्मदा उतरून जात होते त्यांतीलहि दोनतीनशें माणसें नाव बुडून मेलीं. याप्रमाणें जबलपुरचा बराच नाश झाला. शिवाय पेंढाऱ्यांनीं शहरांत घुसून घरें खणून जें वित्त सांपडलें तें नेलें व देवस्थानें फोडून टाकली. तसेंच गढामंडल्याचा सर्व मुलूख लुटून उध्वस्त केला.

**पेंढाऱ्यांवरील स्वाऱ्या**—नर्मदेच्या दक्षिण व उत्तर कांठावर पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्याकरितां राजानें **विठ्ठल बल्लाळ सुभेदार, बेनिसिंग जमादार, रघुनाथरावबाजी घाटगे,** व **महमद अमीनखान** शिवणी छपारेवाले यांना नर्मदेच्या उत्तरेस पाठविलें (१७९९ इ.). तसेंच कांही फौजा दक्षिणेकडेहि पाठविल्या. त्यांनीं चौरागड, भवरगड, साखरगड वगैरे किल्ले काबीज केले. **मीरखान** हा सागरावर चाल करून आला. सागरप्रांत पेशव्यांकडून **गोविंदपंत बुंदेले** यांचा मुलगा **बाळाजी,** याचे ताब्यांत होता. त्यानें आपले बचावाकरितां **विठ्ठलपंत** सुभेदार व **रघुनाथराव** घाटगे यांजकडेस बोलणें लावलें. मंडला व तेजगड हीं ठाणीं बाळाजीनें भोंसल्यास द्यावीं या शर्तीवर त्यांनीं मदत देण्याचें कबूल केलें. तीं ठाणी काबीज करून उभयतांनीं **बाळाजीस** मदत देऊन **मीरखानाचा** मोड करून त्यास हांकून लाविलें. घाटगे यानें या मोहिमेंत चांगलें काम केल्यामुळें त्यास रघूजीनें त्या प्रांताचा सुभेदार नेमिलें. सुभेदाराचा मुक्काम जबलपुरास होता.

पेंढारी यांचा उपद्रव **शिवणी हुसंगाबाद**पासून **जबलपूर**पर्यंत एकसारखा होतच होता. तो वाढत वाढत नागपुरापर्यंत आला. पेंढाऱ्यांनीं **रामटेक** व **भंडारा** हीं शहरें लुटलीं व नागपुरापर्यंत चाल केली. रघू-

---

१ जबलपुरचे दक्षिणेस.

२ औरंगाबादकरांची बखर (अप्रकाशित).

जीनें **सिद्दिकअल्लीखान** यास पेंढाऱ्यांवर पाठविलें. त्यानें पेंढाऱ्यांचा इतका पिच्छा पुरविला कीं ते पळून नर्मदेच्या उत्तरेस निघून गेले. सिद्दिक अल्लीखान यानें नर्मदेच्या दक्षिण कांठीं **शहापुराजवळ** चार महिने छावणी केली. त्यासच रघूजीनें नर्मदेची सुभेदारी देऊन वस्त्रें व शिक्के-कटचार देऊन त्याचा मोठा सन्मान केला.

पेंढाऱ्यांची गडबड नागपुरास समजतांच राजानें **मीरखाना**विरुद्ध कांहीं सैन्य पाठविलें. शिवाय **सिद्दिकअल्लीखान** व **मालजी अहीरराव हे** दोघे नागपुरकर सरदार नर्मदेच्या दक्षिणेस होते त्या सरदारांचे सैन्यास **मीरखानानें श्रीनगराजवळ** घेरा दिला व निमित्त उकरून काढलें कीं "आमचे धनी यशवंतराव होळकर यांस इ. स. १७९९ मध्यें ते पुण्याहून पळून जात असतां भोंसल्यांनीं पकडून नागपुरास कैदेंत ठेवलें. त्यावेळीं त्यांचें बरेंच जडजवाहीर नागपुरास राहिलें तें तुमचे मालकाकडून देववा." वास्तविक होळकराकडून मीरखानास अशी कांहीं कामगिरी मिळालेली नव्हती, परंतु तंटयास कांहीं तरी कारण दाखवावें म्हणून मीरखानानें हें निमित्त सांगितलें. होळकराचा वकील **केशवराव व्यंकटेश** यावेळीं नागपुरास होता. त्याच्याकडे राजानें आपले वकील पाठवून **मीरखानाचा** त्रास होळ-करास लिहून मिटविण्याबद्दल सांगितलें. परंतु त्यानें सांगितलें कीं, "**यशवंत-राव होळकरास** वेड लागलें आहे व **मीरखान** यास दाबणारा दर-बारांत कोणीहि नाहीं. तुम्हास जमेल त्याप्रमाणें मीरखानाचें पारिपत्य करा. आमची त्यास हरकत नाहीं."

**इ. स. १८१०**—**सिद्दिकअल्लीखान** व **मालजी अहीरराव** यांस मीरखानानें वरप्रमाणें अडवून धरलें. सबब **सिद्दिकअल्ली-खानानें** अकरा लक्ष रुपये **मीरखानास** देण्याचें कबूल केलें व चौघेजण सरदार मीरखानास रुपये देईपर्यंत त्याचे ओलीस दिले. एक खुद्द **मालजी अहीरराव**, दुसरा खडगभारतीचा चेला **अमरदास**, तिसरा **झुलफिकारखान** व चवथा **नाजीमसाहेब**. मीरखानानें नर्मदा उतरून परत उत्तरेकडे जावें म्हणजे ही रक्कम दिली जाईल असा सिद्दिक अल्लीखानानें करार केला होता त्याप्रमाणें मीरखान श्रीनगरचे मैदानांतून

निघाला व नर्मदा उतरूं लागला व सिद्दिक अल्लीनें आपलें लष्कर गाडर-वाड्याकडे नेलें. इकडे रघूजी भोसल्यानें **अमृतराव बक्षी** व **भोइटे** यांज-बरोबर लष्कर व तोफखाना देऊन **सिद्दिकअल्लीचे** मदतीस पाठविलें. तसेंच गव्हर्नर जनरल यांनीहि मीरखानास तंबी दिली कीं नागपुरच्या मुलखास तुम्ही त्रास देऊं नये. तसेंच पेंढाऱ्यांचा उपद्रव मोडण्याकरितां गव्हर्नर जनरल यानें स्वतंत्रपणें एक मोहीम काढली, त्यांतच **कर्नल क्लोज** हा पुण्याजवळील घोडनदीचें इंग्रजी पलटण, तसेंच जालन्याचें पलटण व सला-बतखान एलिचपुरकर याची मोंगलाई फौज घेऊन एलिचपुराहून **मोरशी, शेंदूरजन**, या बाजूनें उत्तरेस मीरखानाचे रोखानें गेला तो यावेळीं नर्म-देच्या जवळपास आला होता. तसेंच बुंदेलखंडांतून **मार्टिन्डेल** नांवाच्या इंग्रज सरदारानेंहि मीरखानावर चाल केली. त्यामुळें **मीरखानानें** घाबरून **सिद्दिक अल्लीच्या** शर्ती कबूल केल्या. त्याची फौज व बाजारबुणगें झांशी घाटानें नर्मदा उतरून गेलें होतें व तो स्वतः व सर्व लष्कर मागें राहिलें होतें. तोंच नागपुराहून भोंसल्यांचें लष्कर आलें. **सिद्दिकअल्लीनें** कबूल केलेली रक्कम आमचे राजास मान्य नाहीं. असा निरोप नागपुरच्या सरदारांनीं **मीर खानास** पाठविला व लढाई सुरू केली. **सिद्दिकअल्लीनें** मीरखानावर तुटून त्यावर तोफा चालविल्या व त्याचा मोड केला. त्या गडबडींत ओलीपैकीं **मालजी, अमरदास** व **झुलफिकारखान** हे पळून नागपुरचे सैन्यास मिळाले व एकटा **नाजीम** मात्र मागें राहिला. परंतु शेवटीं मीरखानानें त्याला सोडून दिलें. मीरखानाचा हत्ती निशाणासुद्धां पाडाव झाला व त्याचें एकं-दर एक हजार मनुष्य मारलें गेलें व कांहीं नर्मदेंत बुडालें. भोंसल्याकडीलहि तीन चारशें माणूस जाया झालें. मीरखानाचे लढाईत **उदाजी नवघरे, नारायण बाजी घाडगे, माणकोजी भोइटे, गुलाम हैदरबक्ष, बक्षीराम सुभेदार** वगैरे सरदार प्रसिद्धीस आले. मीरखानानें जबलपुर शहर दोनदां लुटलें. शेवटीं नागपुरचे सैन्याचा व इंग्रजांचा जोर पाहून त्यानें मागें पाय घेतला.

**भोपाळचें राज्य शिंदे व भोंसले यांनीं घेतलें इ. स. १८०७**— इ. स. १८०३ चे इंग्रजमराठ्यांच्या लढाईचे गडबडींत भोपाळचा नबाब वजीर अहमदखान यानें भोंसल्याचीं हुसंगाबाद व शिवणी हीं ठाणीं काबीज

केलीं. हा प्रांत भोंसले व भोपाळवाल्यांच्या सरहद्दीवर असल्यामुळें ज्याचा जास्त जोर होईल तसा त्या दोघांकडे जाई. देवगांवच्या तहानंतर हीं ठाणीं परत घेण्याकडे रघूजीनें लक्ष घातलें. तसेंच पेंढारी भोंसल्यांच्या मुलखांत लुटालूट करीत; त्यास भोपाळवाल्याची मदत असे. त्या सुमारास दक्षिणेस दुष्काळ पडला होता व मागील युद्धामुळें खजिनाहि रिकामा झाला होता. त्यामुळें पूर्ववत् स्थिति येण्यास दोनतीन वर्षें लागलीं. त्यानंतर रघूजीनें तयारी केली व शिंद्याशीं एक तात्पुरता तहनामा करून शिंद्यानें भोंसल्यांस हुसंगाबाद वगैरे ठाणीं घेण्यास मदत करावी असा करार केला.

इ. स. १८०७ मध्यें भोंसल्याचे सैन्यानें भोपाळवर मोर्चा फिरविला व **चैनपुरवाडी व चौकीगड** हीं ठाणीं काबीज केलीं. तसेंच त्यांनीं **गढाकोटास** वेढा दिला. परंतु तितक्यांत शिंद्याच्या पदरचा सरदार **जॉन बॅपटिस्ट** यानें भोंसल्यांच्या सैन्यावर छापा घालून तें ठाणें आपणच घेतलें. उत्तरेकडून शिंदे व दक्षिणेकडून भोंसले अशा कचाट्यांत भोपाळचा नबाब पडला. भोंसल्यांचे सैन्यानें पाहिलें कीं आपल्या मार्गांत शिंद्याचें हें मोठेंच विघ्न आहे. त्यास मिळवून घेतल्याशिवाय काम सुकर होणार नाहीं. शेवटीं भोंसल्यांनीं शिंद्याशीं एकमत करून पुन: दुसरा तहनामा करून ठरविलें कीं दोघांनीं मिळून भोपाळचा मुलूख जिंकून निमानिमा वाटून घ्यावा. हा तह मुक्काम **रातगड** प. **सागर**नजीक वैशाख वद्य ५ शके १७२९ रोजीं झाला. या कराराप्रमाणें शिंदे व भोंसले यांनीं भोपाळावर स्वारी करून सर्व मुलूख जिंकून घेतला व त्यांच्या ेन सारख्या वांटण्या[१] करून घेऊन आपलीं ठाणीं बसविलीं.

भोपाळच्या नबाबानें पेंढाऱ्यांस चिथावणी देऊन नागपुरच्या मुलखास त्रास देण्याचें काम जास्त जोरानें चालविलें. नोव्हेंबर १८१३ पासून जुलै १८१४ पर्यंत भोपाळचे किल्ल्यास वरील दोन्ही सैन्यांनीं वेढा दिला. भोपाळचा नबाब **वजीर अहमदखान** यानें इंग्रजांकडे मदत मागितली. कर्नल **क्लोज** व **क० हेअर** बांद्याकडेस होते. त्यांचेमार्फत

१ या तहाची अस्सल कलमबंदी व वांटणीची यादी उपलब्ध आहे. (अ प्र०)

गव्हर्नर जनरल ( हेस्टिंग्ज ) याचेकडे त्यानें संधान जमविलें व इंग्रजांनीं त्याचा पक्ष उचलला. हें समजतांच भोंसल्यांनीं भोपाळहून आपलें लष्कर काढून घेतलें. वास्तविक त्यांस इंग्रजांचें हें वर्तन रुचलें नाहीं. परंतु इंग्रजांचे विरुद्ध जाऊन त्यांना भांडणाचें निमित्त देण्याचें भोंसल्यांचे मनांत नव्हतें. भोपाळकरांशीं इंग्रजांचा तह झालेला नव्हता व भोंसल्यांचें दोस्त सरकार या नात्यानें इंग्रजांचें वर्तन खरोखरीच चुकीचें होतें. भोपाळवाल्याच्या आमच्याशीं शर्ती पक्क्या ठरल्या नाहीत हें इंग्रजांनीं कळविल्यानंतर सुद्धां भोंसल्यांनीं भोपाळचा नाद सोडला. कारण इंग्रज अखेरीस भोपाळच्या नबाबास आपले पंखाखालीं घेऊन त्यास मदत करणार हें त्यानें ओळखिलें. यावरून इंग्रजांविषयीं हिंदी संस्थानिकांचे मनांत किती दहशत बसली होती हें दिसून येईल.

**सबसीडियरी सैन्य नागपुरास आणण्याचा दुसरा प्रयत्न १८११—१४.** इंग्रज रेसिडेंटाचें रघूजी भोंसल्याच्या हालचालीकडे बारीक लक्ष असे. शिंदे, होळकरांच्या चळवळीमुळें रेसिडेंटास भोंसल्यांचा नेहमीं संशय येत असे. शिवाय पेंढारी वगैरेंच्या उपद्रवामुळें जरी सैन्याची भरती अगर सुधारणा केली तरी रेसिडेंटास संशय येऊन तो सासुरवास करी. शिवाय रघूजी इंग्रजांचें सबसीडियरी सैन्य कबूल करीना व तें कबूल करीपर्यंत आपली मगरमिठी पक्की नाहीं हें इंग्रज जाणून असत. मीरखानाच्या दंग्याचे अखेरीअखेरीस भोंसल्यानें मदत न मागतांच गव्हर्नर जनरल यानें सैन्य पाठवून पेंढाऱ्यांचा मोड करण्यास भोंसल्यांस मदत केली. पेंढाऱ्यांच्या अनुभवानें तरी भोंसल्यास आपलें म्हणणें रुचेल म्हणून नवीन रेसिडेंट **जेन्किन्स** यानें इ. स. १८११ मध्यें पुन्हां आमचें कांहीं सैन्य ठराविक शर्तीवर ठेवा म्हणून भोंसल्यांस सुचविलें; परंतु रघूजीनें ती गोष्ट साफ नाकारली. शेवटीं त्या वेळचा गव्हर्नर जनरल लॉर्ड मिंटो यानें भोंसल्याचा नाद सोडून दिला ( १८१४ इ. ). परंतु त्यानंतर लागलीच पेंढाऱ्यांनीं त्याच्या मुलखांत पुन्हां: उपद्रव सुरू केला व इ. स. १८११ चे नोव्हेंबर महिन्यांत खुद्द नागपुरांत येऊन कांहीं पेठा जाळल्या. त्या वेळीं रघूजीनें इंग्रजी सैन्याची मदत मागितली. परंतु नाराज झालेल्या इंग्रजांनीं ती देण्याचें नाकारलें व आमचे लष्करास दुसरीकडे पाठविणें आहे असें सांगितलें.

इ. स. १८०५ चे जुलै महिन्यांत इंग्रजांचे ताब्यांत असलेल्या **भोंसल्यांच्या संबळपुर** जिल्ह्यांत कांहीं मोकाट सैन्यानें धुमाकूळ मांडला. बंगाल्यांतील इंग्रज सरदार क० **ब्राउटन** यास हें कृत्य भोंसल्याचेंच आहे असें वाटलें. कारण संबळपुराबद्दल इंग्रजांचा व भोंसल्यांचा वाद होताच, परंतु या सैन्याशीं आमचा कांहीं संबंध नाहीं असें राजानें कळविलें व तुम्हांस वाटेल तर तुम्हीं त्याचा मोड करून त्यास हांकून द्या असेंहि सांगितलें. तसेंच एकदां होळकरांचा वकील मदतीकरितां आला असता त्याच्या भेटीचें समग्र वर्तमान राजानें रेसिडेंटास कळविलें. त्यावरून रेसिडेंट **एल्फिन्स्टन** याचा राजावर थोडा विश्वास बसत चालला. **छत्तीसगडांत** राजाचा भाऊ **व्यंकोजी** ऊर्फ **मन्याबापू** हा सैन्य जमवूं लागला त्यावरूनहि रेसिडेंटास राजाची पुन्हां शंका येई. इंग्रजांचे दूत सर्वत्र असल्यामुळें त्यांना बातमी लागली कीं **व्यंकोजीनें** चंद्रपुरासहि कांहीं रक्कम जमविली. परंतु या वेळीं सर्वत्रांना माहीत होतें कीं राजाचें व **मन्याबापूचें** सूत नाहीं, तसेंच राजाचे आप्त **गुजाबादादा गुजर** वगैरे हेहि राजाच्या विरुद्ध पक्षास होते. एवढेंच नव्हे तर खुद्द **गुजाबादादा गुजर** हा तर उघड उघड **शिंद्याकडे** जाणार होता व **व्यंकोजीचाहि** तसाच शिंद्याशी पत्रव्यवहार चालू होता.

**संबळपूर** व **पाटणा**[1] हे परत मिळण्याबद्दल राजाचे प्रयत्न चालूच होते व त्यामुळेंच त्याच्या पोटांत अढी आहे हें इंग्रजांस माहित होतें तें शल्य आहे तोंपावेतों राजाचें मन साफ होणार नाहीं हें जाणून, लॉर्ड **वेलस्ली**-च्या पाठीमागून लॉर्ड **कॉर्नवॉलिस** गव्हर्नर जनरल झाला त्यानें हे दोन्ही प्रांत भोंसल्यांस परत देण्याचें ठरविलें व इ. स. १८०५ च्या दसऱ्याच्या दुसरे दिवशीं हें वर्तमान रेसिडेंट **एल्फिन्स्टन** यानें राजास कळविलें. राजास अर्थातच मोठा आनंद झाला. इ. स. १८०६ च्या सप्टेंबर महिन्यांत हे प्रांत राजाच्या ताब्यांत दिले.

**व्यंकोजी ऊर्फ मन्याबापू**— **रघूजीचें** व **मन्याबापूचें** विशेष सख्य नव्हतें रघूजी हा विचारी व दूरदृष्टीचा होता. उलट **व्यंकोजी** हा शूर व धाडशी

१ हें बिहार प्रांतांतील पाटणा नसून ओरिसाचे प्रांतास लागून एक लहान संस्थान आहे. यास मराठी कागदांत "पटणें" असें म्हटलें आहे.

होता. त्याला स्वस्थ बसून रहाणें आवडत नसे. भोंसल्यांच्या घराण्याच्या शिरस्त्याप्रमाणें धाकट्या घराण्याकडे **चंद्रपुर** व **छत्तीसगडचा** कारभार व सेनाधुरंधर हें पद असे. परंतु वडील घराण्याच्या अनुमतानें व हुकमाप्रमाणें त्यानें वागलें पाहिजे असा रिवाज होता. व्यंकोजीनें छत्तीसगडापैकीं संबळपुरातील इंग्रजी ठाणें हुसकून देऊन तो प्रदेश आपल्या ताब्यांत घेण्याकरितां प्रयत्न केले. तसेंच वऱ्हाडांत निजामाच्या मुलखांतहि स्वाऱ्या करणें सुरू केलें. परंतु दोन्हींकडे इंग्रजांचा हितसंबंध असल्यामुळें इंग्रजांकडून रघूजीस तंबी येई. इंग्रजांविरुद्ध वागल्यानें आपला निभाव लागणार नाहीं हें बलाबल रघूजी पूर्णपणें ओळखीत असल्यामुळें त्यानें मन्याबापूची कानउघाडणी करावी; पण स्वैरवृत्तीचा मन्याबापू तें ऐकेना. मन्याबापू माझें ऐकत नाहीं म्हणावें तर तीहि चोरी. शेवटीं रेसिडेंटाच्या आग्रहावरून रघूजीनें **मन्याबापूस** नागपुरास नजरकैदेंत ठेवलें व त्याची सर्व जहागीर जप्त केली (१८०४). याप्रमाणें रघूजी व मन्याबापू या दोघांनाहि त्रास होऊं लागला. शेवटीं मन्याबापूनें नागपुरचें राज्य सोडून दुसरीकडे जाऊन आपल्या स्वैर वृत्तीस वाव मिळविण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें दौलतराव शिंद्याचा वकील **बाळाजी यशवंत** व सावकार **आत्माराम शिवराम तांबोळी** [१] यांचेमार्फत दौलतरावाकडे बोलणें लावलें. दौलतरावासहि **मन्याबा**पूसारखा शूर मनुष्य पाहिजेच होता. कारण त्याची इंग्रजांचा पाडाव करण्याची धमक व प्रयत्न अद्याप कायम होते. शिवाय नागपुरचे राज्याचा मुलूख बंगालपर्यंत असल्यामुळें इंग्रजांना बंगाल्याकडे शह देण्यास नागपूर राजघराण्यांतला मनुष्य आपणास मिळाल्यास फारच उत्तम होईल अशी त्याची कल्पना होती [२] शिवाय मन्याबापूस हाताशीं धरून नागपुरच्या राजकारणांतहि ढवळाढवळ करण्यास सांपडली असती हाहि एक डाव असावा.

१ हा त्यावेळचे मराठेशाहींतील प्रसिद्ध सावकार वाकडे याचा मुनीम होता. पुढें तो स्वतःच मोठा सावकार बनला. तो शेवटीं काशीस राहिला. (यजु. दे. ब्रा.)

२ यासंबंधींचा पत्रव्यवहार मनोरंजक असून त्यावरून दौलतराव शिंद्याच्या व इतर मराठे सरदारांच्या मनोराज्याची, मनोवृत्तीची व त्यावेळच्या परिस्थितीची बरीच कल्पना येण्यासारखी आहे. (अप्र.)

**मा. हेस्टिंग्जची इं. सैन्याची व्यवस्था**–मार्क्विस ऑफ **हेस्टिंग्ज** हा गव्हर्नर जनरल असतांना त्यानें स्वतःकडे कमांडर इन चीफचे अधिकार घेतले होते व उत्तर हिंदुस्थानांतील सर्व लष्करी अधिकारहि तो स्वतः चालवीत होता. परंतु दक्षिणेंत मात्र त्यानें मद्रासचा सेनापति सर टॉमस **हिस्लॉप** यास दक्षिणेंतील मुख्य सेनापतीचे अधिकार दिले व सर जॉन **मालकम** यास गव्हर्नर जनरल याचा पोलिटिकल एजंट म्हणून **हिस्लॉप** याजजवळ ठेविलें. **मालकम** यास जरूर पडल्यास मोहिमेवरहि पाठवावें असा त्यानें **हिस्लॉप** यास अधिकार दिला होता. पुढें तिसरे मराठा युद्धांत **मालकम** याचाच विशेष उपयोग झाला. नागपुर, पुणें व हैदराबाद येथील रेसिडेंटांकडे लढाऊ अधिकार कांहीच न राहतां सर्व अधिकार **हिस्लॉप**कडे दिले. परंतु पुढें **हिस्लॉप** आजारी पडल्यामुळें रेसिडेंटांनाच लष्करी अंमल चालवावा लागला. दक्षिणेंतील सर्व लष्कर एका अधिकाऱ्याच्या हाताखालीं असल्यामुळें त्यास "ग्रँड आर्मी ऑफ दि डेक्कन" असें नांव देऊन त्याचें वर्गीकरण करून त्यावर निरनिराळे अधिकारी नेमले गेले. **हिस्लॉप** व **मालकम** हे हैदराबादेस येऊन राहिले व तेथून त्यांनीं सर्व दक्षिणभर सैन्यांचीं केंद्रें करून सर्व इंग्रजी सैन्याचें एक जाळें तयार केलें. पहिला डिव्हिजन खुद्द **हिस्लॉप** याचे हाताखालीं; दुसरा हैदराबादेस ब्रि. ज. **डव्हटन**[1] याचे हाताखालीं; तिसरा **मालकम** याचे हाताखालीं फिरता; चवथा ब्रि. ज. **स्मिथ** याचे हाताखालीं पुण्यास; पांचवा ले. क. **आडाम्स** याचे हाताखालीं नागपूर येथें; एक तुकडी रिझर्व्ह डिव्हिजन म्हणून ब्रि. ज. **मनरो** याचे हाताखालीं शिलकेंत. शिवाय गुजराथेंत मे. ज. **कीर** याचे हाताखालीं एक डिव्हिजन होता. या सैन्याची मांडणी अशी होती कीं विरुद्ध असलेलीं अगर होतील अशीं सर्व लष्करें एकदम विरुद्ध झालीं तरी त्या सर्वांशीं एकदम लढाई देतां यावी.[2]

---

१ डव्हटन यास मराठी कागदांत 'दपटीन' असें म्हटलें आहे.

२ याकरितां सर्व हिंदी संस्थानांतील लष्कराचे आंकडे तेथील रेसिडें-टांच्या मार्फत आणवून त्याचा अंदाज ग. ज. यानें बांधला होता. त्याचा तपशील पुढीलप्रमाणें होता. (पुढील पान पहा.)

**पेंढाऱ्यांविरुद्ध जंगी मोहीम** इ. स. १८१७:–ही सर्व लष्करी व्यवस्था मा० हेस्टिंग्ज यानें पुढील सर्व धोरण बांधून केली होती. तिचा प्रथम उपयोग पेंढाऱ्यांना हाणून पाडण्याकरितां त्यानें ठरविला.[१] इ. स. १८१७ चे पावसाळ्यापूर्वीच नर्मदेच्या दोन्ही कांठीं इंग्रजी सैन्याचे तळ पडले. त्यांनीं पावसाळा संपेपर्यंत तेथें राहून नर्मदेस उतार होतांच सर्व बाजूंनी पेंढाऱ्यांस कोंडावें असा इंग्रजांनीं बंदोबस्त करून ठेवला होता. या मोहिमेचा मुख्य उद्देश पेंढाऱ्यांचा नाश करण्याचा असल्यामुळें मध्यहिंदुस्थानाच्या भोंवतालीं सर्व इंग्रजी पलटणी हळूहळू जमल्या. अशीरगड, नर्मदेचा कांठ, ग्वाल्हेर, इंदूर यांच्या राज्यांच्या सरहद्दींवर हळुहळू इंग्रजी सैन्य येऊन ठाणीं देऊन बसलें. दक्षिणच्या पलटणी जालन्याहून मलकापुरच्या जवळ येऊन थांबल्या व त्यांनीं आपला रोख अशीरगडावर ठेवला. दुसरी टोळी **उमरावती**हून निघून **आमनेर, मुलताई, शहापूर, शिवणी** मार्गानें नर्मदेचे कांठीं **बगलातूर**च्या उतारावर तळ देऊन बसली. नागपुरचें इंग्रजांचें सैन्य व राजाचें सैन्य मिळून **रामटेक** जवळ नगरधन येथें एक तळ, वाईनगंगेच्या रोखानें एक तुकडी व दुसरी **पांढुरणा** येथें ठेवली. राजाच्या सैन्यानें पूर्वेकडून पेंढाऱ्यांना अडवावें म्हणून **सांघवी** येथें

| संस्थानिक | स्वार | पायदळ | तोफा |
|---|---|---|---|
| शिंदे | १४२५० | १६२५० | १४० |
| होळकर | २०००० | ७९४० | १०७ |
| पेशवे | २८००० | १३८०० | ३७ |
| भोंसले | १५७६६ | १७८२६ | ८५ |
| अमीरखान पेंढारी | १२००० | १०००० | १८ |
| निजाम | २५००० | २०००० | २०० |
| दुसरे पेंढारी | १५००० | १५०० | १५ |
| | १३००१६ | ८७३१७ | ५८९ |

इ. स. १८०३ मध्यें भोंसल्याचे सैन्याचा आंकडा तीस हजार स्वार, पंधरा हजार पायदळ व साठ तोफा इतका होता. ( Blacker Vol. I )

१ हा बंदोबस्त जरी पेंढाऱ्यांकरितां झाला तरी त्याचा खरा उपयोग तिसरे मराठा युद्धांत बाजीराव व आप्पासाहेब यांजविरुद्ध झाला व पुणें व नागपुरचीं राज्यें यामुळेंच हातीं आलीं.

राजाचें कांहीं सैन्य ठेविलें होतें. **छपारा** येथें कांहीं इंग्रजी पलटणी ठेविल्या असून पूर्वेस **हिरापूर**पासून पश्चिमेस **हरई** व **अंबरवन** हा भाग त्यांचे जिम्मेस दिला होता. नागपुरच्या राजाचे एक हजार स्वार तापीच्या उत्तरेस म्हैसदेहीजवळ ठेवून त्यांनीं पूर्वेस मुलताईपासून पश्चिमे-कडील सर्व प्रदेश ताब्यांत ठेवावा अशी योजना केली होती.

**इंग्रजांचा शिंद्याशीं तह ५-११-१८१७ इ.**:-पेंढाऱ्यांस शिंद्याचा आधार असल्यामुळें प्रथम तो इंग्रजांच्या योजनेस कबूल होईना व गुप्तपणें अमीरखानाशीं संधान बांधूं लागला. परंतु त्यांच्या सर्व गुप्त मसलती हेस्टिंग्ज गव्हर्नर जनरल यास कळल्या. म्हणून त्यानें गुप्तपणें बरेंचसें इंग्रजी लष्कर ग्वाल्हेरच्या भोंवतीं आणून ठेविलें. तें अशा बेतानें कीं, शिंद्यास त्यांतून सुटून आपल्या बाहेरच्या लष्करास मिळणें अगर पेंढाऱ्यांच्या लष्करास मिळणें अशक्य होऊन गेलें. इतकेंहि करून तो जाऊं शकला तर ग्वाल्हेर शहर व किल्ला व शिंद्याचा १५० तोफांचा तोफखाना इंग्रजांच्या हाती सांपडणार. शेवटीं निरुपाय होऊन शिंद्यांस गव्हर्नर जनरलच्या सर्व अटी मान्य करून तह करावा लागला. या तहामुळें असें टरलें कीं, पेंढाऱ्यांचा मोड करण्याकरितां शिंद्यानें आपले पांच हजार निवडक स्वार इंग्रजी अधिकाऱ्याच्या हाताखालीं द्यावे, त्यांच्या दोन वर्षांच्या खर्चाची तरतूद करून द्यावी, जोधपुर, बुंदी व कोटा येथील राजांकडून शिंद्यास मिळणारी खंडणी घेऊं नये व इंग्रज सरकारकडून पूर्वीच्या तहनाम्याप्रमाणें शिंद्यास व त्याचे घराण्यांतील मंडळीस इंग्रजांकडून मिळणारी तीन वर्षांची रक्कम सोडून द्यावी, शिंद्यानें गव्हर्नर जनरलचे परवानगीशिवाय आपली जागा सोडूं नये, अशीरगड व हंडिया येथील किल्ले इंग्रजांच्या ताब्यांत पेंढारी-युद्ध संपेपर्यंत ठेवावे. हा तह ता. ५-११-१८१७ रोजीं झाला.

त्याचप्रमाणें पेंढाऱ्यांचा दुसरा एक मोठा आधार तुटला. ग्वाल्हेरचा आधार तुटल्यानंतर भोपाळच्या राज्यांतील एक दोन किल्ले ताब्यांत घेऊन आपलीं बायकामुलें व रोकड अशा सुरक्षित ठिकाणीं रहावींत म्हणून पेंढाऱ्यांनीं प्रयत्न केला. परंतु भोपाळच्या नबाबानें नुकताच **मालकम** साहे-बाशीं तह करून पेंढाऱ्यांविरुद्ध मदत करण्याचें कबूल केलें होतें व इंग्रजां-

च्या आश्रयाखालीं राहण्याचें कबूल केलें होतें, त्यामुळें तोहि स्वतंत्र राहिला नाहीं.

वरील व्यवस्था होत असतां नागपुरासहि पेंढाऱ्यांची कांहीं गडबड होईल असा रेसिडेंट **जेंकिन्स** यास संशय आला; म्हणून त्यानें नागपुराकडे कांहीं पलटणें मागविलीं. त्यांवरून ले. क. **गाहान** याची छावणी हर्दा येथें होती त्यास घोडेस्वारांची एक, पायदळांची एक अशा दोन तुकड्या व दोन तोफा असा सरंजाम घेऊन नागपुराकडे जाण्याचा हुकूम झाला व त्या तुकड्या हुसंगाबादेचे दक्षिणेस **शिदखेड** येथें येऊन थांबल्या व नागपुरच्या रेसिडेंटाकडून निरोप येतांच एकदम नागपुरास जाण्याच्या तयारीनें राहिल्या. ह्याच तुकड्या सीताबर्डीच्या हल्ल्यानंतर नागपुरास परत गेल्या.

**पेंढाऱ्यांच्या टोळ्या**-- पेंढाऱ्यांच्या सैन्याचे पूर्वेकडून पश्चिमेकडे तीन भाग असून पश्चिमेकडे **वसील महमद** याचें आठ हजार लष्कर व पांच तोफा; मध्यभागीं **करीमखान** व होळकरशाही पेंढारी यांचें तेवढेंच सैन्य व पूर्वेस चित्तू याचें सात हजार सैन्य व दहा तोफा असा सरंजाम होता. नोव्हेंबर १८१७ मध्यें त्यांचेविरुद्ध मोहीम सुरू होऊन सर्व माळवाभर व पूर्वेस नर्मदेच्या कांठीं व उत्तरेस ग्वाल्हेरपर्यंत त्यांचा पाठलाग करून इंग्रजांनीं त्यांना जेरीस आणलें.

**अमीरखानास फोडलें**- **अमीरखान** याचेशी दिल्लीचा रेसिडेंट **मेटकाफ** याचे मार्फत तह होऊन त्याच्या जहागिरी वगैरे कायम ठेवून त्यानें थोडेंसें सैन्य ठेवावें व बाकीचें सोडून द्यावें व इंग्रजांस मदत करावी व दुसरे संस्थानिकांशीं कांहीं संबंध ठेवूं नये; असा करार झाला. त्याचे वंशज हल्लीं **टोंकचे** नबाब म्हणून प्रसिद्ध आहेत. याप्रमाणें अमीरखान हा पेंढाऱ्यांचा संस्थानिक बनला.

**चित्तू**-**चित्तू** पेंढारी हा इंग्रजी लष्करास झुकांड्या देत देत दौलतराव शिंद्याचा सरदार **यशवंतराव भाऊ** यास **जाऊड** येथें जाऊन मिळाला व त्याचे आश्रयानें राहिला. इतर पेंढारीहि जिकडून वाट सांपडेल तसे निसटून इंग्रजांच्या घेऱ्यांतून पळून गेले व एक टोळी तर थेट दक्षिणेंत **तुंगभद्रे**-

पर्यंत जाऊन तिनें तिकडे धुमाकूळ मांडला. शेवटीं **चित्तूचा** मोड होऊन तो पुढें अप्पासाहेबाच्या गडबडींत अशीरगडचे जवळपास जंगलांत भटकत असतां वाघानें मारला.

**पेंढाऱ्यांचा मोड**—इ. स. १८१८ च्या जान्युआरीचे सुमारास पेंढाऱ्यांचा सर्वत्र मोड झाला. **करीमखान** हा इंग्रजांस शरण येऊन कांहीं पेनशन घेऊन राहिला. त्याचेमागें **कादरबक्ष, राजीम, नामदारखां** यांनींहि त्याचाच कित्ता गिरविला. त्यांना त्यांचे कार्यक्षेत्रापासून दूर नेऊन ठेवण्यांत आलें. **चित्तू** पेंढारी हाहि भोपाळ येथें जाऊन त्यानेंहि तसेंच बोलणें लावलें; परंतु त्याचें समाधान थोडक्यांत होईना. शेवटीं हें बोलणें चालू असतांच तो पळून नर्मदा उतरून अशीरगडाचे आसपास भटकत राहिला. त्याचा बेत बाजीराव पेशवा तिकडे असल्यास त्यास मिळण्याचा होता. सातपुड्यांतले व खानदेशांतले भिल्लहि वरप्रमाणेंच इंग्रजांशीं करार करून स्वस्थ झाले. सर्वांत शेवटीं **वसील महमद** पेंढारी शिंद्याचे मार्फतीनें जून १८१८ मध्यें शरण आला व त्यालाहि करीमखानाप्रमाणें **गोरखपूर** येथें ठेविलें.

**जेंकिन्स रेसिडेंट**– इ. स. १८०७ मध्यें **एल्फिन्स्टन** हा रेसिडेंट पुण्यास जाऊन त्याचे जागीं **रिचर्ड जेंकिन्स** हा आला **एल्फिन्स्टन** पुढें पुण्याचे दरबारीं फार प्रसिद्धीस आला. जेंकिन्स यानें ता. २० जान्युआरीस रेसिडेंटाच्या कामाचा चार्ज घेतला. यापूर्वीं हा शिंद्याच्या दरबारीं कर्नल **क्लोज** याचेमागून रेसिडेंट होता. नागपुरच्या सर्व इंग्रजी कारभाराचा पाया यानेंच घातला. हा इ. स. १८२६ पर्यंत नागपुरास होता.

यानंतर **रघूजीच्या** कारकीर्दींत विशेष सांगण्यासारखें कांहीं झालें नाहीं. त्यास वृद्धपणा येऊन पुढील उमेदहि विशेष राहिली नाहीं. त्याचा भाऊ **व्यंकोजी** याशीं त्याचा वांकडेपणाच राहिला. रघूजीचा मुलगा **परसोजी** हा तर पंगु आणि वेडा झालेला होता. त्याजकडूनहि पुढील कांहीं आशा दिसेना. व्यंकोजीचा मुलगा **मुधोजी** ऊर्फ **आप्पासाहेब** हा निव्वळ तरुण पोर शिवाय त्याचेंहि रघूजीशीं वर्तन समाधानकारक नव्हतें. अशा नाउमेदीच्या स्थितींत रघूजीचा लवकरच अंत झाला.

**व्यंकोजीचा मृत्यु १८११ इ.** – रघूजीच्या मरणापूर्वींच त्याचा भाऊ **व्यंकोजी** ऊर्फ **मन्याबापु** सेनाधुरंधर हा काशीस फसली सन १२२१ चे श्रावणमासीं (इ. स. १८११ ऑगस्टमध्यें) निवर्तला. रघूजीनें **व्यंकोजी**-कडील ठाणीं चंद्रपुर व छत्तीसगड हीं त्याचे मुलातर्फे कारभारी नेमून देऊन त्यांचे ताब्यांत दिलीं व आप्पाहेबास नागपुरास आणून ठेविलें. वडील-पणाचे नात्यानें रघूजीनें त्यास बरेंच लडिवाळपणानें वागविलें व आप्पा-साहेबहि निदान बाह्यात्कारी तरी रघूजीस वडीलपणाचा मान देऊन वागत असे. तरी त्याचे अंतःकरणांत मलीनता होतीच. **नागो त्रिंबक, मनभट जोशी** उपाध्ये व **रामचंद्र वाघ** या त्रिकूटाचें आप्पासाहेबाशीं मेतकूट होतें व त्यांचीं कारस्थानें नेहमीं चालत. रघूजीसहि वरील गोष्टी माहीत होत्या पण तो बाहेरून कांहीं दिसूं देत नसे.

**दुसऱ्या रघूजीचा मृत्यु २२–३–१८१६ इ.**–इ. स. १८१५ मध्यें दसऱ्याचे दिवशीं रघूजी शौचास गेला असतां एकाएकीं चक्कर येऊन बेशुद्ध झाला. तसेंच माणसांनीं उचलून आणून निजविलें व औषधोपचार सुरू झाले. तेव्हांपासून रघूजीचा आजार वाढतच गेला. त्यांतच मांत्रिक उपचारहि सुरू झाले. जुन्या समजुतीप्रमाणें हा कांहीं शाबरी मंत्राचा प्रयोग कोणी शत्रु करीत आहे असाहि प्रवाद निघाला. घरांतला संशय येण्याजोगा शत्रु म्हणजे **आप्पासाहेब**; त्यावर संशय उत्पन्न झाला. चौकशी करितां खरी अगर खोटी बातमी आली कीं आप्पासाहेबानें राजावर मांत्रिकांकडून जारणमारण प्रयोग चालविले आहेत व माहूर व चंद्रपूर वगैरे ठिकाणी राजाविरुद्ध अनुष्ठानेंहि चालू आहेत. सर्वांचा संशय आप्पासाहेबावर आला. त्यावेळीं नागपुरास **शंकरभट भट्टे** नांवाचा एक मांत्रिक होता व त्याच्या घरीं भूतपिशाच्चांनीं पछाडलेले लहानमोठे रोगी येऊन त्यांची एक मोठी यात्राच भरत असे राजघराण्यांतील बायकासुद्धां त्याचे घरीं चोरून जात. कोणीं बातमी दिली कीं **शंकरभट** हा शिवेवर जाऊन नग्न होऊन तेथें राजाविरुद्ध मांत्रिक प्रयोग करतो व त्यास आप्पासाहेबानें या कामीं लावलें आहे त्यावरून राजानें एक पत्र आपला जुना कारभारी **श्रीधर लक्ष्मण मुनशी** यास काशीस लिहिलें. परंतु आप्पासाहेबावर उघड इतराजी केली नाहीं.

व्यंकोजीची बायको व आप्पासाहेबाची आई **मैनाबाई** हीहि फाल्गुन शु. २ शके १७३७ [ता. १–३–१८१६] रोजीं मरण पावली. त्या अशौचांत रघूजीचीहि मानगी जास्त वाढली व त्यांतच फाल्गुन व. ९ शके १७३७ ता. २२–३–१८१६ रोजी त्याचा अंत झाला. त्यावेळीं त्याचें वय सुमारें ५६ वर्षांचें होतें. रघूजी मेला त्या वेळेस त्याचे अंथरुणाखालचे गालिचास एक यंत्र बांधलेलें सांपडलें. वरील प्रकारावरून **रघूजीस आप्पासाहेबानें** मारविलें असाहि प्रवाद त्या वेळीं निघाला होता. त्या वेळच्या परिस्थितीवरून व मंत्रप्रयोगावरील विश्वासावरून अशा प्रकारचे प्रवाद नेहमींच निघत असत. चिमणाबापूच्या मृत्यूबद्दलहि असाच प्रवाद निघाल्याबद्दल मागें लिहिलेंच आहे.[१]

रघूजीच्या मरणाच्या वेळेस पुढील परिस्थितीबद्दल त्याचे मुत्सद्यांस काळजी वाटणें साहजिक होतें. कारण रघूजीचा पुत्र **परसोजी** ऊर्फ **बाळासाहेब** हा शरीरानें व मनानें अगदीं पंगु व भ्रमिष्ट होता व आप्पासाहेब गादी बळकावील असा संभव होता. रघूजीचा भाचा **गुजाबादादा गुजर** व मुत्सद्दी **यशवंतराव भवानीशंकर, यशवंतराव रामचंद्र, नारायण गोपाळ पंडितजी, गंगाधर माधव चिटनवीस,**[२] **बाळाजी नारायण जामदार,**[३] **नारायण काशी काळीकर,**[४] चिटनिसाकडील कारभारी **नारायण यशवंत, धर्माजी भोंसले,** यांनीं पुढील व्यवस्था विचारली. आप्पासाहेब व बाळासाहेब (परसोजी) हेहि हजरच होते. मन्याबापूस चंद्रपूर व छत्तीसगड तोडून दिले त्याप्रमाणेंच पुढें आप्पासाहेबानें वागावें व मुख्य गादी परसोजीकडे असावी व कारभार पूर्वीप्रमाणें मुत्सद्यांनीं करावा अशी इच्छा त्यानें दर्शविली. नारायण यशवंत याजकडून याबद्दल यादीहि लिहिल्याचें समजतें.[५]

---

१ जारणमरण मंत्राचा पगडा व इतर अंध विश्वास त्यावेळीं किती होता हें त्यावेळच्या लेखांवरून दिसतें. पे. द. भा. २० पा. १९१–९२ पहा.

२ सर गंगाधरराव व सर शंकरराव यांचे आजे (वंशा.)

३ नारो शंकर जामदार याचा मुलगा. (वंशावळ पहा)

४ हे सदर खजानजी होते. यांचे वंशज नागपुरास आहेत. पवनी व नागपुर येथें त्यांचीं देवस्थानें आहेत. (वंश. पहा)

५ ना. भो. का. ले. ३६. ही यादी प्रसिद्ध नाहीं.

राजाचें दहन व क्रियाकर्मांतर परसोजीकडून करावें कीं आप्पासाहेबाकडून करवावें हाहि विचारच पडला. कारण परसोजी निवळ वेडसर. परंतु शेवटीं आप्पासाहेबास जवळ बसवून तें त्याचेकडूनच करविलें. भोंसल्यांची स्मशानभूमि सक्करदऱ्याचे बाजूस गांवाचे टोकास आहे. तेथें पहिल्या रघूजीच्या देवळाजवळच दहन देऊन तेथेंच देऊळ बांधलें. परसोजीनें क्षौर केल्यानंतर कैक दिवस तो माझ्या मिशा काय झाल्या म्हणून विचारीत होता असें म्हणतात.

**दुसऱ्या रघूजीचें स्वभाववर्णन–रघूजी** हा मरणाचे वेळेस जवळजवळ ५६ वर्षांचा होता.[१] त्याचा बांधा ठेंगणा असून थोडासा लठ्ठ होता. तो कृष्ण–वर्ण असून त्याची वागणूक साधी व मोकळेपणाची होती. तो कोणालाहि भेटत असे व प्रेमानें बोलत असे. बोलतांना तो बहुधा कोणा-सहि दुखवीत नसे. आपल्या मुलामुलींवर व पुतण्यावर तो अतिशय प्रेम करी. बायकांपासून मात्र त्याला फारसें सौख्य झालें नाहीं. परसोजीचीं आई ही फार दिवसांपूर्वींच मरण पावली होती. दुसऱ्या बायकांशींहि त्याचें कधींच पटलें नाहीं. त्याची चवथी वायको **वांकाबाई** हीच त्याची आवडती होती. ती फार कारस्थानी बायको असून आप्पासाहेबाचे वेळेस व त्यानंतर फार प्रसिद्धीस आली. रघूजीचें आपल्या भावांशींहि कधींच पटलें नाहीं. त्यामुळेंच चिमणाबापूस त्यानें जादूनें मारविलें असा प्रवाद उठला होता. व्यंकोजी हाहि रघूजीवर खूष नव्हता व त्यामुळेंच शेवटीं तो काशी-यात्रेच्या निमित्तानें निघून गेला व तिकडेच मरण पावला. रघूजी हा अत्यंत मातृभक्त होता व आईला विचारल्याशिवाय तो कोणतीच महत्त्वाची गोष्ट करीत नसे. काम करण्यांत तो अतिशय वाकबगार असून फार मेहनती होता व प्रत्येक गोष्टींत तो स्वतः लक्ष घालीत असे. तासांचे तास तो हिशेबाचे आंकडे मोडण्यांत घालवी. तो अत्यंत धार्मिक असून हिंदुधर्माचीं नित्यकृत्यें फार काळजीनें करी.

**जेंकिन्सनें केलेलें रघूजीचें वर्णन.**—नागपुरचा रेसिडेंट जेंकिन्स

---

१ जेंकिन्सचा रिपोर्ट. यांत रघूजीस ५६ वर्षें पूर्ण होण्यास २ महिने कमी होते असें म्हटलें आहे.

यानें रघूजीचें स्वभाववर्णन खालीं दिल्याप्रमाणें केलें आहे. तो म्हणतो, " रघूजी हा शरीरानें ओबडधोबड असून त्याची रीतभातहि खेडवळासारखीच होती. तो दुसऱ्यांशीं मिळून मिसळून वागत असे; पण त्यांत पोक्तपणा नसे. तो कांहींसा लोकप्रिय होता व एखादी गोष्ट घडवून आणण्याच्या कामीं चतुर होता; परंतु पैशाचा संबंध आला म्हणजे त्याचें वर्तन हलक्या दर्जाचें होत असे.

" त्याला मुलाबाळांचा फार लळा असे. त्याच्या मुलांना व पुतण्याला त्यानें लहानपणीं फारच लडिवाळपणानें वागविलें. परंतु त्याच्या संशयी स्वभावामुळें तीं मुलें मोठीं झाल्यावर त्यांचें रघूजीशीं पटत नसे. रघूजी आपल्या बापाशीं उत्तम तऱ्हेनें वागला परंतु भावांशीं त्याचें वर्तन चांगलें नव्हतें. आपला मुलगा परसोजी यास तो स्वारीबरोबर घेऊन हिंडे व सर्व राजकारणी गोष्टींत त्याला हजर ठेवी व त्याच्यासमोर डांक वाचणें, पत्रव्यवहार व मसलती करी. परंतु तो वेडसर निघाल्यामुळें त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पत्रव्यवहारामध्यें व कामधंद्यांत रघूजी बांका काम करणारा होता. राज्यकारभाराच्या बारीकसारीक गोष्टींतसुद्धां तो अत्यंत खोल शिरून कीस काढीत असे. तो रागीट परंतु भित्रा असे व तसाच हट्टी व खुनशीहि असे. त्याचा प्रमुख मनोविकार म्हणजे अनन्वित द्रव्यलोभ. जसजसें त्याचें वय जास्त होत गेलें तसतसा त्याचा द्रव्यलोभ अतोनात वाढला. खर्च कमी करण्याऐवजीं लोकांकडून सक्तीनें व अयोग्य मार्गानें पैसे उकळून तो आपला वाढता खर्च भागवी. आपल्या मुत्सद्यांच्या डांवपेंचांवरहि कडी करण्याच्या युक्तिप्रयुक्तीनें व त्यांच्या कारभारांत जास्तच चिकित्सा चालविल्यानें तेही त्याला फसवीत. लष्कराच्या पगारवाटणींतहि तो शिपायांना फसवून पैसे काढीत असे. शिवाय स्वभावानें भित्रा असल्यामुळें शिपायांपैकीं कोणाचाहि त्याचेबद्दल व्यक्तिविषयक आदर नव्हता. त्याचे राज्यावर बाहेरून मोठेसे आघात न झाल्यामुळें व कांहींसें त्याचें स्वतःचें वजन, पूर्वींच्या गोष्टींचें स्मरण व अनुभवजन्य ज्ञान यांच्या भरंवशावर त्याचें राज्य कायम राहिलें.

" इंग्रजांविषयीं त्याचें मन शुद्ध नव्हतें व इंग्रजांच्या स्नेहामुळें त्याचा

जरी पुष्कळ फायदा झाला तरी मागील युद्धांत त्याचा मुलूख गेल्यामुळें त्याचें जें नुकसान झालें तें तो कधींहि विसरला नाहीं. परंतु भोंसले घराण्याचें इंग्रजांशीं जें पूर्वापार दोस्तीचें धोरण होतें तें सोडून आपण इ. स. १८०३ च्या मराठा संघांत इंग्रजांविरुद्ध गुरफटलों गेलों याबद्दल त्याला पूर्णपणें पश्चात्ताप झाला होता. इंग्रजांविरुद्ध उघडपणें कांहींहि खटपटी केल्या तरी त्यामुळें इंग्रजांची सत्ता उलथून पडणार नाहीं व आपणास यश येणार नाहीं हें कळण्याइतकें शहाणपण त्याच्या अंगीं होतें परंतु इंग्रजांची सत्ता उलथून पाडण्याकरितां आंतून दुसरे लोकांस उत्तेजन देण्यास तो कमी करीत नसे. इंग्रजांविरुद्ध कोणास जय मिळाल्याची खबर ऐकल्यास त्यावर त्याचा एकदम विश्वास बसे. स्वतः वयोवृद्ध झाल्यामुळें आपल्या हातून कांहीं धाडसाचें काम होणार नाही व हिंदुस्थानांत त्यावेळीं असलेल्या संस्थानिकांत एकमत होऊन अगर संघ करून इंग्रजांविरुद्ध लढणें हेंहि अशक्य कोटींतलेंच आहे हेंहि तो जाणून होता. आपला प्रत्यक्ष फायदा असल्याशिवाय जरी त्यानें इंग्रजांस खुष करण्याचा कधीं प्रयत्न केला नाहीं तरी इंग्रजांस उघडपणें चिडविण्यासारखेंहि वर्तन त्यानें कधीं केलें नाहीं. आपल्या राज्याचें स्वातंत्र्य कायम ठेवण्याचा त्यानें शेवटपर्यंत चिकाटीनें प्रयत्न केला व म्हणूनच त्यानें शेवटपर्यंत इंग्रजांशीं सबसीडियरी तह केला नाहीं."

रघूजीनें इंग्रजांशीं तैनाती सैन्याचा तह न केल्यामुळें त्याचें स्वातंत्र्य कायम राहिलें होतें. आपलें बलाबल पाहून त्यानें इंग्रजांशीं बिघाड करण्याचें नेहमीं टाळलें. भोपाळ प्रकरणांत इंग्रजांनीं त्यास दगा दिला असतांहि इंग्रजांनीं भोपाळवाल्यास आश्रय दिला; हें पाहतांच त्यानें माघार घेतली व भोपाळवाल्यांचा ताब्यांत आलेला मुलूखसुद्धां सोडून दिला. इंग्रजांच्या लढाऊ सामर्थ्याचा त्याच्या मनावर पूर्ण वचक बसलेला होता व शिंदे, होळकर यांनीं जरी त्यास वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; तरी तो त्यांचे फंदांत पडला नाहीं. कदाचित् यामुळें शिंदे, होळकर, पेशवे व भोसले यांची एकजूट होऊन इंग्रजांस शह देण्याचा दौलतराव शिंदे व यशवंतराव होळकर हे जे मनापासून प्रयत्न करीत होते व त्यांना जें थोडें यशहि आलें, त्या उद्योगाचा पाडाव होण्यास भोंसल्यांची मुग्धता कारणीभूत झाली.

नाहीं तर सर्व मराठ्यांनीं एकदम बळ बांधलें असतें तर इंग्रजांचा कदाचित् मोडहि झाला असता. यावेळचीं शिंदेहोळकरांचीं भोंसल्यांस आलेलीं पत्रें अत्यंत आतुरतेचीं व कळकळीचीं आहेत.

यशवंतराव होळकराचीं आसईच्या लढाईच्या वेळचीं पत्रें मागें लिहि-लींच आहेत. तशींच पत्रें पुढेंहि त्याचीं येतच होतीं. परंतु रघूजी पुनः इंग्रजांविरुद्ध कारस्थानांत प्रत्यक्ष कधी पडला नाहीं.

**रघूजी भोंसल्याचे वेळीं सरकारी खजिन्याची व खर्चाची व्यवस्था:–** भोंसल्यांची जमाखर्चाची व्यवस्था नीट दिसत नाहीं. सरकारी खजिना राजाचे वाड्यांतच असावयाचा व त्यावर सत्ताहि राजाचीच असावयाची. वाटेल तितके पैसे त्यांतून खाजगीकडे घ्यावे व सर्वच खजिना स्वतःचा खाजगी म्हणून समजावा. यामुळें लष्करास पैसे वेळेवर मिळत नसत. मोठमोठ्या मोहिमांच्या वेळीं सावकारांना बरोबर पाठवावें व त्यांनीं हुंड्या वगैरे लिहून पैसे पुरवावे. जवळ खजिना जास्त नसल्यामुळें जातांना रस्त्यानें जीं गांवें लागतील तेथल्या गांवकऱ्यांकडून खंडणी, दंड, पोटगी या कोणत्या तरी नांवानें मोठमोठ्या रकमा घऊन पुढें जावें हा क्रम चालत असे. एका जागीं मुक्काम पडला व लढाई लांबणीवर पडली म्हणजे सेनापतीची मोठीच तारांबळ उडे. एकदां सैन्यास जातांना आगाऊ कांहीं रक्कम द्यावयाची व मोहीम संपली म्हणजे मोहिमेंत आणलेले पैसे घरीं परत आल्यावर द्यावयाचे. पुष्कळदां लष्कर राजवाड्यासमोर धरणें धरून बसे अगर मोहिमेंतच अडून बसे.

सावकारांनीं कर्ज द्यावें तेंहि वेळेवर पटत नसे त्यामुळें ते अधीर होत. पण राजसत्तेपुढें त्यांचा जोर चालत नसे. त्यांना मग कांहीं परगण्याचें उत्पन्न लावून द्यावें व त्यांतून त्यांनीं तें परभारें वसूल करावें असा प्रकार चाले. राजाच्या या अडचणीचा फायदा घेऊन सावकार कांहीं गांवें स्वतःस मोकासे म्हणून मागत व तेहि राजाला द्यावे लागत. कित्येक वेळां सावकारांचें कर्ज जबरीनें बुडविण्याचाहि प्रयत्न होत असे. वरील कारणा-मुळें हिंदी संस्थानांस कर्ज देण्यास सावकार फार नाखुष असत. परंतु तेच इंग्रजी अधिकाऱ्यांस मात्र खुषीनें कर्ज देत व त्यांना पैशाची कधींच अड-

चण पडत नसे. कारण ते वक्तशीर रकमा परत करीत व एकंदरींत चोखीनें व्यवहार करीत.

**नागपुराकडील कांहीं सावकारः**– नागपुर राज्यांतील संस्थानिकांचे सावकार म्हणून पुढील नांवें अढळतात (१) **लक्ष्मीकांत नाईक काळे**–हे मूळचे वऱ्हाडांतील कारंजा येथील राहणारे. (यजुर्वेदी दे. ब्राम्हण. [१])काशीस त्यांचें मोठें दुकान आहे. नागपुरांत सर्व सावकारांत त्यांचा अग्रमान असे व त्यांना "नगरनाईक" ही पदवी असे. राजास कर्ज लागेल तें त्याचे-मार्फत इतर सावकारांकडून काढावयाचें व त्यानें सरकारी कर्जाची सर्व व्यवस्था लावून द्यावयाची अशी वहिवाट होती. हल्लीं नागपुरासहि त्यांचें घर व दुकान आहे. नगरनाईकाची कोठी व तळें नागपुरास आंहे.

(२) **व्यंकोजी नाईक पिद्डी**–हेहि (यजुर्वेदी दे. ब्राम्हण ) वणीकडील राहाणारे. त्यांचींहि सर्व महत्त्वाचे जागीं दुकानें होतीं. व राजकारणाच्या उलाढालींतहि त्यांनीं बराच भाग घेतला होता. हल्लीं या घराण्याची स्थिति खालावली असून नांव मात्र शिल्लक आहे.

(३) **उदेपुरी गोसावी**–भोंसल्यांनीं साताऱ्याहून बरींच माणसें आणली. त्यांत सावकारीमुळें यासहि आणलें. याचें नागपुरास कोणी राहिलें नाहीं.

(४) **मुरार नाईक गडकरी**–यजुर्वेदी दे. ब्राम्हण, (५) **गंगाजी नाईक गडकरी**, (६) **त्रिकमशेट**, याशिवाय नगरचे **वानवळे**, वाईचे **वाकडे**, वांकडयांचे ग्वाल्हेर येथील कारभारी **आत्माराम शिवराम तांबोळी**[२] हेहि नागपूरच्या राज्यांत मधून मधून चमकतात. आत्माराम शिवराम याचीं स्वतःचीं दुकानें ग्वाल्हेर, काशी व नागपुर येथें असत व दुसऱ्या रघूजीनें त्यास मुद्दाम नागपुरास आणविलें होतें. परंतु दौलतराव शिंद्यासहि हे सावकार पाहिजे होते म्हणून त्यानें त्यांना परत बोलाविलें. रघूजीच्या मनांत त्याला जाऊं द्यावयाचें नव्हतें म्हणून ते पळून जात असतां रघूजीनें

१ ब्राम्हण सावकारांपैकीं सर्व यजुर्वेदी आहेत व मुत्सद्दी व सरदार बहुतेक ऋग्वेदी आहेत.

२ हा जातीनें तांबोळी नसून यजु. दे. ब्राम्हण होता. फक्त आडनांव तांबोळी होतें.

रामचंद्र वाघ यास त्यांचेवर पाठवून त्यांना रस्त्यांत पकडलें व परत नागपुरास आणलें. उलट दौलतराव शिंद्याचा प्रयत्न नागपुरचे माधवजी नाईक काळे व व्यंकोजी पिद्र्डी या दोघांच्या दुकानाच्या शाखा ग्वाल्हेरीस आणून त्यांच्याहि पैशाचा आधार आपणास मिळवावयाचा होता. परंतु हें साधलें नाहीं. [१]

इतर जातींच्या सावकारांचीं नांवें भोंसल्यांच्या राज्यकारस्थानांत व कारभारांत आढळत नाहींत. कदाचित् पैशाच्या मामुली व्यवहाराशिवाय त्यांचा संबंध राजकारणांत न आल्यामुळेंहि असें असेल.

---

## भाग १३ वा

# परसोजी व आप्पासाहेब.

---

**परसोजी भोंसले ऊ० बाळासाहेब १८१६ इ०**—रघूजीनंतर त्याचा एकुलता एक पुत्र **परसोजी** हा गादीवर बसला. त्यास बाळासाहेब (क्वचित् बाबासाहेब) म्हणत. बाप मेला तेव्हां हा ३८ वर्षें वयाचा होता.[२] रघूजी-प्रमाणें त्याला राज्यकारभाराचा मुळींच अनुभव नव्हता. लहानपणीं त्याचें शरीर चांगलें होतें परंतु तरुणपणीं अनेक व्यसनांत सांपडून व रोग जडून त्याचें शरीर अगदींच दुर्बल झालें होतें. निरनिराळ्या रोगांकरितां वाटेल तसे उपचार करून त्याचे शरीरावर कायमचा परिणाम झाला होता. अर्धांग-वायूनें त्याचा कमरेखालचा भाग पंगु झाला होता व डोळ्यानेंहि तो आंधळा झाला होता. शिवाय पूर्णपणें वेडा जरी नाहीं तरी त्याच्या बुद्धीस इतकें मांद्य आलें होतें कीं खानपानादि व्यवहारापलीकडे त्याला कारभारांत कांहींच

---

१ अप्रकाशित पत्रव्यवहार.

२ भा. इ. सं. मंडळ–अप्रकाशित पत्रें ( नं. ५८६८ ) बाबूराव वैद्य यांचे मार्फत. पेशव्यानें परसोजीच्या जन्माच्या वेळीं रघूजीस आहेर पाठविल्याबद्दल दाखला आहे. त्यावरून त्याचें वय समजतें.

कळण्याची पात्रता राहिली नव्हती. रघूजीनें त्याला कारभाराचें ज्ञान यावें म्हणून बराच प्रयत्न केला होता. एकुलता एक मुलगा म्हणून त्याला जरी त्यानें अत्यंत लडिवाळपणें वागविलें तरी त्यास शिक्षण देण्याचे कामीं त्यानें कसूर केली नाहीं. रघूजी हा चांगला चौकस असून सर्व जमाखर्च स्वतः पाही. तो परसोजीस आपल्याबरोबर स्वारीस अगर फिरतीवर जातांना बरोबर घेत असे व मुत्सद्यांबरोबर खलबत करतांना व निरनिराळ्या प्रांताचे हिशेब समजून घेतांना परसोजीस जवळ बसवीत असे. माधवराव पेशव्याचे दोन जासूद रघूजीचे दरबारांत व स्वारींत रहात असून ते त्यास त्याच्या सर्व हालचाली कळवीत. त्यांनीं एका पत्रांत [१] कळविलें आहे कीं परसोजीस रघूजीनें स्वारींत बरोबर घेतलें होतें व प्रत्येक खलबताचे वेळीं तो परसोजीस आपल्या जवळ बसवी. त्याच पत्रांत रघूजीनें वऱ्हाड प्रांताचा सर्व हिशेब तपासल्याचें वर्तमान लिहिलें आहे. **पांडुरंग गणेश काळू, बाळाजी काळीकर, गुजाबा गुजर, कृष्णाजी मोहिते** हेहि स्वारींत होते. अशा शिक्षणांत परसोजी हा कसून निघावयाचा परंतु त्याच्या नशिबीं तसें नव्हतें. एकंदरींत परसोजी हा प्रथम शरीरानें व मनानें चांगला होता असें दिसतें परंतु पुढें दुर्व्यसनानें व रोगानें वेडसर व पंगु झाला.

परसोजी वेडसर असल्यामुळें राज्याचा प्रत्यक्ष कारभार कोणीं करावा हा प्रश्न आतां उभा राहिला व यावरून प्रमुख लोकांत दोन पक्ष पडले. रघूजीची बायको **बांकाबाई** इनें नवी हवेली ( जींत हल्लीं सिटी स्कूल आहे ) बळकावून भोवतीं चौकी पाहरे ठेविले व परसोजीस त्याच वाड्यांत आणून ठेविलें. परसोजीची आई पूर्वींच मेली होती. **धर्माजी भोंसला** म्हणून भोसल्याचा एक लेंकवळा होता. त्याचेकडे राजवाड्यांतील खाजगी व सरकारी खजिना व जवाहीर रहात असे व कित्येक वेळां एक कोट रुपयांपर्यंत त्याचे जवळ नगदी शिल्लक असे. तोहि बांकाबाईचे पक्षास मिळाला. रघूजीची एक बहीण **ठकाबाई** ही नागपुरास **नवलोजी** गुजर यास दिली होती. तिचा मुलगा **गुजाबादादा गुजर** हाही मोठा कर्तबगार होता, तोहि **बांकाबाईचे** पक्षास मिळाला. मुत्सद्यांपैकीं **नरोबा चिटणीस** व **नारायण यशवंत** ( चिटणीसांचा मुतालिक ) हेहि बांकाबाईचे पक्षांत

[१] हें अस्सल पत्र भा. इ. सं. मंडळाच्या संग्रहांत आहे. (अप्रकाशित)

प्रथम होते. राजा, लष्कर व खजिना या पक्षाचे ताब्यांत आला. **बांकाबाई** ही फार धूर्त व महत्त्वाकांक्षी बाई होती. **धर्माजी** भोंसला हाहि तसाच महत्त्वाकांक्षी होता. **गुजाबादादा** हा शूर व मुत्सद्दी यामुळें या पक्षाचें पारडें प्रथम बरेंच जड झालें.

दुसरा पक्ष **आप्पासाहेबाचा**. भोंसल्यांच्या घराण्यांत कर्ता पुरुष एवढाच उरला होता. त्यामुळें त्याचेकडे बऱ्याच मुत्सद्यांचा साहजिकच ओढा होता. परंतु आप्पासाहेबांचें पूर्वीचें वर्तन लोकांचे मनांत भरेल असें नव्हतें. त्याचे जुने दोस्त म्हणजे **रामचंद्र वाघ** आणि **मनभट**. या दोघांबद्दल लोकमत अनुकूल नव्हतें. **रामचंद्र वाघ** हा मराठा गृहस्थ मोठा धाडशी व शूर परंतु खोल बुद्धीचा व उलटद्या काळजाचा होता. आप्पासाहेबानें इतर मुत्सद्यांस आपले बाजूस वळवून घेण्याची खटपट चालविली. अस्सल वंशांतील मीं हजर असतां लेकवळचानें–**धर्माजी** भोंसल्यानें–कारभार करावा हें उचित नाहीं असें सांगून व **परसोजीच्या** तर्फे चांगल्या रीतीनें कारभार करीन अशा आणाशपथा घेऊन पुष्कळ मुत्सद्दी त्यानें आपलेकडे वळविले. **मन्नू भालदार, रावजी सखाराम** व **महिबुला** म्हणून परसोजीच्या विश्वासांतील माणसें असत व तीं नेहमीं परसोजीची काळजी घेत असत, त्यांनाहि अप्पासाहेबानें तशाच शपथा देऊन वळविलें. **धर्माजी, सिद्दिक अलीखान** व **गुजाबादादा** यांच्या ताब्यांत फौजा असत. नागोपंत[१] म्हणून अप्पासाहेबाचा एक कारभारी होता. त्यानें **नारायण यशवंत** व **सिद्दिकअली** यांस वळविण्याचा प्रयत्न चालविला. **नारायण यशवंत** मिळण्याचें चिन्ह दिसेना. **यशवंतराव रामचंद्र** हा इंग्रजांकडेस भोंसल्यांतर्फे वकील होता व तो रेसिडेंटाचे विश्वासांतील होता. त्याचे तर्फे **अप्पासाहेबानें** इंग्रज रेसिडेंट **जेंकिन्स** याजकडे संधान बांधलें. रेसिडेंटहि अप्पासाहेबास वळविण्याच्याच खटपटींत होता. कारण नागपुर दरबाराशीं सबसीडियरी तह करून तें संस्थान आपल्या मुठींत आणण्याचा इंग्रजांचा यत्न रघूजीच्या दक्षतेनें शेवटपर्यंत तडीस गेला

---

१ नागो त्रिंबक. याचे पूर्वजांविषयीं अगर पुढील पिढ्यांची माहिती मिळत नाहीं.

नव्हता. व अप्पासाहेब अडचणींत आहे तोंपावेतों त्याचेकडून तो घडवून आणवावा हा त्यांचा हेतु होता व त्याप्रमाणें तो साध्य झालाहि. **नागोपंताचे** घरीं **जेंकिन्स** व **सौथबी** साहेब हे रात्रीं येऊन **नागोपंत, यशवंतराव, नारायण गोपाळ पंडितजी** व **आप्पासाहेब** यांचें खलबत होऊं लागलें. रेसिडेंटानें आप्पासाहेबांकडून सबसीडियरी तह करण्याचें कबूल करून घेतलें व त्या ऐवजीं आप्पासाहेबास मदत करण्याचें कबूल केलें. एवढी तयारी झाल्यावर आप्पासाहेबानें **धर्माजी** भोंसल्यास धरण्याचा मनसुबा केला. **सिद्दिक अलीखान** हाहि इंग्रजांचा कल पाहून वागणारा मनुष्य होता. इंग्रजांचा पक्ष आप्पासाहेबाकडे आहे व त्यामुळें आप्पासाहेबाचा पक्ष जोरदार होणार हें पाहून तोहि आप्पासाहेबास मिळाला. वरील रात्रीच्या बैठकींत आप्पासाहेबानें जरी इंग्रजांशीं सबसीडियरी तह करण्याचें कबूल केलें होतें तरी हा तह ताबडतोब झाला नाहीं. कारण त्याचा गवगवा होऊन सर्व मुत्सद्दी आपल्या विरुद्ध होतील ही आप्पासाहेबास भीति वाटली. शिवाय आप्पासाहेबास हा तह करण्याचा कायदेशीर अधिकारहि नव्हता. रेसिडेंटानें बाह्यतः तटस्थ वृत्ति दाखवून आंतून आप्पासाहेबास सर्व प्रकारें मदत केली व त्यामुळें बरेचसे मुत्सद्दी आप्पासाहेबाच्या बाजूस वळले.

एवढी तयारी होतांच विरुद्ध पक्षापैकीं मुख्य मनुष्य **धर्माजी** भोंसले यास कैद करण्याचा अप्पासाहेबानें निश्चय केला. नव्या हवेली—भोंवतीं **धर्माजीचे** हत्यारबंद अरबांचा पहारा होता. त्यांत आपले हस्तक पाठवून आप्पासाहेबानें फूट पाडली. नंतर **धर्माजी**शींहि बोलण्याकरितां मध्यस्थ पाठविले व तडजोड करण्याचा आव दाखविला. शेवटीं समक्ष बोलून आपला उभयतांचा समेट करावा या निमित्तानें जुने हवेलींत (जुने राजवाड्याचे महालांत) दक्षिणेकडील बुरजांत बैठक घालून तेथें धर्माजीस बोलण्याकरितां आप्पासाहेबानें ता. ११ एप्रिल १८१६ रोजीं बोलाविलें. धर्माजी आल्यावर तेथेंच त्यास कैद करून आप्पासाहेबानें त्याच्या हातापायांत बेड्या ठोकल्या. लागलीच नवी हवेलीहि त्यानें आपले ताब्यांत घेतली व धर्माजीचे ताब्यांतील सर्व रोकड व जवाहीर हस्तगत केलें. तसेंच धर्माजीच्या तर्फेच्या **जानबा जवंजाळ** नांवाच्या गृहस्थाचे ताब्यांत

रघूजीचे वेळचा खजिना होता तोहि हस्तगत करून आप्पासाहेबानें आपले पहारे जुने व नवे हवेलीवर बसविले व सर्व अधिकार आपल्या ताब्यांत घेतले. अनायासेंच राजाहि आप्पासाहेबाच्या ताब्यांत आला.

**आप्पासाहेबानें** पहिला समारंभ **परसोजीस** गादीवर बसविण्याचा केला. ता. १४ एप्रिल १८१६ रोजीं रविवारीं मोठ्या समारंभानें आप्पासाहेबानें परसोजीस नवे हवेलींतून जुने हवेलींत पालखींत बसवून आणलें. आपण स्वत: पालखीबरोबर तो परसोजीवर चवरी धरून पायीं चालत आला व मोठा दरबार भरवून इंग्रजी रेसिडेंट **जेंकिन्स** यास व सर्व मुत्सद्यांस बोलावून त्यानें परसोजीस गादीवर बसविलें. परसोजीच्या तोंडून कसें तरी "आमच्या तर्फे सर्व राज्यकारभार चालविण्यास आम्हीं आप्पासाहेबांस मुखत्यार नेमलें आहे." असें जाहीर करण्यांत आलें व तशी राज्यांत द्वाही फिरविली.

सर्व अधिकार हातीं आल्यानंतर आप्पासाहेबानें **बांकाबाईचे** पक्षाच्या लोकांवर आग पाखडण्यास सुरवात केली. ता. ५–५–१८१६ रोजीं त्यानें **धर्माजी** भोंसल्यास ठार मारविलें. **नारायण यशवंत** पळाला पण त्यास आणभाक देऊन त्यानें परत आणलें व सवा लक्ष रुपयांचे रोखे घेऊन त्यास सोडून दिलें. गणपतराव[१] तिखे म्हणून फौजेकडील एक अधिकारी होता त्यास दटावून त्यानें **गुजाबा दादा** गुजर याचे हाताखालचे फौजेची फोडाफोड केली. **गुजाबादादा** आपलें कांहीं चालत नाहीं व आप्पासाहेबाचा अधिकार जास्त जास्त बळावत चालला असें पाहून सर्व अधिकार सोडून स्वसंरक्षणापुरतें अरब लष्कर आपल्या वाड्याभोंवतीं ठेवून बंदोबस्तानें राहिला. तेथेंहि त्यास भीति वाटूं लागली; तेव्हां **नागो त्रिंबक** याचे घराजवळ गुजरांचे पुरातन कारभारी **येसाजी रामचंद्र गुजर** म्हणून होते त्याचें घर अडचणींत असल्यामुळें हल्ला करण्यास कठीण होतें म्हणून तेथें जाऊन कांहीं दिवस राहिला. शेवटीं आप्पासाहेबाविरुद्ध आपलें रक्षण करणारा इंग्रजांशिवाय दुसरा कोणी नाहीं हें पाहून त्यानें **जेंकिन्सकडे**

---

१ मुधोजीचा चंद्रपुरचा कारभारी रामाजी केशव याचा नातू (वंशवृक्ष पहा)

बोलणें लावलें व तिकडील संधान पक्कें केल्यावर एके दिवशीं रात्रीं पळून सीताबर्डीवर जाऊन तो इंग्रजांच्या आश्रयास राहिला. **जेंकिन्स** यानें त्यास बंदोबस्तानें **प्रयागास** राहण्यास पाठवून दिलें. तो तेथें आप्पासाहेबाच्या कारकीर्दीचे अखेरीपर्यंत राहिला व नंतर इंग्रजी रेसिडेंटानें त्यास नागपुरास परत आणून तिसऱ्या रघूजीच्या कारकीर्दीत **बांकाबाई** बरोबर कारभारावर ठेविलें.

या वेळेपर्यंत राज्याच्या अंतर्गत कारभारांत इंग्रजांचा हात विशेष शिरला नव्हता म्हणून या अंत:कलहांत रेसिडेंट उघड रीतीनें तरी पडला नव्हता. आप्पासाहेबानें प्रथम रेसिडेंटाची मदत व आश्वासन मागितलें होतें. परंतु रेसिडेंटानें प्रथम त्यास वचन दिलें नाहीं. अनेक दृष्टींनीं इंग्रजांचा आधार आपणास असणें अवश्य आहे असें आप्पासाहेबास वाटलें. बांकाबाईचा पक्ष कोणते वेळीं काय अपाय करील याचीहि त्यास नेहमीं भीति वाटे. शिवाय १८०३ चे तहानंतर दुसरे रघूजीस इंग्रज रेसिडेंटाचे विरोधामुळें व संशयामुळें पदोपदीं किती त्रास होत गेला हेंहि त्यानें पाहिलें होतें. रघूजीच्या मरणानंतर राज्याचा कारभार बराच घोंटाळ्याचा झाला होता. फौजेचे पगार तुंबलेले होते. पुढील सालच्या वसुलीच्या खर्चाची तरतूद कधींच होऊन गेली होती. उत्पन्नाच्या मानानें फौजेचा खर्च जास्त झाला होता. फौज कमी करावी तर कमी केलेल्या फौजेंत असंतोष व गडबड माजणार व त्याचा फायदा विरुद्ध पक्ष घेण्यास सदोदित तयार. अशा वेळीं इंग्रजी फौजेची मदत लागण्याचा संभव जास्त. शिवाय इंग्रजांचें वर्चस्व दिवसेंदिवस वाढत असल्यामुळें परसोजीच्या मागें आपणास गादी मिळावी याकरतांहि इंग्रजांशीं स्नेहभाव ठेवणें त्याच्या हिताचें होतें.

**नागपूरशीं सबसीडियरी तह २८-५-१८१६**:—वरील सर्व गोष्टींमुळें ब्रिटिश रेसिडेंट व इंग्रज सरकार यांच्याशीं स्नेहभाव वाढविण्याची विशेष जरूर आप्पासाहेबास वाटली. परसोजीनें त्यास सर्वाधिकारी बनविल्यामुळें त्यास त्याचेतर्फे तह वगैरे करण्याचा कायदेशीर अधिकार आला होता. इंग्रजांशीं त्याचें पूर्वींच बोलणें सुरू झालें होतें. शेवटीं त्यानें नागपूरच्या रेसिडेंटाशीं ता. २८-५-१८१६ रोजीं तैनाती फौजेचा तहनामा

करून मागें सांगितल्याप्रमाणें नागोपंताचे घरीं रात्रीं रेसिडेंटानें व आप्पासाहेबानें त्यावर सह्या केल्या. इंग्रजांकडून तोंपर्यंत अनेक प्रयत्न झाले असतांसुद्धां पूर्वी **रघूजीनें** अखेरपर्यंत जो सबसीडियरी तह करण्याचें टाळलें तो तह **आप्पासाहेबा**नें एका क्षणांत केला. या तहानें नागपुरच्या राज्याचें स्वातंत्र्य कायमचें गेलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्रजांनीं नागपुर राज्याच्या सुरक्षितपणासाठीं पायदळांच्या सहा पलटणी व घोडेस्वारांची एक पलटण ठेवण्याचें कबूल केलें व त्यांच्या पगाराच्या खर्चाकरितां राजानें दरसाल साडेसात लक्ष रुपये द्यावे असें या तहानें ठरलें. रक्कम न मिळाल्यास इंग्रज सरकार मागतील तो वरील रकमेपुरत्या उत्पन्नाचा मुलूख तोडून द्यावा. याशिवाय राजानेंहि आपले पदरीं आपले खर्चानें तीन हजार स्वार व दोन हजार पायदळ कॉंटिजंट फौज म्हणून ठेवावें व तिच्यावर देखरेख व हजेरी पत्रकांची तपासणी करण्याचा अधिकार रेसिडेंटाचा रहावा, राजाच्या सैन्याचा पगार, शिस्त व सामानसुमान या बाबतींत रेसिडेंट ज्या शिफारसी करील त्या राजानें ऐकिल्या पाहिजेत, याप्रमाणें या तहाचीं मुख्य कलमें होतीं. शिवाय परराज्याशीं राजकारण करणें तें इंग्रजांचे मार्फतीशिवाय करूं नये व इंग्रजांशीं व त्यांच्या दोस्तांशीं लढाई करूं नये वगैरे नेहमींची मुख्य कलमें होतीं. या तहनाम्याची मसलत इतक्या गुप्तपणें चालली होती कीं, ता. ९-६-१६ रोजीं शहरांत हा तह सार्वजनिक रीतीनें जाहीर करीपर्यंत याची बातमीसुद्धां कोणास कळली नव्हती. या तहावर आप्पासाहेबानें सही केली तीसुद्धां रात्रीं नागोपंताचे घरीं जाऊन तेथें केली. या तहाबद्दल राजातर्फेचे वकील **नागोपंत** व **नारायण पंडितजी** म्हणून होते. या कामगिरीबद्दल नागोपंतास दरसाल पंधरा हजार रुपयांचें पेनशन इंग्रजांकडून मिळालें. नारायण पंडितास ब्रिटिश सरकाराकडून पेनशन पूर्वींच चालू होतें. यावरून इंग्रजांस या तहाचें किती महत्त्व वाटत होतें तें दिसून येईल. वरील दोघा मुत्सद्यांनीं इंग्रजांस या कामांत किती मदत केली असेल हेंहि वरील बक्षिसांवरून अजमावितां येईल.

सबसीडियरी सैन्याची छावणी उत्तरेकडील भागांत नर्मदेच्या कांठीं कोठेंतरी ठेवावी असें पहिल्यानें ठरलें होतें. कारण त्याच भागांत पेंढारी व परशत्रु यांचा त्रास होता. परंतु **आप्पासाहेब** स्वभावानें भित्रा व त्यावेळेस

त्याला शत्रुहि पुष्कळ; यामुळें आपल्या जिवास कोणे वेळीं अपाय होईल याचीहि त्याला भीति वाटत होती. म्हणून वरील सैन्याशिवाय इंग्रज सैन्याची एक पलटण नागपुरास ठेवावी अशी त्यानें मागणी केली. सदरहू पलटण **जनरल डव्हटन** याचे हाताखालीं एलिचपुराहून ता. १–६–१६ रोजीं निघून नागपुरास ता. १८ जून १८१६ रोजीं आली व बाकीचें लष्करहि नागपुरच्या जवळच **कळंबेश्वर** येथें येऊन राहिलें व आपली सत्ता जास्त दृढ होईपर्यंत **आप्पासाहेबानें** तें तेथेंच ठेवून घेतलें. दोन पलटणी शहरांत पाहऱ्यावर राहिल्या व एक पलटण **तेलंगखेडीवर** ठेवली.

आप्पासाहेबाविरुद्ध दुसरे पक्षाचीं कारस्थानें चालूच होतीं. **बांकाबाई, गुजाबादादा गुजर, नरोबा चिटणीस** यांचेच पक्षास परसोजीची बायको **काशीबाई** हीहि मिळाली. वरील तहामुळें त्यांना जास्तच जोर आला. रेसिडेंटाचें आधींच वाढत चाललेलें महत्त्व या तहामुळें जास्त वाढलें. विरुद्ध पक्षानें रेसिडेंटाकडेहि अप्पासाहेबाविरुद्ध कारस्थानें चालविलीं. परंतु नवीनच झालेल्या तहामुळें रेसिडेंटानें आप्पासाहेबाचाच पक्ष धरला. शिवाय रघूजीची दुसरी बायको **पार्वतीबाई** इला आप्पासाहेबानें आपले पक्षास वळविलें. तरी सुद्धां राजवाड्यांत राहणेंहि आप्पासाहेबास सुरक्षित वाटेना. म्हणून इंग्रज छावणीच्या शेजारीं गांवाबाहेर **तेलंगखेडीचे** बगीच्यांतील बंगल्यांत आप्पासाहेब जाऊन राहिला व ऑगस्ट महिन्याच्या अखेरीस सर्व स्थिरस्थावर झालें तेव्हां परत शहरांत आला. बरसातीच्या नंतर सबसीडियरी सैन्य नागपुराहून नर्मदेच्या कांठीं हुसंगाबादेस कर्नल **आडाम्स** याच्या हाताखालीं ठेवलें. राजाची कॉंटिजंट फौजहि पेंढाऱ्यांचा उपद्रव मोडण्याकरितां त्याचे मदतीस गेली. त्यानंतर बरेच दिवस पेंढाऱ्यांचा उप-द्रव नर्मदेकांठच्या मुलखांत चालूच होता.

**नागपुरच्या सबसीडियरी तहाचें महत्त्व**—नागपूरच्या सबसीडियरी तहाची पूर्वपीठिका व आंतील गोष्टींचा थोडक्यांत निर्देश वर केला त्या-वरून दिसून येईल कीं, आप्पासाहेबानें स्वतःची गादी मजबूत करण्याकरितां-च हा तह केला. त्यापूर्वी इंग्रजांनीं कितीतरी प्रयत्न केले पण रघूजीनें हा तह केला नाहीं. या तहाबद्दल त्यावेळचा गव्हर्नर जनरल **मॉर्क्विस**

**ऑफ हेस्टिंग्ज** याचे खाजगी डायरींतील पुढील उताऱ्यावरून आंतील कारवाईची व या तहाच्या दूरच्या परिणामांची पूर्ण कल्पना येईल व या तहानें नागपूरचें राज्य खरोखरी त्याच वेळी गेलें हें समजेल.

" ता. १ जून १८१६—नागपुरच्या राजाशीं झालेला सलोख्याचा तह मला आज मिळाला. या तहानें नागपुर हें आमच्या छत्राखालीं एक मांडलिक संस्थान झालें आहे. जी गोष्ट आज गेलीं बारा वर्षें घडवून आणण्याचा आम्ही व्यर्थ प्रयत्न करीत होतों ती गोष्ट **रघूजी** राजाच्या आकस्मिक मरणानें त्या राज्यांत जीं व्यक्तिविषयक भांडणें उत्पन्न झालीं त्या योगानें मला घडवून आणतां आली, या गोष्टीकरितां जरी पुष्कळ युक्त्या प्रयुक्त्या कराव्या लागल्या आणि **पैशाच्या माऱ्यानें पुष्कळ अडचणी दूर झाल्या** तरी माझ्या उद्योगाचीं तत्त्वें अत्यंत शुद्ध स्वरूपाचीं होतीं. **रघूजी** राजाचा पुत्र **परसोजी** हा कांहीं विरोध न होतां गादीवर बसला. तो आंधळा असून गादीवर बसल्यापासून राजवाड्याच्या बाहेर कधींच आला नाहीं. त्यामुळें तो अज्ञात असाच राहिला. गादीवर बसण्यापूर्वी, त्याला विशेष अक्कल नाहीं एवढेंच प्रसिद्ध होतें; परंतु तो गादीवर बसल्यानंतर त्याच्याकडे जास्त बारीक दृष्टीनें पाहण्याची जेव्हां इतरांना संधि मिळाली तेव्हां कळून आलें कीं तो अक्षरशः वेडा आहे. त्याचा चुलत भाऊ **आप्पासाहेब** हा वयानें वीस वर्षांचा असून **चलाख** व **शहाणा** आहे व तोच गादीचा पुढील वारस आहे; कारण **परसोजीस** संतति नाहीं. आप्पासाहेबाच्या स्वाभाविक हक्कामुळे व परसोजीला जी कांहीं थोडीबहुत इच्छा प्रदर्शित करतां येत होती ती त्यानें दर्शविल्यावरून आप्पासाहेब राज्याचा कारभारी बनला. आप्पासाहेबाला माहीत होतेंच कीं आपल्या विरुद्ध राजवाड्यांत एक मोठा प्रबळ पक्ष आहे व ते लोक परसोजीस दत्तक घ्यावयास लावतील आणि मग मराठे लोकांच्या रूढीप्रमाणें आप्पासाहेबाचा हक्क अजीबात उडून जाईल. शिंद्याच्या तर्फेचे लोक व राजवाड्यांतील आश्रित हे कट करून राजवाड्यांतील बायांस अशी सल्ला देतील व नागपुरचे राज्यावर आपला पगडा बसविण्याकरितां दत्तक पुत्रास शिंद्याकडून लष्करी मदत मिळेल हाहि संभव आप्पासाहेबास वाटला. "

"आप्पासाहेबाच्या या मनःस्थितीवरून त्याचें मन तहाकरितां वळविणें हें मोठेंसें कठीण नव्हतें. त्याचा कायदेशीर अधिकार आम्हीं मान्य केला व **दत्तक घेण्याला जी बुद्धीची जाणीव लागते ती परसोजीमध्यें मुळींच नाहीं असें समजण्याचें व उघडपणें जाहीर करण्याचें मीं कबूल केलें.** त्या योगानें परसोजीला दत्तक घेण्याविषयींची भीति आप्पासाहेबास राहिली नाहीं. राजाला खाण्यापिण्यालीकडे कोणतीच इच्छाशक्ति नाहीं ही गोष्ट अगदीं सत्य आहे. सबब आप्पासाहेबास आम्हीं जी **हमी** दिली ती निवळ न्याय्य अशीच आहे. नागपूरचें राज्य हें आमचें संशयित वृत्तीचें शेजार होतें; त्यास आम्हीं वरील कृत्यामुळें एक निष्ठावंत मित्र करून घेतलें. याचा आम्हांस जो फायदा झाला तो इकडे आम्हां सर्वांस समजून चुकला आहे. परंतु या फायद्याचा विस्तृतपणा सर्वत्रांस पूर्णपणें अजमावितां येणार नाहीं. तीनशें मैल लांबीच्या सरहद्दीवर लष्कर ठेवण्याची मला बरीच अडचण पडत असे. तें लष्कर ठेवण्याची या नवीन तहामुळें आतां जरूरी राहिली नाहीं. पेशव्यास वळवून त्याचेकडून मराठी राष्ट्रसंघ पुन्हां बनविण्याचा शिंद्याचा जो गुप्तपणें उद्योग चालू आहे तो आतां अगदीं हाणून पडला आहे. शिंदा ज्या भोंसल्यांच्या सैन्यावर व पैशावर आपलें मनोराज्य करीत होता तें त्याला आतां अशक्य झालें आहे. कर्नल **डव्हटन**चे दक्षिणेंतील सैन्याची व नागपुरच्या (इंग्रजी) सैन्याची एक सांखळी झाल्यामुळें शिंद्याच्या उघड्या बाजूच्या तोंडावर आमचें कसलेलें लष्कर जाऊन बसलें आहे. तसेंच पेंढाऱ्यांनीं पुन्हां आमच्या दक्षिणेंतील मुलुखावर स्वारी केल्यास त्यांना आतां खात्रीचा बांध बसला आहे. कंपनीच्या हिताकरितां जें जें करण्याचें माझ्या मनांत आहे तें तें लढाई न करतां पूर्णपणें घडवून आणण्याची मला या तहानें आतां खात्री वाटत आहे. हें सर्व पेशव्याच्या निष्ठेवर अवलंबून आहे; पण जर त्यानें विश्वासघात केला–आणि मराठ्यांच्या इमानदारीबद्दल कोणालाहि खात्री देतां येणार नाहीं.–तर मात्र आम्हांस लढाई करावी लागेल. परंतु आतां अशा युद्धाचा परिणाम काय होईल याबद्दल शंका राहिली नाहीं व अशा युद्धानें कंपनीचाच परिणामीं जास्त फायदा होईल.[१]"

१ The private journal of the Marquess of Hastings. p. 254–55 ( Panini office edition )

आप्पासाहेबानें स्वतःच्या स्वार्थाकरितां राज्याचें स्वातंत्र्य घालविलें व राघोबादादा व दुसरे बाजीराव पेशवे यांचा धडा गिरविला. त्याचा परिणाम मराठी साम्राज्यास किती दुःखाचा झाला हें दिसतच आहे. आप्पासाहेबानें सबसीडियरी तहावर सही केली त्याच वेळीं नागपुरच्या राज्याचें स्वातंत्र्य गेलें. बाकीचा निवळ काळाचा अवधि होता. हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांचा अदूरदर्शीपणा व व्यक्तिगत स्वार्थ व इंग्रजांचा दूरदर्शीपणा व स्वदेशभक्ति यांमधील महदंतर वरील उताऱ्यावरून स्पष्ट दिसेल.

**परसोजीचा मृत्यु ता. १-२-१८१७**--याप्रमाणें स्थिरस्थावर झालें असतां लवकरच एके दिवशीं परसोजी मरण पावला. ता. १-२-१८१७ रोजीं सकाळीं परसोजी बिछान्यांतच मेलेला आढळला. त्यामुळें एकच हाहाःकार झाला. आप्पासाहेबानें त्यास आपल्या हस्तकांकडून गळा दाबून मारलें अशी अफवा उठली. आप्पासाहेब त्यावेळीं नागपुरास नसून चंद्रपुरास कांहीं कामानिमित्त गेला होता. मागें अरबांचा जमादार **सादिक मनू भालदार** व **जानू बनसोड** हे परसोजीच्या शरीराच्या बंदोबस्ताकरितां ठेविले होते. परसोजीचा मृत्यु स्वाभाविक रीतीनें झाला नसून आप्पासाहेबानें त्याचा खून करविला हीच सर्वत्राची समजूत झाली. परंतु तसा प्रत्यक्ष पुरावा कांहींच न मिळाल्यामुळें लोकवार्तेपलीकडे त्या वेळीं मजल गेली नाहीं. रेसिडेंटानें गुंडो लक्ष्मण[१] नांवाच्या रेसिडेन्सींतील मनुष्यास परसोजीस प्रत्यक्ष पाहण्यास राजवाड्यांत पाठविलें होतें. परंतु त्यास दग्याचें कांहीं चिन्ह दिसलें नाहीं असें त्यानें कळविलें.

परसोजीच्या मृत्यूंत आप्पासाहेबाचें अंग कितपत होतें हें निश्चयात्मक सांगणें कठीण आहे. एवढें मात्र खरें कीं, इंग्रजांनीं आप्पासाहेबावर परसोजीचे खुनाचा आरोप आणिला त्यापूर्वीं व त्यानंतरसुद्धां आप्पासाहेबानें रामचंद्र वाघ व मनभट यांचे मार्फतीनें परसोजीचा खून करविला अशी बऱ्याच लोकांची प्रामाणिक समजूत होती; ही गोष्ट त्यावेळचे अनेक लेखांवरून दिसून येते. इंग्रजांचें या बाबतीतलें मत मात्र विश्वासार्ह नाहीं. कारण परसोजी मेल्यानंतर इंग्रजांचे रिपोर्ट आप्पासाहेबाचें अंग या गोष्टींत

१ दंडिगे. याचे वंशज सीताबर्डीस आहेत.

नाहीं असे होते व मग आप्पासाहेबावर इतराजी झाल्यानंतर इंग्रजांकडून प्रथमच हा आरोप करण्यांत आला.

परसोजी मेल्यानंतर कांहीं दिवसांनीं सर्व स्थिरस्थावर झालें व आप्पासाहेब निर्धास्त झाला. त्यानंतर त्याला आपल्या पारतंत्र्याची जाणीव होऊं लागली व तैनाती तहाबद्दल पश्चात्ताप होऊं लागला. **नागोपंत** व **नारायण** पंडितजी यांजवरून त्याचें मन उतरलें व त्यांची सल्लामसलत तो घेईनासा झाला. **सिद्दिकअलीखान** व **रामचंद्र वाघ** हे दोघे लष्करी हुद्देदार यांच्या तंत्रानें तो चालूं लागला. पूर्वींचे दोघे पंडित इंग्रजांच्या पक्षाचे आहेत असें त्यास वाटूं लागलें व तें खरेंहि होतें. **रामचंद्र** वाघ हा मोठा खोल बुद्धीचा व धाडशी मनुष्य होता. सिद्दिकअली व रामचंद्र वाघ यांचें प्रस्थ फारच वाढलें व नागो व नारायण पंडितास कोणी विचारीनासें झालें. त्यांनीं वरील गोष्टी रेसिडेंटाच्या कानावर घातल्या व रेसिडेंटानें आप्पासाहेबास तंबी दिली कीं, हेच जुने वकील आमच्या दरबारीं तुम्हीं ठेविले पाहिजेत.

**रावजी घड्याळजी—रावजी परशराम घड्याळजी** नांवाचा एक मनुष्य या वेळेस पुढें आला. पूर्वीं हा आप्पासाहेबाबरोबर फारसी शिकत होता. त्यावरून त्याचें आप्पासाहेबाशी संघटण जमलें. पुढे तो सीताबर्डीवर जाऊन थोडेंसें इंग्रजी शिकला. साहेब लोकांकडील इंग्रजी वर्तमानपत्रांतील मोडक्या तोडक्या बातम्या कांहीं वाचून व कांहीं ऐकून तो आप्पासाहेबास सांगत असे. इंग्रजांकडे हिंदुस्थानांतल्या सर्व ठिकाणच्या बातम्या येत. तशा आपासाहेबास दुसरीकडून मिळण्याचें साधन नव्हतें, म्हणून **रावजी** हा आपासाहेबाचा आवडता बनला, तो घड्याळें दुरुस्त करण्याचेंहि काम शिकला होता. म्हणून त्यास **घड्याळजी** असें टोपण नांव पडलें. नारायण पंडितजी व नागोपंत यांजवरील विश्वास उडाल्यामुळें आप्पासाहेबानें या घड्याळजीस व रामचंद्र वाघास कारभारी केलें व इंग्रज रेसिडेंटास कळविलें कीं, आमचे तर्फे नारायण पंडिताच्या ऐवजीं हे बोलत जातील. रेसिडेंटानें तंबी देतांच मात्र आप्पासाहेबानें रामचंद्र वाघ, नागोपंत व सिद्दिक अलीखान यांस कारभारी नेमलें.

आप्पासाहेबास प्रथम बराच त्रास झाला होता. परसोजी भोंसले यास आपले हस्तक रामचंद्र वाघ व मनभट यांचेकडून आप्पासाहेबानें मारविलें असा प्रवाद मागें सांगितल्याप्रमाणें प्रथम आंतून आंतून व नंतर उघडपणें आला. त्याचीं बीजें त्यापूर्वीच अस्तित्वांत होतीं. बांकाबाईचा विरुद्ध पक्ष जरी कमजोर झाला होता तरी अद्यापि जिवंत होता व आप्पासाहेबाविरुद्ध कारस्थानें करीतच होता, हा विरुद्ध पक्ष त्यानें त्या पक्षांतील व इतर लोक अनुकूल करून घेऊन हाणून पाडला तेव्हां त्याच्या जिवास थोडासा सुरक्षितपणा वाटला.

**आप्पासाहेब गादीवर बसला ता. २१-४-१८१७**--परसोजी मरण पावला त्यावेळी आप्पासाहेब नागपुरास नसून चंद्रपुरास गेला होता तो ताबडतोब परत आला नाहीं. त्यास गादीवर बसण्यासहि विरुद्ध पक्षाकडून अडथळा झाला असता. परंतु घराण्यांत आप्पासाहेबाशिवाय दुसरा पुरुषच न उरल्यामुळें विरुद्ध पक्षाचें कांहीं चाललें नाही. आप्पासाहेब चांद्याहून परत येऊन कांहीं विघ्न न येतां शांतपणें गादीवर बसला. गादीवर बसण्याचा प्रत्यक्ष विधि ता. २१-४-१८१७ रोजीं झाला. गादीवर बसल्यावर सेना साहेब सुभ्याच्या पदाची वस्त्रें पुण्याहून आणण्याकरितां त्यानें पुण्यास आपला वकील पाठविला व नागपुरच्या रेसिडेंटानें पुण्याच्या रेसिडेंटासहि वस्त्रें मिळवून देण्याबद्दल पत्रें दिलीं. परंतु यानंतर एका अकल्पित कारणामुळें आप्पासाहेबाचा इंग्रजांशी बिघाड झाला. परंतु हा बिघाड होण्यापूर्वी या बिघाडाचीं बीजें गुप्तपणें कांही दिवसांपासून आंतून रुजत होतीं व भडका होण्यास निमित्त मात्र पाहिजे होतें. सर्व हिंदुस्थानी राज्यें निर्जीव व हत-बल झाल्यामुळें व सर्वत्र इंग्रजांचा पगडा बसल्यामुळें इंग्रज सार्वभौम व हिंदुस्थानी राजे रजवाडे हे संस्थानिक बनले. कागदांत मात्र दोस्त राष्ट्रें म्हणून बरोबरीचें नातें दाखवावयाचें व लागलीच प्रत्यक्ष कृतींत इंग्रज हे मालक व संस्थानिक हीं निवळ बाहुलीं अशीं वर्तणूक सुरू झाली. त्यामुळें एकदां स्वातंत्र्याचा आस्वाद घेतलेले बाजीराव पेशवे व आप्पासाहेब भोंसल्या-सारख्यांना इंग्रजांचा सासुरवास सहन होईना व ते इंग्रजांच्या पारतंत्र्यां-तून मोकळे होण्याची इच्छा करूं लागले. परंतु त्या कामास लागणारें धैर्य, शौर्य व बुद्धिमत्ता त्यांचे आंगीं मुळींच नसल्यामुळें ते त्या इच्छेस बळी

पडून आपल्या राज्यास मुकले. प्रथम पेशवे, भोसले, शिंदे व होळकर यांचा आंतून गुप्त पत्रव्यवहार सुरू झाला. नंतर एकमेकांचे वकील गुप्तपणें येऊं जाऊं लागले. पण यांतील गुप्त कांहींच रहात नव्हतें. त्यांचीं पत्रें सुद्धां इंग्रजांच्या हातीं जात व वकीलांचीं खलबतें हेरांकडून इंग्रजांस कळत.

**रेसिडंटास आप्पासाहेबाचा संशय व त्याचा सावधपणा**—नागपुरास राजाचें, आठ हजार स्वार व आठ हजार पायदळ असें सैन्य होतें. माळव्यांत सुद्धां नवीन सैन्यभरती आप्पासाहेबातर्फे होत आहे अशी तिकडील इंग्रज सरदारांस बातमी लागली. **चित्तू** पेंढाऱ्याचे वकील नागपुरास आले व त्यांना पोषाख वगैरे देऊन राजानें त्यास परत पाठविलें. ते परत जातांना **हर्दा** येथील एका गृहस्थास गुप्तपणें भेटले. त्यांनीं पेंढारी यांशीं व राजाशीं कांहीं कारस्थान चालू आहे असें त्या गृहस्थास सांगितलें व त्यानें तें इंग्रज सरदार **मालकम** याचा तळ तेथें होता त्यास सांगितलें. त्यांत तथ्य किती होतें तें सांगतां येत नाहीं. परंतु त्या योगानें इंग्रज सावध झाले व त्यांनीं नागपुरास कांहीं गडबड होईल अशा भीतीनें तिकडे सैन्य पाठविणें सुरू केलें व तें पोंहोचण्यापूर्वींच इकडे भडका सुरू झाला. बाजीराव पेशवे व आप्पासाहेब यांचें गुप्त खलबत चालू आहे ही बातमी दोन्ही दरबारचे रेसिडेंटांस समजली होती व आप्पासाहेबाचें एक पत्र एल्फिन्स्टन याचे हातांत सांपडलें होतें तें त्यानें नागपुरास जेंकिन्सकडे पाठविलें होतें. **जेंकिन्स** यानें काम पडल्यास नागपुरास इंग्रजी सैन्याची मदत यावी अशी तजवीज अगोदरच केली होती. नर्मदेच्या पलीकडचें कर्नल **आडाम्स** याच्या हाताखालचें नागपुरचें सबसीडियरी सैन्य त्यानें नर्मदेच्या दक्षिणेस आणून ठेवलें व जरूर पडेल तेव्हां नागपुरास येण्यास त्यानें तयार असावें असा हुकूम सोडला. तसेंच रामटेकाजवळ **स्कॉट** याची पलटण होती ती त्यानें नागपुरास बोलावून घेतली. **रसेलच्या** पलटणी बैतुलास होत्या त्या व हुसंगाबादेहून ले. क. **गहान** याच्या पलटणी नागपुराकडे निघाल्या होत्या. परंतु त्या पोहोंचण्यापूर्वींच नागपुरास लढाई सुरू झाली.

**खडकीची लढाई** (५–११–१८१७)—पुण्यास ता. ५ नोव्हेंबर १८१७ रोजीं दुपारीं पेशव्याच्या मराठी सैन्यानें इंग्रजी रेसिडेन्सीवर हल्ला केला

व ती लुटली. तसेंच त्यानें खडकीच्या इंग्रजी पलटणींवरहि हल्ला केला. यावरून इंग्रज व पेशवे यांचे सैन्यांत उघड लढाई सुरू होऊन त्याची अखेर बाजीरावाचें पलायन व राज्यत्याग यांत झाली. पुण्याचा हल्ला व ग्वाल्हेर येथें शिंद्याचा इंग्रजांशीं तह ता. ५-११-१८१७ रोजींच झाला व दोन्ही बातम्या ता. १४ नोव्हेंबर रोजीं नागपुरचे रेसिडेंटास समजल्या. नागपुरास आप्पासाहेबानें इंग्रजांविरुद्ध उघड कांहींच वर्तन केलें नाहीं. परंतु त्याचें पुण्याच्या व शिंद्याच्या दरबारीं कांहीं सूत आहे ही गोष्ट रेसिडेंटास कळली होती. इंग्रजांशीं बाजीरावाची लढाई सुरू झाल्यानंतर आप्पासाहेबानें पुण्याशीं पत्रव्यवहार व संबंध ठेवूं नये असें रेसिडेंटानें आप्पासाहेबास बजावलें. इंग्रजांच्या मताप्रमाणें सबसीडियरी तहाच्या कलमान्वयें भोंसल्यांनीं पुणें अगर इतर कोणाहि संस्थानिकांशीं इंग्रजांच्या मध्यस्थीशिवाय स्वतंत्रपणें बोलूं नये. इंग्रजांच्या मताप्रमाणें सबसीडियरी तहानें इंग्रज हे सार्वभौम व भोंसले हे मांडलिक राजे झाले. परंतु आप्पासाहेबास हें नातें कबूल नव्हतें. बाजीरावाकडून खंडो गोविंद नांवाचा वकील नागपुरास येऊन त्याचीं व आप्पासाहेबाचीं कांहीं खलबतें सुरू आहेत अशी रेसिडेंटास बातमी लागली.

**आप्पासाहेबास वस्त्रें**—नागपुरचें राज्य वास्तविक जरी जवळ जवळ स्वतंत्रच झालें होतें तरी कायदेशीर रीतीनें राज्यारोहणास सातारच्या अगर पुण्याच्या दरबारची मान्यता असणें अवश्य होतें व त्याप्रमाणें आतांपर्यंत सर्व राजांनीं सेनासाहेब सुभा या पदवीचीं वस्त्रें पुण्याहून आणलीं होतीं. आप्पासाहेबानें हीं वस्त्रें आपले वकील पाठवून बाजीराव पेशव्याकडून मिळविलीं. तीं इंग्रज रेसिडेंट **एल्फिन्स्टन** याचे संमतीनेंच मिळालीं होतीं. आप्पासाहेबानें तीं वस्त्रें व किताब घेण्याचा जाहीर दरबार सुमुहूर्तानें ता. २४-११-१८१७ रोजींचा ठरविला व रीतीप्रमाणें रेसिडेंटास या दरबारास हजर राहण्याबद्दल आदले दिवशीं आमंत्रण पाठविलें. स्वतः हजर राहतां येत नसल्यास तुमच्या तर्फे कोणी वकील पाठवावा व या प्रसंगानिमित्त इंग्रजी छावणींतहि तोफांची सलामी द्यावी असाहि आप्पासाहेबानें निरोप पाठविला. हा समारंभ औपचारिक परंतु अत्यवश्यक असा होता, परंतु पुण्याहून वस्त्रें रवाना झाल्यानंतर बाजीरावाचें

व इंग्रजांचें युद्ध सुरू झालें. यामुळें बाजीरावाकडून आलेलीं वस्त्रें आप्पासाहेबानें ग्रहण करून आपण पुण्याच्या दरबारचे अंकित आ ों हें दाखविणें रेसिडेंटास आवडलें नाहीं. रेसिडेंटानें दरबारला येण्याचें तर नाकारलेंच, परंतु तुम्हीं आमच्या शत्रूकडून अशीं वस्त्रें घेऊं नयेत असेंहि बजावलें. आप्पासाहेबानें अर्थात् तें मान्य केलें नाहीं व ता. २४-११-१८१७ रोजीं शहरांत मोठा दरबार भरवून त्यानें सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें व किताब ग्रहण केला.

हा समारंभ झाल्यानंतर दरबारांतून बाहेर येऊन आप्पासाहेब हत्तीच्या अंबारींत बसून त्यानें प्रमुख सरदारांस सभोंवतीं बोलावून जाहीर भाषण केलें व सांगितलें कीं " आतां माझी इज्जत कायम ठेवणें हें तुमचे हातांत आहे व तुमच्यावर माझा दृढ विश्वास आहे, त्यानंतर लष्कर व लवाजम्यासह स्वारी निघून सक्करदऱ्याचे छावणीवर गेली. तेथें जरीपटक्याचें निशाण उभें करून सर्व सैन्य रांगेनें उभें राहून सैन्याची व तोफांची सलामी झाली. रेसिडेंटाच्या सांगण्याविरुद्ध हें घडल्यामुळें इंग्रजांची व आपली लौकरच लढाई सुरू होणार हें आप्पासाहेबास कळून आलें. इंग्रजांसहि हें स्पष्ट दिसून आलें व दोन्ही पक्ष आपल्या तयारींत राहिले. रेसिडेंट स्वतःहि आला नाहीं अगर त्यानें कोणी वकीलहि दरबारास पाठविला नाहीं. मग सलामी देणें तर दूरच. या वर्तनाचा आप्पासाहेबास फार राग आला. त्यानें रेसिडेंट व इंग्रजी छावणीशीं सर्व संबंध बंद केला. रेसिडेंटानें हरकाऱ्याबरोबर पाठविलेले लखोटे न घेतां त्यांना दरबारापर्यंतहि येण्याची परवानगी दिली नाही. शहरांत काय चाललें आहे हेंहि रेसिडेंटास कळण्याची मुष्कील झाली. लौकरच भडका होणार व राजाची व इंग्रजांची चकमक होणार हें उघड दिसूं लागलें. दोन्ही पक्ष आपापलें लष्कर जमवूं लागले. इंग्रजी लष्कर रेसिडेंटानें आधींच बोलाविलें होतें परंतु तें येऊन पोहोंचण्यास अवकाश होता म्हणून तो त्याची वाट पहात होता. नाहीं तर त्यानेंच आप्पासाहेबास फार तर एकादा निर्वाणीचा खलिता पाठवून हल्ला केला असता.

**लढाईची तयारी**— आप्पासाहेबाचे मुख्य सल्लागार **मनभट, रामचंद्र**

**वाघ**, सुभेदार **निंबाळकर, नारो सखाराम** व **नारायण नागरे** हे होते. पेशव्याकडचीं वस्त्रें घेतांच इंग्रजांशीं उघड वैर सुरू होईल हें जाणून आप्पासाहेबानें आपलें लष्कर **आंबाझरीवर** होतें तें **सक्करदऱ्याचे** मैदानांत आणून त्याच्या तीन टोळ्या केल्या. एक **गणपतराव सुभेदार** याचे हाताखालीं, दुसरी **अमृतराव पांडुरंग काळू** (बक्षी) याचे हाताखालीं, व तिसरी **रामचंद्र वाघ** याचे हाताखाली. याप्रमाणें तजवीज करून आपासाहेबानें वस्त्रें घेऊन लष्कराची सलामी घेतली व लष्करास तेथेंच डेरे देण्यास सांगितलें व दुसरे दिवशी सीताबर्डी व शहर यांचे दरम्यान अरब सैन्याचे पहारे बसविले. अरबांवर देखरेख करण्याचें काम **मनभट** याजकडे दिलें. तसेंच गणपतराव सुभेदार, रामचंद्र वाघ, नारायण सखाराम, माधवराव खळतकर, निंबाळकर सुभेदार हे सीतावर्डीच्या आसपास ठेवले. नबाब सिद्दिकअलीखां यावर त्या सुमारास आप्पासाहेबाचा रोष झाल्यामुळें त्यास त्यापूर्वीच त्यानें कैदेंत ठेवलें होतें; त्यामुळें तो या लढाईत नव्हता. सिद्दिक अलीखान हाहि इंग्रजांस फितूर झाला आहे असा आप्पासाहेबाचा समज झाला होता.

तारीख २५ रोजीं दुपारीं शहरापासून दोन तीन कोसांवर **भोकर** येथे राजाच्या सैन्याची छावणी होती तेथून दोन हजार घोडेस्वार निघून नागपुरास येऊन रेसिडेन्सीच्या बाजूस येऊन उतरले. तसेंच नागपुरचे छावणीस **गणपतराव** सुभेदार याचे हाताखालचें घोडदळहि सज्ज झालें. पेंढारी नागपुरावर येणार अशीहि भुमका उठली होती. परंतु सैन्याची जमवाजमव करण्याचें खरें कारण न समजावें म्हणूनहि ही बातमी मुद्दाम उठविली असेल. परंतु शहरांत व रेसिडेन्सीमध्यें सर्वांना कळून चुकलें कीं रेसिडेन्सीवर हल्ला होणार. यामुळे सीताबर्डीच्या आसपासची वस्ती व रेसिडेन्सीच्या बाजाराजवळची वस्ती उठून गेली.

**सीताबर्डीच्या टेकडीवर इंग्रजी लष्कर**—इकडे रेसिडेंटानें तीन मैलांवर **तेलंगखेडी** येथें इंग्रजी मुख्य छावणी होती तेथें हुकूम पाठवून तेथील मुख्य अधिकारी ले. क. **स्कॉट** यास सर्व सैन्यासह एकदम कूच करून सीताबर्डीच्या टेकडीवर येऊन ठाणें देण्याबद्दल सांगितलें. त्याचप्रमाणें रेसि-

डेन्सीचे लष्करासहि हुकूम केला कीं, शत्रू टेकडी काबीज न करतील याबद्दल काळजी घ्यावी. दुपारीं ३।४ वाजण्याचे सुमारास कांहीं अरब सैन्य सिताबर्डीच्या टेकडीकडे येत आहे असें रेसिडेन्सी सैन्याचा अंमलदार कॅ. लॉइड यानें पाहून तो आपले सहाशें शिपाई व दोन तोफा घेऊन मोठ्या टेकडीवर ठाणें देऊन बसला. हेंच अगोदर करणें मराठी सैन्यास सुसाध्य होतें. पण त्यांनीं ती संधि फुकट गमावली. इकडे **स्कॉट** हा बंगाली घोडेस्वारांच्या पलटणी व दोन तोफा व कांहीं पायदळ घेऊन निघाला तो विरुद्ध पक्षाकडून कांहीं अडथळा न होतां **सीबतार्डीच्या** टेकडीवर जाऊन मिळाला व दोन्ही टेकड्या इंग्रजी लष्कराच्या ताब्यांत येऊन त्यांना उत्तम माऱ्याची फायदेशीर जागा अनायासें मिळाली.

भोंसल्यांच्या सैन्यांत कांहीं एकसूत्रीपणा अगर दूरदर्शीपणा असलेला दिसत नाहीं. त्यांनीं आपला पुढील कार्यक्रम आंखलेलाहि दिसत नाहीं. सैन्याच्या हालचाली कोणाच्या हुकमाखालीं चालत होत्या हें सांगतां येत नाहीं. युद्धाचे वेळीं वेळेवर सर्व महत्त्व असतें. इंग्रजी सैन्यास कुमक मिळण्यापूर्वी अगर त्यास तयारी करण्यास पूर्ण अवसर न देतां भोंसल्यांच्या सैन्यास एकदम चढाई करतां आली असती. प्रथम सीताबर्डीच्या टेकड्यांची माऱ्याची जागा त्यांनीं आधींच एकदम काबीज करावयास पाहिजे होती. तो प्रयत्न त्यांनीं मुळींच केलेला दिसत नाहीं. दुसरें **स्कॉट** याचें सैन्य टेकडीकडे येण्यापूर्वीं मध्येंच त्यास अडवून मैदानांतच त्यांना लढाई घालतां आली असती व भोंसल्यांचें सैन्य संख्येनें बरेंच जास्त असल्यामुळें त्यांना यश येण्याचा तेथेंच जास्त संभव होता. उलट नाक्याची उंच जागा शत्रूस मिळूं दिल्यामुळें थोड्या सैन्यास स्वतःचें संरक्षण उत्तम तऱ्हेनें करून तोफांचा मारा खालच्या सैन्यावर करतां आला, तो मैदानांत इतक्या चांगल्या तऱ्हेनें त्यांना करतां आला नसता. सीताबर्डीच्या लढाईत भोंसल्यांच्या सैन्याचा पराभव झाला. त्याला हीच चूक मुख्यत्वें कारणीभूत झाली.

इंग्रजी सैन्यानें टेकड्या ताब्यांत घेऊन डागडुजी व तयारी चालविली. परंतु भोंसल्यांच्या सैन्यावर प्रथम हल्ला करण्याची त्यांची इच्छा नव्हतीच. त्यांना स्वतःचा बचाव करण्याचीच मुख्य काळजी होती. नर्मदेकडून येणारे सैन्याची

कुमक मिळण्यापूर्वीं तर त्यांनीं लढाई सुरू करणें शक्यच नव्हतें. आपण टेकड्या ताब्यांत घेतल्या एवढेंच निमित्त राजाच्या सैन्यास लढाई सुरू करण्यास पुरेसें होईल हें रेसिडेंट व स्कॉट जाणून होते. स्कॉट हा आपले ता. ३० नोव्हेंबरचे रिपोर्टांत लिहितो कीं टेकडीखालीं अरब सैन्य व तोफा दिसतांच आम्ही त्यांना निरोप पाठविला कीं " आम्ही तुमचेवर हल्ला चालवीत नाहीं. आम्हीं फक्त आमचे बचावाकरितां बंदोबस्त करतों. " परंतु एवढ्यानें अरबांचें समाधान झालें नाहीं हें उघडच आहे. इंग्रज आपल्या सैन्यास बाहेरची मदत येईपर्यंत कालहरण करीत होते. परंतु शेवटीं अरबांनीं सीताबर्डीच्या टेकडीवर हल्ला केल्यामुळें त्यांना त्यापूर्वीच लढाई करावी लागली.

**नागपुर व आसपासचीं ठाणीं**—पुढील संबंध नीट समजण्याकरितां त्यावेळचें नागपुर व आसपासचा भाग यांचें वर्णन करणें जरूर आहे. नागपुर शहरांत शुक्रवार दरवाज्याच्या आंत महाल म्हणून जो भाग आहे त्यांत राजवाडा असे. तेथें हल्लीं म्युनिसिपालिटीचें ऑफिस व लायब्ररी आहे. त्याचे पश्चिमेकडील अवशिष्ट भाग अद्याप कायम आहे. राजवाड्याचा पश्चिम भाग शुक्रवार दरवाज्यानें संरक्षित असे व त्यालाच किल्ला म्हणत. शिवाय शहराच्या दक्षिण बाजूस सक्करदरा म्हणून बाग आहे तेथेंहि वाडे वगैरे आहेत. शहराच्या व सक्करदऱ्याच्या मध्यें मोठें मैदान असून तेथें लष्कराची छावणी पडे. किल्ल्याच्या आग्नेय बाजूस तुळशीबाग म्हणून एक बाग व त्यांत देवळें व राहण्याचे बंगले आहेत. हा भाग गांवाच्या अखेरीस आहे. शहराच्या दक्षिण बाजूस थोरले रघूजी भोंसले व इतर राजे यांच्या समाधी आहेत. याच तुळशीबागेंत व समाधीच्या आश्रयानें इंग्रजी सैन्य पुढें ता. २४ डिसेंबर १८१७ रोजीं राहिलें होतें.

किल्ल्याच्या भोंवतीं तटबंदी असून ती आंत बहुतेक ठिकाणीं पडलेली आहे. फक्त दरवाजे मात्र शिल्लक असून त्यांवरून त्या तटबंदीची मांडणी लक्षांत येते. शुक्रवार दरवाजा, बुधवार दरवाजा, आदितवार दरवाजा, भंडार दरवाजा, भुत्या दरवाजा वगैरे प्रसिद्ध असून त्यांपैकींहि कांहींचें नुसतें नांवच शिल्लक आहे. (नकाशा पहा.)

इंग्रजी रेसिडेन्सी सीताबर्डीचे किल्ल्याचे पश्चिमेस हल्लीं जेथें मॉरिस कॉलेज वगैरे इमारती आहेत तेथें होती. मॉरिस कॉलेजच्या इमारतींत खुद्द रेसिडेंट रहात असे. इंग्रजी लष्कर तेलंगखेडी (रेसिडेन्सीच्या पलीकडे तीन मैलांवर ) येथें छावणी देऊन असे व खुद्द रेसिडेंटाच्या तैनातींतलें लष्कर सीताबर्डीच्या लहान टेकडीच्या पश्चिमेकडील पायथ्यास व रेसिडेन्सीच्या समोर उत्तरेस बराकींत रहात होतें. तेथेंच इंग्रजांचा खजिनाहि होता. टेकडीच्या उत्तरेकडील व पूर्वेकडील पायथ्यास खालीं लहान-सहान झोपड्या, उत्तरेकडील पायथ्यापर्यंत पसरल्या होत्या. ह्या झोपड्यांस ता. १६ नोव्हेंबरच्या रात्रीं आग लागून त्या बहुतेक जळून गेल्या होत्या.

**सीताबर्डीचा किल्ला**—सीताबर्डीच्या किल्ल्यास तटबंदी नसून शहर व रेसिडेन्सी यांच्या दरम्यान ह्या दोन टेकड्या एकास एक लागून दक्षिणोत्तर लांब अशा होत्या. दक्षिणेकडील टेकडी पूर्वपश्चिम अशा लांबीची आहे. ती मोठी व उंच असून रेसिडेन्सीस लागून होती. दुसरी उत्तरेस सुमारें शंभर फूट अंतरावर पण मोठे टेकडीस लागूनच असून मोठ्या टेकडीपेक्षां ठेंगणी आहे. मोठ्या टेकडीवरील मैदान पू. प. २८० यार्ड लांब व द. उ. रुंद ५० यार्डांपासून १२० यार्डांपर्यंत आहे. लहान टेकडीचें मैदान पू. प. १०० फूट लांब व २० फूट रुंद असें आहे. पूर्वी या टेकड्यांवर कांहीं इमारती नसून लष्कराचेंहि कायमचें ठाणें नव्हतें. लहान टेकडीवर बाणाचें खपरेल म्हणून राजाचे लष्कराची बाण व कैच्या ठेवण्याची एक जागा असे व मोठ्या टेकडीवर कांहीं लहानसहान देवळें असत. मैदानापासून ह्या टेकड्या सुमारें शंभर फुटांच्या उंचीवर आहेत. भोंवतालचा खडक हल्ली पूर्व व दक्षिण बाजूनें भिंतीसारखा फोडलेला आहे व एवढ्यावरूनच त्याला किल्ला म्हणतात. परंतु पूर्वी तोहि फोडलेला नव्हता.[1] परंतु पश्चिमेकडून व उत्तरेकडून चढण फारच सोपी आहे. लहान टेकडीचे पायथ्याशीं म्हणजे हल्लीं जेथें रेल्वे स्टेशन आहे तेथें एक लहान वस्ती असून ती पूर्वेच्या बाजूनें शहराबाहेरील पेठांस लागून असे.

[1] एवढ्या सोईची व माऱ्याची जागा भोंसल्यांनीं किल्ला न बांधतां कशी राहूं दिली हें आश्चर्य आहें. भोंसल्यांना असें संकट कधींच आलें नव्हतें.


सीताबर्डीचा हल्ला
ता २६ व २७ नोव्हेंबर
सन १८१७
A B इंग्रजी लष्कराचीं ठाणें
C इंग्रजी स्वारांची जागा
a a.a भोसल्यांचें लष्कर
b.b b भोसल्यांच्या तोफा
c.c c अरबांची जागा
उत्तर
मीना बाचाचा बाजार
जुम्मा तलाव
मोठी टेकडी
तोफखाना


[ पृष्ठ ४१२

या वस्तीस " मीनाबाबाचा बाजार " असें म्हणत असत. त्यासच लागून टेकडीसमोर ' तेलीपुरा ' म्हणून एक वस्ती होती.

मोठ्या टेकडीच्या दक्षिणेस पायथ्यापासून हल्लींची सीताबर्डीची वस्ती असे व तेथें रेसिडेन्सीशीं संबंध असणारे व्यापारी व इतर लोक नोकरचाकर वगैरे रहात असत. संगमाजवळील बुटीचें संगमेश्वराचें देऊळ मात्र पूर्वींच बांधलेलें होतें. १

सीताबर्डीच्या लढाईचें पुढें दिलेलें वर्णन मुख्यत्वें इंग्रजी आधारांवर २ दिलेलें आहे. त्यांत लेखकांनीं इंग्रज सैनिकांची फुशारकी मारण्याचा थोडासा प्रयत्न केला असला तरी तो वजा जातां तें त्या काळचें असल्यामुळें बरेंच विश्वसनीय दिसतें. निदान दुसऱ्या बाजची माहिती उपलब्ध नसल्यामुळें त्यावरच भिस्त ठेवणें भाग आहे.

युद्धाची अशा तऱ्हेनें तयारी सुरू असतांना देखील राजाकडून रेसिडेंटाकडे मित्रत्वाचें बोलणें चालूच होतें. एकमेकांचे वकील एकमेकांकडे येत होते. पेशव्याचा पुण्यास पराभव होऊन तो पळून गेला हें वर्तमान रेसिडेंटानें राजास कळविलें. त्यावर अभिनंदनपर पत्रें व निरोप ता. २५ रोजीं राजानें पाठविला. परंतु रेसिडेंटानें आतां युद्धास सुरवात होणार हें जाणून जनरल **डव्हटन** यास सैन्य घेऊन ताबडतोब मदतीस येण्याकरितां जासूद, रवाना केले व तेहि मोठ्या मुष्किलीनेंच रात्रीं चोरून बाहेर जाऊं शकले. कारण या वेळेस रेसिडेन्सीभोवतीं सर्व मराठा सैन्याचा घेरा पडला होता.

**सीताबर्डीची लढाई–** ता. २५ रोजीं रात्रीं दोन्ही पक्ष आपापल्या सैन्यांच्या जागा नेमून दुसरे दिवशीच्या युद्धाचा कार्यक्रम ठरविण्यांत गुंतले होते. मोठ्या टेकडीवर कांहीं देवळें, समाधि वगैरे आसऱ्याच्या जागा होत्या. परंतु लहान टेकडीवर कांहींच नसल्यामुळें तेथें कांहीं आसरा करण्याचा इंग्रजी सैन्यानें रात्रीं प्रयत्न करून पाहिला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

---

१ अप्र. कागदपत्रें.

२ त्यावेळच्या इंग्रज सैनिकांनीं लिहिलेली माहिती.
सीताबर्डीच्या लढाईचीं दोन चित्रें हल्लीं मॉरिस कालेजांत आहेत
**Blacker's maps of the 3rd Maratha war.**

ता. २६ रोजीं उजाडतांच दोन्ही पक्षांनीं आपआपल्या ठरविलेल्या जागांवर जाऊन ठाणें दिलें. दोन्ही टेकड्यांवर इंग्रजांनीं नाकेबंदी करून तोफा रोंखून ठेवल्या व आपलें मुख्य लष्कर रेसिडेन्सीपासून किल्ल्यापर्यंत लागून ठेवलें. तें रेसिडेन्सीचे समोर उत्तरेस म्हणजे टेकड्यांच्या पश्चिमेस होतें. तसेंच थोडेंसें लष्कर त्यांनीं मोठ्या टेकडीचे दक्षिणेस ठेवलें. मोठ्या टेकडीच्या पूर्व व दक्षिण बाजूचा खडक उंच असल्यामुळें तिकडून विशेष धास्ती नव्हती. तसेंच पश्चिमेस रेसिडेन्सीच्या पक्क्या इमारती टेकडीस लागून असून तेथें सर्व इंग्रजी लष्कर किल्ल्यापर्यंत लागून होतें. यामुळें या बाजूनें हल्ला होण्याची विशेष धास्ती नव्हती. परंतु खरी धास्ती लहान टेकडीवर होती. तिचा उतार तिन्ही बाजूनीं सोपा व शिवाय त्या टेकडीच्या पायथ्यास असलेलीं वस्तींतील घरें भोंसल्यांच्या लष्करानें वेढलीं असून तीं त्यांना आश्रयास उपयोगी पडलीं. तेथें मुख्य जमाव ठेवून लहान टेकडीवर हल्ला करणें त्यांना सोपें होतें. म्हणून इंग्रजी सैन्यानें तेथेंच जास्त मजबुती केली. परंतु तेथें सर्व लष्कर मावण्याइतकी जागाच नसल्यामुळें मुख्य लष्कर मोठ्या टेकडीवर व रेसिडेंन्सीच्या बाजूनें टेकडीच्या पिछाडीस ठेवावें लागलें.

## इंग्रजी लष्करांत पुढील पलटणी होत्या.

अधिकारी

**मेजर मॅकेन्झी**--(१) मद्रासी हिंदी पायदळ. २० वी पलटणींची एक तुकडी-

कॅ. **सॅडलर**--(२) सदरहू २४ वे ,, ,,

कॅ. **फिट्झेरल्ड**--(३) बंगाली हिंदी स्वारांच्या सहाव्या पलटणींतील तीन तुकड्या--स्वार

ले. **मॅक्सवेल**--(४) चार सहा पौंडी तोफा.

कॅ. **लाइड**--(५) रेसिडेन्सी एस्कॉर्ट (तैनाती सैन्य)--१२० शिपाई. (बंगाली पायदळ)

कॅ. चार्लस **जेंकिन्स**--(६) नागपुरची कंटिंजट फौज--

सबसीडियरी तहाप्रमाणें आप्पासाहेबानें रेसिडेंटाच्या देखरेखीखालीं ठेवण्याची ठरलेली फौज. इजवर रेसिडेंटाचा धाकटा भाऊ कॅ. चार्लस **जेंकिन्स** हा अधिकारी होता व तीहि फौज इंग्रजी फौजेंत सामील होती.

ले. क. **स्कॉट** हा नागपूरचे इंग्रजी सैन्याचा मुख्य अधिकारी होता व त्याच्याच हुकमानें सर्व काम चाललें होतें. **स्कॉट** हा स्वतः २० वी मद्रासी पलटण व रेसिडेंटाची तैनाती फौज घेऊन मोठ्या टेकडीवर राहिला. कारण तेथून लहान टेकडी व रेसिडेन्सीची जागा दोन्ही जवळ होत्या व दोन्हीकडची देखरेख करणें सोपें होतें. ही टेकडी पूर्व पश्चिम लांब असल्यामुळें एक तोफ पूर्वेकडे व एक पश्चिमेकडे याप्रमाणें दोन्ही टोंकास ठेवल्या. चारी तोफांवर इंग्रजी गोलंदाज होते.

घोडेस्वारांच्या बंगाली पलटणीच्या तिन्ही तुकड्या टेकडीखालीं रेसिडेन्सीच्या इमारतीच्या आसपासच्या मैदानांत टेकडीपर्यंत व दक्षिणेस सीताबर्डीच्या वस्तीजवळ मोठ्या टेकडीच्या पायथ्याशीं होत्या. त्यावर मुख्य अंमलदार **कॅ. फिट्झेरल्ड** हा होता व तो ले. क. **स्कॉट** याच्या हुकुमाप्रमाणें हल्ला करण्यास तयार होता. परंतु टेकडीच्या खालीं लढाईचें तोंड लागेपर्यंत त्याला कांहीं काम देतां येण्याजोगें नव्हतें व रेसिडेन्सीच्या जवळून त्याला हलवितांहि येण्याजोगें नव्हतें. रेसिडेन्सीच्या इमारतींत सर्व इंग्रज अधिकाऱ्यांचीं बायकामुलें होतीं व त्यांच्या रक्षणास तैनातीतील, कंटिंजंट फौजेंतील व २० व्या पलटणींतील थोडे थोडे लोक ठेवले होते. ते रेसिडेन्सीच्या इमारती व त्यापलीकडील स्मशानभूमीच्या जागेंत आश्रय धरून राहिले. इंग्रजी लष्कर अगदीं थोडें असल्यामुळें चढाईचें धोरण न स्वीकारतां स्वतःचें रक्षण करण्याकडेच इंग्रजी अधिकाऱ्यांचें मुख्यत्वें लक्ष होतें.

लहान टेकडीकडूनच किल्ल्यावर मारा होण्याचा जास्त संभव. तेथें चोविसावी पलटण कॅ. **सॅडलर** याच्या हाताखालीं देऊन लहान टेकडीचें रक्षण करण्याचें काम **स्कॉटनें** त्याजकडे दिलें. त्याच्या मदतीस दोन तोफा दिल्या त्या त्यानें टेकडीच्या उत्तरेकडील उतरणीच्या तोंडावर रोखल्या.

लहान टेकडीच्या उजवीकडेस व समोर जीं घरें होतीं त्यांच्या आड दीड दोन हजार अरब शिपाई आश्रय धरून राहिले होते व लहान टेकडीवर हल्ला करण्याच्या तयारींत होते तसेंच दोन्ही टोकांच्या पूर्वेस ज्या कांहीं अवशिष्ट झोपड्या होत्या त्यांत व कांहीं जागीं खडक फोडला होता त्या खडकाच्या गंजांच्या आड व खळग्यांतहि बरेच अरब शिपाई

ता. २६ च्या सायंकाळानंतर दबा धरून राहिले होते. ता. २६ च्या सायंकाळानंतर रात्रीं हल्ला करून टेकड्या सर करण्याचा मराठी सैन्याचा विचार होता असें दिसतें. कारण रात्रीं कोणीकडून हल्ला होतो हें चांगलें न दिसल्यामुळें टेकडीवरील सैन्यास बरीच अडचण होऊन खालच्या सैन्यास फायदा झाला असता.

परंतु इतका वेळ थांबण्यांत मराठी सैन्यानें विनाकारण वेळ घालविला व शत्रूस तयारी करण्यास जास्त वेळ दिला. ही त्यांची दुसरी घोडचूक झाली असें म्हणावें लागतें. सीताबर्डीच्या हल्ल्यांत सुसंघटित अगर पक्का निश्चय दिसत नसून आप्पासाहेबाचा अर्धवट निश्चय, कडक शिस्तीचें बंधन नसलेल्या अरब सैन्याचा उतावीळपणा व हुकूम सुटण्याचे पूर्वीच केलेला हल्ला असा प्रकार झालेला दिसतो. ता. २५ रोजीं सकाळपासून उघड युद्ध सुरू झालें. ता. २४ चे दुपारपासून सायंकाळपर्यंत अरब व मराठे लष्कर टेकड्या व रेसिडेन्सीच्या आसपास येऊन बसलें. ता. २४ च्या रात्रीं भोंसल्याच्या सैन्यानें एकदम हल्ला करावयास पाहिजे होता. निदान ता. २५ व २६ चे दिवसभर व्यर्थ कालक्षेप करण्यास नको होता. तितक्या वेळांत इंग्रज सैन्यास तयारी करण्यास बराच वेळ मिळाला व थोडक्यांत चुकलें कीं इंग्रजी सैन्याची कुमक बाहेरून ता. २७ रोजीं लढाई संपल्यावर आली तीच लढाईपूर्वी आली असती तर मराठी सैन्यास जी थोडीबहुत आशा होती तीहि न राहती. उलट ता. २५ रोजीं सकाळीं लढाई सुरू केली असती तर जय येण्याचा बराच संभव होता व बाहेरून इंग्रजांचे जें सैन्य आलें त्यासहि मध्येंच अडवितां आलें असतें. कदाचित् असेंहि शक्य दिसतें कीं, आप्पासाहेबाचा बेत एकदम लढाई सुरू करण्याचा नव्हताच. आपल्या पैशानें पोसले जाणारे सैन्यानें आपल्या राज्यारोहणासारख्या प्रसंगीं आपणास सलामी देऊं नये व आपले दोस्त म्हणविणाऱ्या इंग्रज सरकारानें सदरहू मंगल प्रसंगीं निवळ औपचारिक रीतीनेंच कां होईना पण आपल्या तर्फे कोणी मनुष्यसुद्धां दरबारांत पाठवूं नये याचा त्यास राग येणें स्वाभाविक होतें व त्यानें लढाई सुरू होण्यापूर्वी म्हणजे ता. २६ रोजीं संध्याकाळीं आपले दोन वकील **नारायण गोपाळ पंडितजी** व **नारायण नागरे** रेसिडेंट मि. **जेंकिन्स** याजकडे पाठविले होते व त्यांचे

बरोबर आपल्या सर्व तक्रारी कळविल्या होत्या. ते वकील रेसिडेंटाशीं बोलत असतांच एकदम अरबांनीं सायंकाळ होतांच लहान टेकडीवर मारा सुरू केला व वकीलांचें बोलणें होण्याचे दूर राहून नागरे हा निघून परत गेला. लढाईनंतर आप्पासाहेबानें रेसिडेंटास जो निरोप पाठ-विला त्यांतहि हीच गोष्ट सांगितली आहे कीं, " लढाई सुरू करण्यास मीं मुळींच हुकूम दिला नव्हता व अरबांनीं बिनपरवानगीनें व आपलेच जोखमीवर लढाई सुरू केली. असें होणें हें त्यावेळच्या परिस्थितींत अशक्य नव्हतें. परंतु ती इंग्रजांचा जय झाल्यामुळें दाखविलेली खोटी सबब असावी. **मनभटाचे** हुकुमावरून अरबांनीं गोळी सुरू केली असेंहि त्याचें म्हणणें होतें. रेसिडेंट व इतर इंग्रज लोकांचेहि मतानें ही गोष्ट संभवनीय होती. असें दिसतें. शिवाय ता. २६ चे रात्रीं अरब लोकांशिवाय गणपतराव सुभेदाराचे स्वार व इतर लष्कर यांनीं रेसिडेन्सीजवळील सैन्यावर मुळींच हल्ला केला नाहीं यावरूनहि वरील गोष्टीस पुष्टि मिळते. २६ चे रात्रीं दहा वाजल्यानंतर ते फक्त रेसिडेन्सी व टेकडी यासभोंवतीं तोफा रोखून एक दीर्घ वर्तुळ करून बसून मधून मधून किल्ल्यावर गोळे सोडीत.

अरबांनी लढाई सुरू केली ती थांबविणें कदाचित् आप्पासाहेबाच्या शक्तीबाहेरचें काम होतें; कारण इंग्रजी सैन्य जसें शिस्तीनें वागणारें तसें मराठी सैन्य नव्हतें. शिवाय अरब हे नेहमींच स्वच्छंदी. त्यांना आवरणें फारच कठीण. त्यामुळें आतां लढाई सुरू झालीच आहे; काय व्हावयाचें तें होऊं द्या असें म्हणूनहि आप्पासाहेब स्वस्थ बसला असेल. जय मिळाला तर उत्तमच; नाहीं मिळाला तर वरील सबब तयारच. जोराची लढाई करून एखादी गोष्ट घडवून आणणें त्यांत स्वतःचें लक्ष घालावयाचें, सैन्याचा पाठपुरावा करावयाचा, स्वतः जाऊन हुकूम सोडा-वयाचे तें कांहींच आप्पासाहेबानें केलेलें दिसत नाहीं. त्यामुळें जागेवरील सेनानायकांनीं जसें सुचेल तसें केलें. अरब व इतर मराठी सैन्य यांज-मध्येंहि सहविचार अगर एकमेकांस मदत कांहींच दिसत नाहीं. स्वतः आप्पासाहेब या वेळीं सक्करदऱ्यावर होता व स्वतः लढाईचे जागींसुद्धां आला नाहीं. एकंदरींत आप्पासाहेबाचें वर्तन अत्यंत धरसोडीचें होतें व

कोणत्याच गोष्टींत त्याचा दृढनिश्चय दिसत नव्हता.

भोंसल्यांच्या सैन्याजवळ सुमारें पंचवीस तोफा होत्या. पैकीं सहा लहान टेकडीच्या समोर अरबांच्या ताब्यांत असून त्या त्यांनीं लहान टेकडीवर पूर्वेकडून व उत्तरेकडून रोखल्या होत्या. मोठ्या टेकडीच्या पूर्वेस शहराच्या बाजूनें व सीताबर्डीच्या वस्तीच्या कोपऱ्यास मिळून दहा तोफा किल्ल्याकडेस मारा करण्याच्या रोखानें ठेवल्या होत्या व बाकीच्या तोफा पश्चिमेकडे व उत्तरेकडे जागोजागीं मराठी सैन्याच्या टोळ्यांच्या आघाडीस ठेवल्या होत्या.

मराठी स्वार व पायदळ रेसिडेन्सीच्या पलीकडे पश्चिमेस व दक्षिणेस निरनिराळ्या जागीं तळ देऊन राहिले. एक घोडेस्वारांची तुकडी रेसिडेन्सीच्या नाल्यापलीकडेस[१] जवळच होती. त्याच्या दक्षिणेस जो नाला आहे त्याचे दक्षिणेकडील कांठावर[२] दुसरी एक तुकडी घोडेस्वार, पायदळ व दोन तोफा यांसह होती. तिसरी एक तुकडी नागनदीच्या संगमाच्या मध्यभागीं व चवथी संगमाच्या पुढें नदीच्या दक्षिण कांठावर[३] होती व तेथेंहि दोन तोफा होत्या. शिवाय लहान टेकडीच्या पश्चिमेस बऱ्याच अंतरावर घोडेस्वारांची एक टोळी होती. याप्रमाणें सर्व बाजूंनीं भोंसल्यांच्या सैन्यानें घेरा दिला होता. (नकाशा पहा) त्यावर **गणपतराव सुभेदार, रामचंद्र वाघ, माधवराव खळतकर** व **सुभेदार निंबाळकर** वगैरे अधिकारी होते.

**लढाईस सुरवात**—ता. २६ रोजीं संध्याकाळीं सहा वाजतां किल्ल्याच्या पूर्वेकडून व लहान टेकडीच्या समोरील झोंपड्यांतून बंदुकींचा एकदम मारा सुरू झाला व तोफाहि चालू झाल्या व याप्रमाणें लढाईस सुरवात झाली. रेसिडेंटाच्या तैनातींतील फौज कॅ. लॉइड याच्या हाताखालीं मोठ्या टेकडीवर होती. तेथें विशेष मारा नव्हता म्हणून तो आपले लोक घेऊन त्या टेकडीच्या पूर्वेकडे म्हणजे शहराच्या तोंडाकडेस गेला व तेथें मध्यरात्रीं

---

१ हल्लींच्या म्यूझियमच्या पश्चिमेकडे.

२ हल्लींच्या महाराजबागेच्या जवळपास.

३ हल्लींच्या धनतोलीच्या जागीं.

पर्यंत राहिला. प्रथम टेकडीवरील सैन्यांत बराच घोंटाळा उडाला होता. कांहीं शिपाई अरबांच्या बंदुकींच्या माऱ्यामुळें वरील इमारतीच्या आड दबून बसत तर कांहीं एकदम गर्दी करून एकाच जागीं रहात. **लॉईड** यानें टेकडीच्या आडोशास त्यांना खालीं बसवून त्यांचेकडून खालील अरब सैन्यावर बंदुकींचा मारा चालविला व एक तोफ एकसारखी चालू ठेवली. त्यामुळें अरब शिपाई आपल्या खोपटयांत व आश्रयाच्या जागींच दबून राहिले. रात्रीं साडेनऊ वाजण्याच्या सुमारास या टेकडीवरील पूर्वेकडील तोफ फुटून भडका झाला व कांहीं नुकसान झालें व ती तोफ बेकाम झाली. **लॉईड** यानें दुसरी तोफ तेथें आणून ती चालू केली.

डावीकडे म्हणजे लहान टेकडीवरच जास्त जोराचा मारा झाला. अरब शिपाई झोपडयांमध्यें भिंतीआड असल्यामुळें त्यांना इजा होत नसे. परंतु इंग्रजी लष्कर टेकडीवर अगदीं उघडें असल्यामुळें त्यांचे शिपाई पटापट मरू लागले. दोन्ही तोफा चालू असल्यामुळें अरब शिपाई बाहेर येईनात परंतु आडून त्यांनीं बंदुकींच्या गोळयांचा जोराचा मारा केला. या टेकडीवरील २४ व्या पलटणीचा मुख्य कॅ. सॅडलर हा गोळी लागून पडला व त्याचा दुय्यम कॅ. चार्लस्वर्थ यानें त्याची जागा घेतली. टेकडीच्या माथ्यावर शिपाई असल्यामुळें ते गोळीच्या माऱ्यांत येत. यामुळें बरेंच नुकसान झालें म्हणून त्यानें सर्व शिपाई मागच्या उतरणीवर घेतले व त्यांना खाली बसून गोळया सोडण्यास हुकूम केला. त्यामुळें अरबांच्या गोळया त्यांच्या डोक्यांवरून जाऊं लागल्या व टेकडीच्या माथ्याच्या आड सर्व लष्कर राहिलें.

इंग्रजी तोफांचा मारा खालील झोंपडयांवर झाल्यामुळें त्या पेटल्या व सर्व अरब शिपाई कांहीं काळ पाठीमागें गेले. परंतु त्या झोपडया जळून जातांच पुन्हां त्यांनीं झोपडयांच्या राहिलेल्या भिंतींच्या आडून मारा सुरू केला. मध्यरात्रीनंतर एक वाजण्याचे सुमारास २० वे पलटणींतील कांहीं नव्या दमाचे लोक व तैनाती शिपाई मिळून १५० शिपाई लहान टेकडीवर आले व नंतर २४ वी थकलेली पलटण मोठया टेकडीवर गेली. **चार्लसवर्थ** हा जखमी झाला व क. **मॅकडोनल्ड** हा त्याच्या जागीं आला.

लहान टेकडीवर आश्रय नसल्यामुळें इंग्रजी शिपायांचें फार नुकसान

झालें. म्हणून समोरचे बाजूस कांहीं तरी! आधार केल्याशिवाय आपला बचाव होणार नाही हें पाहून **मॅकडोनल्ड** यानें धान्याचीं पोतीं आणून तीं समोर एकावर एक रचून त्यांची कम्मरेइतकी भिंत करण्याचें ठरविलें व रेसिडेन्सीमधून बैलांवरून धान्याचीं पोतीं लहान टेकडीवर आणविलीं. परंतु ज्या बैलांवर पोतीं आणीत ते बैल बंदुकींच्या आवाजानें भिऊन मध्येंच पोतीं टाकून धूम पळून जात व शिपायांस तीं पोतीं माथ्यावर न्यावीं लागत. **मॅकडोनल्ड** यानें हीं पोतीं उत्तरेकडील उतरणीवर रचलीं परंतु त्यामुळें परिघ मोठा होऊन एवढ्या जागेवर राहण्याइतकें लष्कर जवळ नसल्यामुळें जागा रिकामी राहणार हें पाहून **लॉइड** यानें सर्व पोतीं माथ्यावर परत आणलीं व तेथेंच एक ३॥ फूट उंचीची भिंत तयार केली. तिच्यामागें जेमतेम शंभर शिपाई बसूं शकत.

परंतु यामुळें सर्व उतरण रिकामी राहिली. शिवाय टेकडी पूर्वपश्चिम लांब असल्यामुळें तिची २० फूट रुंदीची बाजूच अरब शिपायांच्या जागे-समोर येई. त्यामुळें सर्व मारा सरळ जात नसे. शिवाय उतरणीवरील जागा रिकामी पडल्यामुळें अरब शिपाई त्या रिकाम्या जागेवर येऊन जवळून मारा करीत व वरून तोफेचा मारा सुरू झाला कीं मागें हटून घरांच्या भिंतींचा आश्रय घेऊन बसत. यामुळें सकाळ होईपर्यंत अरबांचें विशेष नुकसान न होतां इंग्रजी लष्कराचें बरेंच नुकसान झालें.

**ता. २७-११-१८१७** :— ता. २७ रोजीं सकाळीं उजाडतांच दोन्ही पक्षांस आपआपली परिस्थिति स्पष्ट दिसूं लागली. भोंसल्याचे स्वार व लष्कर तयार होऊन टेकडीकडे येऊं लागलें. तोफाहि जवळ येऊन माऱ्याच्या जागा धरून बसल्या व सात वाजण्याच्या सुमारास जास्त जोराचा मारा सुरू झाला. आठनऊ वाजण्याचे दरम्यान लहान टेकडीवर सात तोफा चालू झाल्या. त्यांपैकीं दोन अरबांनीं चालविल्या असून त्या टेकडीच्या अगदीं जवळ ७५।१०० यार्डांवर होत्या व दिवस असल्यामुळें त्यांचा मारा नेमका सुरू झाला व धान्याच्या पोत्यांचे भिंतीचा टिकाव त्या तोफांचे माऱ्यापुढें लागेना. शेवटीं हल्ला करून त्या जवळच्या दोन तोफा काबीज केल्या-शिवाय इलाज नाहीं असें कॅ. **लॉईड** यास कळून चुकलें व कॅ. **ब्रुक**

नांवाच्या अधिकाऱ्यास त्यानें हल्ला करून या दोन तोफा घेण्यास सांगितलें. त्यानें हल्ला केला परंतु त्याचा बेत ओळखून तो येण्यापूर्वींच अरबांनीं आपल्या तोफा मागें नेल्या, व अरबांचा जमाव जास्त असल्यामुळें ब्रुक यास पुढें जाणें धोक्याचें वाटून तो परत आला. गोलंदाजास यानंतर भीति वाटली कीं आपली तोफ उघडी असल्यामुळें हाच प्रयोग आपल्यावर होऊन अरब हल्ला करून आपली तोफ ताब्यांत घेऊन आपल्यावरच फिरविणार. शेवटीं त्यांनीं ती तोफ उचलून दहा वाजण्याचे सुमारास माथ्यावर आणली. या वेळेस इंग्रजी लष्कर अगदींच रोडावलें असून त्याची हिंमत खचली होती. त्याचा मारा अजीबात बंद झाला होता. मराठ्यांच्या लष्करानें इंग्रजी शिपायांच्या टेकडीच्या पश्चिमेकडील बराकीपर्यंत येऊन त्यांना आग लावली. शिपायांच्या वायकामुलांच्या आरोळ्या टेकडीवर शिपायांच्या कानापर्यंत जाऊन तेहि घाबरून गेले. समोरची तोफ मागें गेलेली पहातांच अरबांनीं टेकडीवर चढून एकदम चोहों बाजूंनीं लहान टेकडीवर हल्ला केला व धान्याच्या पोत्यांच्या भिंतीजवळ त्यांनीं लगट केली. कॅ. लॉईड यानें गोळ्या झाडण्याचा व हल्ला करण्याचा हुकूम दिला व स्वतः भिंतीवरून उडी मारून अरबांवर धावला. परंतु बेहिंमत झालेल्या शिपायांपैकीं एकहि त्याचेमागें उडी टाकून आला नव्हता. लॉईड याच्या उजव्या हातास एक गोळी चाटून गेली. घाबरलेलें इंग्रजी सैन्य कांहीं तरी गोळ्या झाडून धूम पळत उजवीकडील मोठ्या टेकडीकडे पळत गेलें. अधिकारी व इंग्रजी शिपाईहि नाइलाजानें मोठ्या टेकडीकडे पळत सुटले. लहान टेकडी रिकामी होऊन अरबांनीं इंग्रजी शिपायांचा पाठलाग करून बरेच शिपाई कापून काढले व लहान टेकडी पूर्णपणें इंग्रजांच्या एका तोफेसह अरबांच्या हातीं आली.

मोठी टेकडी जास्त बंदोबस्ताची व कडे तुटलेली असल्यामुळें तिच्यावर हल्ला करणें सोपें नव्हतें. म्हणून मराठी लष्करानें तोफा व बंदुका चालवून रात्रभर त्यांना गुंतवून ठेवलें होतें. परंतु ती जागा बरीच उंच असल्यामुळें इंग्रजांचें विशेष नुकसान झालें नाहीं. परंतु सकाळीं मराठी सैन्यानें सीताबर्डीचे वस्तीचा आश्रय करून उजवे टेकडीवर जोराचा मारा सुरू केला. शिवाय लहान टेकडी अरबांच्या हातीं गेल्यामुळें मोठ्या टेकडीवरील मारा

करण्याची उंच जागा अरबांच्या हातीं लागली व तेथून इंग्रजांचीच तोफ अरबांनीं त्यांचेवर फिरविली. ले. **क्लार्क** व डॉक्टर **नेव्हिन** हे दोघे एकाच गोळ्यानें उडाले व **सौथबी** हा सरदार दुसऱ्या एका गोळ्यानें ठार झाला व अरबांनीं इंग्रजी शिपायांच्या बराकी व लहान टेकडीच्या दरम्यान जी जागा होती ती काबीज करून इंग्रजी सैन्यापासून ७० यार्डांवर त्यांनीं भोसल्यांचा झेंडा रोविला.

अरबांची चढाई व जय पाहून टेकडीच्या पश्चिमेकडील मराठी घोडेस्वारांनीं मोठ्या टेकडीकडे चाल केली. त्यांच्या व टेकडीच्या मध्यभागीं रेसिडेन्सीसमोर कॅ. **फिट्झेरल्ड** हाहि तयारीनेंच होता. त्याच्या मदतीस ले. **हीयरसे** म्हणून सरदार होता. त्यानें व **फिट्झेरल्ड** यांनीं मिळून मराठी स्वारांवर हल्ला करून त्यांना मागें हटविलें व त्यांच्या दोन तोफा घेऊन त्या त्यांचेवरच उलट रोखल्या. मराठी लष्कर मागें हटलें व त्या तोफा घेऊन इंग्रजी लष्कर रेसिडेन्सींत परत आलें. **फिट्झेरल्ड** यास हुकुमाशिवाय हल्ला करण्याची मनाई होती. परंतु त्यानें आपल्या जोखमीवर हा हुकूम मोडून योग्य वेळ येतांच हल्ला केला, याबद्दल फिट्झेरल्ड व त्याच्या सैन्याचें धैर्य व कौशल्य यांजबद्दल पुढें सर्वत्र वाहवा झाली व त्याची एकंदर परिस्थिति पाहतां त्याचा हा हल्ला व विजय खरोखरच वाखाणण्यासारखा आहे. उलट पक्षीं विरुद्धपक्षाचें संख्याबल पाहतां त्यांच्या लष्करी बुद्धिमत्तेची व संघटनेच्या शून्यतेची कमालच झाली असें म्हणावें लागतें.

**फिट्झेरल्डचा** हा विजय मोठ्या टेकडीवरील इंग्रजी लष्कर मोठ्या आतुरतेनें पहात होतें. त्या बाजूनें आतां भीति राहिली नाहीं हें पाहून त्या शिपायांस दुप्पट दम आला. तितक्यांत लहान टेकडीवरील अरबांच्या दारूच्या कोठ्यांचे गाडीस आग लागल्यामुळें त्याचा भडका होऊन पुष्कळ अरब शिपाई दगावले. या दोन्ही गोष्टींनीं या लढाईची दिशा एकदम बदलून गेली. या योग्य प्रसंगाचा फायदा घेऊन मोठ्या टेकडीवरील इंग्रजी लष्करानें एकदम अरबांवर हल्ला केला व त्यांना बराकींतून हांकून दिलें व लहान टेकडीवर हल्ला करून तेथें धुमश्चक्री सुरू झाली. अरब लोक

गोंधळलेले असतां इंग्रज शिपायांनीं एकदम मारा केला व अरबांना हटवीत हटवीत टेकडीखालीं पिटाळून खालच्या खेड्यांत नेऊन घातलें. या हल्ल्यांत कॅ. **लॉइड** यास खांद्यावर एक गोळी लागली व ले. **ग्रांट** हा ठार झाला. **लॉइड** व कॅ. **स्टोन** हे खालच्या खेड्यांत शिरून आपले शिपायांस उत्तेजन देत होते. इंग्रजी शिपायांनीं त्या खेड्यांतून अरब शिपायांना हांकून दिलें व अरब हटून पळून गेले. लॉइड यास या खेड्यांतहि एक गोळी लागली परंतु तो तसाच परत टेकडीवर आला. इंग्रजी लष्करानें अरबांच्या खालच्या दोन्ही तोफा काबीज करून खिळे मारून टाकल्या होत्या त्या वर आणल्या. अरब लोक खालच्या वस्तींत जमूं लागले. परंतु इंग्रजी सैन्याच्या टोळ्या तेथें पाहऱ्यावर राहून त्यांनीं त्यांना बाहेर हटविलें. दुपारीं सुमारें २।३ वाजण्याचे सुमारास गोळी बंद झाली व लढाई पूर्णपणें थांबली.

सीताबर्डीचे लढाईंत **मनभट** व त्याचें अरब सैन्य यांनींच खरी लढाई केली. इतर मराठी लष्कर इतकें असून त्यानें कांहींच कामगिरी केली नाहीं व अरबांस कांहींच मदत पोंचविली नाहीं याचें आश्चर्य वाटतें. त्यांचें खरें लक्ष या लढाईंत होतें कीं नाहीं याबद्दलहि शंका वाटते. अरबांनीं मात्र मनापासून व जिवाकडे न पाहतां मर्दुमकीनें लढाई केली याबद्दल त्यांची तारीफ करणें जरूर आहे. गणपतराव सुभेदार,[१] रामचंद्र वाघ, माधवराव खळतकर व सुभेदार निंबाळकर यांनीं मधून मधून हल्ले केले. पण इतर सरदारांनीं लढाईंत भाग घेतला नाहीं यावरून आप्पासाहेबांस सर्व सरदारांचें व मुत्सद्यांचें चांगलेंसें पाठबळ नव्हतें अगर सर्वत्रच कमकुवतपणा, उदासीनता व कदाचित् फितुरीहि पसरली होती असें वाटतें.

ता. २६ चे रात्रीं रेसिडेन्सीस सुमारें दहा पंधरा हजार लष्कराचा गराडा पडलेला होता व आंतील माणूस बाहेर जाणें कठीण होतें. नुसता वेढा पडून राहिला असता तरी रेसिडेन्सींतील अन्नसामग्रीसुद्धां जास्त दिवस पुरण्याइतकी नव्हती. शिवाय दारूगोळाहि पुरेसा नव्हता. आंतील

१ बखर पान १९५

बातमीसुद्धां बाहेर कळविणें कठीण काम होतें. इंग्रजी अधिकाऱ्यांचीं व शिपायांचीं बायकामुलें आंत असून त्यांवरसुद्धां हल्ला व गोळीबार होणें शक्य होतें. इंग्रजी लष्कराची मदत बाहेरून रेसिडेंटानें बोलावली होती व त्याप्रमाणें मेजर **पिटमन** वऱ्हाडांतून एलिचपुरच्या छावणीहून नागपुराकडे येण्यास निघाला होता व त्याचा मुक्काम उमरावतीस होता. ले. क. **गाहान** हा हुसंगाबादेहून निघून जलदीनें येत होता. यांना आंतील स्थिति कळविणें आवश्यक होतें. ता. २६ चे रात्रीं दहा वाजतां भोंवतालीं गराडा पडला असतां रेसिडेंटानें या दोन्ही सैन्यांस बातमी कळविण्याचें सांगितलें; परंतु एवढ्या मोठ्या सैन्याच्या घेऱ्यांतून न कळत कसें जाणार ? शेवटीं **लॉईड** याच्या दोघा हिंदी नोकरांनीं व एका तैनाती शिपायानें तें काम कबूल केलें व रात्रीं कोणासही न कळत मराठ्यांच्या लष्करांतून ते तिघे जाऊन त्यांनीं वरील कुमक घेऊन येणारे लष्करास बातमी पोहोंचविली. सीताबर्डीचे लढाईत क. **लॉईड** यानें फारच पराक्रम गाजविला. हाच गृहस्थ पुढें हिमालयाच्या शिखरावर जाणाऱ्या पार्टींत होता व त्या कामांत तो पुढें येऊन **सर विल्यम लॉईड** या नांवानें प्रसिद्धीस आला. कॅ. **फिट्झेरल्ड** याचें प्रसंगावधान व धैर्य तारीफ करण्याजोगें होतें.

सीताबर्डीचे लढाईंत इंग्रजांकडील १४ ऑफिसर्स व ३३३ शिपाई पडले. व पुष्कळसे जखमी झाले. विरुद्ध पक्षाकडीलहि हानि सरासरीनें तितकीच झाली. इंग्रजांकडील एकंदर लष्कर १८०० होतें. मराठी व अरब लष्कर इंग्रजी अंदाजानें १८००० होतें. भोंसल्रेशाहीचें कागदपत्र उपलब्ध नसल्यामुळें त्यांची नक्की संख्या सांगतां येत नाहीं. इंग्रजी अंदाजांतील अतिशयोक्ति काढून टाकली तरी तें इंग्रजांपेक्षां पुष्कळच अधिक होतें हें खास.

**इंग्रजांस कुमक**— कॅ. **गाहान** हा आपलें लष्कर घेऊन व कर्नल **अडाम्स** हा नागपुरचें सबसीडियरी सैन्य घेऊन ता. १७ नोव्हेंबर रोजीं हुसंगाबादेजवळील शिंदखेडाहून निघाला व मोठमोठ्या मजला मारीत **बैतुल, पांढुरणा, उमरी** या मार्गानें ता. २९ रोजीं सकाळीं ४ वाजतां नागपुरास येऊन दाखल झाला. मेजर **पिटमन** वऱ्हाडांतून **मूर्तिजापुराहून** निघून ता. ५ डिसेंबर रोजीं **नागपुरास** आला. जनरल **डव्हटन** हा निजामाचें सबसीडियरी सैन्य घेऊन **जाफराबाद, उमरावती** या मार्गानें

१२ तारखेस नागपुरास आला. रस्त्यानें गोरें लष्कर त्यास उमरावतीस मिळालें.

**आप्पासाहेबाचें धरसोडीचें वर्तनः**-- सीताबर्डीचे लढाईंत मराठे व अरब लष्करांचा पराभव झाल्यानंतर आप्पासाहेबानें आपले वकील रेसिडेंटाकडे पाठविले व कळविलें कीं, 'लढाईचा हुकूम मी दिला नाहीं व माझ्या हुकमाशिवायच **मनभटानें** व त्याच्या अरबांनींच हें काम[१] केलें.' याबद्दल त्यानें दिलगिरीहि प्रदर्शित केली. रेसिडेंटानें तूर्त या बाबतीत आपण कांहींच बोलूं शकत नाहीं; परंतु आप्पासाहेबानें आपलें लष्कर सोडून दिल्यास आपणहि लढाई थांबवूं असें वचन दिलें व आप्पासाहेबाचा कच्चेपणा ओळखिला. त्यासहि सैन्याची मदत येईपर्यंत वेळ घालविणें इष्टच होतें. तसेंच ता. २७ रोजीं लढाई थांबल्यावरोबर दुसरे रघूजीची बायको **बांकाबाई** इनेंहि रेसिडेंट **जेंकिन्स** यास निरोप पाठविला की, "झाली गोष्ट ती वाईट झाली, पण आपला त्यांत कांहीं संबंध नाहीं व रेसिडेंटानें भोंसले घराण्याचा पूर्वीचा स्नेह कायम ठेवावा." ही बाई शेवटपर्यंत रेसिडेंट **जेंकिन्स** याच्या सल्ल्यानें वागली.

यावरून रेसिडेंटानें राजाचें पाणी ओळखिलें. रेसिडेंटासहि या वेळीं वेळच घालवावयाचा होता. कारण त्याचें सैन्य बाहेरून येईपर्यंत मराठ्यांचा पुन्हां हल्ला आल्यास त्यास तोंड देणें इंग्रजी सैन्यास कठीण होतें. परंतु आप्पासाहेबाच्या भित्रेपणामुळें व धरसोडीच्या वर्तनामुळें तसा हल्ला झाला नाहीं व हळूहळू सर्व इंग्रजी सैन्य नागपुरास आलें. तें येतांच रेसिडेंटानें आपलें उग्र स्वरूप प्रगट केलें व आप्पासाहेबास तंबी देणें सुरू केलें.

**रेसिडेंटाच्या शर्ती**-- ता. १५ डिसेंबर रोजीं सकाळीं रेसिडेंटानें आप्पासाहेबाकडे वकील पाठवून मागणें केलें कीं:--

१ आप्पासाहेबानें इंग्रजांस पूर्णपणें शरण यावें.

२ सर्व राज्य इंग्रजांचे स्वाधीन करावें.

३ ह्या सर्व अटी पाळीपर्यंत स्वतः इंग्रजांच्या ताब्यांत ओलीस रहावें.

१ Princep Vol. II. pp. 102-103.

४ इतक्या अटी पाळल्यास सबसीडियरी सैन्याच्या खर्चास लागेल इतक्या उत्पन्नाचा वाटेल तो मुलूख इंग्रज सरकार काढून घेईल व बाकीचा मुलूख आप्पासाहेबास परत देईल. नर्मदेच्या कांठचा मुलूख आणि चौरागड व मंडला हे किल्ले वरील खर्चांत घेण्यांत येतील.

५ आप्पासाहेबानें पुनः इंग्रजांशीं लढाई करूं नये, याकरितां जरूर असेल तितका राज्याचे अंतर्गत भागांत इंग्रज सरकारचा अधिकार राहील. यापेक्षां जास्त कडक शर्ती घातल्या जाणार नाहींत.

ता. १६ चे सकाळीं ४ वाजण्याचे आंत वरील अटींबद्दल उत्तर देण्याची मुदत रेसिडेंटानें घातली. आप्पासाहेबानें दुसरे दिवशीं सकाळीं सहा वाजतां रेसिडेंटाची स्वतः भेट घेण्याची परवानगी मागितली; परंतु रेसिडेंटानें ती देण्याचें नाकारलें. राजानें उत्तर देण्यास तीन दिवसांची मुदत मागितली पण रेसिडेंटानें फक्त तीन तासांची मुदत दिली. सीताबर्डीच्या टेकडीवरील हल्ला परततांच आप्पासाहेबानें जो भित्रेपणाचा निरोप रेसिडेंटास पाठविला होता कीं "माझे परवानगीनें लढाई झाली नाहीं व यांत माझा कांहीं दोष नाहीं." त्याचा फायदा घेऊन रेसिडेंट आप्पासाहेबास निरोप पाठविला कीं "तुमचें लष्कर तुमचें ऐकत नाहीं हें खरें असेल तर तुम्ही आमचे लष्करांत या म्हणजे आम्ही तुमचे लष्कराची खोड मोडूं व त्यास तुमचें ऐकावयास लावूं."

**आप्पासाहेबाची चलबिचल**– आप्पासाहेबाचा धीर अगदींच सुटला होता व कसें तरी करून इंग्रजांशीं सल्ला करावी इकडेच त्याचें लक्ष होतें. आप्पासाहेबाभोंवतीं असलेल्या मंडळींत **गणपतराव सुभेदार, रामचंद्र वाघ** व **मनभट** हीं शूर व इमानी माणसें होतीं; तीं या गोष्टीच्या विरुद्ध होतीं. तसेंच **नारो सखाराम, अमृतराव पांडुरंग** व **नागोपंत** हेहि आप्पासाहेबानें वरील अटी कबूल करण्याविरुद्ध होते. नबाब **सिद्दिक अलीखान, गुजाबादादा गुजर** हीं प्रमुख व कर्तीं माणसें आप्पासाहेबाच्या विरुद्ध होतीं व दोघेहि इंग्रजांस मिळालेले होते. परंतु ते यावेळीं हजर नव्हते. **गुजाबादादा** हा बांकाबाईच्या पक्षाचा असल्यामुळें त्याचा आप्पासाहेबानें बराच छळ केला होता म्हणून त्यास इंग्रजांनीं प्रयागास नेऊन आपल्या आश्रयाखालीं

ठेविलें होतें. **सिद्दिक अलीखान** हा इंग्रजांस फितूर झाला आहे अशा संशयावरून आप्पासाहेबानें त्यास कैदेंत टाकलें होतें. त्यास आतां आप्पासाहेबानें सोडवून आणलें व इंग्रजांकडे बोलणें लावण्यास योग्य मनुष्य म्हणून त्याच्याशीं सल्लामसलत चालविली. त्यानें **रामचंद्र वाघ** यास बराच दोष दिला कीं " लढाई साहेब मजकुराशीं करणेस सल्ला नव्हती, हें काय केलें ? असो, झालें तें झालें. अतां तरी समेट करावी. "

इकडे आप्पासाहेबानें **नारायण गोपाळ पंडतजी** या मुत्सद्यास रेसिडेंटाकडे सल्ला करण्याकरितां आधींच पाठविलें होतें. **सिद्दिक अलीखानाच्या** म्हणण्यावरून व स्वतःची हिंमत खचल्यामुळें सल्ला करण्याकडे आप्पासाहेबाचा जास्त कल होऊं लागला. **रामचंद्र वाघ, मनभट, नारो सखाराम गणपतराव** वगैरे माणसें लढाईची सल्ला देत होतीं. या मंडळीपैकीं नारो सखाराम यासहि आप्पासाहेबानें कैद केलें.[१] नारायण पंडतजी रेसिडेंटाचा निर्वाणीचा निरोप घेऊन ता. १५ दिसेंबर रोजीं आप्पासाहेबाकडे आला व रेसिडेंटाच्या वरील शर्ती आप्पासाहेबास त्यानें सांगितल्या. रात्रीं **रामचंद्र वाघ, गणपतराव सुभेदार, मनभट** वगैरे मंडळींनीं सर्व सरदारांस बोलावून लढाईचा निश्चय केला व आप्पासाहेबासहि रेसिडेंटाच्या अटी कबूल करूं नयेत असें सांगितलें.

**इंग्रजांची शहरावर हल्ल्याची तयारी**—इकडे ज. **डव्हटन** यानें आपलें सैन्य तयार करून त्यास दुसरे दिवशींचे कार्यक्रमाचे सर्व हुकूम देऊन ठेवून रात्रीं लढाईच्या तयारीनें सज्ज केलें व ते हत्यारें उशाशीं घेऊन रात्रीं झोपीं गेलें. त्यांनीं सकाळीं चार वाजतां सज्ज होऊन लाइनींत उभें राहून कूच करण्यास तयार व्हावें असा त्यांना हुकूम होता. कूच केल्यानंतर प्रत्येक पलटणीनें काय काय करावें हें पुढील सर्व भविष्य वर्तविल्याप्रमाणें डव्हटन यानें आपल्या हुकमांत बारकाईनें लिहिलें होतें.

सरदार व मुत्सद्दी यांनीं राजानें रेसिडेन्सींत जाऊन इंग्रजांच्या स्वाधीन होऊं नये व आपण लढाई द्यावी असें ठरविलें असतांनाहि राजाचे मनाचा निश्चय होईना व ता. १६ रोजीं सकाळची अखेरची मुदत असतांहि राजानें

१ हें निवळ रेसिडेंटास दाखविण्यापुरतेंच असावें. बखर पा. १९६.

विचार करण्यास तीन दिवसांची मुदत मागितली. रेसिडेंटानें तीन तासांची मुदत मोठ्या मुष्किलीनें दिली, सकाळीं भेटण्याची परवानगी मागितली तीहि दिली नाहीं. इंग्रजी लष्कर सज्ज झालें असून विरुद्ध बाजूस तयारी करण्यास वेळ देण्याइतके ते मूर्ख नव्हते.

**रेसिडेंटाकडून विनायकराव औरंगाबादकराची राजाकडे रवानगी**– राजावर अखेरचा प्रयोग करून पाहण्याकरितां रेसिडेंटानें आपल्या पदरचे दोघे विश्वासू गृहस्थ **विनायकराव आनंदराव औरंगाबादकर** [१] व **गंडो लक्ष्मण**[२] यांस राजाकडे पाठविलें व त्यांस वचन दिलें कीं राजास भरंवसा देऊन सांगावें कीं " तूं आमचे स्वाधीन झाल्यास आम्ही तुला दगा करणार नाहीं, तुला कैद करणार नाहीं अगर तुझें राज्यहि घेणार नाहीं पुन्हां गादीवर बसवूं, फक्त तुझें लष्कर तुझें ऐकत नाहीं त्याचा मोड करून आमचें लष्कर ठेवूं व त्या लष्करापुरत्या खर्चाचा मुलूख नर्मदेकडे घेऊं." आप्पासाहेबाच्या घाबरलेल्या मनःस्थितींत **विनायकराव** राजाकडे गेला व रेसिडेंटाचा निरोप त्यानें त्यास सांगितला.

**आप्पासाहेबाचें रेसिडेंटाकडे प्रयाण.** १६–१२–१८१७ इ.– सकाळीं राजा न आल्यामुळें ठरल्याप्रमाणें **डव्हटन** आपलें लष्कर व तोफखाना घेऊन शुक्रवार तळ्याच्या अलीकडे येऊन ठेपला, त्यामुळें राजा अधिकच घाबरला. सरदार व मुत्सद्दी व इतर आप्त त्याला इंग्रजांकडे जाऊं देईनात फक्त **नारायण गोपाळ पंडितजी** यानें मात्र आप्पासाहेबाचें मन रेसिडेंटाकडे जाण्याबद्दल वळविण्याची खटपट केली व त्याबद्दल नारायण पंडितावर पुढें आप्पासाहेबाची फार इतराजी झाली. नारायण पंडित हा इंग्रजांस अनुकूल होताच हें वेळोवेळी सिद्ध झालें आहे. शेवटीं आपणांस दगा

---

[१] हा गृहस्थ ब्राह्मण असून जालना येथील राहणारा होता. ज. वेलस्लीनें १८०३ सालीं दुसरे मराठा युद्धांत आसईचे लढाईचे सुमारास जालन्यास तळ असतांना यास आपल्या पदरीं ठेवलें. दुसरे मराठा युद्धानंतर नागपुरास इंग्रज रेसिडेंट आल्यावर त्यानें त्यास नागपुरच्या रेसिडेन्सींत ठेवलें. तेव्हांपासून तो तेथेंच नोकर होता.

[२] जो परसोजीचें प्रेत पाहण्यास राजवाड्यांत गेला होता. मागें पा. ४०३

होणार नाहीं असें विनायकरावाकडून वचनप्रमाण व शपथा[१] घेऊन आप्पासाहेब कोणाचेंहि न ऐकतां **विनायकरावा**बरोबर रेसिडेंटाकडे सीताबर्डीस जाऊन (ता. १६–१२–१७) सकाळीं ९ वाजतां त्याचे स्वाधीन झाला. राजा रेसिडेंटाकडे गेला हें कळतांच ज. **डव्हटन** यानें तळ्याचे जवळच मुक्काम केला.

राजा रेसिडेन्सींत येतांच रेंसिडेंटानें त्याचे जवळून आपले लष्करास असा हुकूम घेतला कीं सर्व तोफखाना इंग्रज अधिकारी **डव्हटन याचे** स्वाधीन करावा. आपले सरदारांस या हुकुमाची रुजवात करून देण्याकरितां राजानें आपला एक मुत्सद्दी त्या हुकमाबरोबर **डव्हटन** याजकडे पाठविला.

**सक्कर–दऱ्याची लढाई १६–१२–१८१७–डव्हटन** यास हुकूम मिळतांच तो सर्व लष्कर घेऊन शुक्रवार तळ्याच्या दक्षिणेकडून सक्करदऱ्याच्या रोखानें चाल करून गेला. राजाच्या सैन्यानें चौदा तोफा भरून ठेविल्या होत्या, परंतु त्याचेमागें दुसरें लष्कर नव्हतें, तोफा डव्हटननें हल्ला करून घेतल्या. मराठी लष्कर यावेळीं तयार नसल्यामुळें इंग्रजांना कांहीं प्रतिकार झाला नाहीं. राजा गेल्यामुळें मराठी लष्कराचें चित्त द्विधा झालें होतें. परंतु पुढील तोफखाना घेण्याकरितां इंग्रजी सैन्य सरसावतांच मराठी लष्करानें त्यांचेवर तोफा व बंदुकी चालविल्या. नागनदीच्या दक्षिणेकडील सक्करदऱ्याच्या पटांगणांत दोन्ही सैन्यांचें निकराचें युद्ध

---

१ ब्राह्मणानें क्रिया करून दगा केला असें कांहीं गोवाड्यांत आणि भाटांच्या गाण्यांत आपण ऐकतों तें या प्रसंगाबद्दलचें आहे. परंतु विनायकरावानें वचन दिलें तें रेसिडेंटाजवळून वचन घेतलें होतें तेंच दिलें व रेसिडेंटानें तें अक्षरशः पाळलें. गव्हर्नर जनरलला राजास पुन्हां गादीवर बसवावें हें पसंत नसतांहि पूर्वीं आपलें वचन गेलें आहे व तें पाळलें पाहिजे असा रेसिडेंट जेन्किन्स यानें आग्रह धरून ता. ९ जान्युआरी १८१८ रोजीं राजास राजवाड्यांत आणून पुनः गादीवर बसविलें. यांत वचनभंग झाला नाहीं. वरील लोकांकडून ही गोष्ट चुकीनें मनभटासंबंधानें सांगण्यांत येते. पण मनभटाचा यांत कांहींच संबंध नाहीं हें कागदपत्रांवरून स्पष्ट दिसतें. (बखर पा. १९६ पहा) तसेंच प्रस्तुत लेखकाचा शारदाश्रम वार्षिकांतील "आप्पासाहेब व मनभट" हा लेख पहा.

झालें.[१] मराठे लष्कर हटत हटत सक्करदरा व तेथील तलावाचे पूर्वेकडे गेलें व इंग्रजी लष्करानें त्यांची जागा घेतली. मराठी लष्करानें पुन्हां सांवर धरून हल्ला केला परंतु इंग्रजी लष्करानें त्यांना लवकरच पिटाळून त्यांचा पाठलाग केला. यावेळीं दुपारचे दीड वाजण्याचा सुमार होता. मराठ्यांचे ४० हत्ती व ४ तोफा मैदानांत सांपडल्या व आणखी २१ तोफा रिकाम्या पडल्या होत्या त्या छावणीच्या जागीं सांपडल्या. इंग्रजी माहितीप्रमाणें इंग्रजांकडचें सुमारें दीडशें माणूस जाया झालें. या लढाईंत मराठ्यांकडील सरदार **गणपतराव सुभेदार, निंबाळकर, रामचंद्र वाघ, यशवंतराव दत्ताजी** व **नारायणराव दत्ताजी, रंगोपंत, जानोजी सखाराम, नारोबा कोलटकर** वगैरे होते.

सक्करदऱ्यावरील मराठी लष्कर दक्षिणोत्तर लांब रांगा धरून पश्चिमाभिमुख उभें होतें व इंग्रजी लष्कर तशाच रांगांनीं पूर्वाभिमुख राहून मराठी लष्करावर चढाई करून येत होतें. एका इंग्रज लष्करी अधिकाऱ्याच्या[२] मतें मराठी लष्करांत तयारी व व्यवस्थितपणा असता तर त्यांनीं पूर्वपश्चिम लांब अशा रांगा करून नागपुर शहराचा दक्षिणभाग इमामवाडीपासून तुळशीबागेपर्यंत नागनदीच्या लांबीप्रमाणें सैन्याची रचना करावयास पाहिजे होती. यामुळें सैन्य हटतांच मागें आडोसा मिळून मारा करितां आला असता. राजा इंग्रजांकडे गेल्यामुळें मराठी लष्करांत मानसिक जोम राहिला नव्हता व **डव्हटन**सारख्या कसलेल्या सेनापतीपुढें व हलक्या इंग्रजी तोफांपुढें त्यांची लवकर पिछेहाट झाली.

मराठी लष्कराची दाणादाण होतांच तें सर्व मुलूखभर विस्कळित रीतीनें टोळ्याटोळ्यांनीं हिंडूं लागलें. त्यांना कोणी आवरता नव्हता व पगार देण्याची जोखीम घेणाराहि नव्हता. मुत्सद्दी व सरदार यांपैकींहि कोणाच्या हातांत अशी सत्ता अगर खजिना नव्हता व त्यांनीं ती कोणाच्या नांवानें चालवावयाची. रेसिडेंटानें राजाच्या व स्वतःच्या नांवाचे हुकूम जागोजाग पाठवून इंग्रजांची सत्ता बळकट केली. इंग्रजी लष्करानें मराठी

---

१ नकाशा पहा.

२ Valentine Blacker. P. 128.

लष्कराच्या टोळ्यांचा जागोजाग पाठलाग केला. फक्त रामटेकाजवळ एक बराच मोटा जमाव जमला होता तो तेथें कांहीं दिवस टिकाव धरून राहिला. **गणपतराव** सुभेदार पळून पुण्याकडे गेला व **बाजीरावाचे** लष्करास सोलापुराजवळ मिळाला व **बाजीरावाचें** लष्कर घेऊन वऱ्हाडच्या दक्षिण सरहद्दीनें चंद्रपुरच्या रोखानें आला. **चंद्रपुर** सर करून **बाजीरावाचा व आप्पासाहेबाचा** मिलाफ करण्याचा त्याचा विचार होता. आप्पासाहेबानें सीताबर्डीच्या लढाईनंतर खजिना व जडजवाहीर चंद्रपुरास पूर्वींच रवाना केलें होतें.

**शहरांतील बंदोबस्तः**—शहराबाहेर इंग्रजांस प्रतिकार करणारें कोणी राहिलें नाहीं; परंतु शहराच्या तटाच्या आंत **मनभट** व त्याचे ५ हजार अरब व हिंदुस्थानी लष्कर शहराचें रक्षण करीत होतें. तें सक्कर-दऱ्याच्या लढाईंत सामील झालें नव्हतें. राजाचा हुकूम शहर इंग्रजांचे ताब्यांत देण्याबद्दल आला पण अरब व मनभट हुकूम मानीनात. तटाच्या आंतील भाग ज्यास किल्ला असें म्हणत तो ताब्यांत आल्याशिवाय राजवाडा ताब्यांत येईना व तोंपर्यंत पूर्ण जय झाला असें म्हणतां येईना. शेवटीं शुक्रवार दरवाजावर तोफा लावून दरवाजा फोडून किल्ला सर करण्याचा **डव्हटन** यानें निश्चय केला.

**ता. १८-१२-१८१७**—शुक्रवार दरवाज्याच्या आंतील भाग ज्यास किल्ला अथवा महाल असें म्हणत तो शहराचा मुख्य भाग होता. त्यांतच राजवाडा व दरबारकचेरी होती. त्यांवरच भोंसल्यांचें निशाण होतें. या भागास तटबंदी होती व शुक्रवार दरवाजा बंद करून आंत अरबांचें लष्कर बंदोबस्तानें राहिलें होतें. आंत उंच दगडी मजबूत इमारती होत्या; त्यांवरहि अरब लोक बसलेले होते. ता. १८ रोजीं इंग्रजी लष्करानें शुक्रवार दरवाज्याकडून हल्ला केला व तोफा चालविल्या. पण अरबांनीं तटबंदीच्या आडून व आंतील इमारतींवरून तोफा, जेजाला व बंदुका यांचा मारा सुरू केला. त्यामुळें इंग्रजी लष्कर जवळ येऊं शकलें नाहीं.

**शुक्रवार दरवाज्यावर तोफा ता. २२-१२-१७:**— ता. २१ रोजीं आंतील लष्कराशीं इंग्रजांनीं बोलणें लावलें कीं, तुम्हीं शहर मुकाट्यानें

आमच्या ताब्यांत द्यावें. आम्ही तुमचे सर्व पैसे देऊं; परंतु ते ऐकेनात. शेवटीं ता. २२ डिसेंबर रोजीं इंग्रजी सैन्यानें शुक्रवार तलावाची पूर्वेकडील बाजू हस्तगत केली व तेथें मोर्चे बांधले. तळ्याचा हा कांठ शुक्रवार दरवाज्याच्या समोर उंच भागीं असून[1] सुमारें पांचशें कदमांचे अंतरावर आहे. त्यामुळें शुक्रवार दरवाज्यावर व किल्ल्याच्या भिंतींवर तेथून मारा होत असे. तेथें भोंसल्यांच्या हस्तगत केलेल्या तोफा इंग्रजांनीं लावल्या व त्यांचा मारा किल्ल्याच्या भिंतींवर व आंतील भागावर सुरू केला. परंतु ह्या तोफा जास्त पल्लेदार नसल्यामुळें त्यांचा किल्ल्याच्या भिंतींवर कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं शुक्रवार दरवाज्यावरच त्या तोफा चालविल्या. परंतु तो दरवाजाहि फुटेना. दरवाजा फुटतांच तो उघडून हल्ला करण्याचा इंग्रजांचा बेत होता. तोफांचा मारा शुक्रवार दरवाज्यावर चालूच राहिला.

**ता. २४–१२–१८१७**— ता. १३ रोजीं सायंकाळीं **डव्हटन** यास त्याच्या एंजिनियरांनीं व अधिकाऱ्यांनीं बातमी दिली कीं, दरवाजा थोडासा फुटला आहे व त्यांतून हल्ला करून आंत जातां येईल. सबब **डव्हटन** यानें तिन्ही बाजूंनीं तीन टोळ्या करून एकदम शहरांत घुसावें असा विचार ठरविला. मुख्य हल्ला शुक्रवार दरवाज्यावरचा. तो त्यानें स्वतःचे देखरेखीखालीं ठेविला. ले. क. **स्कॉट** (सीताबर्डीच्या युद्धांतील योद्धा) यास तुळशीबागेंतील जागा काबीज करून त्यांतील इमारतींच्या आडोशानें राहून तेथील वेशीनें शहरांत घुसण्यास सांगितलें. तिसरी टोळी मेजर **पिटमन** याचे हाताखालील हैदराबाद सबसीडियरी सैन्याची केली व त्यास शुक्रवार दरवाजा व तुळशीबाग यांच्या टोळ्यांच्या मधोमध **जुम्मा दरवाज्यावर** राहून वेळ पडेल तसा हल्ला करण्यास सांगितलें. या तिन्ही नाक्यांवर सैन्याची भरती पाठविली व दुसरे दिवशीं सकाळीं साडेआठ वाजतां ठरल्याप्रमाणें खूण होतांच तिन्ही टोळ्यांनीं शुक्रवार तळ्याच्या कांठच्या मोर्चेबंदीवरून व खंदकाच्या आंतून एकदम बाहेर निघून आपआपल्या जागांवर जाऊन हल्ले सुरू केले.

शुक्रवार दरवाज्याजवळ येतांच इंग्रजी सैन्यास दिसलें कीं, एकदम पुरेसें

---

१ हल्लीच्या टिळक पुतळ्याजवळ.

लष्कर आंत जाण्याइतकें भगदाड पडलेलें नाहीं. शिवाय दरवाजाच्या बाहेर व आंतील बाजूस दोन्हींकडून मोठमोठ्या मजबूत घरांमधून अरब शिपाई भरलेले होते व रस्त्यांचीहि त्यांनीं नाकेबंदी केली होती. ही गोष्ट मोर्चाचे जागेवरून इंग्रजी सैन्यास दिसली नाहीं. इंग्रजी सैन्य पुढें येतांच अरबांनीं घरांमधून त्यांचेवर मारा सुरू केला. इंग्रज शिपायांच्या गोळ्या अरबांस लागेनात. अरबांच्या गोळ्यांनीं मात्र इंग्रज शिपाई पटापट मरत. शेवटीं इंग्रजी शिपाई शेजारपाजारच्या आवारांत जाऊन दडून बसले. त्यांचा दरवाजांपर्यंत सुद्धां रिघाव होत नाहीं हें पाहून **डव्हटन** यानें त्यांना परत फिरण्याचा हुकूम दिला व ते आपल्या मोर्चाचे जागेवर परत आले.

**तुळशीबागेवरील हल्ला**– ले. क. **स्कॉट** हा तुळशीबागेंत शिरला व त्यानें तेथील इमारती व बगीचा काबीज केला. परंतु तिकडच्या बाजूचे शहराचे भिंतीवरून इंग्रजी लष्करावर मारा होऊं लागला व सर्व बाग उघडीच असल्यामुळें इंग्रज शिपाई मरूं लागले. **स्कॉट** यास तुळशीबागेचें जें वर्णन मिळालें होतें तें चुकीचें होतें

शुक्रवार दरवाजावरील हल्ला फसल्यामुळें **डव्हटन** यानें **स्कॉट** व **पिटमन** या दोघांसहि परत बोलाविलें त्याप्रमाणें ते परत आले. शुक्रवार दरवाज्याच्या चकमकींत ले. **बेल** नांवाचा अधिकारी पडला व **कॅमेरान** यास जबर जखमा झाल्या व इंग्रजांचें तीनशें माणूस मेलें.

इंग्रजांजवळ लांब पल्ल्याच्या तोफा व दारूगोळा शिल्लक नव्हता व त्या कामांतील वाकबगार माणसेंहि नव्हती. म्हणून **डव्हटन** यानें आकोल्याहून इंग्रजी तोफखाना बोलाविला. एकंदरींत या हल्ल्यांत इंग्रजांची सर्वत्र पिछेहाट झाली.

**अरबांस फोडलें**:– आकोल्याहून तोफा येईतोंपर्यंत वेळ गमावणें इष्ट नव्हतें म्हणून डव्हटन व रेसिडेंट यांनीं अरबांच्याकडे **सिद्दिक अलीखानास** मध्यस्थीकरिता पाठविलें व राजा आमचेकडे असतां व त्याचा तुम्हास शहर खालीं करून देण्याचा हुकूम असतां तुम्ही **मनभटाचें** काय ऐकतां असें बोलणें लावलें. अरब लोक जाणूनबुजून भाडोत्री. त्यांनीं बोलणें

लावलें कीं, आम्हास आमचे पगाराची बाकी द्या व बायकामुलांसुद्धां व मालमत्तेसुद्धां बाहेर सुरक्षित जाऊं द्या म्हणजे आम्ही ताबा सोडतों. रेसिडेंटानें हें कबूल केलें. ता. २९ रोजीं अरबांनीं आपला मुख्य पीरजादा पाठवून हा ठराव पक्का केला. अरबांपैकीं कांहीं महत्त्वाचे लोक नागपुरास हा करार पुरा होईपर्यंत ओलीस दिले. इंग्रजांनीं एक पलटण व गोरा अधिकारी बरोबर देऊन अरबांस मलकापुरापर्यंत नेऊन खानदेशाच्या हद्दींत सोडावें. अरबांनीं अशीरगडाकडे जाऊं नये असें ठरलें. अरबांचे पगाराची बाकी त्यांना देतांच ते आणखी पन्नास हजार रुपये मागूं लागले. शेवटीं रेसिडेंटानें तेंहि कबूल केलें. कारण वेळ गमावून आणखी अडचणी उत्पन्न करण्यापेक्षां आपलें सर्व सैन्य मोकळें करण्याची इंग्रजांस जास्त निकड होती. कारण तिकडे बाजीराव पेशव्याशीं तेव्हां युद्ध सुरू होतें.

**राजवाड्यावर इंग्रजी निशाण लागलें**:—ता. ३० रोजीं ठरलेली रक्कम अरबांस देण्यांत आली व त्याच दिवशीं दुपारीं १२ वाजतां **भुत्या दरवाज्यानें** तीन हजार अरब शहराबाहेर निघून गेले. शहराचे दरवाजे उघडले गेले व इंग्रजी लष्कर बिनहरकत शुक्रवार दरवाज्यानें किल्ल्यांत शिरलें. सर्व राजवाडा इंग्रजांच्या ताब्यांत आला व सर्व शहरभर इंग्रजांचा पहारा बसला. दुपारीं अडीच वाजतां भोंसल्यांच्या जुन्या राजवाड्यावर एक इंग्रज अधिकारी येऊन त्यानें इंग्रजांचें निशाण लावलें व त्याच्या सन्मानाप्रीत्यर्थ २१ तोफांची सलामी झाली.

**मनभटास कैद**—अरब सैन्य जातांच **मनभट** इंग्रजांच्या स्वाधीन झाला. त्यास इंग्रजांनीं कैदेंत टाकलें.[१] पुढें तो कैदेंतच मरण पावला.[२]

राजवाड्यावर इंग्रजांचें निशाण लागतांच नागपुरचे सर्व सरदार, मानकरी व मुत्सद्दी रेसिडेन्सींत जाऊन रेसिडेंटास त्यांनीं सलामी दिली. रेसिडेंटानें आप्पासाहेबाच्या व आपल्या नांवानें सर्व राज्यांत जाहीरनामे लावले व त्या वेळेपुरतें तरी नागपुरचें राज्य इंग्रजांच्या ताब्यांत गेलें

1 Prinsep vol. II. P. 128

२ याबद्दल तपशील कोठें आढळत नाहीं.

असा देखावा दिसूं लागला. ग. ज. याजकडून पुढें हुकूम येईल त्याप्रमाणें पुढें राज्याची व्यवस्था लागेल असें रेसिडेंटाकडून आश्वासन देण्यांत आलें.

अरब लोक ता. १ जान्युआरी १८१८ रोजीं नागपुराहून निघाले. त्यांचेबरोबर ले. **शेरिफ** यास देण्यांत आलें. ते आकोल्याच्या मार्गानें ता. २१ रोजीं मलकापुरास आले. यांपैकीं दोन तुकडचा रस्त्यांतून हैदराबादेकडे गेल्या. रस्त्यांत जातांना त्यांनीं ले. **शेरिफ** यास बराच त्रास दिला. मलकापुराहून त्यांचा अशीरगडाकडे जाण्याचा बेत दिसला. त्यावरून त्याची व इंग्रजी पलटणीची थोडीशी चकमक होऊन कांहीं अरब जखमी झाले. परंतु शेवटीं अशीरगडचा नाद सोडून ते पश्चिमेकडेस खानदेशांत निघून गेले.

**आप्पासाहेबाशीं तह ६–१–१८१८:—** आप्पासाहेब इंग्रजांच्या ताब्यांत येऊन त्याच्या सर्व शर्ती पूर्ण झाल्या व सर्व शहर इंग्रजांच्या ताब्यांत येऊन सर्वत्र इंग्रजांचा पहारा बसला व स्थिरस्थावर झालें. शेवटीं ता. ६ जान्युआरी रोजीं रेसिडेंटानें आप्पासाहेबाशीं पुढीलप्रमाणें तह पक्का केला व त्याची कायमची बजावणी गव्हर्नर जनरल यांची मंजुरी येण्यावर अवलंबून ठेवली. आप्पासाहेबानें मुकाटचानें त्यावर सही केली.

१ सबसीडियरी सैन्याचे खर्चाकरितां व कंटिंजंट फौजेचे खर्चाकरितां नर्मदेच्या उत्तरेकडील कांहीं मुलूख, वऱ्हाडांत १८०३ चे तहांत भोंसल्यांचा उरलेला सर्व मुलूख म्हणजे गाविलगड व नरनाळा हे किल्ले व त्यांखालचा मुलूख, सिरगुजा व जसपुर हीं संस्थानें इतका मुलूख आप्पासाहेबानें इंग्रजांस द्यावा.

२ राज्याचा मुलकी व लष्करी कारभार रेसिडेंटाच्या सल्ल्याप्रमाणें चालवावा व रेसिडेंटाच्या विश्वासांतील व त्यानें पसंत केलेल्या दिवाणांच्या हातानें तो चालावा.

३ राजानें सर्व कुटुंबासुद्धां नागपुरचे महालांत रहावें व महालावर इंग्रज शिपायांचा पहारा रहावा.

४ कलम १ मधील मुलूख इंग्रजांच्या ताब्यांत देईपर्यंत पाठीमागील थकलेली सैन्याचे खर्चाची बाकी चुकती करावी.

५ नागपुरचे राज्यांतील जे किल्ले इंग्रज मागतील ते राजानें इंग्रजांस द्यावे.

६ मागील युद्धांत ज्या सरदारांनीं आपले हुकुमाविरुद्ध लढाई केली असें आप्पासाहेबाचें म्हणणें होतें त्यांना शक्य असल्यास पकडून इंग्रजांच्या स्वाधीन करावें.

७ सीताबर्डीच्या दोन्ही टेकड्या, रेसिडेन्सीच्या बाजारपेठा व रेसिडेन्सीच्या भोंवतीं जितकी जागा इंग्रजांस लागेल तितकी राजानें इंग्रजांस द्यावी व सीताबर्डीच्या टेकडीवर व इतर जागेवर इंग्रजांना जीं वाटतील तीं लष्करी मजबुतीचीं कामें करण्यास त्यांना मुभा असवी.[१]

या तहाचा मसुदा ग. ज. यास पोहोंचण्यापूर्वी, गव्हर्नर जनरल यानें आम्हास विचारल्याशिवाय राजाशीं तह करूं नये व राज्य परत देण्याचें कबूल करूं नये असा रेसिडेंटास हुकूम पाठविला होता. परंतु तो गेल्यानंतर रेसिडेंटाचें पत्र व तहाचीं कलमें व आप्पासाहेब रेसिडेन्सीत येण्यापूर्वी त्यास दिलेलें अभिवचन वगैरेंची हकीकत त्यास समजली, यामुळें नाइलाज म्हणून ग. ज. यानें वरील तह मंजूर केला. नाहीं तर नागपुरचें राज्य त्याच वेळीं खालसा झालें असतें.

**आप्पासाहेबाची पुनः गादीवर स्थापना**:— हा तह ६ तारखेस पक्का झाला व ता. ९ रोजी आप्पासाहेबास परत राजवाड्यांत जाण्याची परवानगी मिळाली व त्याप्रमाणें आप्पासाहेब परत आला. आप्पासाहेबानें राजवाड्यांतल्या बायका व जडजवाहीर भंडाऱ्यास लढाईपूर्वींच पाठविलें होतें त्यांनाहि ता. १९ रोजीं इंग्रजी शिपायांबरोबर नागपुरास आणलें. या तहाप्रमाणें शहारावर व राजवाड्यावर इंग्रजी पाहारा कायमचा राहिला.

**इंग्रजांचा विजयानंद**:— सीताबर्डीच्या लढाईनें नागपुरच्या राज्याच्या स्वातंत्र्याचा शेवट झाला. कलकत्त्यास नागपुरच्या विजयाचीं स्तुतिपर वर्णनें चटकदार भाषेंत प्रसिद्ध होऊं लागलीं. हिंदुस्थानांतल्या सर्व इंग्रजी ठाण्यांत व छावण्यांत जेव्हां ही बातमी कळली तेव्हां एवढ्याशा इंग्रजी

---

१ मोठ्या टेकडीभोंवतालचा खंदक, बुरूज व इमारती ह्या सर्व यानंतरच्या आहेत.

सैन्यानें एवढ्या मोठ्या सैन्यावर कसा जय मिळविला याबद्दल सर्वांस आश्चर्य व कौतुक वाटलें व या जयाप्रीत्यर्थ सर्वत्र आनंदाच्या तोफा सुटल्या. हिंदुस्थानी लोकांचे मनावर तर या गोष्टीचा अतोनात परिणाम झाला व इंग्रजी लष्करापुढें हिंदी लष्कर कितीहि असलें तरी इंग्रजी लष्करच जय पावतें ही त्यांची भावना दृढ झाली व पुढील दिवस इंग्रजांच्या उदयाचे आहेत हें ओळखून उगवत्या सूर्याप्रमाणें सर्व मुत्सद्दी व महत्त्वाचे लोक संस्थानिकांपेक्षां इंग्रजी रेसिडेंट व अधिकारी यांचीच जास्त खुशामत करूं लागले व त्यांतच आपला स्वार्थ आहे असें समजू लागले. यावेळीं देशाभिमानाची कल्पना सर्वत्र लोपली होती व शिपाई, सरदार, मुत्सद्दी सर्व जण आपआपल्या स्वार्थाकडेच लक्ष देणारे होते. संस्थानिकांजवळ पैशाचें अगर माणसांचें बळ राहिलेलें नव्हतें, व्यक्तिविषयक शौर्य अगर बुद्धिमत्ता हीहि नव्हतीं. उलट इंग्रजांकडेस देशाभिमान, शौर्य, स्वार्थत्याग, चिकाटी, युद्धकलेचें व मुत्सद्दीगिरीचें पूर्ण अनुभवजन्य ज्ञान, पैशाचा व्यवस्थितपणा, साधारण व्यवहारांतील सरळपणा व प्रामाणिकपणा, दुसऱ्याच्या मनांत आदर व विश्वास उत्पन्न करण्याची हातोटी ही विलक्षण होती. नवीन व अल्पसंख्याक लोक असल्यामुळें कुचरपणा करण्याची त्यांना सोय नव्हती कुचरपणा केल्यास प्राणाशींच गांठ आहे हें त्यांना पूर्णपणें माहीत होतें म्हणून ते जीवाची पर्वा न करितां लढत. व्यक्तिविषयक हितापेक्षां त्यांच्या देशाचे हिताची व इभ्रतीची त्यांना जास्त पर्वा होती.

**आप्पासाहेबाच्या वर्तनाबद्दल प्रिन्सेपचें मत**– आप्पासाहेबाच्या दृष्टीनें त्यानें इंग्रजांशी लढण्यांत जो मार्ग पसंत केला त्यांतहि त्यानें व्यवस्थितपणा मुळींच दाखविला नाही. धरसोडपणा न करतां तोच मार्ग त्यानें निकरानें चालविला असता तर ता. २७ नोव्हेंबरचे **सीताबर्डीच्या** लढाईनंतरहि त्यास किती सुंदर संधि होती त्याचें वर्णन एका वाकबगार * ग्रंथकारानें केलें आहे:–

"बाजीरावाचे संघांत सामील होऊन इंग्रजांशीं एकदां लढण्याचें ठरविल्यावर व इंग्रजी सैन्यास पुरून उरेल एवढें मोठें सैन्य जमविल्यावर

* Prinsep Vol. II. P. 128

आप्पासाहेबानें **सीताबर्डीवर** हल्ला करण्यास हुकूम दिला. त्यापूर्वी जी दिरंगाई केली व धरसोडपणा दाखविला, तसेंच हल्ल्यानंतर आपण हल्ला करण्यास सांगितलेंच नव्हतें म्हणून रेसिडेंटास कळविलें व **मनभटा**वर सर्व दोष टाकला व आपली दोषांतून सुटका करून घेण्याचा जो प्रयत्न केला त्यावरून त्याचा शिळपटपणा मात्र दिसून येतो. आपलें स्वतःचें मनच त्याला आरंभापासून अखेरपर्यंत समजत नसे. आपण आरंभिलेलें काम निराश होण्याजोगें नसतांहि लागलेंच सोडून देण्यांत त्याच्या मनाचा अनिश्चितपणा व कच्चेपणा दिसून येतो. **सीताबर्डी**वरील हल्ला मागें हटला तरी आमचें लष्कर थोडें असून अगदीं थकून गेलें होतें म्हणून त्यानें पुन्हां हल्ला करण्यास कांहींच हरकत नव्हती. तसें करण्याऐवजीं **डव्हटनचें** भारी सैन्य येईतोंपर्यंत तो नागपुरास स्वस्थ बसला. इंग्रजांचें बाहेरून येणारें लष्कर मध्येंच अडविण्याचीहि त्यानें कांहींच खटपट केली नाहीं.

नागपुर प्रांताइतका लढण्यास सोईचा असा प्रांत सांपडणार नाहीं. डोंगर व झाडी यांमुळें लपण्यास जागा विपुल असल्यामुळें गनिमी काव्यानें लढण्यास अशी जागा फार उपयोगी. अटकेंतून सुटून गेल्यावर त्याच आप्पासाहेबानें थोड्याशा सैन्यानिशीं राहून लढाई न देतां सहज इंग्रजी सैन्यास कैक दिवस झुलविलें यावरून तो यावेळेस शरण न येतां शेवटपर्यंत लढता तर त्याला हा झगडा बरेच दिवस चालवितां आला असता व आपल्यामागें इंग्रजी सैन्याचा बराच मोठा भाग गुंतवून ठेवून त्याला अप्रत्यक्षपणें आपले सोबत्यास ( पेशव्यास ) मदत करतां आली असती व सर्व इंग्रजी सैन्यानें चोहोंकडून बाजीरावास जसें कोंडलें तसें त्याला इंग्रजांस कोंडतां आलें नसतें.

नागपुरच्या तहामुळें नर्मदेकडील प्रांत इंग्रजांस मिळाला परंतु तो ताब्यांत घेण्याचें काम राहिलें. आप्पासाहेबानें सदरहू प्रांताचा ताबा इंग्रजांस देण्याकरितां सर्व मराठी अधिकाऱ्यांना व किल्लेदारांना हुकूम पाठविले. परंतु इंग्रजांना बहुतेक ठिकाणीं लढाई करूनच ताबा घ्यावा लागला.

**हार्डिमननें जबलपुर घेतलें १९–१२–१८१७:–** नागपुरास कांहीं गडबड होणार असा रंग दिसतांच गव्हर्नर जनरल यानें नर्मदेच्या उत्तरेस असलेलें कांहीं सैन्य नागपुराकडे रवाना केलें होतें. त्यांतच ब्रि. ज. **हार्डिमन** यास

रेवा प्रांतांतून नागपुराकडे जाण्याचा हुकूम पाठविला होता. नर्मदेच्या आसपास मराठी सैन्याचा जागजागीं बराच जमाव होता. जबलपुरासहि त्यांचें ठाणें होतें. ता. १९ डिसेंबर रोजीं **हार्डिमन** यानें जबलपुरचे मराठी सैन्यावर हल्ला केला. मराठी लष्कर तीन हजार होतें. परंतु त्याचा **मोड होऊन** तें शहरांत गेले. दुसरे दिवशींहि हल्ला चालूच राहिला व मराठे जबलपुरची गढी व शहर सोडून निघून गेलें व **जबलपुर** शहर **हार्डिमनचे** ताब्यांत आलें. **हार्डिमन** यानंतर नागपुराकडे गेला परंतु, त्यास रस्त्यांतच नागपुरास येण्याची जरूर नाहीं असें रेसिडेंटाचें पत्र आल्यामुळें तो परत जबलपुरास येऊन राहिला. ले. क. **मॅकमॉरिन** हाहि लौकरच त्यास जबलपुरास मिळाला.

**श्रीनगर ५-१-१८१८:— गाडरवाड्याचे** बाजूस बरेंच मराठी सैन्य जमलें आहे असें पाहून डिसेंबरचे शेवटीं ले. क. **मॅकमॉरिन** हा त्याचेवर चालून गेला. **श्रीनगर**[१] येथें **सदूबाबा** नांवाचा मराठा सरदार सैन्यासह होता व **माधवराव** नांवाचा दुसरा सरदार त्यास येऊन मिळणार होता. **मॅकमॉरिनजवळ** सैन्य पुरेसें नसल्यामुळें त्यानें जबलपुराहून आणखी सैन्य मागविलें व मराठ्यांचें नवीन सैन्य येण्यापूर्वीं **श्रीनगरावर** हल्ला केला. ता. ५-१-१८१८ रोजीं लढाई होऊन **श्रीनगर** इंग्रजांचे स्वाधीन झालें. **हरिपुरावर** इंग्रजी लष्कर जातांच तेथील मराठी लष्कर सागरकडे निघून गेलें. मराठी लष्कर तेथून निघून गेल्यामुळें तो प्रदेश मोकळा झाला.

राजानें आपले अंमलदार नागपुराहून इंग्रज अधिकाऱ्यांबरोबर देऊन या नवीन मुलुखाचा ताबा देण्यास पाठविलें होतें. तरी सैन्याची मदत लागणारच म्हणून **हार्डिमन** हा जबलपुरासच राहिला. इंग्रजी लष्करानें **बल्हारीच्या** किल्लेदारास किल्ला ताब्यांत मागतांच त्यानें खुषीनें किल्ला ताब्यांत दिला. **सोहागपुरचा** किल्लाहि तसाच ताब्यांत आला. **मंडल्याचा** किल्ला ताब्यांत घेणार, परंतु तेथील शिबंदीस पगार न मिळाल्यामुळें ती ताबा सोडीना. **चौरागड** व **मंडला** हे किल्ले खुषीनें ताब्यांत येतील असा रंग दिसेना.

**शिवणीचा किल्ला व खंडोपंत:—शिवणीचा** किल्ला **खंडोपंत** नांवाच्या सरदाराच्या ताब्यांत होता. त्याचेजवळ लष्कर फारसें नव्हतें

---

१ नर्मदेच्या दक्षिणेस.

म्हणून हुसंगाबादेहून मे० **मॅकफर्सन** यास तो किल्ला घेण्याकरितां रवाना केलें. ता. २१-१-१८ रोजी **मॅकफर्सन** शिवणीस गेला व **खंडोपंतापाशीं** किल्ला ताब्यांत मागूं लागला. **खंडोपंतानें** किल्ला देण्याचें कबूल केलें परंतु कांहीं वेळाची मुदत मागितली. परंतु ती संपल्यावरहि तो किल्ला सोडीना. शेवटी **मॅकफर्सन** यानें किल्ल्यावर तोफा सुरू केल्या. सायंकाळपर्यंत तोफांचा मारा चालू राहिला, परंतु कोठेंहि खिंड पडली नाहीं. सायंकाळ झाल्यानंतर **खंडोपंत** व त्याचें लष्कर लहानलहान टोळ्या करून किल्ल्याबाहेर नकळत निघून गेलें. त्यापैकीं कांहीं टोळ्या जातांना दिसल्या. त्यावर **मॅकफर्सन**च्या रोहिला पलटणीनें हल्ला करून कांहीं लोक जखमी केले. **शिवणीचा** किल्ला, शहर व तोफा वगैरे सरंजामासुद्धां इंग्रजांचे ताब्यांत आला. **खंडोपंत** पळून ७।८ कोसांवर **वैरागड** येथें **परमसुख** नांवाचा दुसरा मराठ्यांचा अधिकारी शेंदीडशें शिपायांसुद्धां होता त्यास मिळाला. ता. २३ रोजीं त्यांची व इंग्रजी लष्कराचे एका टोळीची चकमक होऊन **परमसुख** पकडला गेला. **खंडोपंत** व बाकीचें लष्कर पळून गेलें.

**घिरूड**--नागपुरचे अग्नेयेस १७।१८ कोसांवर **घिरूड** येथें **गणपतराव** नांवाच्या एका सरदारानें पांगापांग झालेलें मराठे लष्कर एकत्र करून जमाव केला. त्यावर नागपुरचें इंग्रजी लष्कर चालून गेलें. परंतु लढाई न होतांच **गणपतराव** व त्याचें लष्कर लहान लहान टोळ्या करून निघून गेलें.

**ज. डव्हटन** हा नागपुराहून ता. २१ जान्युआरीस खानदेशाच्या रोखानें बाजीरावाचे मागें जाण्यास निघाला. मध्यंतरीं नवीन तहाप्रमाणें वऱ्हाडांतील भोंसल्यांचा राहिलेला कांहीं मुलूख व **नरनाळा** व **गाविलगड** हे किल्ले ताब्यांत घेण्याचें काम राहिलें होतें. **अडगांव**च्या इ. स. १८०३ च्या तहाप्रमाणें हा भाग भोंसल्यांच्या ताब्यांत राहिला होता. त्यांपैकीं **अकोट, अडगांव** व **वडनेर** हे परगणे व **नरनाळा** व **गाविलगड** हे किल्ले एलिचपुरचा नबाब **सलाबतखां** यास गव्हर्नर जनरलच्या मंजुरीवर अवलंबून देण्याचें ठरलें होतें व **उमरावती**जवळील **भातकुली** हा

परगणा निजामाचा एक कारभारी हैदराबादचा राजा **गोविंदबक्ष** यास देण्याचा होता. तसेंच मेळघाटाचा तापीपर्यंत भाग १८०३ च्या तहापासून पेशव्यांच्या अधिकाऱ्याच्या ताब्यांत होता तोहि घेऊन एलिचपुरच्या नबाबाच्या ताब्यांत देण्याचा होता. हीं सर्व कामें करण्यास जनरल **डव्हटन** यास हुकूम दिला होता.

**डव्हटन** हा **आमनेर, हिवरखेड** या मार्गानें **एलिचपुरास** आला. **आमनेराहून** त्यानें मे. **पिटमन** यास आकोला, उमरावती या भागांत पाठविलें व वरील परगणे ताब्यांत घेण्यास सांगितलें. कॅ. **जोन्स** याजबरोबर थोडेंसें लष्कर देऊन त्यास **गाविलगड**चा ताबा घेण्यास पाठविलें. राजाचा हुकूम पाहतांच किल्लेदारानें किल्ला ताब्यांत दिला. तसेंच **अडगांवा**हून एक कंपनी **नरनाळ्यास** गेली. तेथील किल्लेदारानेंहि किल्ला सोडून दिला. वरील किल्ले व मुलूख एलिचपुरचे नबाबाचे[1] ताब्यांत देण्यांत आला. हीं कामें होतांच **डव्हटन** हा मलकापुरास गेला व तेथून खानदेशांत गेला. होळकराकडील **रामदीन** नांवाचा अधिकारी बाजीराव पेशव्यास मिळण्याकरितां नर्मदा उतरून येत आहे असें समजल्यामुळें **डव्हटन** त्यास रोखण्याकरितां खानदेशांत राहिला.

**मंडला २६–४–१८१८:–मंडल्याचा** किल्ला नर्मदेच्या एका वांकावार असून तेथें नर्मदा पूर्वेकडून पश्चिमेकडेस येऊन एकदम उत्तरेकडे वळते. त्यामुळें दोन्ही प्रवाहांच्या मध्यें किल्ल्यास सोईस्कर जागा झाली आहे. जवळ जवळ तिन्ही बाजूनीं नर्मदेच्या प्रचंड प्रवाहाचा आश्रय मिळून फक्त उत्तरेची बाजूच मोकळी राहाते. तिकडे शहर वसलेलें आहे व उत्तरेकडून शहरासहि तटबंदी आहे. परंतु बाकीच्या बाजूस नदीचा आश्रय असल्यामुळें तटबंदी नाहीं. किल्ल्याच्या व शहराच्या दरम्यान खंदक असून नर्मदेच्या एका वाकापासून दुसऱ्या वाकापर्यंत नदीचें पाणी त्यांत खेळविलेलें असे[2]. शहराच्या बाजूनें खंदकावर एक पूल असे. एकंदरीत किल्ल्याच्या तीन बाजूंस नर्मदा व चौथ्या बाजूस खंदक व पलीकडे शहर व त्या पलीकडे शहराची तटबंदी. यामुळें हा किल्ला बराच मजबुतीचा असे.

---

१ पेंढाऱ्यांवरील व इतर वेळच्या मोहिमांत हा नबाब आपल्या लष्करासह इंग्रजांबरोबर होता. २ नकाशा पहा.

शिबंदीचा मागील पगार दिल्यास हा किल्ला आपण खुषीनें स्वाधीन करतों असें किल्लेदारानें प्रथम बोलणें लावलें होतें व त्यामुळें लढाई करावी लागणार नाहीं असें इंग्रजी अधिकाऱ्यांस प्रथम वाटलें. नागपुरच्या दरबारचा व इंग्रजी अधिकाऱ्याचा याप्रमाणें दोन्ही हुकूम किल्लेदाराकडे पाठवून दिले व एक इंग्रजी पलटण ताबा घेण्याकरितां तिकडे गेली. किल्ल्यापासून ३–४ मैलांवर तिचा तळ असतां मराठी लष्कराची एक तुकडी त्यांचेवर येऊन पडली व तिनें त्यांना पळावयास लावलें. यामुळें हा किल्ला खुषीनें ताब्यांत येत नाहीं अशी खात्री झाली. जबलपुराहून मे. ज. **मार्शल** याच्या हाताखालीं लष्कर देऊन तें मंडल्याकडे रवाना करण्यांत आलें. ता. १८–४–१८ रोजीं तें लष्कर मंडल्यास पोहोंचलें व चारी बाजूंस वेढा देऊन बसलें. कांहीं तुकड्या नर्मदा ओलांडून शहराच्या उत्तर बाजूसहि तळ देऊन बसल्या. शिद्याचेंहि कांहीं लष्कर इंग्रजांच्या मदतीस होतें व त्याचा तळ शहराच्या उत्तरेस एका झाडींत होता. तोफखाना व दारूगोळा हें सामान बरेंच मागाहून आलें. तेथपर्यंत इंग्रज अधिकाऱ्यांनीं माऱ्याच्या जागा नक्की करून ठेविल्या व तोफा व सामान येतांच ता. २५ चे रात्रीं नेमलेल्या जागीं मोर्चे बांधून जवळून किल्ल्यावर मारा करावयाचा असा कार्यक्रम ठरलेला होता. त्याप्रमाणें शहराच्या उत्तरेस नदीकांठीं तोफांचा मुख्य मोर्चा बांधला होता व त्याचा मारा नेमलेल्या ठिकाणीं ता. २६ रोजीं सकाळीं सुरू झाला. पश्चिमेकडून नदीपलीकडूनहि एक मोर्चा बांधला होता त्याचा मारा शहरावर व किल्ल्यावर होई. तसेच नदीच्या तिन्ही बाजूंस नदीपलीकडे मोर्चे बांधले होते व त्यांचा मारा किल्ल्यावर करतां येई.

ता. २६ रोजीं दुपारीं दोन वाजतां तटबंदीस लौकरच भगदाड पडलें व १।२ तासांत रस्ता पडेल असें दिसतांच **मार्शल** यानें नदीपलीकडचें सैन्य उतरवून शहराच्या उत्तरेकडेस आणविलें. कल्पनेप्रमाणें भगदाड पडतांच इंग्रजी सैन्यानें शहरांत घुसून हल्ला केला. कांहीं लोकांनीं तटबंदीची सबंध भित ताब्यांत घेतली व बाकीचे शहरांत उतरले. आंतील मराठे लष्कराची व त्यांची झुंज होऊन त्यांचा मुख्य **आनंदसिंग** हा पडला. हा मनुष्य आप्पासाहेबाचा फार विश्वासू असून इंग्रजांचा कट्टा शत्रु होता. मराठे लष्कर हटून पुलावरून किल्ल्यांत जाण्याकरितां किल्ल्याच्या दर-

वाज्याशीं गेलें, परंतु त्याच्या दुर्दैवानें किल्ल्याचा दरवाजा उघडला नव्हता. इंग्रजी लष्करहि त्याच्या मागोमाग किल्ल्यांत येईल अशी आंतील लोकांना भीति वाटली असावी. परंतु किल्ल्यावरील तोफा व बंदुका चालू केल्या असत्या तर त्यांच्या आधारानें हें मराठी लष्कर आंत घेतां आलें असतें व त्यांपैकीं बरेच लोक वांचले असते. परंतु किल्लेदारानें त्यांना वांचविण्याची कांहीं खटपट केली नाहीं. किल्ल्याबाहेर त्याचेवर नदीपलीकडील दोन्ही बाजूंचे तोफखान्यांचाहि मारा सुरू झाला. शेवटीं गांवांतील हें मराठी लष्कर कांहीं कापलें गेलें. कांहीं नदींत उडी टाकून पलीकडे जात असतां बुडालें व थोडेसे लोक पलीकडे गेले. ते नदीपलीकडच्या इंग्रजी लष्करानें कैद केले. नदीपलीकडे सर्व बाजूंनीं इंग्रजी लष्कराची नाकेबंदी असल्यामुळें त्यांना टाळून पळणें शक्य नव्हतें. रात्र पडल्यानंतर सर्व शहरभर रात्रीं इंग्रजी सैन्य राहिलें व दुसरे दिवशीं शहरांत मोर्चा बांधून किल्ल्यावर मारा करण्याची त्यांनीं तयारी चालविली. शहरांतील हल्ल्यांत मराठ्यांचे पांचशे शिपाई पडले. इंग्रजांकडील हानि फारशी झाली नाहीं.

रात्रीं अंधारांत एक होडी किल्ल्यांतून नदींत उतरली व लपतछपत नदीपलीकडे चालली. इंग्रजी पाहरेकऱ्यांची टेहळणी सर्व नदीभर चालू होती. त्यांनीं ती होडी येत आहे असें पाहून दबा धरून ती नदीकांठीं येतांच समोर येऊन पकडली. त्यांत चार गृहस्थ पळून जातांना सांपडले. एक मनुष्य किल्लेदार **राय हजारी** हा होता. त्यास धरून इंग्रजी अधिकाऱ्याकडे नेलें तेव्हां त्यानें सांगितलें कीं किल्ला स्वाधीन करतों, याबद्दल इंग्रजी अधिकाऱ्यांशीं बोलणें लावण्याकरितांच मी येत होतों व किल्ला लढविण्याचा माझा मुळींच विचार नव्हता व याकरितांच मीं किल्ल्यावरून माराहि केला नाहीं व शहरांतील लष्करहि आंत घेतलें नाहीं.

किल्लेदाराचें म्हणणें खरें नव्हतें व त्याचा विचार बहुधा गुप्तपणें पळून जाण्याचाच असावा. परंतु पहिले दिवशीं किल्ल्यावरून मारा न करण्यांत व शहारांतील लष्कर आंत न घेण्यांत त्यानें मनाचा कच्चेपणा व धरसोड दाखविली. किल्ला लढवावयाचा नव्हता तर ता. १८ पासून ता. २५ पर्यंत इंग्रजी लष्कराचा गराडा पडला असतां त्यास इंग्रजी

अधिकाऱ्यास तसें कळवितां आलें असतें. परंतु तसें न करतां किल्ला खुषीनें ताब्यांत न देतां तो लढविण्याचा त्यानें निश्चय केला. परंतु पराकाष्ठेचे प्रयत्न न करतां व शहराचे शिबंदीचा पाठपुरावा न करतां त्यानें भेकड-पणाच दाखविला. दुसरे दिवशीं किल्ल्यावर मारा होणार हें जाणून त्यानें मुकाट्यानें पळून जाण्याचा निश्चय केला होता असें दिसतें.

किल्लेदार पळून गेला हें पाहतांच दुसरे दिवशीं सकाळीं किल्ल्यावरील सर्व शिबंदी सुमारे ११०० शिपाई दुय्यम किल्लेदार **गंगासिंग** यासह शस्त्रें खालीं ठेवून किल्ल्याचे दरवाजे खुले करून बाहेर निघाली व इंग्रजांस शरण गेली. निःशस्त्र असल्यामुळें अर्थात् त्यांचेवर हल्ला झाला नाहीं.

ता. २८ रोजीं किल्लेदार **राय हजारी** व **गंगासिंग** यांची कोर्टमार्शल-पुढें चौकशी झाली. किल्लेदारानें किल्ला ताब्यांत न देण्याबद्दल नागपुर-दरबारचा आलेला हुकूम दाखविला. किल्लेदार कुचरपणा करील तर त्यावर नजर ठेवण्याकरितां **आनंदसिंग** यासहि तेथें पाठविलें होतें असें समजलें. त्यावरून किल्ला न देण्यांत त्याची स्वतःची कसूर नाहीं असें ठरून त्यास दोषमुक्त केलें. त्याचप्रमाणें **गंगासिंग** यासहि दोषमुक्त केलें. **आनंदसिंग** नसता तर कदाचित् किल्लेदारानें मुकाट्यानेंच किल्ला अगो-दर इंग्रजांच्या स्वाधीन करून दिला असता हेंहि शक्य होतें.

**मंडल्याचे** किल्ल्यांत व शहरांत लहान मोठ्या २६ तोफा व मुबलक दारूगोळा होता व त्याचे जोरावर कैक दिवस तो किल्ला लढवितां आला असता. परंतु पुढाऱ्यांच्या आंगीं जोमाचा प्रयत्न व दृढनिश्चय नसल्यामुळें विशेष प्रतिकार न होतांच किल्ला इंग्रजांच्या हातीं आला.

**चौरागड १२–५–१८१८:— चौरागडचा** किल्ला फारच मजबूत म्हणून प्रसिद्ध होता. त्यावर नंतर लष्कर पाठविण्यांत आलें. पण तें पोहोंचण्याच्या पूर्वींच किल्लेदारानें किल्ला **मॅकमॉरिन** याचे स्वाधीन करून दिला, म्हणून लढाईचें काम पडलें नाहीं.

**सागर व नर्मदा प्रांत**—बाजीराव पेशव्याकडून इंग्रजांस इ. स. १८१८ मध्यें मिळालेल्या प्रांतांत **सागर, दमो** वगैरे प्रांत यापूर्वींच इंग्रजांकडे आले

होते व ता. ६-१-१८१८ च्या तहाप्रमाणें आप्पासाहेबाकडून इंग्रजांस बैतुल, शिवणी व नर्मदेकडील इतर मुलूख मिळाला, तो दोन्ही मिळून त्याचा "सागर व नर्मदा प्रांत[१]" या नांवानें एक प्रांत इ. स. १८२० मध्यें करण्यांत आला व त्याचें मुख्य ठिकाण जबलपुर ठरविलें. त्यावर प्रथम "कमिशनर व एजंट टु दि गव्हर्नर जनरल" म्हणून एक स्वतंत्र अधिकारी नेमला होता. हा प्रांत राज्यव्यवस्थेकरितां इ. स. १८३६ मध्यें त्यावेळच्या वायव्य सरहद्द[२] प्रांतास जोडण्यांत आला होता. इ. स. १८३६ ते १८४३ पर्यंत तो वायव्य प्रांताचे ले. गव्हर्नराचे अमलाखालीं व पुन्हां १८४३ पासून १८५३ पर्यंत स्वतंत्र व १८५३ पासून १८६१ पर्यंत पुन्हां वायव्य प्रांतांत होता. नंतर १८६१ मध्यें सर्व नागपुर प्रांत इंग्रजांकडे आल्यानंतर तो नागपुरास जोडून सर्वच मुलूख "मध्यप्रांत" या नांवानें एक नवा प्रांत करून त्यावर "चीफ कमिशनर" म्हणून प्रांताधिकारी नेमण्यांत आला.[३]

**बाजीरावाचें चंद्रपुरच्या रोखानें पलायन**---आप्पासाहेब ता. ९ जान्यु-आरीपासून शांततेनें नागपुरच्या गादीवर होता. बाजीराव पेशवा पुण्याहून पळत निघाला तो **सोलापूर, राक्षसभुवन** वगैरेहून वऱ्हाडांत **वाशीम** येथें आला व तेथून चंद्रापुराकडे येण्याचा त्याचा रंग दिसू लागला. बाजीरावाचे लष्कराबरोबर **गणपतराव सुभेदार** हा होता. त्याचप्रमाणें बाजीरावाचा आप्पासाहेबाशी पत्रव्यवहार होत आहे व **आप्पासाहेब** व **बाजीराव** मिळून **चंद्रपुरास** येऊन तेथून इंग्रजांशीं लढणार आहेत अशीहि बातमी रेसिडेंटास मिळाली. चंद्रपुरचे किल्लेदारास नवीन सैन्यभरती करण्याचा आप्पासाहेबानें हुकूम दिला आहे अशाहि बातम्या समजल्या. तशांत आप्पासाहेबाचें बाजी-रावास गेलेलें एक पत्र मध्येंच पकडलें गेलें व तें पुण्याचा रेसिडेंट एलफि-न्स्टन यानें नागपुरच्या रेसिडेंटाकडे पाठविलें, त्यावरून व बाजीराव चंद्रपुरा-कडे येत होता यावरून हा संशय दृढ झाला व रेसिडेंटानें **आप्पासाहेबास** कैद करण्याचा निश्चय केला.

---

१ Saugar & Nerbada Territories.

२ हल्लींचा संयुक्त प्रांत.

३ Foreign Dept. Resolution No. 9 of 2-11-1861.

**आप्पासाहेबास कैद केलें १५-३-१८१८:**— सर्व शहर व राजवाडा इंग्रज शिपायांच्याच ताब्यांत होता, त्यामुळें राजास धरणें ही अगदीं सोपी गोष्ट होती. नागपुर शहरांत एक मद्रासी पलटण पूर्वीच होती. तिचे मदतीस कॅ. **ब्राऊन** याचे हाताखालीं ता. १५ मार्च रोजीं सकाळीं दोन बंगाली कंपन्या राजवाड्यावर पाठविण्यांत आल्या. त्यांचेबरोबर रेसिडेन्सीमधील एक गृहस्थ पाठविला होता. त्यानें आप्पासाहेबाकडे प्रथम जाऊन त्यानें बिनहरकत वरील लष्कराचे स्वाधीन व्हावें असें सांगितलें. आप्पासाहेबानें तें अर्थातच कबूल केलें नाहीं. परंतु तो विरोध तरी काय करणार? बिचारा राजवाड्याच्या आंतील भागांत राणीवशांत जाऊन लपून बसला. कॅ. **ब्राऊन** हा स्वतः आंतील खोल्यांत शिरला व त्यानें आप्पासाहेबास हातानें धरून बाहेर ओढलें व कैद करून रेसिडेन्सींत नेऊन रेसिडेंटाचे स्वाधीन केलें. आप्पासाहेबाचे दोस्त **रामचंद्र वाघ** व **नागोपंत** या दोघांसहि त्याचप्रमाणें कैद करण्यांत आलें. आप्पासाहेबास कैद करतांना कोणीहि प्रतिकार केला नाहीं व कॅ. **ब्राऊन** यास जनानखान्यांतील बायकांच्या नखांच्या ओरखड्यांशिवाय जास्त दुखापत झाली नाहीं. शहरांत हूं कीं चूं झालें नाहीं अगर प्रांतांतहि कोठें बंडाळी झाली नाहीं.

**आप्पासाहेबाचें कैदेंतून पलायन १३-५-१८१८:**— आप्पासाहेबास नागपुरास ठेवणें इंग्रजांस धोक्याचें वाटलें म्हणून रेसिडेंटानें त्यास व त्याचे मित्र **रामचंद्र वाघ** व **नागोपंत** यांजवर फितुरीचा व इतर आरोप ठेवून त्या त्रिवर्गांस प्रयागास पाठविलें. ता. ३ मे रोजीं त्यांची नागपुराहून कॅ. **ब्राऊन** याचे हाताखालीं रवानगी झाली. ता. १३-५-१८१८ रोजीं पहाटचे रात्रीं जबलपुरचे दक्षिणेस **रायचूर** मुक्कामीं त्यांचा तळ असतां आप्पासाहेबानें पहारेकरी वश करून घेऊन पलायन केलें तो प्रकार असाः—

आप्पासाहेब पळून जाण्यापूर्वीं बरेच दिवस हा कट गुप्तपणें चालला होता असें दिसतें. तो नागपुराहून निघाला तेव्हांपासूनच त्याचे मागावर त्याच्या पक्षाचे लोक होते. **गंगासिंग**[1] नांवाचा मनुष्य कांहीं लोक व द्रव्य घेऊन

१ एक अप्रसिद्ध पोवाडा.

हा गंगासिंग मंडल्याचे किल्ल्यावरील नायब गंगासिंग नसून दुसरा असावा. मंडल्याचा किल्ला तारीख २७-४-१८१८ रोजीं पडला.

नागपुरपासून त्याचे मागोमाग गुप्तरूपानें निघाला. आप्पासाहेबास कोणीकडे नेतात हेंच प्रथम माहीत नसावें असें दिसतें. कारण त्यास कलकत्त्यास नेतात असा लोकांचा प्रथम समज होता म्हणून ही मंडळी कोणीकडे जाते या पत्त्यावर **गंगासिंग** होता व दुरून त्याचे मार्गावर लक्ष देत होता व इंग्रजी सैन्याचे जवळपास आपला मुक्काम ठेवीत होता. आप्पासाहेबाची बायको **उमाबाई** ही मोठी कर्तव्यनिष्ठ बाई होती असें दिसतें व तिनेंच गंगासिंगास पाठविलें होतें. ती शेवटपर्यंत आप्पासाहेबास पैशाची मदत करीत होती.

ता. ५–५–१८१८ रोजीं कॅ. **ब्राऊन** हा आप्पासाहेब, नागोपंत व रामचंद्र वाघ यांसहित **डोंगरताल** येथें पोहोंचला व ता. १२ रोजीं **रायचूर** येथें त्यांचा मुक्काम झाला. ता. १३–५–१८१८ रोजीं रात्रीं पहाटचे ३ वाजतां पहारा बदलण्याची वेळ होती. आप्पासाहेबानें फितूर केलेल्या पहारेकऱ्यांची वेळ असतांच आप्पासाहेबानें आपल्या तंबूंत आंथरुणावर एकदोन लांब उशा मनुष्यासारख्या निजवून पांघरूण घातलें व आपण स्वतः पहारेकऱ्यांपैकीं एकाचा पोषाख चढविला व नवीन पहारा बदलतांना पहिल्या गार्डाच्या शिपायांबरोबर रांगेंत मार्च करीत तो नवीन गार्डासमक्ष निघून गेला. गार्डाच्या अधिकाऱ्यानें तंबूंत बाहेरून पाहिलें तों पलंगावर मनुष्य निजल्यासारखें दिसलें. आप्पासाहेबाच्या नोकरानें सांगितलें कीं राजाची प्रकृति ठीक नाहीं.

इकडे आप्पासाहेब व गार्डाचे नऊ शिपाई रात्रींच लष्करांतून पळून गेले व नेमल्या ठिकाणीं **गंगासिंग** व त्याचे लोक घोडे घेऊन होते त्यांचेबरोबर पळून गेले ते थेट महादेवाचे डोंगरांत गेले. सकाळ होतांच सर्व प्रकार उघडकीस आला व आप्पासाहेबाचा चारी दिशांस पाठलाग झाला. परंतु आप्पासाहेब हातीं लागला नाहीं. बाकीचे गार्ड **रामचंद्र वाघ** व **नागोपंत** यांस घेऊन ता. १५–५–१८ रोजीं जबलपुरास पोंहोचले.

आप्पासाहेबास राजवाड्यांत कैद करणारा कॅ. **ब्राऊन** हाच आप्पासाहेबाबरोबर पाठविला होता. त्यानें ता. १३ रोजीं आप्पासाहेब पळाल्या-

बद्दल नागपुरच्या रेसिडेंटास रिपोर्ट पाठविला व पुन्हां दुसऱ्या दिवशीं सविस्तर[१] हकीगत कळविली. स्वतः **ब्राऊन** हा राजाच्या तपासास निघाला. सर्व इंग्रजी अधिकाऱ्यांकडे पत्रें गेलीं व आप्पासाहेबास पकडण्याकरितां हुकूम सुटले. रेसिडेंटानें आप्पासाहेबास जिवंत पकडून देणारास अगर बातमी देणारास एक लाख रुपयांचें बक्षीस लावलें व तें चोहोंकडे जाहीर केलें.[२] तसेंच नवीन बसविलेल्या राजे **रघूजीकडून**हि तसाच जाहीरनामा काढविला. आप्पासाहेबाबरोबर असलेले **रामचंद्र वाघ** व **नागोपंत** व आणखी एक ब्राह्मण यांस प्रयागास पाठवून तेथें किल्ल्यांत कैदेंत ठेवण्यांत आलें. त्यांनीं रेसिडेंटास पत्रें पाठवून कळविलें कीं, आप्पासाहेबाच्या कटांत आपला संबंध नाहीं. तशीच त्याचीं खाजगी पत्रें त्याचे घरीं पोंचविण्यांत येत असत.

**ब्राऊनवर कोर्टमार्शलः**— कॅ. **ब्राऊन** यास जबलपुराहून परत नागपुरास बोलावण्यांत आलें. तेथें त्यास निष्काळजीपणाच्या आरोपावरून कैद केलें व त्याचे सुस्तीबद्दल त्याची हुसंगाबादेस कोर्टमार्शलपुढें चौकशी झाली.[३] **राजाराम** नांवाचा मनुष्य आप्पासाहेबाबरोबर होता; त्यास नागपुरास परत आणवून त्याचीहि या कटांत सामील असल्याबद्दल चौकशी झाली. त्याचप्रमाणें आप्पासाहेबाचे कांही नातेवाईक त्याचेतर्फें नागपुरास खटपट करीत आहेत असें रेसिडेंटास समजल्यावरून त्यांना पकडून प्रयागच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें. **गुजाबादादा गुजर** रेसिडेंटाच्या परवानगीनें प्रयागाहून परत नागपुरास आला.

महादेवाच्या डोंगराच्या पूर्व व उत्तर भागांकडून इंग्रजांनीं बरीच नाकेबंदी केली होती. परंतु डोंगरांतून हुसकल्यानंतर आप्पासाहेब **अशीरगडच्या** किल्ल्याच्या आश्रयानें तिकडे जाईल असा अंदाज होता व तोच पुढें खरा ठरला. त्या बाजूस सर जॉन **मालकम** हा होता. किल्ल्याच्या भागांत गव्हर्नर जनरलचा एजंट म्हणूनहि त्यास अधिकार होता. बाजी-

१ Nagpur Residency Records.

२ हा जाहीरनामा ता.२१साबान म्हणजे इं.ता.२६–६–१८१८चा आहे.

३ या चौकशीचा निकाल काय झाला हें माहीत नाहीं.

रावाकडून सर्व राज्य घेऊन त्याच्याशीं तह करण्याचें महत्त्वाचें काम त्यानें नुकतेंच केलें होतें (३–६–१८). गव्हर्नर जनरल यानें मालकम यास आगाऊ सूचना देऊन, आप्पासाहेब शरण आल्यास अगर सामोपचाराच्या गोष्टी बोलावयास लागल्यास त्याच्याशीं कोठवर बोलावें याबद्दल आपल्या शर्ती कळविल्या होत्या* (ता. ७–८–१८१८). त्यांत मुख्य शर्त अशी होती कीं, आप्पासाहेबास बाजीराव पेशव्याप्रमाणें पेन्शन देऊन कोठें तरी दूर ठेवावयाचें व पेन्शनाची रक्कम दरसाल एक लक्षापेक्षां जास्त नसावी. पुढें ही रक्कम दोन लक्षांपर्यंत वाढविली व तसें पंचमढीस आप्पासाहेबास कळविलें.

**आप्पासाहेबास धरण्याकरितां बक्षीस**—ता. १४–८–१८१८ रोजीं **मालकम** यानें नागपुरच्या रेसिडेंटास पत्र लिहिलें त्यांत मजकूर कीं, आप्पासाहेबातर्फे बोलण्याकरितां एक गृहस्थ येऊन गेला, परंतु ह्या अटी आप्पासाहेबास मान्य नव्हत्या असें दिसतें. ता. १५–९–१८१८ रोजीं मेजर **ओब्रायन** हा जबलपुरच्या कमिशनरास लिहितो कीं, आपलेकडे आप्पासाहेबाकडून एक मनुष्य आला आहे व नागपुरची गादी परत देण्याचें इंग्रज वचन देतील तर आपण स्वाधीन होण्यास कबूल आहों असें त्याचें सांगणें आहे. डिसेंबरमध्यें अशीरगडाजवळ ले. **क्रुकशांक** नांवाचा अंमलदार होता त्याचेमार्फत त्या भागांत एक जाहीरनामा लावला कीं, जो कोणी आप्पासाहेबाचें मन वळवून त्यास तह करण्यास लावील त्यास मोठें बक्षीस देण्यांत येईल. आप्पासाहेबास धरून देणारास पूर्वीं जें एक लाख रुपयांचें बक्षीस लावलें होतें तें दोन लाख रुपये व दहा हजारांची जहागीर याप्रमाणें वाढविण्यांत आलें. परंतु मोठमोठ्यांनाहि लालूच सुटेल असें हें बक्षीस न घेतां जंगली गोंडांनीं आपलें इमान राखलें. जान्युआरी (१८१९) मध्यें हा **क्रुकशांक** स्वतःच पंचमढीच्या डोंगरांत वेषांतर करून गेला. एका गृहस्थानें आप्पासाहेबास युक्तीनें पकडून देण्याचें त्यास कबूल केलें. त्यासहि क्रुकशांकच्या म्हणण्यावरून **दोन** हजार रुपये देण्यांत आले. परंतु आप्पासाहेब सांपडला नाहीं. **इंग्रज**

* Residency Record unpublished.

लष्कराच्या पुष्कळ टोळ्या महादेवाचे डोंगरांत शिरल्या व कोठें तरी छापा घालून आप्पासाहेबास धरण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला. आप्पासाहेबाच्या सैन्याच्या व त्यांच्या कांहीं चकमकीहि झाल्या. शेवटीं त्या डोंगरांत राहणें आप्पासाहेबास सुरक्षित वाटेना. ता. ६–२–१८१९ रोजीं ले. क. **स्कॉट** यानें रेसिडेंटास रिपोर्ट पाठविला कीं, आप्पासाहेब महादेवाच्या डोंगरांतून निघून बऱ्हाणपुराकडे गेला. त्याच्या लष्कराच्या शेवटच्या टोळीची व इंग्रजी पलटणींची एका जागीं चकमकहि झाली.

**आप्पासाहेबाचे मदतगार मोहनसिंग व चैनशहा**:– आप्पासाहेब महादेवाचे डोंगरांत **धवलगिरी** व **पंचमढी** येथें गोंडांच्या आश्रयानें राहून तेथें सैन्यभरती करीत होता. पंचमढीचा ठाकूर **मोहनसिंग** व हरईचा राजा **चैनशहा** व इतर गोंड राजांनीं त्यास पूर्ण साह्य केलें. इंग्रजांनीं त्याचे पाठीवर चोहोंकडे सैन्य पाठविलें. कांहीं इंग्रज अधिकारी वेष बदलून पंचमढीच्या डोंगरांत शिरले. आप्पासाहेबाचे हस्तक डोंगराच्या बाहेर बैतुल, मुलताई व बऱ्हाणपुर वगैरे भागांत सैन्यभरती करूं लागले व त्यांनीं कांहीं मुलूख ताब्यांतहि घेतला. एकंदर वीस हजार सैन्य जमलें व तें निरनिराळ्या टोळ्या करून हिंडूं लागलें. त्यांतच इतर लुटारू लोकहि आप्पासाहेबाचे नांवानें धामधूम करूं लागले. **बाजीरावाचें** रिकामें झालेलें सैन्यहि त्यांतच मिळालें. बऱ्हाणपुरास आप्पासाहेबाच्या पक्षाचे बरेच लोक होते. शिवाय नागपुरासहि आप्पासाहेबाच्या पक्षाचे कांहीं लोक होते. ते गुप्तपणें पैशाची वगैरे मदत पाठवीत असत.

**क. स्पार्कचा नाश. जुलै. १८१८**:— बैतुलाहून क. **स्पार्क** नांवाचा अधिकारी **१००** लोकांची एक टोळी घेऊन अशा एका जमावावर तुटून पडला. हा जमाव लहान असेल अशी त्याची कल्पना होती. परंतु तो अंदाज तीन हजारांचा निघाला व त्यानें क. **स्पार्क** व त्याचे सर्व शिपाई कापून काढले ( २१ –७–१८ ). बैतुल व शिवणीचे आसपास गोंड, अरब व शीख लोकांचा पंधरा हजारांचा जमाव जमला व त्यांनीं **मेळघाट, भैसदेही, आतनेर, सातनेर** व **आमळा** वगैरे प्रांत आपल्या ताब्यांत घेतले. बैतुलास ले. क. **वॉर्डला** म्हणून लष्करी अधिकारी होता. त्याच्याजवळ सैन्य कमी

होतें म्हणून त्यानें नागपुराहून स्वसंरक्षणार्थ आणखी सैन्य मागविलें. कॅ. **न्यूटन** हा त्या भागांत या लष्करावर चालून गेला परंतु तोहि घाबरला व **स्पार्क**प्रमाणेंच त्याचीहि गति होते कीं काय या भीतीनें हुसंगाबादचा लष्करी अधिकारी **मॅकफर्सन** यानें तिकडे स्वत: कूच केलें. **न्यूटनची** व आप्पासाहेबाच्या लोकांची एक चकमक झाली. तेव्हां हा जमाव आपल्या कल्पनेपेक्षां बराच लहान आहे असें **न्यूटन** यास समजलें. गोंडांचे व अरबांचे लष्करांतून एक कैदी सुटून आला त्यानें बातमी दिली कीं, **मॅकफर्सन** व त्याचे लष्करास गांठून **स्पार्क**प्रमाणेंच त्यांचा पूर्ण नाश करण्याची तयारी झाली आहे.

आप्पासाहेबाचे लोकांनीं ऑगस्ट १८१८ चे आरंभीं मुलताई व आसपासचा भाग आपल्या ताब्यांत घेतला. परंतु जवळ सैन्य नसल्यामुळें बैतुलच्या इंग्रजी अधिकाऱ्याचा कांही इलाज चालेना. काहीं दिवसांनीं लष्कर आल्यावर मुलताईवर इंग्रजांनीं चाल केली. परंतु तें येण्यापूर्वीच आप्पासाहेबाचे लोक निघून गेले. मुलताईच्या तीन मुख्य गृहस्थांची कोर्टमार्शलपुढें चौकशी झाली व त्यांना शिक्षा झाल्या. त्याचप्रमाणें बऱ्याच जमीनदार व प्रमुख लोकांस आप्पासाहेबास मदत केल्यावद्दल शिक्षा झाल्या. नागपुर प्रांतांत व नर्मदाभागांत इंग्रजी सत्ता डळमळूं लागली होती. परंतु जालन्याहून **डव्हटन** व एलिचपुराहून नबाबाचें सैन्य मदतीस आलें व चोहोंकडच्या इंग्रजी पलटणी त्या भागांत जाऊन इंग्रजांचा पुन: जम बसला.

**बाळा मोकाशी** नांवाच्या एका मनुष्यानेंहि बरेंच सैन्य जमवून धामधूम चालविली होती. त्यावरहि इंग्रजी लष्कर जाऊन त्याचा मोड झाला. तसेंच नर्मदेच्या कांठांवर **प्रतापसिंग** नांवाच्या माणसानें कांहीं दिवस लुटालूट चालविली होती.

**रामचंद्र वाघ** व **नागोपंत** यांचे अर्ज प्रयागाहून नागपुरच्या रेसिडेंटाकडे इ. स. १८२४ पर्यंत येतच होते. **गणपतराव सुभेदार** हा अहमदनगरच्या किल्ल्यांत कैदेंत होता व **मनभट** नागपुरास कैदेंत होता. **रामचंद्र वाघ** यास नंतर सोडून दिलें असें दिसतें; कारण १८२९ मध्यें

तो जबलपुरास रहात असतांना त्यास नर्मदा विभागांतून बाहेर काढून दिल्याबद्दल पत्रव्यवहार आढळतो.

मुलताई,* कुपटा, अंबागड, पवरी, आमला, बोरडी व आमनेर–झिलपी, हीं ठिकाणें हल्ला करून घ्यावीं लागलीं. महादेवाचे डोंगरांतसुद्धां दऱ्याखोऱ्यांतून इंग्रजी सैन्य जाऊन त्यांनीं आप्पासाहेबाचें सैन्य हुसकून लावलें. **चौरागड** व **मंडला** हे किल्ले तर फार प्रयासानें घेतले व दोन्ही किल्लेदारांची कोर्टमार्शलमार्फत चौकशी झाली.

महादेवाचे डोंगराबाहेरसुद्धां गोंडांनीं हल्ले केले. **चौरागडच्या** किल्ल्यावर **चैनशहा** यानें दोनतीन हजार सैन्य घेऊन तो किल्ला घेण्याचा प्रयत्न केला. परंतु बाहेरच्या इंग्रजी लष्करास ही बातमी समजून तें तेथें आलें व चैनशहास तेथून हाकून दिलें. चैनशहा याची व दुसऱ्या एका इंग्रजी टोळीची महादेवाचे डोंगरांत चकमक होऊन **चैनशहा** पकडला गेला.

**मोहनसिंग व चैनशहास पकडलें**:—पंचमढीचा राजा ठाकूर **मोहनसिंग** व इतर गोंड राजे इंग्रजी लष्करास शरण गेले व त्या डोंगरांतून आप्पासाहेबाचे सर्व लोक निघून गेले. हरईचा **चैनशहा** यास मे. ओब्रायन यानें डोंगराच्या एका खोल दरींत छापा घालून धरलें. त्यास चांद्याच्या किल्ल्यांत कैदेंत ठेवलें तेथें तो महामारीनें मरण पावला. त्याचा मुलगा **सोहनशहा** यास **सोनपुरच्या** आसपासचा मुलूख इंग्रजांनीं तोडून दिला व हरईचें राज्य चैनशहाचा पुतण्या **यशवंतशहा** यास देण्यांत आलें.

**चिन्तूचा मृत्यु**:—**चित्तू** पेंढारी यास माळव्यांतून **मालकम** यानें हुसकल्यानंतर तो कांहीं दिवस अशीरगडच्या आसपास जंगलांत राहिला व नंतर कांहीं माणसें जमवून तो महादेवाच्या डोंगरांत आप्पासाहेबास जाऊन मिळाला. या डोंगरास इंग्रजी लष्कराचा वेढा असल्यामुळें लहानलहान टोळ्यांनीं आप्पासाहेबाचें सर्व लष्कर डोंगरांत जमा झालें व नंतर एकदम निघून बऱ्हाणपुराकडे गेलें. **चित्तू** पेंढारी यास अशीरगडच्या किल्लेदारानें किल्ल्यांत येऊं दिलें नाहीं व पुढें जंगलांत लपतछपत हिंडतांना त्यास

---

* मुलताईचे पाटील, देशमूख व देशपांडे यांस सडकेवर काम करण्याची शिक्षा दिली होती.

एका ठिकाणीं वाघानें मारून खाल्लें. त्याचा मुलगा त्याच्या शोधार्थ हिंडत असतांना त्यास त्याचें प्रेत सांपडलें.

ता. ६–३–१८२५ रोजीं सागर व जबलपुरचे बाजूस **नारोपंत** व **बाबूपंत** नांवांचे आप्पासाहेबाचे दोघे हस्तक आप्पासाहेबाकरितां सैन्य जमवीत होते. त्यांपैकीं ५० लोकांची एक टोळी इंग्रजांनीं पकडून कैद केली. तसेंच त्याच सुमारास **रावजी नारायण** नांवाचा एक मनुष्य सागरकडे आप्पासाहेबाकरितां सैन्य जमवीत होता व त्याचेंहि वरील दोघां हस्तकांशीं सूत होतें.

**रामरतन** बाबू नांवाचा एक मनुष्य आप्पासाहेबाचा मनुष्य म्हणून दिल्लीच्या रेसिडेंटाची भेट घेण्याचा प्रयत्न करीत होता. त्याची भेट घेऊं नये म्हणून जबलपुरच्या कमिशनरानें कळविल्याचाहि दाखला सांपडतो (ता. ९–६–१८२८). इ. स. १८२९ च्या सुमारास आप्पासाहेब मारवाडांत होता व त्यास मारवाडांतून हुसकून लावल्याबद्दल अजमीरचा पो. एजंट हा ता. ८–७–१८२९ रोजीं कळवितो.

**आडाम्स** व **मॅकमॉरिन** हे उत्तरेकडून व **स्कॉट** हा दक्षिणेकडून पंचमढीचे डोंगरांत शिरले व ते पंचमढीस आले. तेथून त्यांनीं सर्व दरे-खोरे धुंडाळले; परंतु आप्पासाहेब व त्याचे लोक पूर्वींच निघून गेले होते. **आडाम्स** हा जान्युआरीच्या पहिल्या तारखेस पंचमढीस जाणार होता. परंतु जड सामान व हत्ती नेण्यास उशीर लागल्यामुळें आप्पासाहेब निघून गेल्यानंतर १५ दिवसांनीं तेथें पोहोंचला.

**आप्पासाहेबाचें महादेवाचे डोंगरांतून अशीरगडाकडे पलायन १-२-१८१९**–**आप्पासाहेब** ता. १ फेब्रुआरी १८१९ रोजीं महादेवाच्या डोंगरांतून अशीरगडाकडे जाण्यास निघाला. त्याचेबरोबर **चित्तू** पेंढारी व ५०० अरब व हिंदुस्थानी सैन्य होतें. **बोरडा** येथें कॅ. **जोन्स** म्हणून एक इंग्रज सरदार होता त्यास आप्पासाहेब डोंगरांतून निघाल्याची बातमी लागली परंतु बोरडा येथील अंमलदारानें तो शहापुरच्या रस्त्यानें जाणार म्हणून बातमी दिली. ती बहुधा आप्पासाहेबाच्या लोकांची हूल होती. त्यामुळें त्या रस्त्यानें त्यानें नाकेबंदी केली.परंतु दुसरा एक रस्ता होता तो मोकळा राहिला व आप्पासाहेब त्या रस्त्यानें निघून पलीकडेस सावळीगडाच्या रस्त्यानें निघून गेला.

हें समजतांच **जोन्स** यानें त्यांना गांठण्याचा प्रयत्न केला. परंतु आप्पासाहेबाच्या मागून जाणाऱ्या एका टोळीची व त्याची चकमक होऊन आप्पासाहेबास पुढें जाण्यास आणखी वेळ मिळाला. कांहीं अंतर पुढें गेल्यावर **डांबरघाटा**जवळ या लोकांनी पुन्हां जमा होऊन इंग्रजी लष्कराशीं सामना दिला व पुन्हां त्यांची पांगापांग झाली ( ३–२–१९ ). इंग्रजी लष्करास अडवून आप्पासाहेबास पुढें जावयास वेळ मिळावा अशा तऱ्हेच्या ह्या युक्त्या होत्या. दुसरी एक इंग्रजांची टोळी तापीच्या कांठच्या **झिलपी–आमनेरच्या** उत्तरेस होती. तिलाहि ही बातमी समजतांच तिचा मुख्य ले क. **पोलॉक** हा ता. ४ रोजीं खांडव्याजवळ **पिंपळोद** येथें आला. कारण अशीरगडास जाणारे दोन रस्ते तेथें फुटत होते. एक **बामगड**करून व दुसरा **बोरगांवा**-वरून. तसेंच मागें दोन कोस **हिवऱ्या**वरूनहि एक रस्ता जात होता तेथेंहि नाकेबंदी केली. आप्पासाहेब सावळीगडाहून थेट पश्चिमेकडे येत होता. त्यास मध्येंच गांठण्याची इंग्रज लष्करानें खूप तयारी केली. आप्पासाहेबाबरोबरहि रस्त्याचे माहितगार लोक होतेच. शिवाय पेंढाऱ्यांना या भागाच्या रस्त्यांची माहिती चांगली. ता. ४ फेब्रुआरी रोजीं सायंकाळचे सुमारास **हिवऱ्या**च्या लष्कराची व आप्पासाहेबाची अकस्मात् गांठ पडली. आप्पासाहेबाबरोबर फारसे लोक नव्हते. त्याचे बरोबरचें लष्कर वगैरे मागें रहात असे. कारण पाठलाग करणारांस अडविण्यास तें उपयोगी पडे. इंग्रजी लष्करानें एका अडचणीच्या जागीं एका खोल नदीजवळ आप्पासाहेबास गांठलें. परंतु आप्पासाहेबानें त्या खोल पाण्यांतून हिमतीनें घोडा घातला व इंग्रजी लष्कर पहात असतां नदीच्या पार होऊन आप्पासाहेब निघून गेला. बाकीची टोळीहि चोहोंकडे निघून गेली व अंधारामुळें दिसेनाशी झाली. आप्पासाहेबाचा पाठलाग केला परंतु तो सांपडला नाहीं. मात्र या हल्ल्यांत इंग्रजी लष्कराच्या हातीं आप्पासाहेबाचे कांहीं लोक सांपडले. त्यांत आप्पासाहेबाला फितूर होऊन त्याचेबरोबर रायचुराहून पळालेले कांहीं शिपाई सांपडले. त्यांना इंग्रजांनीं कडक शिक्षा दिल्या. हिवऱ्याची तुकडी व पोलॉकची तुकडी बोरगांवाहून **सेवल** येथें गेली. हें ठिकाण अशीरगडाच्या किल्ल्यापासून अगदीं जवळ आहे.

**अशीरगडांत आश्रय:–आप्पासाहेब** अशीरगडांत जाऊन तेथील किल्ले-

दार **यशवंतराव लाड** याचे आश्रयानें आहे अशी इंग्रजी लष्कराची खात्री झाली म्हणून त्यांनीं तेथेंच मुक्काम केला. अशीरगडचा किल्ला शिंद्याच्या ताब्यांत असून यशवंतराव लाड हा बाजीराव व आप्पासाहेब यांस अनुकूल होता. इंग्रजांचें त्याचेशीं संधान लागण्याचा संभव नव्हता व शिंद्याचा व इंग्रजांचा या वेळीं तह असल्यामुळें शिंद्याच्या परवानगीशिवाय त्या किल्ल्यावर इंग्रज हल्ला करणार नाहींत असें आप्पासाहेबास वाटलें. किल्लाहि मजबूत असल्यामुळें मोठ्या तोफा व इतर सामुग्रीशिवाय हल्ला करणें सोपें नव्हतें. आप्पासाहेब अशीरगडच्या किल्ल्यांत जाऊं नये म्हणून इंग्रज सैन्यानें खूप तयारी केली होती. परंतु वरप्रमाणें ती सर्व फुकट गेली. सदरहू हकीगत आपले वरिष्ठांस कळवून हें इंग्रजी लष्कर हुकमाची वाट पहात तेथेंच तळ देऊन राहिलें.

**अशीरगडास वेढा:—डव्हटन** हा खानदेशांत **वरखेड** ( एदलाबादेजवळ ) येथील आपल्या छावणींत होता. त्यास बऱ्हाणपुरावर जाण्यास हुकूम झाला. **जालन्याहून** त्यानें तोफखाना बोलाविला. सर जॉन **मालकम** हा स्वत: आपले महूचे छावणीहून सरंजामानिशीं **अशीरगडाकडे** येण्यास निघाला. **काळा चबुत्रा** येथें **डव्हटन** व **मालकम** यांच्या भेटी होऊन किल्ल्याच्या वेढ्याचा कार्यक्रम ठरला. **मालकम** हा बोरगांवाहून कट्टीघाटानें अशीरगडाजवळ **संदलपुर** येथें येऊन बसला.

तसेंच **आडाम्स** यास हुसंगाबादेचा तळ उठवून **अशीरगडास** बोलाविलें. ले. क. **स्मिथ** यास पुण्याहून सर्व तोफखाना वगैरे घेऊन अशीरगडास बोलावण्यांत आलें. एकंदरींत माळवा, हैदराबाद, पुणें व नागपुर येथील अत्यंत कसलेले योद्धे व साहित्य अशीरगडास आणविलें. दुसरीकडे कोठेंहि इंग्रजी फौजेस शत्रु उरला नव्हता. यामुळें सर्व फौज बिनहरकत आणतां आली.

अशीरगडचा किल्ला अत्यंत प्रसिद्ध व बळकट. दक्षिणचा दरवाजा म्हणून त्यानें अनेक हल्ले पाहिलेले. कोणत्याहि जेत्यास तो आपल्या ताब्यांत ठेवणें जरूरीचें वाटे. मोंगलांपासून तों मराठ्यांपर्यंत सर्वांना तो दक्षिणेंत येण्याजाण्यास अवश्य असा वाटे. पूर्वीच्या काळांत तरी तो जवळजवळ अभेद्य असाच वाटे.

**आप्पासाहेबाचा अशीरगडांत प्रवेशः**—अशीरगडाच्या भोंवतालच्या जंगलांत आप्पासाहेबाचे कांहीं लोक होते. त्यांना हुसकून लावण्यास व उत्तरेकडील खिडींतून त्यांना पळण्यास रस्ता राहूं नये म्हणून प्रथम **स्मिथ** व **स्किनर** यांनीं टेहळणी सुरू केली. ता. १५ फेब्रुवारीस या सैन्याची व **चित्तू** पेंढाऱ्याच्या टोळीची आकस्मिक गांठ पडली. चित्तू पाहतां पहातां निसटला. आप्पासाहेबहि त्या टोळींत होता. असें समजलें की तो बाकीच्या लोकांसह अशीरगडाच्या किल्ल्यांत गेला. परंतु किल्ल्यावरून गोळ्यांचा मारा सुरू झाल्यामुळें इंग्रज शिपायांस आप्पासाहेबाचा किल्ल्यापर्यंत पाठलाग करतां आला नाहीं. वास्तविक आप्पासाहेब या टोळींत नव्हता असें पुढें समजून आलें. परंतु तो अशीरगडासच गेला अशी त्या वेळेस इंग्रज अधिकाऱ्यांची खात्री होती.

किल्ल्याचे भोंवतीं इंग्रज सैन्याचा व तोफखान्याचा गराडा पडला, हें पाहतांच किल्लेदार **यशवंतराव लाड** यानें ता. १८ फेब्रुवारीस **डव्हटनकडे** वकील पाठवून **मालकम** यास **बोरगांवास** त्याचे छावणींत जाऊन भेटण्याकरितां लष्करी परवाना मागितला व त्याप्रमाणें **डव्हटन** यानें त्यास न अडविण्याकरितां तसा परवाना दिला. परंतु **यशवंतराव मालकम** यास भेटण्यास गेला नाहीं. **डव्हटन** यास मात्र त्यानें कळविलें कीं आप्पासाहेब किल्ल्यांत नाहीं. तुम्ही व्यर्थ संशय घेतां.

इकडे शिंद्याशीं बिघाड होऊं नये म्हणून इंग्रजांनीं तेथील रेसिडेंटामार्फत शिंद्याकडून **यशवंतरावास** हुकूम आणविला कीं, किल्ला इंग्रजांच्या ताब्यांत द्यावा. यामुळें हल्ल्याची तयारी झाली असतांहि वरील हुकूम येईपर्यंत इंग्रजांनीं हल्ला थांबविला. वरील हुकूम **यशवंतरावास** पोहोंचविला परंतु त्यानें त्या हुकमावर किल्ला ताब्यांत देण्याचें नाकारलें. शेवटीं हल्ला होण्याचा रंग दिसू लागतांच त्यानें पुढील शर्तीवर किल्ला खालीं करून देण्याचें कबूल केलें. त्या अशा कीं इंग्रजांनीं आधीं वेढा उठवून आपलें सैन्य दूर न्यावें. **यशवंतराव** व सर्व शिबंदी यांस सुरक्षित बाहेर जाऊं द्यावें; या कराराच्या पूर्णतेसाठीं कोणी मोठा इंग्रज अधिकारी यशवंतरावाकडेस ओलीस ठेवावा. ह्या शर्ती अर्थातच इंग्रजांनीं मान्य केल्या नाहींत व किल्ल्यावर हल्ला करण्याचें नक्की ठरलें.

**अशीरगड किल्ल्याचें वर्णन**:—पुढील हकीगत सांगण्यापूर्वी अशीरगड किल्ल्याचें थोडें वर्णन करणें जरूर आहे. किल्ल्याचा मुख्य भाग म्हणजे वरचा किल्ला. हा पूर्वपश्चिम ११०० यार्ड लांब असून दक्षिणोत्तर ६०० यार्ड रुंद आहे. वरील सपाटीभोंवतीं तटबंदी आहे ती एका रेषेंत नसून जसजसे कडे तुटले आहेत तशी वेडीवांकडी आहे. या मुख्य किल्ल्याची टेकडी इतर टेकड्यांपासून अलग असून सुमारें ७५० फूट उंच आहे. मुख्य किल्ल्याचे भोंवतीं खडक फोडून स्वाभाविक कड्यांची भिंत केलेली आहे. ती सुमारें १[illegible] फूट उंच आहे व त्यावर किल्ल्याची बांधीव तटबंदी आहे. तुटलेल्या कड्यांवरून वर चढणें अशक्यच आहे. परंतु दोन जागांवरून चढाव कमी असल्यामुळें वर चढणें शक्य होतें तेथें विशेष बंदोबस्ताची तटबंदी बांधली आहे व तेथेंच तोफांचाहि बंदोबस्त करून चांगल्या माऱ्याची जागा केली आहे. किल्ल्याच्या आंत पाण्याचा पुरवठा मुबलक असून पाण्याच्या जागीं बाहेरील तोफांचा मारा चालूं शकत नाहीं.

परंतु इतर डोंगरी किल्ल्यांप्रमाणें अशीरगडाचा कच्चेपणा असा आहे कीं बाहेरून हल्ला करणारे सैन्यास किल्ल्याभोंवतालच्या लहानशा टेकड्या व दऱ्या यांचा आश्रय मिळून त्यांना हळूहळू वर चढतां येतें. उत्तरेकडेस अशा एका जागीं खालीं दुसरी भिंत बांधून दुप्पट बंदोबस्त केला आहे. आग्नेयेचे कोपऱ्यास किल्ल्याबाहेर एकदम पडून हल्ला करण्याकरितां विशेष व्यवस्था केली आहे. ती अशी कीं आंतील लोकांस जरूर वाटल्यास सहज बाहेर जातां यावें. परंतु बाहेरचे लोकांस आंत येतां येऊं नये याकरितां जागोजाग रस्ते बंद करतां येतात. नैर्ऋत्येचे बाजूस किल्ल्याचा मुख्य दरवाजा असून तेथून खालीं जाईपर्यंत पांच दरवाजे लागतात व त्यांच्या शेवटीं दुसरी तटबंदीची भिंत आहे व तेथें जाईपर्यंत दगडी पायऱ्यांचा चढाव आहे. त्याच्या खालीं "खालचा किल्ला" म्हणून दुसरी तटबंदीची जागा आहे व ती मोठ्या टेकडीच्या खालीं पश्चिमेस एक लहान टेकडी आहे तिच्याभोंवतीं भिंत घालून केलेली आहे. खालच्या किल्ल्यास "**मालीगड**" असेंहि म्हणतात. लहान किल्ल्याच्या खालींच "पेटा" म्हणून किल्ल्याखालची वस्ती आहे. पेट्यासहि दक्षिणेकडून तटबंदी आहे.

**वेढयाची तयारी**—ता. १७ मार्च रोजीं रात्रीं १२ वाजतां ले. क. **फ्रेझर** याच्या हाताखालच्या सैन्यानें आपल्या छावणींत तयार होऊन एक वाजतां कूच करावें व मुख्य किल्ल्याच्या पश्चिमेस खालच्या किल्ल्याच्या पायथ्याशीं असलेल्या **पेटयावर** हल्ला करून तो, दिवस निघण्यापूर्वी काबीज करावा; असा कार्यक्रम ठरून तसे हुकूम देण्यांत आले. वेढयाची मुख्य व्यवस्था **डव्हटन**कडे होती. इतर ठिकाणांहून आणखी सैन्य व दारूगोळा येताच होता. प्रथम **पेटा** हस्तगत करण्याचें कारण तेथील घरांच्या आडोशानें तोफांचे मोर्चे खालच्या किल्ल्यावर तोफा चालविण्या-करितां लावण्याचे होते. प्रथम खालचा किल्ला हस्तगत करून तेथें दुसरे मोर्चे बांधून त्यावरून मोठया किल्ल्यावर मारा करावयाचा असा बेत होता. इकडे हें काम सुरू करून वरील शिबंदीचें चित्त दुसरीकडे वेधण्याकरितां उत्तरेकडील बाजूनें **मालकम**च्या फोजेनें तोफा चालवाव्या अशी योजना करण्यांत आली.

**डव्हटन**ची छावणी **तंबोल्यास** होती. तेथून रात्रीं हें लष्कर कूच करून बट्टीखेडयाच्या नाल्यांतून **पेटयावर** गेलें व त्यांनीं एकदम त्यावर हल्ला केला व ती जागा सर केली. पेटयावर हल्ला झाला हें समजतांच खालच्या किल्ल्यावरून त्यावर मारा सुरू झाला. परंतु इमारतींच्या आश्रयानें इंग्रजी सैन्याचें विशेष नुकसान झालें नाहीं. किल्ल्याखालीं असलेल्या आडव्या घरांच्या आश्रयानें तोफांचे मोर्चे बांधण्याजोगी सोईची जागा इंग्रजांस सांपडली. तसेंच पेटयाजवळील **लालबाग** व **मोतीबाग** नांवांचीं दोन ठिकाणें काबीज करून तेथेंहि तोफांचे मोर्चे लावले.

**पेटा सर केला**—दुसरे दिवशीं पेटयांत मोर्चे बांधले व ते खालच्या किल्ल्यावर रोखले. तसेच पेटयाच्या डावीकडे एक टेकडी आहे तीवरहि मोर्चे बांधले, पण ते निरुपयोगी ठरले. याप्रमाणें ता. २० पर्यंत ठिक-ठिकाणीं मोर्चेबंदी होत होती. रात्रीं मोर्चेबंदी करून दिवस निघण्यापूर्वी खालच्या किल्ल्याच्या माऱ्यापलीकडे जाऊन शिपायांनीं रहावें असा क्रम चालला. खालच्या किल्ल्यावरील शिबंदीनेंहि वरील माऱ्याचे आश्रयानें खालीं उतरून कांहीं घरें जाळलीं. परंतु पेटयांतील घरांतूनहि इंग्रजी

लष्कर थोडेंबहुत रहातच असे, त्यामुळें इंग्रजांची मोर्चेबंदी पुरी होऊन खालच्या किल्ल्यावर तोफा सुरू झाल्या.

ता. २० रोजीं सकाळीं प्रथम ह्या तोफा सुरू झाल्या व त्यांनीं खालच्या किल्ल्याची तटबंदी ढांसळूं लागली. त्या माऱ्यांतूनहि खालच्या किल्ल्यावरून शिपाई खालीं उतरून त्यांनीं पेटचामधील कांहीं घरें व रस्ते काबीज केले. परंतु त्यांना लवकरच ते सोडून परत जावें लागलें. परंतु या हल्ल्यांत इंग्रजांकडील मुख्य सरदार ले. क. **फ्रेझर** हा पडला.

**खालचा किल्ला सर**—ता. २१ चे सकाळपर्यंत लहान किल्ल्यावर तोफा चालूच राहिल्या व त्यांमुळें त्याची तटबंदी ढांसळूं लागली. आतां तेथें टिकाव लागणार नाहीं हें पाहून तेथील शिबंदी खालचा किल्ला सोडून वरील किल्ल्यांत निघून गेली. परंतु हें दिवस निघण्यापूर्वीच झाल्यामुळें रात्रीं इंग्रजी शिपायांस दिसलें नाहीं व त्यांच्या तोफांचा मारा खालच्या किल्ल्यावर चालूच राहिला. सकाळीं सात वाजतां इंग्रजांकडील दारूगोळ्यास आग लागून दारूचीं १३० पिपें जळून भडका झाला. ती वेळ पहारा बदलण्याची असल्यामुळें एकंदर शंभर शिपाई व दोन हिंदी लष्करी अधिकारी जळून मेले. हें पाहतांच खालच्या किल्ल्यावरील लोक पुन्हां खालीं उतरले.

ता. २२ मार्च रोजीं **मालकमची** टोळी उत्तरेकडून निघून पेटचाच्या भागास येऊन तिनें मारा सुरू केला. तसेंच " **मोंगलकी टोपी** " म्हणून किल्ल्याच्या दक्षिणेस एक जागा आहे तेथेंहि मोर्चे बांधले. उत्तरेकडेस **रामबाग** म्हणून ठिकाण आहे तेथेंहि मोर्चे बांधले. याप्रमाणें चोहोंकडून मारा सुरू झाला. खालचा किल्ला आतां बराच ढांसळला असल्यामुळें तो फक्त हल्ला करून घेण्याचें काम राहिलें. तेथील शिबंदी ता. ३० मार्चचा दिवस निघतांच वरील किल्ल्यांत निघून गेली व सूर्योदयाचे सुमारास इंग्रजी लष्कर वर चढून त्यानें " **माळीगड** " ताब्यांत घेतला व तेथें मोर्चेबंदी सुरू केली. रात्रीं पेटचांतील तोफा माळीगडावर न्याव्या व तेथें रात्रीं मोर्चेबंदी करावी असा क्रम सुरू झाला. जागा जवळची असल्यामुळें वरच्या किल्ल्याच्या लांब पल्ल्याच्या जड तोफांचा मारा तेथें होईना. परंतु

बंदुकांचा प्रखर मारा मात्र होऊं लागला.

ता. ३१ रोजीं सागरकडील २००० लष्कर व तोफखाना इंग्रजी सैन्यास येऊन मिळाला व दक्षिणच्या युद्धांत कधींहि झाला नाहीं असा इंग्रजी सैन्याचा व तोफांचा जमाव अशीरगडाभोंवतीं जमला. चोहोंकडून लहानमोठ्या तोफा सुरू झाल्या व मोठ्या किल्ल्याची तटबंदी पडूं लागली. तसेंच कांहीं जागीं सुरुंग लावून ते उडविण्यांत आले व त्यानेंहि कांहीं तटबंदी ढांसळली.

इंग्रजांना बाहेरून दारूगोळा व दाणा–वैरण यांचा पुरवठा मुबलक होत असे. परंतु आंतील वैरण संपत आली. बाहेरून कांहीं मदत येणेंहि शक्य नव्हतें. तटबंदी ढांसळूं लागल्यामुळें आंतील लोक घाबरूं लागले. शिंद्या-तर्फेचा वकील इंग्रजांकडे होता त्यास त्यांनीं किल्लेदाराकडे बोलणें लावण्यास पाठविलें. परंतु आंतील शिबंदी व किल्लेदार त्याला इंग्रजांकडील हेरच समजत. तसेंच निरनिराळ्या निमित्तानें इंग्रजांचे हेरहि किल्ल्यांत जात. त्यांतील एक हेर संशयावरून पकडला गेला. तो २० दिवस किल्ल्यावर कैदेंत ठेवून वरच्या लोकांनीं सोडून दिला. त्यानें वरील हकीगत सांगितली. तोफखान्यावरील जमादार जखमी होऊन मरण पावला.

**तहाचें बोलणें:—यशवंतराव लाड** यानें तहाचें बोलणें लावण्याची इच्छा दर्शविली व त्या कामाकरितां बऱ्हाणपुराहून **सुलतानखा** नांवाच्या आपल्या विश्वासू गृहस्थास किल्ल्यांत येऊं द्यावें म्हणून मागणें केलें. तो गृहस्थ हजर नसल्यानें त्याचे जागीं बऱ्हाणपुरचे सुभेदाराच्या हाताखालचा अधिकारी किल्ल्यांत पाठविण्यांत आला. किल्ले दारास जास्त भीति वाटावी म्हणून नेहमीपेक्षां दुप्पट जोराचा मार किल्ल्यावर सुरू झाला. किल्ल्यावरूनहि तसाच उलट मारा चालू होता. वरील लोकांपैकीं प्राणहानी फारशी झाली नाहीं परंतु खालच्या लोकांची मात्र फार होत असे परंतु खालचें लष्कर अवाढव्य असल्यामुळें वेढा देणा-रांना त्याची क्षिति नव्हती.

बाहेरून इंग्रज सैन्यासहि त्रास देणारें कोणी उरलें नव्हतें. शेवटीं निराश होऊन, ता. ७ एप्रिल रोजीं सायंकाळीं किल्लेदारानें दोन वकील खालीं

पाठविले व आपण किल्ला खालीं करून देण्यास तयार आहों असें सांगितलें. किल्ल्याचे आंतील सर्व मालमत्ता नेऊं द्यावी एवढीच किल्लेदाराची शर्त होती. परंतु **मालकम**साहेबानें ही शर्त कबूल न करतां उलट निरोप पाठविला कीं, स्वतः **यशवंतराव** व किल्ल्यावरील मुख्य मुख्य अधिकारी यांना शिद्याकडे पाठविलें जाईल व त्याचेकडून चौकशी होऊन तो त्यांना जी शिक्षा देईल ती देईल. इतर लोकांनीं शस्त्रें खालीं ठेवून रिकामे बाहेर जावें त्यांना व त्यांचे बायकामुलांना सुरक्षित बाहेर जाऊं देण्यांत येईल. शिवाय आप्पासाहेबास लपविण्यांत यांपैकीं कोणाचें आंग आहे याचा तपास करून वरील शर्तीची अंमलबजावणी होईल. अद्यापहि आप्पासाहेबास लपविण्याचा जे जे प्रयत्न करतील त्यांना जबर शिक्षा होईल असेंहि बजावण्यांत आलें. आप्पासाहेब किल्ल्यांत आहे अशी सर्व इंग्रज अधिकाऱ्यांची पूर्ण खात्री होती व किल्लेदाराकडून जरी तो आंत नाहीं असें खात्रीपूर्वक सांगण्यांत येई तरी त्यावर त्यांचा विश्वास बसेना.

शेवटीं ता. ८ एप्रिल रोजीं ११ वाजतां **यशवंतरावानें** वरील शर्ती कबूल करून मारा थांबविण्याची विनंति केली व ती **मालकम** यानें मान्य करून किल्ल्यावरील मारा थांबविला. तरी या वेढ्यांतील मुख्य अधिकार **डव्हटन** साहेबाकडे असल्यामुळें व तो यांपैकीं कांहीं शर्ती ढिल्या करील अशी आशा वाटल्यामुळें यशवंतराव मालकमबरोबर **डव्हटन** याचा तळ ३।४ मैलांवर होता तेथें गेला. परंतु डव्हटननें त्याचें कांहीं ऐकिलें नाहीं. यशवंतराव मालकमबरोबर परत येऊन किल्ल्यांत गेला व ठरल्याप्रमाणें किल्ला खालीं करून देण्याचें त्यानें कबूल केलें. **मालकम** खालच्या किल्ल्यांत राहिला व ठरल्याप्रमाणें बजावणी न झाल्यास पुन्हा मारा सुरू होईल हें बजावण्यास त्यानें कमी केलें नाहीं.

**यशवंतरावानें किल्ला खालीं केलाः किल्ल्यावर इंग्रजांचें निशाणः**— ता. ९ एप्रिल १८१९ रोजीं सकाळीं ४ वाजतां यशवंतरावानें मालकमाकडे निरोप पाठविला कीं, शिबंदी सकाळीं खालीं उतरूं लागेल. पांच वाजतां दुसरा निरोप आला कीं, इंग्रजी निशाण किल्ल्यावर लावण्याकरितां वर पाठवून द्यावें व शिबंदी खालीं सशस्त्र उतरून पेटयांत गेल्यावर शस्त्रें खालीं

ठेवील. यामुळें शिपायांना थोडें बरें वाटेल कारण किल्ल्यांतून निःशस्त्र बाहेर निघणें त्यांना जास्त अपमानाचें वाटेल. **मालकम** यानें शंभर युरोपियन व शंभर काळे शिपाई युनियन जॅकचें निशाण घेऊन किल्ल्यावर पाठविले सकाळींच इंग्रजी निशाण पश्चिमेकडील बुरजावर लावण्यांत आलें व त्याच्या सन्मानार्थ सर्व तोफखान्याची सलामी देण्यांत आली. किल्ल्याच्या दरवाजावर इंग्रजांचा पाहरा बसला.

दुपारीं मालकमच्या लष्करानें पेटयामध्यें एक चतुष्कोण बनविला. यशवंतराव व मुख्य मुख्य अधिकारी किल्ल्यावरून उतरून प्रथम तेथें आले. **डव्हटन** हा पूर्वीच आपल्या छावणींतून पेटयावर आला होता. तेथें यशवंतराव वगैरेंनीं **डव्हटनची** भेट घेतली. **डव्हटननें** त्यांना शस्त्रें जवळ ठेवण्यास परवानगी दिली व किल्ल्यावरून एक एक टोळी क्रमानें आणण्यास सांगितलें. प्रत्येकानें आपली पलटण त्या चतुष्कोणांत आणावी. त्यांनीं बंदुका खालीं ठेवाव्या व ढाली, तलवारी व मालमत्ता घेऊन सलाम करून बाहेर निघून जावें असा क्रम चालला. कांहीं लोकांना वाटखर्चीहि देण्यांत आली. याप्रमाणें सुमारें १२०० अरब, मकराणी, सिंधी वगैरे जातींची शिबंदी किल्ला सोडून निघून गेली.

**आप्पासाहेब किल्ल्यांत सांपडला नाहीं**:—आप्पासाहेबास आश्रय देण्यांत कोणाचें किती आंग होतें व कोणास काय शिक्षा द्यावयाची याची चौकशी करण्याचें कारणच पडलें नाहीं. कारण कानाकोपऱ्यांतून शोधलें तरी आप्पासाहेब किल्ल्यांत सांपडला नाहीं व किल्ल्यांत खरोखर तो कधीं तरी आला होता कीं नाहीं, याबद्दलहि शंका वाटूं लागली [१] एवढा खटाटोप ज्या निमित्तानें केला तें मूळच सांपडलें नाहीं. फक्त एक महत्त्वाचा किल्ला हातीं लागल्यामुळें इंग्रजांविरुद्ध आश्रय मिळण्याची एक जागा नाहींशी झाली. अशीरगडचा किल्ला तेव्हांपासून इंग्रजांच्या ताब्यांत राहिला. शिंद्यानेंहि त्यावरील आपला हक्क सोडला. किल्ला सर झाल्यानंतर **मालकम**

---

१ कित्येकांचे मतें किल्लेदारानें आप्पासाहेबास आंत घेतलें व तेथें तो कांहीं दिवस राहिला व इंग्रजांनीं वेढा दिल्यानंतर वेष बदलून इंग्रजांच्या वेढयांतून गुप्तपणें निघून तो बऱ्हाणपुरास गेला.

साहेबानें यशवंतरावास विचारलें कीं, तुझे मालकाचा किल्ला सोडण्याचा हुकूम असतां तूं किल्ला कां दिला नाहींस ? त्यावर यशवंतरावानें सांगितलें कीं, असा किल्ला नुसत्या पत्रावर व हुकुमावर देण्याची आमचेकडे रीत नाहीं. कारण असे हुकूम पुष्कळदां मर्जीविरुद्ध द्यावे लागत. ते खरे नसतात. यशवंतरावाच्या म्हणण्याप्रमाणें शिंद्याचे असेहि हुकूम यशवंतरावानें दाखविले कीं, आमचा हुकूम आला तरी तुम्हीं किल्ला सोडूं नये व शेवट-पर्यंत लढवावा. हा किल्ला परत शिंद्यास न देण्याचें मार्क्किस ऑफ **हेस्टिंग्जनें** हेंच कारण दाखविलें होतें व शिंद्याचीं वरील अस्सल पत्रें त्याजकडे पाठविलीं होती.

**आप्पासाहेबाचा अज्ञातवास १८१८–१८२९:**—अशीरगडाच्या वेढ्या-पूर्वी ( ता. १५ फेब्रुआरी १८१९ ), अशीरगडाच्या वायव्येस **खैरी–घाटा-**जवळ **धूळकोटा**जवळून आप्पासाहेब निसटला तो बऱ्हाणपुरास जाऊन एका ब्राह्मणाच्या घरीं गुप्तपणें राहिला. डव्हटनचें सैन्य त्या भागांत असल्या-मुळें तेथून निघून जाणें त्यास धोक्याचें वाटलें. इंग्रजी सैन्य अशीर-गडच्या वेढ्यास गुतल्यानंतर तो गोसाव्याच्या [१] वेषानें बऱ्हाणपुराहून

१ नखीबाबा म्हणून एक साधु मालकम याचे मर्जीतला होता त्यानें मालकम यास खूष करण्याकरितां आप्पासाहेबाचा तपास करण्यास हेर पाठवून माहिती आणविली व ती माहिती आणणारे मनुष्याबरोबरच ती खालीं लिहिल्याप्रमाणें मालकम यास पत्रानें कळविली (ता.२६-५-१८१९) ती इतर माहितीशीं बरोबर जुळते.

"नागपुरवाला राजा आप्पासाहेब अशेरहून निघाले. बरोबर सरंजाम घेऊन खरगोण येथें आले. तेथून सरंजामास रजा देऊन आंगास विभूत लंगोटी लावून एक इसम बरोबर घेऊन राजपिपळ येथें नर्मदा नदी उतरून अलीमोहन जवळ आले. तेथून आमझेरा, झाबवा जवळून पुढें देवळ्या प्रतापगडावरून उदेपुर, नाथद्वार या रत्यानें लाहोरास जाण्याचा त्यांचा इरादा आहे. पूर्वीं महादेवाच्या डोंगरांत राजा होता. त्यानें अगोदरच एक इसम लाहोरास पाठविला होता, तो तेथून परत निरोप घेऊन अशेर येथें आला. तुम्हीं आमच्यापाशीं यावें असा लाहोराहून जबाब आल्यावरून ते तेथून गेले. असा त्यांचा पत्ता लागला आहे. ही बातमी सांगणारा इसमच हें पत्र घेऊन आपल्याकडे जात आहे. ज्येष्ठ शु॥ ३ संवत १८७३"

निघून **इंडिया** येथें गेला व तेथें नर्मदा उतरून भोपाळचे राज्यांत अरण्यांत लपून राहिला. तेथून त्यानें भोपाळच्या नबाबास आपणातर्फे मध्यस्थी करण्यास निरोप पाठविला. परंतु भोपाळच्या नबाबानें मध्यस्थी करण्याचें नाकारलें. कारण त्यासहि इंग्रजांकडून आप्पासाहेबास पकडण्याविषयीं व अडविण्याविषयीं हुकूम गेला होता. तो इंग्रजांस बातमी देईल म्हणून पुन्हां आप्पासाहेबानें दडी मारली. नंतर बरेच दिवस त्याचा पत्ता लागला नाहीं. मधून मधून भलत्याच ठिकाणाहून तो दिसल्याच्या बातम्या येत, शिंद्यानें त्यास आश्रय देण्याचें साफ नाकारलें. आप्पासाहेबानें शिंदे, होळकर, जयपुर, जोधपूर वगैरे सर्व संस्थानिकांचा आश्रय मागितला. परंतु त्यास कोणीहि आश्रय देईना. नंतर तो वेष पालटीत लाहोरास गेला. तेथें **रणजितसिंगानें** त्यास कांहीं दिवस आश्रय दिला. परंतु सर्वांसच इंग्रजांचा धाक म्हणून त्यानेंहि आप्पासाहेबास शेवटीं काढून दिलें. आप्पासाहेब स्वतः लपतछपत असतांना सुद्धां त्याचे उद्योग चालूच असत. मार्च १८२८ मध्यें **वलीदादखा** नांवाचा त्याचा हस्तक एलिचपुरच्या नबाबाकडे त्याचा एक खलिता घेऊन आला त्यास एलिचपुरास पकडलें. त्याचेजवळ नागपुरचे रेसिडेंटासहि देण्याचें एक पत्र होतें. त्याचेकडून आप्पासाहेबाचा पत्ता काढण्याचा बराच प्रयत्न झाला पण कांहीं उपयोग झाला नाहीं.

**लाहोरास आश्रय**– ता. ९–७–१८२४ रोजीं कलकत्त्याहून नागपुरचे रेसिडेंटास पत्र आलें त्यांत लाहोर दरबारानें आप्पासाहेबाबद्दल पुढील हकीकत * कळविली होती." आप्पासाहेब हा **सुकाइत मंडी** येथें रहात आहे त्यास नागपुराकडून द्रव्याची बरीच मदत होत आहे व तो लाहोर प्रांतांत सैन्य उभें करीत आहे." तसेंच रेवा येथील राजा व लाहोरचा **रणजितसिंग** याचेंहि आप्पासाहेबाचे बाबतींत बोलणें चालू असल्याचा दाखला सांपडतो. यावरून दिसतें कीं इतक्या प्रतिकूल परिस्थितींतहि

---

( ता. २६ मे १८१९ ) (सरदेसाई रियासत उ. वि. भा. ३ पा. ४१३. ऐ. संकीर्ण साहित्य खंड १ पृ. १६४ )

* 1 Nagpur Residency Records,
2 Ludlaw's Br. India Vol. II.
3 Prinsep Vol. I.

आप्पासाहेबानें आपला उद्योग सोडला नव्हता. १८२९ मध्यें **गंगासिंग** नांवाच्या वकीलामार्फत दिल्लीच्या रेसिडेंटाकडेहि त्यानें बोलणें लाविलें होतें. त्या वकीलास कैद करण्यांत आलें.

**आप्पासाहेबास पकडलें.**:—यानंतर **आप्पासाहेब** पळून हिमालयांतील डोंगरी संस्थानांत गेला. **मंडीच्या** राजानें त्यास कांहीं दिवस आश्रय दिला. **मंडी, टेहरी, गढवाल** वगैरे डोंगरी मुलखांत तो नंतर हिंडत राहिला. ता. ३–६–१८२९ रोजीं **अजमीरच्या** पोलिटिकल एजंटाचा रिपोर्ट आहे कीं आप्पासाहेब मारवाडांत **नागोर** येथें आहे. त्यास पकडण्याची खटपट चालूच होती. शेवटीं **जोधपुर** संस्थानांत लपत छपत असतां इ. स. १८२९ मध्यें त्यास पकडलें. परंतु जोधपुरच्या राजानें त्यास इंग्रजांचे स्वाधीन न करतां आपणच नजर कैदेंत ठेवलें व तो पळून जाणार नाहीं अशी आपण हमी घेतली व त्यास स्वतःच्या खर्चानें इतमामानें वागविलें.

**आप्पासाहेबाचा मृत्यु**:—आप्पासाहेब याप्रमाणें नजरकैदेंत असतांच बरेच दिवसांनीं ता. १५–७–१८४० रोजीं तेथेंच मरण पावला. तेथील पोलिटिकल एजंटानें वरील गोष्ट नागपुरच्या रेसिडेंटास कळविली. याप्रमाणें आप्पासाहेबाचा शेवट झाला. मरणसमयीं आप्पासाहेबाचें वय ४४ वर्षांचें होतें. ( जन्म इ. स. १७९६ )

आप्पासाहेब जोधपुरास कसा राहिला याबद्दल पुढील दंतकथा प्रसिद्ध आहे. आप्पासाहेब **जोधपुरच्या** राज्यांत जाऊन तेथें गोसाव्याचे वेषानें रहात असतां एका मंदिरांत एका प्रसिद्ध गाणारणीचें गाणें ऐकून खुष झाला व त्यानें तिला एक हिऱ्याची आंगठी बक्षीस दिली. त्यावरून हा कोणी तरी मोठा मनुष्य असावा असा संशय उत्पन्न झाला. ही गुणगुण पोलिटिकल एजंटाच्या कानावर जाऊन त्यास हा आप्पासाहेब असावा असा संशय येऊन त्यानें त्यास धरण्यास माणसें पाठविलीं. आप्पासाहेबास हें कळतांच तो तेथील राजाचें "मानमंदिर" "महामंदिर" अथवा "गुरुद्वार" म्हणून एक देवालय आहे त्यांत पळून गेला. या मान–मंदिराची परंपरा अशी होती कीं या मंदिराचे परिघाचे आंत कोणीहि गुन्हेगार गेल्यास तो

त्या हद्दींत आहे तोंपर्यंत त्यास गुन्हा माफ असे. बाहेर आल्यास त्यास पकडून कैद करण्यांत येई. ही परंपरा त्या राजाचे घराण्यांत पिढचानुपिढचा चालू होती. आप्पासाहेबास ही माहीत होती म्हणून तो त्या महामंदिरांत लपून बसला. पोलिटिकल एजंट यास आप्पासाहेब तेथें गेल्याबद्दल बातमी लागली व त्यानें मानसिंग राजास सांगून पाठविलें कीं आप्पासाहेबास कैद करून आमचेकडे पाठवा. राजानें एजंटाजवळ मध्यस्थी केली कीं आमची परंपरा मोडूं नका. मी त्याचे सुरक्षितपणाबद्दल जबाबदार आहें व माझे आश्रयास आलेला मनुष्य पकडून देण्यांत माझी अपकीर्ति होईल. त्यामुळें एजंटानें तें कबूल केलें. मानसिगराजानें आप्पासाहेबास सन्मानानें ठेविलें. आप्पासाहेबाची समाधि जोधपुरास या गुरुद्वारासमोर आहे असें समजतें.[१]

**आप्पासाहेबाच्या बायका. १ उमाबाई. २ सावित्रीबाईः—उमाबाई** म्हणून आप्पासाहेबाची बायको होती ती शोकानें जून १८१८ मध्यंच मरण पावली. **सावित्रीबाई** म्हणून दुसरी बायको होती तिला नागपुरचें राज्य खालसा झाल्यावर दरसाल दहा हजारांचें पेन्शन चालू होतें. ती बरेच दिवस जिवंत होती. उमाबाईनें आप्पासाहेबास त्याचे पलायनांत व नंतर बरेंच द्रव्य पुरविलें. सावित्रीबाई ही आप्पासाहेबाचा तपास लागल्या-नंतरहि त्याचेकडे गेली नाहीं. ती नागपुरासच मरण पावली.

**आप्पासाहेबाचे तोतयेः**— सदाशिवराव भाऊच्या तोतयांप्रमाणें आप्पा-साहेबाचेहि कांहीं तोतये निघाले. इ. स. १८४१ च्या आक्टोबर महिन्यांत एका तोतयानें वऱ्हाडांत व निजामाचे राज्यांत कांहीं सैन्य जमविलें व वर्धेच्या कांठापर्यंत पुंडाई चालविली. **बुऱ्हानी**साहेब म्हणून त्याचा एक कारभारी होता. या मंडळीचा विचार चंद्रपुरास जाऊन तेथें ठाणें बसवून नंतर नागपुराकडे जाण्याचा होता. हैदराबाद कंटिजंट फौजेपैकीं कांहीं सैन्य त्याच्या पाठीशीं होतें व नागपुरच्या सबसीडियरी सैन्यापैकीं ले. क. डॅम-कर यानें वर्धा नदीच्या जवळपास तोतयाच्या सैन्यावर हल्ला केला, परंतु, तोतयाचें सैन्य पळून गेलें. **बुऱ्हानी**साहेब हा **जानस्टन** नांवाच्या हैदरा-

१ भारत इति. सं. मंडळ त्रैमासिक वर्ष ४ अंक १ ते ४ जोधपुरचे मुनशी देवीप्रसाद यांनीं कळविलेली माहिती.

बादच्या अधिकाऱ्याच्या टोळीच्या हल्ल्यांत हातीं सांपडला, परंतु तोतया तेथून पळून गेला.

**रामजी पाटील**:— उमरावतीजवळ **रामजी पाटील** नांवाचा एक गृहस्थ होता. त्यानें या तोतया आप्पासाहेबास फार साह्य केलें. हा पाटील ह्या भागांत साधु म्हणून प्रसिद्ध होता; त्यासहि पकडण्यांत आलें होतें. तोतया हा महादेवाचे डोंगरांत पळून गेला व तेथें पकडला गेला. त्यास हैदराबादेस रेसिडेंटाकडे पाठविण्यांत येऊन त्याची तेथें चौकशी झाली.

**मुगुटराव**:— आप्पासाहेबाचा दुसरा तोतया **मुगुटराव** म्हणून शिंद्याचे राज्यांत निघाला. इ. स. १८४२ मध्यें त्यानें सैन्य जमविलें. एप्रिल महिन्यांत तो अशीरगडाजवळ **धूळकोट** येथील राजाच्या आश्रयानें राहिला. शिंद्याचा सरदार **नाना आपटे** यानें नंतर त्यास काढून दिल्यावर तो निजामाच्या राज्यांत **चारठाणा** येथें गेला. तेथून तो वऱ्हाडांत व निजामाचे राज्यांत लुटालूट करीत राहिला.

अखेरीस शिंद्याचा सरदार **बाबा आपटे** यानें त्यास पकडून गढाकोटचाजवळ इंग्रज सरदार ब्रि. **ट्रेमलो** याचे स्वाधीन केलें. बळवंतराव व नाना कोतवाल म्हणून त्याचे दोघे हस्तक होते, तेहि पकडले गेले. त्यांस इंदुरास रेसिडेंटाकडे पाठविलें.

**राघो भारती**:— इ. स. १८४८–४९ मध्येंहि आप्पासाहेबाचा आणखी एक तोतया निघून त्यानें वऱ्हाडांत व निजामाचे राज्यांत सैन्यभरती केली होती व तो वणीच्या बाजूस बरेच दिवस पुंडावा करीत होता. त्याचें खरें नांव **राघो भारती गोसावी** असें होतें. त्यानें चार हजार सैन्य जमविलें होतें. उमरावतीजवळ त्यानें मोठें सैन्य जमविलें व शहरावर हल्ला करण्याची तयारी केली. शेवटीं हैदराबाद कंटिजंट फौजेचा ब्रि. **ऑन्स्लो** यास त्याचेवर पाठविलें. त्यानें त्याचा पाठलाग करून **कळंब** येथें त्यास गांठलें. परंतु **ऑन्स्लो** हा त्या छाप्यांत घोड्यावरून पडून मरण पावला. ब्रि. **हॅम्टन** यानें हल्ला करून तोतयास पकडलें व त्याची मंडळी चारी दिशांस पळून गेली. तोतयास नागपुरास आणून राजाच्या ताब्यांत दिलें व त्यास शिक्षा झाली.

आप्पासाहेबाचे आणखीहि एक दोन तोतये निघाले होते.

एकपक्षीं असें म्हणतां येईल कीं, निजामाप्रमाणें आप्पासाहेबानें ही परिस्थिति ओळखून नाइलाज म्हणून पुढें इंग्रजांशीं विरोध न करतां शांततेनें रहावयास पाहिजे होतें. असें तो करता तर हल्लींच्या निजाम, शिंदे, होळकर, गायकवाड याप्रमाणें तोहि मांडलिक बाहुलें या नात्यानें पुढें राहता. परंतु ही परतंत्र स्थिति त्याचे मानी स्वभावास आवडली नाहीं असें म्हणावें तर शौर्य व धडाडी दाखवून एक तर जय मिळवावा नाहीं, तर लढाईंत मरून जावें ही क्षात्रवृत्तिहि त्यानें दाखविली नाहीं. तसेंच बाजीरावाप्रमाणें पेनशन घेऊन न राहतां दोन लक्ष रुपयांचें पेनशन सोडून अज्ञातवास पत्करला ही गोष्टहि त्याचा थोडासा बाणेदारपणा दाखविते.

**आप्पासाहेबाविरुद्ध रेसिडेंटाचे आरोपः—** रेसिडेंटानें पुढील आरोप आप्पासाहेबावर ठेवले होते.

१ आप्पासाहेबानें गोंड वगैरे डोंगरांतल्या लोकांस इंग्रजांविरुद्ध चिथावून त्यांचें सामानसुमान व सामुग्री जातांना ती रस्त्यानें लुटविली.

२ चौरागड, मंडला व धामोनी येथील किल्लेदारांना वरपंगीं जरी किल्ले ताब्यांत देण्याचे हुकूम दिले तरी आंतून कळविलें कीं किल्ले ताब्यांत देऊं नका. त्याप्रमाणें किल्लेदारांनीं शांतपणें किल्ले ताब्यांत न देतां ते लढविले व त्यामुळें मार्च, एप्रिल व मे महिन्यांत इंग्रजांना ते किल्ले लढून घ्यावे लागले.

३ आप्पासाहेबानें बाजीराव पेशव्याकडे माणसें पाठवून सैन्याची मदत मागितली व चंद्रपुरचे किल्लेदारास माणसें जमविण्यास हुकूम केला.

४. नागपुराहून निसटून चांद्यास जाऊन स्वतंत्रपणें राहण्याचा आप्पासाहेबाचा विचार कायम झाला होता.

५. परसोजी भोंसल्यास आप्पासाहेबानें मारविलें ही गोष्ट यावेळीं उघडकीस आली.

रेसिडेंटानें या आरोपांबद्दल " आपली खात्री करून घेतली, " असें याच्या रिपोर्टांत म्हटलें आहे. रेसिडेंटास त्यावेळीं काय लेखी अगर तोंडी

पुरावा उपलब्ध झाला होता हें समजण्यास मार्ग नाहीं. परंतु आप्पासाहेबास धरल्यानंतर त्यानें व त्याचा कारभारी **नागो पंडित** यानें हे सर्व आरोप कबूल केले असें रेसिडेंट **जेंकिन्स** याच्या रिपोर्टांत म्हटलें आहे.

वरील आरोपांपैकीं बराचसा खरा वाटण्याजोगा आरोप म्हणजे आप्पासाहेबाचें बाजीराव पेशव्याशीं सूत असणें हा; दोघेहि समदुःखी व सारख्याच अडचणींत सांपडलेले. दोघेहि एकाच मराठी राज्याचे घटक. इंग्रजांच्या कचाटयांतून सुटण्याची दोघांचीहि इच्छा व दोघेहि सबसीडियरी भुतानें हीनबल झालेले. यामुळें दोघांचाहि एकमेकांकडे ओढा असणें स्वाभाविक होतें. आप्पासाहेबाचें बाजीरावास गेलेलें एक पत्र पुण्याचा रेसिडेंट एल्फिन्स्टन यानें धरून नागपुरच्या रेसिडेंटाकडे पाठविलें होतें, तेंहि तीच गोष्ट दाखवितें. इंग्रज लोकांनीं जो अंदाज बांधला तो एकंदर परिस्थितीवरून व स्वसंरक्षणाच्या दृष्टीनें बाजीराव व आप्पासाहेब हे एक होणें त्यांना संभवनीय वाटलें. शिवाय बाजीराव हा पुण्याहून पळत निघाला असतां तो वऱ्हाड व चंद्रपुरच्या रोखानें आला होता. म्हणून वरील गोष्ट पूर्ण संभवनीय वाटण्याजोगी होती. या बाबतींत बाजीराव व आप्पासाहेब यांचा कांहीं बेत ठरला असावा व सूत्रहि असावें हें खरें दिसतें. परसोजीस आप्पासाहेबानें मारविलें हा आरोप बराच डळमळीत आहे व त्याला खात्रीलायक पुरावा नाहीं. कदाचित् ती गोष्ट खरीहि असेल, परंतु इंग्रजांनीं त्यावेळीं मात्र या आरोपाबद्दल अवाक्षरहि काढलें नव्हतें व आप्पासाहेब इंग्रजांच्या विरुद्ध उलटल्यानंतरच प्रथम हा आरोप पुढें आला ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

**बाजीराव पेशव्याचें पांढरकवडयास आगमनः**— याच संबंधांत बाजीरावाचा चंद्रपुराकडे येण्याचाहि धागादोरा होता, तो सांगणें जरूर आहे. बाजीराव पेशवा, पाठीमागें इंग्रजी लष्कर लागल्यामुळें, पळत वऱ्हाडच्या दक्षिण सरहद्दीवरून **गणपतराव** सुभेदारासह पांढरकवडयावर आला. आप्पासाहेबाचा बेतहि चांद्यास जाण्याचा होता अशी रेसिडेंटास नक्की बातमी लागली होती. चांद्याजवळ दोघांनीं मिळून तेथील तटबंदींत आपलें ठाणें देऊन तेथून पुढील बेत ठरवावेत असा त्यांचा इरादा होता.

परंतु त्यापूर्वींच तारीख १५–३–१८ रोजीं आप्पासाहेबास कैद केल्यामुळें चंद्रपुरास जाऊन कांहीं उपयोग नव्हता. बाजीराव चांद्याचे रोखानें येत आहे हें समजतांच रेसिडेंटानें कर्नल **स्कॉट** यास नागपुराहून पाठविलें व बाजीरावास चांद्याकडे येऊं न देतां मध्येंच अडविण्यास सांगितलें. बाजीरावाची आघाडी फौज ता. २ एप्रिल रोजीं चंद्रपुरच्या रोखानें वर्धा नदीवर आली, परंतु स्कॉट यानें त्यांना तेथेंच अडविलें. तेथें शिवणी या गांवाजवळ बाजीरावाच्या सैन्याची इंग्रजी सैन्याशीं लढाई होऊन बाजीरावाचे सैन्याचा पराभव झाला. **पांढरकवड्याचे** जवळ बाजीरावाचा मुक्काम असतां एका दैवी आपत्तीनेंहि त्याच्या सैन्यास ग्रासलें. त्याच्या सैन्यावर एकाएकीं जोराचा **गारांचा** पाऊस पडून पुष्कळ लोक मेले व दुखावले. कैक थंडीनें कांकडले. वस्त्रें नाहींत, जागा नाहीं अशी स्थिति झाली. पाऊसहि मनस्वी झाला. म्हणून सुरक्षित ठिकाणीं जाण्याकरितां तळ हलविला तर एके ठिकाणीं नदीच्या पुरांत कांहीं सैन्य वाहून गेलें.[१]

बाजीरावाचे मागें जालना व पुण्याहून **डव्हटन** व **स्मिथ** हे दोघेहि निरनिराळ्या रस्त्यांनीं येत होते. नागपुराहून **स्कॉट** हा वर्धा नदीच्या पूर्वतीरावरून दक्षिणेस येऊं लागला. तो येण्यापूर्वींच बाजीराव चंद्रपुरास जाता तर त्यास किल्ल्याचा आश्रय मिळाला असता. परंतु तो वर्धेच्या पश्चिम तीरावरच वणीचे आसपास घुटमळला व नंतर माहूर–पट्टींत जाऊन

---

१ प्रभाकराच्या पोवाड्यांत या गोष्टीचें वर्णन केलें आहे तें असें:—

पांढरकवड्यावरी रिचविल्या, घनगारा अद्भुत ।
थंडीनें मेले लोक, उठविलें गारपगाऱ्यानें भूत ॥
बेफाम होतें लष्कर, नव्हती कांहीं वार्ता संभूत ।
(चाल) ओढवले कसें सर्वांचें या समयीं संचीत ॥
अनुचीत घडली गोष्ट दिसेना ठाव लपायाला ।
कोणे ठिकाणीं नदीत लागलें सैन्य बुडायाला ॥

प्रभाकर बाजी. पोवाडा.

आक्वर्थ व शालिग्राम पोवाडे. केळकर पा. ४०१. पेशवे बखर पान १९०. हा पाऊस इंग्रजांनीं गारपगाऱ्यास पैसे देऊन पाडविला अशीहि मराठ्यांची समजूत झाली होती.

**एदलाबाद**[१] येथें राहिला. तिकडे दाट झाडी असल्यामुळें त्यास कांहीं दिवस सुरक्षितपणें राहतां आलें.

**स्कॉट** याचें सैन्य थोडें असल्यामुळें त्यास चंद्रपुरास वेढा देणें शक्य नव्हतें. म्हणून तो बाजीरावानें चंद्रपुराकडे जाऊं नये व त्यास अडवावें या धोरणानें त्याचे रोखावर राहिला. **आडाम्स** हाहि ता. ५ एप्रिल रोजीं नागपुरास जाऊन ता. ९ ला **हिंगणघाट** येथें आला व तेथें त्यानें **स्कॉट** यास चांद्याकडून परत बोलावून घेतलें.

बाजीरावाचें इतस्ततः पांगलेलें सर्व सैन्य एदलाबादेस जमा झालें. त्याचा जमाव वीस हजारांपर्यंत झाला. **गणपतराव** सुभेदार हा नागपुराहून नागपुरचें लष्कर घेऊन पळाला होता, तोहि त्याचेबरोबर होता. त्यांनीं आतां चंद्रपुरचा नाद सोडला, कारण आप्पासाहेबाच्या मदतीची त्यांना आशा राहिली नाहीं व इंग्रजी सैन्य नागपुराहून व मागाहून येत असल्यामुळें चंद्रपुरास आपण कोंडले जाऊं अशी त्यांना भीति पडली. **डव्हटन** हा कारंजा, माहूर या मार्गानें **पांढरकवडयास** आला व ता. १७–१८ एप्रिल रोजीं त्यानें आपली सर्व तयारी केली. बाजीरावाचे मागें **डव्हटन** व **स्मिथ** हे पुन्हां लागले. बाजीराव त्यांस झुकांडया देत देत पश्चिमेकडून उत्तरेकडेस ब-हाणपुरच्या रोखानें निघाला. त्याचा बेत अशीरगडच्या किल्ल्यांत जाऊन आश्रय घेण्याचा होता.

**चंद्रपुरचा वेढा १३ ते २० मे १८१८:—शिवणी** येथें बाजीरावाचें सैन्य मागें हटून बाजीराव पश्चिमेकडे गेल्यामुळें **आडाम्स** यानें चांदा सर करण्याचें ठरविलें व तिकडे आपला मोर्चा फिरविला. हिंगणघाट येथें फौजा व तोफा वगैरे जमा करून तो **चांदा** येथें ता. ९ मे रोजीं आला. चांदा शहरास मजबूत तटबंदी असून ती १५ पासून २० फूट उंच व सहा मैल परिघाची होती. आंत बाले किल्ला म्हणून दुसरा किल्ला होता. त्यावेळीं नागपुरच्या बरोबरीनें चंद्रपुरचें महत्त्व होतें व शहराची वस्तीहि तशीच मोठी होती.

ता. १३ मेपासून इंग्रजी लष्करानें भोंवतालच्या टेकडया व सोइस्कर

---

१ निजामाचे राज्यांत.

जागा पाहून तोफांचे मोर्चे बांधले व शहरावर मारा सुरू केला. तोंपर्यंत तटाचे आंतून आंतील लष्कराचाहि बाहेर तोफांचा मारा चालू होता.

कांहीं दिवस टेहळणी केल्यानंतर आग्नेयेकडील तटाची बाजू तोफांचे माऱ्यास बरी आहे असें इंग्रज अधिकाऱ्यांनीं ठरविलें व त्या जागेवर ता. १७ रोजीं सुमारें ४०० यार्डांवरून तोफांचा मारा सुरू केला, परंतु भिंत पडेना. शेवटीं ता. १८ रोजीं रात्रीं भिंतीपासून २५० यार्डांचे अंतरावर १८ पौंडाचें मोठे तोफांचा मोर्चा बांधला. रात्रींहि तटावरून गोळे येऊन मोर्चे बांधणारांपैकीं कांहीं लोक मेले. परंतु ता. १९ रोजीं सकाळीं या मोठ्या तोफांचा मारा सुरू होतांच तट ढासळूं लागला व दुपारीं ४ वाजतां तटास भगदाड पडलें. हल्ला एकदम करावयाचा परंतु हल्ल्याची पूर्ण तयारी नसल्यामुळें दुसरे दिवशीं सकाळीं हल्ला करून शहरांत शिरण्याचें ठरविलें. रात्रभर फुटलेल्या तटावर तोफा व बंदुकांचा मारा चालूच राहिला; कारण रात्रीं भिंतीची दुरुस्ती झाली असती.

**चंद्रपुर पडलें**:— ता. ३० रोजीं सकाळीं या पडलेल्या तटबंदींतून लष्कराचा हल्ला सुरू झाला. हें बिकट काम नागपूरच्या सबसीडियरी सैन्याचा सरदार **स्कॉट** यानेंच अंगावर घेतलें. प्रथम पडलेल्या तटाचे जागेवर अर्धा तास तोफांचा मारा केल्यामुळें तिकडून उलट मारा येणें बंद झालें व इंग्रजी लष्करास तटापर्यंत बिनहरकत जातां आलें. **स्कॉट** आपल्या लष्करासह शहरांत शिरला व भगदाडाजवळ रक्षणाकरितां त्यानें इंग्रजी पाहारा ठेवला. तसेंच शहरांतून बाहेर जाण्याचे रस्तेहि बाहेरून इंग्रजी सैन्यानें रोखून ठेवले. शहराचे आंत इंग्रजी लष्कर शिरतांच प्रत्येक रस्त्यावर चकमकी सुरू झाल्या. आंतील शिबंदी तटाचे भिंतीवरून आंतील इंग्रजी लष्करावर बंदुकांचा मारा करूं लागली व उलट इंग्रजी शिपाईहि त्यांचेवर बंदुका झाडूं लागले. बाहेरून इंग्रजी लष्करास वारंवार मदत येतच होती परंतु आंतील मराठ्यांच्या शिबंदीस मात्र बाहेरचा आधार नव्हता. किल्लेदार **गंगासिंग** हा निकरानें लढून जखमी होऊन पडला[१] व इतरहि

१ जखमी झाल्यावर त्यानें विषप्राशन केलें. कारण आपणास कैद केल्यावर इंग्रज काय शिक्षा करतील याची त्याला भीति वाटली. Prinsep vol. II

२०० शिपाई गतप्राण झाले. उरले ते वाट सांपडेल तसतसे बाहेर झाडींत पळून गेले. जातांनाहि त्यांपैकीं कांहीं मारले गेले व १०० शिपाई कैद झाले. तेथील गोंड राजाहि बाहेर पळून गेला. त्याचे वाड्यांत पुष्कळ मालमत्ता सांपडली. तसेंच कांहीं दिवसांनीं जमिनींत पुरलेले नऊ लक्ष रुपये सांपडले. ते पुढें गव्हर्नर जनरलच्या हुकुमानें इंग्रजी लष्करास लुटीचा हिस्सा म्हणून वांटून दिले.

**बाजीराव मालकम याचे स्वाधीन झाला ३–६–१८१८ इ.**:–बाजीराव अशीरगडाकडे पळाल्यानंतर त्यास चोहोंकडून इंग्रजी सैन्यानें कोंडल्यामुळें तो अशीरगडच्या किल्ल्याच्या आश्रयास गेला. परंतु शिंद्याच्या किल्लेदारानें त्यास आंत घेतलें नाही. कारण इंग्रजांच्या ताब्यांत किल्ला देण्याबद्दल शिंद्याचा हुकूम इंग्रजांजवळ होता. खुद्द बाजीरावाचा भाऊ **चिमणाजी आप्पा** व **आप्पा देसाई निपाणकर** हे परिवारासह बाजीरावास सोडून गेले होते. जिव्हाळ्याचें कोणी राहिलें नाहीं. अशा स्थितींत **मालकम** साहेबानें त्याचेशीं संधान लावलें व बाजीरावानें त्याच्या शर्ती कबूल केल्या व तो ता. ३–६–१८१८ रोजीं अशीरगडाजवळ **खैरीघाटाचे** पायथ्याशीं मालकम साहेबाच्या स्वाधीन झाला. पुण्यास थोडीशी जहागीर तरी देऊन ठेवा असा बाजीरावानें फार आग्रह धरला. परंतु मालकमनें तें न ऐकतां काशी अगर प्रयागास राहण्यास सांगितलें. परंतु बाजीरावानें कानपुराजवळील **ब्रह्मावर्त** हें गांव पसंत केलें. त्यास दिलेलें ८ लक्षांचें पेन्शन फार झालें अशी इतर इंग्रज अधिकाऱ्यांनीं कुरकुर केली. परंतु त्यापूर्वी त्याचा भाऊ **अमृतराव** यास ८ लक्ष रुपयांचें पेन्शन दिलें होतें; त्यामुळें व पुढील त्रास वाचविण्याकरितां **मालकम** यानें तें कबूल केलें. जें सैन्य राहिलें तें भाडोत्री अरब वगैरे मुसलमान व परदेशी, निव्वळ पैशाकरितां जमलेलें, त्यांना देण्यास जवळ पैसा नसल्यामुळें त्यांनीं त्यास अडवून धाक घातला. अशा स्थितींत आपणास हे आपलेच शिपाई जिवंत सोडतात कीं नाहीं असा त्यास धाक पडला व बाजीरावानें जवळच तळ पडलेल्या **मालकम** साहेबास निरोप पाठविला कीं, यांचे हातून माझा जीव वांचवा. तेव्हां **मालकम** यानें आपलें सैन्य पाठवून व बाजीरावाच्या सैन्यास तुमची बाकी आम्ही देऊं अशी हमी घेऊन बाजीरावास आपले तळांत

आणलें. तेव्हां बाजीरावाचा जीव खालीं पडला व त्यानें **मालकमनें** सांगितलेल्या सर्व शर्ती कबूल करून सर्व राज्य सोडल्याबद्दल सही करून दिली ( ता. ३-६-१८१८ ).

**बाजीराव व आप्पासाहेब यांचें साम्यः**—बाजीराव व आप्पासाहेब यांचें बहुतेक गुणांत साम्य आहे. दोघेहि भित्रे, रणभीरु, चंचल स्वभावाचे, असत्यवचनी, स्वपरबलाबल न ओळखणारे असे होते. स्वार्थाकरितां दोघांनींहि विचार न करितां सबसीडियरी तह करून इंग्रजी लष्कर छाती-वर घेऊन आपलें स्वातंत्र्य गमावलें व नंतर रेसिडेंटाचा ससेमिरा रोज पाठीस व सबसीडियरी सैन्याचा तोफखाना समोर रोंखलेला, ही स्थिति सहन न झाल्यामुळें शिंदे, होळकर, भोंसले व पेशवे यांची एक जूट करून मराठी स्वराज्य पुन्हां स्थापण्याच्या दुर्घट उद्योगास दोघेहि लागले. त्यांतहि उच्च हेतु कितपत असेल हीहि शंकाच. दोघांसहि प्रजा अगर मुत्सद्दी अनुकूल नव्हते व एकनिष्ठ सेवकहि नव्हते. धिटाईनें व चिकाटीनें लढाई करून आत्मयज्ञ करण्यांतहि जे गुण व हेतु लागतात ते नसल्यामुळें त्यांच्या नाशाबद्दलहि कोणास वाईट वाटलें नाहीं. आपलें स्वकीयांचें राज्य गेलें याबद्दल सर्वसाधारणपणें जो सर्वांस विषाद वाटला त्यापलीकडे त्या दुःखाची अगर संतापाची मजल गेली नाहीं.

बाजीराव व आप्पासाहेब यांच्याबद्दल त्यावेळीं गव्हर्नर जनरल मार्क्विस ऑफ **हेस्टिंग्ज** यास जे रिपोर्ट गेले त्यांवरून त्यानें जी माहिती लिहून ठेविली ती खालीलप्रमाणें आहे.

" ता. २९ एप्रिल सन १८१८—ले. क. **आडाम्स** यानें बाजीरावावर जोराचा आघात केल्याची खुषखबर समजली. बाजीरावाची आपल्या राज्यांत पिछेहाट झाली तेव्हां नागपुरच्या राजानें गुप्तपणें निरोप पाठवून त्यास नागपुरास बोलावलें. कारण त्याच्या अंदाजाप्रमाणें नागपुरास इंग्रजी सैन्य थोडें होतें व राजाचें सर्व सैन्य बाजीरावाच्या पक्षास मिळेल असा त्यानें भरंवसा दिला. सदरहू पत्रव्यवहार नशीबानें आमचे हातीं सांपडला. राजास व त्याचे मुत्सद्यांस कैद करण्यांत आलें. कैद केल्यावर वरील मुत्सद्यांना समजलें कीं, सर्व मुद्देमाल आमच्या हातीं लागला आहे. तेव्हां

त्यांनीं रेसिडेंटाजवळ सर्व गोष्टी कबूल केल्या व राजाचे तोंडावर त्यास सांगितलें कीं, ‘ आम्ही मना करीत असतां तुम्हीं आग्रहानें आम्हांस ह्या गोष्टी करावयास लावल्या ’ आप्पासाहेबानें उत्तर दिलें कीं, ‘ आमचा मालक जो पेशवा त्याशीं इमान ठेवून त्याच्या उपयोगी पडणें हें माझें कर्तव्यच होतें व आतां जो प्रसंग आला आहे त्यास सादर राहणें भाग आहे.’ दिलेल्या वचनांपेक्षां ज्या अर्थीं वरील गोष्टीचें जास्त महत्त्व आप्पासाहेबास वाटलें त्या अर्थीं ही सुदैवाचीच गोष्ट आहे कीं मराठी राज्याचा नाश करणें आम्हांस भाग पडलें. बाजीराव वर्धा नदीपर्यंत आल्यावर त्याला आप्पासाहेबास कैद करून गादीवरून काढल्याचें वर्तमान समजलें. बाजीरावानें तेथेंच मुक्काम केला. कारण त्यानें शिंद्याकडे वकील पाठविले होते. तिकडील जबाब यावयाचा होता. तितक्यांत दक्षिणेकडून हैदराबादेच्या इंग्रज सैन्यासह ज. डव्हटन जवळ आल्यामुळें त्याला उत्तरेकडील रस्ता धरणें भाग पडलें. परंतु तितक्यांत **आडाम्स** हा त्याच्या समोर आडवा आला. आडाम्सचें पायदळ हें घोडदळाबरोबर ३४ मैलांची मजल मारूं शकलें नाहीं त्यामुळें मागें राहिलें. परंतु त्याच्या घोडेस्वारांनीं व तोफखान्यानें मराठी लष्करांत धुमाकूळ माजवून दिला. शत्रूचे ४०० लोक पडले आणि पांच पितळी तोफा हातीं पडल्या. मूळचा रस्ता सोडणें भाग पडल्यामुळें व लष्कराच्या घोटाळ्यामुळें डव्हटन हा बाजीरावाच्या सैन्यास लवकरच गांठील असें वाटतें व तसें झालें म्हणजे आडाम्सच्या थकलेल्या घोडदळानें जें काम नाइलाजानें अपुरें ठेवलें तें डव्हटनचें लष्कर पूर्ण करील. ”[१]

**नागपुर राज्यांतील फितुरी, पक्षभेद वगैरे**:— आप्पासाहेबाच्या लष्करांत व मुत्सद्दी मंडळींत फितुरी होती व आंतून बरेचसे सरदार व मुत्सद्दी इंग्रजांना अनुकूल होते असा लोकप्रवाद पूर्वीपासून ऐकूं येतो. या लोकप्रवादाबद्दल लेखी दाखले पोवाडे, बखरी वगैरेंमधून क्वचित् आढळतात.

प्रथम **बांकाबाई** व तिचे पक्षाची मंडळी ही पहिलेपासून आप्पासाहेबाविरुद्ध व इंग्रजाना अनुकूल अशी होती. **गुजाबादादा गुजर, धर्माजी भोंसला** व **नरोबा चिटणीस** हे बांकाबाईच्या पक्षास असत. **सिद्दीक**

---

१ Private journal of M. Hastings. P. 258–59.

**अलीखान** याचें व आप्पासाहेबाचें वांकडें असून तोहि इंग्रजांच्या बाजूचा होता. वकील व मुत्सद्यांपैकीं **यशवंतराव रामचंद्र, नारायणराव पंडितजी** व नागोपंत[१] हे तर इंग्रजांकडून पेनशन खाऊन त्यांची चाकरी भोंसल्यांच्या दरबारांत बजावीत असत. त्यावेळचा गव्हर्नर मार्क्विस ऑफ हेस्टिंग्ज हा आपल्या खाजगी डायरीत यासंबंधानें लिहितो कीं, "या कामांत [२] आम्हास पैशाचा बराच उपयोग करावा लागला. तेव्हां मार्गांतल्या बऱ्याच अडचणी दूर झाल्या." ही गोष्ट वरील उदाहरणांवरून पटते. याशिवाय इंग्रजांचा पैशाचा मारा कोणाकोणावर झाला होता तें उघडकीस आलें नाहीं.

यशवंतराव रामचंद्र यास काशीस राहण्याकरितां एक चांगलें घर घेऊन देण्याबद्दल नागपुरच्या रेसिडटाकडून बनारसच्या इंग्रज अधिकाऱ्यांस पत्रें गेल्याचाहि एक दाखला आहे.[३]

याप्रमाणें पैशाचा मारा इंग्रजांकडून चालू असतां निवळ स्वार्थाकडे पाहणाऱ्या सर्व मुत्सद्दी व अधिकारी मंडळींत फितुरी झाल्यामुळें कोणीहि मन लावून काम करीत नसे हें उघड दिसतें. सीताबर्डीच्या टेकडीच्या लढाईंत व शुक्रवार दरवाज्याजवळील लढाईंत **मनभट** व त्याचे अरब यांनींच काय ती इमानेंइतबारें कामगिरी केली. ता. १६–१२ च्या शुक्रवार तळ्याजवळील हल्ल्यांत व ता. २४–१२ च्या सवकरदऱ्याच्या मैदानावरील लढाईत **गणपतराव सुभेदार** व **रामचन्द्र वाघ** यांनींच मनापासून युद्ध केलें व शेवटपर्यंत इंग्रजांस शरण न जातां त्यांनीं आपणावर संकट ओढवून घेतलें. पण हेच **गणपतराव** सुभेदार व **रामचंद्र वाघ** ता. २६–२७ नोव्हेंबरच्या सीताबर्डीच्या लढाईंत मनापासून लढले असते तर सीताबर्डीचा परिणाम कदाचित् तात्पुरता तरी निराळाच झाला असता.

---

१ नागोपंत पुढें आप्पासाहेबास मदत करूं लागल्यामुळें रेसिडेंटाच्या मनांतून उतरला व पुढें त्यास आप्पासाहेबाबरोबर कैद केलें.

२ Private journal of the Marquess of Hastings. Pamini office edition P. 254

३ नागपुरच्या सेक्रेटरीएट रेकॉर्डमधील कागदपत्र.

**मनभट व बांकाबाईवरील आरोपः– मनभट** व बांकाबाई यांनीं नागपुरचें राज्य बुडविलें असा एक लोकप्रवाद त्यावेळीं व अद्याप ऐकूं येत आहे. मनभटाचें नांव एवढें दूषित कां झालें हें समजत नाहीं. वास्तविक मनभटाच्या अंकित असलेल्या अरबांनींच शेवटपर्यंत लढाई केली. व पगार तुबला तेव्हां त्यालाच धरलें. इंग्रजांकडून लांच खाल्ल्याचाहि पुरावा त्याचेविरुद्ध दिसत नाहीं.

आप्पासाहेबानें रेसिडेंटाच्या ताब्यांत जावें कीं न जावें याबद्दल त्यावेळीं भवति न भवति झाली. त्यांत मनभट, रामचंद्र वाघ, गणपतराव वगैरे बऱ्याचशा मंडळींचें मत आप्पासाहेबानें रेसिडेंटाच्या स्वाधीन होऊं नये असें होतें. परंतु रेसिडेंटाचा वकील विनायकराव औरंगाबादकर यानें स्वतः हमी घेऊन व शपथ देऊन त्यास रेसिडेन्सींत येण्याची सल्ला दिली व तेथें नेलें व आप्पासाहेब जेंकिन्स रेसिडेंट याचे स्वाधीन झाला. त्यावरून " ब्राम्हणानें क्रिया करून भरंवसा देऊन नेलें व तेथें आप्पासाहेबास कैद केलें. " असा एक प्रवाद ऐकूं येतो. यापैकीं मुख्य गोष्ट खरी ही आहे कीं रेसिडेंटानें अप्पासाहेबाच्या सैन्याचा पराभव केल्यानंतर विनायकरावाबरोबर निरोप पाठविला कीं अद्यापहि तुम्ही येऊन आमचे स्वाधीन व्हाल तर थोडासा सैन्याचे खर्चापुरता मुलूख कापून घेऊन मुख्य राज्य व गादी तुम्हास कायम ठेवूं. असें न कराल तर मात्र सर्व राज्य खालसा करून तुम्हास पदच्युत करूं. विनायकरावानें जाऊन याप्रमाणें आप्पासाहेबास सांगितलें व सर्व राज्य गमावण्यापेक्षां रेसिडेंटावर विश्वास ठेवून राज्य कायम ठेवणें बरें अशीहि सल्ला दिली व जेंकिन्स यानें विनायकरावास भरंवसा दिल्यावरून आप्पासाहेबाच्या जिवास धोका येणार नाहीं व राज्य खालसा होणार नाहीं अशी शपथपुरःसर क्रिया केली व त्यावरून आप्पासाहेब रेसिडेंसींत गेला व गव्हर्नर जनरल जें करतील तें मान्य करीन असें त्यानें जेंकिन्स यांस लिहून दिलें. त्या वचनाप्रमाणें पुढें बरोबर वर्तणूक झाली आणि यामुळें कोणाकडूनच वचनभंग झाला नाहीं.

परंतु या गोष्टींतहि अप्रामाणिकपणाचा अगर फसवेगिरीचा दोष विनायकरावावरसुद्धां येत नाहीं. विनायकराव हा आप्पासाहेबाचा नौकर

नसून रेसिडेंटाचा नौकर होता. त्यामुळें धन्याशीं बेमानी केल्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. त्यावेळीं परिस्थिति अशी होती कीं, इंग्रजांचें सर्व सैन्य नागपुरास जमलेलें होतें व मराठे सैन्याचा मोड झाला होता व त्यांना यश येण्याचा संभव नव्हता. असें झालें म्हणजे खरोखरच राज्य खालसा होण्याची भीति होती. म्हणून जेंकिन्सनें विनायकरावास पक्का शब्द दिला. त्याच्या भरंवशावर त्यानेंहि इमान प्रमाण केलें व त्याप्रमाणेंच जेंकिन्सहि इमानपूर्वक वागला व त्यानें ग. ज. यास लिहिलें कीः— "आप्पासाहेब जरी बिनशर्त स्वाधीन झाला आहे तरी राज्य कायम राखण्याचें आम्हीं तोंडीं वचन दिलें आहे तेव्हां तें खालसा करूं नये" याच गोष्टीमुळें त्यावेळीं राज्य कायम राहिलें. वास्तविक ग. ज. याचे मनांत राज्य कायम ठेवण्याचें नव्हतें व त्यानें रेसिडेंटानें दिलेल्या वचनाबद्दल आपली नापसंतीहि दर्शविली. परंतु रेसिडेंटानें वचन दिलें एवढ्या गोष्टीवरच त्यावेळीं राज्य कायम ठेवलें. वास्तविक त्यावेळीं आप्पासाहेब गेल्यामुळें त्याचें राज्य बुडालें नसून राज्य कायम राहिल्यानंतर व **आप्पासाहेब परत येऊन गादीवर बसल्यानंतर तीन महिन्यांनीं** निराळ्याच कारणानें त्यास कैद केलें. विनायक आनंदराव हा जरी इंग्रजांच्या बाजूचा होता तरी त्यानें जो सल्ला आप्पासाहेबास दिला तो निव्वळ अप्रामाणिकपणानें दिला व राज्य बुडण्यास त्यानें मदत केली असें म्हणतां येणार नाहीं. पण आश्चर्य हें कीं, वचनभंगाचा व राजास फसवून रेसिडेंसींत नेल्याचा दोष विनायकरावावर आला नसून लोकप्रवादानें तो बिचाऱ्या मनभटावर घातला.

तिसरा आरोप **बांकाबाईवरचा.** ही बाई स्वसंरक्षणार्थ इंग्रजांच्या बाजूस मिळालेली होती व अत्यंत महत्त्वाकांक्षी असल्यामुळें तिला आपले हातीं कारभाराचीं सूत्रें पाहिजे होतीं म्हणून तिचें आप्पासाहेबाशीं वाकडें आलें. शिवाय इंग्रजांच्या भेदनीतीमुळें व रेसिडेंटाच्या गोडगोड भाषणामुळें तिचा इंग्रजांवर विश्वास बसला. तो स. १८५४ मध्यें तिच्या सर्व विनंतीस, अर्जांस व आक्रोशास न जुमानतां इंग्रजांनीं राज्य खालसा केलें व सर्व राजवाड्यांतील संपत्ति जबरीनें नेली तोंपर्यंत कायम होता. परंतु यांतहि तिची जरी प्रथम राजनीतीच्या दृष्टीनें चूक झाली असेल तरी आपलें राज्य बुडावें

अशा फितुरी दृष्टीनें तिनें वरील गोष्टी खास केल्या नाहींत. आप्पासाहेबाविषयींचा तिचा द्वेष अनिवार झाल्यामुळें ती इंग्रजांचे बाजूस मिळाली. उलट भोसल्यांचें नांव व गादी कायम रहावी याकरितां तिनें पुढें जिवापाड श्रम केले हें इतरत्र दिसून येईल. अर्थात् परक्या बलिष्ठ शत्रूस घरांत घेऊन आप्पासाहेबाचा पाडाव करण्याच्या प्रयत्नांत आपलें राज्यच जाईल हें दूरदर्शित्व तिला राहिलें नाहीं. पण बांकाबाईपेक्षां जास्त कर्तृत्ववान् व राजकारणी पुरुषांनीं हेंच पाप केलें आहे. त्याचीं उदाहरणें राघोबादादा व दुसरे बाजीराव पेशवे हीं यापेक्षांहि ठळक आहेत. आप्पासाहेबानें तरी हेंच केलें.

एकंदरींत नागपुरचें राज्य कोणा एका व्यक्तीच्या फितुरीनें गेलें असें नसून हिंदुस्थानच्या इतर संस्थानांप्रमाणेंच समाजाच्या व राज्यकर्त्यांच्या सर्वसाधारण खालावलेल्या नीतिमत्तेमुळें व कर्तव्यशून्यतेमुळें गेलें.

**मनभटाबद्दल मिथ्या लोकप्रवादः**—पण सर्वांत जास्त आश्चर्याची गोष्ट म्हणजे **मनभटावरचा** आरोप ही होय. एका पोवाड्यावरून* लोकांची समज अशी झालेली दिसते कीं " मनभटानेंच आप्पासाहेबास रेसिडेन्सींत जाण्याची सल्ला दिली व त्याप्रमाणें आप्पासाहेब रेसिडेन्सींत गेला व इंग्रजांनीं त्यास पकडून सर्व राज्य त्याचेकडून लिहून घेतलें व याप्रमाणें नागपुरचें राज्य खालसा झालें. " पण यांपैकीं एकहि गोष्ट खरी नाहीं. ता. २७ नोव्हेंबरची सीताबर्डीची लढाई एकट्या **मनभटाचे** अरबांनीं लढविली. ता. १६ डिसेंबरची शहरांतली लढाई एकट्या **मनभटाच्या** अरबांनीं चालविली. **मनभट** हा अरब लोक निघून जाईपर्यंत इंग्रजांशीं लढत होता. अरब निघून गेले तेव्हां त्यास इंग्रजांनीं कैद करून जन्मभर कैदेंत ठेविलें. **मनभट** इंग्रजांस कधींच मिळाला नाहीं. **मनभटानें** आप्पासाहेबास रेसीडेन्सींत जाण्याची सल्लाहि दिली नाहीं. मग वचन तर कोठचें ? विनायक आनंदराव औरंगाबादकराबद्दल अडाणी लोक मनभटच धरून बसले. कांहीं पोवाडे व भाट यांनीं हा गैरसमज आणखी पसरविला. खरी हकीगत त्या वेळच्या इंग्रज लोकांच्या व मराठ्यांच्या लेखांवरून आम्हीं

---

* बापू शाहीर याचा पोवाडा. (पाठक, मुंबई) हा पोवाडा तत्कालीन नसून अलीकडचा आहे.

वर दिल्याप्रमाणें घडली आहे. **मनभट** पूर्ण राजनिष्ठ होता व त्याकरितां त्याला कष्ट सोसून कैदेंत मरावें लागलें. इतर दुर्गुण त्याचे आंगीं असतील पण तो स्वामिद्रोही खास नव्हता.

इतर कांहीं मुत्सद्यांबद्दल मात्र असें म्हणतां येणार नाहीं. नारायण गोपाळ पंडितजी हा इंग्रजांस अनुकूल असावा अशी शंका घेण्यास सबळ कारणें आहेत. इंग्रजांच्या फौजेची फुगवून वाढविलेली माहिती त्यानें आप्पासाहेबास दिली होती व यामुळें रेसिडेन्सीत जाण्यास आप्पासाहेबाचें मन वळण्यास एक कारण झालें. यामुळें आप्पासाहेबाची पंडितजीवरची मर्जी उतरली व तो त्यास आपले समोर येऊं देईना.[१] नारायण पंडितजीस इंग्रजांकडून पूर्वी व नंतरहि पेनशन चालू होतें. बांकाबाईनें इ. स. १८५३ मध्यें राज्य खालसा झाल्यानंतर राज्य कायम राखण्याद्दल जी खटपट केली त्यांत नारायणरावाचा पुत्र माधवराव यानें नेपाळास रॅम्से यास पत्रें दिलीं व आपला एक मनुष्य पाठविला. याबद्दल रेसिडेंटाची व नंतर कमिशनर यांची त्याचेवर फार गैरमर्जी झाली व त्यास कैद करून त्याची चौकशी झाली. पण पुढें त्याचेवरील संशय दूर झाला.

---

## भाग १४ वा

# तिसरा रघूजी व खालसा प्रकरण.

## तिसरा रघूजी भोंसले

**तात्पुरती इंग्रजी व्यवस्था**– सीताबर्डीच्या लढाई नंतर **आप्पासाहेबास** इंग्रजांनी पुन्हां गादीवर बसविलें त्याच वेळेस त्याचेकडून तहांत कबूल करून घेतलें होतें की त्यास गादीवर बसविल्यानंतर मुलकी व लष्करी कारभार इंग्रजांच्या विश्वासाच्या मुत्सद्यांनीं करावा व त्यांनीं रेसिडेंटाच्या सल्ल्याप्रमाणें कारभार करीत जावा. म्हैसूरचें राज्य टिपूच्या लढाईनंतर

[१] Prinsep Vol. II. P. 222, 225.

पूर्वीच्या हिंदु राजाच्या ताब्यांत देतांना इंग्रजांनीं ज्याप्रमाणें प्रथम राज्याचा सर्व कारभार आपल्याकडे घेतला त्याचप्रमाणें नागपुरासहि व्यवस्था करण्याचा त्यांचा विचार होता. म्हैसूरच्या पूर्णय्या दिवाणाप्रमाणेंच एकादा दिवाण नेमून त्याचे हातून सर्व कारभार करावा अशी रेसिडेंटानें प्रथम योजना केली. या कामास योग्य मनुष्य म्हणून रेसिडेंटानें **नारायण गोपाळ पंडितजी** याची निवडणूक केली. हा गृहस्थ रेसिडेंटाच्या पूर्ण विश्वासांतला होता व त्यानें **आप्पासाहेबास** रेसिडेंटाकडे जाण्यास त्याचें मन वळविण्याचे कामीं रेसिडेंटास फार मदत केली होती, परंतु नारायण पंडित हा भित्र्या स्वभावाचा असल्यामुळे व वरील कारणानेच आप्पासाहेबाची त्याचेवर इतराजी झाल्यामुळें त्यानें **नागो त्र्यंबक** यास आपले जोडीस दिल्याशिवाय आपण काम करूं शकणार नाहीं असें रेसिडेंटास सांगितलें. नागो त्र्यंबक हा हिशेबी कामांत फार वाकबगार मनुष्य असून आप्पासाहेबाचे विश्वासांतला व सीताबर्डीचे लढाईपूर्वी नारायण पंडिताचा जोडीदार होता. रेसिडेंटानें शेवटीं नागोपंताकडे मुख्य अधिकार ठेवून नारायण पंडितास त्याचा मदतनीस म्हणून नेमलें. नारायण पंडित व आप्पासाहेब यांचेमध्यें सांध्याप्रमाणें नागोपंतानें वागावें असा रेसिडेंटाचा हेतु होता. याप्रमाणें कांहीं दिवस काम ठीक चाललें होतें. ही व्यवस्था आप्पासाहेबास कैद करीपर्यंत चालू होती.

आप्पासाहेबास कैद केले त्याच वेळेस नागोपंतासहि कैद करून रेसिडेंटानें आप्पासाहेबाबरोबर पाठविलें. त्यानंतर तिसरा रघूजी यास गादीवर बसविण्यांत आलें, परंतु तो अल्पवयी असल्यामुळें कारभार इंग्रजांच्याच हातीं राहिला. नारायण पंडिताविरुद्ध लोकमत फारच होतें व त्यानें आप्पासाहेबाविरुद्ध इंग्रजांस सामील होऊन त्यास फसविलें असा सार्वत्रिक समज झाला होता. त्यामुळें तोहि कंटाळून त्यानें आपल्याकडून कारभार होणार नाहीं असें रेसिडेंटास सांगितलें. त्यामुळें रेसिडेंटानें नवाब **सिद्दिक अलीखान** यास कारभारी नेमिलें. **सिद्दिक अली** याचें आप्पासाहेबाशीं अगदीं वांकडें होतें व आप्पासाहेबाविरुद्ध त्यानें रेसिडेंटास प्रत्यक्ष मदतहि केली होती. त्यामुळें त्याचेवर रेसिडेंटाचा पूर्ण विश्वास होता. म्हणून रेसिडेंटानें त्याची या कामीं निवड केली होती. **सिद्दिक अलीनें** सर्व कारभार रेसि-

डेंटाच्या सल्ल्याप्रमाणें करीत जावा असें ठरलें. परंतु एकट्यावरच हें काम टाकणें योग्य न वाटून रेसिडेंटानें सर्व महत्त्वाच्या जागांवर इंग्रज अधिकारी नेमले. एक इंग्रज अधिकारी राजवाड्याच्या प्रत्यक्ष बंदोबस्ताकरितां नेमिला व त्याचे हातीं शहरचाहि बंदोबस्त ठेविला. एक शहरच्या पोलीसावर मुख्य म्हणून ठेविला व नागपुर शहर इंग्रजी लष्कराच्या ताब्यांत दिलें.

देवगड, चांदा व छत्तीसगड या तीन भागांवर तीन इंग्रज अधिकारी नेमिले. राजाच्या सर्व लष्करावरहि इंग्रज अधिकारीच नेमिले. खजिन्यावरहि मुख्य अधिकारी इंग्रजच नेमिला. परंतु **सिद्दिकअलीचा** कारभार रेसिडेंटास पसंत पडला नाहीं.प्रत्येक कामांतील रेसिडेंटाची ढवळाढवळ सिद्दिक अल्लीला सहन होईना व प्रत्येक गोष्ट तो आपल्यापासून गुप्त ठेवतो अशी रेसिडेंटाची समजूत झाली.

तिसऱ्या रघूजीस गादीवर बसविल्यानंतर रेसिडेंटानें **गुजाबा दादा गुजर** यास काशीहून नागपुरास बोलाविलें ( ता. २–९–१८१८ ). गुजाबा दादा हा **बांकाबाईच्या** पक्षाचा असून बांकाबाईकडे रेसिडेंटानें राजवाड्याची आंतील सर्व व्यवस्था ठेविली होती. म्हणून **बांकाबाई** व **गुजाबादादा** गुजर यांजकडे राजवाड्यांतील सर्व अधिकार रेसिडेंटानें दिला.**गुजाबा दादा** व **सिद्दिक अली** यांचेंहि एकमेकांशीं वांकडें असल्यामुळें त्यांचें एकमेकांशीं पटणें शक्य नव्हतें म्हणून राजवाड्याच्या बाहेरचा सर्व अधिकार रेसिडेंटानें आपल्याकडेस घेतला. आप्पासाहेबाचा इंग्रजांशीं बिघाड झाला तेव्हांपासून **बांकाबाई** ही आप्पासाहेबाविरुद्ध इंग्रजांस मिळाली होती.

वरील सर्व व्यवस्था करून राज्यकारभार आपल्याकडे घेतल्याबद्दल रेसिडेंटानें सर्व प्रांतभर जाहीरनामा काढून प्रसिद्ध केलें. नवीन राजाच्या नांवानेंहि तसाच जाहीरनामा काढला.

तिसऱ्या रघूजीस लिहण्यावाचण्याचें व राज्यकारभाराचें शिक्षण देण्याकरितां रेसिडेंटानें तजवीज केली होती. लिहिणें, वाचणें, हिशेब, फारशी व मराठी या भाषांचें ज्ञान वगैरे गोष्टी त्यास शिकविण्यांत आल्या. परंतु त्या वेळच्या रेसिडेंटाच्या रिपोर्टाप्रमाणें शिकण्याकडे त्याचें विशेष लक्ष नसे.

गुजाबा दादाचा व बांकाबाईचाहि शेवटीं बिघाड झाला व गुजाबा दादानें

( दुसऱ्या ) रघूजीची दुसरी बायको **अंबिकाबाई** इचा पक्ष धरला. ही स्थिति तिसरा **रघूजी** स्वतः कारभार करीपर्यंत चालू होती.

**नाग० च्या गादीवर दत्तक पुत्राची स्थापना : तिसरा रघूजी**— आप्पासाहेबास कैद करून पाठविल्यावर गादीवर कोणास बसवावें हा प्रश्न उभा राहिला. याच वेळेस वास्तविक नागपुरचें राज्य खालसा व्हावयाचें. कारण आप्पासाहेबामागें पहिल्या रघूजी भोंसल्याच्या वंशांत कोणी राहिला नव्हता. परंतु आप्पासाहेबास गादीवरून काढण्याबद्दल इंग्रज रेसिडेंट **जेन्किन्स** व गव्हर्नर जनरल हेस्टिंग्ज यांचा पत्रव्यवहार झाला त्याच वेळीं गव्हर्नर जनरल यानें रघूजीचा मुलीकडील नातू ( दुसऱ्या रघूजीची मुलगी बनूबाई इचा मुलगा ) **बाजीबा** यास गादीवर बसवून आप्पासाहेबास काढावें असें ठरविलें होतें. **बनूबाई** ही **व्यंकटराव** नाना गुजर यास दिली होती. तिचा मुलगा **बाजीबा** उर्फ **बाजीराव** यास **बांकाबाईचे** सल्ल्यानें ता. २५–६–१८१८ रोजीं परसोजीची बायको **दुर्गाबाई** हिच्या मांडीवर देऊन त्याचें नांव **तिसरा रघूजी** ठेविलें व त्यास ता. २६–६–१८१८ रोजीं गादीवर बसविलें. **रघूजी** हा **१०** वर्षांचा असल्यामुळें **बांकाबाई** इनें राजवाड्यांतील कारभार पहावा व दरबारांतील कारभार **गुजाबा दादा गुजर** याच्या सल्ल्यानें चालवावा असें ठरलें. वास्तविक सर्व राज्याचा कारभार इंग्रज रेसिडेंटाच्या हातीं आला. रेसिडेंटानें प्रत्येक खात्यावर इंग्रजी अधिकारी नेमले व लष्कर तर पूर्णपणें त्याच्याच ताब्यांत होतें. **बांकाबाई** ही नांवाची रीजंट राहिली. या व्यवस्थेस गव्हर्नर जनरल याची मंजुरातहि मिळाली व इंग्रजी कारभार सुरू झाला. तो इ. स. १८१८ पासून इ. स. १८२६ **पर्यंत** चालला. **बांकाबाईची** बरेच दिवसांची स्वतः राज्यकारभार करण्याची इच्छा अंशतः तरी तृप्त झाली.

राज्यांतील सर्व अधिकारी रेसिडेंटाचे हाताखालीं असत. त्यानें देवगड, चांदा व छत्तीसगड या तीन जागीं तीन अधिकारी नेमले होते व नागपुरास एक अधिकारी बाकाबाईजवळ ठेवला होता. तो राजवाड्याची व नागपूरचे दरबारची व्यवस्था पहात असे. शिवाय रेसिडेंटानें **बचाराव रघुनाथ** नांवाचा आपल्या तर्फेचा एक मनुष्य राजवाड्यांतहि ठेविला.

पूर्वीचे बहुतेक अधिकारी व राजाचे नातलग हे नौकरीवरून काढून त्यांना पेन्शन दिलें व खर्च बराच कमी केला. लष्कर कमी करून नागपुरास तीन हजार स्वार व चांदा व रतनपुर येथें लष्कराच्या दोन तुकड्या एवढेंच लष्कर राजाच्या खर्चानें ठेविलें. शिवाय इंग्रजांचें सबसीडियरी सैन्य होतेंच. सर्व लष्करावर रेसिडेंटाचे हाताखालीं लष्करी सेक्रेटरी म्हणून एक इंग्रज अधिकारी ठेविला व तो लष्कराची देखरेख व पैशाचा बटवडा करीत असे. तसेंच पोलिसांचा मुख्य अधिकारीहि इंग्रज असून तो प्रांतांतील सर्व पोलिसांवर देखरेख करीत असे. एकंदरींत रीजंट हे नांवाचेच असून सर्व कारभार प्रत्यक्ष रेसिडेंटच करी. पण तो राजाच्या नांवानें करी. नागपुरास सिटीकोर्ट म्हणून एक कोर्ट ठेविलें व त्यावर इंग्रज अधिकारी ठेविला.

या व्यवस्थेनें नागपुरच्या राज्यव्यवस्थेंत एकदम बदल झाला. पूर्वीची अव्यवस्थित पद्धति जाऊन सर्व कामांत व्यवस्थितपणा व नोकरांत कडक शिस्त लागली. खर्च बराच कमी झाला व उत्पन्न वाढलें. राज्यांतील अंदाधुंदी व दंगेधोपे कमी होऊन शांतता नांदली. त्यामुळें ज्या लोकांनीं शेती सोडून दिली होती ते परत येऊन शेती करूं लागले. याप्रमाणें शेतीस उत्तेजन मिळालें. दुसरा रघूजी मेल्यानंतर नागपुरास व राज्यांत सर्वत्र अंदाधुंदी झाली होती त्यामुळें सर्व खजिना रिकामा झाला होता. हळूहळू शिल्लक जास्त राहूं लागली. पूर्वीचें सर्व कर्ज फिटून बरीच मोठी रक्कम खजिन्यांत राहिली. एकंदरीनें या कारभारानें संस्थानी लोकांचा अधिकार जरी गेला तरी नवीन शिस्तीचें वळण लागल्यामुळें राज्याचा व रयतेचा बराच फायदा झाला होता.

**जेंकिन्स** यानें सर्व अधिकार आपलेकडे घेऊन संस्थान खालसा केल्यासारखेंच केलें होतें. इतका अधिकार राज्याच्या अंतर्व्यवस्थेंत इंग्रज सरकारनें चालवावा हें गव्हर्नर जनरल यास पसंत नव्हतें. परंतु रेसिडेंट हा स्थानिक बाबतींत जास्त माहितगार; यामुळें त्यानें ही व्यवस्था रेसिडेंटाचे मर्जीप्रमाणें चालू दिली. निदान कांहीं मुलूख इंग्रजी अमलाखालीं ठेवून बाकीचा राजाच्या अमलाखालीं ठेवावा व त्यास राज्यकारभाराचा अनुभव द्यावा म्हणजे बाकीचा मुलूख त्याच्या ताब्यांत तो सज्ञान झाल्या-

बरोबर दिल्यानंतर त्यास एकदम जड जाणार नाहीं अशी सूचना ग. ज. यानें केली. पण रेसिडेंटानें कसें तरी तें टाळून सर्व राज्याचा कारभार आपणच इ. स. १८२६ पर्यंत चालविला. इ. स. १८२६ मध्यें अल्पवयी राजास १८ वर्षे पूर्ण होऊन तो सज्ञान झाला व त्याचे स्वाधीन सर्व राज्य-कारभार करावा असें गव्हर्नर जनरल यानें ठरविलें. याच वेळीं रेसिडेंट **जेंकिन्स** यानें विलायतेस जाण्याकरितां रजा मागितली; परंतु **जेंकिन्स** हा जुना माहितगार म्हणून राजाशीं नवीन तह करणें, राजाचे हातीं कारभार दिल्यानंतर त्यास तो सुरळीत चालवितां येईल अशा तऱ्हेनें त्यास मदत करण्याकरितां खात्रीचीं व योग्य माणसें त्याच्या कारभारांत नेमून देणें, राज्यांतील नवीन ठेवलेले इंग्रज ऑफिसर कमी करून त्यांचे जागीं कमी पगारांचे हिंदी अधिकारी नेमणें व एकंदरींत कारभार राजाचे हातीं देण्याची सर्व तयारी करणें तें जेंकिन्स यानेंच जुन्या माहितीवरून करणें सोइस्कर होतें म्हणूनच जेंकिन्स यास रजा देण्याचें ग. ज. यानें नाकारलें. नागपुरचें संस्थान व इंग्रज सरकार यांमधील संबंध आप्पासाहेबाशीं ता. ६ जान्युआरी १८१८ इ. रोजीं झालेल्या तात्पुरत्या तहानें ठरलेले होते. हा तह वास्तविक तात्पुरता होता व सर्व कलमें स्पष्ट घालून ग. ज. याच्या मंजुरातीनें दुसरा तह आप्पासाहेबाशीं व्हावयाचा होता. ता. १५-१२-१८१७ चा तहनामा तर जास्तच अस्पष्ट होता व ग. ज. खुषीनें जें देईल तें घेऊन आप्पासाहेबानें रहावें एवढाच त्या तहाचा अर्थ होता. म्हणून नवीन तपशीलवार तहनामा होणें जरूर होतें. लागलीच आप्पासाहेबाची धामधूम झाल्यामुळें व पुढें तिसरा रघूजी अल्पवयी असल्यामुळें हा तहनामा मागें पडला. तो करून घेऊन तिसऱ्या रघूजीच्या स्वाधीन सर्व राज्यकारभार करावा असा ग. ज. याचा इरादा होता. या तहाचा मसुदासुद्धां आप्पासाहेबाच्याच वेळेस तयार झाला होता. त्यांत योग्य ते फेरफार करून नवीन तहनामा करून घेण्याबद्दल व राजा वयांत येण्याचे सुमारास त्याचे ताब्यांत कारभार देण्याबद्दल ग. ज. यानें जेंकिन्स यास लिहिलें. परंतु **जेंकिन्स** यानें ता. ५ एप्रिल १८२६ रोजीं लांबलचक पत्र लिहून कळविलें कीं इतक्यांतच राजाचे हातीं कारभार देऊं नये, कारण त्यास अद्याप राज्यकारभाराचें ज्ञान व अनुभव नाहीं. तसेंच नवीन प्रधान-मंडळ बनविणेंहि बरेंच कठीण आहे असेंहि

त्यानें कळविलें. या व इतर कारणांवरून तूर्त कारभार पूर्वीप्रमाणेंच ब्रिटिश रेसिडेंटामार्फत चालावा अशी त्यानें शिफारस केली. परंतु ग. ज. लॉर्ड **आम्हर्स्ट** यानें कळविलें कीं राजा वयांत आला म्हणजे त्याचे ताब्यांत राज्य देण्याचें पूर्वीच हिंदुस्थान सरकारानें व विलायतचे अधिकाऱ्यांनीं ठरविलें असल्यामुळें आतां त्यांत बदल करणें आपले हातांत नाहीं.

**नागपुरशीं नवीन तह्नामा—जेंकिन्स** यानें ता. ५–८–१८२६ रोजीं नवीन तहाचा मसुदा ग. ज. याजकडे पाठविला व तो मंजूर होऊन आला. ता. १ डिसेंबर १८२६ रोजीं राजाकडून मोठा दरबार भरविण्यांत आला. त्यांत रेसिडेंटानें सदरहू तह्नामा वाचून त्याच्यावर दरबारांतच राजाची सही घेतली. ग. ज. यानें त्यावर ता. १३–१२–२६ रोजीं सही करून तो मंजूर करून परत पाठविला.

या नवीन तहाचीं कलमें येणेंप्रमाणें होतीः—

१ इ. स. १८१६ च्या सबसीडियरी तहाचीं जीं कलमें या तहाशीं विसंगत नाहींत तीं सर्व कबूल आहेत.

२ राजानें साताऱ्च्या राजघराण्याशीं व इतर मराठे संस्थानिकांशीं असलेले संबंध व सेनासाहेबसुभा या पदवीशीं संलग्न असलेले सर्व मानपान सोडून यावे. फक्त सेनासाहेबसुभा हा किताब मात्र ठेवावा.

३ राजानें इंग्रजांच्या मध्यस्थीवांचून इतर संस्थानिकांशीं कांहीं व्यवहार करूं नये व कोणत्याहि परकी संस्थानांत आपले वकील अगर मुखत्यार ठेवूं नये.

४ स. १८१६ च्या तहानें जें सबसीडियरी सैन्य इंग्रजांनीं ठेवलें पाहिजे असें ठरलें होतें त्यांत त्यांनीं वाटल्यास कमती करावें अगर वाढवावें व तें नागपुरच्या राज्यांत वाटेल तेथें ठेवावें.

५ सबसीडियरी सैन्याच्या ७॥ लक्ष रु. खर्चाबद्दल जो मुलूख तोडून देण्याचें आप्पासाहेबानें कबूल केलें होतें तो मुलूख रघूजीनें इंग्रजांस तोडून द्यावा म्हणजे दरसाल ७॥ लक्ष रु. देण्याची व १८१६ च्या तहानें जी ५००० कंटिंजंट फौज ठेवण्याचीहि जबाबदारी राजावर होती

ती ठेवण्याचीहि राजास जरूर नाहीं. याऐवजीं बाकीचें राज्य राजाकडे वंशपरंपरा ठेवण्याची हमी इंग्रज सरकार घेत आहे.

६ वरील कलमांप्रमाणें देण्याचा म्हणून ठरलेल्या मुलुखांत एकमेकांच्या सोईच्या दृष्टीनें कांहीं अदलाबदल केलेले आहेत.

७ राजा वयांत आला आहे म्हणून राज्य त्याचे ताब्यांत दिलें आहे.

८ जमा वसूल करणारी शिबंदी व थोडेंसें दरबारी सैन्य हें खेरीज करून सर्व संस्थानी सैन्य इंग्रज अधिकाऱ्यांचे ताब्यांत ठेवावें व त्याच्या खर्चाची तजवीज राजानें करावी.

९ चांदा, देवगड, वरघाट, लांजी, छत्तिसगड हे जिल्हे व त्याच प्रदेशांतील मांडलिक यांवर अंमल इंग्रजांचा रहावा व या जिल्ह्यांचे खर्च वजा जातां राहील तें उत्पन्न दरसाल १७ लक्ष रुपये इंग्रजांनीं राजास द्यावें. बाकीचा प्रांत व नागपुर यांवर अंमल राजानें करावा. राजाची कारभार करण्याची पात्रता दिसून आल्यानंतर वरील चांदा वगैरे जिल्ह्यांचा कारभारहि त्याचे स्वाधीन करण्यांत येईल. मात्र त्या प्रांतांतील मांडलिक व जमीनदार यांच्याशीं सर्व व्यवहार इंग्रजांचे मार्फतीनेंच होईल.

१० इंग्रज सरकार राज्यकारभाराचे बाबतींत राजास वेळोवेळी जो सल्ला देईल तो राजानें मानावा व राजानें नेमलेले दिवाण इंग्रजांच्या भरंवशाचे असावेत. ते राजास व इंग्रजांस दोघांनाहि जबाबदार राहतील. रयतेशीं पूर्वीं इंग्रज अधिकाऱ्यांनीं जे ठराव केले आहेत ते राजानें पाळले पाहिजेत. निरनिराळे अधिकारी नेमण्याबद्दल, संस्थानाचा व खाजगीचा खर्च ठरविण्याबाबत व प्रांताच्या कायदेकानूबद्दल रेसिडेंट जो सल्ला देईल तो राजानें मान्य केला पाहिजे. खजिना व राज्याचे सर्व हिशेब वाटेल तेव्हां तपासण्याचा अधिकार इंग्रज रेसिडेंटास आहे.

११ इंग्रजांची कोणाशीं लढाई सुरू झाल्यास आपल्या शक्तीप्रमाणें राजानें त्यांना पैशाची मदत करावी. सदरहू रक्कम इंग्रजांनीं ठरवावी.

१२ राज्यकारभार नीट रीतीनें न केल्यास, खर्चापुरती रकम शिल्लक न राहिल्यास, इंग्रजांचा सल्ला न ऐकल्यास सर्व राज्य अगर कांहीं भाग इंग्रजांनीं आपल्या ताब्यांत घ्यावा व आपले अधिकाऱ्यांमार्फत त्याचा कारभार करावा.

१३ वरील कलमांप्रमाणें कांहीं प्रांत इंग्रज सरकारानें आपले ताब्यांत घेतल्यास त्यांनीं जमाखर्चाचा प्रामाणिकपणें हिशेब राजास द्यावा व खर्च वजा जातां राहील त्या उत्पन्नाची निदान ½ रक्कम दरसाल राजास त्याचे हक्काबद्दल म्हणून देत जावी.

१४ सीताबर्डी व इतर मजबूत ठिकाणें अगर किल्ले जे वाटतील ते इंग्रजांनीं ताब्यांत घ्यावे व तेथें वाटेल ती मजबुती करावी.

वरील तहानें जरी राज्यकारभार प्रत्यक्ष राजाचे हातांत आला तरी इंग्रजी अंमल पूर्ण राहिला. रेसिडेंटास राजाचे कामांत ढवळाढवळ करण्याचे इतके अधिकार राहिले कीं एका इंग्रज अधिकाऱ्यानें म्हटल्याप्रमाणें "राजा राज्य करीत नसून रेसिडेंटच आपल्या अधिकाऱ्यांच्या ऐवजीं राजाच्या हातानें राज्य करीत आहे" अशी स्थिति झाली. रेसिडेंटाच्या मर्जीबाहेर एवढेंसें सुद्धां करण्याचा राजास अधिकार राहिला नाहीं.

**जेंकिन्सचें विलायतेस प्रयाण**—हा तह झाल्यानंतर जेंकिन्स याचें नागपुरचें काम पूर्ण झालें व तो ता. २९–१२–१८२६ रोजीं कॅ. हॅमिल्टन यास चार्ज देऊन नागपुराहून मुंबईस जाण्यास निघाला. त्याचे मागून मि. वाइल्डर यानें ता. १२–४–१८२७ रोजीं रेसिडेंटाचे जागेचा चार्ज घेतला.

**जेंकिन्सच्या कारकीर्दीचें सिंहावलोकन**:—जेंकिन्स यानें जवळ जवळ वीस वर्षें नागपुरच्या रेसिडेंटाचें काम केलें व सर्व राज्यांतील उलाढाली याचेच वेळेस झाल्या. इंग्रजांच्या दृष्टीनें यानें फारच हुशारीनें व कर्तबगारीनें नागपुरचा कारभार केला व अत्यंत कठिण प्रसंगीं न डगमगतां धैर्यानें अनेक प्रसंग निभावले. नागपुरच्या संस्थानाशीं वागतांना त्यानें इंग्रजांचें हित जरी डोळ्याआड केलें नाहीं तरी त्यानें आत्यंतिक कठोरपणाहि दाखविला नाहीं. ग. ज. च्या मर्जीविरुद्ध त्यानें आप्पासाहेबास एक दोन वेळां माफी देऊन पुन्हां गादीवर बसविलें. तसेंच आप्पासाहेबास कैद केल्यानंतर

त्यानें राज्य खालसा करण्याचा सल्ला दिला असता तरी चालण्याजोगें होतें. परंतु त्यानें दत्तक देऊन घराण्याचें नांव चालू ठेविलें. **जेंकिन्स** असता तर १८५३–५४ मध्येंहि तो दत्तक घेववून भोंसल्यांचें संस्थान चालविता असें मानण्यास हरकत नाहीं. उलट सर जॉन **मालकम** यानें दुसरे **बाजीरावास** पकडलें तेव्हां राज्य खालसा केल्याशिवाय सोडलें नाहीं. **जेंकिन्स** हा बांध्यानें ठेंगणा व शरीरानें स्थूल होता. राज्यांतील एकूण एक हिंदी मनुष्य त्याच्या ओळखीचा होता व त्याचें नांव " जंकिन साहेब " नागपुरास प्रत्येकाच्या तोंडीं असे.

**तिसऱ्या रघूजीचें लग्न–** तिसरा **रघूजी** ( बापूसाहेब) याचें लग्न ता. २१–५–१८२७ रोजीं शिरक्यांची कन्या **गंगाबाई** इच्याशीं झालें. नंतर लवकरच राज्याचा कारभार रेसिडेंटानें राजाचे स्वाधीन केला व त्यास खिलत ( पोषाख ) दिला. मागील सालीं केलेला तहनामाहि पुन्हां त्याचेकडून मंजूर करून घेतला.

ता. ६–१२–१८२७ रोजीं **वाइल्डर** यानें ग. ज. याजकडे रिपोर्ट पाठविला त्यांत राजाच्या चांगल्या वर्तणुकीबद्दल व होतकरूपणाबद्दल बरीच तारीफ केली आहे. त्यावेळीं खजिन्यांत शिल्लकहि बरीच होती व राज्याचें उत्पन्नहि बरें होतें. राज्यांत पोलीस व सैन्याचा बंदोबस्त चांगला असून सर्वत्र शांतता नांदत होती. ही व्यवस्था राजाचे अमदानींत तशीच चालू राहिली.

**तहांत नवीन फेरफार**–इ.स. १८२९मध्यें ग. ज. लॉर्ड विल्यम **बेंटिंक** यानें रेसिडेंटास नागपुरच्या संबंधान १८२६ सालीं झालेल्या तहांत फेरबदल करण्याचें सुचविलें. राजाचें वर्तन इंग्रजांस अनुकूल असेंच राहिलें व त्याच्या हातांत कारभार दिल्यापासून त्यानें तो उत्तम तऱ्हेनें चालविला. १८२६ च्या तहाचीं कलमें ८ व ९ हीं राजाच्या इभ्रतीस न शोभण्यासारखीं व गैरवाजवी होतीं हें ग. ज. याच्या लक्षांत आलें म्हणून तीं रद्द करून सबसीडियरी सैन्याशिवाय जें कंटिजंट व इतर लष्कर राजानें ठेवण्याचें व जें इंग्रजांच्या ताब्यांत दिलें होतें तें परत राजाच्या ताब्यांत द्यावें, कलम ९मधील चांदा, भंडारा, देवगड व छत्तीसगड वगैरे जिल्हे परत राजाच्या ताब्यांत द्यावे, राजाकडे दिलेले सर्व मुलकी व लष्करी इंग्रज अधिकारी इंग्रजांनीं काढून घ्यावे व राजानें

सबसीडियरी सैन्याकरितां फक्त ८ लक्ष रु. इंग्रजांस द्यावे व सर्व अंतर्व्यवस्था व बंदोबस्त राजानें करावा.

**इ. स. १८२९ चा तहनामा**—याप्रमाणें मागील तहांत दुरुस्ती ग. ज. यानें सुचविली. राजानें वरील शर्ती आनंदानें कबूल केल्या. परंतु इंग्रजांनीं राजास हिंदुस्थानांतील इतर संस्थानिकांच्या दर्जानें व मानानें वागवावें असें सुचविलें. यावर पत्रव्यवहार होऊन ता. २६–१२–१८२९ रोजीं एक सात कलमी तहनामा करण्यांत येऊन त्यावर उभय पक्षांच्या सह्या झाल्या. रेसिडेंट **वाइल्डर** यानें ग. ज. यास सुचविलें कीं चांदा वगैरे प्रांत परत राजाच्या ताब्यांत द्यावयाचा तो अडीच वर्षांनीं द्यावा; कारण या प्रांतांतील जमीनदारांशीं ठराव पांच वर्षांचे केलेले असून ते १८३२ सालीं पुरे व्हावयाचें ठरलें होतें. शिवाय इंग्रजांकडील तैनाती फौज एकदम काढून टाकल्यानें एकदम इतके लोक रिकामे होऊन असंतोष माजेल व अडीच वर्षांनीं राजाची राज्यकारभार करण्याची पात्रताहि जास्त खात्रीलायक कळून येईल, वगैरे कारणें वाइल्डर यानें ग. ज. यास लिहिलीं होतीं. शेवटीं ता. ६ जून १८३० रोजीं हे जिल्हे सर्व राजाचे ताब्यांत द्यावे व जमीनदारांशीं इंग्रजांनीं केलेले सर्व करार राजानें पाळावे असें ठरलें. त्याप्रमाणें हे जिल्हे व पारडी येथील कंटिजंट फौज राजाच्या ताब्यांत देण्यांत आली. हा नवीन तह झाला तेव्हां शहरांत व सीताबर्डीच्या किल्ल्यावर तोफांची सलामी होऊन नवीन तह जाहीर करण्यांत आला. या तहांत पुढें राजाच्या म्हणण्यावरून थोडासा फेरफार झाला तो असा कीं १८२६ च्या तहाचें सहावें कलम रद्द करून आप्पासाहेबानें इंग्रजांस दिलेला कांहीं मुलूख भोंसल्यांच्या राज्यांत असणें जास्त सोईचें होतें म्हणून तो भोंसल्यांस परत देण्यांत आला व त्याऐवजीं इंग्रजी मुलुखास लागून असलेला दुसरा प्रदेश इंग्रजांस कायमचा दिला. हा तह अखेरचाच होता.

इ. स. १८३१ मध्यें राजास एक मुलगा झाला. त्या प्रसंगीं रेसिडेंटामार्फत ५५०० रु. चा आहेर राजास दिला गेला. परंतु हा मुलगा ५।६ महिन्यांचा होऊन ता. २२–१०–१८३१ रोजीं मरण पावला. रेसिडेंटानें आपला रेसिडेन्सी सर्जन जॉन **वायली** एम्. डी. यास औषध देण्याकरितां

पाठविलें होतें. परंतु राजाकडून डाक्टरांचें औषध देण्याची परवानगी मिळे-पर्यंत त्या मुलाची प्रकृति अखेरच्या स्थितीस आली होती असें त्यानें रेसि-डेंटास केलेल्या रिपोर्टांत लिहिलें आहे. इंग्रजी औषधांवर त्यावेळीं लोकांचा विश्वास नव्हता म्हणून या डॉक्टराचा लौकर प्रवेश झाला नाहीं असें यावरून दिसतें.

यानंतर राजास संतति झाली असें दिसत नाहीं. इ. स. १८३७ मध्यें रेसि-डेंटानें दूरदर्शीपणानें हिंदुस्थान सरकारशीं पत्रव्यवहार चालविला कीं राजा जर निपुत्रिक मरण पावला तर राज्याची व्यवस्था काय करावयाची? राजाचे मागें दत्तक घेण्याची परवानगी द्यावयाची कीं नाहीं अगर राज्य खालसा करून इंग्रज सरकारनें ताब्यांत घ्यावयाचें ? राजा यावेळीं फक्त २७।२८ वर्षांचा होता. परंतु दुर्दैवानें या भाकिताप्रमाणेंच पुढें वस्तुस्थिति झाली हें पुढें दिसून येईल. इंग्रजी अधिकाऱ्यांस इतका दूरवरचा पोंच राहिला, परंतु राजास मात्र तो वयातीत झाल्यावर सुद्धां आपले समोर पुढील व्यवस्था नक्की करण्याची बुद्धि सुचली नाहीं.

इतक्या पूर्वीसुद्धां सर्व जगांतील राजकारणांतील गुप्त उलाढालींच्या बातम्या प्रत्येक ठिकाणाहून रेसिडेंटास पुरविल्या जात असत. हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांत व संस्थानें, तसेंच अफगाणिस्थान, ब्रह्मदेश, नेपाळ व तिबेट वगैरे सरहद्दींचे प्रांत व बगदाद, एडन, चीन, जपान, इराण, इजिप्त, युरोप व अमेरिका वगैरेंच्या सर्व हालचालींची सर्व माहिती रेसिडेंटांस पुरविली जात असे. त्यामुळें त्याची राजकारणी दृष्टि फार व्यापक बने.

मराठेशाहींत सुद्धां हिंदुस्थानांतील ठिकठिकाणच्या वकीलांमार्फत अशी माहिती येत असे पण ती निवळ स्थानिक असे. मराठ्यांनीं सरहद्दीच्या प्रांतांत अगर बाहेर देशीं अशीं साधनें कधींच ठेविलीं नव्हतीं. हिंदुस्थाना-बाहेरील भौगोलिक व राजकारणी माहिती नसल्यामुळें हिंदुस्थानी लोक फार मागें राहिले.

तिसऱ्या रघूजीची कारकीर्द अखेरपर्यंत शांततेची झाली. नाहीं म्हणावयास एक दोन लहानसहान दंगेधोपे झाले. इ. स. १८४२–४३ मध्यें नरसिंग-पुर व छत्तीसगडांत थोडेसे दंगेधोपे झाले. पण राजाचें लष्कर जाऊन त्यानें ते ताबडतोब मोडले.

इ. स. १८४१ मध्यें व १८४८ मध्यें आप्पासाहेबाचे तोतये निघून त्यांनींहि दंगे केले. परंतु ते नागपुर प्रांताच्या हद्दींत येण्यापूर्वींच पकडले गेले. (मागें पान ४६६ पहा.)

**लष्करी छावण्या व सैन्यांचीं ठाणीं**:—भोंसल्यांच्या लष्कराच्या दोन छावण्या होत्या. एक नागपुरच्या पूर्वेस दोन कोसांवर **पारडी** ऊर्फ महाराजगंज येथें व दुसरी नैर्ऋत्येस **सोनेगांव** येथें असे. यांत प्रत्येकीं कांहीं स्वार व कांहीं पायदळ असे. यांपैकीं पलटणें आळीपाळीनें चांदा, छत्तीसगड व भंडारा येथें बंदोबस्ताकरितां जात असत. निरनिराळ्या ठेवलेल्या शिपायांची संख्या– रायपुर ११००, चांदा ३५०, भंडारा २५०, छिंदवाडा २५०, श्रीनगर (नर्मदा दक्षिणतीर) २५०.

पारडीच्या सैन्यांत युरोपियन तऱ्हेनें शिकविलेलें कवायती सैन्य व कांहीं तोफा असत. सोनेगांवचें बहुतेक सैन्य हिंदुस्थानी पद्धतीचें असे.

इ. स. १८४५ मध्यें पारडीच्या सैन्यांतील लोकांनीं दंगा केला. तेव्हां रेसिडेंटाच्या सल्ल्यानें राजानें बंडखोर लोकांपैकीं २१७ इसम व अधिकारी बडतर्फ केले. या बडतर्फ केलेल्या लोकांच्या पगारांच्या खर्चांत एक नवीन पलटण व दोन तिल्लेरीच्या (Artillery) तोफा सोनेगांवच्या छावणींत उभ्या करण्याकरितां राजानें आपला वकील **माधवराव गोविंद** यास रेसिडेंटाच्या स्वारींत भंडारा येथें एक पत्र पाठविलें तें उपलब्ध आहे. तें इतक्या मिन्नतवारीनें लिहिलें आहे कीं त्यावरून राजाचे सर्व कारभारावर रेसिडेंटाचा किती दाब बसला होता हें कळून येण्यासारखें आहे. एवढ्या गोष्टीची परवानगी रेसिडेंटाकडून मिळविण्याकरितां राजा आपल्या वकीलास लिहितो, "तुम्ही या सरकारआज्ञेंत लिहिल्याचे पुर्तेपणीं, मनन करून जितक्या तजविजी साधकबाधकतेच्या लिहिल्या आहेत याचा खुलासा मुक्तसर साहेब रेसिडेंट बहादुरास त्याचे मिजासीचे संतोषाची वेळ व मर्जी खुषवक्त पाहून कामकारभाराचा जिकर व हरएक प्रकर्णी चर्चा होत राहतात त्यांत ही गोष्ट काढून ज्यांत पलटणभरतीचा हुकूम लवकर होईल तें घडून येण्याविषयींची परवानगी घेऊन जलद सरकारांत लिहून पाठविणें."

**सतीची चाल बंद**:—इ. स. १८३७ च्या सप्टेंबरच्या महिन्यांत इंग्रज

सरकारच्या सूचनेवरून राजानें सर्व राज्यांत हुकूम सोडून सतीची चाल बंद केली. त्यानंतर विशेष खटपट न करतांहि सदरहू चाल अजीबात बंद झाली. फक्त छत्तीसगडच्या एका कोपऱ्यांत एक उदाहरण घडलें. त्याशिवाय पुन्हां अशी गोष्ट घडली नाहीं.

**तिसऱ्या रघूजीची काशीयात्रा**—इ. स. १८३८ चे आक्टोबर महिन्यांत राजा काशीयात्रा व गयावर्जन करण्याकरितां नागपुराहून निघाला. बरोबर कॅ. **फिट्झेरल्ड** हा थोडेंसें मद्रासी सैन्य घेऊन होता. वरील तीर्थयात्रेस सात महिने लागले. पाठीमागें राज्याचा बंदोबस्त **बांकाबाई** ही करीत असे. पूर्वीच्या ब्रिटिश कारभाराचें वळण राज्यास लागल्यामुळें बांकाबाईस व राजास विशेष त्रास पडला नाहीं. शिवाय इंग्रज सरकार व रेसिडेंट यांची देखरेख चालूच होती.

**नागपुरचे निरनिराळे रेसिडेंट**—वाईल्डर याच्यामागून **ग्रीम**, कर्नल **ब्रिग्ज, कॅव्हेंडिश,** मेजर **विल्किन्सन**, ले. क. **स्पीयर्स**, कॅ. **रॅमसे**, **डेव्हिडसन** व शेवटीं **मॅनसेल** वगैरे रेसिडेंट नागपुरास झाले. **ब्रिग्ज** हा उत्तम फारशी जाणणारा होता व त्यानें फेरिस्ताचें भाषांतर, निजामाच्या राज्याचा इतिहास वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. **विल्किन्सन** हा जाडा संस्कृतज्ञ होता व नागपुरास रेसिडेंट असतांना **बापूशास्त्री देव** व **श्रीकृष्णशास्त्री घोंगे** नांवाचे दोघे शास्त्री त्यास ज्योतिर्गणित शिकवीत असत. कलकत्त्याच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मासिकांतून त्याचे पुष्कळ लेख प्रसिद्ध झाले आहेत. **स्पीयर्स** हा फार आजारी होऊन विलायतेस जाण्याकरितां मुम्बईस जाण्यास निघाला असतां रस्त्यांत **जालना** येथें मरण पावला. प्रसिद्ध कॅ. **स्लीमन** हा जबलपुरास एजंट म्हणून होता. त्याचेहि कांहीं ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**जमा व खर्च : खजिन्याची सांपत्तिक स्थिति**— राजाच्या हातीं कारभार आला तेव्हां सरकारी खजिन्यांत तीस लक्ष रुपये शिल्लक होते. ते लवकरच खर्च झाले. कांहीं मुलूख इंग्रजांकडे गेल्यामुळें राज्याचें उत्पन्न कमी झालें. राज्यांतील कांहीं प्रतिष्ठित अधिकाऱ्यांनीं आपले महालांची जमाबंदी कमी लावावी. इंग्रजी अमलापेक्षां राजानें एकंदरीत सर्वच जमिनी-

वरील लागवण कमी केली होती. १८४५ चे सुमारास नागपुर राज्याचें उत्पन्न सरासरी ५० लक्षांचें होतें व खर्चहि तितकाच होता. आतां आठ लक्षांचा मुलूख गेल्यामुळें उत्पन्न बेचाळीस लक्षांवर आलें. पूर्वीं खर्च जास्त होत असे पण राजानें स्वतः सर्व देखरेख व काटकसर करून खर्च कमी केला व बरेंचसें कर्ज फेडून खर्च उत्पन्नाच्या आंत आणला. हें करतांना त्याला प्रत्येक खात्यांत बारीक लक्ष घालून बरेंच काम करावें लागलें. नवीन तहाप्रमाणें इंग्रज सरकारास सैन्याबद्दल दरसाल देण्याचे आठ लक्ष रुपये तो अत्यंत काळजीपूर्वक व मुदतशीर देत असे. त्यामुळें निजामाप्रमाणें बाकी वाढत वाढत त्यास आणखी प्रांत तोडून देण्याचा प्रसंग आला नाहीं. परंतु हें करण्यापूर्वीं त्यानें आपला खर्च उत्पन्नापेक्षां जास्त आहे व नेहमीं १०–१५ लक्ष रु.चें कर्ज राहतें हें दाखवून दरसाल आठ लक्षांची रकम देण्यास आपणास अडचण जाते म्हणून ती रकम कमी करावी अशी मागणी करून खटपट करण्यास कमी केलें नाहीं.[1] बरेच दिवस असा पत्रव्यवहार चालविला होता व रेसिडेंटानें आपल्या १८४१ सालच्या रिपोर्टांत एकदां तशी शिफारसहि केली होती. परंतु पुढील रिपोर्टांत रेसिडेंटाचा अभिप्राय विरुद्ध पडल्यामुळें ही रक्कम अखेर कमी झाली नाहीं तरी वर सांगितल्याप्रमाणें राजानें काटकसर करून खर्च उत्पन्नाच्या आंत आणिला. राज्याचें मुख्य उत्पन्न जमीनमहसुलाचें होतें. ५० लक्षांपैकी ३६।। लक्ष रु. जमीनमहसुलाचें उत्पन्न व सायर कलालीचें उत्पन्न सुमारें ८ लक्ष व बाकीचें उत्पन्न क्षुल्लक असे. खर्चापैकीं मुख्य बाबी गोंडराजाचा हिस्सा १। लक्ष; जहागिरी, पेन्शनें व धर्मादाय ६।। लक्ष; खाजगी खर्च १४ लक्ष; लष्करखर्च १३।। लक्ष; इंग्रजांस फौजेबद्दल ८ लक्ष ह्या असत व रस्ते, शाळा, दवाखाने वगैरे लोकोपयोगी कामांवर मुळींच खर्च होत नसे. (जमाखर्चाचे आंकडे १८४२–४३ सालच्या रिपोर्टावरून घेतले आहेत.)

**प्रांताचे विभाग**— प्रांताची अंतर्व्यवस्था खालीलप्रमाणें होती:— सर्व प्रांताचे पांच सुभे ऊर्फ जिल्हे केलेले होते. १ देवगड (वरघाट),

---

१ सागर व नर्मदाप्रांत खरोखर याच कामाकरितां तोडून दिला होता. म्हणून ही रक्कम अजीबात देण्याचें कारण नव्हतें. परंतु नवीन तहाच्या वेळीं ही गोष्ट लक्षांत घेतली नाहीं असें दिसतें.

यांत उत्तरेकडील घाटावरील सर्व प्रदेश नर्मदेपर्यंत येत असे. २ देवगड (घाटाखालचें), यांत नागपूर व भोंवतालचा सर्व भाग (वर्धा व वाईनगंगा या नद्यांचे दरम्यान) येत असे. ३ वाइनगंगा, नागपूर व छत्तीसगड यांचे मधील प्रदेश. ४ चंद्रपुरच्या दक्षिणेकडील सर्व जंगली भाग. ५ ओरिसापर्यंत सर्व भाग. उत्तरेस अमरकंटक व दक्षिणेस बस्तर वगैरे मांडलिक राज्यें.

या पांच सुभ्यांवर 'सुभेदार' म्हणून अधिकारी असत ते बहुधा नागपुरच्या राज्यांतील जुने माहितगार व घरंदाज लोक असत. परंतु वरील कारणामुळें ते नेहमीं सुभ्यांत रहात नसून बहुधा नागपुरासच रहात.

**न्यायखातें**—दिवाणी व फौजदारी कामांची व्यवस्था पुढें (पान ४९६) लिहिल्याप्रमाणें होती.

नागपुर जिल्ह्यांतील ( शहराबाहेरच्या ) व्यवस्था थोडीशी निराळी होती. नागपुर जिल्ह्यास सुभेदार निराळा नसून राजा स्वतःच सुभेदाराचें काम पहात असे व त्याच्या हाताखालीं फडणीस म्हणून एक अधिकारी असे. नागपुरचा सुभेदार या नात्यानें राजा सुभेदाराच्या हुकमावरील अपिलें स्वतः घेत असे. तसेंच नागपुर जिल्ह्यास सुभेदार नसल्यामुळें शहर कोतवालाप्रमाणें जिल्हा पोलीस सुपरिंटेंडेंट निराळा असे. त्याच्याकडे जिल्ह्याचा पोलीस बंदोबस्त व शिवाय फौजदारी मुकदमे चालविण्याचे अधिकार असत. त्यास ५० रुपयांपर्यंत दंड व एक वर्षपर्यंत कैदेची सजा देण्याचे अधिकार असत. परंतु प्रत्येक शिक्षा दिल्यानंतर राजाकडे माहितीकरितां रिपोर्ट करावा लागे व जास्त शिक्षा देणें असल्यासहि राजाकडे मुकदम्याचा रिपोर्ट पाठवावा लागे. इ. स. १८४५ सालीं नागपुरच्या सदर दिवाणी कोर्टावर **शिवराव बक्षी*** म्हणून अधिकारी होता. शहर कोतवाल व फौजदारी कोर्टावर दोघे मुसलमान गृहस्थ होते. पोलीस शिपायांस बरकंदाज असें म्हणत असत.

* काळू घराण्यांतील.

| | कोर्टाचें नांव | दिवाणी अधिकार | फौजदारी | अपिलाचे अधिकार | या कोर्टावर अपी.कोणाकडे | इतर अधिकार |
|---|---|---|---|---|---|---|
| नागपुर शहर | १ दिवाणी कोर्ट नागपुर शहर | रु.१–३०० चे मूळ दावे. | | | ची.कोर्ट(सदर दि. अदालत) | |
| | १ फौजदारी कोर्ट नागपुर शहर | | रु. ५० पर्यंत दंड व १ वर्षाची कैद. (*a*) सर्व शिक्षेचे रिपोर्ट माहितीकरितां राजाकडे पाठवावे लागत. (*b*) जास्त शिक्षा देणें असल्यास राजाकडे रिपोर्ट. | | राजाकडे | हा अधिकारी शहरचा सिटी सु. ऊर्फ कोतवाल असे. |
| | १ चीफ कोर्ट (ना. शहर व जिल्हा) दिवाणी अदालत | रु. ३०० चे वरील दावे. | | नागपुर शहरचे दि.कोर्टावरील अपिलें. | राजाकडे | |
| जिल्हे अगर सुभे | १ कमावीसदार | रु. ३०० पर्यंत मूळ दावे | रु. १० दंड (*a*) रिपोर्ट सुभेदाराकडे माहिती (*b*) जास्त शिक्षा देणें असल्यास सुभेदाराकडे रिपोर्ट | | दिवाणी अपी. व फौ. अपील सुभेदाराकडे. | परगण्याचा मुलकी व पोलिस अधिकारी (हल्लींचा सब-इन्स्पेक्टर) |
| | २ सुभेदार | रु.३००चे वर | १०० रु. दंड व १ वर्षाची कैद. (*a*) राजाकडे माहितीकरितां रिपोर्ट. (*b*) जास्त शिक्षा देणें असल्यास राजाकडे रिपोर्ट. | कमावीसदाराच्या दि. व फौ. निकालाविरुद्ध सर्व अपिलें | राजाकडे | सर्व सुभ्याचा मुलकी व पोलिस अधिकारी. |

**तिसरे रघूजीचा स्वभाव व कर्तबगारी**-- राजाचे हुशारीसंबंधानें निरनिराळ्या रेसिडेंटांचीं भिन्नभिन्न मतें दिसून येतात. **जेंकिन्सच्या** वेळीं राजा अल्पवयी होता व कारभारहि त्याचे हातीं आला नव्हता. परंतु त्याचे मताप्रमाणें रघूजी हा " मोठा हुशार नव्हता व मोठासा कर्तबगार निघेल अशी आशा नव्हती. राज्यकारभाराऐवजीं हलक्या दर्जाचे करमणुकीचे छंदाकडे त्याची जास्त प्रवृत्ति होती. लिहिणें, वाचणें, जमाखर्च व थोडेंसें फारशी भाषेचें ज्ञान येण्याइतकें त्याचें शिक्षण झालें होतें. परंतु आंग मोडून काम करण्याकडे त्याची प्रवृत्ति नव्हती." जुन्या तऱ्हेचें लष्करी शिक्षण त्यास मिळालें होतें पण लढाईचा प्रसंग त्यास कधीं पडला नाहीं. **वाइल्डर** व **ग्रीम** यांचें मत असें होतें कीं " रघूजी हा फार बुद्धिमान आहे. फक्त काम करण्याचा सराव मात्र पाहिजे. " राज्यकारभाराचे ऐवजी क्षुल्लक गोष्टी व करमणुकी यांतच त्याचा वेळ जात असे हें मात्र सर्वांनीं लिहिलें आहे. एकंदरींत रघूजी हा शांत, सुस्वभावी व बुद्धिमान् होता असें सार्वत्रिक मत असे. तो कोणासहि भेटत असे व पुढें पुढें तर राज्यकारभारांतहि बरेंच लक्ष घालून व आंग मोडून कामहि करून त्यानें खजिन्याची व राज्याची स्थिति बरीच सुधारली होती. इंग्रज सरकारची व रेसिडेंटाची मर्जी सांभाळण्यांत त्यानें केव्हांहि कसूर केली नाहीं. कारण त्याचा परिणाम काय होईल याची त्याला पूर्ण ओळख होती. म्हणून रेसिडेंटास काय आवडेल हें पाहून त्याप्रमाणें तो आपलें वर्तन ठेवीत असे. हें मेजर **विल्किन्सन** व **रॅमसे** यांनीहि कबूल केलें आहे.

**तिसरे रघूजीचे वेळेस राज्याची स्थिति**--सर्व रेसिडेंटांनीं वेळोवेळीं नागपूरच्या राज्याच्या स्थितीसंबंधानें गव्हर्नर जनरल याजकडे रिपोर्ट केले आहेत त्यांवरून राज्याची स्थिति कशी होती हें कळून येतें. शांतता व सुव्यवस्था यांमुळें प्रजेची स्थिति बरीच सुधारत गेली व उत्पन्न वक्तशीर येत गेल्यामुळें खजिन्याची स्थितीहि बरी राहिली. पूर्वींच्या दहा वर्षांच्या इंग्रजी कारभाराचें वळण सर्व खात्यांस लागल्यामुळें व रेसिडेंटाच्या देखरेखीमुळें राजाच्या उधळपट्टीवरहि बराच दाब बसला. राजा राज्यकारभारांत बरेंच लक्ष घालीत असल्यामुळें अंदाधुंदी बरीच कमी झाली. परंतु राजाच्या कारकीर्दीचीं अखेरचीं वर्षें याप्रमाणें राहिलीं नाहींत.

इ. स. १८४९ मध्यें नागपुर शहरांत पहिला इंग्रजी तऱ्हेचा दवाखाना उघडण्यांत आला. तसेंच त्याच सुमारास मिशनरी रे० **स्टिफन हिस्लॉप** यानें आपल्या मिशनची एक इंग्रजी शाळा सुरू केली. तेथें बायबल शिकविण्यांत येत असे. त्यामुळें या शाळेविरुद्ध मोठा गिल्ला झाला.

**स्टिफन हिस्लॉप मिशनरी--स्टिफन हिस्लॉप** हा मोठा कडवा मिशनरी होता. नागपुरच्या स्कॉच ख्रिस्ती मिशनचा तो जनकच होता असें म्हटलें तरी चालेल. तो इ. स. १८४५ मध्यें नागपुरास आला व त्यानें नागपुरास व नागपुर प्रांतांत लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याची सुरवात केली. सीताबर्डीच्या टेकडीस लागून असलेलें एक घर त्यानें घेऊन तेथें मिशन हाऊस ठेविलें. हल्लीं तो बंगला जी. आय. पी रेल्वे कंपनीनें विकत घेतला आहे व रेल्वेपुलाच्या जवळ जो गवती बंगला दिसतो तोच तो असावा. लवकरच शहरांत एक शाळा काढावी असें त्याच्या मनांत आलें. परंतु ख्रिस्ती धर्माचें शिक्षण देणारी, बायबल शिकवून हिंदु लोकांस बाटविणारी शाळा शहरांत हिंदु राजा घालूं देईल कीं नाही याची हिस्लॉप यास मोठी भीति वाटली. परंतु इकडे सर्व अंधार होता. प्रयत्न करतांच हिस्लॉप यास राजमहालाच्या मुख्य रस्त्यावर शुक्रवार दरवाज्याच्या समोर म्हणजे हल्लीं जेथें हिस्लॉप कॉलेज आहे तेथें नाक्याचे जागीं एक घर मिळालें व तेथें ३० मुलांची शाळा सुरू झाली. ती सुरू होतांच आपणास कल्पनेबाहेर यश आलें असें वाटून हिस्लॉप यास मोठा हर्ष झाला. पुढें याच शाळेचें कालांतरानें हल्लींच्या हिस्लॉप कॉलेजांत रूपांतर होऊन सदरहू शाळा व कॉलेज नागपुरच्या शिक्षण संस्थांपैकीं एक प्रमुख संस्था झाली आहे.

**हिस्लॉपच्या मनाचा कोतेपणा--हिस्लॉप** याच्या स्वभावांत परधर्म सहिष्णुता बिलकूल नव्हती. त्यावेळीं अशी रीत असे कीं मुख्य मुख्य हिंदू सणांच्या दिवशीं राजाच्या दरबारांत त्या त्या सणांचे सामाजिक कार्यक्रम होत व रेसिडेंट व इतर इंग्रज अधिकारी त्या त्या वेळीं हजर राहून थोडाबहुत भाग घेत. ही गोष्ट एकमेकांचे स्नेह-संवर्धनाच्या व सामाजिक संमेलनाच्या दृष्टीनें महत्त्वाची असे. फक्त धार्मिक कामांत मात्र ते भाग घेत नसत. याप्रमाणें रंगपंचमीच्या उत्सवांत रेसिडेंट व इतर इंग्रज लोक येऊन

रंगगुलालादि क्रीडांत सामील होत व आनंदानें परत जात. तसेंच दसऱ्याच्या स्वारीच्या वेळीं राजा हत्तीवर सीमोल्लंघनास जाई त्या वेळींहि रेसिडेंट व लष्करासह इंग्रज लष्करी अधिकारी राजवाड्यासमोर जाऊन सैन्याची व तोफांची सलामी देत व राजाच्या स्वारीबरोबर शहराबाहेर कांहीं अंतरावर जाऊन मग रेसिडेन्सीकडे परत जात. शमीपूजन वगैरे धार्मिक विधीकरितां मात्र ते थांबत नसत.

वास्तविक या प्रकारांत राजकीय व सामाजिक भागच असल्यामुळें ख्रिस्ती धर्माविरुद्ध यांत कांहीं नसे. परंतु हें पाहून हिस्लॉप साहेबाच्या आंगाचा तिळपापड होई. त्यानें मुंबई येथील "बॉम्बे टेलिग्राफ" नांवाच्या पत्रांत हे प्रकार धर्माविरुद्ध आहेत म्हणून रेसिडेंटाविरुद्ध टीका सुरू केली ( इ. स. १८४६ ). तसेंच दरबारी कागदपत्रांत वर "श्री" अगर देवाचें नांव लिहिणें, कोर्टांतील शपथांत गंगाजलाचा उपयोग करणें, रेसिडेन्सी खजिन्यांतून सीताबर्डीच्या एका हिंदु देवळास वर्षासन देणें वगैरे क्षुल्लक गोष्टींतहि त्यानें रेसिडेंटाच्या पाठीमागें लकडा लावावा. त्याच्या म्हणण्यावरून त्या देवळाचें वर्षासन अखेर रेसिडेंटानें बंद केलें.

हिस्लॉपच्या शाळेंत हळूहळू विद्यार्थी इंग्रजी शिकण्याकरितां येऊं लागले व लोकांना ख्रिस्ती करण्याचाहि उद्योग हळूहळू सुरू झाला. त्यामुळें मुलें बाटतील म्हणून लोक भिऊं लागले व आपल्या मुलांना त्या शाळेंत जाऊं देईनात. बापाच्या इच्छेविरुद्ध एक मुलगा त्या शाळेंत गेला म्हणून त्याच्या बापानें त्यास मारहाण केली व घराबाहेर काढून देण्याची धमकी दिली. त्यामुळें मुलानें शाळा सोडून दिली. हिस्लॉप साहेबास हें समजतांच त्यानें बापास मुलास मारण्याचा कायद्यानें हक्क नाहीं म्हणून त्याचेवर काम चालविण्याचे उद्देशानें तें प्रकरण रेसिडेंटापर्यंत नेलें. पण रेसिडेंटानें तिकडे लक्ष दिलें नाहीं.

तरी हळूहळू मिशनचे कामास यश येऊं लागलें. बाबा पांडुरंग या नांवाचा ब्राह्मणाचा एक १५ वर्षांचा मुलगा हिस्लॉप साहेबाच्या मोहांत सांपडला व ख्रिस्ती होण्यास तयार झाला व पळून मिशन हाऊसमध्यें लपून बसला. त्याच्या बापानें पुष्कळ प्रयत्न केला. परंतु त्याचा प्रवेश मिशन

हाऊसमध्यें होईना व त्याच्या मुलाचा पत्ता लागेना. शेवटीं बाप थकून राजाकडे गेला व त्यानें रेसिडेंटास लिहिलें. रेसिडेंटानें हिस्लॉप यास लिहून त्या मुलाची सुटका करविली व त्यास बापाचे ताब्यांत देवविलें.

परंतु शेवटीं बाबा कांहीं दिवसांनीं ख्रिस्ती झालाच व मिशनमधील एका मुलीशीं त्यानें लग्न केलें. त्याची पहिली बायको जिवंत होती. परंतु ती आपल्या आईबापाकडेच राहिली. पुढें बाबाची ख्रिस्ती बायको मरण पावली व नंतर त्याची पहिली हिंदु बायको कंटाळून नाइलाजानें बाबाकडे आली व तिलाहि ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्यांत आली.

**हिस्लॉप**साहेबानें नंतर आपलें कार्य वऱ्हाडाकडे वळविलें व तेथें **नारायण शेषाद्रि** नांवाचा एक ब्राह्मण ख्रिस्ती उपदेशक ठेविला. त्यानें रे० **सिदोबा भिसाळ** याचे हाताखालीं उमरावती येथील शाखा सुरू केली. क० **मॅकेंझी** नांवाचा उमरावतीस कमिशनर होता. त्यानें आग्रा येथून बलदेवसिंग म्हणून एक निराश्रित रजपुताचा मुलगा आणिला होता. त्यावर या मिशनऱ्यांचा पहिला प्रयोग होऊन त्यास ख्रिस्ती बनविण्यांत आलें.

ख्रिस्ती करण्याच्या उद्योगांत इतर मिशनऱ्यांप्रमाणें हिस्लॉप साहेबासहि बराच त्रास भोगावा लागला. बाबाप्रमाणेंच गणू नांवाच्या एका तेलगू गवंड्याच्या मुलास मिशन हाऊसमध्यें नेऊन ठेवण्यांत आलें. तें त्याच्या बापास व इतर लोकांस समजतांच ४०० लोक मिशन हाऊसवर चाल करून गेले व दंगा करून त्यांनीं आपल्या मुलास सोडवून आणिलें. एकदां **हिस्लॉप** साहेब हा शहरांत हिंडत असतां त्यास लोकांनीं धरून खूप मारलें, इतकें कीं त्याचे सर्व कपडे रक्तानें भरले व तो बेहोष पडला. शेवटीं त्याच्या शाळेंतील एका जुन्या विद्यार्थ्यानें त्यास ओळखलें व सोडवून त्याच्या घरीं पोहोंचतें केलें. तो मिशनरी आहे हें न ओळखतां रेसिडेंटाकडील कोणी इंग्रज आहे असें समजून लोकांनीं त्यास मारलें असें नंतर समजलें.

**कलंकी ब्राम्हण प्रकरण– हिस्लॉप** याच्या लेखांवरून नागपुर, चांदा वगैरे बाजूस जें कलंकी ब्राम्हणांचें ग्रामण्य आतांपर्यंत चालू होतें त्याचा थोडासा पत्ता लागतो. इ. स. १८४५ च्या सुमारास या ग्रामण्याला आरंभ झाला असें दिसतें. खानदेशांतील एका हुशार मुसलमानानें मुसलमानी धर्म

प्रसाराची एक युक्ति काढली. तो नागपुरास आला व गुप्त रूपानें ब्राम्हण वगैरे उच्चवर्णीय हिंदु लोकांच्या भोळसटपणाचा फायदा घेऊन त्यांजमध्यें साधु म्हणून मिरवूं लागला. कलियुग संपून आतां श्रीविष्णूचा कलंकी अवतार येणार आहे. पांढऱ्या घोड्यावर हातांत खड्ग धारण करून तो सर्व लोकांत संचार करून धर्मनिष्ठ लोकांचें परित्राण व अधर्मी म्हणजे या पंथांत न येणारे लोकांचा तो नाश करणार आहे. असा उपदेश त्यानें सुरू केला. पंथांत येणाऱ्या लोकांस तो गुप्त रूपानें उपदेश व दीक्षा देत असे. त्यांतच कांहीं महत्त्वाचे आचार गुप्त रूपानें परिपाळण्याची शपथ असे. दीक्षा घेतांना जानवें काढून टाकावयाचें व एक गुळाची अगर पोटांत गूळ घालून पिठाची गाय करून ती कापून दीक्षा घेणारानें भक्षण करावयाची. ह्या दोन मुख्य गोष्टी या पंथांत घेतांना तो करवीत असे व हाच प्रकार कुलाचार अगर पंथाचा मुख्य आचार म्हणून गुप्तपणें चालविण्याची शपथ असे.

नागपुरचे बरेच ब्राह्मण व इतर उच्च वर्णीय हिंदु याप्रमाणें या "कलंकी" पंथांत सामील झाले व तो पंथ नागपुरच्या आसपासहि वाढत चालला. वरोडा, चांदा येथपर्यंतहि त्याचा प्रसार झाला. ही गोष्ट गुप्त न राहतां इतर ब्राम्हणांना समजली व त्यांनीं "कलंकी" पंथीयांना जाती-बाहेर टाकलें. हें ग्रामण्य वाढत जाऊन राजाच्या कानावर गेलें. शेवटीं त्यानें राजोपाध्यांमार्फत सर्व ब्राम्हणांची सभा भरवून कलंकी ब्राम्हणांना प्रायश्चित्त देऊन पंक्तिपावन करून घ्यावें असा हुकूम दिला. त्याप्रमाणें बऱ्याच कलंकी ब्राम्हणांना प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतलें व सर्वांचीं एका पंक्तीस जेवणें झालीं. याप्रमाणें हा वाद मिटल्यासारखा झाला. परंतु अशिक्षित व जुन्या विचाराचे कांहीं ब्राम्हण ऐकेनात व उलट या जेवणाऱ्या ब्राम्हणांवरहि त्यांनीं ग्रामण्य पुकारलें. शेवटीं त्यांनाच बिचाऱ्यांना प्रायश्चित्त घ्यावें लागलें व मूळचे कलंकी पंथीय ब्राम्हण कलंकीच राहिले. अलिकडे पांचपंचवीस वर्षांत लोकांच्या विचारांत बदल होत चालला व अनेक धर्म-गुरूंच्या निर्णयांवरून व विचारी लोकांच्या उपदेशांवरून लोकमत निवळून कलंकीयांचा कलंक आतां साफ निघून गेला आहे व त्यांचेवरचा बरेच दिवसांचा अन्याय दूर झाला आहे.

इकडे हा धर्मबुडवेपणा चालू असतांना **हिस्लॉप**साहेब या झगड्याकडे फारच बारकाईनें पहात होता व हा झगडा वाढून हिंदुसमाजाचा हा तुकडा वेगळा पडल्यास आपणास आत्मसात् करतां येईल या आशाळभूत नजरेनें तो या समाजाकडे पहात होता. तो म्हणतो*—"मला फार दुःख वाटतें तें हें कीं या लोकांपर्यंत माझा प्रवेशच होत नाहीं. एक तर या लोकांची भाषा मला समजत नाहीं व कोणालाहि विचारावें तर ते सांगतात कीं कलंकी कोण आहेत हें आम्हांस माहीत नाहीं. कलंकी लोकहि राजाच्या भीतीनें आपण कलंकी आहों हें लपवून ठेवतात."

**राजाचे रेसिडेंटांशीं संबंध व राजाच्या वर्तणुकीची दुसरी बाजू**— तिसरा **रघूजी** हा जरी स्वभावतः बरा होता तरी भोंवतालच्या वाईट परिस्थितीचा परिणाम त्याचेवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. अल्प वयांत राज्याचे अधिकार त्यास मिळाले होते. त्याच्या शिक्षणाविषयीं व त्यास कायमचें चांगलें वळण लावण्याबद्दल कांहीं विशेष व्यवस्था नव्हती व रेसिडेंटाशिवाय घरांत अगर दरबारांत दुसऱ्या कोणाचा योग्य दाब त्याचेवर नव्हता. घरांत **बांकाबाईचें** बरेंच वजन होतें व ती फार शहाणी व कर्तबगार बाई होती, परंतु तिची देखरेख मर्यादितच राहणार. रेसिडेंटांचा दाब हाहि राजकारणापुरताच राहणार व त्याप्रमाणें तो होताहि. परंतु खाजगी नीतिमत्तेच्या कामांत ते बहुधा लक्ष घालीत नसत व तसें करणें शक्य अगर योग्यहि झालें नसतें. जोंपर्यंत रेसिडेंट मजबूत असत अगर दुर्लक्ष करीत असत तोंपर्यंत राजाच्या विरुद्ध विशेष ओरड झाली नाहीं. शिवाय प्रथम राजा अल्पवयी व कमी अनुभवाचा व रेसिडेंट वयस्क व जास्त अनुभवी. इ. स. १८४५ पर्यंत राजाच्या विरुद्ध विशेष काहूर उठलें नव्हतें. राजा सर्व वेळ चैनींत घालवितो व राज्यकारभाराकडे लक्ष देत नाहीं त्यामुळें खर्च उत्पन्नापेक्षां जास्त होतो, राजा स्वतः लक्ष घालील तर खर्च बराच कमी होईल, एवढीच काय ती तक्रार इ. स. १८४५ पर्यंत होती.

परंतु यानंतर पारडें फिरलें. **स्पीयर्स** हा रेसिडेंट राजाच्या अंतर्व्यवस्थेंत विशेष बारकाईनें पहात नसे. तो गेल्यावर कॅ. **रॅमसे** जो नागपुरासच

* Stephen Hislop, D. H. Smith ( Murray ) 1888.

असिस्टंट रेसिडेंट होता तोच तात्पुरता रेसिडेंट झाला. कायमचा रेसिडेंट **डेव्हिडसन** हा आजारी पडल्यामुळें दोन वर्षेपर्यंत **रॅमसे** हाच रेसिडेंट राहिला. तो कायमचा नसल्यामुळें त्याचें वजन राजावर विशेष पडेना व राजा जास्त स्वच्छंदी बनूं लागला. संस्थानांतून स्वतःच्या चैनीकडे पैसा मनमुराद घेतां येईना; कारण पूर्वींच्या रेसिडेंटांनीं फारच लकडा लावल्यामुळें त्यास आपला खाजगी खर्च मर्यादेंत आणावा लागला. पैशाची जरूर लागल्यामुळें तो अप्रामाणिक व हलक्या लोकांच्या हातीं सांपडला. ते वाईट रीतीनें राजास पैसा उत्पन्न करून देऊं लागले. पैसे घेऊन सरकारी नोकऱ्या देणें, मोठमोठ्या दिवाणी व फौजदारी मुकदम्यांचे निकाल लुचपत अगर नजराणा घेऊन अन्यायाचे करणें, बेवारस लोकांच्या इस्टेटी गिळंकृत करणें, वगैरे अनीतिमान् राज्यकर्त्यांचे सर्वसाधारण दोष राजांत उत्पन्न झाले. रेसिडेंटाचें गुप्त हेरांचें खातें या सर्व गोष्टींकडे जागरूकपणें पहात असे व ही सर्व खडान्खडा माहिती रेसिडेंटास रोज मिळे. राजाकडे आज कोण गृहस्थ आला व काय बोलला, कोण अधिकारी काढला, कोण नेमला हें सर्व रेसिडेंटास कळत असे. " आमच्या गुप्त हेरांकडून अमकी बातमी आज कळली. " अशा तऱ्हेचे उल्लेख त्या वेळच्या रेसिडेंटांच्या रिपोर्टींत अद्याप आढळतात.

इ. स. १८४५ सालापर्यंत रघूजीचीं तीन लग्नें झालीं होतीं. परंतु त्यावेळीं एकच बायको **अन्नपूर्णाबाई** ही जिवंत होती. दोघी मेल्या होत्या. राजास दोन मुली व एक मुलगा होऊन सर्व मुलें लहानपणींच मेलीं त्या वेळीं त्याचें वय ३७ वर्षांचें होतें. परंतु, गैरवाजवी वर्तनानें व मादक द्रव्यांच्या सेवनानें त्याची प्रकृति इतकी खालावली होती कीं त्यास यापुढें संतति होणें शक्य नाहीं असें आपलें अनुमान त्याच वेळीं रेसिडेंटानें ग. ज. यास कळविलें होतें. तरीसुद्धां यानंतर रघूजीनें आणखी पांच बायका*

* रघूजी मेला तेव्हां त्यास अन्नपूर्णाबाईशिवाय आणखी दोन बायका होत्या अन्नपूर्णाबाई रघूजीनंतर लौकरच मेली. दर्याबाई नांवाची रघूजीची सहावी बायको होती, ती बरेच दिवस जिवंत होती. तिच्या दिनचर्येबद्दल रघूजी असतांना जे नियम घालून दिले होते त्याची इ. स. १८४५ ची कलमबंदी यादी प्रसिद्ध आहे (ना. भो. का. प. २९ पहा). तीवरून राजाचे घरांतील मामुली व्यवस्था कशी होती तें दिसून येतें.

केल्या. त्यांना संतति कांहींच झाली नाहीं. एवढ्यानेंच पूर्ण झालें नाहीं. त्याच्या आवडत्या दोन नाटकशाळा **जानी** व **धुमन** नांवाच्या पूर्वींच होत्या व आणखीहि इतर पांचसहा झाल्या. **नाटक शाळां**पैकीं **जानी** इच्यामुळें रघूजीस दारू पिण्याचें व्यसन लागलें; तें मरेपर्यंत कायमच होतें. रोज एका बाटलीपेक्षां जास्त ब्रँडी तो पीत असे. इ. स. १८५० च्या रेसिडेंटाच्या एका आठवड्याच्या डायरींत राजाकरितां कांचेचीं भांडीं व शांपेनच्या बाटल्या विलायतेहून खरेदी करण्याचें काम लिहिलेलें होतें. त्या डायरीची नक्कल कलकत्त्यास गेली. ती ग. ज. याच्या समोर आल्यावर त्यानें रेसिडेंटास लिहिलें कीं राजाकरितां दारू खरेदीचीं कामें करणें गैरशिस्त आहे (Residency Records. ). कैक वेळां अतिरेक होऊन तो अस्ताव्यस्त पडत असे. ही संवय त्याला इ. स. १८४५ च्या सुमारास लागली. यानंतर त्याचा वेळ कामांत मुळींच जात नसे. रेसिडेंटाच्या वकीलास सुद्धां राजाकडून कांहीं काम करून घेणें कठीण पडे. गाणें, नाच, जुवेबाजी व पतंगाच्या शर्यती या हलक्या करमणुकीच्या खेळांत त्याचा बहुतेक वेळ जाऊं लागला. कुस्त्यांच्या शर्यतीचाहि त्याला नाद असे.

शेवटीं शेवटीं रघूजीचें रेसिडेंटाशीं पटेनासें झालें. त्यांतल्या त्यांत कॅ. **रॅमसे** याचे त्याच्याशीं वारंवार खटके उडत. रॅमसे यानें कांहीं बडे अधिकारी लांचखाऊ आहेत म्हणून ते काढून टाकण्यास व नवीन चांगलीं माणसें नेमण्याबद्दल राजास तगादा लावला. राजानें सांगितलें माझीं माणसें प्रामाणिक आहेत. शेवटीं दोघांचें भांडण ग. ज. कडे जाऊन त्यानेंहि राजास दटावणी दिली. शेवटीं राजासन मतें घ्यावें लागलें. त्यानें रेसिडेंटास निराशेनें कळविलें कीं, तुम्ही म्हणाल तीं माणसें मी नेमतों. तुमचा शब्द म्हणजे मला हुकूमच आहे. पारडी व सोनेगांवच्या सैन्यांचा पगार तुंबला होता व सावकारांचें कर्ज खजिन्यावर होतें तें खाजगी शिल्लक बाहेर काढून राजानें बरेंचसें वारलें. कैक वेळां तर रेसिडेंटाच्या जाचामुळें राजा बेफाम होऊन कामकाज सोडून खोलींत स्वतःस कोंडून घेऊन बसे. रेसिडेंटाचे हेर राजाभोंवतीं नेहमीं असत. त्यामुळें राजा आपले मुख्य अंमलदार घेऊन खोलींत गुप्तपणें कारभार करी. त्यावर रेसिडेंटानें ग. ज. यास रिपोर्ट केला कीं, " राजा माझे बातमीदाराचा प्रवेश होणार

नाहीं अशा ठिकाणीं बसून सल्ला मसलत करतो, त्यामुळें त्याच्या हालचाली मला समजत नाहींत."

एकंदरींत राजाचें आयुष्य मोठेंसें सुखकर नव्हतें. शिवाय राजास प्रजेच्या कल्याणाची विशेष पर्वा नव्हती अगर लोककल्याणाच्या कांहीं गोष्टीहि त्यानें केलेल्या दिसत नाहींत. त्यामुळें तो विशेष लोकप्रिय होता अशांतलाहि भाग नाहीं. शिवाय रेसिडेंटास अशी अंदाधुंदी दिसत असल्यामुळें त्यासहि राजाविरुद्ध कारवाई करण्याची संधि मिळे. या कष्टमय जीवनानेंहि राजाच्या व्यसनांत जास्त भर पडली. रघूजी मरेपर्यंत त्याचें पुढें कोणत्याच रेसिडेंटाशीं जमलें नाहीं.

तिसऱ्या रघूजीच्या कारकीर्दींत प्रांताचा जमाखर्च पुढील प्रमाणे होता–

| उत्पन्न | (आंकडे हजारांचे) | | खर्च |
|---|---|---|---|
| मालकाळी | ३७०० | गोंडराजाचा हिस्सा | १२५ |
| खंडण्या | २८३ | नेमणुका, जहागिरी व. | ४३५ |
| अबकारी | १७७ | देवस्थान, धर्मदाय व. | १६७ |
| पांढरी | ७६ | काळी व पोलीस | |
| सायर (जकात) | ६४३ | खात्याचा खर्च. | ६३६ |
| सिवाई (दंड, फी वगैरे). | ८८ | चिल्हर | २७ |
| ऐनदफा (धान्याची वाढ | | खाजगी | १३ |
| व कर्जावरील व्याज) | ८७ | सैन्य | १४२ |
| टांकसाळ | २३ | इंग्रज सरकारास देण्याचे | ९३९ |
| एकूण ५० लक्ष ८२ हजार | | | ५०॥ लक्ष अंदाज. |

१०० सुर्ती रुपये=११५ नागपुरी.

इ. स. १८३७ मध्यें व पुन्हां इ. स. १८४४ मध्यें रघूजी आजारी पडला होता व त्या आजारांतून राजा न उठल्यास राज्याची विल्हेवाट कशी लावावयाची याबद्दल रेसिडेंटानें ग. ज. याजकडे विचारणा केली होती व त्यावर ग. ज. यानें रेसिडेंटास हुकूम देऊन ठेविला होता कीं "असा प्रसंग आल्यास राजास त्या वेळीं औरस अगर दत्तक पुत्र नसल्यास एकदम संस्थान

तुम्ही आपले ताब्यांत घ्यावें. नंतर ग. ज. हे योग्य वारसाची चौकशी करतील. तसेंच राजाचे पाठीमागें दत्तक वगैरे घेण्याचा कोणाचा अधिकार आहे हें पाहून योग्य तो हुकूम करतील. एकंदरींत वरील गोष्टी त्या वेळच्या परिस्थितीवर अवलंबून राहतील." या हुकुमाप्रमाणें वेळ येईल तेव्हां अंमलबजावणी करण्यास इंग्रजी रेसिडेंट नेहमीं तयार होते.

परंतु इकडे राजमहालांत सर्वत्र अंधार होता. राजानें स्वतः दूरवर विचार करून पुढील व्यवस्था आपल्या हातानें करून ठेवावयाची ती कांहींच ठेवली नाहीं. त्यास मूलबाळ होण्याची मुळीच उमेद नव्हती. शिवाय त्याच्या ४।५ राण्या असल्यामुळें त्यांच्यामध्यें भांडणें लागण्याची भीति होती. मेल्यानंतर दत्तकाची परवानगी ब्रिटिश सरकार देईल अगर नाहीं हीहि शंका दुसऱ्या संस्थानांतील पूर्वींच्या अनुभवावरून त्यास यावयास पाहिजे होती. शिवाय घराण्यांत दुसरा मनुष्य उरलेला नव्हता व संस्थान खालसा होण्याची धास्ती होती. परंतु राजाचा स्वभाव अदूरदर्शी, तामसी व गर्विष्ठ असा होता. त्याच्या कल्पनाहि बऱ्याच आकुंचित होत्या. **मॅनसेल** रेसिडेंट यानें आपल्या रिपोर्टांत म्हटल्याप्रमाणें "आपणास पुत्र नाहीं व दत्तक घ्यावा लागतो ही एक नशीबाची कमतरता जगांत दाखविणें हें त्याच्या मानी स्वभावास आवडेनासें होतें." व म्हणून हा प्रसंग त्यानें शक्य तोंवर टाळला व आपण मेल्यानंतर आपल्यामागें राणी कोणी तरी दत्तक घेऊन त्या दत्तकास गादी मिळेलच अशीहि त्याची स्वाभाविक कल्पना असावी. तिसरा रघूजी ज्याप्रमाणें दत्तक होऊन गादीवर आला त्याप्रमाणेंच पुढेंहि होईल अशी त्याची कल्पना असली पाहिजे. परंतु दुसरा दूरदर्शी मनुष्य इतका बेसावध न राहता व आपले समक्ष दत्तक घेऊन अगर इंग्रज सरकाराकडून दत्तकाची परवानगी घेऊन ठेवून पुढील व्यवस्था नक्की करून ठेवता. तशी कांहींच सावधगिरी राजानें केली नाहीं यामुळें त्याचा परिणाम त्याचे घराण्यास कायमचा भोगावा लागला व त्याचे मागें नागपुरचें राज्य खालसा करण्यास इंग्रजी अधिकाऱ्यांस निमित्त मिळालें. वृद्ध बांकाबाईस व राजाभोंवतीं असणाऱ्या मुत्सद्यांसहि ही गोष्ट सुचावयास पाहिजे होती. परंतु त्यांना एक तर पुढील अंदाज आला नाहीं अगर राजाच्या स्वभावामुळें त्यांचें कांहीं चाललें नसावें.

तिसरा **रघूजी** हा वयाच्या ४७ व्या वर्षी नागपुर येथें राजवाड्यांत ता. ११ डिसेंबर १८५३ रोजीं सकाळीं ६ वाजतां मरण पावला. मरणापूर्वी तो २५-२६ दिवस आजारी होता. त्याला दम्याचा व मूळव्याधीचा आजार होता. परंतु मूळव्याधीबद्दल त्यानें अखेरपर्यंत कोणाजवळहि सांगितलें नाहीं. शेवटीं शेवटीं कांहीं बाह्य उपचार केले. परंतु रेसिडेन्सी सर्जननें ऑपरेशन करण्याबद्दल म्हटलें असतां त्यानें ऑपरेशन करण्याचें अजीबात नाकारलें. तसेंच ताप वगैरे असतांना स्नान करणें, हिंडणें, खाणें, मद्यादि पिणें व निरोगी माणसाप्रमाणें सर्व व्यवहार करणें हें चालूच होतें. शेवटीं आंतील आंतडीं सुजून व लघवी होणें बंद होऊन त्याचा अंत झाला.

राजा बराच आजारी पडला तेव्हां रेसिडेंट **मॅनसेल** यानें भेटण्याची फार इच्छा दर्शविली. परंतु रेसिडेंटाविषयीं पराकाष्टेचा तिटकारा राजाचे मनांत भरला असल्यामुळें त्यानें रेसिडेंटास भेटण्यास येऊं दिलें नाहीं. यावरून एकमेकांचीं मनें एकमेकांविषयीं किती कलुषित झालीं होतीं हें दिसून येईल व या विरोधभावाचा विपरीत परिणाम इंग्रजी रेसिडेंटावर होऊन पुढील व्यवस्थेंत रेसिडेंटाचा कल संस्थान खालसा करण्याकडेच राहिला असावा व त्याप्रमाणें संस्थान अखेर खालसा झालें. राजाच्या मरणाच्या वेळेस मात्र रेसिडेंट हजर होता.

राजाचें और्ध्वदेहिक दुपारीं १२ वाजतां झालें. सीताबर्डीच्या किल्ल्यावरून व कामठीच्या लष्करांतून राजाच्या वयाच्या वर्षांइतक्या (४७) तोफा त्याच्या सन्मानार्थ उडविण्यांत आल्या. कलकत्त्यास फोर्ट सेंट जॉर्जच्या किल्ल्यांतूनहि हें वर्तमान समजतांच दर मिनिटास एक याप्रमाणेंच तोफा उडविण्यांत आल्या. सतीची चाल नागपुरचे राज्यांत पूर्वींच बंद केली असल्यामुळें सती जाण्याची इच्छा कोणाहि राणीनें दर्शविली नाहीं. राजाच्या मागें चार राण्या जिवंत होत्या.

रेसिडेंट **मॅनसेल** यानें शिक्कामोर्तब व खजिना ताब्यांत घेऊन सर्व राज्यकारभार आपल्या हातांत घेतला. लष्कराचा व राजवाड्याचा बंदोबस्त पूर्वींच रेसिडेंटाचे हातीं होता. त्यामुळें त्यास कांहींच अडचण पडली नाहीं. संस्थानांतील सर्व अधिकारीहि रेसिडेंटाचा अधिकार पूर्वीपासून

जाणूनच होते. तेहि रेसिडेंटाच्या हुकुमाप्रमाणें वागूं लागले व सर्व राज्य अत्यंत शांततेनें व बंदुकीची एक गोळीहि न सोडतां राजा मेला त्याच दिवशीं इंग्रज रेसिडेंटाच्या ताब्यांत आलें. रेसिडेंटानें सावधगिरी म्हणून कामठीवरून लष्कर आणून ठेवलें व राजवाड्यावरहि जास्त पहारा ठेविला. पण कोठेंच कांहीं गडबड झाली नाहीं. अर्थात् पुढें काय व्यवस्था होणार आहे याची राज्यांत कोणालाच कांहीं कल्पना नव्हती.

नागपुरास रेसिडेंट येऊन राहणें, सबसीडियरी तह होणें व राजा मरतांच रेसिडेंटानें सर्व राज्य आपल्या ताब्यांत घेणें ह्या क्रमप्राप्त पायऱ्या एका-मागून एक कशा शांतपणानें होत गेल्या हें विचार करण्यासारखें आहे. लष्करी सामर्थ्यावरच राज्याची मालकी अवलंबून असते हें तत्त्व जगाच्या आरंभापासून अखेरपर्यंत अबाधित रहात आलें व राहणार याचा हा एक लहानसा नमुना आहे. जगांतील सर्व करारमदार, तहनामे व कायद्याचीं व न्यायाचीं तत्त्वें मनगटाच्या जोरापुढें कुचकामाचीं ठरतात हा सर्वत्र अनुभव आहे.

राजाचें और्ध्वदैहिक **नाना अहीरराव** (रघूजीचा भाचा) याचे हातून करविलें. त्याचा मुलगा यशवंतराव[१] यास दत्तक घेण्याचें सर्वांनीं ठरविलें. परंतु राजाचे सर्व अंत्यविधी झाल्यानंतर रेसिडेंटाची व इंग्रज सरकारची रीतसर परवानगी वगैरे घेऊन दत्तकाचा विधी व समारंभ करावा असें सर्वांनीं ठरविलें. अस्थि प्रयागास नेण्याकरितां ठेवून रक्षा चिन्नूरजवळ कालेश्वरघाट येथें गोदावरींत टाकविली. सीताबर्डीवर फौज तयार ठेव-ण्यांत आली तसेंच पारडी येथील राजाच्या सैन्याचा मुख्य अधिकारी जनरल **चिंतामणराव भाऊ**[२] व सोनेगांवचे छावणीवरील मेजर **मानाजी** हे इंग्रजां-चे वतीचेच होते. त्यांना आपले फौजेंत जाऊन राहण्याचा व शिपायांच्या हालचालींकडे बारीक नजर ठेवण्याचा हुकूम रेसिडेंटानें दिला. कांहीं सुभेदार नागपुरास होते त्यांना रेसिडेंटानें आपआपल्या सुभ्यांवर जाऊन राहण्यास सांगितलें. रेसिडेंट आपल्या रिपोर्टांत लिहितो कीं " मी एकहि

१ कांहीं ठिकाणीं या यशवंतरावाच्या हातूनच क्रियाकर्मांतर करविलें असें सांपडते.

२ याचे वंशज नागपुरास कप्तान या आडनांवानें प्रसिद्ध आहेत.

महत्त्वाचा मनुष्य असा ठेवला नाहीं कीं, ज्याला मी राजी करून घेतलें नाहीं. मी स्वतः राजवाड्यांत रोज जाण्याचा क्रम ठेविला आहे. मी ता. १३ डिसेंबर रोजीं **बांकाबाई** व तिसऱ्या रघूजीच्या राण्या यांच्या समाचारास गेलों व राजाच्या मरणाबद्दल दुःख प्रदर्शित केलें. आमच्या इकडच्या तिकडच्या साधारण गोष्टीच झाल्या. पण त्यांतल्या त्यांत **बांकाबाई** ही आपल्याकडून मधून मधून म्हणतच होती कीं, "नागपुरचें राज्य भोंसले घराण्यांतच पुढेंहि रहावें."

हें शेवटचें वाक्य वाचकांनीं नीट ध्यानांत ठेवावें. कारण पुढील घडामोडींशीं याचा बराच संबंध येणार आहे.

ता. १४-१२-१८५३ रोजीं रेसिडेंट **मॅनसेल** यानें नागपुरच्या परिस्थितीसंबंधानें व राज्याच्या पुढील व्यवस्थेसंबंधानें आपला सविस्तर रिपोर्ट पाठविला. त्यांत प्रथम त्यानें राजाच्या कारकीर्दींतील कारभाराचें वर्णन केलें आहे. त्याचा सारांश हाच कीं "राजानें अत्यंत अंदाधुंदीनें राज्य चालविलें. राजाची खाजगी व राज्यकारभारांतील नीतिमता अगदीं वाईट होती. रेसिडेंटाशीं वर्तन अत्यंत बेपर्वाईचें होतें इतकें कीं रेसिडेंटानें भेट घेण्याची इच्छा दर्शविली तरी तो भेट सुद्धां घेत नसे व आपला रेसिडेंटाविषयीं तिरस्कार उघडपणें दाखवी." पुढील व्यवस्थेसंबंधीं रेसिडेंट म्हणतो "राजाच्या हल्लीं चार राण्या जिवंत आहेत. १ अन्नपूर्णाबाई, २ दर्याबाई, ३ आनंदीबाई व ४ कमळजाबाई. मुलगा अगर मुलगी नाहीं व राण्यांपैकीं कोणी गरोदरहि नाहीं. मी दोन वर्षांपासून राजास सुचवीत आलों कीं दत्तक वगैरे घ्यावयाचा असल्यास तुमची इच्छा काय ती आतांच सांगून ठेवा व पुढील व्यवस्थाहि कळवा. परंतु पूर्वीं अगर अखेरच्या दुखण्यांत त्यानें दत्तकाबद्दल कधीहि इच्छा दर्शविली नाहीं. साताऱ्याचें राज्य खालसा झाल्यापासून ह्या गोष्टीची दरबारचे लोकांत बरीच चर्चा झाली होती. यावरून राजानें दत्तक घेतला नाहीं तो मुद्दाम विचार करूनच, घेतला नाहीं असें वाटतें. याचें कारण असें कीं आपणास मुलगा नाहीं ही कमीपणाची गोष्ट जाहीरपणें कबूल करण्याचें राजास आवडेना. तसेंच बांधकाम खात्यावरील दरोगा जगदेव मोरे नांवाच्या एका हलक्या मनुष्यानें राजाच्या मनांत भरविलें कीं दत्तक घेतल्यास इंग्रज लोक तुम्ही त्यांचें ऐकत नाहीं व राज्य नीट चालवीत नाहीं

या सबबीवर तुम्हास गादीवरून काढून टाकतील व मुलास गादीवर बसवतील. नागपुरचें राज्य संपादन करणारा पहिला राजा रघूजी याचे घराण्यांतला कोणीहि पुरुष राहिला नाहीं."

नागपुरच्या राजास दत्तकाची परवानगी द्यावी कीं नाहीं हा प्रश्न पूर्वी दोन तीन वेळां निरनिराळ्या रेसिडेंटांनीं ग. ज. यांना विचारला होता व प्रत्येकानें आपआपलें मतहि कळविलें होतें. इ. स. १८३७ मध्यें **कॅव्हेंडीश** यानें आपलें असें मत दिलें होतें कीं राजास ( ति. रघूजी यास ) दत्तकाचा हक्क नाहीं. ग्वाल्हेर, हैदराबाद, लखनौ हीं राज्यें कंपनी सरकारानें हल्लींच्या राजांस दिलीं नसून त्यांचींच आहेत म्हणून त्यांची गोष्ट निराळी. परंतु नागपुर, म्हैसूर, सातारा हीं राज्यें कंपनीनें हल्लींच्या राजांस दिलीं आहेत. सबब राजाचे औरस संततीशिवाय इतरास गादीवर बसण्याचा हक्क नाहीं. इ. स. १८४० मध्यें मेजर **विल्किन्सन** यानें मात्र याच विषयावर लिहितांना **कॅव्हेंडिश** याचें मत खोडून काढून कळविलें कीं " या दोन्ही तऱ्हेच्या संस्थानिकांत या बाबतींत मुळींच फरक नसून ग्वाल्हेर, हैदराबाद, वगैरे संस्थानिकांस जसा दत्तक घेण्याचा हक्क आहे तसा नागपुरच्या राजास अगर तो मेल्यावर त्याचे राणीस आहे." इ. स. १८४४ मध्यें कर्नल **स्पीयर्स** या रेसिडेंटानेंहि या विषयावर पुनः गव्हर्नर जनरल यास विचारणा केली. परंतु ग. ज. याजकडून कोणासहि याबद्दल उत्तर मिळालें नाहीं.

**मॅनसेल** यानें विल्किन्सन याचें मत आपणास पसंत नाहीं. कॅव्हेंडिश प्रमाणेंच आपलेंहि मत आहे असें कळविलें. तो म्हणतो, " नागपुरची गादी पुढें चालवावी कीं नाहीं हा प्रश्न दत्तकाच्या हक्काशिवाय इतर गोष्टींचा विचार करून सोडवावा. या बाबतींत इंग्लंडांतील लोकमत व हिंदुस्थानांतील इतर संस्थानांत या गोष्टीनें लोकांचा काय ग्रह होईल व हिंदुस्थानी लोकांना जबाबदारीच्या जागा मिळण्याचें क्षेत्र आकुंचित करण्यापासून काय परिणाम होईल या गोष्टींचा विचार केला पाहिजे. याच्या उलट गोष्टीहि त्या बरोबरच विचार करण्यासारख्या आहेत त्या अशा कीं सर्व हिंदुस्थानच्या लष्करी बंदोबस्तांत एवढा मोठा प्रांत हिंदी राजाच्या ताब्यांत असल्यामुळें या प्रांतांतून पैशाची कांहीच मदत होत नाहीं अगर झाल्यास फार थोडी होते.

उलट संस्थानिकाचें लष्कर रहात असल्यानें त्याच्यावर नजर ठेवणें व त्या करितां आपलेंहि जास्त लष्कर ठेवणें जरूर पडतें. शिवाय मुलखाची व्यवस्था चांगली राहणें याहि दृष्टीनें विचार केला पाहिजे.

"नागपुरचें राज्य कायम ठेवणेंच असल्यास हल्लीं लष्करी खर्चाकरितां इंग्रज सरकारास जी आठ लक्षांची रकम मिळते ती वीस लक्ष रुपये घेण्यांत यावी. बाकीचें पंचवीस लक्षांचें उत्पन्न राजाच्या मुलकी व लष्करी खर्चास पुरेसें होईल. तसेंच राजालाहि आपलें सैन्य कमी करावें लागेल व जें राहील त्यावर इंग्रज अधिकारी नेमावे लागतील. म्हणजे त्या लष्कराचा कांहीं धाक राहणार नाहीं. नाहीं तर राजाचे लष्कराचा एक खर्च व त्याचे लष्कराविरुद्ध इंग्रज सरकारास ठेवावें लागणाऱ्या दुसऱ्या लष्कराचा दुसरा खर्च याप्रमाणें दुहेरी खर्च चालू राहणार !

"नागपुरची गादी कायम ठेवण्याचें ठरविल्यास **बांकाबाई इला** तिच्या हयातीपावेतों सर्व अधिकार द्यावेत व तिनें रेसिडेंटाचे सल्ल्यानें कारभार चालवावा. असें केल्यानें गादी कायम राखल्याचेंहि श्रेय मिळेल व आपलाहि मतलब साध्य होईल. इंग्रज लोक हिंदी संस्थानें बुडविण्याच्या मार्गे लागले आहेत हा लोकांचा ग्रह नाहींसा होईल. **बांकाबाईस** राज्य देण्याचें पसंत नसल्यास व गादी चालविणेंच असल्यास मी **नाना अहीरराव** याचा मुलगा **यशवंतराव** अहीरराव याचें नांव सुचवितों. हा मुलगा १८ वर्षे वयाचा असून स्वभावानें बरा आहे. त्याचें मराठी व फारशी शिकणें चालू आहे. जरी तो मोठा हुषार नाहीं तरी सांगितलें तसें वागण्यासारखा आहे. त्याचें लग्न झालेलें नाहीं. शरीरानें जरी तो अशक्त आहे तरी गेल्या तीन वर्षांत त्यास कोणताहि आजार झाला नाहीं. हाच मुलगा दरबारच्या सर्व लोकांनाही पसंत पडेल."

शेवटीं रेसिडेंटानें आपलें मत दिलें कीं, "नागपुरचें राज्य बुडविल्यास या राज्याशीं संबंध असलेल्या सर्व लोकांस अतोनात वाईट वाटेल हें खरें; परंतु साधारण जनतेंत मराठे हे परकेच असल्यामुळें मागील राजासारख्या त्रासदायक राज्यांतून आपली सुटका व्हावी हीच त्यांची इच्छा राहणार. **जेंकिन्सनें** पूर्वी नामधारी राजा ठेवून जशी व्यवस्था चालविली होती,

तशीच मीं सुचविल्याप्रमाणें कांहीं व्यवस्था झाल्यास इंग्रजांच्या छत्राखालीं आपल्याच लोकांनीं चालविलेलें राज्य लोकांना फार पसंत पडेल."

एकंदरींत **मॅनसेल** यानें भोंसल्यांचें राज्य वारस नसल्यामुळें बुडविण्याचीच सल्ला दिली. परंतु तसें न झाल्यास नांवाची गादी चालवून सर्व सत्ता इंग्रजांच्या हातांत रहावी अशीहि दुसरी योजना सुचविली व तिच्या योगानें दोन्हीहि गोष्टी साधतील असें त्याचें म्हणणें पडलें. एकंदरींत न्यायापेक्षां स्वार्थाकडेच त्याच्या रिपोर्टाचा कल जास्त होता. परंतु दुर्दैवानें त्यावेळीं लॉर्ड **डलहौसी** हा गव्हर्नर जनरल होता. हा गृहस्थ हिंदी संस्थानें खालसा करण्याच्या कामांत अध्वर्यु होता. हा रि ोर्ट कलकत्त्यास पोहोंचला त्या वेळीं गव्हर्नर जनरल हा ब्रह्मदेशांत **पेगू** येथें होता. त्याच्या मागें गव्हर्नर जनरल याचे कौन्सिलचा प्रेसिडेंट **डॉरिन** व मेंबर्स कर्नल **लो** व **हॅलिडे** यांनी रेसिडेंटास जशी व्यवस्था आहे तशीच चालू ठेवण्याचा व इंग्रज सरकारातर्फे कोणास कोणतेंहि अभिवचन न देण्याचा हुकूम दिला. रेसिडेंटाचा रिपोर्ट ग. ज. यास ब्रह्मदेशांत पेगू येथें मिळाला व परत कलकत्त्यास आल्यावर लॉर्ड **डलहौसी** यानें व त्याच्या कौन्सिलनें ता. २८ जान्युआरी १८५४ रोजीं विलायतेस कंपनीच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्स यांजकडे आपलें म्हणणें कळविलें.

हिंदी संस्थानें कायम ठेवावींत कीं नाहीं व दत्तकाची परवानगी देत जावी अगर नाहीं या प्रश्नाचा खल हिंदुस्थानांतील व इंग्लंडांतील इंग्रज मुत्सद्यांमध्ये बरेच वर्षांपासून चालू होता. निदान नागपुरच्या कोणत्याहि तहांत परवानगीशिवाय दत्तक घेणार नाहीं अशी शर्त नव्हती. म्हणून करारमदाराच्या दृष्टीनें भोंसल्यांनीं आपला दत्तक घेण्याचा हक्क घालविला नव्हता. हिंदुधर्म शास्त्राप्रमाणें राण्यांस दत्तक घेण्याचा अधिकार होता व त्यास रेसिडेंटाचे परवानगीची कोणत्याहि तहाप्रमाणें जरूर नव्हती. तेव्हां रेसिडेंटास अगर इंग्रज सरकारास तरी आम्ही दत्तकाची परवानगी देत नाहीं असें म्हणण्याचा अधिकार कसा प्राप्त झाला हें कळत नाहीं. हा अधिकार ओढून ताणून इंग्रज सरकारानें आपले हातीं घेऊन हिंदुस्थानांतील बरींच संस्थानें खालसा केलीं त्यांतच नागपुरचें संस्थान खालसा झालें.

गव्हर्नर जनरल याच्या रिपोर्टांतील मुख्य मुद्दा हा होता कीं " राजानें दत्तक घेतला नाहीं व घेण्याची इच्छाहि त्यानें कधीं दर्शविली नाहीं. त्याचप्रमाणें राजा मेल्यानंतर त्याचे राण्यांपैकीं कोणीहि दत्तक घेतला नाहीं अगर घेण्याची इच्छा दर्शविली नाहीं. दत्तक घेतल्यास दत्तकाची पालनकर्ती त्याची दत्तक आई होईल व मग आपलें महत्त्व जाईल म्हणून बाकाबाईचीहि इच्छा दत्तक घेण्याची नाहीं. त्यामुळें आज मितीस गादीस कोणीहि हक्कदार अस्तित्वांत नाहीं. तिसरे रघूजीस गादी इंग्रजांनीं आप्पासाहेबाचें राज्य घेतल्यानंतर खुषीनें दिलेली असल्यामुळें आतां ती गादी दुसऱ्यास देणें अगर न देणें ही इंग्रजांच्या खुषीची गोष्ट आहे. नागपुरच्या लोकांच्या कल्याणाचे दृष्टीनें, हिंदुस्थानच्या राजकारणाच्या दृष्टीनें व इंग्लंडच्या हिताच्या दृष्टीनें—कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी आतां कोणी मराठा राजा नागपुरच्या गादीवर बसविणें ठीक होणार नाहीं. इंग्रजी राज्यापासूनच लोकांचें कल्याण होईल. शिवाय इंग्लंडची भरभराटी व व्यापार कापसावर अवलंबून असल्यामुळें हा कापसाचा प्रांत इंग्रजांच्या हातीं आल्यापासून इंग्लंडच्या कारखानदारांचा व व्यापाऱ्यांचा चांगला फायदा होईल. तसेंच पश्चिमेस खानदेश व वऱ्हाड व पूर्वेस ओरीसा हे प्रांत पूर्वींच इंग्रजांच्या ताब्यांत आलेले असल्यामुळें मुलखाचा, पैशाचा व लष्करी सोईचा मोठा फायदा हें राज्य इंग्रजांनीं घेतल्यासच होईल. मराठ्यांचें जुलमी व त्रासदायक राज्य जाऊन इंग्रजांचें चांगलें राज्य आल्याबद्दल सर्व नागपुरच्या लोकांना आनंदच वाटेल. "

एकंदरींत ग. ज. यानें शिफारस केली कीं नागपुरचें राज्य खालसा करून इंग्रजी मुलखास जोडावें. राण्या व बांकाबाई यांना चांगल्या पेन्शनच्या नेमणुका करून द्याव्या. तसेंच भोंसल्यांच्या नोकरांचीहि चांगली सोय करावी.

राण्या दत्तक घेऊं इच्छीत नाहींत व संस्थान खालसा करावें असें जाहीर रीतीनें कोणी सांगेपर्यंत असें अनुमान गृहीत धरणें हें चुकीचें आहे. राजानें दत्तक घेतला नाहीं यावरून त्याचा तसा विचारच नव्हता असेंहि म्हणतां येत नाहीं. राजाला हें पूर्णपणें माहित होतें कीं आपण दत्तक न घेतला

तरी आपल्या मागें राणीला दत्तक घेतां येईल. रेसिडेंटानें राजाला असें कधीं सांगितलें नव्हतें कीं तुम्ही स्वतः दत्तक न घेतल्यास पुढें राणीस दत्तक घेतां येणार नाहीं व राज्य खालसा होईल. अशा स्थितींत रेसिडेंटानें व ग. ज. यांनीं आपल्या रिपोर्टांत लिहिलेले सर्व तर्क एकांगी व आपमतलबीपणाचे होते.

राण्यांची व बांकाबाईची दत्तकाबद्दल इच्छा दिसत नाहीं हें रेसिडेंटाचें विधान चुकीचें आहे याबद्दल ग. ज. याच्या कौन्सिलांतील मेंबर कर्नल लो यानें पुढीलप्रमाणें लिहिलें आहे.

" रेसिडेंटाचें म्हणणें कीं बांकाबाईची व लोकांचीहि इच्छा दत्तकाविरुद्ध व संस्थान कायम ठेवण्याच्या विरुद्ध आहे व इंग्रजांनीं राज्य खालसा करून आपल्या अमलाखालीं घ्यावें अशी आहे. परंतु हें म्हणणें त्याच्याच म्हण याप्रमाणें चुकीचें दिसतें. रेसिडेंटाच्या रिपोर्टांत म्हटलें आहे कीं, पहिले दिवशीं रेसिडेंट दुखवट्याची भेट घेण्यास राजवाड्यांत गेला तेव्हां सुद्धां बांकाबाईनें सुचविलें होतें कीं नागपुरच्या राज्याचा संबंध भोंसले घराण्याशीं पुढेंहि कायम रहावा. यावरून बांकाबाईची स्पष्ट इच्छा व मागणी रेसिडेंटास कळली होती. शिवाय सरकारी रिपोर्टापूर्वीं रेसिडेंट **मॅनसेल** याचें एक खाजगी पत्र मला पहाण्यास मिळालें होतें. त्यांत मॅनसेल यानें लिहिलें होतें कीं दरबारचे लोक मला म्हणत होते कीं, **दत्तक देऊन राज्य चालवावें.** " यावरून रिपोर्टांत रेसिडेंटानें लिहिलेल्या गोष्टी खऱ्या नसून राज्य खालसा करण्याच्या त्याच्या शिफारशीच्या पुष्टिकरणार्थ त्यानें उगीच दडपून दिल्या आहेत; असा प्रच्छन्न आरोप कर्नल लो यानें केला आहे व तो सर्वस्वी खरा होता असें म्हणावें लागतें.

कर्नल **लो** याच्या स्पष्ट व निर्भीड व प्रामाणिक युक्तिवादाचा ग. ज. व कौन्सिलचे दुसरे दोघे मेंबर यांच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं. उलट खाजगी पत्राचा उपयोग केल्याबद्दल कर्नल **लो** यास माफी मागावी लागली. नागपुरचें राज्य खालसा करावें अशीच शिफारस ग. ज. यानें बोर्ड ऑफ डायरेक्टर्स यांचेकडे केली.

बोर्ड ऑफ डायरेक्टर्स यांनीं ग. ज. यांची शिफारस मान्य करून नाग-

पुरचें राज्य खालसा करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें ग. ज. यास कळविलें. कर्नल लो याच्या युक्तिवादासंबंधानें एवढाच उल्लेख केला आहे कीं ' भोंसल्यांच्या राज्यांत लोकांना फार त्रास होता व इंग्रजी राज्यानें प्रजेस फार सुख होणार आहे ' ही गोष्ट कर्नल लो यासहि मान्य आहे. मग राज्य खालसा करण्यास हरकत कोणती ? शिवाय कर्नल लो याच्या शिफारसीप्रमाणें हिंदी लोकांना अधिकाराच्या जागा जरूर दिल्या जातील असें अभिवचन देण्यांत आलें. तसेंच राण्यांना व इतरांना भरपूर पेनशन द्यावें असेंहि बोर्ड ऑफ डायरेक्टर्स यांनीं सुचविलें. ग. ज. यानें त्याप्रमाणें राज्य खालसा केलें हें जाहीर करण्याबद्दल व सर्व राज्यकारभार हातांत घेण्याबद्दल हुकूम सोडले. रेसिडेंट **मॅनसेल** यास नागपुर प्रांताचा कमिशनर म्हणून नेमलें व या नात्यानें त्यानें ता. १३ मार्च १८५४ रोजीं कारभार सुरू केला.

रेसिडेंट हा आतां कमिशनर झाला व त्यानें **बांकाबाई** व रघूजीच्या राण्या यांना कंपनी सरकारनें राज्य खालसा केल्याबद्दल आलेला हुकूम कळविला. तसेंच पारडी व सोनेगांव येथील राजाच्या सैन्याच्या छावण्यांस व सुभेदारांना व सर्व मुलकी अधिकाऱ्यांना प्रांतोप्रांतीं हुकूम गेले. तसेंच भोंसल्याच्या राज्यांत जी लहान लहान मांडलिक संस्थानें होतीं त्यांनाहि कळविण्यांत आलें. दरबार वगैरे विशेष गाजावाजा न करतांना इंग्रजी राज्य सुरू होऊन भोंसल्यांचें राज्य गेल्याबद्दल सर्वांना कळलें. बहुतेक इंग्रजी सैन्य नागपुरास ठेवण्यांत आलें. परंतु नागपुरास अगर राज्यांत कोठें दंगा धोपा वगैरे झाला नाहीं.

गव्हर्नर जनरल व कर्नल लो यांनीं विलायतेस पाठविलेले खलिते **मॅनसेल** यास पाहण्यास मिळाले नव्हते. त्याच्या पहिल्या रिपोर्टांत त्यानें दत्तकाबद्दल आपले एकतर्फी व कांहींसे कल्पित व राज्य खालसा करण्यास उपयोगी पडतील अशाच धोरणानें या विषयाचा उल्लेख केला. परंतु कर्नल लो यानें आपल्या व्यवहारज्ञानावरून खरी स्थिति ओळखली व आपलें कर्तव्य केलें याबद्दल त्यास धन्यवाद दिले पाहिजेत. लॉर्ड **डलहौसी** यासहि हें समजलें नसेल असें नाहीं. परंतु राज्य–लालसेच्या दृष्टीनें त्यानें व इतर कौन्सिल मेंबरांनीं तसेंच विलायतच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्स यांनीं

खऱ्या खोटयाचा विचार न करतां निवळ अन्यायानें राज्य खालसा केलें असेंच म्हणावें लागतें. **मॅनसेल** यानें आपला राज्य खालसा करण्याचा हेतु साध्य झाला असें पाहून राज्य खालसा झाल्यानंतर जो दुसरा रिपोर्ट पाठविला त्यावरून खरी स्थिति जास्त खात्रीलायक समजते. ता. २९ एप्रिल १८५४ रोजीं **मॅनसेल** यानें पुढील व्यवस्थेसंबंधीं आपला रिपोर्ट पाठविला त्यांत तो म्हणतो. " राजाच्या सर्व कुटुंबाची इच्छा अशी आहे कीं एखादा दत्तक बसवून गादी पुढें चालवावी. जेंकिन्सच्या वेळेपासून राजा नांवाचाच राहून सर्व अधिकार इंग्रजांच्या हातांत रहावेत व राजाचा खर्च यथास्थित चालावा या गोष्टींची संवय सर्वांना झाली आहे. म्हणून जो तो आपल्या स्वतःच्या सुखाकडे पहात आहे.

" दरबार वकीलास जेव्हां मी प्रथम विलायत सरकारचा हुकूम कळविला तेव्हां त्यानें मला कळविलें कीं बांकाबाई व अन्नपूर्णाबाई यांचेकडून आपला दत्तक घेण्याचा हक्क आहे व दत्तक घेऊन गादी चालवावी याबद्दल त्या मजकडे लिहिणार आहेत. तसेंच त्यांचें म्हणणें पडलें कीं राण्यांना व बांकाबाईला तसेंच दरबारच्या सर्व लोकांना असें वाटत आहे कीं राण्यांशीं अगर दरबाराशीं या बाबतींत कांहींच बोलणें चालणें न करितां राज्य खालसा करण्यांत मोठा अन्याय झाला. मलाहि कांहीं अंशीं असें वाटतें कीं राण्यांच्या असहाय स्थितीमुळें व दरबारच्या सर्व प्रमुख लोकांना आपण दत्तकाच्या बाबतींत खटपट केली तर रेसिडेंटास राग येईल व त्याच्या विरुद्ध वागल्यासारखें होईल. अशी भीति वाटत असल्यामुळें कोणीहि कलकत्त्यास अगर विलायतेस राज्य खालसा करण्याविरुद्ध अद्याप कांहीं खटपट करीत नाहीं. तसेंच मजकडेहि अद्याप कांहीं रीतसर व लेखी अर्ज आला नाहीं. राज्य खालसा केल्याबद्दल आपली तक्रार व नापसंती दर्शविण्याची इच्छा आतां नाहींशी होत चालली आहे अगर मनांतल्या मनांत दबून राहिली आहे व आतां माझ्या हातांत आपल्या पुढील नेमणुका वगैरे करण्याचे सर्व अधिकार आल्यामुळें मला खुष करण्यांतच आपला व्यक्तिशः फायदा आहे असें प्रत्येक मनुष्य समजून जो तो दत्तकाच्या बाबतींत व राज्य खालसा करण्याविरुद्ध आपण कांहीं खटपट करीत नाहीं असें श्रेय मिळवून मला खुष करण्याचा प्रयत्न करीत आहे. "

वरील उताऱ्यांतील प्रत्येक वाक्यावरून खरी स्थिति काय होती हें कळून येतें. रेसिडेंटाच्या हातांत सर्व अधिकार असल्यामुळें त्याच्या हुकमाशिवाय दत्तक घेऊं देणें अगर न देणें, घेऊं दिल्यास कोणता मुलगा घेणें, इ. आपणास कांहीं करतां येणार नाहीं. रेसिडेंटाच्या व गव्हर्नर जनरलच्या या शिफारसीस कौन्सिलचे दोघे मेंबर डॉरिन व हॅलिडे यांनीं आपली पूर्ण संमति दिली. परंतु त्यांतहि कर्नल लो यास वरील पोकळ व मतलबी युक्तिवाद पटला नाहीं व त्यानें एकट्यानें मात्र आपलें इमान जागृत ठेविलें. त्यानें आपली **भिन्न–मतपत्रिका** (मिनिट) लिहून बोर्ड ऑफ डायरेक्टर्सकडे पाठविली व नागपुरचें राज्य खालसा करणें अन्यायाचें होणार आहे असें बजाविलें. आपल्या म्हणण्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं हें तो पक्कें जाणून होता व तसें त्यानें आपल्या मिनिटांतहि स्पष्ट लिहिलें. परंतु आपलें कर्तव्य त्यानें केलें याबद्दल तो स्तुतीस पात्र आहे. कर्नल **लो** याच्या मिनिटांतील मुख्य मुद्दे खालीं लिहिल्याप्रमाणे आहेतः–

"हिंदी संस्थानें खालसा करणें हें सोपें आहे व इंग्रजांनीं मनांत आणल्यास क्रमाक्रमानें निरनिराळ्या सबबीवर सर्व संस्थानें हळू हळू खालसा होतील. परंतु तसें करणें धोक्याचें आहे. मॉक्विस ऑफ **हेस्टिंग्ज**, सर टॉमस **मनरो**, सर जॉन **मालकम**, **एल्फिन्स्टन** व लॉर्ड **मेटकॉफ** या मुत्सद्यांचें मतहि याप्रमाणेंच होतें. इंग्रजी राज्य सुरू होतांच त्या प्रांतांतील धनिक व वजनदार लोक नाहींसे होतात. कारण आपण हिंदी लोकांना मोठाल्या मुलकी अगर लष्करी अधिकाऱ्यांच्या जागा देत नाहीं. तसेंच पेन्शन वगैरे रूपानें देशांतील बराचसा पैसा परदेशांत जातो व देशांत खर्चिला जात नाहीं. आपण परके असल्यामुळें हिंदी लोकांत मिसळून रहात नाहीं. दुष्काळाच्या दिवसांत संस्थानांतले धनिक लोक व जहागीरदार आपण पैसे देऊन लोकांस जगवितात तसें आपण करीत नाहीं. त्यामुळें दुष्काळांत इंग्रजी मुलुखांत जास्त लोक मरतात. पुढील वीस वर्षांत यामुळें नवीन कोणताच मुलूख घेऊं नये व आपल्या प्रांतांत लोक जास्त धनिक व खुष राहतील याबद्दल काळजी घ्यावी. ज्यानें आपले करार मोडले नाहींत अशीं कोणतींच संस्थानें खालसा करूं नयेत व त्यांच्या मनांत आपलेविषयीं विश्वास उत्पन्न होईल असें वर्तन ठेवावें. संकटाच्या

वेळीं संस्थानिकांकडून आपणास मदत होईल इतका त्यांचा विश्वास आपल्यावर असावा. अफगाणिस्थानांतील लढाईच्या वेळीं कर्नल **सदरलंड** अजमीर येथें असतांना व मी लखनौ येथें असतांना संस्थानिकांनीं या प्रकारें आम्हास पैशाची व लष्कराची फार मदत केली. व आम्ही आमचें व संस्थानिकांचें लष्कर पाठवूं शकलों. याप्रमाणें खुष ठेवलेल्या संस्थानिकांची आपणास फार मदत होते. मॅनसेल याच्या सूचनेप्रमाणें राणीचे मांडीवर दत्तक देऊन संस्थान चालवावें व दरसाल बारा लक्ष रुपये जास्त घेत जावेत म्हणजे संस्थानांतील लोकहि संस्थान खालसा केलें नाहीं याबद्दल आपणास धन्यवाद देतील व त्यांचें आपल्याविषयीं चांगलें मत राहील व आपला पैशाच्या दृष्टीनें व राजकीय महत्त्वाच्या दृष्टीनें बराचसा फायदा होईल. सिंध खालसा केल्यामुळें, ग्वाल्हेरावर स्वारी केल्यामुळें व सातारचें राज्य खालसा झाल्यामुळें इंग्रजांविषयीं संस्थानिकांचीं व लोकांचीं मनें साशंक व कलुषित झालेलीं आहेत. त्यांना जास्त चेतविणें योग्य नाहीं. त्यामुळें हिंदी लोकांच्या मनांत इंग्रजांविषयीं तिरस्कार उत्पन्न होईल. ज्या संस्थानिकांना औरस संतति नाहीं ते आपल्यामागें आपल्या राण्यांची व इतर लोकांची सोय व्हावी म्हणून राज्याचें हित न पाहतां आपला फायदा करून घेण्याकरितां बरेच जुलूम करतील व पैसे उकळतील. सातारचें राज्य खालसा केलें त्या संबंधानें माझ्याशीं ज्या ज्या लोकांचें भाषण झालें त्यांनीं हा एक अन्यायच झाला व 'बळी तो कान पिळी' असा न्याय झाला असें आपलें मत दर्शविलें व असाच अन्यायाचा प्रकार इंग्रजांकडून पुढेंहि होऊन सर्व संस्थानें राज्यलोभानें इंग्रज अन्यायानें खालसा करतील अशी भीति त्यांना उत्पन्न झाली. कारण सातारचें राज्य खालसा करण्याला राजाकडून कांहीं आगळीक झाली नसतांना राज्य खालसा झालें ही गोष्ट सर्वांना अन्यायाची वाटते.

"नागपुरचें राज्य खालसा केल्यास अशाच प्रकारचें लोकांचें मत होईल. सर्वांना हें माहीत आहे कीं नागपुरच्या राजानें इंग्रज सरकारशीं लढाई केली नाहीं, पैसे देण्यांत कुचराई केली नाहीं, आपणास कांहीं त्रास उत्पन्न होईल अशा रीतीनें राज्यकारभार केला नाहीं. राजा मेल्यावर त्याच्या जागीं वारसाबद्दल तंटे चालले नाहींत. असें असतांना राज्यांतील आंतील

कारभारांत इंग्रजांना पडण्याचें कारण नाहीं. राजानें आपल्या हयातींत जरी दत्तक घेतला नसला तरी राजाच्या राण्यांनीं आतांपर्यंत नागपुरच्या प्रमुख लोकांच्या सल्ल्यानें कोणी तरी दत्तक खास घेतला असता. आतांपर्यंत घेतला नाहीं याचें कारण इंग्रज रेसिडेंटाच्या भीतीमुळेंच. याशिवाय दुसरें कारण नाहीं. नागपुरचें राज्य खालसा केल्यास सर्व हिंदु संस्थानिकांना असेंच वाटेल कीं ग्वाल्हेरीस बायजाबाई शिंदे यांना ज्याप्रमाणें दत्तक देवविला त्याच प्रमाणें नागपुरच्या रेसिडेंटानें रघूजीच्या राणीस दत्तक देववून नागपुरचें संस्थान पुढें चालविण्यास पाहिजे होतें व राज्य खालसा करण्यांत आपण राज्य मिळवण्याकरितां अन्याय केला असें त्यांना वाटून आपल्या प्रामाणिकपणाबद्दल त्यांचें जें चांगलें मत होतें तें कलुषित होईल."

या मिनिटांत कर्नल लो यानें राज्यकारणाच्या मुद्यावरच जोर दिला आहे परंतु यानंतर कर्नल लो यानें दुसरें मिनिट लिहिलें त्यांत फक्त कायदेशीर हक्कांचा विचार केला आहे. **कॅव्हेंडिश, मॅनसेल** व गव्हर्नर जनरल यांचा भ्रामक युक्तिवाद त्यानें फार उत्तम तऱ्हेनें खोडून काढला आहे. त्यानें लिहिलें आहे कीं, "आप्पासाहेबास राज्यावरून काढून राज्य मेहेरबानीनें देणगी म्हणून रघूजीस दिलें म्हणून दत्तकाचा हक्क गेला या युक्तिवादांत कांहीं अर्थ नाहीं. आप्पासाहेबानंतर रघूजीशीं जो तह झाला तो इतर संस्थानिकांप्रमाणेंच रघूजीसहि लेखून त्याच नात्यानें झाला. दत्तकाचा अधिकार नाहीं अगर या बाबतींत इतर संस्थानिकांहून कांहीं कमी हक्क रघूजीस राहतील असें तहांत कोठें नमूद केलें नाहीं. उलट राज्य रघूजीस वंशपरंपरा कायम राहील असेंच लिहिलें आहे व हिंदु शास्त्राप्रमाणें व चालीरीतीप्रमाणें राणीस दत्तक घेण्याचा अधिकार असतो हें तत्त्व जेंकिन्सच्या रिपोर्टापासून नागपुरच्या गादीसंबंधीं वेळोवेळीं मान्य करण्यांत आलें आहे."

राणीनें आतांपर्यंत दत्तक कां घेतला नसावा याबद्दल कर्नल लो यानें लिहिलें आहे कीं, "राजा मेल्याबरोबर रेसिडेंटानें एकदम सर्व राज्य, व खजिना आपल्या ताब्यांत घेतला. लष्कर जय्यत तयार ठेवलें. असें करण्यांत रेसिडेंटाचा जरी कांहीं दोष नसला तरी पण त्याचा अप्रत्यक्ष परिणाम हाच

होणार कीं धिटाईनें आपला दत्तक घेण्याचा हक्क राण्यांनीं सांगणें शक्य नव्हतें. योग्य मार्ग म्हटला म्हणजे हाच आहे कीं रेसिडेंटानें सर्व मोठमोठे लोक बोलावून राण्यांची दत्तकाबद्दल काय इच्छा आहे हें उघडपणें विचारावें व कोणी अगर कोणास दत्तक घ्यावें याबद्दल कांहीं तंटा अगर मतभेद असल्यास त्याबद्दल चर्चा करून योग्य निवड करून दत्तक ठरवावा व संस्थान कायम ठेवावें. राजानें रेसिडेंटाशीं दत्तकाच्या बाबतींत कांहीं भाषण केलें नाहीं अगर अशा विचित्र परिस्थितींत राण्यांनीं आपली दत्तकाची इच्छा अगर हक्क दाखविला नाहीं यावरून त्यांची दत्तक घेऊं नये अशीच इच्छा आहे अगर त्यांना दत्तक घेण्याचा हक्क नाहीं असें म्हणतां येणार नाहीं. राज्याची पुढील व्यवस्था ठरविणें हें सर्व रेसिडेंटाच्या हातांत होतें हें बाकाबाई, राण्या व इतर मुत्सद्यांना माहित होतें. **बांकाबाईनें** व इतर मुत्सद्यांनीं 'कोणी तरी दत्तक बसवून राज्य चालवावें' अशी इच्छा पहिले पासून रेसिडेंटास कळविली होती व पुढें स्वतः रेसिडेंट आपणास विचारील अगर रेसिडेंट गव्हर्नर जनरल याच्या हुकमाची वाट पहात असेल अशा भरवंशावर हे सर्वजण स्वस्थ बसले. असाहि बराच संभव आहे कीं रेसिडेंटानेंहि त्यांना वरिष्ठांच्या हुकमाची सबब दाखविली असेल. परंतु यांपैकीं खरी स्थिति आपल्या पहिल्या रिपोर्टांत न दाखवितां रेसिडेंटानें उलट असें भासविलें कीं राजालाहि स्वतः दत्तक घेण्याची इच्छा नव्हती, अगर आपल्या मागें आपल्या राण्यांनीं दत्तक घेऊन गादी पुढें चालवावी अशीहि त्याची इच्छा नव्हती. आपला अधिकार दत्तक घेतल्यास आपल्या सुनेच्या हातांत जाईल म्हणून बाकाबाई दत्तकाच्या विरुद्ध होती. बांकाबाईच्या व गत–राजाच्या इच्छेमुळें राणीच्या मनांतहि दत्तक घेण्याचें नव्हतें म्हणूनच आतांपर्यंत दत्तक घेतला गेला नाहीं अगर दत्तकाबद्दल आपली इच्छाहि कोणीं मजजवळ दर्शविली नाहीं." परंतु यांतील प्रत्येक गोष्ट वस्तुस्थितीस सोडून होती. **मॅनसेल**, लॉर्ड **डलहौसी** व कौन्सिलचे इतर मेंबर्स याच्या नीतिमत्तेस या गोष्टीनें कलंक लागला आहे व त्याच्या उलट कर्नल **लो** याची उज्वल नीतिमत्ता उठावदार रीतीनें स्पष्ट दिसून येत आहे.

**मॅनसेल** यानें नंतर ज्या शिफारसी केल्या त्यांत "एखादा दत्तक बसवून नागपुरास एक लहानसें नांवापुरतें संस्थान चालवावें

व त्यास सरासरी सहाव्या हिश्शाचें उत्पन्न ठेवावें म्हणजे बरें दिसेल " अशी शिफारस केली. परंतु ग. ज. यानें ती धुडकावून लावली व लिहिलें कीं " असें होतें तर ही शिफारस पूर्वींच करावयास पाहिजे होती. आतां विलायतेपर्यंत सर्व गोष्टी ठरून गेल्या आहेत. आतां मॅनसेल यानें अशी शिफारस करावी हेंच आश्चर्य आहे " याप्रमाणें मॅनसेलची कानउघाडणी करण्यांत आली. मॅनसेल यानें बाकाबाई व इतर राण्या यांना देण्याच्या तहाहयात नेमणुकींबद्दल पुढीलप्रमाणें शिफारसी केल्या होत्या.

बांकाबाई-- वार्षिक एक लक्ष वीस हजार रु.

अन्नपूर्णाबाई-- ,, ,, साठ हजार रु.

दुसऱ्या राण्या--प्रत्येकीं वार्षिक चाळीस हजार रु. (दुर्गाबाई, आनंदीबाई, कमळजाबाई).

आप्पासाहेबाची बायको सावित्रीबाई--वार्षिक दहा हजार रु.

नाटकशाळा व इतर बायकामंडळी-- " वीस हजार रु.

राजाची एक अनौरस मुलगी व नातू यांसहि कांहीं नेमणूक देण्याबद्दल शिफारस केली होती.

गव्हर्नर जनरल यास ह्या रकमा जास्त वाटल्या. " साताऱ्चें राज्य इ. स. १८४८ मध्यें खालसा केलें तेव्हां दत्तकास १६ लक्ष रु. चें जवाहिर व वीस हजारांचें जमीनीचें उत्पन्न व राण्यांस प्रत्येकीं पंचेचाळीस, तीस व पंचवीस हजारांची नेमणूक करून दिली होती व साताऱचें राजघराणें सर्व मराठ्यांत श्रेष्ठ त्या मानानें ह्या नेमणुका फार आहेत." या सबबीवर ग. ज. यानें पुढील नेमणुका ठरविल्या.

बांकाबाई--एक लक्ष वीस हजार रु.

वडील राणी अन्नपूर्णाबाई--पन्नास हजार रु.

इतर राण्या--प्रत्येकीं पंचवीस हजार रु.

सावित्रीबाई (आप्पासाहेबाची बायको)--दरसाल दहा हजार रु.

इतर--वीस हजार रु.

याशिवाय नागपुरच्या गोंडराजाला नागपुर दरबारांतून पूर्वींपासून मिळत असलेलें १। लक्ष रुपयांचें पेन्शनहि त्यास पूर्वींप्रमाणें मिळत जावें असें ठरलें

राजवाड्यांत खाजगी इस्टेट वीस लक्ष रुपये रोकड व ५० ते ७५ लक्षांचें जवाहीर होतें. जवाहीर विकून व वरील रक्कम मिळून सर्व रकमेचा एक " भोंसले घराण्याचा निधि " करण्यांत यावा व तो घराण्याच्या मुख्य पुरुषाच्या ताब्यांत राहून घराण्यांतील इतर लोकांनाहि त्यांतून नेमणुका द्याव्या, अशी मॅनसेल यानें शिफारस केली होती. ती ग. ज. यास पसंत पडून अवश्य तेवढें अंगावरील जवाहीर ठेवून बाकीचें विकून सर्व मिळून " भोंसले-फंड " म्हणून एक निधि ठेवण्याचा त्यानें हुकूम दिला. भोंसले घराण्यांतील कोणी पुरुष न राहिल्यामुळें " भोंसला " कोणीहि राहिला नाहीं हें नीट लक्षांत ठेवण्याबद्दलहि सूचना मॅनसेल यास दिली गेली. पुढील पत्रव्यवहारांत सावधपणें भोंसले घराण्याचा उल्लेख करण्याबद्दलही एक सूचना केली.

या भोंसले फंडांतून एखादें चिरस्थायी लोकोपयोगी काम भोंसले घराण्यानें करावें अशीहि सूचना मॅनसेल यानें केली होती. त्याच्या मतानें कन्हान नदीवरील पूल अगर एखादें कॉलेज या पैशांचे कांहीं भागांतून काढून त्यास भोंसल्यांचें नांव द्यावें असें होतें.

मॅनसेल यानें भोंसल्यांचें एक लहानसें संस्थान ठेवावें म्हणून जी शिफारस केली त्यामुळें गव्हर्नर जनरलाचें पित्त इतकें भडकून गेलें कीं त्यानें आपल्या उत्तरांत त्याची चांगली खरडपट्टी काढली व अनेक कारणें दाखवून त्यास कमिशनरचे कामास नालायक ठरविलें व त्याच उत्तरांत लिहिलें कीं तुमचे जागीं दुसरा मनुष्य येईल त्यास चार्ज देऊन तुम्हीं मोकळें व्हावें. तुमच्या जोगी दुसरी एखादी जागा तुम्हांस देण्यांत येईल. मॅनसेलच्या रिपोर्टांत एक वाक्य असें होतें कीं " राजास ज्या ज्या सुधारणा मी रेसिडेंट या नात्यानें सांगत होतों त्या राजानें न ऐकल्यामुळें त्याच्यामध्यें व माझ्यामध्यें जे झगडे झाले त्यांच्या त्रासामुळें राजाची प्रकृति जास्तच बिघडून त्यास मरण आलें." ह्या वाक्याचाहि गव्हर्नर जनरलनें फायदा घेतला व मॅनसेल यास नालायक म्हणून शिक्का दिला. त्याचे जागीं कॅ. **ईलियट** याची कमिशनर म्हणून नेमणूक झाली.

मॅनसेल यानें इतर सुधारणा सुचविल्या होत्या; त्यांत दोन महत्त्वाच्या आहेत. एक इंग्लंडच्या धर्तीवर कांहीं जमिनी पूर्ण हक्काच्या म्हणून लोकांना

विकावयाच्या. सरकारी जमाबंदीच्या पंचवीस पट रक्कम घेऊन ती जमीन पूर्ण मालकीच्या हक्कानें सरकारनें लोकांस विकावी म्हणजे त्या जमिनी-पासून पुढें सारा घेण्याचा हक्क राहिला नाहीं अशी ही योजना होती. यामुळें सरकारास बरीचशी रक्कम एकदम मिळेल अशी कल्पना होती पण अशा जमिनी एकंदर जमिनीच्या एक चतुर्थांशापेक्षां जास्त देऊं नयेत व ज्या द्यावयाच्या त्या पडीत व लागवडीस न आलेल्या जमिनींपैकींच द्यावयाच्या अशीही योजना होती. ह्या विषयाचा पुढें बराच उहापोह झाला हें पुढें दिसून येईल.

**मॅनसेलची एंजिनियरिंग कॉलेजची योजनाः— मॅनसेलची** दुसरी शिफारस म्हणजे एंजिनियरिंग व उद्योगधंदे शिकविणारें एक कॉलेज स्थापन करावयाचें. मॅनसेलचें म्हणणें कीं "लहान[1] सहान कारकून, मुलकी व पोलिस अधिकारी निर्माण करणें हें निरर्थक आहे. सर्वसाधारण जनतेची सुधारणा करणें, व्यापार, कारखाने, शेती व तत्संबंधीं शास्त्रें यांत लोकांचा प्रवेश सुगम करणें हें काम आपण केलें पाहिजे. तुम्ही म्हणाल तर असें कॉलेज नागपुरास काढण्याबद्दलची सविस्तर योजना मी तयार करून पाठवितों व हें कॉलेज एक राष्ट्रीय संस्था म्हणून आपल्या राज्याचे स्थापनेचें एक स्मारक म्हणून राहील व तिचा परिणाम सर्व देशभर होईल." यापेक्षां जास्त कळकळीचे विचार कोण इंग्रज काढूं शकेल ?

मॅनसेल याच्या पहिल्या रिपोर्टाच्या मानानें दुसरा रिपोर्ट बराच उदार-पणानें लिहिला आहे. तरीसुद्धां पहिल्याहि रिपोर्टांत राज्य खालसा करावें अशी स्पष्ट शिफारस त्यानें केली नव्हती व दुसऱ्या रिपोर्टांत तर नांवा-पुरतें तरी नागपुरचें संस्थान कायम ठेवावें अशी स्पष्ट शिफारस त्यानें केली होती. ग. ज. **डलहौसी** याच्याइतका अनुदारपणा मात्र मॅनसेलनें दाखविला नाहीं. तरी दुसरा एकादा प्रामाणिक व सरळ मनाचा रेसिडेंट नागपुरास असता तर डलहौसी याची अन्यायी वासना तृप्त झाली नसती.

मॅनसेल याचे राजकारणांतील कांहीं हस्तक होते. त्यांना पेन्शन चालू

1 Para 66 of Mansel's Report. [ Govt. Prees, Nagpur ]

होतें. परंतु त्यांना अखेरचें बक्षीस व इतरांनाहि तशीच कामगिरी करण्यास उत्तेजन द्यावें म्हणून मॅनसेल यानें खालीं लिहिल्याप्रमाणें तहाहयात जहागिरी देण्याची सूचना केली होती:–

| | |
|---|---|
| पर्वतराव गुजर – | ५००० रु. सालीना. |
| जलालुद्दीन खान – | ५००० " " |
| गणपतराव व त्याचा भाऊ | ५००० " " |
| माधवराव नारायण पंडितजी | हे नारायण गोपाळ पंडतजी याचे पुत्र |

परंतु गव्हर्नर जनरल यानें ही शिफारस मंजूर केली नाहीं.

**बांकाबाई व राण्यांचे नंतरचे प्रयत्न**–राज्य खालसा केल्यानंतर **बांकाबाईनें** ग. ज. जनरल याजकडे अनेक अर्ज पाठविले. त्यांत स्पष्ट लिहिलें कीं रेसिडेंटानें आम्हांस सर्व कांहीं तुमचे इच्छेनुसार होईल अशा थापा दिल्या व कलकत्त्याहून लिहून आल्यावर तुमच्याशीं बोलूं असें सांगून वेळ घालविला व शेवटीं तीन महिन्यांनीं येऊन सांगितलें कीं गादीस वारस नसल्यामुळें राज्य खालसा केलें. वास्तविक आम्ही व राण्या दत्तक घेण्यास तयार होतों व तसें रेसिडेंटास सांगितलेंहि होतें कीं तुमच्या व आमच्या सल्ल्यानें जो तुम्ही पसंत कराल तो दत्तक आम्ही घेऊं व नागपुरची गादी पूर्वीप्रमाणें चालू ठेवा. त्यावर रेसिडेंटानें वरप्रमाणें आम्हांस विश्वास दाखवून थांबविलें. आतांहि तुम्ही पसंत कराल तो दत्तक आम्ही घेण्यास तयार आहों. **बांकाबाईनें** पूर्वीं आपण इंग्रजांच्या किती उपयोगी पडलों व पुत्रासारखा आप्पासाहेब त्याचेहि विरुद्ध इंग्रजांस मदत केली त्याचें कांहीं तरी स्मरण ठेवा असेंहि लिहिलें.

परंतु सर्व अर्जांवर उत्तर एकच कीं वरील गोष्ट आतां पक्की ठरून गेली आहे. आतां त्यांत हात घालतां येत नाहीं.

**कलकत्त्यास हणमंतराव वकीलाची रवानगी**–– अर्जांनीं दाद लागत नाहीं असें पाहून बाकाबाईनें कलकत्त्यास दोन वकील पाठविले व गव्हर्नर जनरल यास भेटन व अर्ज देऊन गादी कायम ठेवण्याची खटपट करण्याचें त्यांना सांगितलें. ते वकील कलकत्त्यास जाऊन राहिले व त्यांनींही अनेक अर्ज केले व भेट मागितली. परंतु खमंग गव्हर्नर त्यांची भेटहि घेईना व

अर्जहि घेईना. त्यास उतर मिळालें कीं आम्ही तुम्हांस ओळखीत नाहीं, आमचा कमिशनर नागपुरास आहे. त्याचे मार्फत खुद्द राण्यांनीं काय अर्ज करावयाचे ते करावे. थेट कलकत्यास अर्ज आम्ही घेत नाहीं. बाकाबाईचा व अन्नपूर्णाबाईचा "**बापू हणमंतराव**" नांवाचा वकील या कामाकरितां बरेच दिवस कलकत्यास राहिला व त्यानें अनेक खटपटी केल्या. पण सर्व व्यर्थ गेलें.

राजवाड्यांतील व इतर ठिकाणचा माल इंग्रजी अधिकाऱ्यांनीं जप्त करून नेला. हत्ती, घोडे व इतर जनावरें उघड लिलावानें हरास करून विकलीं. राण्यांच्या ताब्यांत कांहीं दागिने व सामान ठेवून बाकीचें सर्व विकण्यांत आलें. कांहीं तेथें विकलें जाईना तें कलकत्यास नेऊन विकलें. *

---

*त्यावेळीं कलकत्यास लिलावाचा जो जाहीरनामा छापण्यांत आला होता तो खालीं लिहिल्याप्रमाणें:-

GRAND PUBLIC SALE
OF THE
NAGPORE JEWELS.
*HAMILTON AND COMPANY*
Have the honour to announce, that they have been favoured with the
COMMANDS OF GOVERNMEMT
*To submit to Public and Universal Sale,*
**THE WHOLE OF THE**
NAGPORE JEWELS,
etc., etc., etc ,

---

*These Magnificent Ornaments ( the largest and Most Valuable Collection ever exhibited in Calcutta ), are now on View at Messrs Hamilton & Company's Show Rooms.*

**THEY COMPRISE**

**DIAMONDS, of Immense Size and Weight, and of Pure Water, Set as Armlets, Bracelets, Rings and Large Diamond**

जी बाकाबाई इंग्रजांस इतकी अनुकूल होती व ज्यामुळें तिचा एवढा बडेजाव होता तिची स्थिति आतां अगदींच केविलवाणी झाली. तिच्या समोर तिच्या वाड्यांतील माल, जनावरें, खजिना व जवाहीर नेऊन भराभर विकूं लागले. १०० रु. ची वस्तू पांच रुपयांस विकली जाई. तिनें अर्ज,

---

Drops of various weights. One of these Diamonds is Considerably Larger than the 'Darya-i-Noor.'

PEARL NECKLACES, very Large and Uncommon, Single, Double and Four-Rows, with Diamond Pendants or Dook Dhookies.

LARGE EMERALD NECKLACES, Elegantly Carved and Polished. SEVERAL Superb Drop Shaped DIAMONDS and other NECKLACES, HINDOOSTANEE EAR RINGS, Very Handsome, set with Diamonds and Pearls.

VARIOUS Diamond, Ruby and Emerald JEEGAHS, SERPECHES, GOSE PAICH and RAJEH SYE or HEAD ORNAMENTS.

A VERY Elegant Diamond TORRAH or TURBAN ORNAMENT, Containing many Drops.

SEVERAL PEARL Ditto Ditto

A CHARCOBE or ROYAL DRESS COAT, Ornamented with Beautiful Diamonds, Pearls, Rubies, and Emeralds all over.

SEVERAL GOLD and Enamelled HORSE TRAPPINGS, set with Diamonds, Rubies, Emeralds Cat's Eyes; and Pearls; GUNDAS; HYKULS; KULGEE; and FLOWER ORNAMENTS for HORSES' HEADS. SADDLES; CHAR MAJAHS, or SADDLE CLOTHS, Embroidered with Diamonds, Emeralds, Rubies and Pearls.

VERY Handsome Gold and Enamelled ANKOOSES, or GUZBAGS, for driving elephants, Set with Diamonds' Rubies, Emeralds etc., Gauntlets set with Ditto, Ditto, Ditto.

प्रोटेस्ट (निषेध) वगैरे सर्व करून पाहिलें. परंतु त्यास कोणी विचारीना. तिच्याकडे कोणी जाऊं येऊं लागला तर त्याच्याकडे कमिशनरची वक्रदृष्टि होई. म्हणून तिच्याकडे कोणीहि जाईना. भंडारा जिल्ह्यांतील रामपायली परगण्याचा गोविंदराव म्हणून एक कमाविसदार होता त्यास आपला वकील

---

GOLD and Enamelled UTTER and PAUN DAUNTS, ROSE WATER SPRINKLERS, SPICE BOXES, SURROY, WATER JUGS, KULLUM DAUNS, etc. etc., Set all over with Purely White Diamonds.

A VERY Elegant Gold and Enamelled HOOKAH, Set all round with Beautiful Large and Pure Water Diamonds, with Chillum Cup, Surpose, Mouth Piece Kirrenah Mounted with Diamonds, and a Snake Embroidered with Pearls and Rubies and Large Emerald Pendants.

A LARGE number of Gold, Diamond, and Ruby Mounted Swords, PHINOCEROS HIDE SHIELDS, DAGGERS, KNIVES, BOWS, ARROWS, QUIVERS etc., etc.,

SEVERAL Very Costly SWORD BELTS and KNOTS, Studded with Diamonds, Rubies, Emeralds and Pearls.

PURE GOLD AND SILVER ORNAMENTS, viz. PAUN AND UTTER DAUNS, ROSE WATER SPRINKLERS, SPICE BOXES, SALVERS with Enamelled Work, WATER JUGS, etc. etc.

GOLD JEWELLERY; viz. Several Bracelets, Necklaces, Armlets, Waist Chains or Chunder Harrs, Ear-rings, Bangles, Anklets, Toe Rings etc. etc.

ARMOUR: viz. Steel Gauntlets, Helmets Coats, Spears, Battle Axes, Kandahs, Knives, Shields, Several of them Inlaid with Gold etc. etc.

PLATE CHESTS, Containing English made Silver. Electro-Plated Ware and Porcelain Dinner and Dessert Services to dine 100 Persons.

( CALCUTTA MORNING CHRONICLE 12–10–1855.)

म्हणून कलकत्त्यास पाठविण्याकरितां बांकाबाईनें बोलावलें. त्याप्रमाणें तो आला व बाईस भेटला. एवढ्यावरून कमिशनरानें त्यास कामावरून बडतर्फ केलें व बाईसहि लिहिलें कीं आमचे नौकरांस तुम्ही हुकूम वगैरे पाठवूं नये.

**कलकत्त्यास व नेपाळास वकील**—बाकाबाईनें नंतर त्याच गोविंदरावास आणखी लोक बरोबर देऊन कलकत्त्यास खटपटीकरितां पुनः पाठविलें. कमिशनरामार्फतहि खटपट करण्याचा प्रयत्न केला. परंतु मॅनसेलचें उदाहरण पाहून नवीन कमिशनर ही गोष्ट आपण बोलणार नाहीं असें म्हणूं लागला. बांकाबाईनें **बिजेशंकर** म्हणून मनुष्य नेपाळांत कॅ. **रॅमसे** हा रेसिडेंट होता त्याचेकडे पाठविला. हा रेसिडेंट पूर्वीं नागपुरास असि. रेसिडेंट होता. तो तरी आपल्याकरितां गव्हर्नर जनरलजवळ भीड खर्च करील अशी भोळ्या बांकाबाईस आशा वाटली. ही मंडळी रवाना झाल्याबद्दल कमिशनरानें कलकत्त्यास कळविलें. **बिजेशंकर** हा **माधवराव नारायण** व **गणपतराव** पंडितजी या दोघा बंधूंचा नोकर होता, म्हणून या बंधूंवरहि कमिशनराची इतराजी झाली. कारण माधवराव हा पूर्वीं राजातर्फे रेसिडेंटाकडे वकील होता व या नात्यानें तो इंग्रजांच्या बराच उपयोगी पडला होता. म्हणूनच त्या बंधूंना पांच हजारांची जहागीर द्यावी अशी मॅनसेलनें ग. ज. कडे शिफारस केली होती. शिवाय त्यांचा बाप नारायण गोपाळ पंडितजी हा तर आप्पासाहेबाच्या वेळेपासून इंग्रजांस अनुकूल होता. इंग्रजांस अनुकूल असल्यामुळें त्याचेवर राजाची अवकृपाहि झाली होती व रेसिडेंटाच्या वजनानें त्याला पुनः राजानें लावून घेतलें होतें. माधवरावास या बद्दल कमिशनरानें तंबी दिली व दोन्ही भावांस नौकरीवरून दूर केलें. परंतु त्यांचें म्हणणें पडलें कीं बाकाबाईनें बोलवल्यावरून आपण तिजकडे जातों येतों व तिचे म्हणण्यावरून आपण **रॅमसे** साहेबास एक पत्र दिलें. यापलीकडे आपला वरील प्रकरणाशीं कांहीं संबंध नाहीं. नेपाळच्या राजाशीं कांहीं कारस्थान करण्याकरितांच बिजेशंकर हा गेला आहे अशी कमिशनराची व गव्हर्नर जनरल यांची समजूत झाली. म्हणून कमिशनरानें माधवराव व गणपतराव यांस पकडून अटकेंत ठेवलें व त्यांची लेखी जबानी घेतली. त्यांनीं आपण दिलेल्या पत्राचा नमुना दाखविला तेव्हां कमिशनरची खात्री झाली कीं नेपाळ दरबारशीं कांहीं कारस्थान नाहीं. रॅमसेकडे पत्र पाठविण्याचें

कारण कीं **मॅनसेल** याशीं बोलतांना त्याच्या बोलण्यांत असें आलें होतें कीं **रॅमसे** यानें गव्हर्नर जनरलाकडे राजाविरुद्ध रिपोर्ट केला होता. **रॅमसे** असि. रेसिडेंट असतांना मॅनसेल प्रमाणेंच त्याचेहि राजाशीं नेहमीं खटके उडत. त्यामुळें ही आपत्ति आली व **रॅमसे** हा अनुकूल रिपोर्ट करील तर त्याचा कांहीं उपयोग होईल अशी बांकाबाईची समजूत झाली होती.

पारडी येथील सैन्य जनरल **चिंतामणराव** भाऊ याचे हाताखालीं होतें व सोनेगांवचें सैन्य **मसाजी** याचे हाताखालीं होतें. हे दोघेहि तसेच नोकरीवर कायम राहिले.

राजवाड्यांतून निरनिराळ्या वस्तू हलवून त्या बाहेर नेऊन विकण्याचें काम रोज सुरू होतें व बांकाबाईचा विरोधहि चालूच होता. हें काम करण्यांतील हस्तक **पर्वतराव गुजर** व **जमालुद्दीन** हे दोघे होते व त्यावर मुख्य अंमलदार कॅ. क्रिक्टन् हा होता. एकदां बांकाबाईनें सामान नेऊं देणार नाहीं व तुम्हीं न थांबाल तर मी राजवाड्यास आग लावून देईन, अशी आतताई सुरू केली. पण तिच्या ओरडण्यास कोण भितो? तिनें वकीलामार्फत नोटिसा दिल्या व सर्व प्रकार करून पाहिले कीं निदान जंगम माल तरी वांचावा. राजवाड्यांतील खजिन्यांतून पैसे नेऊन कमिशनरनें सैन्याचा व इतर पगार वांटण्यासहि सुरवात केली व बाई जागचे जागीं जळफळत राहिली.

**जमालुद्दीन यास मारहाण**--ता. ११-१०-१८५४ रोजीं सकाळीं **पर्वतराव** हा बाईजवळ बसला व **जमालुद्दीन** पालखींत बसून सिलेखान्यांत जाण्याकरितां चांदणी चौक म्हणून मुख्य चौक होता तेथें आला. राजवाड्यांतील लोक बदलून गेले होते व इंग्रजांचे शिपाई होते त्यांचीहि आंतून राण्यांच्या बाजूनें सहानुभूति होती. **जमालुद्दीन** पालखींतून उतरतांच राजवाड्यांतील लोकांनीं त्याचेवर हल्ला करून त्यास खूप मारलें. तो आधींच लंगडा होता त्यास लौकर पळतांहि येईना. त्याची पालखी मोडून टाकली. पाहरेकरी हांसत उभे राहिले. परंतु जमालुद्दीनच्या सुदैवानें क्रिक्टन् हा राजवाड्यांत बाहेरचे बाजूस होता। त्यास हें समजतांच तो आंत आला व त्यानें पाहरेकऱ्यांस दटावून जमालुद्दीन याची सुटका केली. ही गडबड ऐकतांच

राजवाड्यांत बरेचसे लोक जमले. सीताबर्डीसहि खबर गेली. रेसिडेंटानें कामठीवरून कांही जास्त पलटणी सीताबर्डीवर आधींच आणून ठेवल्या होत्या त्यापैकीं कांहीं लष्कर शहरांत पाठविलें व कांहीं गडबड होते कीं काय अशी भीति वाटूं लागली. पण सर्व क्षणिकच होतें. त्याच दिवशीं राजवाड्यांतून हत्यारांच्या १३ पेट्या भरून सीताबर्डीस नेल्या.

आपला कोणताहि इलाज चालत नाहीं व आतां आशा करणें व्यर्थ आहे असें समजल्यावर बाकाबाईनें व राण्यांनीं माल नेण्यास अडथळा करणें सोडून दिलें. राजवाड्याच्या आंतील टांक्यापैकीं ४ लक्ष रुपये एके वेळीं नेण्यांत आले. अन्नपूर्णाबाईच्या खोलींतल्या टांक्यांतील रुपये व मोहराहि तशाच नेण्यांत आल्या.

रेसिडेंटाच्या सांगण्यावरून बांकाबाईनें सर्व वकील व मध्यस्थी काढून टाकले व सरकार देईल तें आम्ही घेऊं असें म्हणून गादीविषयीं सर्व नाद सोडून दिला. राण्यांच्या खोल्यांत वीस हजार मोहरा होत्या. परंतु त्यांपैकीं एक हजार मोहरा त्यांनीं कमिशनराकडे पाठविल्या. बाकीच्या जबरीनें खोल्यांत घुसून घेण्याचाहि विचार चालला. परंतु गव्हर्नर जनरलानें तसें न करण्याबद्दल कमिशनराला हूकूम पाठविला.

**इंग्लंडांत बांकाबाईचे वकील**—हणमंतरावानंतर **पांडुरगपंत*** म्हणून दुसरा एक वकील बांकाबाईनें कलकत्त्यास पाठविला. शिवाय विलायतेंत जाऊन तेथें बोर्ड ऑफ डायरेक्टर्स व पार्लमेंटमध्यें खटपट करण्याकरितां तिघे वकील बांकाबाई व इतर राण्या मिळून लेखी मुखत्यारपत्र देऊन पाठविले. हे तिघे गृहस्थ मद्रासचे होते. त्यांत एक ई. **लँगले** नांवाचा युरोपियन व दोघे मुसलमान गुलाम **काईम** व सय्यद **इब्राहीम** नांवाचे होते. ते विलायतेंत गेले व तेथें त्यांनीं कंपनीचे डायरेक्टर व पार्लमेंटचे मेंबर यांच्या भेटी घेतल्या. त्यांना विलायतेंत समजलें कीं, नागपुरचा कमिशनर **प्लौडन** यानें राण्यांच्या तर्फेचे म्हणून शिवराव वगैरे नऊ आसामी कैद केले व राजवाड्यावर लष्करी पाहरा ठेवला, तसेंच कमिशनराकडून इतर रीतीनेंहि राण्यांना त्रास होत आहे. हें ऐकून त्यांनीं

---

* याचें पूर्ण नांव पांडुरंग गंगाधर पाणतावणे.

कमिशनराविरुद्ध विलायतेंत चळवळ सुरू केली व तसें पत्र कमिशनरा-मार्फत बांकाबाईकडे पाठविलें. तें अर्थात् कमिशनरास वाचण्यास सांपडलें. त्यांतील विधानें खोटीं असल्याबद्दल कमिशनरानें वरील तिघांस कळविलें. परंतु त्याचा परिणाम असा झाला कीं कमिशनरास व इंग्रज सरकारास आपला राग येईल या भीतीनें बांकाबाईनें कमिशनरामार्फत वरील तिघा वकीलांस कळविलें कीं, असें कांहीं झालें नाहीं व यापुढें तुम्हीं कांहीं खट-पट करूं नये, तुमचें मुखत्यारपत्र रद्द केलें आहे. आम्ही सर्वस्वी कमिशनर व गव्हर्नर जनरल यांच्या भरंवशावर टाकलें आहे. याप्रमाणें वरील गृह-स्थांचे सर्व प्रयत्न फसले.

**अन्नपूर्णाबाईचा मृत्यु व जानोजी दत्तक घेतला**—राज्य खालसा झाल्या पासून अन्नपूर्णाबाईनें आंथरूण धरलें व ती ता. १४–११–१८५५ रोजीं मरण पावली. त्यानंतर ( नोव्हेंबर १८५५ मध्येंच ) बाकाबाईनें **नाना अहीरराव** याचा मुलगा **यशवंतराव** यास बाकीच्या तिघी राण्यां-कडून दत्तक घेवविला व त्याचें नांव **जानोजी** असें ठेविलें. वास्तविक रघूजी मरण पावला त्याच वेळीं हा मुलगा पसंत केला होता व त्याचे बापाकडून राजाचें और्ध्वदैहिक करविलें होतें. परंतु इंग्रज सरकारची परवानगी मिळाली म्हणजे दत्तकाचा विधि व समारंभ करावयाचा होता.

**बांकाबाईचा मृत्यु**—७–९–५८ रोजीं मध्यरात्रीचे सुमारास **बांकाबाई** ही राजवाड्यांत मरण पावली. ता. ७ रोजीं सकाळीं तिनें (त्रिंबकजी) नाना अहीरराव यास कमिशनराकडे पाठविलें व अखेरची भेट घेण्या-करितां बोलावलें. रेसिडेंट हा १–२ इंग्रज अधिकाऱ्यांसह राजवाड्यांत बांकाबाईच्या खोलींत गेला. तिघी राण्या पडद्याआड पण बांकाबाईच्या जवळ बसल्या होत्या व बांकाबाई जमिनीवर आंथरुणावर होती. दत्तक **जानोजी** जवळ उभा होता. बांकाबाईचा आवाज खणखणीत असून ती पूर्ण शुद्धींत होती. दत्तक जानोजीस आतां मी तुमच्या पदरांत घालतें, तुम्ही त्याचें पितृतुल्य पालन करा व भोंसल्यांचे घराण्याचे हक्काचा पुन: विचार करण्याबद्दल तुम्ही जानोजीतर्फे खटपट करा असें तिनें **प्लौडन** यास विनविलें. तुम्ही खटपट केल्यास भोसल्यांची गादी कायम राहील

अशी माझी खात्री आहे असें तिनें सांगितलें. शेवटपर्यंत तिला आशा होती व तिची धडपड चालूच होती. पण दुर्दैवानें तिला यश आलें नाहीं. कमिशनरानें तिला आश्वासन दिलें कीं जानोजीस कांहीं उत्पन्न व सन्मानाची पदवी देऊन भोंसले घराण्याचें कांहीं महत्त्व कायम ठेवण्याबद्दल पुन्हां विचार व्हावा म्हणून मी खटपट करीन. परंतु या पलीकडे मी कांहीं आशा देऊं शकत नाहीं. त्याच दिवशीं रात्रीं ती मरण पावली. मरण समयीं तिचें वय ७७ वर्षांचें होतें.

**बांकाबाई**चें आचरण फार धार्मिकपणाचें असे. स्नान व पूजा झाल्याशिवाय ती पाणीसुद्धां पीत नसे. याप्रमाणें ४० वर्षें तिचें आचरण चालू होतें. तिच्या अखेरच्या आजारांत वैद्यांनीं औषधें आणलीं. पण स्नान न झाल्यामुळें तिनें तीं घेतलीं नाहींत. **बांकाबाई** अंतःकरणानें दयाळू व परोपकारी होती. इंग्रजांवर तिनें आमरण पूर्ण विश्वास ठेवला व जरी राज्य खालसा केल्यामळें तिच्या मनास मोठा धक्का बसला तरी तिला शेवटपर्यंत आशा वाटे कीं, इंग्रज सरकार भोंसल्यांची गादी कायम ठेवील. आप्पासाहेबाशीं द्रोह केल्याबद्दल तिला मोठा पश्चात्ताप होई.

बांकाबाई बुद्धीनें अत्यंत तीक्ष्ण असे व तिला राज्यकारभारांतल्या बऱ्याचशा गोष्टी समजत. तिचें भाल विशाल असून मुद्रा तेजस्वी असे. तिचें माहेर वऱ्हाडांतील वेणीकोठे येथील महाडिकांचें होतें.

कमळाबाई ही ता. २९–११–१८५९ रोजीं मरण पावली

**१८५७ चे बंडांत नागपुरची स्थिति–** उत्तरेकडील शिपायांचे बंडाची हकीकत नागपुरास समजतांच तेथेंहि गडबड सुरू झाली. बंगाली शिपायांतील बंडखोरांचे हेर नागपुरास येऊन गेले. कामठी येथें कांही मद्रासी पलटणी होत्या. त्याशिवाय दुसरी इंग्रजी फौज या प्रांतांत नव्हती. राजाचें जुनें बिनकवायती लष्कर टाकळी येथें होतें. त्यांत घोडेस्वारांची एक पलटण, एक पायदळाची व थोडासा तोफखाना होता. घोडेस्वारांत नागपुरच्या मुसलमानांची बरीच भरती होती व पायदळ हिंदुस्थानी लोकांचें होतें. परंतु हें लष्कर तेव्हांच बदलण्यासारखें होतें. त्यांच्यामध्यें प्रथम गडबड सुरू झाली; त्याचप्रमाणें कामठीचे सैन्यांतहि फितुर झाला. परंतु

तें सैन्य नागपुरच्या सैन्याची वाट पहात होतें. प्रथम नागपुरच्या सैन्यानें एकदम हल्ला करून कमिशनर व इतर युरोपियन अधिकाऱ्यांची कत्तल करून दारूगोळा व तोफा हस्तगत करून सीताबर्डीचा किल्ला ताब्यांत घ्यावा व मग कामठी येथील सैन्यानेंहि या सैन्यास मिळावें असा त्यांचा बेत ठरला होता. याबद्दल थोडीशी गुणगुण अधिकाऱ्यांच्या कानावर गेली होती व ते फार बारकाईनें चौकशी करीत होते. परंतु हा कट इतका दाट असेल अशी त्यांची कल्पना नव्हती.

**प्लौडन** हा या वेळीं कमिशनर होता. तो नेहमींप्रमाणें असावध राहिला. परंतु डेप्युटी कमिशनर **एलिस**[१] हा सावध होता. नवीन असल्यामुळें त्याला सर्व लोकांची विशेष माहिती नव्हती. मार्च १८५७ मध्यें पारडी येथील लष्करांत चपात्या फिरविल्या गेल्या. १३ जून रोजीं एकदम कमिशनरच्या बंगल्यावर व सीताबर्डीवर हल्ला करण्याचा त्यांचा दिवस ठरलेला होता. या कटांत नागपुरचे बरेच मुसलमान[२] प्रामुख्यानें सामील होते.

उत्तर हिंदुस्थानांत जबलपुराकडे इंग्रजी सैन्याची जरूर होती म्हणून **प्लौडन** यानें घोडेस्वारांची एक तुकडी शिवणीस पाठविण्याचा हुकूम दिला. टाकळीच्या सैन्यानें आपण होऊन कमिशनरास निरोप पाठविला कीं आम्ही जबलपुरास जाण्यास तयार आहों व कामठीचें सैन्य रवाना झालें म्हणजे दुसरे दिवशीं आम्हीं निघूं. अर्थात् आपलें जाणें लांबविण्याची व प्लौडन यास फसविण्याची ही युक्ति होती.

ता. १२ जून रोजीं **फैझबक्ष** नांवाचा एक मुसलमान व त्याचा मुलगा स्टिफन **हिस्लॉप** मिशनरी याचे बंगल्यावर रात्रीं गेले. फैझबक्षाचा मुलगा पूर्वीं हिस्लॉपच्या शाळेंत होता त्यामुळें त्याला हिस्लॉपविषयीं कळकळ असे.

१ R. S. Ellis, C. B. हा नंतर मद्रास सरकारचा चीफ सेक्रेटरी झाला

२ या पूर्वीं शहरांतील मुसलमानांत एका गोष्टीवरून नाराजी उत्पन्न झाली होती. शहराचे हद्दींत मृतांस पुरूं नये असा नवीन हुकूम अधिकाऱ्यांनीं काढला होता. तो शहरांतील मुसलमानांस न आवडून त्यांनीं त्याविरुद्ध चळवळ केली. परंतु त्याचा कांहीं उपयोग न होतां तो हुकूम त्यांना पाळावा लागला.

या दो ांनीं हिस्लॉप यास बातमी दिली कीं ३।४ दिवसांत नागपुरचे सर्व इंग्रजांची कत्तल होणार आहे म्हणून तुमचीं बायकामुलें एकदम मुंबईस पाठवा. हिस्लॉप हें वर्तमान दुसरे दिवशी **एलिस** यास सांगण्यास गेला व तें सांगत असतांच **प्लौडन** हा टाकळी सैन्यास इतक्या आतुरतेनें शिवणीस जाण्यास तयार झाल्याबद्दल शाबासकी देण्यास जातांना त्यांना भेटला. त्यालाहि हें वर्तमान हिस्लॉपनें सांगितलें.

बंडखोरांची अशी खूण ठरली होती कीं शहरांतील मुसलमानांनीं व टाकळीच्या सैन्यानें तयार रहावें व खुणेकरतां दारूचे फुगारे उडवावे. ते आकाशांत दिसतांच सर्वांनीं एकदम कमिशनरीवर व सीताबर्डीवर हल्ला करावा.

ता. १३ जून १८५७ रोजीं शनिवारीं रात्रीं दहा वाजण्याच्या सुमारास मिशन हाऊसचे जवळ "मोतीबाग" म्हणून बगीचा होता. त्यांत ४०० मुसलमान जमले व टाकळीकडून लोक येण्याची वाट पहात बसले. टाकळीचे स्वारहि घोडे तयार करून बसले. परंतु त्यांनीं पायदळांच्या लायनींत एक दफेदार पाठविला होता तो परत येण्याची वाट पहात बसले. या मनुष्यास तेथील एका मद्रासी हवालदारानें पाहिलें व पकडून सर्व कारस्थान उघडकीस आलें. हवालदारानें सर्व अधिकाऱ्यांस धोक्याची सूचना दिली व इंग्रज व ख्रिस्ती या लोकांत पळापळ सुरू झाली. सर्व इंग्रज बायकांस कामठीस रवाना केलें व तेथून लष्कर नागपुरास बोलावलें. कोणी कामठीस पळाले, कोणी सीताबर्डीच्या किल्ल्यांत आश्रय धरून बसले. इंग्रज अधिकाऱ्यांनीं सीताबर्डीच्या किल्ल्यावर बंदोबस्त करून तोफा रोंखून ठेविल्या. मद्रासी पलटणीच्या वर्तनावरून ते या बंडांत सामील होणार नाहींत अशी अधिकाऱ्यांस खात्री पटली. परंतु घोडेस्वार आपले घोडे सज्ज करून खूण मिळतांच उठाव करण्यास तयार होते. त्यांनीं एक मनुष्य पायदळांत उठावणी करण्यास पाठविला होता तो परत येण्याची ते वाट पहात होते. तिकडील बेत फिसकटल्यामुळें त्यांचा धीर सुटून ते अस्वस्थ झाले. पायदळ व तोफखाना यांच्या इमानावर नागपुरची सर्व भिस्त होती. पायदळांचे आधिकारी गैरहजर असल्यामुळें कमिशनरचा असिस्टंट **कंबरलेज** यानें पायदळाचें आधिपत्य आपणाकडे घेतलें. त्यास दिसून आलें कीं पायदळ व तोफखान्यांतील लोक बदलले नसून वाटेल

तो हुकूम ऐकण्यास तयार आहेत. हें पाहतांच **एलिस** निर्धास्त झाला. घोडेस्वारांचे पलटणींतहि लोक घाबरून अधिकारी तेथें जातांच त्यांनीं घोड्यावरील जीन उतरलें. **एलिस** व इतर अधिकारी रात्रीं शहरांत फिरले तेव्हां त्यांना सर्व स्थिरस्थावर दिसलें.

इकडे बंडखोर लोकांनीं योजनेप्रमाणें एकदम अंमलबजावणी केली नाहीं व सर्व काम अर्धवटच केलें. एकाचा विश्वास दुसऱ्यास लागेना. यामुळें सुदैवानें रात्रभर कांहीं जास्त गडबड झाली नाहीं व दारूचे फुगारे कांहीं उडाले नाहींत. एकदां बत्ती लावण्याचाच अवकाश कीं, त्याच्या ज्वाला एकदम भडकून नागपुरचें व कामठीचें सर्व सैन्य बंडांत सामील झालें असतें.

रविवारीं ( ता. १४ ) कामठीहून एकदम सैन्य बोलावण्यांत आलें. तें येतांच धरपकड सुरू झाली. कटांतील प्रमुख लोक धरून त्यांना एकदम फांशीं दिलें. घोडेस्वारांतील जो दफेदार पायदळांत गेला होता त्यासहि फांशी दिलें. त्यामुळें एकदम वचक बसला. शहराच्या सर्व लोकांचीं हत्यारें काढून घेतलीं. फैझबक्ष यास एकदम शहर–कोतवालाची जागा मिळाली व त्यानें कटवाल्यांना हुडकून काढून कडक शिक्षा देवविल्या.

मराठे मंडळींतहि खळबळ उडाली होती व लोकांच्या टोळ्या जागोजाग हिंडत होत्या. त्यांना फक्त कोणी पुढारी पाहिजे होता. वृद्ध **बांकाबाई** त्या वेळीं जिवंत होती. तिनें हा सर्व जमाव राजवाड्यांत बोलावला व कोणीहि कांहीं गडबड करूं नका असा उपदेश केला. त्यांतील प्रमुख लोकांस तर तिनें रोज आपलेकडे येऊन हजेरी देण्यास सांगितलें. व कोणीहि बंडांत समील आहे असें मला समजलें कीं तो जरी माझा आप्त असला तरी मी त्याला धरून देईन अशी भीति घातली. त्या वेळीं बांकाबाईच्या चिथावणीचा एक शब्द पुरे होता कीं सर्व नागपुरभर एकदम भडका उडाला असता. तिनें पूर्वीं बरींच वर्षें राज्याचीं सूत्रें हलविलीं होतीं व त्यामुळें सर्व प्रमुख लोकांवर तिचें बरेंच वजन होतें. बांकाबाईचा असा कल पाहून मराठे मंडळींत पुढें कांहीं गडबड झाली नाहीं. बांकाबाईचे या वर्तनामुळेंच पुढें **जानोजीस** दत्तकपुत्र म्हणून इंग्रजांनी मान्य करून कांहीं उत्पन्न व राजा ही पदवी दिली.

**तफज्जुल हुसेनखान**—हा टाकळीच्या लष्करावर एक कप्तान होता. त्यानंतर पोलीस स्वारांचा रिसालदार म्हणून त्यास नेमलें होतें. टाकळीचें लष्कर बदललें म्हणून त्यांतील मुख्य ऑफिसरांना कैद करण्याचें कमिशनरानें ठरविलें. पण कोणास पाठवावें हा विचार पडला. तफज्जुलखान हा त्याच सैन्यांत पूर्वी असल्यामुळें त्यानें हें काम आंगावर घेतलें व फक्त एक शिपाई बरोबर घेऊन जाऊन त्यानें सर्व सैन्यास परावृत्त केलें व त्या अधिकाऱ्यांस कैद करून आपल्या बरोबर आणलें. त्यास पुढें सरदारबहादुर हा किताब व सहा हजार रु. उत्पन्नाची जहागीर देण्यांत आली. हा गृहस्थ पंजाबी होता. यानेंच पुरावा गोळा करून स्वारांपैकीं पांच अधिकारी व शहारांतील दोघे मुसलमान या कटांत सामील असल्याचें उघडकीस आणलें व त्यांना शहराच्या तटाच्या भिंतीवर फाशीं दिलें.

नबाब **सिद्दिक अलीखान** याचा एक मुलगा महमद **कादर अलीखान** हाहि या कटांत सामील होता असें समजलें असतां त्यासहि एकदम फाशीं दिलें.

कामठी व नागपुर येथील शेट **बनसीलाल अबीरचंद** यानेंहि सत्तावन सालचे बंडाचे वेळीं इंग्रजांस पैशानें व इतर पुष्कळ मदत दिली. त्याबद्दल त्यास रायबहादुर ही पदवी व सोन्याचें कडें बक्षीस दिलें. तसेंच नागपुरचा सावकार **तेजराम** यानेंहि तशीच मदत दिल्याबद्दल त्यासहि वरप्रमाणें बक्षीस मिळालें. या दोघांना मारवाडांत जहागिरी देण्याबद्दल जयपुरच्या राजाकडेस लिहून गेलें; परंतु त्यानें ती गोष्ट अमान्य केली. तसेंच **नागन्ना नायडू** नांवाच्या गृहस्थानेंहि कामठीस बंडाचे वेळीं फार मदत केली. त्यावरून त्यास "राजा" हा किताब देण्यांत आला. सागरचे राजे **कृष्णराव** यांनींहि बंडाचे वेळीं मदत दिल्याबद्दल त्यास "रावसाहेब" हा किताब मिळाला.

जबलपुरचे **गोकुळदास** यांसहि वरप्रमाणेंच "राजा" हा किताब मिळाला.

इतर अनेक लोकांस इनामें, पेनशनें, पदव्या [१] वगैरे बक्षिसें मिळालीं.

---

१ हिंदुस्थानी लोकांना पदव्या देण्याची कल्पना इ. स. १८२९ मध्यें प्रथम निघून ग. ज. यानें ता. ३०-५-१८२९ रोजीं हा ठराव सर्व प्रांतांत जाहीर केला होता.

नागपुरास याप्रमाणें बंडाचा स्फोट झाला नाहीं. परंतु उत्तरेकडील नर्मदा विभागांत मात्र बंडाच्या ज्वाला येऊन पोहोंचल्या होत्या. प्रांतभर आटा, चपात्या, गूळ, शेंदूर, विड्याचीं पानें, नारळ, सुपारी व लाल निशाण वगैरे बंडाच्या सूचना गुप्तपणें फिरत होत्या. त्या जिनसा पकडून, फिरविणाऱ्या लोकांना कैद करण्याबद्दलचे हुकूम सर्व इंग्रजी अधिकाऱ्यांस दिले गेले. झांशी, सागर, जबलपुर, मंडला व छत्तीसगडांत थोडीशी गडबड उडून गेली होती. बऱ्हाणपुर व अशीरगड येथील शिंद्याचें व इंग्रजांचें शिबंदी सैन्य फितूर झालें होतें. त्यांची हत्यारें हिसकून घेऊन त्यांचा लौकरच मोड झाला (जून १८५७).

**तात्या टोपे**—हा १८५८ चे आक्टोबरांत चंदेरी येथें बिटवा नदी उतरून दक्षिणेंत मेळघाटांत आला. नोव्हेंबर महिन्यांत त्यानें २५०० लोकांसह सोहागपुरावर चाल करून तें शहर लुटलें. डिसेंबरांत तो सातपुड्यांत मोटा येथें मेळघाटाच्या उत्तरेस आला मुलताई शहर त्यानें लुटून जाळलें. परंतु नागपुराहून त्या बाजूस इंग्रजी सैन्य रवाना झाल्यामुळें तो पूर्वेस वळला व त्यानें मेळघाटांतील गोंड, भिल्ल व कोरकू यांस उठविलें. त्याच वेळीं त्याचा एक हस्तक **सीताराम** यानेंहि सातपुड्याच्या उत्तरेस पुष्कळ भिल्ल जमविले. तो आपण नानासाहेब पेशव्यांचा नोकर आहों असें सांगत असे. कॅ. **कीटिंग्ज** यानें त्याचा मोड केला. **तात्या टोपे** व रावसाहेब पेशवा (नानासाहेबाचा पुतण्या) व बांदेवाले नबाब यांचा मोड झाल्यावरहि त्यांना पकडण्याकरितां जबलपुर, सागर वगैरे भागांत दहा हजार रुपये व नाना-साहेबास पकडण्याबद्दल पन्नास हजारांच्या बक्षीसाचे जाहीरनामे लागले होते (१८५८).

कॅ. **ईलियट** हा ऑफि. कमिशनर होता. तो विलायतेस रजेवर गेल्यावर जॉर्ज **प्लौडन** हा नागपुरास कमिशनर व ग. जनरलाचा एजंट झाला. त्याच्या हाताखालीं असिस्टंट एजंट म्हणून एक अधिकारी होता. **प्लौडन** हा अतिशय सुस्त व टाळाटाळी करणारा मनुष्य होता. कोणत्याहि कामाचा झटपट निकाल करणें त्याचेकडून होत नसे. स्वभावानेंहि तो विचित्र, उर्मट व अनुदार असा होता. बांकाबाई व इतर राण्या यांनीं

जानोजीस दत्तक म्हणून मंजुरी देऊन त्यास भोंसल्यांच्या नांवास साजेसें उत्पन्न व राजा ही पदवी द्यावी म्हणजे राज्य गेल्यानंतर त्याची कांहीं स्मृति तरी कायम राहील असें मागणें केलें. प्लौडननें त्यांना हो हो म्हणून थापा दिल्या. परंतु तसें वर कांहीं लिहिलें नाहीं. राजवाड्याच्या खर्चा-करितां दरमहा सात हजारांची मंजुरी आणवून तेवढें मिळेल असें एका युरोपियन अधिकाऱ्यामार्फत राण्यांस कळविलें व पुढें तपशीलवार शिफारशी करण्याचें तें मुळींच केलें नाहीं. सात हजार रुपयांत राजवाड्याचा प्रचंड खर्च, राण्या व नाटकशाळा यांचा खर्च भागेना. राण्यांना देण्यांत येणारें पेनशन कमी झालें. बांकाबाई मरण पावल्यामुळें राजवाड्यांत वजनदार कोणी राहिलें नाहीं. **दर्याबाई** वडील राणी व **आनंदीबाई** धाकटी राणी यांच्यांत कलह सुरू झाले. कांहीं मंडळी या पक्षास व कांहीं त्या पक्षास होऊन दर्याबाईच्या पक्षानें कमिशनरास अनुकूल करून घेऊन सर्व अधिकार दर्या-बाईकडे सोंपविला. ती बाई अगदींच भोळसर असल्यामुळें तिला कांहींच व्यवस्था करतां येईना. तसाच **जानोजी** हा त्रिशंकूप्रमाणें लटकत राहिला. त्याला स्वतःचें कांहींच अस्तित्व नव्हतें. राण्यांना व नाटकशाळांना कांहीं पेनशन तरी मिळे. परंतु त्याच्या दत्तकपणास सरकाराची मान्यता सुद्धां मिळाली नव्हती तर मग उत्पन्न तर दूरच. धड इकडे ना तिकडे अशी त्याची अवस्था झाली.

**कॅ. इव्हान्स बेल याची शिफारस १८५६**—कॅ. इव्हान्स बेल नांवाचा कमिशनरचा एक असिस्टंट होता. त्याचा हुद्दा असिस्टंट टु गव्हर्नर जनरल्स एजंट असा होता. रेसिडेंटाची जागा बंद झाल्यापासून नाग-पुरचा कमिशनर हाच गव्हर्नर जनरलचा एजंट होता व त्याच्या हाताखालीं हा अधिकारी होता. भोंसल्यांच्या गादीची वाताहत झाल्याबद्दल त्याला बरेंच वाईट वाटलें व या घराण्याविरुद्ध झालेला हा धडधडीत अन्याय त्याच्या लक्षांत आला. तशांत कमिशनरनें चालविलेली ही टाळाटाळ त्यानें पाहिली. शेवटीं त्यानें स्वतःच एक मेमोरँडम तयार केलें व कमिशनरामार्फत तें गव्हर्नर जनरल याजकडे पाठविलें. त्यांत त्यानें भोंसल्यांच्या विरुद्ध झालेला अन्याय उघड करून दाखविला व **जानोजी** भोंसला हा नागपुरकर भोंसल्यांचा खरा व कायदेशीर वारस असल्यामुळें त्याच्या अन्यायाचें कांहीं तरी परिमार्जन

करावें म्हणून शिफारस केली. नागपूरची गादी आतां परत मिळणें अशक्यच आहे हें त्याच्या लक्षांत आलें. पण राज्य गेलें तर गेलें, परंतु एका मोठ्या जमीनदारीवजा संस्थानाप्रमाणे तरी हें संस्थान जहागीर रूपानें अगर कसें तरी इभ्रतीनें कायम रहावें, निवळ नगदी पेन्शनरूपानें राहूं नये व जानोजी यास दत्तक म्हणून मान्य करून भोंसल्यांचें नांव नागपुरचा राजा म्हणून कायम ठेवावें असें त्यानें सुचविलें.

ही शिफारस **बेल** यानें आपला वरिष्ठ कमिशनर यास न विचारतां केली व कमिशनराकडे पाठविली. कमिशनरास तें आवडलें नाहीं व त्यावर त्यानें पुढील शेरा दिला :-

" हें मेमोरँडम बेल यानें माझी सल्ला न घेतां व मला न विचारतां तयार केलें व इतक्या आकस्मिक रीतीनें बेल साहेबाचे चमत्कारिक विचार प्रथमच मजपुढें आले आहेत. "

परंतु **बेल** एवढेंच करून थांबला नाहीं. त्यानें आपल्या शिफारसी थेट गव्हर्नर जनरलाकडे परभारेंहि पाठविल्या. **प्लौडन** यानें असिस्टंट एजंटाची जागाच काढून टाकली व **बेल** यास नागपुरच्या डेप्युटी कमिशनराच्या हाताखालीं असिस्टंट कमिशनर म्हणून नेमलें. त्या वेळीं **एलिस** नांवाचा गृहस्थ डेप्युटी कमिशनरच्या जागीं होता. राण्यांचे पगार, राजवाड्याचा खर्च व व्यवस्था हीं डेप्युटी कमिशनरामार्फत होत असे व या कामाकरितां त्यानें बेल यास वारंवार राजवाड्यांत पाठवावें. बांकाबाईनें व राण्यांनीं त्याचेजवळ वारंवार कुरकूर करावी व त्यांनीं कमिशनर हा तुम्हांस वचन दिल्याप्रमाणें लौकरच शिफारसी करील व हिंदुस्थान सरकाराकडून जानोजीच्या मान्यतेचा व उत्पन्नाचे प्रश्नाचा समाधानकारक निकाल करील असें वारंवार सांगावें. **एलिस** व **बेल** हे दोघेहि गृहस्थ प्रामाणिक व स्वतंत्र विचाराचे होते व " लो " याजप्रमाणेंच त्यांचेंहि मत होतें कीं राज्य खालसा करण्यांत त्या वेळचा रेसिडेंट व गव्हर्नर जनरल यांनीं प्रामाणिकपणाचें आचरण केलें नाहीं व कसेंहि करून नागपुरचें राज्य गिळंकृत करावें या उद्देशानें राजाचा व राण्यांचा दत्तक घेण्याचा उद्देशच नव्हता वगैरे खोटे रिपोर्ट केले व अन्यायानें हें राज्य खालसा केलें. राण्यांची केविलवाणी

स्थिति व प्लौडन याचा हलगर्जीपणा व अरेरावी यांचाहि त्यांना तिटकारा आला.

१८५७ सालचे बंडाच्या ज्वाला नागपुरापर्यंत आल्या होत्या व त्या वेळीं नुकत्याच झालेल्या अन्यायामुळें **बांकाबाई** व राजघराण्याशीं संबंध असलेले सर्व लोक नाराज झालेले होते. अशाच स्थितींत **बांकाबाईनें** जें वर्तन केलें त्यामुळें वाईट प्रसंग आला नाहीं. ही बांकाबाईची वर्तणूक नागपुरच्या अधिकाऱ्यांसमोर होती. नागपुरचा डेप्युटी कमिशनर या नात्यानें **एलिस**वर ही जबाबदारी होती. त्यास वरील सर्व गोष्टी समजल्या व त्या **प्लौडन** यासहि माहितच होत्या. तरी प्लौडन यानें त्यांबद्दल कांहींच रिपोर्ट गव्हर्नर जनरल याजकडे केला नाही.

राण्यांना ही स्थिति दुःसह झाली. १८५९च्या फेब्रुआरीमध्यें तर त्यांनीं कमिशनर यास एक व कॅ. बेल यास एक अशीं पत्रें पाठविलीं व बेल यास निरोप पाठविला कीं, या प्रकरणाचा लौकर निकाल न झाल्यास कमिशनरच्या बंगल्याच्या कंपौंडांत तंबू ठोकून आम्ही तेथें धरणें धरून बसूं. **प्लौडन** खंबीरच राहिला. परंतु कॅ. **बेल** हा स्वतः राण्यांस भेटण्यास गेला व त्यांना समजाविलें कीं, अनेक कारणांमुळें हिंदुस्थान सरकारकडून उशीर झाला आहे. तरी लौकरच निकाल होईल.

शेवटीं **बेल** यानें स्वतःच ग. ज. **क्यानिंग** याजकडे सर्व प्रकरणाचा रिपोर्ट केला व **प्लौडन**च्या सर्व वागणुकीचा उल्लेख केला. राणीकडे भेटण्यास गेल्याबद्दल प्लौडननें बेल यास दोष दिला व पुन्हा राण्यांस न भेटण्याबद्दल वचन मागितलें. बेल अशा धमकावणोस भिणारा नव्हता. त्यानें असें वचन देण्याचें नाकारलें. प्लौडन यानें रागावून बेल यास सस्पेंड केलें व ग. ज. याजकडे त्याचे विरुद्ध रिपोर्ट केला. बेल यानेंहि आपल्या तर्फेचा सर्व रिपोर्ट पाठविला.

परंतु **प्लौडन** याच्या पापाचा घडा भरत आला होता. अनेक महत्त्वाच्या कामांचे रिपोर्ट त्याजकडून न गेल्यामुळें व त्यामुळें कामाचा घोटाळा होत असल्यामुळें हा मनुष्य या जागेच्या लायक नाहीं असें ठरवून गव्हर्नर जनरल यानें त्यास कामावरून दूर केलें व बंगाल सरकारच्या ताब्यांत

दिलें (३–१०–१८५९). त्याच्या जागेवर नागपुरास डेप्युटी कमिशनर असलेला व पूर्वी ऑफि. कमिशनरचें काम केलेला मे. **ईलियट** याची नेमणूक झाली. हा मध्यंतरीं रजेवर गेला होता व नुकताच परत आला होता. त्याचे जागीं काम करीत असलेला **एलिस** हा नंतर रजेवर इंग्लंडांत गेला होता.

**एलिस** हा विलायतेंत असतांना **बेल**कडून त्याला प्लौडनला काढण्या-पूर्वींच्या सर्व गोष्टी समजल्या होत्या. प्रामाणिक **बेल** यास सस्पेंड केल्याबद्दल व भोंसल्यांची दाद अझूनहि लागत नाही या गोष्टींबद्दल त्याला वाईट वाटलें. त्यानें मोठ्या प्रयासानें नागपुरकर भोंसल्यांविरुद्ध कसकसे अन्याय झाले व त्यांचें राज्य कसें अन्यायानें खालसा झालें याची सविस्तर माहिती कागदपत्रांवरून लिहिली. त्याप्रमाणें हल्लींहि **प्लौडन** याच्या सुस्तीमुळें भोंसल्यांवर कसा अन्याय होत आहे हें स्पष्ट लिहून बांकाबाईस व राण्यांस वचन दिल्याप्रमाणें **जानोजी** भोंसल्यास दत्तक म्हणून कबूल करून त्यास कांहीं उत्पन्न व पदवी देण्याबद्दल शिफारस केली व परभारें सेक्रेटरी ऑफ स्टेटकडे सदरहू मेमोरँडम सप्टेंबर १८५९ मध्यें रवाना केलें. त्यांत बऱ्याचशा गोष्टी प्रथम उघडकीस आल्यामुळें तिकडे मोठी खळबळ उडाली व सेक्रे. ऑफ स्टेट यानें वरील मेमो. गव्हर्नर जनरलाकडे रवाना करून एक स्वतंत्र अधिकारी नेमून या प्रकरणाची चौकशी करण्यास सांगितलें व **एलिस** यासहि नागपुरास जाऊन आपल्या कामावर रुजू होण्यास व या प्रकरणाची सर्व माहिती पुरवण्यास हुकूम दिला (२३–९–१८५९). परंतु हा हुकूम कलकत्त्यास पोहोंचण्यापूर्वींच **प्लौडन** यास गव्हर्नर जनरल यानें नागपुराहून काढून टाकलें होतें. ग. ज. यानें कलकत्त्याहून प्लौडनच्या वर्तनाची चौकशी करण्याकरितां एक स्पेशल अधिकारी पाठविला व भोंसल्यांच्या पुढील व्यवस्थे-बद्दल त्वरित शिफारसी पाठविण्याबद्दल नवीन कमिशनर मेजर ईलियट यास हुकूम पाठविला.

मेजर **ईलियट** यानें आपला रिपोर्ट ता. १८–१–१८६० रोजीं रवाना केला. त्याच्या मुख्य शिफारशी पुढीलप्रमाणें होत्याः—

१ जानोजी याचें दत्तक कबूल करून त्यास तिसऱ्या रघूजीचा पुत्र म्हणून मान्यता द्यावी. भोंसले घराण्याचा मुख्य पुरुष म्हणून तो समजला जावा.

२ राजवाड्याची मालकी, व व्यवस्था त्याजकडे रहावी. राण्यांचें व इतरांचें पेन्शन त्याचेमार्फत दिलें जावें.

३ त्यास पुणें, सातारा, अहमदनगर व सोलापूर वगैरे जिल्ह्यांतील भोंसले घराण्याचें सर्व वतन व तत्संबंधीं जमिनी, मोकासे व इतर उत्पन्न दिलें जावें व त्यांच्या वतनाचें मोकासा गांव देऊन ( ता. कोरेगांव, जि. सातारा ) यावरून " देऊरचे राजेबहादुर " ही पदवी त्यास व त्याचे औरस अगर दत्तक वंशजांस वंशपरंपरा दिली जावी. फक्त चांगले वर्तनाची शर्त त्यास लागू राहील.

४ सालीना तीस ते चाळीस हजारांचें जहागिरीचें उत्पन्न जानोजीस द्यावें. शिवाय दरमहा दहा हजार रुपये म्हणजे वार्षिक १ लक्ष २० हजार रु. नगदी पेनशन त्यास दिलें जावें.

नवीन जहागीर देण्याची शर्त ग. ज. यानें कबूल केली नाहीं. बाकीच्या सर्व शर्ती मंजूर केल्या. फक्त १ लक्ष २० हजार रु. पेनशन देण्याचें तें कायमचें न समजतां प्रत्येक पिढीस त्याबद्दल फेरविचार होऊन कमीजास्त करण्याचा अधिकार हिंदुस्थान सरकारनें आपल्या हातीं ठेवला.

ग. ज. लॉर्ड क्यानिंग याच्या सहीनें ता. १०-१०-१८६१ रोजीं "राजाबहादुर ऑफ देऊर" च्या वंशपरंपरा पदवीची सनद फारशी भाषेंत लिहिलेली अशी जानोजीस देण्यांत आली.

वरप्रमाणें व्यवस्था अमलांत आली व भोंसल्यांच्या घराण्याची दुसरी पायरी संपली.

वरील जानोजी भोंसले हे डिसेंबर १८८१ सालीं मरण पावले व त्यांचे दोघे पुत्रांपैकीं राजेबहादर रघोजीराव हे विद्यमान असून राजे लक्ष्मणराव हे १९३२ सालीं मरण पावले. उभयतांसहि पुत्र आहेत. त्यांचीहि व्यवस्था वरप्रमाणेंच चालू आहे. त्यांचे धार्मिक वर्तनानें त्यांनीं सर्व जनतेंत मोठा आदर संपादन केला आहे. राजे लक्ष्मणराव हे अनेक सार्वजनिक कामांत लक्ष घालीत असत व नवीन काळांतील प्रगतीच्या ओघाबरोबर जाण्याचा प्रयत्न करीत. राजेबहादर रघोजीराव हे जुन्या वळणांतील घराण्याचे आदर्श आहेत.

**भोंसला फंड**—भोंसल्यांचें जवाहीर व इतर सामान विकलें त्याच्या किंमतीचा अंदाज ७०–७५ लक्षांचा होता. परंतु प्रत्यक्ष विकण्यांत अंदाजें २६ लक्ष रुपये आले व शिवाय ७ लक्षांची रोकड मिळाली. या रकमेचा एक "भोंसला फंड" म्हणून निधी करून ती रक्कम भोंसले घराण्याची अनामत म्हणून ठेवण्यांत यावी व तिचा विनियोग भोंसले घराण्याच्या हिताकरितां करावा असें ठरलें होतें. यामुळें त्यांचे पेनशनाच्या उत्पन्नांत भर पडून त्यांची सांपत्तिक स्थिति चांगली राहील अशी कल्पना होती. परंतु पुढें यांतच कांहीं भर घालून त्याचे व्याजांतून भोंसल्यांस पेन्शन द्यावें अशी कल्पना निघाली. जानोजीचें पेनशन वगैरे ठरल्यानंतर या भोंसले फंडाचें काय करावें याबद्दल आपल्या सूचना पाठविण्याबद्दल गव्हर्नर जनरल यानें कमिशनर यास लिहिलें (१८५९). परंतु तो फंड आतां सरकारजमा झाला असून त्यावर भोंसल्यांचा कांहीं हक्क राहिला नाहीं.

**जमीनधाऱ्याची पद्धति**— मराठ्यांच्या कारकीर्दींत नागपुर प्रांताची जमीनधाऱ्याची पद्धति मौजावार म्हणजे हल्लींच्या मालगुजारी पद्धतीची होती व सर्व गांवाचा एक ठराव असून मालगुजार प्रत्येक वहीतदारास जमिनीच्या मगदुराप्रमाणें जमीन लावून काढी. सरकारी ठराव जास्त मुदतीचा नसून फार तर ५ वर्षांचा असे. इंग्रजी अमल सुरू झाल्यानंतर हा ठराव ३० वर्षांचा केला व सर्व जमिनीची मोजणी होऊन प्रत्येक शेताचा सारा ठरविण्यांत आला. मालगुजारास त्याच्या हिश्शाबद्दल शेंकडा ४० रु. ठेवून सरकारनें शेंकडा ६० रु. घ्यावे असा ठराव केला. मालगुजारी हक्क दुसऱ्यास तबदील करतां येतो. वहीतदाराचे हक्क शेतकऱ्यांपुरते संरक्षित आहेत परंतु ते तबदील करतां येत नाहींत. शेतकऱ्यांच्या मालमत्तेस त्यामुळें किंमत नाहीं; परंतु मालमत्ता कायम राहण्याच्या दृष्टीनें ही पद्धति शेतकऱ्यांचे फायद्याची आहे. शिवाय हा कायदा सहज उल्लंघन करण्यासारखा असल्यामुळें त्याचा विशेष उपयोग होत नाहीं व हल्लींच्या सुधारलेल्या काळांत फार दिवस टिकण्यासारखा नाहीं.

**कायम धारा**—मध्यप्रांतांत कायम धाऱ्याची पद्धति सुरू करण्यासंबंधीं बरेच दिवस विचार चालू होता (१८६१ ते १८६४). इ. स. १८६०

मध्यें हिंदु. सरकारानें क० वेअर्ड **स्मिथ** नांवाचा अधिकारी उत्तरबंगाल प्रांतांत या कामाकरितां नेमला होता. त्यानें केलेला रिपोर्ट हा कायम धारा पद्धतीचा मूळ पाया समजला जातो. ही पद्धति मध्यप्रांतांत सुरू करावी असें पुष्कळ अधिकाऱ्यांचें मत पडलें. चीफ कमिशनर **टेंपल** यानेंहि तशी शिफारस केली होती. परंतु तूर्त ३० वर्षांची जमाबंदी जाहीर करावी व तिचा अनुभव पाहून नंतर वाटल्यास तो अगर पुढील जमाबंदीचा ठरलेला सारा कायमचा म्हणून ठरवावा असा सेक्रेटरी ऑफ स्टेटनें हुकूम दिला. वरील मुदतींत कायम धाऱ्याच्या पद्धतीबद्दल हिंदुस्थान सरकारचे विचार पार बदलून गेले व ३० वर्षांच्या ठरावाचें तत्त्व सर्व हिंदुस्थानभर अमलांत आलें.

वीस पट अगर पंचवीस पट सारा घेऊन कांहीं जमिनी पूर्ण मालकी हक्कानें लोकांना द्याव्या म्हणजे सरकारनें त्या जमिनीवरील दरसाल सारा घेण्याचा हक्क विक्री करावा ही पद्धतहि कायमची नामंजूर करण्यांत आली.

पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें निरनिराळे कर अमलांत होते* ते सर्व बंद होऊन नवीन तऱ्हेचे कर उत्पन्न झाले.

---

# भाग १५

# उपसंहार

मराठ्यांच्या इतिहासांत नागपुरच्या राज्यस्थापनेस बरेंच महत्त्व आहे. नागपुरकर भोंसल्यांच्या राज्यामुळें मराठी साम्राज्याची सीमा पश्चिम समुद्रापासून तों पूर्वसमुद्रास जाऊन भिडली व पहिल्या रघूजीची धडाडी त्याच्या मागील पुरुषांच्या आंगीं असती तर सर्व बंगाल, बिहार हे प्रांतहि त्यांच्या अमलाखालीं आले असते. उत्तरेकडील शिंदे व होळकर व पूर्वेस भोंसले मिळून मराठी राज्य जवळजवळ एकछत्री झालें असतें. बंगालच्या

* ह्या कराचें तपशीलवार वर्णन खालील रिपोर्टांत दिलें आहे.
Jenkins Report 1827. P. p. 118—24.
,, Supplement P. 55.

राजकारणांत इंग्रजांशीं सामना देण्यांत भोंसले अपुरे पडले व थोड्याशा धडाडीनें व चतुराईनें प्रथम जें कार्य सुसाध्य होतें तें पुढें अवघड होऊन दुःसाध्य झालें.

भोंसल्यांच्या घरगुती भांडणांमुळें जानोजी व दुसऱ्या रघूजीचा पूर्वभाग व्यर्थ गेला. तसेंच पेशवे व भोंसले यांच्या भांडणांमुळें दोघांचाहि जोर कमी होऊन दक्षिणेंतील दोघांचाहि प्रतिस्पर्धी जो निजाम त्याचा अतोनात फायदा झाला. किंबहुना त्यामुळेंच निजामाचें राज्य कायम राहिलें. या भांडणांत दोन्ही पक्षांच्याहि कमीजास्त प्रमाणांत चुका होत गेल्या. त्यांतल्या त्यांत राक्षसभुवनाच्या लढाईपूर्वी भोंसल्यांचें निजामास मिळणें व पहिल्या मराठा युद्धांत इंग्रजांकडून लुचपत घेऊन पुणें दरबारशीं विश्वासघात करणें ह्या चुक्या इतिहासांत अक्षम्य होत व अशा मनोवृत्तींचा देशांत प्रसार झाला असतां कोणत्याहि देशाचें स्वातंत्र्य चिरकाल टिकणें शक्य नाहीं. अशी अवनति वरच्या वर्गांत शिरली कीं ती खालच्या वर्गा-पर्यंत पाझरत जाते व असेंच मराठी साम्राज्याच्या उत्तर कारकीर्दीत झालें. संस्थानिक निकट स्वार्थाकडे पाहणारे, मुत्सद्दी, सैनिक, सावकार व इतर सर्वच तसे. याप्रमाणें स्थिति झाल्यावर राज्य बुडण्यास वेळ तो किती लागणार ?

वरील दोष सोडून दिले तर भोंसल्यांच्या राज्यस्थापनेमुळें या प्रांतांत मानवी सुधारणांचा प्रसार होऊन बराचसा जंगली भाग शेती, व्यापार, व उद्योगधंदे यांचा प्रसार झाल्यामुळें भरभराटीस आला. चोहोंकडून व विशे-षतः पश्चिम महाराष्ट्रांतून व वऱ्हाडांतून विद्वान् शूर व कर्तबगार माणसें येथें आकर्षिलीं जाऊन नागपुर हें अशा लोकांचें केंद्र बनलें. नागपुरच्या नामांकित पंडितांची परंपरा शेवटपर्यंत चालू होती ती भोंसल्यांच्या राजा-श्रयामुळेंच. नागपुर, चंद्रपुर, उमरेड येथील विणकामाचे धंदे यांचीहि एके काळीं जो उर्जितावस्था झाली होती तीहि त्याच कारणानें. भंडाऱ्यापासून छत्तीसगडापर्यंत अनेक तलाव, पाटबंधारे भोंसल्याच्या कारकीर्दीतच झाले व त्यामुळें शेतीस उत्तेजन मिळालें. एकंदरींत या "झाडीच्या" देशाची सर्व दृष्टीनें सुधारणा होण्यांत भोंसल्यांच्या व त्यांच्या पदरच्या लोकांचा भाग बराच मोठा आहे.

## पुरवणी १

### उमरावतीकर भोंसले

मागें लिहिल्याप्रमाणें * उमरावतीकर भोंसल्यांच्या वंशाची हकीगत पुढें दिली आहे. रूपाजी, साबाजी व रायाजी यांचा वंश खुंटल्यानंतर पुढें फक्त बापूजीचा वंश राहिला. बापूजी यास तीन पुत्र. पहिला बिंबाजी याचा पुत्र प. रघूजी हा नागपुरच्या गादीचा संस्थापक, दुसरा संताजी हा दिल्लीस पडला. तिसरा राणोजी ऊर्फ सवाई संताजी. हाच उमरावतीकरांचा मूळपुरुष. त्याचा पुढील वंश खालीं दिल्याप्रमाणें:—




राणोजी यास शाहू राजानें—९—१०—१७२२ ( राज्या. श. ४९) रोजीं उमरावती परगणे वडनेर बिबी म्हणजे वऱ्हाडांतील प्रसिद्ध उमरावती हें नांव

* पान. ५४ पहा.

मोकासा दिलें. यावरूनच राणोजी यास व त्याच्या शाखेस 'उमरावतीकर' हें नांव पडलें. उमरावतीस भोंसल्यांची गढी अद्याप कायम होती. यानंतरहि शाहूनें राणोजीस वऱ्हाड नागपुराकडील तळेगांव, गिरोली, आर्वी, नाचणगांव, कुऱ्हें, पहूर, विरूळ, गिरड व केळझर वगैरे गांवें मोकासा दिलीं. उमरावती व वरील गांवांच्या अस्सल सनदा या घराण्यांत अद्याप कायम आहेत.

माळवा, वसई, बुंदेलखंड वगैरे मोहिमांतील राणोजीच्या कामगिरीविषयीं मागें [१] वेळोवेळीं उल्लेख आलाच आहे. रघूजीप्रमाणेंच राणोजी यानें पूर्वेकडेस हातपाय पसरण्याचा उपक्रम केला होता असें दिसतें. भंडारा जिल्ह्यांतील प्रसिद्ध आंबागड किल्ल्याची एक सनद त्यानें मिळविलेली कायम आहे.

**रामाऊ भोंसली**—साबाजी मरण पावल्यामुळें त्याचे मोकासे त्याची स्त्री रामाऊ इजकडे इ. स. १७१७ मध्यें आल्याबद्दल मागें लिहिलें आहे. तीं गांवें कुमठें, मरळी व पुसें हीं ती मरेपर्यंत तिच्या ताब्यांत होतीं. रामाऊ ही सन १७५७ मध्यें मरण पावली. तिला संतति नसल्यामुळें तीं गावें नानासाहेब पेशव्यानें राणोजीकडून पंधरा हजार रुपये नजराणा घेऊन राणोजीस दिलीं. [२] तीं त्याचेकडे मरेपर्यंत होतीं. वरील राणोजीची सनद कार्तिक शु. ११ शके १६७९ (इं. ता. २१–११–१७५७) ची आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, " साल मजकुरीं रामाबाईस देवाज्ञा जाहली.

---

१ भाग ३ पहा.

२ ऐति. पत्र. ले० ९३–९४–९५ पहा. ( नाग. भों. का. प. ५८, ५९ ६१ ) साताऱ्यास रामाऊचा गोट म्हणून पेठ होती. तिचें उत्पन्न पुढें नागपुरकर भोंसल्यास मिळूं लागलें. दु. रघूजीच्या कारकीर्दींत मुधोजीचे हातची एक कलमबंदी उपलब्ध आहे तींत एक कलम खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

" सवाल ५–साताऱ्यांतील रामाऊचा गोट पूर्वीपासून चालत आला तो अलीकडे चालत नाहीं. ऐशास सुदामत प्रमाणें पेठ करून देववावी.

जबाब—नाना साहेबांचे कारकीर्दींत चालत आल्यास चालेल "

नाग. भों. का. १७ ऐ. प. १३५.

त्याजवरून तुम्ही रामाबाईचे [१] पुतणे हें जाणोन तुम्हांस तीन गांव सदरहू प्रमाणें करार करून दिले असेत."

वरील नजराणा पटविल्यानंतर सुद्धां तीन वर्षेपर्यंत या गांवांचा अंमल राणोजीस मिळाला नाहीं. त्या वेळच्या कारभाराप्रमाणें स्थानिक अधिकाऱ्यांनीं राणोजीस ताबा न दिल्यामुळें इ. स. १७६० पावेतों पेशव्यसा वरील अधिकाऱ्यांस पुनः पुन्हां हुकूम सोडावे लागले.

राणोजी भोंसल्यास शाहूकडून एकंदर ४३ गांवें मिळालीं होतीं व रघूजीनें त्यास २७ महाल दिले. त्यांत खानदेश, वऱ्हाड व हंडीया या भागांतील महालांचीं नांवें आहेत.[२] रघजी हा राणोजीस नागपुरास घेऊन आला असा बखरींत उल्लेख आहे. परंतु तो नागपुरास न राहतां उमरावतीसच रहात असावा.[३]

राणोजी हा इ. स. १७६० पर्यंत जिवंत असल्याचा लेखी दाखला सांपडतो. परंतु यानंतर इ. स. १७७३ पर्यंत त्याबद्दल लेखी दाखला मिळत नाहीं. ता. २३–४–१७७३ रोजीं साबाजी भोंसल्यानें अनंतभट चितळे [४] उमरावतीचा कमावीसदार यास हुकूम पाठविला आहे. त्यांत तो म्हणतो, "मौजे मजकूर ( उमरावती ) हा गांव पेशजी तीर्थस्वरूप कैलासवासी राणोजी बुवा भोंसले याजकडे मोकासा होता. तो हल्लीं सन ११८३ चे सालापासून चिरंजीव राजेश्री राणोजी [५] भोंसले याजकडेस मोकासा दिला आहे. तरी मौजे मजकूरचे मोकाशाबद्दल सुदामत प्रमाणें म ॥ निल्हेकडे अंमल देणें" नेहमींप्रमाणें अमल या हुकमावरहि दिला गेला नाहींच. म्हणून

---

१ छापील प्रतींत रमाबाई लिहिलें तें चुकीचें असून खरें नांव रामाबाई होतें. हें मागें सांगितलेंच आहे. ( मागें पा. ५० पहा. )

२ बखर पा. ४१ पहा.

३ उमरावतीस कुंभारवाड्यांत भोंसल्यांची गढी कायम होती. ती अलीकडे नाहींशी झाली आहे.

४ हा प० रघूजीच्या वेळचा प्रसिद्ध शिक्केनवीस असावा. तसें नसल्यास त्याचा नातू असावा.

५ हा राणोजी जिजाजीचा मुलगा व वडील राणोजीचा नातू. याचा बाप जिजाजी हा या वेळीं नुकताच कुंभारीच्या लढाईंत पडला होता.

साबाजीनें पुन्हां दुसरा खरमरीत हुकूम ता. ५-६-१७७३ रोजीं अनंत भटास पाठविला.

**राणोजीचा मृत्यु**—यावरून दिसतें कीं, राणोजी हा इ. स. १७७३ पूर्वीं कांहीं दिवस मरण पावला होता. इ. स. १७२० पासून इ. स. १७६० पर्यंत तरी या पुरुषाची कारकीर्द कर्तबगारीनें भरलेली आहे. मरणाचे वेळेस त्याचें वय ६०।७० वर्षांचें तरी असलें पाहिजे.

**धाकटा राणोजी**—राणोजीनंतर उमरावती गांवाची सनद चि. राणोजी यास दिल्याचें साबाजीच्या वर लिहिलेले हुकमांत आहे. या राणोजीचें नांव कांहीं वंशावळींत सांपडत नाहीं. परंतु एका वंशावळींत तो जिजाजीचा पुत्र म्हणून सांपडतो व वरील दोन अस्सल कागदांवरून हा वडील राणोजीचा नातू असावा हें सिद्ध होतें. याचा बाप जिजाजी हा नुकताच कुंभारीच्या लढाईंत पडला होता. नाहीं तर सनद त्याच्याच नांवानें झाली असती. शिवाजी यानें इ. स. १७७५ च्या सुमारास बंड केल्याचा दाखला आढळतो. [१]

या बंडामुळेंच उमरावतीकर भोंसल्यांचा व नागपुरकरांचा बेबनाव झाला व उमरावती वगैरे गांवें मुधोजी व रघूजी यांनीं उमरावतीकरापासून हिसकून घेतलीं. इ. स. १७९४ मध्यें नाना फडणीसानें उमरावतीकर सखोजी भोंसल्यास तीनशें स्वार घेऊन बोलाविलें. त्या वेळीं सखोजीनें नानाजवळ तक्रार केली कीं, "उमरावती हा गांव आमचेकडे चालत होता तो अलीकडे चालत नाहीं यास्तव रा. रघूजी भोंसले सेनासाहेबसुभा याजकडील कुशाबा [२] यासी बोलून उमरावती गांव व ऐवज महाल निसबत हिस्सा वाटणीप्रमाणें पावत होता तो देऊन आमचे आम्हांकडे चालतें करावें. येविसी राजश्री दाजीबा फडके व गोविंदराव पिंगळे यांस पत्रें लिहिलीं आहेत त्यांस तें बोलतील त्याप्रमाणें कामकाजाचा बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे" हें झालें म्हणजे आपण स्वारांसुद्धां येतों असें सखूजीनें कळविलें. त्यावर नानानें ता. ४-११-१७९४ रोजीं उत्तर दिलें कीं " त्याप्रमाणें पत्रें लिहीत आहोंत

---

१ मागें पान २०९ पहा.

२ चिटणीस

व सेनासाहेबाचें येणें इकडे होईल त्यावेळेस त्यांस समक्ष सांगूं. तुम्ही हुकमाप्रमाणें तीनशें स्वारानिशीं यावें."

**सखोजी**--या पत्राप्रमाणें सखोजी गेला होता अगर नाहीं हें नक्की समजत नाहीं. परंतु बहुधा तो गेला असावा असें वाटतें. या वेळेस निजामाचा व पेशव्यांचा बेबनाव झाला होता व लढाई होईल असा अंदाज दिसत होता. त्याप्रमाणें खडर्याची प्रसिद्ध लढाई झालीच (ता. ११-३-१७९५). या लढाईकरितां नानाची ही लष्कराची जमवाजमव चालली होती. नागपुरकर रघूजी भोंसल्याची फौजसुद्धां या लढाईंत मदतीस आली होती.

परंतु यानंतर उमरावती वगैरे गांवें उमरावतीकरास मिळाल्याचें दिसत नाहीं. उलट नागपुरकरांनीं उमरावतीकरास नागपुरांस आणून भंडार दरवाजाजवळ नजर कैदेंत ठेविलें.

सखोजीचा पुत्र कृष्णराव व नातू बाळासाहेब हे इंग्रजी अमदानींत पोलिटिकल पेनशनर होते. बाळासाहेब हा इंदुरासहि रहात असून त्यास तेथील दरबारांतून कांहीं नेमणूक मिळे. त्याचे मागें त्याचा पुत्र बाबासाहेब हा नागपुरास रहात असून त्यास त्याचे वडिलाचें पेनशन वगैरे कांहींच मिळत नाहीं व सांपत्तिक दृष्ट्या त्याची स्थिति खालावलेली आहे.

जिजाजी हा कुंभारीच्या लढाईंत पडल्याबद्दल मागें उल्लेख आलाच आहे.[१] त्याचा पुत्र धाकटा राणोजी यास वडील राणोजी नंतर उमरावती व[ग]रे गांवांची सनद मिळाली. पुढें याच्याहि वंशांत कोणी न राहिल्यामुळें तिसरा भाऊ सखोजी याच्या शाखेंत उमरावतीची सनद गेली व ते बरेच दिवस या गांवाचा उपभोग घेत होते. शिवाजी भोंसल्याच्या बंडानंतर तें गांव नागपुरकरांनीं त्याचेकडून काढून घेतलें व त्यांना नागपुरास आणून ठेवलें हें मागें सांगितलेंच आहे.

---

१ पान १९७ पहा (इ. स. १७७३).

# पुरवणी २

## नाग० भोसल्यांचे शिक्के.

१ परसोजी–प० सेनासाहेब सुभा
　श्रीमच्छिव प्रसन्न. परसोजी (गोल शिक्का. राज. खं. १५ पा. १०२)

२ साबाजी–प० परसोजीचा भाऊ.
　श्रीसाबाजी भोसले. (गोल शि० राज. खं. १५ पा. १०२ )

३ कान्होजी.
　श्री शाहुनृपतिनिष्ठस्य पर्सोजी तनुजन्मनः ।
　कान्होजी भोसलस्येयं भाति मुद्रा यशस्करी ।।
　　　　　　　　( राज. १५ पा. ३२८ )

४ प० रघूजी—
　प्रथमचा–पार्वतीकान्त विश्रांत मनसोति यशस्विनः ।
　　　　बिंबात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते ।।
　नंतरचा—
　　　　श्रीशाहुराजपदांभोजभ्रमरायितचेतसः ।
　　　　बिंबात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते ।।

५ जानोजी– प० रघूजीचाच शिक्का याचे वेळेसहि सांपडतो.

६ मुधोजी—
　शाहुराजप्रसादेन रघूजी सुयशोधरः ।
　तत्सूनोस्तु मुधोनाम्नस्तस्य मुद्रा विराजते ।।

७ साबाजी—
　रघुवीर चरणी तत्पर
　साबाजी भोंसले निरंतर

८ दु. रघूजी—
　राजाशाहुपदांभोज भ्रमरायितचेतसः ।
　जानुपुत्रस्य मुद्रैषा राघवस्य विराजते ।।

९ रायाजी—
　श्रीमच्छाहूपदासक्त कान्होजी पुण्यजन्मनः ।
　रायाजी　....　....　....　।।

## पुरवणी ३

### मध्यप्रांताचे चीफ कमिशनर व गव्हर्नर

( म. प्रां. सिव्हिल लिस्टवरून )

| No. | Name | Date of assuming charge of office. | No. | Name | Date of assuming charge of office. |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Col. E. K. Elliot .. | 11 12 61 | 7 | Col. R. H. Keatings, V.C., C.S.I , Offg. | 8 7 70 |
| 2 | Lt. Col. J. K. Spence, Offg. | 27 2 62 | | Mr. J. H. Morris, C.S.I. . | 6 7 72 |
| 3 | Mr. Richard Temple, Offg. | 25 4 62 | 8 | Mr. C. Grant, Offg. .. | 11 4 79 |
| | Col. E. K. Elliot .. | 18 12 63 | | Mr. J. H. Morris, C.S.I... | 15 11 79 |
| 4 | Mr. J. S. Campbell, Offg. | 12 3 64 | 9 | Mr. W. B. Jones, C.S.I... | 30 4 83 |
| | Mr. Richard Temple .. | 17 3 64 | 10 | Mr. C. H. T. Crosthwaite | Officiating 1 4 84 Confirmed 27 1 85 |
| | Mr. J. S. Campbell, Offg. | 24 4 65 | 11 | Mr. D. Fitzpatrick | 15 12 85 |
| | Mr. Richard Temple .. | 6 11 65 | 12 | Mr. J. W. Neill, Offg. .. | 19 2 87 |
| 5 | Mr. J. H. Morris, C.S.I., Offg. | 4 6 67 | 13 | Mr. A. Mackenzie, C. S. I. | 24 3 87 |
| 6 | Mr. G. Campbell .. | 27 11 67 | 14 | Mr. R. J. Crosthwaite .. | 22 7 89 |
| | Mr. J. H. Morris, C.S.I... | officiating 16 4 68 Confirmed 27 5 70 | 15 | Mr. J. W. Neill .. | 18 11 90 |

| No. | Name | Date of assuming charge of office. | No. | Name | Date assuming charge of office. |
|---|---|---|---|---|---|
| | Mr. A. P. MacDonnel, C. S. I. | 28 1 91 | 22 | The Hon. Mr. J. O. Miller, C. S. I. | 4 5 05 |
| 16 | Mr. J. Woodburn, C. S. I. | Officiating 28 5 93 Confirmed 1 12 93 | 23 | The Hon. Mr. S. Ismay, C. S. I. | Officiating, 27 7 06 to 2 10 06 |
| 17 | Sir C. J. Lyall, K.C. S.I., C. I. E. | 21 12 95 | 24 | The Hon. Mr. F. A. T. Phillips, I. C. S. | S. p. t. 5 to 24 3 07 |
| 18 | The Hon. Mr. D. C. J. Ibbetson, C. S. I. | 14 7 98 | 25 | The Hon. Mr. R. H. Craddock, C. S. I., I. C. S. | 25 3 09 |
| | | | | The Hon. Mr. F. A. T, Phillips, I. C. S. | Officiating, 20 5 09 |
| 19 | The Hon. Sir. A. H. L. Fraser, K. C. S. I. | Officiating 28 11 99 Confirmed 6 3 02 | | The Hon. Sir R. H. Craddock, K. C. S. I., I. C. S. | 22 11 09 |
| 20 | The Hon. Mr. J.P.Hewett. C. S. I., C. I. E. | Officiating 16 9 02 Confirmed 2 11 03 | 26 | The Hon. Mr. H. A. Crump, C. S. I., I. C. S. | S. p. t. fr. 26 1 12 to 16 2 12 |
| 21 | The Hon. Sir. F.S.P.Lely, K. C. I. E., C. S. I. | Officiating 18 3 04 Confirmed 23 12 04 | 27 | The Hon. Mr.M, W. Fox-Strangways, C.S. I.,I.C.S. | S, p, t, fr, 17 2 12 |
| | | | 28 | The Hon. Sir B.Robertson, K. C. S.I.,C.I.E.,I.C.S.. . | 3 8 12 |

| No. | Name | Date of assuming charge of office |
|---|---|---|
| | The Hon. Mr. H. A. Crump, C. S. I., I. C. S. .. | Officiating 1 1 14 to 8 4 14 |
| | The Hon. Sir B. Robertson, K. C. S. I., K. C. M. G., C. I. E., I. C. S. | 9 4 14 to 25 1 20 |
| | The Hon. Sir F. Sly, K. C. S. I., I. C. S. | S. p. t. 26 1 20 to 16 12 20 |
| | *Governors* | |
| 29 | H. E. Sir F. Sly, K. C. S. I., I. C. S. | 17 12 20 to 25 1 25 |
| 30 | H. E. Sir M. S. D. Butler, K. C. S. I., C. B., C. I. E., C. V. O., C. B. E., I. C. S. | 26 1 25 |
| 31 | H. E. Mr. J. T. Marten, C. S. I., I. C. S. | officiating 20 8 27 to 16 12 27 |
| | H. E. Sir M. S. D. Butler, K. C. S. I., C. B., C. I. E. C. V. O., C. B. E., I. C. S. | 17 12 27 to 29 11 29 and from 29 3 30 |
| 32 | Hon. Mr. S. B. Tambe | 30 11 29 to 28 3 30 |
| | H. E. Sir A. E. Nelson, K. C. I. E., O. B. E., J. P., I. C. S. | Acting, 30 7 32 to 24 11 32 |
| | H. E. Sir M. S. D. Butler, K. C. S. I., C. B., C. I. E., C. V. O., C. B. E., I. C. S. | 25 11 32 to 15 9 33 |
| 33 | H. E. Sir H. C. Gowan, K. C. S. I., C. I. E., V. D. I. C. S., J. P. | 16 9 33 up to date |

## नागपुरकर भोंसल्यांची वंशावळ




---

## करांडे सरदार ( मराठे )




पुढें माहिती मिळत नाहीं.

---

## नागपुरकर भोंसले (पुढें चालूं)

**पहिला रघूजी** से. सा. ३ = १ सकवारबाई, २ सुलाबाई वगैरे १३ बायका.
(उ० बाबासाहेब) (मृ. ता. १४–२–१७५५ इ.)

- १ **जानोजी** से. सा. मु. ४ (मृ. २१–५–१७७२) =दर्याबाई
  - दु० रघोजी (बापूसाहेब दत्तक) से. सु. ५ (मृ. २२–३–१८१६) = १ गोजराबाई २ पार्वतीबाई ३ अंबिकाबाई ४ बांकाबाई
    - १ परसोजी बाळासा० — १ काशीबाई, २ अहिल्याबाई ३ दुर्गाबाई
      - ति. रघूजी दत्तक
    - २ बनूबाई =व्यंकटराव गुजर
    - ३ साळूबाई
    - ४ गंगाबाई
- २ मुधोजी (आप्पा०) सेनाधुरंधर (मृ. १३–५–१७८८) = १ चिमाबाई २ कमलजाबाई.
  - १ रघूजी (जानोजीस दत्तक)
  - २ खंडोजी उ० चिमणाबापू मृ. १६-८-१७८९
  - ३ व्यंकोजी उ० मन्याबापू.
    - मुधोजी उ० आप्पासाहेब=१ उमाबाई २सावित्रीबाई (मृ. १५–७–१८४०)
  - ४ बाळाई =मोहिते
  - ५ ठकूबाई =गुजर
  - ६ झिंगराबाई =मोहिते
- ३ साबाजी (नाना) (मृ. इ. १७७५) = सगुणाबाई
  - ०
- ४ बिंबाजी (आबा) = १ उमाबाई (सती) २ आनंदीबाई (मृ.७–१२–१७८७)
  - ०

## नागपुरकर भोंसले (पुढें चालूं)

तिसरा रघूजी से. सु. ८
(दुर्गाबाईस दत्तक) – बायका ८
(मृ. ११–१२–१८५३ इ.) यानंतर राज्य खालसा

जानोजी (पेनशनर) = बायका ६ अंजीराबाई, काशीबाई वगैरे
(त्रिबकजी उ. नाना अहिरराव याचा हा मुलगा यशवंतराव तिसऱ्या रघूजीचे बायकोस दत्तक दिला) मृ. डिसेंबर १८८१

मा. अंजीराबाई

- १ पुत्र — राजेबहादूर रघूजीराव (विद्यमान)
  - कु. फत्तेसिंगराव वि.
  - कु. जयसिंगराव वि.

मा. काशीबाई—

- २ पुत्र — राजे लक्ष्मणराव (मृ. १९३२)
  - १ प्रतापसिंह
  - २ राजारामसिंह
  - ३ विजयसिंह
  - ४ तेजसिंह
  - (सर्व विद्यमान)
- ३ भागिरथीबाई = मोहिते.
- ४ पार्वतीबाई = मोहिते
- ५ बनूबाई = शिरके

**उमरावतीकर भोंसले** (पुरवणी १ पहा )

मूळ पुरुष (बापूजीचा पुत्र)

राणोजी ऊ. सवाई संताजी (मृ अजमासें १७७० इ.)



## अहीरराव, नागपूर (मराठे)

मूळ मालजी अहीरराव प्रथम नागपुरास आला.
त्याचा पुत्र लक्ष्मणराव.




---

## कप्तान* (ऋ. दे. ब्रा.) नागपूर

आनंदराव (आप्पा) रिसालदार.




*आनंदराव दारव्ह्याहून आले. अरबांचे रिसालदार. चिंतामणराव सोनेगांवचे भोंसल्यांचे लष्करांत प्रथम मेजर व नंतर जनरल झाले (१८५३).




कोन्हेरराम कोल्हटकराचे आश्रयानें नागपुरास येऊन राजोपाध्ये झाले.

कृष्णभट– रतनपुर येथें बिंबाजीचा कारभारी.

मनभट– आप्पासाहेबाचा कारभारी.

या शिवाय रहाळकर यांचें घराणें उपाध्ये म्हणून आहे

———




बाळाजी हा दु. रघूजीचे वेळेस खजिन्याचें व काळीच्या उत्पन्नाच्या हिशेबाचें काम करीत असे.

नारायण काशी हा सदर खजानजी होता.

विठ्ठलराव हे इंग्रजींत मुनसफीचें काम करीत होते.

विनायकराव हे सुशिक्षित असून कौन्सिल ऑफ स्टेटचे मेंबर आहेत.

मुधोजीचा दिवाण रामाजी केशव तिखे याचे मार्फतीनें त्याचा आप्त उमाजी महादेव हा सिलेखान्यावर व फडणीसाचे कामावर आला. त्याचे हाताखालीं बाळाजी केशव हा होता. उमाजी महादेवाचे मृत्यूनंतर बाळाजीसच तें काम दिलें. उमाजीचा पुत्र विश्वनाथ हा इ. स. १८०४ मध्यें यशवंतराव होळकराकडे वकीलीस असतांना होळकर इंग्रजांच्या एका लढाईंत मरण पावला. दुसरा मुलगा महादजी हा नागपुरास होता. त्यास बाळाजीकडून त्याचे हक्काबद्दल कांहीं नेमणूक मिळत असे.

बाळाजी केशव याचा मुतालिक सदाशिव जगन्नाथ आबदेव म्हणून होता. याचेंहि घराणें नागपुरास आहे.

---




१. भवानीपंत हे वऱ्हाडांतील मंगरूळ तालुक्यांतीक खडी–धामणी वगैरे गांवांचे वतनदार कुळकर्णी दारव्ह्यास साबाजीकडे गेले. तेथून जानोजीनें नागपुरास नेले.

२. प. रघूजीचे वेळेस व्यंकाजी व राघोपंत हे बक्षी होते. जानोजीनें त्यांचे घराण्यांतून बक्षीगिरीचें काम काढून भवानी काळोस दिलें. त्यानें तें आपला पुतण्या पांडुरंग गणेश यास दिलें. तें या घराण्यांत शेवटपर्यंत चालू होतें.

३. शिवराव हा ति. रघूजीचे वेळेस नागपुरास सदर दिवाणी कोर्टावर मुख्य होता.

———

## कोठेकर ( ऋ. दे. ब्रा.)

आनंदराव
|
भालचंद्र दाजी
|
त्रिंबकराव

(हल्लीं वंशज नागपुर, बालाघाट वगैरे ठिकाणीं आहेत.)

---

१ बखर पान १८३ पहा.

गंगथडींत (निजामराज्य) कोठें म्हणून गांव आहे तेथील राहणारे. गंगथडीचा सुभा भोंसल्यांकडे होता तेथें सुभेदार होते. तेथें भाऊबंद आहेत. (११९९ फ. ते १२१३ फ.) ब. पा. १६४ टीप पहा

---

## खळदकर–दिग्रस (मराठे)

खांबोजी (प. रघूजीचे वेळेस नाग०स आला.)




---

१ मूळ पुरूष जेजुरीजवळ खळद गांवचे पाटील.

२ इतर शाखेचेहि वंशज जागोजाग आहेत.

३ माधवराव आप्पासाहेबाचे वेळेस होता.

**कोल्हटकर–मुजुमदार** (कों. ब्रा.)

रामाजी नारायण ( रा. पांडववाडी नजीक, वाई)




१ कोन्हेरराम प. रघूजीचा दिवाण. २ भास्करराम– बंगाल्यांत खून. ३ रामचंद्र काशीकडे वऱ्हाडचा सुभा होता तो त्याचे अज्ञानपणांत ताईचा मानलेला भाऊ कृष्णाजी गोविंद हा करीत असे. कृष्णाजी याचें ठाणें पातुर येथें असे. ताई व कृष्णाजी पातुरासच रहात होते.

---

घाडगे, नागपूर (मराठे)

बाजीराव




---

**खांडेकर** ( कऱ्हा. ब्रा).

संभाजी




१ या घराण्याची एक शाखा फडणीस म्हणून साताऱ्यास आहे.
२ माहिती गणपतराव खांडेकर रा. उज्जनी यांजकडून.

---

**चिटणीस** (मुतालिक) प्रभु

यशवंत ( जानोजीचे वेळेस )




---

खेर (कऱ्हा. ब्रा. सागरचे राजे)

गोविंदपंत बुंदेले. (१७३१-६१)




१ राधाबाई व रखमाबाई यांस अडीच लक्ष रु० पेनशन मिळत असे.

२ बळवंतरावापासून जबलपुरास राहण्याचा हुकूम आहे. पेनशन हल्लीं सालिना पांच हजार रुपये मिळतें.

---

२ गुजर नागपूर (मराठे)

नवलोजी = ठकूबाई (मुधोजीची मुलगी)

|

गुजाबादादा (आप्पासा० व तिसरे रघूजीचे वेळीं)

|

यशवंतराव = सख्याबाई.

|

नवलोजीराव (दत्तक)

(अपघातानें मृत्यु. ता. १-९-१९०८)

पुढें वंश नागपुरास

---

शिवाय एक शाखा—पर्वतराव व त्याचा पुत्र पांडुरंगराव.

---




१ पुढें वंश दमो जिल्हयांत असून त्यास कांहीं पेनशन मिळतें. पान नं. ५६८* पहा.

**१ गुजर** नागपूर (मराठे)

मूळ जानराव गुजर प. रघूजीबरोबर आला. त्याचा पुत्र

सिदोजी गुजर ( ब. ३४) वामनराव गुजर (ब.५२)

व्यंकटराव नाना=बनूबाई (दु.रघूजीची मुलगी)

|

बाजीराव (परसोजीच्या बा.स दत्तक) ति. रघूजी भोंसले

चिटकोजी ऊ० बाबाजी (येल्होजी मोहित्याचा पुत्र दत्तक)

|

आबासाहेब

|

कृष्णराव

|

व्यंकटराव दाजीसाहेब विद्यमान

---

**जमादार** ( रजपूत )

झार्मसिंग (गाविलगडचा किल्लेदार)

|

परमोर्दसिंग

|

बेनीसिंग

पुढें वंशज बैतूल जिल्ह्यांत भैसदेही येथें आहेत.

---

१ झार्मसिंग प. रघूजीनें बंगाल्यांतून पाडाव करून आणिला.

---

* पान ५६७ वरून—२ शंकरशहा व रघुनाथशहा हे बंडांत सामील झाल्यामुळें त्यांस तोफेच्या तोंडीं दिलें.

३ हिरदेशहानें मंडल्यास राजधानी आणून जवळच रामनगर येथें राजवाडा बांधला. त्यावर त्यानें आपली वंशावळी व प्रशस्ति संस्कृत भाषेंत खोदविली आहे.

४ संग्रामसिहानें चौरागड व सिंगोरगड हे किल्ले बांधले.

## गुप्ते ( चां. का. प्रभू )




काशीराव यानें ना. भो. छापील बखर लिहिली.

---

## गोसावी*

बनसीपुरी ( दशनामी महंत मठ सातारा )
|
हंसपुरी
|
उदेपुरी — वैजनाथपुरी
| (नागपुर)

रघुनाथपुरी — दत्तपुरी

( पुढें माहिती नाहीं )

---

* नागपुरचे महेशपुरी यांचा यांशीं कांहीं संबंध नाहीं. ते पदमपुरी मठाचे वंशज




१ रखमाजी हा सातारचे चिटणीस गोविंदराव यांचा मामेभाऊ. प. रघूजी बरोबर नागपुरास आला.

२ चिमाजीस पुत्र नसल्यामुळें त्यानें आपले मामाचा मुलगा कृष्णराव माधव यासच पुत्रवत् मानून आपले मागें चिटणिशी मिळावी अशी व्यवस्था केली. (अप्र. का.)

३ सर्व सुभ्यांत चिटणिशीचे कामावर या घराण्यातर्फे कारकून जात असत.

४ कृष्णराव माधव हा वऱ्हाडांत कुऱ्हे येथें स. १२१३ फसलींत (इ.स. १८०३) दु० रघूजीबरोबर असतांना मरण पावला. कुऱ्हे येथें यशवंतराव रामचंद्र हा वेलस्लीशीं देवगांवचा तह करून रघूजीची संमति घेण्याकरितां आला होता. तेथें रघूजीच्या सैन्याचा तळ होता.

**चोरघोडे** (ऋ. दे. ब्रा.)

दिवाकर पुरुषोत्तम उ०
देवाजीपंत (नरखेडचा राहणार)
|
कोका बापू (दासीपुत्र)
|
०
(प्रत्यक्ष वंशज कोणी नाहींत)

---

१ दिवाकरपंतामागें त्याचा भाचा बळवंत विष्णु हा कांहीं दिवस काम करीत होता. नंतर त्याचा भाऊ जनार्दन विष्णु हा काम करीत होता. त्यांचेहि कोणी वंशज नाहींत. (अप्र. का.)

२ दिवाकरपंताचा मेहुणा एक शिवराम हरी म्हणून होता तो मुधोजी तर्फे नागपुरचा कमाविसदार होता.

---

**जाचक** (वर्धा जिल्ह्यांत—मराठे)

ऱ्होजी (प. रघूजीबरोबर)
|
रखमाजी
|
मल्हारराव | जोत्याजीराव | ऱ्होजी

---

रखमाजी जा० अप्र. पत्र.

१ पदमोजी जाचक (पे. द. २० पा. ४०)

२ दारकोजी जाचक. ओरिसांत बाराभाटीचा किल्लेदार (मृ. १७७६इ.)
(Per. calendar P. V. P. 15)

३ दारकोजीचा पुत्र हैबतराव हाहि बाराभाटीचा किल्लेदार
(इ. १७७६ पासून)

४ वंशज वर्धा जिल्ह्यांत आर्वी तहसिलींत सोरठा वगैरे गांवचे मालगुजार आहेत.

---

## चंद्रपुरचे गोंड राजे

भीमबल्लालसिंग (शिरपुर येथें)
|
हीरासिंग
|
केसरसिंग
|
दिनकरशहा
|
रामसिंग
|
सुरजा बल्लालशहा
|
खांडक्या बल्लालशहा (बल्लाळपुरास आला)
|
हीरशहा
|
कोंडीशहा उ० कर्णशहा ( वंशज )

बाबाजी
|
धुंडीरामशहा
|
कृष्णशहा
|
वीरशहा
|
रामशहा
|
नीळकंठशहा

पुढें वंशज चंद्रपुरास आहेत. हल्लीं यादवशहा नांवाचा प्रमुख आहे.

---

नीळकंठशहाचे वेळेस नाग० भो० राज्य खालसा केलें. त्याचे वंशजास सालीना ५०० रु. पेनशन व कांहीं हक्क मिळतात. भाग २ पहा.




सुंदर बहिराजी प्रभु याचेनंतर मुधोजीनें मुकुंदजी बाबाजी प्रभु यास जामदारखान्याचें काम दिलें. मुकुंदजीतर्फे नारो रघुनाथ प्रभु हा काम करीत होता व त्याचे हाताखालीं नारो शंकर हा कारकून होता. नारो रघुनाथ यास मुधोजीनें पुढें महिपत दिनकर याचे जागीं चंद्रपुरास सुभेदार नेमिलें व नारो शंकर यास जामदारखान्याचें काम सांगितलें. हा प्रथम साताऱ्याहून आकोटास कोणा मुसलमानाकडे नोकर होता. त्यानें त्यास कैद केलें. ब्रम्हेंद्रस्वामीच्या शिफारशीवरून रघूजीनें सोडवून नागपुरास आणिलें. (भा. ३ पहा.) रघूजीबरोबर प्रथम साताऱ्याकडून आला ही समजूत चुकीची आहे. (ब्र० स्वा. च. ले. २९५ पहा.)

---

**नाईक** (गाइकवाड)
दारकोजी–विश्रामजी.
|
गिरमाजी नाईक (सिलेखान्याचा मुख्य)
|
राणोजी.
पुढें वंशज नागपुरास

---

जवाहीरखाना व सिलेखाना.

### तिखे नागपुर (ऋ. दे. ब्रा.)




१ रामाजी केशव यास व मोरोपंत फडणीस यांस मुधोजीनें महिपत-राव दिनकर याचे मार्फतीनें गायकवाडाकडून आणलें. पुढें रामाजीस चंद्रपुरास दिवाण केलें. मूळ पुण्याकडील राहणारे.

२ गबाजी हा कुंभारीच्या लढाईनंतर नागपुरास येतांना मरण पावला (इ. १७७३)

३ माधवराव बिंबाजीजवळ छत्तीसगडांत होता. त्यास मुधोजीनें नागपुरास आणलें.

४ गणपतराव हा आप्पासाहेबाचे कारकीर्दींत फौजेवर मुख्य होता.

---

### तुळजोराम-सरदार (ऋ. दे. ब्रा. )

तुळजोराम (प. रघूजीबरोबर साताऱ्याकडून आला.)

|

यमाजी

|

पुत्र (हैद्राबादेकडेस गेला)

पुढें माहिती मिळत नाहीं.

तुळजोरामपंत हा रघूजीचा प्रख्यात सरदार होता. त्यानें बंगाल, कटक पर्यंत स्वाऱ्या केल्या. रघूजीच्या सर्व स्वाऱ्यांत हा रघूजी करांड्याप्रमाणें प्रमुख सरदार होता.

## दिवाण शिवणीकर (पठाण.)

महमदअलीखां (मृ. १७५९)




पुढें वंश शिवणी येथें. हल्लीं सुजातअलीखां.

---

१ मजीदखान हा जानोजीच्या पक्षास होता. जानोजीनें यास चंद्रपुरचे वेढ्यावर ठेविलें होतें. ब. पा. ६६

२ पांचगांवचे लढाईंत मजीदखान व त्याचा पुत्र म० अमीनखा हे साबाजीच्या पक्षास हजर होते. ब. पा. ११५

३ ताजखान यानें नारायण पेशव्याचा मारेकरी म० ईसफ यास पकडलें. त्याबद्दल त्यास एक गांव जहागीर मिळालें.

---

## दुबे (हिंदुस्थानी कान्यकुब्ज ब्रा.)

शिवभद्र




पुढें वंशज हुशंगाबाद जिल्ह्यांत आहेत.

---

बेनीराम हा कलकत्त्यास भोंसल्यांतर्फे वकील होता. हे सर्व भाऊ इंग्रजांस अनुकूल होते.

## देवगडचे गोंडराजे (राजगोंड)




---

### नाईक – नवघरे– नागपुर (मराठे कु.)

उदाजी ना. (ब. पा. १७०)

वऱ्हाडांतील चिखली तालुक्यांतील मंगरूळ (नवघऱ्याचे) या गांवचे पाटील.

---

### नाईक – मापारी – नाग. (मराठे कु.)

व्यंकटराव

|

गणपतराव.

---

१ वऱ्हाडांतील मेहेकर तालुक्यांतील लोणार येथील पाटील.

---

**धर्माजी भोंसले,** नागपुर (मराठे दासीपुत्र)

लक्ष्मणराव (प. रघूजीचा दासीपुत्र)
|
अर्जुनजी
|
धर्माजी (आप्पासाहेबानें ठार मारलें.)
|
कृष्णाजी

पुढें वंश नागपुरास

---o---

**नगरनाईक काळे** (नागपूर व काशी) यजु. दे. ब्रा.

माधोजी नाईक
|
लक्ष्मीकांत नाईक

(वंशज काशीस राहातात)

---

मूळ राहाणार तळेगांव दशसहस्त्र. वऱ्हाड.

---

**नरसिंगराव भवानी प्रभु**

बंधु

भवानी — लक्ष्मण

भवानी
|
नरसिंगराव बुवाजी (प. रघूजीबरोबर)

लक्ष्मण
|
काशीराव (सातारा) फडणीस
|
- व्यंकटराव
  |
  जगजीवन
- महीपतराव
  |
  शिवराव
  |
  राजेश्वर
- लक्ष्मणराव
  |
  जीवनराव

---

**नबाब नागपुर. (मुसलमान)**

नबाब सिद्दिक अलीखान.

न. ताकीअलीखान — कादरअलीखान

१ मुलगी–दौलतबेगम – हिदायतहुसेन व. इमदादहुसेन सुभा

२ मुलगी–बातुल्ला बेगम हैदराबाद

१ न. कमरुद्दीनअलीखान
- इमदाद हुसेन (विद्य.)
- अबदुलकियाम (विद्य.)

२ न. गुलाम मोहिउद्दीन अलीखान
- १ खा.सा.सिद्दीकअलीखान फ.क्ला.मॅजिस्ट्रेट (विद्य.)
- २ ताकीअलीखान (विद्य.)
- ३ इब्राहिम अलीखान (विद्य.)
- ४ हिदायत अलीखान (विद्य.)

मूळपुरुष सिद्दीकअलीखान हा टिपूचा नातलग होता.

श्रीरंगपट्टणाहून टिपूकडून कांहीं राजकारणाकरितां दु. रघूजीकडे आला. तो गंगथडींत त्यास भेटला. तसेंच त्यास रघूजीनें नागपुरास आणलें. त्याचेबरोबर प्रथम शंभर स्वार होते. नंतर त्यानें अनेक पराक्रमार्चीं कामें केलीं. विशेषतः मीरखान पेंढाऱ्याविरुद्ध त्यानें जय मिळविला. त्याबद्दल रघूजीनें त्याचा फार सन्मान केला. आप्पासाहेबाचे वेळेस त्याचेवर इतराजी झाल्यामुळें त्यास कैदेंत टाकलें. पुढें सोडलें. पुढें तो इंग्रजांच्या बाजूस राहिला. तिसऱ्या रघूजीच्या वेळेस रीजन्सीमध्यें कारभारी होता.

मोहपा जहागीर तीस हजारांची या घराण्यांत होती. न० ताकीअलीच्या वेळेस ती गेली. त्यानंतर या घराण्यांतील पुरुषांस कांहीं पेनशन मिळत होतें. तें कमी होत होत आतां नाहीसें झालें आहे. त्याचे घराजवळील भागास नबाबपुरा असें म्हणतात.

या घराण्यांतील कादरअलीखान यास सत्तावन सालाचे बंडाचे वेळेस बंडात सामील असल्याच्या आरोपावरून सीताबर्डीचे किल्ल्यांत फांशी दिलें. तो एवढा जबरदस्त होता म्हणतात कीं दोनदां फांस तुटले. हा पहिल्या नबाब सिद्दिकअलीखानाचा चुलतभाऊ होता असें वंशज सांगतात. कांहीं ठिकाणीं तो त्याचा मुलगा होता असें आढळतें.

---

**नाईक**– झेंडेवाले नागपुर (मराठे कु.)

१ वऱ्हाडांत चिखली तालुक्यांतील धोत्र (नायकाचें) या गांवचे राहणार.

---

**नाईक** – तुपकर – नागपुर (मराठे कु.)

गंगाजी नाईक
|
लक्ष्मण नाईक
|
मारुती नाईक (पेनशनर)

वंशज नागपुरास आहेत.

---

वऱ्हाडांतील चिखली तालुक्यांतील आंढेरा येथील पाटील.

---

## निंबाळकर

पिराजी नाईक.

महादाजी ब. पा. ७१

---

## पटवर्धन झिपरे (को. ब्रा.)

सिक्केनवीस

(सावकार) रघुनाथभट = बचाबाई (प. रघूजीचा शिक्का इचे हातांतील पाटलीचा होता)

|

महादेवभट

|

बाळकृष्णभट (सावकार)[1] = बहिणाबाई (काशीस मृत्यु)

रघुनाथराव (मुधोजीनें शिक्केनवीसिचें काम काढून दुसऱ्यास दिलें)

|

गणपतराव

|

नारायणराव (बऱ्हाणपुरास भुसकुटे यांचे आश्रयास गेला.)

(हल्लीं वंशज काशीस)

---

१ बाळकृष्णभटाचे मध्यस्थीनें एलिचपुरास साबाजी व मुधोजी यांचा समेट झाला.

---

## पानतावणे (ब्रा. दे.)

विश्वनाथपंत (सिरपुरचा किल्लेदार)

|

येसोबादादा (पांचगांवचे लढाईंत जखमी)

|

गंगाधर (सीताबर्डीचे लढाईंत हजर)

|

पांडुरंग

पांडुरंग गंगाधर हा ति. रघूजीचे मरणानंतर कलकत्त्यास अन्नपूर्णाबाई-तर्फे वकील म्हणून गेला होता.

---

**पोतनीस** नागपूर (जामदार प्रभु)

शंकराजी रखमाजी (प.रघूजीचे वेळीं पोतनीस व जामदार ब. पा. ३४)

सुदर बहिराजी (पुतण्या)




१ सुंदर बहिराजी याचे हाताखालीं देवाजी नारायण डोंगरदेव व बाबूजी भुरे हे कारकुनी करीत असत तेहि बरेच प्रसिद्धीस आले.

जामदारखान्याचें काम नारोशंकर याजकडे नंतर गेलें.

(जामदार वंश पहा.)

---

**पंडितजी, नागपुर** ( य. दे. ब्रा. )

नारायण गोपाळ

माधवराव (तात्यासा०) — शंकरराव — वंशज नागपुरास धनतोलीस आहे.

गणपतराव (बापूसा०)

१ नारायण गोपाळ हा नागपुरास काशीचा सावकार गणेशदास गोपाळदास याचे पेढीवर मुनीम होता. त्याचे देण्याघेण्यावरून दु० रघूजीशीं संबंध आला. नारायण गोपाळ हा आप्पासाहेबाचे वेळेस प्रसिद्धीस आला. रेसिडेंटाकडे आप्पा सा० तर्फे वकील.

२ माधवराव भंडाऱ्यास सुभेदार.

३ गणपतराव सुरू इंग्रजीत अपील कोर्टावर जज्ज व चंद्रपुरास सुभेदार.

४ जबलपुर व नागपुरचे बाजूस यांस मोकासे वगैरे आहेत.

**फडणीस**, नागपुर (ऋ. दे. ब्रा.)




पुढील वंश नागपुर व जवळपास आहे.

१ आनंदराव व अमृतराव यांनीं फडणीसीचें काम केलें.

२ कृष्णराव हा रायपुरचा सुभेदार व गोपाळराव हा नागपुरचा सुभेदार होता.

३ तात्यासाहेब हा दर्याबाईचा (ति. रघूजीची वायको) कारभारी होता.

---

**बक्षी**. कडेवाळीकर (ऋ. दे. ब्रा.)




१ जानोजीनें महीपतरावाची बक्षीगिरी काढून भवानी काळो यास दिली.

२ महिपतरावाचे हाताखालीं अवधूतपंत व त्याचा पुत्र सखाराम अवधूत हे होते तेहि प्रसिद्ध होते.

---




(वंशावळ श्री. माधवराव गणेश बावडेकर इनामदार पुणें यांजकडून)

---

१ मूळ घराणें केळशी (जि. रत्नागिरी). केसोबा काशीस सावकार

२ बाबूजी नाईक बारामतीकर प्रसिद्ध सावकार व मुत्सद्दी. मराठेशाहींत पेशव्यांचा प्रतिस्पर्धी व रघूजी भोंसल्याचा पक्षपाती. कवि मोरोपंत याचा आश्रयदाता.

३ आंबूजो यास बाळाजी विश्वनाथ पेशव्याची कन्या दिली होती.

४ नारायण ऊर्फ नानाजी कृष्ण जोशी हा नागपुरास भोंसल्यांचा सरदार रघूजी करांडे याचा कारभारी होता. जानोजी व मुधोजी यांचे भांडणांत करांडे हा मुधोजीच्या पक्षास गेल्यामुळें हाहि मुधोजीच्या पक्षास गेला व त्याचा कारभारी झाला. त्यामुळें त्यावर जानोजीचा मोठा रोष होता. ( पे. द. भा. २० पा. ९०, ९५, ९६ पहा.)

नंतर मुधोजी व साबाजी यांच्या भांडणांत हा साबाजीच्या पक्षास गेला. पांचगांवचे लढाईंत ( २६–१–१७७५ इ.) हा साबाजीचे पक्षास होता. तो एका स्वतंत्र अंबारींत असतांना मुधोजीनें बंदुकीची गोळी मारून त्यास ठार केलें. साबाजी यासहि मुधोजीनें गोळी मारून ठार केलें. त्याचे वंशज सातान्यास आहेत.

( मागें पा. २०६–२०७ पहा.नाग. भो. बखर पा. ११६.)

## बिनीवाले (ऋ. दे. ब्रा.)




१ गुन्डो शंकर हा दु. रघूजीच्या सर्व मोहिमांत हजर. मीरखान पेंढारी याचेशीं झालेल्या लढाईंत जखमी.

२ रंगराव हा पांचगांव, बदामी व खर्ड्याचे लढाईंत हजर व जखमी. कटक प्रांतांतील एका मोहिमेंत पडला.

३ सीताराम यास इंग्रजींत ६६६ रु. पेनशन मिळत असे.

४ पुढें वंशज किनगांव जटू व भुमराळे (वऱ्हाड बुलढाणा जि०) येथें भोंसल्यांच्या जहागीर गांवीं आहेत.

---

## भुसकुटे, बऱ्हाणपूर. (कों. ब्रा.)




रामचंद्र बल्लाळ यास नानासाहेबानें ता. १७–२–१७५४ मध्यें नेमाड प्रांताचे मंडलोई व सरकानूनगो नेमलें.

---




भवानी नागनाथ व श्रीधर लक्ष्मण हेच दोन पुरुष प्रसिद्धीस आले.

---

**मोहिते** नागपुर (मराठे)

केदारजी

|

मानसिंगराव (प.रघूजीचा जावई)

पुढें वंश नागपुरास

केदारजी मोहिते याचे पुत्र मानसिंगराव यास प. रघूंजीची मुलगी बांकाबाई ही दिली होती त्यामुळें नागपुरास आणिलें ब. ४८; कृष्णाजी ब. ६३.

---

**राजाराम मुकुंद** – कटकचा सुभेदार.

|

सदाशिव

पुढें माहिती मिळाली नाहीं.

## रिसालदार. नाग. ( ऋ. दे. ब्रा.)




१ रामचंद्र व गोविंद हे एलिचपुरास इस्मायलखान नबाबाचे पदरीं होते. साबाजीनें नागपुरास आणिले. रामचंद्र दादो अनेक कामीं वकिली-वर होता.

२ यशवंतरावाची बहीण श्रीधर मुनशीचे भावास दिली होती.

३ यशवंतराव देवगांव येथें वेलस्लीशीं झालेल्या तहांत ( १८०३ इ. ) दु. रघूजीचा वकील होता. व त्या तहावर यशवंतरावाची सही आहे. त्यास इंग्रजांकडून सालीना १५ हजार रुपयांचें पेनशन होतें.

४ केशवराव भोंसल्यांतर्फे हैदराबादेस व जयकृष्ण हा ग्वाल्हेर, पुणें वगैरे दरबारीं वकील होता. जयकृष्ण पायदळावर मुख्य होता. माधवराव निजामाकडेस नोकर राहिला.

**लष्करी** ( ऋ. दे. ब्रा.)

महादाजी बल्लाळ लष्करी.

पुढें माहिती मिळाली नाहीं.

मूळ पुरुष वणीचा राहणार.

---

**वाघ**. नागपुर ( मराठे )

आनंदराव ( प० रघूजी ब. )

|

रामचंद्र वाघ ( आप्पासा०चे वेळेस प्रसिद्धीस.)

पुढें माहिती मिळाली नाहीं.

---

रामचंद्र वाघ हा दु० रघूजीचे शेवटीं व विशेषत: आप्पासाहेबाचे बरोबर यास कैद करून प्रयागास पाठविलें. तो तेथें कैदेंत होता. पुढें जबलपुरास होता असा दाखला सांपडतो. त्यापुढील माहिती मिळत नाहीं.

---

**शिरके** नागपुर (मराठे)

संभाजी (प. रघूजीची बायको सकवारबाई इचा भाऊ ब. ४८.)

|

गुणाजी

|

बहिराजी (दादबा)

पुढें माहिती मिळाली नाही.

---

**वैद्य**. वाई (कों. ब्रा.)

विश्वनाथ

|

बाबूराव

|

नारायण

पुढें वंश वाई (जि.सातारा येथें आहे पुण्यासहि वाडा आहे.)

---

पुणें दरबारचे वकील नागपुरास.

**सखदेव** (ब्राह्मण)

तिमाजी सखदेव
|
व्यंकोजी सखदेव ( कटकचा सुभेदार. )

पुढें वंश नागपुरास

तिमाजी सखदेव चंद्रपुरच्या गोंड राजाचा दिवाण होता. प० रघूजीनें चंद्रपुर घेतलें तेव्हां त्याकडे आला. ब. ४२

---

**सुभेदार** भंडारा (ऋ. दे. ब्रा.)

व्यंकटराव पांडुरंग (छत्तीसगडचा सुभेदार)
| (तात्या)

- सखाराम (छत्तीसगडचा सुभेदार)
  - गोविंदराव (नागपुर.)
- गणपतराव (भंडाऱ्याचा सुभेदार)
  - सदाशिवराव (भंडारा विद्य.)
  - निळकंठराव (भंडारा विद्य.)

---

(वंशज नागपुर व भंडारा येथें आहेत.)

१ मूळपुरुष भोकरधन तालुक्यांतील राहणारे. तिकडे बोरगांवीं भाऊबंद आहेत.

**सुभेदार परांजपे** ( कों. ब्रा. )

बाळाजी
|
विठ्ठल बल्लाळ
|
गणपतराव

( पुढें माहिती मिळत नाहीं. )

---

१ विठ्ठल बल्लाळ हा जानोजी व दु०रघूजीचे वेळेस मोठा प्रसिद्ध सरदार होता. खडर्याचे लढाईंत भोंसल्यांचे सैन्यावर मुख्य होता.

२ गणपतराव हा आप्पासाहेबाचे वेळेस मुख्य सरदार असून सीताबर्डीचे व सक्करदऱ्याचे लढाईंत हजर होता. त्यानंतर पळून गेला व दु० बाजीरावास घेऊन आला. पुढें अहमदनगरचे किल्ल्यांत कैदेंत मरण पावला.

३ पुढील माहिती मिळत नाहीं.

# नागपुर प्रांताच्या इतिहासाची सूचि

ब

## भ

## य

# या ग्रंथावरील कांहीं अभिप्राय

## १

श्री. यादवराव काळे यांनी नागपूरच्या इतिहासाचीं मुद्रितें मला आगाऊ वाचण्यास दिलीं याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. इतर विषयांप्रमाणेंच इतिहासासंबंधानेंहि हल्लींचें युग विशिष्ट अभ्यासकांचें असून प्रत्येकानें लहानसें क्षेत्र आंखून घेऊन तेवढ्यांतच आपल्या बुद्धीचें व श्रमाचें सार्थक करून दाखविणें किती जरूर आहे हें मी प्रसंगानुसार वारंवार सांगत आलों आहे. मराठ्यांच्या इतिहासावर अलीकडे इतकें साहित्य निरनिराळ्या भाषांतलें प्रसिद्ध होत आहे कीं, त्या सर्वांचा एका व्यक्तीकडून परामर्ष घेणें शक्य नाहीं. या दृष्टीनें श्री. काळे यांच्या या नवीन पुस्तकानें मराठ्यांच्या इतिहासांतील एका अत्यंत महत्त्वाच्या भागाचें साधार व निःपक्षपात विवेचन वाचकांस उपलब्ध होत आहे हें मी आपल्या इतिहासाचें मोठें सुदैव समजतों. त्यांनीं कांहीं वर्षांपूर्वीं वऱ्हाडचा इतिहास लिहिला, त्याच वेळीं नागपूरचा समग्र इतिहास तयार करण्याचें काम त्यांनीं आंगावर घ्यावें असें मला वाटलें होतें; आणि आतां तें त्यांच्याच हातून सिद्धीस गेलें ही मोठी संतोषाची गोष्ट आहे. या पुस्तकाचा मुख्य गुण हा आहे कीं, प्रत्येक लहानमोठ्या मुद्याची प्रकाशित आधारांच्या साह्यानें तपासणी करून सत्य प्रतिपादन करण्याचा कसोशीचा प्रयत्न करण्यांत आला आहे. नागपुर प्रांताशीं, तेथील स्थलांशीं व व्यक्तींशीं पूर्ण परिचित असलेल्या गृहस्थांशिवाय बाहेरच्या इसमाकडून हें काम इतकें चोख होणें शक्य नव्हतें. रघूजी भोंसल्याच्या व भास्कररामाच्या बंगालच्या स्वाऱ्यांची मीमांसा या पुस्तकांत यथायोग्य करण्यांत आली आहे. खरें म्हटलें तर श्री. काळे यांनीं आपलें पुस्तक इंग्रजींत प्रसिद्ध केलें असतें तर तें समग्र हिंदी वाचकांस उपलब्ध होऊन त्यामुळें हल्लींचा विकृत इतिहास सुधारण्यास पुष्कळच मदत झाली असती. अद्यापि तसा योग जुळून यावा अशी माझी फार इच्छा आहे.

प्रकृति नादुरुस्त असतांहि केवळ आवडीच्या विषयांत कालक्षेप करून श्री. यादवरावांनीं या पुस्तकानें मराठ्यांच्या ऐतिहासिक ग्रंथांत महत्त्वाची भर टाकली आहे. त्याचा योग्य तो उपयोग मराठी वाचक करून घेतील अशी मला आशा आहे.

कामशेत<br>ता. ९-७-१९३४

**गो. स. सरदेसाई**

Mr. Y. M. Kale's **History of Nagpur** is really an encyclopædia of information on the past history and cultural Life of the Central Provinces and Berar. It represents a life's labour in research and excursion to historical places and personal inquiry. The present edition has been enriched by incorporating the fresh information brought to light by the publication of Mr. G. S. Sardesai's series of **Selections from the Peshwas' Daftar,** and thus enables us to correct many prevailing errors.

The book will be very helpful to other workers who wish to make a minute specialised study of any sub-division of the many subjects embraced in this volume, as I cannot imagine a better starting point and guide for such research than this learned and full volume.

*3rd August,* 1934.

Sd/- **Jadunath Sarkar,**
KT., C. I. E., M. A.,
Hony. Member, Royal Asiatic Society of Great Britain.

रा. यादवराव काळे यांचा नागपुरचा इतिहास म्हणजे मध्यप्रांत व वऱ्हाडच्या ऐतिहासिक व सांस्कृतिक आयुष्याच्या माहितीचा एक बृहन्कोशच आहे. ग्रंथकारानें सर्व आयुष्यभर अनेक ऐतिहासिक स्थळें स्वतः पाहून व स्वतः चौकशी करून केलेल्या संशोधनाचा हा इतिहास एक निदर्शक आहे. रा. गो. स. सरदेसाई यांनीं छापलेल्या पेशवे दप्तराच्या खंडांतील नवीन माहितीचा उपयोग या ग्रंथांत केल्यामुळें हा ग्रंथ पूर्ण झाला आहे व त्यायोगानें हल्लीं प्रचलित असलेल्या पुष्कळ चुका दुरुस्त झाल्या आहेत.

या ग्रंथांत समाविष्ट झालेल्या अनेक विषयांचे पोटभाग पाडून त्यांचा बारकाईनें विशेष अभ्यास करणाऱ्या लोकांस या ग्रंथाची फारच मदत होईल कारण कीं, या विद्वत्तापूर्ण व विस्तृत ग्रंथापेक्षां संशोधनास जास्त उपयोगी व मार्गदर्शक मूलग्रंथ दुसरा कोणताही दिसत नाहीं.

३ ऑगस्ट १९३४.

(सही) जदुनाथ सरकार
नाईट, सी. आय्. ई., एम् ए.
ऑ. मेंबर रॉयल एशियाटिक सोसायटी ग्रेट ब्रिटन.